# पद्मपुराण

## (जैन रामायण)

मूळ कवि : आचार्य रविषेण

मराठी काव्य रूपांतर :

जिनवाणीभूषण पं. जिनदास पार्श्वनाथ फडकुले, न्यायतीर्थ,

सोलापुर.

वीर संवत् २४९१

ानेवारी १९६५ * किमत दहा रुपये

## ※ रामायण प्रकाशन समिति ※



---



---

※ चित्रकार :— प्रा. भय्यासाहेब ओंकार, पुणे ※

---


प्रकाशक :

श्री रामायण प्रकाशन समिति
४३७, प. मंगळवार, चाटी गल्ली,
सोलापुर.

मुद्रक :

श्री. प्रकाशचंद्र फुलचंद शहा
मेसर्स वर्धमान छापखाना,
५१९, शुक्रवार, सोलापुर.

# निवेदन

रामायण या काव्यग्रंथाचा हा दुसरा खंड. श्री. रविषेणाचार्यांच्या 'पद्मपुराण' या महाकाव्याचे अत्यंत सुरस व सुंदर मराठी रूपांतर आमच्या वाचकांच्या पुढे ठेवताना आम्हाला आनंद वाटत आहे. सुमारे सोळाशे पृष्ठांचा ग्रंथ मुद्रित करणे हे आजच्या काळातले जसे एक दिव्य आहे तसेच इतकी प्रदीर्घ कविता लिहिणे हेही एक विलक्षण दिव्य म्हटले पाहिजे. पं. जिनदास पार्श्वनाथ फडकुले यांच्या लेखणीची गती चौदा सहस्र आर्यापर्यंत कुठेही कुंठित होऊ नये हा अलीकडच्या काव्यसृष्टीतला एक चमत्कार.

रामायण-प्रकाशनसमितीने हा ग्रंथप्रकाशनाचा प्रचंड खटाटोप का केला? धार्मिकतेच्या व शुद्ध काव्यरसिकतेच्या अवनतीच्या काळात ग्रंथप्रकाशनाचे हे आर्थिक दिव्य करण्यात कोणता अर्थ आहे? समितीला आर्थिक हानीची फारशी मातब्बरी वाटत नाही. आठशे पृष्ठांच्या खंडाची नाममात्र किम्मत ठेवण्यात हे सूचित झाले आहेच. पण रामायणाकडे पाहाण्याचा जैनदृष्टिकोन कसा आहे व

रामसीता या पुण्यशील व्यक्तींच्या जीवनात कोणता तत्वभाग आढळतो यावर स्वच्छ प्रकाश 'रामायणातून' पडलेला दिसतो. रामायणासारख्या ग्रंथाचे सर्वत्र वाचन व्हावे व आजच्या केवळ भौतिक सुखाच्या पाठीमागे बेभानपणे धावत सुटलेल्या भोगवादी प्रवृत्तीचा काही प्रमाणात तरी निरास व्हावा, आत्मचिंतनाची, आत्मकल्याणाची व सम्यक्‌दर्शन करून घेण्याची ओढ कांहीं अंशांनी तरी उत्पन्न व्हावी असे आम्हाला तीव्रतेने वाटते. धर्मभावनेने उजळलेल्या व अंतःकरणांत सत्प्रवृत्तींच्या बीजारोपणास साहाय्य करणाऱ्या उदात्त साहित्याची आज विशेष आवश्यकता आहे. आजच्या साहित्याला धार्मिक भावनेचे जीवनचिंतनाचे अधिष्ठानच नाही. रोगटपणा, मानसिक विकृति, असंस्कृतपणा, उथळपणा, विचार-दारिद्र्य, सवंग सुखाची अनिवार आसक्ति यांचे भयानक प्रदर्शन आजच्या साहित्यात होत रहावे हे दुर्दैव. अश्लीलतेच्या आरोपावरून काही लेखकांना आरोपीच्या पिंजऱ्यातही उभे रहावे लागत आहे. इतके खरे की वाङ्मयाने मनुष्य-मनातल्या पशुत्वाचा निरास करावा. अमृताच्या संजीवक स्पर्शाने जी निरामयता येते ती श्रेष्ठ साहित्याच्या परिशीलनातून मनाला यावी. सुसंस्कृतपणाची वाढ ज्या अनेक साधनांनी होत असेल त्यात साहित्याला अग्रस्थान दिले पाहिजे. संस्कृतीची रचना करणारी साहित्य ही एक संपन्न शक्ति आहे. कलावादाचा पुरस्कार करणारे व साहित्य हे केवळ मनोविनोदनासाठीच असते असे मानणारे साहित्यकोविद कळत न कळत आपले विचारदारिद्र्य तर लपवीत नाहीत ना अशी शंका येऊन जाते. आम्हाला तरी साहित्य व संस्कृति यांचा संबंध अविच्छिन्न आहे असेच वाटते. 'रामायणासारख्या' पुण्यप्रतापी ग्रंथाचा व त्यांतील तत्त्वज्ञानाचा आदर्श आजच्या, उद्यांच्या पिढीसमोर असणे अत्यंत जरूरीचे आहे म्हणूनच या ग्रंथाचे प्रकाशन आम्ही सर्व प्रकारच्या अडचणीतून वाट काढून केले आहे.

प्रस्तुत साहित्याचे कलात्मक सौंदर्य व त्याचा तात्विक आशय या दोन्ही महत्त्वाच्या घटकांकडे रसिक वाचकांनी लक्ष द्यावे अशी विनंती आहे. मराठी पंडिती कवितेच्या इतिहासात पं. फडकुले यांच्या 'रामायणाला' अत्यंत महत्त्वपूर्ण स्थान मिळेल असा आम्हाला विश्वास वाटतो. ग्रंथप्रकाशनासाठी ज्यांनी सहाय्य केले त्या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

– रामायण प्रकाशन समिति.

# पद्मपुराण (जैन रामायण) भाग २ रा

## विषयानुक्रम

असें तो त्याला म्हणाला. कळविण्याचें बिभीषणानें कबूल केलें ३६-३७, सीतादेवीला पाहून मारुतीच्या मनीं अत्यादर ३७, रूपांतरित मारुतीनें तिच्यापुढें आंगठी टाकली. ती पाहून तिला हर्ष झाला ३८, रावणाचा स्वीकार कर असें मंदोदरीनें म्हटल्यामुळें कोपून सीतेनें जें भाषण केलें तें ३८-३९, प्रगट झालेल्या मारुतीनें रामाची विरहावस्था सांगितली ३९-४०, सीतामनांत पतिविषयीं उत्पन्न झालेल्या अनिष्टकल्पनांचें निरसन करून तिच्या परोक्ष गोष्टींचें वर्णन मारुतीनें केलें ४०-४२, सीता देण्याविषयीं मी रावणास सांगतो असें मारुतीनें म्हटलें ४२-४३, मंदोदरीच्या भाषणास मारुतीचें खमंग उत्तर ४३, मंदोदरी मारुतीला कोपानें बोलते हें पाहून सीता तिची हजेरी घेते ४३-४४, मंदोदरी वगैरे स्त्रिया सीतेला मारावयास उठल्या असतां मारुति सीतेचें रक्षण करतो ४४, पतिवार्ता कळल्यानंतर सीतेची प्रतिज्ञा समाप्त झाली व तिनें आहार घेतला ४४-४५; आपण माझ्या खांद्यावर बसा मी श्रीरामचंद्राकडे नेतो असें मारुतीनें म्हटल्यावर सीतेनें त्याला उत्तर दिलें ४५-४६, रामचंद्राना देण्यासाठीं विस्तृत निरोप मारुतीला कळविण्यासाठीं सीता सांगते ४६-४७, मारुति लंकेबाहेर आल्यावर त्याला मेघनादादिकांनीं घेरलें ४८-४९, इंद्रजितानें नागपाशांनीं बांधून मारुतीला लंकेत नेलें. व रावणापुढें त्याच्या दोषांचें वर्णन केलें ४९-५०, रावण व त्याच्या स्त्रियांनीं मारुतीची निंदा केली. तेव्हां रावणाला व त्याच्या स्त्रियांना मारुतीचें सडेतोड उत्तर ५०-५२, 'हा भूगोचरांचा दास' म्हणून याला लंकेंत फिरवा अशी आज्ञा रावण नोकरांना देतो. मारुति बंधन तोडून निघून गेला ही वार्ता ऐकून सीतेनें त्याला परोक्ष पुष्पांजलि वाहिली ५२-५३.

## पर्व ५४ वें– ( पृ. ५६–६१ )

रामाला वंदन करून मारुतीनें चूडामणि त्यांना दिला व उभयांच्या परिचित गोष्टी त्यानें सांगितल्या ५६-५७, बंधो ! आपण शोक सोडा. लौकर लंकानगरीला जाऊ या असें लक्ष्मणाचें भाषण व त्यास उद्देशून सिंहनादाचें भाषण ५७, चन्द्रमरीचीचें सिंहनादास उद्देशून भाषण ५७-५८, रामचंद्रादिकांचें लंकेकडे प्रयाण व शुभशकुनें ५८-६०, समुद्रराजानें सत्यश्री आदिक चार कन्या लक्ष्मणाला दिल्या ६०-६१.

## पर्व ५५ वें– ( पृ. ६७–७३ )

बिभीषणाचा रावणाला उपदेश. इंद्रजिताचें बिभीषणाविषयीं अपमानकारक भाषण ६७-६८, बिभीषणाचें इंद्रजितास कठोर भाषण ६८, रावण बिभीषणास

सांगितलें. नंतर भामण्डलादिकांनीं तिला विमानांत बसवून लंकेला नेलें १३७-१३८, विशल्या आल्यानंतर अमोघविजयाशक्ति लक्ष्मणाच्या वक्षःस्थलांतून बाहेर पडली. मारुतीनें तिला पकडलें असतां तिनें विशल्येचा प्रभाव सांगितला तेव्हां त्यानें तिला सोडून दिलें १३८-१३९, विशल्येनें लक्ष्मणाच्या अङ्गाला चंदनाची उटी लाविली व तिनें स्पर्शिलेली उटी तिच्या मैत्रिणींनीं इतर विद्याधरांना व इंद्रजितादि शत्रूंनाही लाविली १३९-१४०, लक्ष्मणानें स्वतःचा विवाह विशल्येबरोबर करण्यास अनुमति दिली १४१.

## पर्व ६६ वें– ( पृ. १४६–१५३ )

मंत्र्यांनीं रामाशीं संधि करावा असें रावणाला सांगितलें व तें त्यानें कबूल केलें पण जो दूत रामचंद्राकडे पाठविला त्याला धूर्ततेनें आपला अभिप्राय सांगण्यास बाध्य केलें १४६-१४७, दूतमुखानें 'सगळी पृथ्वी राज्य मी तुला देतो पण माझा भाऊ व दोन पुत्र व सीता तूं मला दे' असें रावण बोलला १४७-१४८, यावर रामचंद्राचें उत्तर १४८, पुनः दूतमुखानें रावणाचें भाषण १४९, भामण्डल रागावून दूताला तरवारीनें मारण्यास धावला. लक्ष्मणानें त्याला थांबविलें १४९-१५०, पुनः दूत बडबडू लागला तेव्हां त्याला सभेंतून हाकलून दिलें १५०, हे प्रभो, रामचंद्र आपल्याविषयीं असें म्हणाले. असें दूतानें रावणास सांगितलें १५१, सुग्रीवादिकांनीं आपणाविषयीं जें भाषण केलें तें हें १५१, मी सुग्रीवादिकांना याप्रमाणें उत्तर दिलें १५२-१५३.

## पर्व ६७ वें– ( पृ. १५४–१५५ )

बहुरूपिणी विद्या सिद्ध करण्याचा रावणाचा निश्चय १५४-१५५.

## पर्व ६८ वें– ( पृ. १५६–१५७ )

रावणानें फाल्गुन शुद्ध अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत आष्टान्हिक महिमा केला. १५६-१५७.

## पर्व ६९ वें– ( पृ. १५८–१५९ )

शान्तिजिनाचें पूजन करून रावण बहुरूपिणी विद्या सिद्ध करण्यास बसला व सर्व प्रजाजनांनीं पूजन, व्रत नियमादिकें आठ दिवस करीत रहावें असें यमदण्डानें सर्व प्रजेला कळविलें १५८-१५९.

पर्व ७० वें– ( पृ. १६४–१७० )

रावण नियमस्थित असल्यामुळें लंकेंत जाऊन घातपात करण्याची मनाई रामचंद्रांनीं आपल्या लोकांना केली १६४, कांहीं विद्याधरांनीं कुमारांना लंकेंत उपद्रव करण्याची प्रेरणा केली १६५-१६६, भयानें स्त्रियांच्या मनांत आलेले विचार १६६, युद्धोद्यत मयानें मंदोदरीच्या भाषणानें शस्त्रत्याग केला व जिनमंदिरांत तो जिनस्तुति करूं लागला १६६-१६७, जिनशासनदेव अनेक रूपें धारण करून बाहेर आले व वानरपक्षीयसुराबरोबर लढू लागले १६७-१६८, यक्षाचें रामचंद्राबरोबर भाषण व यक्षाला लक्ष्मणाचें उत्तर १६८-१६९, सुग्रीवानें अर्घ्य देऊन विनंति केली १६९, यक्ष अंतर्धान पावले १७०.

पर्व ७१ वें– ( पृ. १७३–१७८ )

अंगदादिकुमार लंकेंत प्रवेश करितात १७३, रावणाच्या प्रासादाची आश्चर्यजनकता १७३-१७५, शांतिजिनमंदिरांत अंगदादिकांचा प्रवेश व जिनवंदन करून अंगद रावणास उपसर्ग करितो १७५-१७६, रावणाच्या अंतःपुरांत येऊन अंगदानें स्त्रियांची टक्कर लावणें, गळ्यांत दगड बांधणे आदिक क्रीडा केल्या १७६, या अंगदापासून माझें रक्षण करा असें रावणास मंदोदरी म्हणू लागली १७७, बहुरूपिणी विद्या रावणास सिद्ध झाली व ती रावणास असें म्हणाली १७७-१७८.

पर्व ७२ वें– ( पृ. १८३–१९० )

अंगदानें आम्हाला फार छळलें असें रावणास त्याच्या स्त्रियांनीं सांगितलें तेव्हां मी सर्वांना मारून टाकीन तुम्ही शांत व्हा असें रावण त्यांना म्हणाला १८३, स्नान-भोजनानंतर रावणानें विद्येचें परीक्षण केलें १८३-१८४, रावणाचें अपारसैन्य पाहून सीता घाबरून रामादिकांच्या मरणाविषयीं चिंता व्यक्त करतें १८४-१८५, मी राम-लक्ष्मणांना खात्रीनें मारीन असें रावण सीतेस सांगतो १८५, रावणा याप्रमाणें माझा संदेश रामाला मारण्यापूर्वी सांग असें म्हणून सीता मूर्च्छित झाली १८५-१८६, तिला मूर्च्छित झालेली पाहून हिला हरण्याचें अयोग्य कार्य मी केलें असा विचार करून पश्चात्तापयुक्त झाला १८६, मी रामाला जिंकून त्याला नंतर सीता देईन १८७, अंतःपुरांत गेल्यावर स्त्रियांची विटंबना रामपक्षीयांनीं केली असा विचार करून रावण अतिशय संतप्त झाला १८७-१८८ रावणाला अनेक दुर्निमित्तें उत्पन्न झालीं १८८-१९०.

## पर्व ७३ वें– ( पृ. १९५–२०५ )

रागावलेल्या रावणाला पाहून सचिव व मंदोदरी आदिक स्त्रिया भ्याल्या १९५, शस्त्रागाराकडे जातांना रावणाला अनेक अपशकुन १९५-१९६, शत्रुबरोबर संधि करावयाला आपण रावणास सांगा असें मंदोदरी सचिवाला म्हणाली. तेव्हां ते तिला असें वदले १९६-१९७, मंदोदरी रावणास सीतेचा त्याग करा असा उपदेश करते १९७-१९८, यानंतर रावणभाषण १९८, मंदोदरीचें पुनः भाषण १९९, मी परस्त्रींत आसक्त झालों मला धिक्कार असो असें रावण बोलला १९९-२००, मी सीतेला रामाकडे नेते व पुत्रादिकांना सोडवून आणते असें म्हणतांच रावण रागावून मंदोदरीला म्हणाला २००, आपण प्रतिनारायण आहा व लक्ष्मण नारायण आहे आपण सीता देऊन गृहस्थधर्म धारण करावा असें मंदोदरीचें भाषण २०१, गृहस्थधर्म धारण करणारा राजा आहे तो याप्रमाणें २०१-२०२, माझ्यापेक्षां बलवान् कोणीच नाहीं तुला स्त्रीत्वामुळें भय वाटतें. नांवाचे नारायण, बलभद्र पुष्कळ असतात असें रावणाचें भाषण २०२-२०३, निशाकालवर्णन, सूर्योदय झाला व वीर युद्धाला निघाले २०३-२०४, मारीचादिक युद्धास निघाले २०४-२०५.

## पर्व ७४ वें– ( पृ. २०९–२१६ )

बहुरूपिणीरचित रथांत रावण बसला २०९-२१०, राम-लक्ष्मण सिंहरथ व गरुडरथावर आरूढ होऊन निघाले २१०-२११, जय व पराजयाचीं कारणें २११-२१२, मारुति आदिकांना मयानें निरस्त्र केल्यावर रामानें त्याला शरवृष्टीनें जर्जर केलें २१३, रावण लक्ष्मणाच्या युद्धास प्रारंभ २१४-२१५.

## पर्व ७५ वें– ( पृ. २२१–२२५ )

युद्धांत क्षुधितादिक योद्ध्यांची व्यवस्था असे २२१, अप्सरांना चन्द्रवर्धनाच्या आठ कन्यांनीं सांगितलेलें वृत्त २२१-२२२, सिद्धार्थ शब्द ऐकून सिद्धार्थास्त्राचा प्रयोग लक्ष्मणानें केला २२२, बहुरूपिणी विद्येनें रावणानें नानाविध रूपें धारण केलीं व लक्ष्मणानें तीं तोडली २२२-२२३, बहुरूपिणी विद्या त्यागून रावण प्रगट झाला व त्यानें कोपानें चक्ररत्न लक्ष्मणावर फेकलें २२३-२२४, लक्ष्मणाच्या हातांत तें शोभलें २२४-२२५.

## पर्व ७६ वें– ( पृ. २२६–२२९ )

लक्ष्मणाच्या हातांत चक्ररत्न गेल्यावर रावण विचार करूं लागला २२६-२२७.

पर्व ७० वें– ( पृ. १६४–१७० )

रावण नियमस्थित असल्यामुळें लंकेंत जाऊन घातपात करण्याची मनाई रामचंद्रांनीं आपल्या लोकांना केली १६४, कांहीं विद्याधरांनीं कुमारांना लंकेंत उपद्रव करण्याची प्रेरणा केली १६५-१६६, भयानें स्त्रियांच्या मनांत आलेले विचार १६६, युद्धोद्यत मयानें मंदोदरीच्या भाषणानें शस्त्रत्याग केला व जिनमंदिरांत तो जिनस्तुति करूं लागला १६६-१६७, जिनशासनदेव अनेक रूपें धारण करून बाहेर आले व वानरपक्षीयसुराबरोबर लढू लागले १६७-१६८, यक्षाचें रामचंद्राबरोबर भाषण व यक्षाला लक्ष्मणाचें उत्तर १६८-१६९, सुग्रीवानें अर्घ्य देऊन विनंति केली १६९, यक्ष अंतर्धान पावले १७०.

पर्व ७१ वें– ( पृ. १७३–१७८ )

अंगदादिकुमार लंकेंत प्रवेश करितात १७३, रावणाच्या प्रासादाची आश्चर्यजनकता १७३-१७५, शांतिजिनमंदिरांत अंगदादिकांचा प्रवेश व जिनवंदन करून अंगद रावणास उपसर्ग करितो १७५-१७६, रावणाच्या अंतःपुरांत येऊन अंगदानें स्त्रियांची टक्कर लावणें, गळयांत दगड बांधणे आदिक क्रीडा केल्या १७६, या अंगदापासून माझें रक्षण करा असें रावणास मंदोदरी म्हणू लागली १७७, बहुरूपिणी विद्या रावणास सिद्ध झाली व ती रावणास असें म्हणाली १७७-१७८.

पर्व ७२ वें– ( पृ. १८३–१९० )

अंगदानें आम्हाला फार छळलें असें रावणास त्याच्या स्त्रियांनीं सांगितलें तेव्हां मी सर्वांना मारून टाकीन तुम्ही शांत व्हा असें रावण त्यांना म्हणाला १८३, स्नान-भोजनानंतर रावणानें विद्येचें परीक्षण केलें १८३-१८४, रावणाचें अपारसैन्य पाहून सीता घाबरून रामादिकाच्या मरणाविषयीं चिंता व्यक्त करतें १८४-१८५, मी राम-लक्ष्मणांना खात्रीनें मारीन असें रावण सीतेस सांगतो १८५, रावणा याप्रमाणें माझा संदेश रामाला मारण्यापूर्वी सांग असें म्हणून सीता मूर्च्छित झाली १८५-१८६, तिला मूर्च्छित झालेली पाहून हिला हरण्याचें अयोग्य कार्य मी केलें असा विचार करून पश्चात्तापयुक्त झाला १८६, मी रामाला जिंकून त्याला नंतर सीता देईन १८७, अंतःपुरांत गेल्यावर स्त्रियांची विटंबना रामपक्षीयांनीं केली असा विचार करून रावण अतिशय संतप्त झाला १८७-१८८ रावणाला अनेक दुर्निमित्तें उत्पन्न झालीं १८८-१९०.

पर्व ७३ वें– ( पृ. १९५–२०५ )

रागावलेल्या रावणाला पाहून सचिव व मंदोदरी आदिक स्त्रिया भ्याल्या १९५, शस्त्रागाराकडे जातांना रावणाला अनेक अपशकुन १९५-१९६, शत्रुबरोबर संधि करावयाला आपण रावणास सांगा असें मंदोदरी सचिवाला म्हणाली. तेव्हां ते तिला असें वदले १९६-१९७, मंदोदरी रावणास सीतेचा त्याग करा असा उपदेश करते १९७-१९८, यानंतर रावणभाषण १९८, मंदोदरीचें पुनः भाषण १९९, मी परस्त्रींत आसक्त झालों मला धिक्कार असो असें रावण बोलला १९९-२००, मी सीतेला रामाकडे नेते व पुत्रादिकांना सोडवून आणते असें म्हणतांच रावण रागावून मंदोदरीला म्हणाला २००, आपण प्रतिनारायण आहा व लक्ष्मण नारायण आहे आपण सीता देऊन गृहस्थधर्म धारण करावा असें मंदोदरीचें भाषण २०१, गृहस्थधर्म धारण करणारा राजा आहे तो याप्रमाणें २०१-२०२, माझ्यापेक्षां बलवान् कोणीच नाहीं तुला स्त्रीत्वामुळें भय वाटतें. नांवाचे नारायण, बलभद्र पुष्कळ असतात असें रावणाचें भाषण २०२-२०३, निशाकालवर्णन, सूर्योदय झाला व वीर युद्धाला निघाले २०३-२०४, मारीचादिक युद्धास निघाले २०४-२०५.

पर्व ७४ वें– ( पृ. २०९–२१६ )

बहुरूपिणीरचित रथांत रावण बसला २०९-२१०, राम-लक्ष्मण सिंहरथ व गरुडरथावर आरूढ होऊन निघाले २१०-२११, जय व पराजयाचीं कारणें २११-२१२, मारुति आदिकांना मयानें निरस्त्र केल्यावर रामानें त्याला शरवृष्टीनें जर्जर केलें २१३, रावण लक्ष्मणाच्या युद्धास प्रारंभ २१४-२१५.

पर्व ७५ वें– ( पृ. २२१–२२५ )

युद्धांत क्षुधितादिक योद्ध्यांची व्यवस्था असते २२१, अप्सरांना चन्द्रवर्धनाच्या आठ कन्यांनीं सांगितलेलें वृत्त २२१-२२२, सिद्धार्थ शब्द ऐकून सिद्धार्थास्त्राचा प्रयोग लक्ष्मणानें केला २२२, बहुरूपिणी विद्येनें रावणानें लक्षावधि रूपें धारण केलीं व लक्ष्मणानें तीं तोडलीं २२२-२२३, बहुरूपिणी विद्या त्यागून रावण प्रगट झाला व त्यानें कोपानें चक्ररत्न लक्ष्मणावर फेकलें २२३-२२४, लक्ष्मणाच्या हातांत तें शोभलें २२४-२२५.

पर्व ७६ वें– ( पृ. २२६–२२९ )

लक्ष्मणाच्या हातांत चक्ररत्न गेल्यावर रावण विचार करूं लागला २२६-२२७,

रामचंद्राला शरण ये म्हणजे पुनः तूं त्रिखंडाधीश होशील असें लक्ष्मण म्हणाला त्यावर रावणाचें उत्तर २२७, लक्ष्मण व रावणाचें उत्तर-प्रत्युत्तर २२७-२२८, चक्ररत्नाच्या आघातानें रावणमरण २२८-२२९.

## पर्व ७७ वें– ( पृ. २२६–२३८ )

मृतरावणाला पाहून बिभीषणाचा शोक २३२, मंदोदरी आदिक राण्यांचा शोक २३२-२३५, रामाचा बिभीषणास शोकत्यागाचा उपदेश २३५-२३६, भामण्डलाचा दृष्टान्तपूर्वक उपदेश २३६-२३८.

## पर्व ७८ वें– ( पृ. २४४–२५४ )

रावणशरीराचा चंदनादिकांनीं दाह २४४, इंद्रजितादिकांची बंधमुक्ति २४४-२४५, इंद्रजितादिकांनीं केलेला विचार २४५-२४६, आम्हाला बंधु मानून राज्योपभोग घ्या या लक्ष्मणाच्या भाषणास इंद्रजितादिकाचें उत्तर २४६, मरणोत्तर रावणाविषयीं लोकमत २४६-२४७, शोकयुक्त लोकांचे विचार २४७. अप्रमेयबल-मुनींना केवलज्ञान झालें २४७, केवलींच्या अतिशयाचें वर्णन २४८, जीव नरकादि चारीगतींत उत्पन्न होण्याचीं कारणें २४९-२५०, धर्माचरणानें स्वर्ग व मोक्ष २५०, इंद्रजित् व मेघवाहन यांचें पूर्वभववर्णन २५०, प्रथम व पश्चिम या दोन भावांनीं क्षुल्लक दीक्षा घेतली २५०-२५१, पश्चिम क्षुल्लक निदानानें नंदिश्रेष्ठीचा पुत्र राजा झाला २५१-२५२, प्रथम नामक क्षुल्लकाचा स्वर्गांत जन्म २५२, तो देव रति-वर्धनाचें रूप धारण करून राजाला हाकालून देतो. नंतर उपदेश देतो. रतिवर्धन मुनि होऊन स्वर्गांत देव होतो २२५, ते दोघे स्वर्गच्युत होऊन उर्व व अर्वस राजपुत्र होतात व मुनि होऊन देव होतात व नंतर इंद्रजित् व मेघवाहन होतात २५२-२५३, इंदुमति मंदोदरी झाली. इंद्रजित्, मेघवाहन, कुंभकर्ण व मारीच मुनि झाले २५३, शशिकांता आर्यिकेजवळ मंदोदरी ४८ हजार स्त्रियांसह आर्यिका होते २५३-२५४.

## पर्व ७९ वें– ( पृ. २५८–२६२ )

लंकेंत राम-लक्ष्मणादिकांचा प्रवेश. लोकांचे प्रशंसोद्गार २५८-२५९, रामचंद्रांनीं सीता कोठें आहे असें विचारलें. दासीनें स्थानवर्णन केलें २५९-२६०, सीतेला रामचंद्राचें आगमन कळविलें २६०, राम-सीता भेट. लक्ष्मण तिला वंदन करितो २६०-२६२.

## पर्व ८० वें– ( पृ. २७०–२८५ )

शांतिजिनालयांत शांतिजिनाची रामादिक स्तुति करितात २७०-२७२, बिभीषणाचे आजे, पिता आदिकांना सांत्वनपर भाषण २७२-२७३, बिभीषणाच्या आज्ञेनें विदग्धाराणीनें आपल्या प्रासादांत रामादिकांना येण्यास विनंती केली. स्वतः बिभीषणही त्यांना नेण्यास आला २७३-२७४, बिभीषणाच्या महालांत रामादिकांचें आगमन व स्नान-भोजनादि क्रिया २७४-२७५, बिभीषणादिकांनीं बलनारायणपदप्राप्त्यर्थ राम-लक्ष्मणांचा अभिषेक केला २७६, विराधिताला कूबर आदिक नगरांत पाठवून लक्ष्मणानें आपल्या सर्व स्त्रिया आणविल्या व तो सुखोपभोगांत गढून गेला २७६-२७७, कांहीं स्त्रिया महापुरुषाच्या पत्नी होतात त्याचीं कारणें २७७, इंद्रजित्, मेघवाहन व कुंभकर्ण केवलज्ञानी होऊन मुक्त झाले २७८, जंबुमालीमुनि तपानें अहमिंद्र झाले. पुढीलभवीं ऐरावतक्षेत्रांत ते मुक्त होतील २७८-२७९, मयमुनि व मारीचमुनि यांचें तपोवर्णन २७९, सत्त्वगुणाचा प्रकर्ष व त्याचें उत्तमफल २७९-२८०, कुशीलस्त्रीची कथा २८०-२८१, राजाच्या मस्तकावर लाथ मारली त्यास काय शिक्षा द्यावी या राजप्रश्नाचें उत्तर हेमाङ्कानें दिलें २८१, ब्राह्मणपुत्र श्रीवर्धिताची कथा २८१-२८२, श्रीवर्धिताच्या चातुर्यानें प्रसन्न होऊन कररुह राजानें त्याला पोदनपुर दिलें २८२, मयमुनीच्या पदस्पर्शानें सिंहेंदूचें सर्पविष उतरलें २८२-२८३, श्रीवर्धितानें सिंहेंदूला स्वगृहीं आणिलें २८३, मयमुनीनीं श्रीवर्धिताचे व त्याच्या संबंधिजनाचे पूर्वभव सांगितले २८३-२८५.

## पर्व ८१ वें– ( पृ. २८९–२९८ )

रामचंद्राच्या मातेचा शोक. व नारद अपराजितेला शोकाचें कारण विचारतो २८९-२९०, नारद स्ववृत्त सांगतो २८९-२९१, कौसल्या अयोध्येंत घडलेल्या घटनांचें वर्णन करिते २९१-२९२, नारद लंकेला आला अंगदाच्या लोकांनीं त्याला रामचंद्राकडे आणिलें २९२-२९३, नारद रामाला याप्रमाणें बोलला २९३-२९४, मातृप्रेमानें रामचंद्र नारदाला असे बोलले २९४-२९५, आम्हाला मातृदर्शनार्थ अयोध्येस जावयाचें आहे असें रामचंद्रानें विभीषणास कळविलें तेव्हां त्यानें आपण आतां सोळा दिवसच लंकेंत राहावें अशी विनंति केली व ती त्यांनीं मान्य केली २९५, विद्याधर अयोध्येस भरतसभेंत गेले व राम-लक्ष्मणांच्या वैभवाचें त्यांनीं वर्णन केलें. भरतानें मातृयुगाजवळ त्यांना नेलें. त्याचें वृत्त ऐकून त्यांना आनंद वाटला २९६, विद्याधरांनीं अतिशय रत्नवृष्टि केली. प्रत्येकाच्या घरीं रत्नांचा पर्वतप्राय राशि झाला. विद्याधरशिल्पींनीं सुवर्णरत्नमय अयोध्या रचिली २९६-२९८.

पर्व ८२ वें– ( पृ. ३०२–३०८ )

अनेक विद्याधरासह राम, लक्ष्मण, सीता यांचें अयोध्येकडे प्रयाण ३०२, श्रीरामचंद्र सीतेला मेरुपर्वताची माहिती सांगतात ३०२-३०३, दंडकवनापासून अयोध्येपर्यंत घडलेल्या गोष्टींचें वर्णन ३०३-३०४, स्वागतार्थ आलेल्या भरताला राम-लक्ष्मण भेटले व त्यानें तिघांना नमस्कार केला ३०४, अयोध्येकडे मिरवणूक चालली ३०५, स्त्रिया राम, लक्ष्मण, सुग्रीव, भामण्डल, मारुति आदिकांचें वर्णन करितात ३०५-३०६, राम-लक्ष्मणांनीं सर्व मातांना नमस्कार केला. मातांनीं त्यांच्या मुखावरून प्रेमानें हात फिरविला. तेव्हां त्यांना अपूर्वसुख झालें ३०६-३०८.

पर्व ८३ वें– ( पृ. ३१४–३२२ )

श्रेणिकराजाला गौतमगणधरांनीं बलनारायणाचें वैभव सांगितलें ३१४-३१६, सीतेच्या अशुभकर्माच्या उदयानें लोकामध्ये असद्भावना उत्पन्न झाली ३१६-३१७, भरताचें मन वैराग्याकडे झुकू लागलें ३१७-३१८, रामचंद्र भरताला राज्य देण्याचा प्रयत्न करितात ३१८-३१९, भरताचें रामाला उत्तर ३१९-३२०, अन्यराजांनींही भरताला विरक्ततेपासून विरक्त करण्याचा प्रयत्न केला ३२०, भरताचें उत्तर ३२०, भरत दीक्षा घेण्यासाठीं जात असतां लक्ष्मणानें त्याला प्रतिबंध केला. भरतमाता, भरतस्त्रिया, सीता वगैरेनीं त्याला घेरलें. त्यामुळें त्याला जलक्रीडेकरितां जावें लागलें ३२०-३२१, त्रिलोकमण्डन हत्ती उन्मत्त होऊन सरोवराकडे धावत आला ३२१-३२२.

पर्व ८४ वें– ( पृ. ३२४–३२६ )

राम-लक्ष्मणांनीं हत्तीला वश केले. जानकी व विशल्या यांच्यासह भरत अयोध्येंत आला ३२४, भरतानें सत्पात्रांना आहार देऊन नंतर आहार घेतला ३२४-३२५, चार दिवसापासून हत्ती आहार घेत नाहीं असें महातानें रामास सांगितलें ३२५-३२६.

पर्व ८५ वें– ( पृ. ३३५–३४९ )

महेंद्रोद्यानांत देश-कुलभूषणांचें आगमन व त्यांचा धर्मोपदेश ३३५-३३६, लक्ष्मणानें त्रिलोकमंडन हत्तीचे पूर्वभव सांगा असा त्यांना प्रश्न केला. प्रथमतः केवलींनीं आदिभगवंताचें चरित्र सांगितलें ३३५-३३७, सूर्य, चंद्र या राजांनीं दीक्षा घेतली. परीग्रहभग्न होऊन ते मरीचीचे शिष्य झाले. व सांख्यमतप्रसार केला ३३७, चंद्र हा मरणोत्तर ‘ कुलंकर ’ राजा झाला व सूर्य हा मरणोत्तर त्याचा श्रुति नामक

पुरोहित झाला ३३७-३३८, कुलंकर राजानें जैनसाधूच्या उपदेशानें सर्प झालेल्या आजोबाचें रक्षण केलें ३३८, कुलंकराची जैनमुनि होण्याची इच्छा होती पण श्रुति पुरोहितानें वैदिकधर्म सोडून परधर्म स्वीकारू नका असा उपदेश केला. त्यामुळें तो जैनसाधु झाला नाहीं ३३८, कुलंकराची राणी व्यभिचारिणी होती. तिनें राजाला व पुरोहिताला विष घालून मारलें त्यामुळें ते संसारांत फिरले ३३९, विनोदानें रमणाला मारिलें व दोघेही भवभ्रमण करूं लागले ३३९-३४०, रमण व विनोद हरिण झाले. हरिण झालेला रमण समाधिमरणानें मरून स्वर्गांत देव झाला व दुसरा पशुगतींत फिरूं लागला ३४०-३४१, रमणामर धनदश्रेष्ठीचा पुत्र भूषण झाला. मुनिदर्शन घ्यावें म्हणून पायऱ्या उतरत असतां सर्पदंशानें मरण पावला व माहेंद्रस्वर्गांत उत्पन्न झाला ३४१-३४२, माहेंद्रस्वर्गांतून चवून प्रकाश नामक राजाचा 'जगद्द्युति' नामक पुत्र झाला. राज्यपालन करून मुनिदानानें भोगभूमींत जन्मला व तेथून ऐशानस्वर्गांत त्याचा जन्म झाला ३४२, यानंतर अचलचक्रवर्तीचा 'अभिराम' नामक पुत्र झाला. दीक्षा घेण्यास पित्यानें प्रतिबंध केल्यामुळें घरांतच तप त्यानें केलें व ब्रह्मोत्तरस्वर्गांत तो देव झाला ३४३-३४४, धनदश्रेष्ठी भवांत फिरून अग्निमुख व शकुना यांना 'मृदुमति' नामक उद्धट पुत्र झाला. त्याला मातापित्यांनीं हाकून दिलें. पुष्कळ वर्षांनीं पुनः तो परत आला. त्यानें आईबापांना व नातलगांना पुष्कळ धन मिळवून दिलें. ३४४-३४५, मृदुमति जैनमुनि झाला. व त्यानें मी 'गुणनिधि' नामक मुनि आहे असें लोकांना भासविलें त्यामुळें त्याला तिर्यग्गतीचा बंध पडला ३४५-३४६, ब्रह्मोत्तरस्वर्गांतून च्युत होऊन हा सल्लकवनांत प्रचंड हत्ती होऊन जन्मला ३४७, भरताला पाहून हा शांत झाला ३४८, चक्रिपुत्र अभिराम ब्रह्मस्वर्गांतून चवून दशरथपुत्र भरत झाला ३४८-३४९.

### पर्व ८६ वें– ( पृ. ३५३–३५५ )

भरतानें दीक्षा घेतली. त्याच्याबरोबर हजार राजांनीं दीक्षा घेतली ३५३-३५५.

### पर्व ८७ वें– ( पृ. ३५६–३५८ )

देशभूषणमुनींनीं हत्तीला अणुव्रतें दिलीं. उग्रतप करून हत्ती ब्रह्मोत्तरस्वर्गांत देव होतो. भरतमुनीश्वरांना उग्रतपश्चर्येनें मोक्षप्राप्ति ३५६-३५८.

### पर्व ८८ वें– ( पृ. ३६१–३६४ )

राम-लक्ष्मणांचे भरताविषयीं स्तुत्युद्गार ३६१-३६२, राम व लक्ष्मण यांचा

सीता व विशल्यासह विद्याधर राजांनीं राज्याभिषेक केला ३६३-३६४, रामचंद्रांनीं कोणास काय दिलें ३६४.

## पर्व ८९ वें– ( पृ. ३६८–३७७ )

शत्रुघ्नानें मला मथुरेचेंच राज्य पाहिजे असा हट्ट धरला. मथुरा जिंकणें शक्य नाहीं या रामचंद्राच्या भाषणाला शत्रुघ्नाचें बाणेदार उत्तर ३६८-३६९, सुप्रजामाता शत्रुघ्नाला पंचपरमेष्ठी तुझें मंगल करोत असा आशीर्वाद देतें ३७०-३७१. लक्ष्मणानें समुद्रावर्त धनुष्य, अग्निमुख बाण व कृतांतवक्र सेनापति शत्रुघ्नाला दिले ३७१-३७३, शत्रुघ्नसैन्य व मधुसैन्य यांची लढाई होऊं लागली ३७३, कृतांतवक्र व लवणार्णव यांचें युद्ध व लवणार्णवाचा मृत्यु ३७४, मधुराजा व शत्रुघ्न यांचें युद्ध ३७५, विरक्त मधुराजा पंचपरमेष्ठिचिंतन करीत स्वस्वरूपस्थिर होतो ३७५-३७७.

## पर्व ९० वें– ( पृ. ३८४–३८६ )

चमरेंद्र शत्रुघ्नाला दुःख देण्यासाठीं मथुरेकडे चालला ३८४, प्रभाव कोणाचे ठिकाणीं असतो याचें चमरेंद्र वर्णन करितो ३८४, चमरेंद्र मथुरेंत अनेक रोग उत्पन्न करतो व शत्रुघ्न सैन्यासह अयोध्येस जातो ३८५-३८६.

## पर्व ९१ वें– ( पृ. ३८७–३९२ )

शत्रुघ्नाच्या पूर्वजन्माचें कथन ३८७, कुलंधराला राजानें राणीच्या पलंगावर बसलेला पाहून त्याला मारेकऱ्याच्या स्वाधीन केलें. कल्याणसाधूनें त्याला सोडवून दीक्षा दिली ३८७-३८८, तपानें तो ऋतुविमानांत देव झाला. नंतर तेथून चवून तो चंद्रभद्र राजाचा 'अचल' नामक पुत्र झाला ३८८-३८९, सापत्नमातेनें त्याला ठार मारण्याचा बेत केला. तो त्यास समजला. तो वनांत पळून गेला ३८९, तेथें त्याच्या पायांत काटा मोडला. तो 'आप' नामक मनुष्यानें काढला. तेव्हां तो मी राजा झाल्यावर मला भेट. मी तुझा उपकार फेडीन. असें म्हणून तो कौशांबीला गेला ३९०, कौशांबी येथें विशिखाचार्याला त्यानें जिंकिलें. राजानें त्याला वासवदत्ता–आपली मुलगी दिली. त्यानंतर त्यानें अनेक राजांना जिंकिलें व तो मथुरेला येवून राज्य करूं लागला ३९०-३९१, अचलानें आपाला ओळखून त्याला श्रावस्तीचें राज्य दिलें ३९१, यशःसमुद्रगुरूजवळ अचल व आपानें दीक्षा घेतली. अचल, शत्रुघ्न व आप कृतांतवक्र झाला ३९१-३९२.

### पर्व ९२ वें– ( पृ. ३९७–४०५ )

सुरमन्यु आदि सप्तर्षींचे मातापिता व दीक्षा घेण्याचें कारण ३९७, सप्तर्षींच्या आगमनानें मथुरा नगरी रोगरहित झाली ३९८, अर्हद्दत्तश्रेष्ठीनें हे सप्तर्षि स्वैराचारी आहेत असें समजून त्यांची निंदा केली ३९८-३९९, द्युत्याचार्यांनीं सप्तर्षींना वंदिलें पण त्यांच्या शिष्यांनीं भ्रांतीनें त्यांची निंदा केली ३९९-४००, अर्हद्दत्तानें स्वतःची निंदा केली व मथुरेस जाऊन त्यानें वैभवानें त्यांची पूजा केली ४००-४०१, शत्रुघ्नानें आहारासाठीं माझ्या घरी या असें म्हटलें तेव्हां मुनि उद्दिष्टाहारत्यागी असतात असें उत्तर सप्तर्षींनीं दिलें ४०१, पंचमकालांत अधर्माचा प्रसार होईल हें त्यांनीं शत्रुघ्नाला सांगितलें ४०२-४०३, हे शत्रुघ्ना, मुनींना दान देत जा व सप्तर्षींच्या प्रतिमा नगरांत चार दिशामध्यें स्थापित कर व प्रजाजनही स्वगृहीं जिनबिंब स्थापून पूजा करो असा उपदेश त्यांनीं केला ४०३-४०४, सीतेच्या घरीं आहार घेऊन सप्तर्षि आशीर्वाद देऊन तेथून निघून गेले ४०४, शत्रुघ्नानें दुसरी मथुरानगरी रचिली. राजे त्याची आज्ञा मानीत असत ४०४-४०५.

### पर्व ९३ वें– ( पृ. ४०८–४१२ )

रत्नरथ राजाला नारदानें मनोरमाकन्येला योग्य वर कोण हें सांगितलें. पण नारदाचा त्याच्या पुत्रांनीं अपमान केला ४०८-४०९, नारदानें लक्ष्मणाला तिचा चित्रपट दाखविला. व रत्नरथ पुत्रांनीं माझा अपमान केला असें सांगितलें. लक्ष्मण युद्धासाठीं रत्नपुरावर चाल करून गेला. राजाच्या उद्धतपुत्रांना जिंकिलें ४१०-४११, लक्ष्मणाला मनोरमेनें वरिलें ४११-४१२.

### पर्व ९४ वें– ( पृ. ४१६–४१८ )

लक्ष्मणाचा दक्षिणविजयार्धदिग्विजय ४१६, लक्ष्मणास सात दिव्यरत्नांची प्राप्ति. त्याला १७ हजार राण्या व ८ पट्टराण्या होत्या. रामचंद्रांना ८ हजार राण्या व सीता वगैरे ४ पट्टराण्या. लक्ष्मणास अडीचशे पुत्र होते ४१७-४१८.

### पर्व ९५ वें– ( पृ. ४१९–४२३ )

सीतेला जें स्वप्न पडलें त्याचें फल रामचंद्रांनीं तिला सांगितलें ४१९, वसंत ऋतूचें वर्णन. सीता स्वतःचे डोहाळे रामचंद्रांना सांगते ४२०-४२१, सर्व जिनमंदिरांत पूजन करण्याची रामाज्ञा व राम-लक्ष्मण वैभवानें पूजा करण्यासाठीं सीतादिकासह गेले ४२२-४२३.

पर्व ९६ वें– ( पृ. ४२९–४३५ )

सीतेचा उजवा नेत्र लवतो त्याचें फल ती इतर सवतींना विचारते. अनुमति, गुणमाला वगैरे देवी असें म्हणाल्या ४२९-४३०, सीतेनें भद्रकलशास किमिच्छकदान देण्यास सांगितलें ४३०-४३१, प्रजेचे पुढारी सभेंत येतात. प्रजाग्रणींचें भाषण ४३१-४३२, प्रजाग्रणींचें भाषण ऐकून रामचंद्र सचिंत होतात ४३३-४३५.

पर्व ९७ वें– ( पृ. ४३६–४४९ )

लक्ष्मणाचें सभेंत आगमन व त्याचें भाषण ४३६, रामचंद्राचें भाषण. लक्ष्मणाचें रामास प्रत्युत्तर ४३८-४३९, पुनः लक्ष्मणाचें भाषण, रामाचें कठोर भाषण ४३९-४४०, कृतांतवक्राचें सभेंत आगमन, सीतासती रथांत बसते. मार्गांत अपशकुन ४४१-४४२, वनवर्णन, गंगानदीवर्णन ४४२-४४४, सीतेचा रामास संदेश ४४४-४४५, कृतांतवक्राचा नोकरपणाविषयीं तिरस्कार, सीताशोक ४४६-४४७, मला प्राप्त झालेलें दुःख पूर्वजन्माच्या अशुभकर्माचें फल आहे असा सीता विचार करिते ४४७-४४९.

पर्व ९८ वें– ( पृ. ४५२–४६० )

कांहीं सज्जन सीतेला दुःखाचें कारण विचारतात. वज्रजंघराजाला सीता स्ववृत्त सांगते ४५२-४५४, रामचंद्रानीं तीर्थवंदनेस जाऊं असें म्हटलें ४५५-४५७, रामचंद्रांनीं माझा त्याग कां केला त्याचें कारण सीता सांगते ४५७, शोक न करण्याचा वज्रजंघाचा उपदेश व स्वतःचें वृत्तनिवेदन ४५७-४६०.

पर्व ९९ वें– ( पृ. ४६४–४७२ )

वज्रजंघाबरोबर पुण्डरीक नगरास प्रयाण ४६४-४६५, वज्रजंघानें दिलेल्या प्रासादांत सीतेचा निवास ४६५, कृतांतवक्र सीतेचा संदेश रामाला सांगतो ४६५-४६७, सिंहरवा अटवीचें वर्णन. सीतात्यागामुळें राम शोक करितो ४६७-४६९, लक्ष्मणाचें रामास समजावणें, सीतात्यागानें प्रजाशोक ४६९-४७२.

पर्व १०० वें– ( पृ. ४७५–४८१ )

गरोदरपणीं सीतेच्या शरीरांत झालेले फरक. सीतेला दोन पुत्र होतात ४७५-४७७, सिद्धार्थक्षुल्लक सीतापुत्राना शस्त्रास्त्राचें शिक्षण देतो ४७७-४७८, लवांकुशाच्या पराक्रमादि गुणांचें वर्णन ४७९-४८१.

पर्व १०१ वें– ( पृ. ४८५–४९२ )

पृथुराजाबरोबर लव-अंकुशाची लढाई ४८५-४८६, पृथुराजाला लवणाङ्कुश जिंकतात ४८६-४८९, पृथुराजानें सुवर्णमाला कन्येचा अंकुशाबरोबर विवाह केला ४८९, लव-अंकुशांनीं अनेक देश जिंकिले ४८९-४९१, लवाङ्कुशांचें पुंडरीकनगरास आगमन ४९१-४९२.

पर्व १०२ वें– ( पृ. ४९६–५०९ )

नारद लवाङ्कुशाला राम-लक्ष्मणांची कथा सांगतात ४९६-४९८, सीतात्यागाची वार्ता ऐकून लवाङ्कुश युद्धाची तयारी करतात व लढावयास निघतात ४९८-५००, लवणाङ्कुशांना सीता त्यांच्या पितृकुलाची कथा सांगते ५००-५०२, त्यांचें लढण्यासाठीं अयोध्येकडे प्रयाण. अयोध्येच्या प्रदेशाचें वर्णन ५०२-५०४, नारद व सिद्धार्थ यांचें भामंडलाकडे गमन ५४०-५०५, राम-लक्ष्मणाकडे आज्ञाङ्कित राजांचें आगमन ५०५-५०७, भामंडल व मारुति यांनीं लवणांकुशांचा पक्ष स्वीकारला. लवण व अंकुश यांचें राम-लक्ष्मणाबरोबर युद्ध ५०७-५०८, राजे व अन्य योद्धे एकमेकाशीं लढले ५०८-५०९.

पर्व १०३ वें– ( पृ. ५१२–५१९ )

लवण व अंकुश यांची राम व लक्ष्मणाबरोबर लढाई. रामचंद्र व कृतांतवक्र आपआपल्या अवस्थांचें वर्णन करतात ५१२-५१४, लवण व अंकुश हे सीतापुत्र असल्यामुळें चक्राचें वैफल्य ५१४-५१५, लवण व अंकुश राम-लक्ष्मणांना भेटतात व भामंडल, हनुमान्, सुग्रीवादिकांना आनंद होतो ५१५-५१७, पुष्पकविमानांत बसून लवणांकुश अयोध्येंत प्रवेश करितात. कुमारयुगलाविषयीं स्त्रियांचे उद्गार ५१७-५१९.

पर्व १०४ वें– ( पृ. ५२३–५३३ )

सीतादेवीला आणविण्यासाठीं बिभीषणादिक रामाला विनंति करितात. सीतेनें आपला निर्दोषपणा सिद्ध केला म्हणजे मी तिचा स्वीकार करीन असें रामानें सांगितलें ५२३-५२४, सुग्रीवादिक सीतेला आणण्यासाठीं पुण्डरीकनगरास गेले. सीता बिभीषणादिकांचें भाषण प्रतिभाषण ५२४-५२५, सीतेचें महेंद्रवनांत आगमन. प्रातःकालीं सीता महासभेंत आली ५२५-५२७, सीतेच्या मनांतले विचार, रामाचें व सीतेचें उत्तर प्रत्युत्तर ५२७-५२९, सीतेनें अग्निप्रवेश करणें मान्य केलें. त्यामुळें हनुमानादिक खिन्न झाले. क्षुल्लकसिद्धार्थाचें प्रतिज्ञापूर्वक भाषण ५२९-५३०,

सीतासती पवित्र आहे अग्निदिव्य नको असे म्हणणाऱ्या लोकांवर रामचंद्र रागावतात. ५३०, सकलभूषणमुनिकथा ५३१, विद्युद्वदना राक्षसीचा उपसर्ग सहन करून सकलभूषण केवली होतात ५३२-५३३, सीतोपसर्ग दूर करण्यास इंद्र मेघध्वजदेवास सांगून केवलिसभेंत गेला ५३३.

## पर्व १०५ वें– ( पृ. ५३९–५६० )

सीतावियोगसंभावनेनें राम व्याकुळ होऊन विचार करतात ५३९-५४०, पंचपरमेष्ठींना स्तवून व रामाशिवाय अन्यपुरुषाला मी मनांत स्थान दिलें नाहीं असें म्हणून सीतेनें अग्नींत उडी टाकिली ५४०-५४१, प्रचंड अग्नीचें वापींत रूपांतर झालें. तिच्या मध्यभागीं सिंहासनावर सतीसीता विराजमान झाली असें दृश्य ५४१-५४३, लव व अंकुश मातेजवळ गेले. रामचंद्र तिची स्तुति करून माझ्याबरोबर आनंदानें राहा अशी विनवणी करितात व सीतेचें रामास प्रत्युत्तर ५४३-५४४, राम-लक्ष्मणादिकांचें सकलभूषण केवलीकडे गमन ५४५, सकलभूषण केवलींचा सविस्तर धर्मोपदेश ५४६, नरकदुःखवर्णन , त्रसस्थावरजीवांचें वर्णन ५४७-५४९, संसारीजीव व त्यांच्या देहाचें वर्णन ५४९-५५०, मध्यलोक, ज्योतिर्लोक व स्वर्गादिकांचें वर्णन ५५०-५५२, मुक्ति व मुक्तिसुखाचें वर्णन ५५२-५५५, भव्य व अभव्य कोण? अन्यमतीं मोक्षप्राप्ति नाहीं ५५५-५५७, मुनि होऊन पापाचरण करणाऱ्यांना मुक्तिप्राप्ति होत नाहीं ५५७-५५८, सम्यग्दृष्टि व मिथ्यादृष्टि यांच्यांतलें अन्तर व मोहानें प्राप्त होणाऱ्या आपत्ति ५५८–५५९ मी भव्य आहे कां अभव्य आहे असें रामचंद्रांनीं केवलींना विचारलें ५५९-५६०.

## पर्व १०६ वें– ( पृ. ५६७–५९० )

बिभीषणाच्या विनंतीला अनुसरून रामादिकांचे पूर्वभव केवलीनें सांगितलें ५६७, धनदत्ताला गुणवती बहिण देण्याचें मान्य करून नंतर ती श्रीकांताला द्यावयाचा विचार गुणवंत करितो ५६८, वसुदत्त व श्रीकांत अन्योन्याला मारून संसारांत फिरतात ५६८-५६९, गुणवती धनदत्तालाही वरीत नाहीं. ती मरून हरिणी होते ५६९, धनदत्त रात्रिभोजनत्यागासह अणुव्रतें घेऊन प्रथमस्वर्गी देव झाला ५६९-५७० पद्मरुचिश्रेष्ठीनें बैलाला पंचनमस्कार मंत्र दिला व तो मरून राजपुत्र झाला ५७०-५७१, वृषभकेतूनें जिनमंदिर बांधलें व दरवाजाजवळ पूर्वजन्म लिहिलेला चित्रपट स्थापन केला ५७१-५७२, पद्मरुचि व वृषभकेतु यांना अन्योन्या-विषयीं दृढस्नेह उत्पन्न झाला व ते दोघे गृहिधर्म पाळून ऐशानस्वर्गांत उत्पन्न झाले

# पद्मपुराण

## (जैन रामायण)

## भाग दुसरा

### एकोणपन्नासाव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

रावणाचें ज्याच्यावर प्रेम आहे, ज्याच्या ठिकाणीं उत्तम वक्तृत्व आहे असा दूत रावणाकडे पाठवावा. रावणानें लंका अतिशय दुर्गम केली आहे व तेथें सामान्य दूताचा प्रवेश होणेंच शक्य नाहीं, यास्तव पवनञ्जयपुत्र मारुतीस रावणाकडे पाठविणें योग्य होईल. आज विद्याधरसमाजांत त्याच्यासारखा लढवय्या निस्पृह व सद्गुणी दुसरा कोणी नाहीं. बिभीषणाचेंही त्याच्यावर प्रेम आहे. व बिभीषणाच्या सल्ल्या-विरुद्ध रावण वागणार नाहीं. यास्तव मारुतीला दूत म्हणून पाठवावें अशी महोदधीनें केलेली सूचना सर्वांना पसंत पडली व तत्काल श्रीभूति नामक दूत मारुतिकडे पाठविला. तो दूत आकाशांतून उड्डाण करून उंच सौधांनीं शोभत असलेल्या श्रीपुर नामक नगरीला पोहोंचला. मारुति राजाचा वाडा अतिशय सुंदर होता. त्यांत श्रीभूतीनें प्रवेश केला.

त्याचवेळीं मारुति राजाची राणी अनङ्गकुसुमा तिचा उजवा डोळा लवू लागल्यामुळें खिन्न झालेली होती. पूर्वीच्या अशुभकर्मांच्या उदयानें जें दुःख प्राप्त होतें तें भोगल्याशिवाय गत्यंतर नसतें. असा विचार करून ती खिन्न होऊन बसली. मारुति राजाच्या सभेंत येऊन दूतानें मारुतीला नमस्कार केला व याप्रमाणें घडलेली हकीकत सांगितली.

हे राजन्, दण्डकारण्यांत राम व लक्ष्मण हे महातेजस्वी दोन वीर आले आहेत. लक्ष्मणानें शंबूकाचा वध केल्यामुळें खरदूषण आपल्या विशाल सैन्यासह लक्ष्मणाबरोबर लढण्यास आला. घोर युद्ध झालें. पुष्कळ योद्धे मरण पावले. सूर्यहास-खड्गानें लक्ष्मणानें खरदूषणाचा वध केला.

ही वार्ता ऐकून 'अनङ्गकुसुमा' भाऊ व पिता यांच्या निधनदुःखामुळें मूर्च्छित होऊन पडली. सावध केल्यावर शोकाश्रूंनीं तिचें तोंड मलिन झालें. बाबा व प्रियबंधो, आपण कोठें गेला. एकदा तरी या, व मला दर्शन द्या. भयंकर वनांत एका भूगोचरी व्यक्तीच्याद्वारें महाशूर अशा आपणांस मरण यावें हें अभेद्यवज्र ढेकणानें चूर्ण केल्याप्रमाणें झालें. याप्रमाणें विलाप करीत असतां संसारस्थितीचें स्वरूप सांगून तिचा शोक विद्वानांनीं नाहींसा केला.

ही दूतकथित वार्ता ऐकून मारुतिलाही राग आला. त्याचे डोळे व मुख रागानें लालबुन्द झाले. पण दूतानें कोप दूर करणारें भाषण करून त्याला शांत केलें व पुढील वृत्त याप्रमाणें सांगितलें.

एका दुष्टानें सुग्रीव राजाचा आकार धारण करून राजवाड्यांत प्रवेश केला त्यामुळें खऱ्या सुग्रीवाला अत्यंत दुःख झालें. शेवटीं रामचंद्राला तो शरण गेला. खऱ्या व खोट्या सुग्रीवाच्या लढाईच्यावेळीं खोट्या सुग्रीवाला लक्ष्मणांनीं आलिंगन देऊन घट्ट धरून ठेविलें व रामचंद्र जेव्हां जवळ गेले तेव्हां खोट्या सुग्रीवाची वेताली विद्या रामचंद्राला भिऊन निघून गेली त्यामुळें तो पूर्वीच्या स्वरूपांत राहिला. तो साहसगति नामक विद्याधर होता. त्याच्याशीं लढून रामचंद्रांनीं त्याला ठार मारिलें. हा खऱ्या सुग्रीवावर फार मोठा उपकार त्यांनीं केला. सुग्रीवाच्या निर्मळ कुलाचें रक्षण त्यामुळें झालें. हें दूतानें वृत्त सांगितलें तेव्हां मारुति राजा फार प्रसन्न झाला. मारुति राजा म्हणाला– सुग्रीवाचें गोत्र उज्ज्वल सुवर्णकुंभाप्रमाणें आहे. अकीर्तिरूपी आडांत बुडत असलेल्या या गोत्ररूपी सुवर्णकुंभाला वर काढलें हें रामचंद्रांनीं फार उत्तम कार्य केलें. आपल्या सासऱ्यावरील संकट रामचंद्रांनीं दूर केलें म्हणून मारुतीनें जिनपूजन केलें व दान दिलें. सुग्रीवाची पद्मरागा कन्या ही मारुति राजाची पत्नी होती. तिला बापाचें संकट टळल्यामुळें आनंद झाला. अनङ्गकुसुमा भाऊ व बाप यांचा वध झाल्यामुळें दुःखी झाली अशा या दोन विरुद्ध गोष्टी घडल्यामुळें मारुति राजाचें घर हर्ष व विषाद या दोन रसांनीं एकदम भरल्यामुळें भकास व शोभिवंतही दिसूं लागलें.

यानंतर मारुती आपल्या बंधुगणासह व अनेक राजासह किष्किंधापत्तनाकडे विमानांत बसून निघाला. लौकरच नगराजवळ स्वागत करून सुग्रीव राजानें त्याला रामचंद्राकडे आणिलें. रामचंद्र, लक्ष्मण वगैरेंनीं मारुतीला भेटून आनंद व्यक्त केला. राम-लक्ष्मणाचें रूप, तेजस्वीपणा व त्यांच्या ठिकाणीं असलेल्या इतर गुणांनीं मारुतीचें

मन प्रभावित झालें. माझ्या सासऱ्यावरील संकट नाहींसें करून आपण फार मोठा उपकार केला यामुळें मला अत्यानंद वाटत आहे. आम्ही विद्याबलानें युक्त असूनही सुग्रीवाचें संकट नष्ट करण्यास समर्थ झालों नाहीं. आपण आमच्यावर खोट्या सुग्रीवाचें रूप नाहीसें करून न फिटणारें उपकार केले आहेत.

हे रामचंद्रा, आतां आम्ही आपल्या पक्षाचा अवलंब करून आपलें संकट दूर करूं. हे प्रभो, मी दशाननाला चार उपदेशाच्या गोष्टी सांगून आपली पत्नी अवश्य आणीन. असें रामचंद्राला मारुतीनें म्हटलें त्यावेळीं जांबूनद म्हणाले— वत्सा मारुते, तूं लंकानगरींत सावधपणानें प्रवेश कर व कोणाशींही तंटाबखेडा करूं नकोस. तुझा आम्हाला विश्वास वाटतो कीं, तूं हें कार्य अवश्य पार पाडशील. मारुतीनें म्हटलें— आजोबा, आपण जें सांगितलें तें ध्यानांत ठेवून त्याप्रमाणें वागेन. हें मारुतीचें नम्रतायुक्त भाषण ऐकून रामचंद्रांना मोठा आनंद वाटून ते त्याला याप्रमाणें बोलले :—

" हे मारुते, माझा एक संदेश सीतेला तूं सांग. तुझ्या वियोगानें राघवाला कोठेंही सुख वाटत नाहीं. पाण्यांतल्या माशाला जमीनीवर जसें दुःख होतें तसें तुझ्या वियोगानें मला दुःख होत आहे. माझें अस्तित्व असूनही तुला वियोगदुःख भोगावें लागत आहे म्हणून मला खेद वाटत आहे. तूं निर्मल-शीलवती आहेस. सतत माझें तूं चिंतन करीत आहेस. पण प्राणत्यागाला उद्युक्त होऊ नकोस. प्राणत्यागानें असमाधिमरण होऊन दुर्गतींत फिरावें लागेल. ही माझी आंगठी तुझ्याकडे पाठवीत आहे व ती माझ्या जीविताची सूचक आहे. असें हे मारुते तूं तिला सांग व तिच्याकडून चूडामणि लौकर घेऊन ये. " असें म्हणून त्यांनीं आंगठी मारुतीला दिली. रामचंद्रांचें भाषण ऐकून जशी आपली आज्ञा असें म्हणून मारुतीनें राम व लक्ष्मणांना हात जोडून नमस्कार केला. व विमानांत बसून आपल्या परिवारासह तो लंकेकडे चालला.

जग हें अनेक जीवांनीं भरलेलें आहे. कांहीं हितमार्गाचा स्वीकार करून स्वपर कल्याण करितात. जे भव्य जिनदास असतात ते इतरांनीं केलेलें उपकाराचें स्मरण ठेवतात. असें भव्य चन्द्र-सूर्याप्रमाणें सर्वमान्य होतात.

—•—

# एकोणपन्नासावें पर्व.

[ श्रीमारुतिराजाच्या घरीं दूतागमन. ]

तो दूत वायुवेगें आकाशांतुनि करून उड्डाण।
उंच घरांनीं शोभित करी तदा श्रीपुराकडे गमन ॥ १ ॥
मोत्यांच्या माळांनीं शोभे ज्याचें प्रवेशनद्वार[1]।
ऐशा मारुतिगेहीं प्रवेश करि दूत जो असे चतुर ॥ २ ॥
तेव्हां अनङ्गकुसुमा पवनसुताची मनःप्रिया राणी।
उजवा नेत्र तियेचा स्पन्दन[2] पावें म्हणून खिन्न मनीं ॥ ३ ॥
पूर्वाशुभकर्मानें जें होतें प्राप्त दुःख तें न टळे।
भोगावें तें लागे जीवा त्याविण कदापि नैव गळे ॥ ४ ॥
जें कर्म ज्यास्वरूपीं सुरही वदलू शके न केव्हांही।
यापरि सचिन्त होउनि खेदा ती मारुतिप्रिया वाही ॥ ५ ॥

[ शंबूक व खरदूषण यांचें निधनकथन. ]

इतुक्यांत दूत येउनि सभेंत तो मारुतीस नमन करी।
श्रीराम मैथिलीसह दण्डकवनिं येइ अनुज[3] ज्यास हरि[4] ॥ ६ ॥
शंबूक तयें वधिला समरीं खरदूषणास ये मरण।
वार्ता दूत वदे ही अनङ्गकुसुमा करी सशोक मन ॥ ७ ॥
मूर्च्छित होउनि पडली निष्क्रियता ये तिच्या तदा देहा।
चन्दनजलास सिंचुनि हरिलें दासीगणें तिच्या मोहा ॥ ८ ॥
शोक करी नेत्रांतुनि सन्तत अश्रुप्रवाह वाहवुन।
स्तनकलश आर्द्र झाले विलाप करि सन्त होति सदयमन ॥ ९ ॥
ताता ! आपण कोठें गेला बोला नका धरू मौन।
प्रियबन्धो ! मज दर्शन देउनि माझें करी प्रसन्न मन ॥ १० ॥
भीषणवनिं भूगोचररणांत ताता तुला महावीरा।
वधिती आश्चर्य गमे मत्कुण[5] करिती हिंस्यास जेवि चुरा ॥ ११ ॥

---

१ वेशीचा दरवाजा. २ लवणें. ३ धाकटा भाऊ. ४ लक्ष्मण. ५ ढेकूण.

जनक नि भाऊ यांच्या मृतिदुःखें तीव्र तप्त जी झाली ।
उपशम-निपुण-जनांनीं कष्टानें शान्ततेस ती नेली ॥ १२ ॥
संसारस्थिति जाणुनि जिनमार्गज्ञा अनङ्गकुसुमा ती ।
लोकाचारा पाळुनि करी स्वतःची तदा मनःशान्ति ॥ १३ ॥
दुसरे दिनिं पवनञ्जयसुत शोकें विकल[1] सकल वृत्तान्त ।
ऐकून कुपित झाला झाले मुखनयन तेधवा रक्त ॥ १४ ॥
दूतें कोपविनाशक भाषण बोलून मधुर मन शान्त ।
केलें श्रीशैलाचें कथिलें सुग्रीववृत्त जें वृत्त[2] ॥ १५ ॥
सुग्रीवाचा घेउनि आला आकार दुष्ट खग एक ।
ठावे असेचि तुजला पण घडलें काय तें पुढें ऐक ॥ १६ ॥
दुःखें पीडित होउनि गेला तो शरण रामचन्द्रास ।
संकट निज वाराया जाय जसा देव शरण इन्द्रास ॥ १७ ॥
श्रीपद्म लक्ष्मणासह आले किष्किन्धनगरिं धावून ।
आकृतिचौरें[3] झालें श्वशुराचें[4] युद्ध तव न जें ऊन ॥ १८ ॥
तेजस्वी रामानें चोरा बोलाविलें लढायास ।
आला कोपें धावुन गेली विद्या तदीय विलयास ॥ १९ ॥
साहसगति विद्याधर निजस्वरूपांत तेधवा आला ।
रामें निशांतबाणें[5] चातुर्यें लढुनि मारिलें त्याला ॥ २० ॥
ऐकून वृत्त झाला पवनञ्जयपुत्रकोप तैं शान्त ।
बोले तो दूताला प्रफुल्लवदनें मनांत बहु तुष्ट ॥ २१ ॥

[ रामाविषयीं मारुतीचे स्तुत्युद्गार. ]

रामें सुग्रीवकुला अकीर्तिपासून रक्षिलें झालें ।
उत्तम परोपकारीं त्याचें तात्पर्य आज पूर्ण कळें ॥ २२ ॥
सुग्रीवगोत्र उज्ज्वल सुवर्णकुम्भासमान जें आहे ।
बुडतां अकीर्तिकूपीं रामें उद्धारिलें तया पाहे ॥ २३ ॥
श्रीराम-लक्ष्मणांना स्तवून सानन्द वायुसुत झाला ।
संकटपरिहरणानें जिन-पूजा करुनि दानविधि केला ॥ २४ ॥

१ पीडित. २ घडलेलें. ३ खऱ्या सुग्रीवाचें रूप धारण करणाऱ्या साहसगति विद्याधराबरोबर. ४ सुग्रीवाचें– सुग्रीव हा मारुतीचा सासरा होता. ५ तीक्ष्ण.

पितृदुःखक्षय[1] झाला पङ्कजरागा[2] म्हणून वहु मोदें ।
परि चन्द्रनखातनया अनङ्गकुसुमा झुरे मनीं खेदें ॥ २५ ॥
तेणें श्रीमारुतिगृह युगपत् आनन्दखेदयुत झालें ।
विच्छाय[3] कान्तिसंयुत रसयुगलें युक्त तें जना दिसलें ॥ २६ ॥
यापरि निजजन हर्षें खेदें नि व्याप्त वघुनि वायुसुत ।
समता मनांत ठेवुनि किष्किन्धा-पत्तना निघे त्वरित ॥ २७ ॥

[ मारुतिबरोबर अनेक विद्याधरराजे किष्किन्धेकडे निघाले. ]

तें रत्नजडित उज्ज्वल वायुसुताचें विमान नभिं शोभे ।
जणु सूर्यकान्ति किरणें जिंकाया जाय तें दिसे लोभें ॥ २८ ॥
अनुसरती सुर इन्द्रा तैसें त्या मारुतीस वन्धुगण ।
अनुसरले सूर्याला अनुसरती जेवि उष्णसे किरण ॥ २९ ॥
मागें पुढें नि दोन्ही वाजूंनीं खचरराजगण चाले ।
त्यांच्या जयजय-शब्दें सगळें आकाश शब्दमय झालें ॥ ३० ॥
वहु हत्ती, वहु घोडे, नाना-रथ पंक्ति[4] चालतात नभीं ।
जणु चालली सुरांचीं सैन्यें चतुरंग लवहि ज्या नच भी ॥ ३१ ॥
शुभ्रच्छत्रांचा तो समूह सुन्दर नभांत वहु शोभे ।
कुन्दलतापुष्पांचे मण्डप जणु शुभ्र शोभतात उभे ॥ ३२ ॥

[ किष्किन्धापुरींत प्रवेशून रामदर्शनानें मारुति क्षुब्ध होतो. ]

यापरि सैन्यासह तो सुत पवनाचा प्रवेश किष्किन्धीं ।
आला करून वेगें श्रीरामाच्या समीप त्या वन्दी ॥ ३३ ॥
सुग्रीवासह वैसे आदरभावें समस्त वृत्तान्त ।
कथिला श्रीरामाचा केला येणें[5] चि तोतया शान्त ॥ ३४ ॥
त्या श्रेष्ठ पुरुष रामा निजदेहें वालसूर्य-समधामा ।
पाही पवनञ्जयसुत त्याला लाभे अपूर्व-सुखसीमा ॥ ३५ ॥
आनन्द-जनक नेत्रां जनमन-हरणांत चतुर यद्रूप ।
पाहून काम[6] ज्याला निजदेहें खचित पावला लोप ॥ ३६ ॥
सन्तप्त-शुद्ध-सोन्यासमान ज्याचा मनोज्ञ[7] देह दिसे ।
नाक शुकासम ज्याचें अधर नि विम्बीफलास[8] सतत हसे ॥ ३७ ॥

---

१ पित्याच्या– सुग्रीवाच्या दुःखाचा नाश. २ पद्मरागा ही सुग्रीवाची मुलगी मारुतीची पत्नी. ३ भकास. ४ पायदळ. ५ श्रीरामचन्द्रानें. ६ मदन. ७ सुंदर. ८ तोंडलें.

कुन्दासमान वदनीं दांतांची पङ्क्ति शुभ्र वारीक ।
हास्य प्रगटे जेव्हां जननयना मोहवी तिची चमक ॥ ३८ ॥
सर्वावयवीं सुन्दर रामाचें तें स्वरूप पाहून ।
पवनञ्जयतनयाचें झालें तेव्हां अतिप्रसन्न मन ॥ ३९ ॥
रूप तयाचें दिसलें त्याच्या नयनां प्रभावसम्पन्न ।
परि तें प्रियावियोगें गमलें अत्यल्प तन्मना खिन्न ॥ ४० ॥
इन्द्र शचीविण दिसतो चन्द्र जसा रोहिणी विना गमतो ।
दिसला पवनसुताच्या सीतेविण रामचन्द्र नयना तो ॥ ४१ ॥
माहात्म्य-शौर्यधैर्यें युक्त नि बुद्ध्यादि सद्गुणें सहित ।
पाहुनि रामा मारुतिहृदयांत क्षोभ जन्मला त्वरित ॥ ४२ ॥
राम-प्रभाववश-मन मारुतिचें चिन्तनांत रत झालें ।
लक्ष्मण शूर भ्राता ज्याच्या वश नवल यांत तें कसलें ॥ ४३ ॥
चन्द्रासमान शुभ्रच्छत्र जयाचें बघून समरांत ।
साहसगतिची विद्या वेताली कां पळे न ती त्वरित ॥ ४४ ॥
इन्द्रासहि पाहुनि मम मन कम्पित जाहलें न जें होतें ।
पाहुनि महानरा या क्षुब्धावस्थेस कां बरें जातें ॥ ४५ ॥
विस्मित झाला मारुति हृदयीं त्याच्या स्मरून गुणराशि ।
झाला मोद तयाला मेघा पाहून जेवि मोराशी ॥ ४६ ॥
आला जेव्हां मारुति पाहुनि त्याला दुरून मोदानें ।
श्रीराम-लक्ष्मणादिक उठून आलिंगिती अनुक्रमणें ॥ ४७ ॥
पाहून एकमेका विनयें वोलून आसनीं वसले ।
हृदयें प्रसन्न झालीं मुखावरी मधुर हास्य तें दिसलें ॥ ४८ ॥
केयूरें भूषित भुज उजळि दिशा जो निजाङ्गकान्तीनें ।
पद्माक्ष[1] पद्म वसला भद्रासनिं रम्य चतुर शान्तमनें ॥ ४९ ॥
तो नीलाम्बर-धारी उज्ज्वल वैडूर्य रत्नतुल्य गमे ।
मौक्तिकहारें दिसला नभिं तारायुक्त चन्द्र काय रमे ॥ ५० ॥
सुन्दर पीताम्बरधर गल-बाहु-युगांत हार केयूर ।
धरि रामानुज शोभे सतडिन्मेघासमान[2] नीलतर ॥ ५१ ॥

---

१ कमलप्रमाणें डोळ्याचा. २ विजेसहित मेघासारखा.

मुकुटीं वानर ज्याच्या इन्द्रगजासम सलील गति ज्याची ।
सुग्रीव कुबेरचि जणु अपार धनसंपदा असे त्याची ॥ ५२ ॥
सौमित्रीच्या मागें कुमार सुन्दर विराध तो वसला ।
जणु चक्ररत्न त्याच्या मागें शोभे असा जना दिसला ॥ ५३ ॥
रामासमीप वसला पवनञ्जयतनय सकल सुजनास ।
पूर्णेन्दूच्या संनिध वघुनि बुधा[1] जेवि वाटला तोष ॥ ५४ ॥
वस्त्रालङ्कारांनीं भूषित सुग्रीवपुत्र जे दोन ।
अङ्ग नि अङ्गद दिसले सोमयमासम नि शूर रणनिपुण ॥ ५५ ॥
नलनीलादिक अन्यहि राजे रामासभोंवती होते ।
यापरि देवें आवृत इन्द्रापरि राम शोभती तेथें ॥ ५६ ॥

[ मारुति रामाच्या गुणाचें वर्णन करितो. ]

आश्चर्यचकित होउनि वदला रामास अञ्जनातनय ।
प्रत्यक्षचि रघुनन्दन सुगुण तुझे बोलणें न हा सुनय ॥ ५७ ॥
परि लोकीं प्रियवक्ते करिती प्रत्यक्ष सद्गुणाख्यान ।
ही उलटी स्थिति आहे म्हणून तव मी करीन गुणगान ॥ ५८ ॥
सुगुण तुझें माहात्म्यहि आम्ही कर्णेंचि ऐकिलें होतें ।
नेत्रें वघून तुजपरि पावें मन आमुचें प्रमोदातें ॥ ५९ ॥
सौन्दर्यपूर्ण असशी गुणरत्नांचें निधान आहेस ।
शुभ्र यशानें राजन् भूषण या भूतलास झालास ॥ ६० ॥
रक्षिति सहस्रसुर ज्या धनुष्य तें प्राप्त जाहलें तुजला ।
सीतास्वयंवरामधि विक्रम कर्णेंचि सर्व ऐकियला ॥ ६१ ॥
दशरथपिता असे तव भामण्डल मेहुणा तुझा मित्र ।
सौमित्रि तुझा भ्राता वर्णू किति मी तुझें यशश्चित्र[2] ॥ ६२ ॥
ज्याची शक्ति अलौकिक रूपहि ज्याचें जगास मोहवितें ।
अब्ध्यावर्तधनूचा[3] स्वामी वश विदित कां न आम्हांतें ॥ ६३ ॥
पितृवचनपालनाचें अपूर्वसें धैर्य सुगुण इतरीं न ।
राज्यत्यागाचा गुण तुझ्याच ठायीं वदे न जन कोण ॥ ६४ ॥

१ बुध नामक ग्रह. २ नाना प्रकारची कीर्ति. ३ सागरावर्त नामक धनुष्य.

दण्डकवनीं भयंकर निवास केलास हें न अन्यत्र ।
बान्धववर्गीं अथवा देवेशीं[1] तूं खराच सत्पुत्र ।। ६५ ।।
सुग्रीवाकृति धरि जो साहसगति मारिला तुवा ठार ।
सुग्रीववंशदूषण-विनाशकारिन् तुला नमस्कार ।। ६६ ।।
आम्ही विद्याबलयुत असूनही त्यास नष्ट करण्यास ।
नाथ ! समर्थ न झालों दुर्जय तो वाटलाचि सविशेष ।। ६७ ।।
तव दर्शन त्या होतां गेलें सुग्रीवरूप विलयास ।
उपकार तुझा नाथा फिटणें वाटे न शक्य आम्हांस ।। ६८ ।।

[ उपकार गुणाचें श्रेष्ठत्व. ]

प्रत्युपकार कराया असमर्थ जनें मनांत ठेवावा ।
उपकारि-जनीं आदर सोडावें पापमलिन खलभावा ।। ६९ ।।
जो नर उपकाराचें महत्त्व किंवा विशेष नच जाणी ।
न्याय्याचरणीं खल तो निजबुद्धीला कदापि नच आणी ।। ७० ।।
अकृतज्ञ तो नराधम चाण्डालाहून पातकी जाणा ।
तो दुष्ट पारध्याहुनि तन्नामग्रहण योग्य नच माना ।। ७१ ।।
स्वशरीराहि त्यागुनि उपकार करावयास रत राहू ।
तुमच्या घेउनि पक्षा अन्यत्र कदापि नाथ नच जाऊं ।। ७२ ।।
पण्डित दशाननाला जाउनि मी सदुपदेश सांगेन ।
करुनि त्वरा महाभुज ! मी तव पत्नी अवश्य आणीन ।। ७३ ।।
उदित[2]-प्रसन्न-चन्द्रासम सीता-वदन-कमल वषशील ।
न धरी मनिं सन्देहा श्रीशैल करील कार्य सच्छील[3] ।। ७४ ।।

[ जाम्बूनदाला मारुतीचा उपदेश. ]

सचिव वदे जाम्बूनद वत्सा ! तव वाक्य परमहितकर हें ।
पवनसुता तूं असशी आम्हा आधार एकटा पाहे ।। ७५ ।।
रावण-रक्षित-लङ्कानगरीं सावध सदैव राहून ।
जा तूं कलह न करि वा कोणाशीं शान्त ठेवुनि स्वमन ।। ७६ ।।
ताता तुमच्या वचना हृदयीं ठेवुनि तसेंचि वागेन ।
हें वाक्य मारुतीचें ऐकुनि सानन्द होय राम-मन ।। ७७ ।।

---

१. इन्द्रांत. २ उगवलेल्या निर्मल चन्द्राप्रमाणें. ३. सदाचरणतत्पर.

[ मारुतीजवळ रामचन्द्रांनीं सीतेसाठीं जो निरोप दिला त्याचें कथन.]

राजीवनयन[1] वदले श्रीराम तयास मारुते एक ।
सीतेस सांग जाउनि माझा सन्देश एक निःशंक[2] ॥ ७८ ॥
" राघव तुझ्या वियोगें झाला दुःखी तयास कोठेंही ।
सुख नच तळमळतो तो मासा भूमीवरी जसा पाही " ॥ ७९ ॥
" अस्तित्व असुनि माझें सीते झालें वियोगदुःख तुला ।
पौरुष असुनिहि ठायीं गेलें तें व्यर्थ वाटते मजला " ॥ ८० ॥
" निर्मलशीला असशी चिन्तन माझेंच हृदयिं तूं करिशी ।
माझ्या वियोगदुःखें त्यागाया जीवितास तूं झटशी " ॥ ८१ ॥
" असमाधिमरण परि हें जाणुनि तूं प्राणरक्षणा करि गे ।
जीव-त्याग कराया उद्यत होऊ नकोस उद्वेगें " ॥ ८२ ॥
" प्राणत्यागें दुर्लभ संगम होईल हें मनीं आण ।
जिनधर्म सखि, मिळेल न जो आहे जगिं समस्त सुखखाण " ॥ ८३ ॥
" जिनधर्माहुनि दुर्लभ समाधिमरणास मानिती सन्त ।
होतां अलाभ त्याचा संसाराला न येतसे अन्त " ॥ ८४ ॥
" जीवित माझें सुचवी परिचित ही आंगठी तिला देई ।
जा वायुसुता लौकर चूडामणि परत घेउनी येई " ॥ ८५ ॥
जैशी अपुली आज्ञा ऐसें बोलून हात जोडून ।
रामा नि लक्ष्मणाला करी नमस्कार मोद मानून ॥ ८६ ॥
बसुनि विमानीं जातां मारुति येथेंच थांबण्या कथुन ।
हर्षभरें सुग्रीवा गेला निजसैन्य शीघ्र घेऊन ॥ ८७ ॥
शुभ्रच्छत्र-विराजित चामर ज्या वारितात भृत्यगण[3] ।
मारुति तेथून निघे वैभवशाली जिनास वन्दून ॥ ८८ ॥
नानाविध जन्तूंनीं उत्तम भोगेंहि युक्त जग आहे ।
यांतुनि कोणी हितकरमार्गी जिनदास वर्ततो पाहे ॥ ८९ ॥
इतरांनीं केलेल्या उपकारा स्मरुनि वागती नर जे ।
जिनदास-सदृश कोणी भुवनीं रविशुक्रसोमसम साजे ॥ ९० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे हनुमत्प्रस्थानं नाम एकोनपञ्चाशत्तमं पर्व ॥ ४९ ॥

---

१ कमलाप्रमाणें ज्यांचे डोळे आहेत असे. २ निर्भय. ३ चाकरलोक.

# पन्नास व एक्कावन्न पर्वकथांचा सारांश.

वायुपुत्र मारुति मोठ्या वैभवानें लंकानगरीला जात असतां बहिणीस घरीं आणण्यासाठीं निघालेल्या भावाप्रमाणें लोकांना वाटला. त्याचें विमान महेंद्रपुरावरून जात होतें. तें नगर पाहून त्याच्या मनाला आनन्द वाटला नाहीं. तें नगर त्याच्या आजाचें (आईच्या वडिलाचें) होतें. जेव्हां मारुति मातेच्या-अंजनेच्या गर्भांत होता त्यावेळीं सासू-सासऱ्यांनीं तिला हाकालून दिलें असतां तिच्या पित्यानेंही तिला आपल्या घरीं घेतलें नाहीं व वनांत तिला फार दुःख भोगावें लागलें. त्यामुळें मारुति महेन्द्र-राजाला आपल्या मातेच्या बापाला बाप समजत नव्हता तो त्याला शत्रु वाटू लागला. माझी माता वनांत गेली. तेथें एका पर्वतांत पर्यङ्का नांवाची गुहा होती. तेथें अमितगति नामक अवधिज्ञानी यतिराजांचें दर्शन तिला झालें. त्यांनीं मातेला उत्तम हितकारक धर्मोपदेश केला त्यामुळें ती आपलें दुःख विसरली. तीच ही गुहा आहे. ही गुहा मुनींच्या राहण्यामुळें पवित्र झाली व येथेंच माझ्या मातोश्रीनें मला जन्म दिला त्यामुळें मलाही फार प्रिय वाटतें. याप्रमाणें पूर्व गोष्टीचें स्मरण झाल्यामुळें मारुतीला राग आला.

या माझ्या गर्विष्ठ आजाचा गर्व हरण करून नंतर येथून पुढें प्रयाण करावें असें ठरवून त्यानें युद्धसूचक नगारे वाजविले. तेव्हां त्याचे आजोबा सपुत्र व ससैन्य लढावयास आले. प्रथमतः 'प्रसन्नकीर्ति' नामक त्याच्या वडील पुत्राबरोबर (मामाबरोबर) लढाई झाली. त्यानें बाणांनीं त्याचें धनुष्य मोडून टाकिलें व नंतर त्याच्या रथाचे घोडेही बाण फेकून त्यानें रथमुक्त केले. नंतर त्याचा मामा विमानांत बसून लढू लागला. पण तेंही त्यानें बाणवृष्टीनें मोडून टाकिलें. यानंतर विद्यासामर्थ्यानें त्याचा मामा शस्त्रादिक प्रगट करून लढला पण त्यांचाही नाश करून जसा गरुड सापावर झडप घालून त्याला पकडतो— तसें त्यानें त्याला पकडलें. त्याला पकडलेलें पाहून त्याचा आजा त्याच्याबरोबर लढला. पण थोड्यावेळानें त्यालाही त्यानें जिंकिलें व त्याच्या रथांत उडी मारून त्याला बांधून तो आपल्या रथांत घेऊन आला. त्यानंतर मारुति त्याचा नातू आहे असें समजलें व तो प्रसन्न होऊन म्हणाला— वत्सा, मी तुझ्या पराक्रमाच्या गोष्टी पूर्वीं ऐकत होतों आज प्रत्यक्ष मी पाहिल्या. मला मोठा आनन्द झाला. आनन्दानें त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले.

त्यानें मारुतीचें मस्तक हुंगून त्याला घट्ट मिठी मारली व त्याची त्यानें फार प्रशंसा केली.

यानंतर मारुतीनें आजोबाची क्षमा मागून लंकेकडे जाण्याचें कारण सांगितलें व त्यांनाही किष्किंधानगरींत रामचन्द्राकडे सैन्यासह जाऊन त्यांना साहाय्य करा असें सांगून मारुति पुढें निघाला. नंतर त्याचे आजोबा त्याच्या आईला भेटण्यासाठीं आपल्या पुत्रासह गेले. फार वर्षांनीं ही पित्याची व मुलीची भेट झाली. नंतर ते किष्किंधानगरींत रामचन्द्रास भेटावयास गेले. विराधित, सुग्रीवादिकांनीं त्यांचें स्वागत केलें. येथें ग्रंथकार म्हणतात– 'ज्यांनीं पूर्वजन्मीं चित्त निर्मल ठेवून तप केलेलें असतें अशा जिनदास असलेल्या भव्यांना ( रामचन्द्रादिकांना ) सबल पुरुषही वश होतात. म्हणून भव्यांनीं तप व चारित्रांत तत्पर रहावें म्हणजे त्यापासून त्यांना उत्तम फल लाभतें.'

लंकेकडे जातांना वाटेंत दधिमुखद्वीप लागलें. त्यांत दधिमुख नामक सुन्दर शहर होतें. या नगराच्या जवळ दाट अरण्य होतें. त्याच्या एका विभागांत दोन चारणमुनि तप करीत होते. त्याच्याच एका विभागांत तीन राजकन्याही शुभ्र वस्त्र परिधान करून तप करीत होत्या. कोणी दुष्टानें त्या वनाला आग लाविली होती. व ती आग त्या मुनि व कन्या यांच्या सभोंवती पसरली होती. मारुतीला ही भयानक परिस्थिति दिसली. त्यानें विद्येच्या सामर्थ्यानें समुद्राचें पाणी आकर्षून मेघांच्याद्वारें खूप वृष्टि करून ती आग नाहींशीं केली. नंतर तो मोठ्या विनयानें मुनिद्वयापुढें जाऊन नमस्कार करून बसला. त्यानें त्यांची पूजा केली.

इतक्यांत विद्याप्राप्ति झालेल्या राजकन्या मेरुपर्वतावरील जिनमंदिरांचें वन्दन करून तेथें आल्या. मुनींना व मारुतीला नमस्कार करून त्यांनीं त्याची फार प्रशंसा केली. त्या म्हणाल्या– हे सज्जना, आपलें जर येथें आज आगमन झालें नसतें तर आज आम्ही व हे महामुनियुग जळून भस्ममय झालों असतों. आपल्या ठिकाणीं विशिष्ट वात्सल्य आहे म्हणून आज आम्ही जिवन्त राहिलों.

मारुतीनें या घोर जंगलांत तुम्ही कां राहत होता ? याचें कारण सांगा असा प्रश्न विचारला. राजकन्यांत वडील असलेल्या चन्द्रलेखेनें याप्रमाणें सांगितलें:—

या नगराचा राजा 'गन्धर्वराज' नांवाचा आहे. तो आमचा पिता; 'अमरी' आमच्या मातेचें नांव; आम्ही त्यांच्या मुली; चन्द्रलेखा, विद्युत्प्रभा व तरङ्गमाला अशीं आमचीं नांवें आहेत. आम्ही अतिशय सुन्दर असल्यामुळें

विजयार्ध पर्वतावरील अनेक राजपुत्रांनीं आमच्या पित्याला प्रार्थना केली. पण त्यानें विवाहाला अनुमति दिली नाहीं. याचप्रमाणें 'अंगारक' नामक एका दुष्ट विद्याधर-पुत्रानेंही आमच्याविषयीं याचना केली. त्यालाहि पिताजीनें नकार दिला. त्यामुळें तो फार रागावला.

एकेवेळीं आमच्या वडिलांनीं एका अष्टाङ्गनिमित्तज्ञमुनींना माझ्या मुलींचा कोण पति होईल म्हणून विचारिलें तेव्हां त्यांनीं "जो साहसगति" विद्याधराला मारील तो तुझ्या मुलींचा पति होईल असें सांगितलें. मुनीचें वचन असत्य होत नाहीं असा माझ्या पित्याचा विश्वास आहे.

यानंतर आम्ही या वनांत बारा दिवसापूर्वी 'मनोनुगामिनी' नामक विद्या सिद्ध करण्यास आलों. आम्हाला दुष्ट अंगारकानें पाहिलें व या सगळ्या वनाला अग्नि लावला. हा उपसर्ग आम्ही सहन केला. जी विद्या सहा वर्षांनींही आम्हाला सिद्ध झाली नसती ती हे भद्र आपल्या साहाय्यानें सिद्ध झाली. हा वृत्तान्त ऐकून मारुति हंसला व म्हणाला– 'मुलींनों, तुमची बुद्धि निर्मल आहे, तुमचे परिश्रम सफल झाले व तुम्हाला विद्या प्राप्त झाली म्हणून मला मोठा आनन्द वाटत आहे. तुम्ही मोठ्या भाग्यवती आहांत, कारण साहसगति विद्याधराला रामचन्द्रांनीं मारून सुग्रीवाचें मोठें संकट दूर केलें आहे. ते सध्या किष्किन्धानगरांत वास्तव्य करीत आहेत. आतां मी लंकेला जात आहे' असें म्हणून तो निघणार इतक्यांत त्या तिघी राजकन्यांचे माता-पिता तेथें आले. त्यांना ही वार्ता मारुतीनें सांगून लंकेकडे प्रयाण केलें व गन्धर्वराजाही मोठ्या वैभवानें तीन मुलीसह किष्किन्धानगरीला गेला. त्यानें त्या तीन कन्या मोठ्या वैभवासह रामचन्द्राला अर्पण केल्या.

रामचन्द्र कन्या नि वैभवानें सेवित होऊनही सीतेवांचून खिन्नच होते. तिच्यावांचून सर्व विश्व त्यांना शून्यच वाटे.

गुणयुक्त व शुभोदययुक्त अशा पुरुषांनीं या विश्वाला शोभा आली आहे. ते जर तसे नसते तर हें विश्व घोर जंगल झालें असतें.

पूर्वजन्माचें शुभ उदयास आलें असतां पदार्थांत प्रेम उत्पन्न होतें व तें जेव्हां उदयाला येत नाहीं तेव्हां अरति–अप्रेम उत्पन्न होतें. हे जिनभक्त भव्यांनो, या कर्मरूपी सूर्याच्या प्रकाशानें सर्व वस्तु प्रकाशित झाल्या आहेत. म्हणून जिनभक्ति करून शुभकर्म प्राप्त करून घ्या.

———

# पन्नासावें पर्व.

आकाशीं जाणारा पवनञ्जयतनय परमविभवानें ।
वहिणीस आणणाऱ्या भावासम वाटला न कोण म्हणे ॥ १ ॥
मित्राज्ञेनें झाला प्रवृत्त शुभकार्यदक्ष मारुति तो ।
उत्साहपूर्ण दिसला परोपकारांत सुजन नित्य रतो ॥ २ ॥
लङ्केस जात असतां इन्द्रपुरीतुल्य नगर एक दिसे ।
नाम महेन्द्र जयाचें धनधान्यसमृद्ध सुजन तेथ वसे ॥ ३ ॥

( मारुति महेन्द्रपुराला पाहून आनन्दित झाला नाहीं
याचें कारण तोच स्वतः सांगतो. )

पाहून मारुतीच्या मनास संतोष वाटला नाहीं ।
दुर्मति महेन्द्रराजा इथें वसे नच दया जया पाही ॥ ४ ॥
होतों गर्भांत जिच्या मी जननी दुःखिनी अशी माझी ।
आली असतां द्वारीं स्वागत करण्या न जाहला राजी[1] ॥ ५ ॥
आहे पिता जियेचा तथापि त्यानें दिला न गृहिं वास ।
गेली वनीं सखीसह रुचला तेथें तिला गुहावास ॥ ६ ॥
पर्यङ्कस्थित[2] मौनी ध्यानीं पाही गुहेंत तेथ यति ।
अवधिज्ञानी होते अन्वर्थक नाम ज्यास अमितगति ॥ ७ ॥
साधूपदेश[3] देउनि मातेचें दुःख निरसिलें त्यांनीं ।
तीच गुहा ही आहे मी येथें जन्मलों हिच्या स्थानीं ॥ ८ ॥
आली शरण जयाला माझी माता तथापि या दुष्टें ।
निर्वासिलें[4] तियेला बाप नव्हे 'अरि' दिलीं तयें कष्टें ॥ ९ ॥
सिंहापासुनि झालें माझ्या मातेस कष्ट म्हणुनि गुहा ।
वाटे अरम्य ही मज मुनिसङ्गें फार रम्य सौख्यवहा ॥ १० ॥
मातामह[5] हा आहे माझा गर्विष्ठ सतत वैर करी ।
गर्व तयाचा नाशिन हरि[6] हरिणप्राण जेवि तूर्ण हरी ॥ ११ ॥

---

१ आनन्दित. २ पद्मासनानें बसलेले. ३ हितकर उपदेश. ४ हकालून दिली. ५ आईचा बाप. ६ सिंह.

दुन्दुभि आदिक वाद्यें वाजविलीं युद्धचतुर सुभटांनीं ।
ऐकुनि महेन्द्र आला सेना घेउनि लढावयास झणिं ॥ १२ ॥
मारुति सैन्याक्रमणें हतवल निजसैन्य जाहलें म्हणुन ।
माहेन्द्रि[1]ही लढाया आला घेउनि करीं धनुर्बाण ॥ १३ ॥

(मारुतीनें आपल्या मामाला व आजाला जिंकून बांधिलें
व स्वरथांत आणून ठेविलें.)

पवनसुतानें सोडुनि शर तीन धनुष्य मोडिलें त्याचें ।
घेतो धनुष्य तो वरि रथाश्वही मारिलें तयें साचें ॥ १४ ॥
रथमुक्त अश्व समरीं वेगानें चपल विपुल ते फिरले ।
मनरहित इन्द्रियांचा विषयवनीं गणं[2] जसा सदा डोले ॥ १५ ॥
बसुनि विमानीं केली घोर लढाई महेन्द्र पुत्रानें ।
परि तेंहि वायुपुत्रें कोपें मोडून टाकिलें वाणें ॥ १६ ॥
विद्यासामर्थ्यानें शस्त्रादिक करुनि वीर तो लढला ।
त्या वायुसुत निवारुनि गरुड जसा अहिस त्या तयें धरिला ॥ १७ ॥
अरिनें पुत्रा धरिलें जाणुनि होऊन कुपित समरांत ।
आला पाहुनि मारुति लढावया जाहला तदोद्युक्त ॥ १८ ॥
करवत, तरवार, शरें आजा नातूहि शूर वहु लढले ।
युद्ध तयांचें बघण्या व्योमीं कुतुकें[3] अनेक सुर जमले ॥ १९ ॥
सिंह जसे रागावुन परस्परावरि तुटून पडतात ।
त्यापरि युद्ध तयांचें झालें अन्योन्य त्या न ये अन्त ॥ २० ॥
वाण, कुऱ्हाड, शतघ्नी[4], गदा नि मुद्गर नि शैलशिखरें हीं ।
विद्यासामर्थ्यानें आजा फेकी दया न त्या लवही ॥ २१ ॥
परि वायुसुता झाली व्यथा न मेघें जशी गिरीस न ती ।
उल्काविद्यायोगें विनाशिलीं नातवें समस्त तति ॥ २२ ॥
वेगें मारून उडी आजाच्या रथिं तयास तो बांधी ।
आणी निजरथिं ज्याची धी विजयश्रीस सर्वथा साधी ॥ २३ ॥

(मारुतीचा पराक्रम पाहून महेन्द्रानें– त्याच्या आजानें
त्याची प्रशंसा केली.)

---

१ महेन्द्रराजाचा मुलगा प्रसन्नकीर्ति. २ समूह. ३ कौतुकानें.
४ शंभर योद्ध्यांना मारणारें शस्त्र.

शत्रु न हा मम नातू ऐसें जाणुनि महेन्द्र मुदित मनीं ।
झाला बहु प्रशंसी कोमल ऐशा अनेकविध वचनीं ॥ २४ ॥
पूर्वी तुझा पराक्रम कानांनीं वत्स ऐकिला होता ।
प्रत्यक्ष आज झाला माझ्या आनन्द जाहला चित्ता ॥ २५ ॥
देवेन्द्रसमरिं देखिल माझ्या पुत्रा न जिंकिलें कोणी ।
तूं त्यास जिंकिलें बा प्रसन्नकीर्त्याख्य तो असे जाणी ॥ २६ ॥
बाळा तव जन्मानें झालें कुल आमुचें प्रसिद्ध जगीं ।
धैर्य पराक्रम रूप नि अनुपम तव तूं सदैव गुणरागी ॥ २७ ॥
विनयादिक सुगुणांचा असशी तूं राशि परम तेजाचा ।
कल्याणमूर्ति असशी असशी अवतार कल्पवृक्षाचा ॥ २८ ॥
आधार बान्धवांचा असशी तूं मेघ दुःखतप्त जना ।
स्तुति करि मातामह तो प्रसन्न होऊन पाहि तद्वदना ॥ २९ ॥
आनन्दाश्रु-कणांनीं भरले डोळे तयास घेऊन ।
मस्तक हुंगुनि भेटे स्नेहें त्या दृढ मिठीस मारून ॥ ३० ॥

( मारुतीनें आजोबांना क्षमा मागितली व आपण रामचंद्रांना साहाय्य करण्यासाठीं किष्किंधानगरीस जावें मी लंकेला जाऊन रामसंदेश सीतादेवीला सांगतो, असें म्हटलें. )

वायुसुतानें वन्दन करून आजास हात जोडून ।
म्हटलें क्षमा करावी आजोबा मी असे महाअज्ञ ॥ ३१ ॥
बालक मी अविचारी क्षमा करावी दिला तुम्हां त्रास ।
संपूर्ण दोष माझे उदरीं घ्यावेत हीच मम आस ॥ ३२ ॥
बोलुनि ऐसें कथिला येण्याचा हेतु वायुतनयानें ।
रामप्रियेस हरिलें दशाननें विबुध असुनि अनयानें ॥ ३३ ॥
जातो मी लङ्केला कथितों सीतेस राम-सन्देश ।
पूज्य अजोबा आपण जावें रामा सहाय करण्यास ॥ ३४ ॥
किष्किन्धानगरीमधिं निजानुजासह निवास राम करी ।
तेथें तुमचें होवो जाणें जें रामदुःख विनिवारी ॥ ३५ ॥
यापरि बोलुनि गेला आकाशांतुनि करून उड्डाण ।
पवनञ्जयसुत वेगें लङ्केप्रति हर्षयुक्त होऊन ॥ ३६ ॥

( महेन्द्रराजा प्रसन्नकीर्ति पुत्राला बरोबर घेऊन अञ्जनेकडे गेला तिला पाहून त्याला आनन्द व धन्यता वाटली. )

इकडे महेन्द्र खगपति घेउनि तनया प्रसन्नकीर्तिस ।
गेला स्नेहें मारुति-मातृश्री-अञ्जना स्वतनयेस ॥ ३७ ॥
पाहुनि वहु-कालानें अपुल्या चित्तीं अतिप्रमोद धरी ।
आदर करी तिचा तो मानितसे धन्यता स्वकीय उरीं ॥ ३८ ॥
नन्तर किष्किन्धेला महेन्द्रनृप जाय सैन्य घेऊन ।
स्वागत विराधितादिक नृप करिती हृदयिं तुष्ट होऊन ॥ ३९ ॥
ज्यांनीं पूर्वभवामधिं दुर्धरतप चित्त शुद्ध ठेवून ।
केलें अशा महात्म्या वश होती सवल पुरुष विस्मय न ॥ ४० ॥
यास्तव सतत करावा जिनदासें यत्न सुतपिं चरितांत ।
रविसम उज्ज्वल सुफलप्राप्ति तयें होय भव्य हो त्वरित ॥ ४१ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे महेन्द्रदुहितृसमागमाभिधानं नाम पञ्चाशत्तमं पर्व ॥ ५० ॥

# एकावन्नावें पर्व.

[ दोन मुनि व तीन राजकन्या दावानलानें घेरलेल्या पाहून मारुति जलवृष्टि करून त्यांचें रक्षण करितो. ]

असतां जात हनूमान् बसुनि विमानांत अन्तरीं आलें ।
द्वीप जयाचें दधिमुख सुनामगुण ज्यांत पूर्णसे वसले ॥ १ ॥
दधिमुख नामक आहे पुर यांत दह्यासमान सितसौध ।
द्वारीं काञ्चनतोरणपङ्क्ति दिसे रम्य वर्णितात बुध ॥ २ ॥
या नगरीं उद्यानप्रदेश पुष्पें सुशुभ्र दिसतात ।
नक्षत्रयुक्त ऐशा आकाशासम विराजती सतत ॥ ३ ॥
स्फटिकासमान निर्मल जल ज्यांचें पायऱ्या जयां असती ।
कमळें सित नित फुललीं विहिरी नगरीं अनेकशा दिसती ॥ ४ ॥
त्या नगराच्या सन्निध गवत लता तरु जयांत घन[1] दिसती ।
क्रूरश्वापद विहरति वन घोर जयांत शुष्कताहि अति ॥ ५ ॥
दुर्गम अशा तयाच्या वसे प्रदेशीं खगामि[2]मुनियुगल ।
अष्टदिनावधि तत्पर निजस्वरूपांत सतत शुष्कगल[3] ॥ ६ ॥
त्याच वनाच्या वसति[4] क्रोशचतुर्भागमात्रशा स्थानीं ।
कन्या तीन जटाधर सितवस्त्रावृत[5] मनोज्ञ रूपखनी ॥ ७ ॥
तप निर्मल त्या करिती लज्जित होते जयां बघून रति ।
घोर वनानलधूमें वेष्टित झाल्या तथापि नच भीति ॥ ८ ॥
मुनियुग्महि दावानलवेष्टित[6] झालें बघून सदय मनीं ।
पवनञ्जयसुत झाला वात्सल्य करावयास सज्ज वनीं ॥ ९ ॥
निर्ग्रन्थ ध्यानस्थित रागादिविकार सर्व सोडून ।
मुक्तीच्छा मनिं धरिती मुनि ते ज्यांचें प्रसन्न वदन मन ॥ १० ॥
जीवन-मरणा मानिति समान जे दुःख सौख्यसम गणती ।
पाषाणा नि सुवर्णा जे निस्पृहतेंत सतत रति करिती ॥ ११ ॥

---

१ दाट. २ आकाशगामी दोन मुनि. ३ ज्यांचा गळा सुकला आहे. ४ राहतात. ५ पांढरे वस्त्र नेसलेल्या. ६ वनाग्नीनें घेरलेले.

पाहून अग्निपीडित त्यांना सागरजलास ओढून ।
मेघजलांनीं केलें पवनसुतानें वनाग्निचें शमन ॥ १२ ॥
साधु जसा कोपाला शमवि मनीं क्षान्तिभाव[1] ठेवून ।
नाशी पवनाचा सुत पवनें जो भडकला असे दहन[2] ॥ १३ ॥
नन्तर केली त्यानें पूजा चारणमुनीन्द्रयुगलाची ।
पुष्प-फलादिक घेउनि लोकोत्तम शरण मङ्गलेशाची ॥ १४ ॥
तितुक्यांत सिद्ध झालें साध्य जयांचें अशा तिघी कन्या ।
मेरुजिनांना वन्दुनि आल्या वन्दावयास मुनिमान्यां ॥ १५ ॥
पवनसुतासह केला कन्यांनीं मुनियुगा नमस्कार ।
सविनय सद्बुद्धीनें प्रशंसिती त्यास त्या तदा चतुर ॥ १६ ॥
द्रुतगतिनें[3] कोठें तरि असतां तूं जात तात आम्हांस ।
रक्षियलें मुनियुग्मासह तव वात्सल्यभाव सविशेष ॥ १७ ॥
येणें झालें नसतें अपुलें येथें तरी उपद्रव हा ।
मुनियुग्मासह आम्हां करता अत्यन्त भस्ममय पाहा ॥ १८ ॥

[ तुम्ही येथें राहावयास कां आला या प्रश्नाचें उत्तर
मारुतीला वडील कन्येनें याप्रमाणें दिलें :— ]

निर्मल चित्त जयाचें ऐशा मारुतसुतें तदा केला ।
प्रश्न तुम्ही या भीषण वनांत राहावयास कां आला ? ॥ १९ ॥
तेव्हां प्रथमा कन्या वदली दधिमुखपुरांत जो भूप ।
'गन्धर्वराज' त्याचें नांव असे तोचि आमुचा बाप ॥ २० ॥
माता अमुची 'अमरा' आम्ही उभयां तिघीजणी तनया ।
मी वडिल चन्द्रलेखा दुसरी विद्युत्प्रभा धरी विनया ॥ २१ ॥
तिसरी भगिनी अमुची तरङ्गमाला असे तिचें नाम ।
माता-पित्यांस आम्ही प्रीतीचें जाहलों तिघी धाम ॥ २२ ॥
जितके विजयार्धादि-स्थानीं आहेत खगनृपाल-सुत ।
जे कुलकमल-दिवाकर[4] धरिती अभिलाष आमुचा सतत ॥ २३ ॥
करिती अमुच्यासाठीं अमुच्या जनकास याचना जरि ते ।
अनुमति मिळे न त्यांना म्हणून ते सकल कष्ट बहु वरिते ॥ २४ ॥

---

१ क्षमाभाव. २ अग्नि. ३ शीघ्रवेगानें. ४ वंशरूपी कमलाला प्रफुल्ल करण्यास सूर्यासारखे.

अङ्गारक नांवाचा विद्याधरसुत असे महाखलधी ।
सन्तप्त तो असे वहु हरिणगणीं जेवि पारधी हतधी[1] ॥ २५ ॥

[ अमुच्या पित्यानें माझ्या कन्यांचा पति कोण होईल हें सांगा असा अष्टाङ्ग-निमित्तज्ञ मुनीस प्रश्न विचारला तेव्हां जो साहसगतीस मारील तो तुझ्या कन्यांचा पति होईल असें उत्तर दिलें तें याप्रमाणें :— ]

एकेवेळीं तातें अष्टाङ्गज्ञा मुनीस जाऊन ।
माझ्या कन्यांचा पति आहे कोठें असें वदा स्थान ॥ २६ ॥
म्हटलें मुनिवर्यानें मारिल साहसगतीस समरांत ।
होईल तोच पति तव कन्यांचा हृदयिं ठेव हें सतत ॥ २७ ॥
ऐकुनि मुनिवर्याचें वचन पिता हसुनि बोलला बोल ।
साहसगतीस समरीं क्षम मारायास कोण जणु काल[2] ॥ २८ ॥
अथवा मुनिवर्याचें असत्य होतें न वाक्य केव्हांही ।
ऐसें मानून मनीं आश्चर्यें जनक आमुचा राही ॥ २९ ॥
अङ्गारकें पित्याची पुनः पुनः प्रार्थना जरी केली ।
न दिल्या तयास कन्या विफलचि मद्याचना[3] असे झाली ॥ ३० ॥
करुनि विचार असा मनिं द्यावें या दुःख कोणतें नि कसें ।
ऐशा विचारचक्रें गेले दिन वहुत खिन्न हृदयिं वसे ॥ ३१ ॥
तेव्हांपासुनि अमुच्या मनीं मनोरथ असा सदा राहे ।
‘ साहसगतीस ’ मारी त्या वीरा नेत्र केधवा पाहे ॥ ३२ ॥
आम्ही या वनिं आलों भीषण जें सङ्कटें सदा वाटे ।
विद्या मनोनुगामिनि साधाया प्रीति हृदयिं वहु दाटे ॥ ३३ ॥
आलों आम्हीं येथें आहे हा आज दिवस बारावा ।
मुनियुग्म इथें आलें त्यांचा मनिं दिवस आठवा ध्यावा ॥ ३४ ॥
खल अङ्गारें आम्हा पाहियलें या स्थलीं तदा कोपें ।
तो सन्तप्त जहाला जाळाया इच्छिलें तयें पापें ॥ ३५ ॥
त्यानें दहादिशामधिं वनांत तत्काल अग्नि पेटविला ।
त्याच्या ज्वालांनीं तो प्रदेश सर्वत्र जाहला पिवळा ॥ ३६ ॥
जी षड्वर्षें देखिल साध्य करायास शक्य नच होतें ।
ती साध्य आज झाली उपसर्गें भद्र[4] पूर्ण आम्हांतें ॥ ३७ ॥

१ वाईट बुद्धीचा. २ यम. ३ माझी प्रार्थना. ४ हे सज्जना मारुते.

या सङ्कटप्रसंगीं झालें नसतें जरी तवागमन ।
मुनियुग्मासह आम्हीं गेलों असतों अवश्य वा जळुन ॥ ३८ ॥
मारुति हंसून वदला तुमचा श्रम सफल जाहला आज ।
विद्या पूर्ण मिळाली तुमचें संपूर्ण जाहलें काज ॥ ३९ ॥
तुमची निर्मल आहे बुद्धि मनोरथहि शुभ असे तुमचा ।
उत्तुंग भाग्य तुमचें विद्येचा लाभ जाहला साचा ॥ ४० ॥

[ साहसगतीचा नाश ज्यानें केला तो भावी पति किष्किंधानगरींत आहे असें मारुतीनें त्या कन्यांना सांगितलें. ]

यापरि पवनसुतानें बोलुनि पद्मादिवृत्त सांगितलें ।
लङ्केस मी निघालों कथुनि तयांना अतीव तोषविलें ॥ ४१ ॥
हें सर्व वृत्त जाणुनि अमरेसह तेथ येइ गन्धर्व ।
निजपरिवारा घेउनि वन नन्दन जाहलें तदा सर्व ॥ ४२ ॥
नन्तर तो नृप गेला दुहिता घेऊन तीन परिवारें ।
किष्किन्धानगरीला पद्माश्रित जाहला नि दुःख सरे ॥ ४३ ॥
उत्कृष्ट वैभवासह सुन्दर रामास अर्पिल्या कन्या ।
रामप्राप्तीनें त्या स्वतः अत्यन्त मानिती धन्या ॥ ४४ ॥
कन्या नि वैभवानें सेवित तो राम खिन्न राहि मनीं ।
सीतेविण सकल दिशा तथापि तो शून्य सर्वदा मानी ॥ ४५ ॥
गुणयुक्त शुभोदययुत सुन्दर सुजनें समस्तभू शोभे ।
तैसे नसतिल जन जर वाटे ती भूमि भीमवनचि[1] उभें ॥ ४६ ॥
पूर्वभवीं सञ्चित जें उत्कट शुभकर्म येइ उदयास ।
तेव्हां रति जनिं होतें नसतां तें होय अरति आयास ॥ ४७ ॥
हा कर्मरूप-सूर्यप्रकाश सर्वत्र पसरला आहे ।
लोकत्रयिं जिनदासा वस्तु तयानें प्रकाशती पाहे ॥ ४८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मस्य ‘गन्धर्वकन्यालम्भाभिधानं’ नाम एकपञ्चाशत्तमं पर्व ॥ ५१ ॥

---

१ भयंकर.

# बावन्नाव्या पर्वांतील कथेचा सार.

दधिमुख नगराहून पराक्रमी बलवान् वायुपुत्र विमानांत बसून त्रिकूट पर्वताकडे जाण्यास निघाला. कांहीं वेळ त्याचें विमान चालून तें एकदम बंद पडलें. तेव्हां वायुपुत्र विमान बंद पडण्याच्या कारणांचा विचार करूं लागला. कोणी चमरेन्द्रानें माझें विमान अडविलें काय? किंवा या पर्वतावर भगवज्जिनेंद्राची प्रतिमा आहे काय? अथवा तद्भव मोक्षगामी कोणी मुनि तपांत तत्पर आहेत काय? असा विचार करीत असतां 'पृथुमति' सचिवानें म्हटलें कीं, या पर्वतावर मायामय तटाची रचना रावणानें केली आहे. आपणाला पुढें जाणें शक्य नाहीं. आतां येथून परतावें लागेल. हें भाषण ऐकून मारुतीनें तट न्याहाळून पाहिला. या तटांतून प्रवेश करणें शक्य नाहीं असें त्यालाही वाटलें. या तटाला चोहोंकडे भयंकर दिसणारीं, जीभ बाहेर काढलेलीं लालबुन्द तोंडें होतीं. या तटाला हजारों शिखरें करवतासारखी तीक्ष्ण धारेची होतीं. भयंकर व प्रचंड सर्पाप्रमाणें या तटांतून विष बाहेर फेकणारे फूत्कार निघत होते. जो वीर शौर्योद्धत होऊन या तटांत प्रवेश करी तो पुनः बाहेर पडणें शक्य नव्हतें.

परंतु मारुतीनें या मायामय तटाचा विध्वंस करण्याचा दृढ निश्चय केला. विद्येचें कवच अंगावर धारण करून व गदा फिरवित सूर्य-राहूच्या तोंडांत प्रवेश करतो त्याप्रमाणें त्यानें तटाच्या— आशालिका विद्येच्या तोंडांत प्रवेश केला. सिंह जसा तीक्ष्ण नखांनीं हत्तीचें उदर फाडतो त्याप्रमाणें विद्यात्मक तीक्ष्ण नखांनीं त्यानें तिचें पोट फाडलें. त्यावेळीं प्रचण्ड आवाज झाला व तो मायामय तट नाहींसा झाला.

त्या तटाचें रक्षण करणारा वज्रमुख नामक राजा तो आवाज ऐकून धांवत आला व त्यानें मारुतीबरोबर युद्ध केलें. दोघांचीं सैन्यें लढू लागलीं. मारुतीनें आपल्या चक्रशस्त्रानें वज्रमुखाचें मस्तक तोडलें.

वज्रमुखाच्या कन्येला लङ्कासुंदरीला त्याच्या वधाची वार्ता समजली. तेव्हां ती धांवतच लढण्यासाठीं आली. दुष्टा! आज तुझा यमाच्या मुखांत प्रवेश करवितें असें म्हणून तिनें त्याच्यावर बाण फेकला तोंच त्यानेंहीं तिचें बाणानें छत्र मोडून टाकिलें. तिचा बाण लागून मारुतीच्या हातांतलें धनुष्य मोडलें. नंतर तिनें त्याच्यावर शक्तिनामक आयुध फेकलें पण त्याचे मारुतीनें दोन तुकडे करून तें निकामी केलें.

तिनें त्याच्यावर विद्याबलानें खूप बाणांचा मारा केला. त्याला त्यांनीं तिनें आच्छादिलें. पण विद्येच्या सामर्थ्यानें तो झांकला जाऊनही जखमी मुळींच झाला नाहीं. मारुतीनें त्यांतूनही प्रगट होऊन तिच्याकडे पाहिलें. तिच्या अद्भुत सौंदर्यानें तो मोहित झाला. तिचीही मारुतीचें सौंदर्य पाहून तीच अवस्था झाली. अशा सौंदर्यशाली पुरुषावर शस्त्रप्रहार करण्यास तिचा हात धजेना. तेव्हां तिनें एका बाणावर आपला अभिप्राय लिहून तो नामबाण त्याच्या चरणाजवळ सोडला. मारुतीनें तो बाण हातांत घेऊन वाचला. त्याला आनंद झाला. तो रथावरून खालीं उतरून तिच्याकडे गेला तिला त्यानें आपल्या मांडीवर बसविलें. तेव्हां ते दोघे मदन-रतीप्रमाणें शोभू लागले.

आपल्या पित्याला मारुतीनें मारल्यामुळें तिला शोकाचा उमाळा आला तेव्हां त्यानें म्हटलें प्रिये हा क्षात्रधर्म आहे. युद्धांत क्षत्रिय, पिता, भाऊ इत्यादिक संबंध लक्षांत न घेतां लढत असतात. पुनः हें तूं लक्षांत घेणें योग्य दिसतें– "पूर्वभवीं जसें कर्म उपार्जिलेलें असतें त्याचा उपभोग घेत जीव फिरत असतात. अमुकानें अमुकाचा नाश केला हें बोलणें निमित्तमात्र आहे. आयुष्य संपलें म्हणजे जीवांना मरण येतें. यास्तव शोक करूं नकोस. हा आर्तध्यान उत्पन्न करतो." असें सांत्वनपर भाषण करून त्यानें तिला शोकरहित केलें. ते दोघे चन्द्र व रोहिणीप्रमाणें शोभले.

यानंतर मारुतीचें सैन्य व त्याच्यासह आलेले राजे आकाशांत निर्माण केलेल्या आपल्या नगरांत गेले. रात्र संपून प्रातःकाल झाला व मारुति लंकानगरास जावयास निघाला. त्याला अडवून ती म्हणाली– नाथ, रावण मोठा दुष्ट आहे. आपल्याला पकडवून कोंडून ठेवील. आतां पूर्वीचें संबंध राहिले नाहींत. स्नेह संपला आहे शत्रुत्व उत्पन्न झालें आहे. यास्तव आपण या संकटांत कां उडी टाकीत आहा मला समजत नाहीं. आपण जाऊं नये.

मारुति म्हणाला– प्रिये, लंकेशरावणानें अन्यायानें रामचंद्र-पत्नी सीतेला हरण करून आणिलें आहे. त्यानें ती रामचंद्राकडे परत पाठवावी हें सांगण्यासाठीं मी जात

आहे. रामचंद्रानीं खोट्या सुग्रीवाचा नाश करून खऱ्या सुग्रीवावर मोठा उपकार केला आहे. प्रत्युपकारासाठीं मी लंकेला जाईन. रावणाचा अभिप्रायही मला उथळ आहे कां खोल आहे हें समजेल. जिनें रावणाच्या मनरूपमेरूला सकम्प केलें त्या सीतेचें रूप पाहण्याचीही इच्छा आहे. याप्रमाणें बोलून व लंकासुंदरीची अनुमति मिळवून चतुर मारुति तिच्यापासून लंकानगरीकडे निघाला.

मनुष्याचें मनही आश्चर्यचकित करणारी वस्तु आहे. तें मन एका रसांतून दुसऱ्या रसांत प्रवेश करतें. हा मनाचा स्वभावच आहे असें मात्र समजणें चुकीचें होईल. अनेक रसामध्यें मनाचा प्रवेश कर्मोदयामुळें होतो. कर्म हें त्याचें कारण आहे त्यामुळें तें बहुस्वभावी बनलें आहेत.

# बावन्नावें पर्व.

( लंकेच्या मायामयी तटानें मारुतीच्या विमानाची गति बंद पाडली. )

हा पवनपुत्र बलवान् विक्रमशाली पुनः विमानांत ।
बैसुनि निघे त्रिकूटा[1]कडे जसा चन्द्र मन्दरा[2] कान्त[3] ॥ १ ॥
यापरि निजसैन्यासह असतां तो जात रुद्ध गति झाली ।
पाहुनि तद्वदनांतुनि विचारमाला अशी असे आली ॥ २ ॥
माझी विमानगतिही झाली कां रुद्ध हेतु काय असे ।
कां चमर गर्वपर्वत[4] सुरेन्द्र किंवा उभा पुढें विलसे ॥ ३ ॥
किंवा या गिरिवरती प्रतिमा भगवज्जिनेन्द्र-देवाची ।
किंवा चरमशरीरी[5]-मुनि-तत्परता तपांत कां साची ॥ ४ ॥
यापरि वितर्क-भाषण ऐकुनि पृथुमति तयास सचिव वदे ।
परतावें श्रीशैला मायातट हा जनास खेदा दे ॥ ५ ॥
पवनसुतानें तेव्हां स्वदृष्टि वळवून शाल पाहियला ।
सुविरक्त-स्त्रीमानस समान तो दुष्प्रवेश्य[6] त्या दिसला ॥ ६ ॥
नानाकृतिधारकशीं भीषण तोण्डें अनेक त्या होतीं ।
देवांहि तो प्रवेश्य न खाई सर्वास तीव्र धरि कान्ति ॥ ७ ॥
शिखरें तीक्ष्ण तयाचीं दिसतीं जणु करवतासमान जनां ।
जिह्वा त्यास हजारो रक्तानें लालबुन्द भयद मनां ॥ ८ ॥
मोठा भुजङ्ग जैसा करितो फूत्कार उंच करुनि फणा ।
फूत्कार करुन फेकी पुनः पुनः तो विषस्फुलिङ्गकणां ॥ ९ ॥
शौर्यें उद्धत होउनि जाई जो भट तटा न तो परते ।
बेडूक सर्पवदनीं जातां ये तो न परत यत्नशतें ॥ १० ॥
अत्युच्च साल होता रविमार्गा रोधिलें तयें होतें ।
दुर्लङ्घ्य नि दुष्प्रेक्ष्यैं[7]हि रचना ज्याची समानता धरिते ॥ ११ ॥

---

१ त्रिकूटपर्वताकडे. २ मेरुपर्वताकडे. ३ सुन्दर. ४ पर्वताएवढा गर्व ज्याला आहे असा भवनवासी देवांचा चमरेन्द्र. ५ वर्तमानकालीन भवांतच कर्म-मुक्त होणारे. ६ कष्टानें प्रवेशयोग्य. ७ ज्याच्याकडे पाहणें शक्य नाहीं.

कल्पान्तकाल मेघासम त्याची गर्जना जना भिववी ।
हिंसाग्रन्थासम[1] जो प्रतिसमयीं पापकर्मबन्धा वी ॥ १२ ॥
पाहुनि असा भयङ्कर तट मारुति मानसीं विचार करी ।
लङ्कानाथें रचिलें अपूर्व कौशल न यांत किन्तु[2] उरीं[3] ॥ १३ ॥
विद्यासामर्थ्यानें रचिलेलें यन्त्र पूर्ण मोडीन ।
ध्यानी मोहा जेवी रावणमानास तेवि नाशीन ॥ १४ ॥
सङ्गरनिर्णय घेउनि नभांत सेना सशब्दशी रचुन ।
विद्या-कवची होउनि फिरवी हातीं गदेस घेऊन ॥ १५ ॥

( मारुति आशालिकेचें पोट विद्यानखांनीं फाडतो. )

सूर्य जसा राहूच्या वदनीं करितो प्रवेश तेवि शिरे ।
श्रीशैल शालिकेच्या लवहि जयाच्या मनांत भीति नुरे ॥ १६ ॥
सिंह जसा खरनखरें[4] विदारि कर्युदरें[5] तेवि उदर तिचें ।
विद्यानखें विदारी हृदयीं ज्याच्या न लवहि भय साचें ॥ १७ ॥

( मारुतीनें मायातट विध्वस्त केला. )

ध्यानीं निर्मल भावें टाकी कर्मस्थितीस तोडून ।
निर्दय घोरगदेच्या आघातें शाल[6] तो करी चूर्ण ॥ १८ ॥
जेव्हां विभिन्न झाली विद्या आशालिका तदा घोर ।
शब्द प्रचण्ड झाला नाभिं जलदांच्या समान गम्भीर ॥ १९ ॥
जैसें जिनस्तुतीनें कलुष असा कर्मसङ्घ हो नष्ट ।
तो तट विनष्ट झाला देत असे जो महाभटां कष्ट ॥ २० ॥

( मारुतीचें वज्रमुख राजाबरोबर युद्ध. त्यांत वज्रमुखाचें मरण. )

प्राकार[7] नष्ट होतां वज्रासम शब्द परमभयदायी ।
ऐकून वज्रमुखनृप बहुकोपें तप्त जाहला हृदयीं ॥ २१ ॥
तटरक्षणाधिकारीं नियुक्त ज्या रावणें असे केलें ।
रथिं चढुनि येइ धावत कोपानें लाल करुनि निज डोळे ॥ २२ ॥
वज्रमुखाच्या पुढती लढावया पवनतनय राहि उभा ।
पाहून त्यास नाना योद्धे हृदयांत पावले शोभा ॥ २३ ॥

---

१ पशुयज्ञाचें प्रतिपादन करणारा ग्रन्थ. २ संशय. ३ मनांत. ४ तीक्ष्ण नखांनीं. ५ हत्तीचें पोट. ६ तट. ७ तट.

दोघांचींही सैन्यें स्वजीवितीं स्नेहशून्य होऊन ।
करुनि मुखें घनगर्जन[1] लढती अन्योन्य तीव्र कोपून ॥ २४ ॥
वातसुताच्या सैन्यें पिटाळिलें घोर शत्रुसैन्यास ।
मारुतिनें निजचक्रें तोडियलें वज्रवदनशीर्षासि[2] ॥ २५ ॥

( लंकासुंदरीसह मारुतीचें घोरयुद्ध. )

पाहुनि निजजनकाचा वध लङ्कासुन्दरी महाकुपित ।
झाली आली धावुनि लढावयां उसळलें तिचें रक्त ॥ २६ ॥
जो वेगानें धावे ऐशा अश्वावरी बसून निघे ।
कानीं कुण्डल तेणें मुखावरी कान्तिजाल नित्य रिघे ॥ २७ ॥
सुवया कोपें भालीं उंच जिनें चढविल्या भयाण दिसे ।
चापासमान छाती विस्तृत वीरावतार जी विलसे ॥ २८ ॥
तीव्रक्रोधें भासे फुललेलें लाल कमलतुल्य मुख ।
दन्तें ओठा चावी जणु ही रागेजली रमा देख ॥ २९ ॥
वदली हे श्रीशैला ! थांव तुला पाहिलें लढायास ।
बोलाविते तुझा मी वघ करिते यममुखीं सदा वास ॥ ३० ॥
दिङ्मूढ जाहल्यासम आलास अनिष्ट आज या स्थानीं ।
दुष्टा ! पाठविते मी आजचि तुज यमगृहास हें जाणी ॥ ३१ ॥
ती त्वरित येत असतां शुभ्र तिचें छत्र पवनसुत पाडी ।
बाणें चाप तयाचा कोपें तुकडे करून ती मोडी ॥ ३२ ॥
शक्त्यायुध ती फेकी केलें बाणें द्विधा तयें त्यास ।
विद्याबलगम्भीरा वर्षी त्याच्यावरी शरौघांस[3] ॥ ३३ ॥
आच्छादिलें तयाला तिनें शरें जेवि मेघ सूर्यास ।
अक्षत[4] राही अन्तरिं विद्यायोगें न साध्य इतरास ॥ ३४ ॥
मायाविद्याकुशलें वायुसुतें सर्वबाण संहरुन ।
निजशस्त्रांनीं केलें प्रगट पराक्रमगुणें न जो न्यून ॥ ३५ ॥
नानाशस्त्रास्त्रांचें घर्षण होउनि उजेड समरांत ।
वारंवार तयांच्या पडे नभीं जेवि विद्युदुद्योत[5] ॥ ३६ ॥

( मारुति व लंकासुन्दरी या दोघांच्या मनांत एकमेकाविषयीं अभिलाष उत्पन्न होतो. )

---

१ मोठी गर्जना. २ वज्रमुखराजाचें मस्तक. ३ बाणसमूहास. ४ व्रणरहित. ५ विजेचा प्रकाश.

रूप जियेचें अनुपम धैर्यवती जी रमेसमान दिसे ।
झाला विद्ध तियेच्या नेत्रशरांनीं तसा शरें न असे ।। ३७ ।।
नेत्रधनुष्यापासुनि निघती जे मदनवाण विद्ध तयें ।
झालों चापापासुन मुक्तशरें विद्ध नैव विस्मय[1] ये ।। ३८ ।।
आहे मनोहरा ही ललितशरें बाह्य अन्तरा विद्ध ।
करिते झाला तेणें ममान्तरात्मा अतीव हा लुब्ध ।। ३९ ।।
जे सोडिले हिनें शर तेणें मरणें मला बरें वाटे ।
परि विरहानें स्वर्गीं जीवित दुःखद जसे वनीं काटे ।। ४० ।।
यापरि विचार असतां करीत मारुति मनीं तशी ती ही ।
कामें विद्ध जहाली वज्रमुखाची सुता वने मोही ।। ४१ ।।
सुन्दर समीरसुत हा सुनेत्र याचे प्रफुल्ल कमलास ।
लाजविती मुखचन्द्रा मिळो मला यासवेंचि सुविलास ।। ४२ ।।
हा मूर्तिमन्त आहे मन्मथ वाताञ्जनाज[3] मज भासे ।
मारावयास उद्यत होउ कशी योग्य हें दिसे कैसें ।। ४३ ।।
करुनि विचार असा मनिं शक्त्यस्त्रा संहरी त्वरें रमणी ।
मारावयास माझें धजत नसे मन अशी वदे वाणी ।। ४४ ।।
माझ्या पित्यास मारुनि केला अपराध घोर मारुतिनें ।
मोहवितो परि माझ्या मनास[2] हा निज अपूर्व-रूपगुणें ।। ४५ ।।
करुनि प्रीति तयावरि याच्यासह जरि न भोग भोगीन ।
या जगिं निष्फल सगळें होइल हें वाटतें मला जनन[4] ।। ४६ ।।

( लंकासुन्दरी बाणावर मारुतीला वरण्याचा अभिप्राय लिहून तो त्याच्याकडे पाठविते. )

होउनि मनांत विह्वल पाठविला नाम-बाण तच्चरणीं ।
आश्चर्य काय नच हें अरि प्रिया इच्छि व्हावया तरुणी ।। ४७ ।।
जिंकावयास मजला समर्थ नच सुरसमूह जरि आला ।
ती स्मरशरें पराजित तुजला मी इच्छिते वरायाला ।। ४८ ।।
बाणावरील ऐसा वातसुतें वाचिला अभिप्राय ।
आनन्द त्यास झाला भूमिवरी ठेविला तयें पाय ।। ४९ ।।

---

१ आश्चर्य. २ मनाला. ३ पवनंजय व अञ्जना यांचा मुलगा मारुति. ४ जन्म.

हरिसम विक्रम ज्याचा मारुति येउनि समीप मांडिवरी ।
बसवी कामरतीची शोभा उभया अभूत-पूर्व वरी ॥ ५० ॥
( पित्याच्या मरणामुळें शोक करणाऱ्या लंकासुन्दरीचा शोक
मारुति दूर करितो. )
वैर प्रशान्त झालें पितृमरणस्मृति मनांत परि आली ।
शोकें विह्वल होतां नेत्रांतुनि अश्रु वाहती गालीं ॥ ५१ ॥
म्हटलें पवनसुतानें शोक नको गे करूं प्रिये आतां ।
हा क्षात्रधर्म ऐसा पितृमरणाची नको करूं चिन्ता ॥ ५२ ॥
तुजला ठाउक आहे राज्यपदीं जे विराजले असती ।
ते कर्मबलप्रेरित मारिति जनकादिकांहि न भ्रान्ति ॥ ५३ ॥
तूं व्यर्थ शोक करिशी आर्तध्यानास विफल तूं वरिशी ।
पूर्वभवार्जित भोगित फिरतो हा जीव सतत अघराशि ॥ ५४ ॥
हा अरि यानें वधिला म्हणणें हें गे निमित्तमात्र असे ।
आयुष्यकर्म सरतां होती जन कालविवश हेंचि दिसे ॥ ५५ ॥
ऐशा वचनें झाली ती लंकासुन्दरी अशोके[1] झणी ।
शोभे पवनसुतासह चन्द्रासह जेवि शोभते रजनी ॥ ५६ ॥
सप्रेम दृढालिङ्गन तें देई युगल एकमेकास ।
युद्धश्रम उभयांचा तेणें गेला समस्त विलयास ॥ ५७ ॥
ज्या स्तम्भिनी-सुविद्या-साहाय्यें नभि समस्त मारुतिचें ।
खगबल केलें होतें स्तम्भित तें आणिलें गृहा साचें ॥ ५८ ॥
( आकाशांत नगराची रचना करून मारुतिसह अनेक राजे रात्रीं राहिले. )
श्रीशैलाचें शोभे शिबिर नभीं सुरपुरासमान सदा ।
सन्ध्यामेघासम तें ध्वजमालाकुल समस्त हरि विपदा ॥ ५९ ॥
गजवाजिरथविमानीं बसून राजे अनेक त्या नगरीं ।
शिरले पवनसुतासह राहति रात्रौ प्रसन्नहृदय घरीं ॥ ६० ॥
नंतर तेथुनि लंकानगराप्रति जावयास वायुसुत ।
उद्यत पाहुनि वदली ती लंकासुन्दरी तया त्वरित ॥ ६१ ॥
नाथा ! लङ्कानगरीं जातां येतील संकटें घोर ।
कां हट्ट जावयाचा करिता कारण वदा मला चतुर ॥ ६२ ॥

---

१ शोकरहित.

सगळा वृत्तान्त तिला सांगितला वायुनन्दनें घडला ।
प्रत्युपकार कराया जातो मी बंधु शंसिती ज्याला ॥ ६३ ॥
राक्षसपति-लङ्केशें दशाननें हरुनि रामभार्येला ।
नाम जियेचें सीता नेलें अन्याय हा तयें केला ॥ ६४ ॥
नाथा ! तुमचें जाणें तेथें होय न कदापि सौख्यकर ।
वदली तयास तेव्हां ती लंकासुन्दरी महाचतुर ॥ ६५ ॥
श्रीरामासह झाला वियोग संयोग तो करायास ।
जातों मी लंकेला होइल याच्यांत विपुल आयास ॥ ६६ ॥
प्रेम पुरातन तुमचें किंवा श्रद्धान एकमेकांचें ।
आज न उरलें जाणा म्हणून हें गमन नैव सौख्याचें ॥ ६७ ॥
जातां तेल समाप्तिस पावे नाशास जेवि दीपशिखा ।
स्नेहविनाशें आतां भेटेल तुम्हास खचित कलहसखा ॥ ६८ ॥
लंकाप्रवेशकालीं पूर्वी बहुमान होतसे तुमचा ।
देवासमान नाथा ! आतां उगवेल तो न दिन साचा ॥ ६९ ॥
रावण तीव्रक्रोधी बघून तो आपणास खवळेल ।
दोषी जाणुनि तुम्हां अवश्य पकडून कां न कोंडील ॥ ७० ॥
निर्दोष देशकाला पाहुनि निर्दोष आपणा नाथ ।
तेव्हां आपण जावें लंकानाथास पाहण्या स्वस्थ ॥ ७१ ॥
तूं बोलतेस सुन्दरि ! सगळें तें योग्य कोण न वदेल ।
त्याचें हृदय बघाया इच्छितसे उथळ वा सखे खोल ॥ ७२ ॥
अथवा वैदेहीचें रूप कसें पाहण्यास इच्छि मन ।
मनमेरु रावणाचा कम्पित केला जयें कसा जाण ॥ ७३ ॥
यापरि बोलुनि मारुति अनुमति घेऊनि तो निघे चतुर ।
आला त्रिकूट-शैलासमीप ज्यासम नसे दुजा शूर ॥ ७४ ॥
एका रसास सोडुनि जातें तत्काल नृमन इतर रसीं ।
आश्चर्य फार वाटे प्रतिदिनिं बदले नभांत जेवि शशी ॥ ७५ ॥
कर्मचि या हेतु गमे जिनदासा ! या निसर्ग[१] हेतु नच ।
त्या जीव बांधितो हा बहु स्वभावत्व येइ मग साच ॥ ७६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे हनूमल्लङ्कासुन्दरिकन्यालाभाभिधानं नाम द्वापंचाशत्तमं पर्व ॥ ५२ ॥

---

१ पृथ्वी, हवा वगैरे पदार्थ.

## त्रेपन्नाव्या पर्वांतील कथेचा सार.

पवनञ्जयपुत्र मारुति लङ्कासुंदरीपासून निघून लङ्कानगरींत बिभीषणाकडे गेला. प्रथमतः एकमेकांनीं कुशल प्रश्न विचारले. यानंतर "जो भरतार्द्धाचा अधिपति त्यानें चोराप्रमाणें परक्याची स्त्री चोरून आणणें हें अत्यंत अयोग्य आहे. पर्वतापासून जसा नद्यांचा उगम होतो तसें राजापासून सर्व नीतिमर्यादा उत्पन्न होतात. पण तेच जर अनाचारी झाले तर लोकामध्यें सदाचाराची अपेक्षा करणें हें व्यर्थ आहे. जो राजा अन्यायानें वागतो, अकृत्य करतो त्याचा प्रजासह नाश होतो." यास्तव हे पूज्य स्वपरहिताकरितां आपण आपल्या वडील भावाला या अकार्यापासून परावृत्त करा असें मारुतीनें म्हटलें.

मारुतीला बिभीषण म्हणाला— वत्सा, मी रावणाला एकदां नाहीं दहादां सांगितलें आहे. पण तो दुराग्रही बनला आहे. आपला हट्ट सोडीत नाहीं. आज अकरा दिवस झाले सीतेनें अन्नपाण्याला स्पर्श केला नाहीं. तथापि तिच्यापासून रावणाचें मन विरक्त होत नाहीं. हें बिभीषणाचें भाषण ऐकून मारुतीच्या मनांत दया उत्पन्न झाली. व तो प्रमदवनांत सीतेला भेटण्यासाठीं गेला. तेथील वेली व झाडें अतिशय सुंदर असून फळाफुलांनीं लवलेलीं होतीं. सरोवरें पाण्यानें तुडुंब भरलेलीं होती व त्यांतील प्रफुल्ल कमळें सरोवराच्या डोळ्याप्रमाणें भासत असत.

प्रमदवनांत सीतेला पाहिल्याबरोबर मारुतिच्या मनांत तिच्याविषयीं फार आदरभाव उत्पन्न झाला. कमलाचा त्याग करून येथें जर लक्ष्मी आली असती तर तिला देखिल असें सौंदर्य आपल्या ठिकाणीं नाहीं म्हणून विषाद वाटला असता. असो. ती हाताच्या तळव्यावर आपला गाल टेकून बसली होती. डोळ्यांतून अश्रुधारा गालावर ओघळत होत्या. डोक्याचे केस विसकटलेले होते. रामवियोगानें दुःखी होऊनही ती सर्व स्त्रियापेक्षा वेगळी— असामान्य दिसत होती.

मारुतीनें रूपांतर धारण केलें व पाय न वाजवितां तिच्याजवळ आला व तिच्या ओटीच्या वस्त्रावर त्यानें राममुद्रिका टाकली. ती दृष्टीस पडल्याबरोबर तिच्या गालांत स्मित झळकूं लागलें. हें पाहून रक्षिका स्त्रिया तत्काल रावणाकडे गेल्या व त्यांनीं 'सीतादेवी प्रसन्न झाली तिच्या मुखावर रम्य हास्य दिसत आहे.' असें सांगितलें. ही वार्ता ऐकून रावण आनंदला. आपल्या लोकांना उत्सव करा असें म्हणाला व मंदोदरीला तत्काल तिचें अभिनंदन करण्यासाठीं त्यानें पाठविलें. ती म्हणाली– "तूं आनंदलीस म्हणून आम्हा सर्वांना मोठा आनंद वाटला. आतां हर्षानें रावणाचें सेवन कर." हें भाषण ऐकल्याबरोबर सीता कोपून म्हणाली– माझा पति रामचंद्र आतां लौकरच येऊन रावणाचा नाश करील. मला आज पतिवार्ता समजली म्हणून मला आनंद वाटला. पण मंदोदरी आदिकांना वाटलें कीं, पुष्कळ दिवसाच्या उपवासामुळें वात उत्पन्न होऊन ही बडबडत आहे.

इकडे पतीची वार्ता सांगण्यासाठीं कोण बंधु आला आहे त्यानें प्रगट होऊन मला ती सांगावी. असें म्हटल्यावर मारुति पुढें येऊन उभा राहिला. ज्याच्यांत हरिण नाहीं अशा चंद्राप्रमाणें मारुति सुंदर होता. त्याच्या मुकुटावर वानराचें चिह्न होतें तो हात जोडून सीतेपुढें उभा राहिला. त्यानें प्रथम स्वतःचें कुलगोत्र, माता-पिता व स्वतःचें नांव वगैरे सांगितलें. नंतर रामचंद्रांची हकीकत याप्रमाणें सांगावयास सुरवात केली.

तो म्हणाला– देवि! दुष्ट रावणानें आपणाला हरण करून नेल्यानंतर आपल्यापरोक्ष ज्या हकीकती घडल्या त्या येणेंप्रमाणें:— लक्ष्मणानें सिंहध्वनि केला त्यावरून प्रभुरामचंद्रांना लक्ष्मण संकटांत पडला आहे त्याला साहाय्य करण्यास जावें असें वाटून ते आपणास सोडून गेले. व इकडे रावणानें आपणास हरण करून नेलें. "मी सिंहध्वनि केला नाहीं व मी संकटग्रस्तही झालों नाहीं. आपण तत्काल सीतादेवीच्या रक्षणासाठीं जावें" असें लक्ष्मणानें सांगितलें. आपणास कोणी दुष्टानें फसविलें असें रामप्रभूंना वाटलें. ते वेगानें धांवत आले. पण त्यांना आपलें दर्शन झालें नाहीं. प्रभु इकडे तिकडे आपल्यासाठीं भटकत असतां 'जटायु' आसन्नमरण होऊन पडलेला दिसला. त्याला त्यांनीं पंचनमस्कार सांगितला व तो मरून स्वर्गांत देव झाला.

रामचंद्रप्रभु भटकून शेवटीं आश्रमांत येऊन जमिनीवर पडून राहिले. लक्ष्मण खरदूषणास मारून परत आला. विराधिताबरोबर रामचंद्र व लक्ष्मण रथांत

बसून पाताळलंकेंत गेले. तेथें सुग्रीवानें खोट्या सुग्रीवानें माझें राज्य व सैन्य ग्रहण केलें आहे मला आपण सहाय्य करावें असें रामप्रभूस म्हटलें. त्यांनीं कबूल केल्यावर सुग्रीवासह विराधित, रामप्रभु, लक्ष्मण किष्किधानगरीस गेले. खरा सुग्रीव व खोटा सुग्रीव यांची लढाई झाली. रामचंद्रांना त्यावेळीं खऱ्या खोट्याचा भेद समजला नाहीं. पण पुनः लढतेवेळीं लक्ष्मणानें खोट्या सुग्रीवास दाबून धरलें. रामचंद्र त्यावेळीं त्याच्याजवळ गेल्याबरोबर वेतालीविद्या त्याला सोडून गेली. शेवटीं साहसगतिबरोबर लढून त्याला रामप्रभूंनीं ठार मारलें. सुग्रीवादिक अनेक विद्याधर आपला शोध करण्यासाठीं निघाले. इतर कोणाला आपली वार्ता कळली नाहीं. पण सुग्रीवाला रत्नजटीची भेट झाली व त्यानें सुग्रीवाला रावणानें सीतादेवीला हरण करून नेल्याची वार्ता कळविल्यानंतर मला रामचंद्रप्रभूंनीं इथें आंगठी देऊन पाठविलें आहे. असा हा पूर्वेतिहास आहे.

सुग्रीवावर जो रामप्रभूंनीं उपकार केला त्याच्या प्रत्युपकारास्तव मला सुग्रीवानें पाठविलें आहे. रामप्रभूंनीं आपला चूडामणि मागितला आहे तो आपण द्यावा म्हणजे मी त्यांना दाखवीन त्यामुळें त्यांची खात्री होईल.

हें मारुतीचें भाषण ऐकून सीतादेवी म्हणाल्या— माझ्या पतिसंनिध तुझ्या-सारखे सुजन किती आहेत ? त्यावेळीं मंदोदरी म्हणाली— जे सद्गुणी असतात ते स्वतःविषयीं कांहीं बोलत नसतात. मी त्यांच्याविषयीं सांगत्ये— या मारुतीनें युद्धांत रावणाला अनेकवेळां साहाय्य केलें आहे. सर्व वीरांत हा मारुति अतिशय प्रसिद्ध आहे. पण आतां हा भूमिगोचरीचा दास बनला आहे.

मारुति म्हणाला— मंदोदरी देवि, आपण चार शब्द सांगून या अकार्यापासून रावणाला निवृत्त करावयास पाहिजे पण उलटें त्याची दूती होऊन त्याच्या पापकार्याला सहायक झालेल्या आहांत ही खेदाची गोष्ट आहे.

मंदोदरी म्हणाली— तूं अपराधी आहेस असें असूनही दूत बनून आला आहेस. ही वार्ता जर त्यांना कळेल तर ते तुला कडक शासन करतील.

यानंतर सीता मंदोदरीला म्हणाली— माझ्या पतीच्या वज्रावर्त धनुष्याचा टंकार ऐकून महावीरही थरथर कांपतात. लक्ष्मणाला पाहिल्याबरोबर शत्रु जीवित रक्षणासाठीं सैरावैरा पळून जातात. आतां माझा पति येऊन लक्ष्मणाच्याद्वारें रावणास ठार मारून तुला व तुझ्या सर्व सवतींना विधवा करील. हें ऐकल्याबरोबर त्या सर्व रावणस्त्रिया सीतेला मारण्यासाठीं धांवल्या मध्यें मारुति उभा राहून त्यांचें निवारण केल्यावर त्या रागानें निघून गेल्या.

नंतर मारुतीनें सीतादेवीला जेवणास्तव विनंति केली व इरा नांवाची कुलीन स्त्री जी मारुतीला भाऊ मानीत असे तिनें आहार तयार केला व सीतेनें देवपूजादि उरकून जेवण केलें. नंतर थोडावेळ तिनें विश्रांति घेतली. मारुतिही बिभीषणाच्या घरीं आहार घेऊन पुनः सीतादेवीकडे आला. त्यानें तिला म्हटलें कीं– भगिनी, तूं माझ्या खांद्यावर बैस मी तुला समुद्र उल्लंघून रामचंद्राकडे नेईन म्हणजे त्यांचा विरह नाहींसा होईल. ते तुझा आदरानें स्वीकार करतील.

सीतेनें आपले दोन हात जोडून म्हटलें कीं– प्रभूची आज्ञा तशी असती तर मी आले असतें. सर्व लोक मलाही शुद्ध आहे असें बोलतील तर माझें येणें योग्य होईल अन्यथा नाहीं. यास्तव रामचंद्र जसा निर्णय घेतील तसें वागणेंच माझ्या हिताचें होईल. असें बोलून सीता म्हणाली– हे बंधो, आतां तूं येथें राहू नकोस तुझें येणें रावणाला समजेल तर तो तुला मटाकडून बांधवील व पीडा देईल. तूं येथून निघतांना तुला माझा संदेश देते तो रामाला जाऊन सांग.

“ हे राम, आपण दोघां चारणमुनींना अतिशय भक्तीनें आहार दिला होता. व त्यावेळीं पञ्चाश्चर्यवृष्टि झाली होती हें आपणास आठवत असेलच. एकेवेळीं कमळ-शोभित सरोवरांत आपण उभयतां जलक्रीडा हर्षानें करीत असतां एक रानटी हत्ती गर्जना करीत अंगावर धांवून येत होता त्याला आपण खेळून वश केलें होतें. एका झाडाची फुलांनीं लकडलेली फांदी मी वाकवीत असतां भुंगे माझ्या अंगावर आले. त्यावेळीं मी भीतीनें आपल्या गळ्याला मिठी मारिली होती. एकेवेळीं सूर्योदयकालीं मी व आपण एका कमलसरोवराजवळ उभयतां उभे राहिलों असतां आपण कौतुकानें कमलनालानें मला ताडन केलें होतें. या झाडाचें नांव काय? यांचीं फुलें फार सुंदर दिसतात असें मी म्हणालें असतां आपण याला नंदिवृक्ष म्हणतात असें सांगितलें होतें तें आठवत असेलच. अशा अनेक गोष्टी आपल्या स्मरणांत येत असतीलच. या सुखद स्मरणांनीं थोडावेळ आपल्या मनाला हर्ष वाटत असेल व पुनः दुःखही होत असेल.” “ नाथ, माझ्या या चूडामणीवर आपलें फार प्रेम होतें यास्तव हा मी या बंधूबरोबर आपल्याकडे पाठविते त्याचा स्वीकार व्हावा.” असें बोलून सीता रडूं लागली. मारुतीनें तिचें सांत्वन केलें. नंतर तो चूडामणि मारुतिजवळ दिला व रामचंद्रांनीं दिलेली आंगठी बोटांत घालून म्हणाली– प्रभो, आपल्या हांतून त्यावेळीं प्रमाद घडला म्हणून हा वियोगप्रसंग भोगणें नशिबीं आलें आहे. मी तो भोगीन पुनः आपला संयोग होईल तोपर्यंत मी प्राणांचें रक्षण करीन असें म्हणून सीतेनें मारुतीस रामाकडे जाण्यास सांगितलें.

मारुति जाण्यास निघाला असतां त्याला पकडण्यासाठीं रावणाचें सैन्य आलें त्याच्याशीं लढतांना त्याच्यावर त्यानें शिला फेकल्या. झाडें उपडून फेकून दिलीं. हातांनीं, पायांनीं, मुठींनीं पुष्कळांना त्यानें मारिलें. व बगीच्याची नासधूस करून तो तेथून निघून लंकेच्या बाहेर आला.

तेथें मारुतीला पकडण्यासाठीं इंद्रजित व मेघवाहन सैन्य घेऊन लढण्यास सज्ज होते. इंद्रजिताबरोबर बराचवेळ युद्ध झालें. शेवटीं नागपाशांनीं बांधून मारुतीला रावणाजवळ इंद्रजितानें आणिलें. किष्किंधेहून लंकेच्या उद्यानांत येईपर्यंत मारुतीनें काय कार्य केलें हें सर्व इंद्रजितानें रावणाला सांगितलें.

रावण रागावून म्हणाला–" हे मारुते, तुझ्यावर मी पुष्कळ उपकार केले होते. तूं आदरणीय होतास पण तूं आतां भूगोचरांचा दास बनून माझी मर्जी गमावून बसला आहेस. तूं कृतघ्न झालास. तुझें तोंड मी पाहू इच्छित नाहीं." त्याचवेळीं रावणाच्या स्त्रियाही त्याला रागावून बोलल्या.

मारुतीनें रावणाला व त्या स्त्रियांना म्हटलें कीं– " तुमच्या पतीला कुबुद्धि सुचून त्यानें सीतेचें हरण केलें. आतां लौकरच युद्ध होऊन त्यांत रावण मारला जाईल व तुम्ही विधवा व्हाल. हे रावणा तूं कुदैवप्रेरित होऊन सीता हरिली आहेस. गुरुजनांनीं व हितैषी बंधुमित्रांनीं तुला हितोपदेश दिला तरी सीतेचा त्याग करीत नाहींस. या कुत्सित आचरणानें तुला दीर्घकालपर्यंत नरकांत दुःख भोगावें लागेल. पूर्वी तुझ्या वंशांत सदाचारी, कीर्तिवंत, प्रजाप्रेमी अनेक राजे होऊन त्यांनीं सर्व जगाला आपल्या कीर्तिनें धवलित केलें होतें पण तूं आपल्या कृष्णकृत्यांनीं त्यांचें यश मलिन केलें आहेस. त्यांच्या पवित्रवंशाचा तूं नाश करणारा निपजलास."

या त्याच्या भाषणानें रावणास राग आला. त्यानें या दुष्टाला सर्व नगरींतून फिरवा व ' हा विद्याधर असूनही भूमिगोचरीचा दीन दास बनलेला आहे याला पाहा असे सर्व लोकांना सांगा ' अशी आज्ञा नोकरांना दिली. त्याप्रमाणें ते फिरवीत असतां मारुतीनें आपलीं बंधनें कोपानें तोडून टाकिलीं व तो आकाशांतून उड्डाण करून किष्किंधानगरास रामाकडे जावयास निघाला. सीतेनें मारुतीच्या परोक्ष रामचंद्राला हा निर्विघ्न भेटो म्हणून परोक्षरीतीनें पुष्पांजलि वाहिली. किष्किंधेला पोहोंचल्यावर त्यानें सर्व हकीकत रामचंद्रांना सांगितली व चूडामणि दिला याचें वर्णन पुढें येईल.

हे भव्यहो तुम्ही जिनदास होऊन अकार्यें त्यागा, सज्जनसंगतींत राहा व जिनभक्ति करा म्हणजे तुमचें कल्याण होईल.

# त्रेपन्नावें पर्व.

स्वल्पचि किङ्कर घेउनि अपुल्यासह वायुपुत्र लङ्केंत ।
विक्रमशाली शिरला शङ्कालवहि[1] न यदीय-हृदयांत ॥ १ ॥

( बिभीषणाकडे जाऊन मारुतीनें सीता रामचंद्रास परत दे असें तूं त्याला सांग असें म्हटलें तेव्हां बिभीषणानें सांगण्याचें कबूल केलें :— )

गेला विभीषणाच्या सदनीं सम्मान करुनि तो वसवी ।
कुशलप्रश्नानन्तर मारुति वदला जणु प्रभातरवि[2] ॥ २ ॥
जो भरतार्द्धाचा पति त्यानें चोरासमान चोरून ।
आणावी परनारी कोणाचें त्या वदेल योग्य मन ॥ ३ ॥
उत्तम-मर्यादांचें नृप पर्वत मूळ जेवि सरितांचें ।
तोचि अनाचारी जर लोकीं आचार केवि मग साचे ॥ ४ ॥
ज्या सर्वलोक निन्दिति कृत्य असे भूप जेधवा करितो ।
फल घोर दुःखदायक निजप्रजेसह अवश्य तो वरितो ॥ ५ ॥
स्वपरहितास्तव यास्तव करि जें तत्क्षेम रावणापाशी ।
जाऊन बोल मान्या ! वचन न्यायास जें सदा स्पर्शी ॥ ६ ॥
इहपरलोकीं जेणें निन्दा होईल कार्य तूं न करी ।
हे जगताच्या नाथा ! अकीर्तिकर कार्य सर्वथा न वरी ॥ ७ ॥
येथेंच चरित निर्मल नाथ तुझें गाइलें न हें जातें ।
परि सुरलोकीं देखिल सुर कर जोडून गाति नित त्यातें ॥ ८ ॥
यापरि दशाननाला त्याचा हितवन्धु सर्वदा असंसी ।
वद वा तूं मद्वचना, तव शुभ गातात चरित देवर्षि ॥ ९ ॥
पवनसुतास विभीषण वदला मी अग्रजांस[3] सांगितलें ।
वत्सा, अनेकवेळां परि त्यानें वर्ज्य बोलणें केलें ॥ १० ॥
परि तव वचना मानुनि निजाग्रजा मी उद्या कथीन हित ।
मानील न मद्वचना दुराग्रहा जो असे वशीभूत ॥ ११ ॥

---

१ भीतीचा अंशही. २ प्रातःकालचा सूर्य. ३ वडील भावास.

अकरा दिवस जहाले सोडुनि आहार आज सीतेनें ।
लङ्केन्द्राच्या हृदयीं विरक्ति देतें तथापि नच ठाणें ॥ १२ ॥
ऐकुनि विभीषणाचें वचन तयाच्या मनीं दया उपजे ।
प्रमदवनीं जायाला पवनञ्जयतनय तत्क्षणांत सजे ॥ १३ ॥
सुन्दर-रामाकर[1]-सम कोमल-पल्लव-समूह ज्यास असे ।
ऐशा लतासमूहें जें वन अरुणप्रकाशतुल्य दिसे ॥ १४ ॥
जे वाऱ्यानें झुलती ज्यांच्या फांद्या फलें सदा नम्र ।
जे भ्रमरांनीं वेष्टित ऐसे तरु शोभती जिथें आम्रें[2] ॥ १५ ॥
कमलवनानें शोभित विमलजलें जीं तुडुम्ब भरलेलीं ।
ऐशा सरोवरांनीं शोभा ज्याला अपूर्वशी आली ॥ १६ ॥
जेथें महातरूंना कल्पलता गाढ मारतात मिठी ।
त्या प्रमदवनीं आला मारुति सीता-विलोकनासाठीं ॥ १७ ॥

( सीतादेवीला पाहून मारुतीच्या मनीं आदर उत्पन्न झाला. )

दिसतां दुरून सीता इतरांच्या दर्शनीं न मोद वसे ।
वाटून वायुतनया आदर त्याच्या मनीं तदा विलसे ॥ १८ ॥
करिता विचार झाला श्रीरामाचीच ही असे भार्या ।
हरुनि दशग्रीवानें विरहानलिं हाय टाकिली आर्या ॥ १९ ॥
नेत्रांतुनि गालावरि अश्रूंचे थेंब हे हिच्या गळती ।
स्निग्धाग्निज्वालेसम दिसते नयनास शान्त ही सुदती[3] ॥ २० ॥
हाताच्या तळव्यावर टेकुनि सीता मुखारविन्दास ।
केस जिचे सुटलेले कृशोदरी जी दिसे सदोदास[4] ॥ २१ ॥
ही निजसौन्दर्यानें जिंकी त्रिजगीं समस्तसौन्दर्या ।
सुरसुन्दरीहि वानिति रूप जिचें ही असे अशी आर्या ॥ २२ ॥
कमलें सहितहि लक्ष्मी दिसे हिच्यासारखी न केव्हांही ।
दुःखी असुनिहि इतर स्त्रियाहुनी भिन्न सर्वथा पाही ॥ २३ ॥
या शैलाच्या शिखरावरून मी पडुनि मृत्यु पावेन ।
श्रीरामचन्द्रविरहीं मी या हतजीविता न वाहीन[5] ॥ २४ ॥

---

१ स्त्रीच्या हाताप्रमाणें  २ आंब्याचीं झाडें.  ३ सुंदर दांत जिचे आहेत ती.
४ सदा उदास.  ५ दीनवाणें जगणें.

( रूपांतर धारण करून मारुतीनें सीतेच्यापुढें रामाची आंगठी टाकली ती घेऊन सीता अतिशय हर्षित झाली. )

यापरि हृदयीं चिन्तन करीत असतां तिच्याकडे आला।
रूपान्तर पवनात्मज वरून निःशब्द करुनि पदकमला ॥ २५ ॥
जी नित्य परिचयाची होति तिच्या राममुद्रिका टाकी ।
ओटीच्या वस्त्रावर मारुति सीता तियेस अवलोकी ॥ २६ ॥
हर्षं वदनीं झळके मधुरस्मित तेवि पुलक[1] देहांत ।
पाहून रक्षिकागण धावत गेला दशानना त्वरित ॥ २७ ॥

( सीता हर्षित झाली हें पाहून दासीनीं तिच्या हर्षाची बातमी रावणाला कळविली. रावणाच्या आज्ञेनें मंदोदरी वगैरें राण्यांनीं सीतेपुढें आमच्या पतीचा स्वीकार तूं करशील म्हणून आम्हाला आनंद होत आहे असें म्हटलें. नंतर सीतेनें कोपून जें भाषण केलें तें याप्रमाणें :—)

नाथा ! प्रसन्न झाली सीता मुखि हास्य रम्यसें दिसलें ।
ऐकुनि देहावरचे दशवदनें वस्त्र रत्न सर्व दिलें ॥ २८ ॥
सीतेनें स्मित केलें झालें मम कार्य सिद्ध मानि मनीं ।
उत्सव करावयाला देई आज्ञा समस्तशा स्वजनीं ॥ २९ ॥
पतिची आज्ञा होतां येई मन्दोदरी स्वपरिवारें ।
सीतामुख हर्षाकुल पाहुनि हृदयीं तिच्या प्रमोद भरे ॥ ३० ॥
वदली बाले ! केला त्वां अमुच्यावरि महाननुग्रह गे ।
लंकेश-रावणाला शोका सोडून सेवि अनुरागें[2] ॥ ३१ ॥
त्या लाभलीं असे गे खण्डत्रयसंपदा तयास सुर ।
करिती वन्दन त्याच्यांसम आहे गे जगांत कोण नर ॥ ३२ ॥
यापरि भाषण ऐकुनि सीता मन्दोदरीस कोपून ।
वदली पद्मचि मम पति मारिल तो रावणास येऊन ॥ ३३ ॥
मज पतिवार्ता कळली झाला माझ्या मनास सन्तोष ।
यास्तव मी गे हसल्ये आनन्दाचा मिळे मला कोप ॥ ३४ ॥
सीतावचना ऐकुनि वदल्या लङ्केशयोषिता[3] वदते ।
क्षुद्भववातें[4] हसते येईल कदापि राम नच येथें ॥ ३५ ॥

१ आनंदानें रोमाञ्च उभे राहणें. २ प्रेमानें. ३ रावणाच्या स्त्रिया. ४ अतिशय भूक लागून उत्पन्न झालेल्या वातानें.

इकडे सन्तोषानें उत्कण्ठित वचन बोलली सीता ।
या घोरसागराच्या द्वीपीं मी तीव्र सङ्कटग्रस्ता ॥ ३६ ॥

( मारुति प्रगट होऊन सीतेला रामचंद्राची विरहावस्था सांगतो. )

कोण मला यावेळीं आला तारावयास धावून ।
प्रेमळबन्धु तयानें बोलावें प्रगट कां न होऊन ॥ ३७ ॥
तेव्हां वायुसुतानें विचार केला मनांत ऋजुभावें[1] ।
उपकारकसुजनानें लपून वसणें न योग्य भयभावें ॥ ३८ ॥
सङ्कटकष्टांतुनि जे करिती उद्धार धरिति हृदयिं दया ।
जन्म तयांचा निर्मल इतरांचा जन्म होतसे वाया ॥ ३९ ॥
झालों प्रगट तयानें हानि न येई परोपकारांत ।
गुरुता[2] लाभे होइल लक्ष्मी ही सफल सुयश जगतांत ॥ ४० ॥
यापरि चिन्तुनि झाला भामण्डलतुल्य मारुति प्रगट ।
श्रीरामधर्मपत्नीपुढें उभा भालिं जोडुनी हस्त ॥ ४१ ॥
अप्रतिमरूपधारी निर्मृगचन्द्रासमान[3] कान्तियुत ।
मुकुटीं वानरचिह्ना धरि चन्दनगन्ध जो स्वदेहांत ॥ ४२ ॥
कुल गोत्र नाम माता-पितादिकांचें सुवृत्त ऐकवुन ।
दशरथवंशदिवाकर[4]-रामाचें वृत्त तो कथी निपुण ॥ ४३ ॥
तुमच्या विरह-समुद्रीं श्रीराम निमग्न जाहले असती।
विभवयुत स्वर्गासम सौधीं त्यांना मिळे न लवहि रति ॥ ४४ ॥
सोडून सकलकार्यें धारण करितात मौन ते बहुधा ।
मुनिसम तुमचें चिन्तन करून एकाग्रचित्त करिति सदा ॥ ४५ ॥
वीणादिक वाद्यांच्या साथीसह गान मधुर जरि चाले ।
न करी प्रवेश कानीं त्यांचें त्वच्चिन्तनांत मन रुतलें ॥ ४६ ॥
सर्वांजवळ स्वामिनि तुमचीच कथा सदैव वदतात ।
तुमच्याच दर्शनार्थ प्राणा बान्धून ठेविती सतत ॥ ४७ ॥
यापरि निजपतिजीवननिवेदिवचनावलीस[5] ऐकून ।
परमानन्दा पावुनि लोचन बनले प्रफुल्लता-सदन ॥ ४८ ॥

---

१ सरळपणानें. २ मोठेपणा. ३ हरिणानें रहित चंद्रासारखा. ४ सूर्य.
५ आपल्या पतीच्या जीवनाचें वर्णन करणाऱ्या शब्दसमूहास.

दुःखी पति बहु झाला म्हणून वाटे विषाद फार तिला ।
जलपूर्ण नेत्र झाले शान्ता वदली विनीत मारुतिला ॥ ४९ ॥
मी दुर्दैवी अतिशय झालें मी सङ्कटांत या मग्न[१] ।
देऊं काय तुला मी झाल्या इच्छा समस्त मम भग्न ॥ ५० ॥

( पति रामचंद्राविषयीं ज्या अनिष्ट कल्पना सीतामनांत उद्भवल्या त्या तिनें मारुतिपुढें मांडल्यावर त्या कल्पनांचें निवारक भाषण करून तिच्या परोक्ष घडलेल्या गोष्टींचें मारुतीनें जें वर्णन केलें तें असें :— )

वदला मारुति तिजला हे पूज्ये ! दर्शनेंचि मी तुष्ट ।
मजला सर्व मिळालें वाटूं देऊं नकोस मनिं कष्ट ॥ ५१ ॥
आणुनि नयनीं पाणी जणु दुःखी श्री तयास ती वदली ।
दुस्तर सागर लंघुनि वन्धो ! गति येथ केवि तव झाली ॥ ५२ ॥
लावण्यद्युतिरूपें युक्ता मम वान्धवा कुठें तुजला ।
झालें मत्पतिदर्शन लक्ष्मण सद्बन्धु हा असे ज्याला ॥ ५३ ॥
किंवा भीषणसमरीं खलखचरें ठार मारिलें त्यास ।
लक्ष्मण-सङ्गत मम पति जीवित वा धरुनि सांग सत्यास ॥ ५४ ॥
किंवा मद्विरहाच्या दुःखें सन्देश तुजशि सांगून ।
वनिं परलोकाश्रित कां झाला मज सर्व सांग अन्यून[२] ॥ ५५ ॥
अथवा भववैराग्यें त्यागुनि सगळ्या परिग्रहां नाथ ।
झाला जिनेन्द्रमार्गी मुनीश कां सेवि मुक्तिपुरपन्थ[३] ॥ ५६ ॥
झाला वियोगदुःखें कृश सर्वावयव-देह रामाचा ।
तेणें गळून पडली मुद्रा कां सत्य बोल मज वाचा ॥ ५७ ॥
परिचय मम प्रभूशीं वन्धो नच केधवाहि तव झाला ।
कार्यावांचुनि वद वा मित्रपणा हा कसा तुला आला ॥ ५८ ॥
करुनि कृपा माझ्यावरि आणियली आंगठीं तुवा सदया ।
झाला प्रमोद मजला प्रत्युपकृति[४] परि समर्थ न कराया ॥ ५९ ॥
मजला जें जें घडलें वन्धो तूं वृत्त सांग तें सगळें ।
शपथ तुला देवाची संशय जेणें मदीय सकल गळे ॥ ६० ॥

---

१ नम्र. २ पूर्ण. ३ मुक्तिनगराचा मार्ग. ४ उपकार करणाऱ्याच्यावर उपकार करणें.

ऐसें विचारल्यावर करयुग जोडून वायुपुत्र वदे ।
मी सत्य तेंचि कथितों जें सज्जन-मानसास तोषा दे ॥ ६१ ॥
रविहास[1]खड्ग घेउनि शम्बूकवधास लक्ष्मणें केलें ।
चन्द्रनखेनें सांगुनि अनिष्ट खरदूषणास रोषविलें ॥ ६२ ॥
खरदूषणें अनेका खगराजांना सहाय करण्यास ।
बोलाविलें स्वसैन्या घेउनि गेला स्वयंहि समरास ॥ ६३ ॥
झालें युद्ध भयङ्कर रामानुजलक्ष्मणें खरा[2] वधिलें ।
तेव्हां त्याच्या सैन्यें तेथून पलायन त्वरें केलें ॥ ६४ ॥
रावण सैन्या घेउनि आला युद्धास दण्डकाख्यवनीं ।
पाहून आपणाला हरणाची बुद्धि हीन होय मनीं ॥ ६५ ॥
नीतीस पूर्ण विसरुनि विवेक देई समस्त सोडून ।
मायेनें सिंहध्वनि करून हरणार्थ तो करी यत्न ॥ ६६ ॥
ऐकून पद्म मायासिंहध्वनि लक्ष्मणास समरांत ।
साहाय्य करायातें गेले परि जाहलें न तें उचित ॥ ६७ ॥
करुनि त्वरा सुमित्रा[3]तनयें रामास परत पाठविलें ।
हरिलें दशकण्ठानें स्वस्थानीं आपणा न पाहियलें ॥ ६८ ॥
शोधायास्तव केलें भ्रमण वनीं शोकखिन्न होऊन ।
श्रीरामें पाहियला जटायु आसन्न ज्या असे मरण ॥ ६९ ॥
कानांत मृत्युसमयीं पञ्चनमस्कारमन्त्र सांगितला ।
तेणें प्राणा त्यागुनि सुरलोकीं दिव्य देव तो झाला ॥ ७० ॥
पूज्ये ! तुलाच हृदयीं ठेवुनि करि राम काननीं भ्रमण ।
आला लक्ष्मण तेथें समरीं खरदूषणास मारून ॥ ७१ ॥
रत्नजटीनें कथिलें येउनि सीतेस रावणें हरिलें ।
सुग्रीवरूप विद्यासामर्थ्यें साहसें तदा धरिलें ॥ ७२ ॥
श्रीरामदर्शनानें विद्या सोडून साहसा गेली ।
सुग्रीवरूप गेलें स्वरूपता[4] तेधवा तया आली ॥ ७३ ॥
रामें लढून त्याला समराङ्गणिं घोर मारिलें ठार ।
सुग्रीवावरि केला यापरि उपकार जो असे थोर ॥ ७४ ॥

---

१ सूर्यहास नांवाची दिव्य तरवार. २ खरदूषणाला. ३ लक्ष्मणानें.
४ मूळचें स्वरूप.

या प्रत्युपकारास्तव पाठविलें वडिलबान्धवें मजला ।
जो त्वत्परोक्ष घडला पूज्ये ! इतिहास तोचि सांगितला ॥ ७५ ॥

( मी रावणाला रामचन्द्रांना सीता दे असें सांगेन असें
मारुतीनें म्हटलें तें असें :— )

पूज्ये ! विमुक्त करण्या स्नेहानें रावणास सांगेन ।
समराविण कार्याची जी सिद्धि तिला प्रशंसिती सुजन ॥ ७६ ॥
लङ्कापुरीस रावण असे दयाळू नि हृदय मृदु त्याचें ।
सत्यव्रतांत सुस्थिर वच त्याचें क्रौर्यरहित नित साचें ॥ ७७ ॥
कीर्ति असे जगतीतलिं विश्रुत शशिशुभ्र सुजनगणमान्य ।
लोकापवादभय मनिं त्याच्या राहे सदैव नच अन्य ॥ ७८ ॥
तो करिल वचन माझें मान्य नि अर्पण करील रामास ।
तुजला भगिनी जेणें येइ न समरप्रसङ्ग आम्हांस ॥ ७९ ॥
बन्धुप्रेमा पाहुनि जनकसुता बोलली तया सीता ।
वायुसुता गुण रमविति या भगिनीच्या सखेदशा स्वान्ता ॥ ८० ॥
धैर्य, पराक्रम, रूप नि विनयें जे तुजसमान आहेत ।
माझ्या पतिसन्निध ते असती किति बोल सुजन धीमन्त ॥ ८१ ॥
सीतावचना ऐकुनि वदली मन्दोदरी तियेस असें ।
जे शूर सत्त्वशाली सुगुणी ते शंसिती स्वतःस कसें ? ॥ ८२ ॥
वैदेहि वायुसुत हा ठाउक नाहीं विचारिसी म्हणुन ।
याच्यासमान दुसरा नसे कपिध्वज असें मनीं आण ॥ ८३ ॥
गजवाजिविमानादिक सैन्याच्या घोर समरकार्यांत ।
साहाय्य रावणाला होतें अतिशय कुणा न हें विदित ॥ ८४ ॥
ज्यानें दशानना रणिं केलें साहाय्य विजयलाभांत ।
पवनाञ्जनातनय हा प्रसिद्ध हनुमान् समस्त-वीरांत ॥ ८५ ॥
मोठें सङ्कट येतां शत्रूंचें रावणावरी हाच ।
करुनि विनाश तयाचा विजयाचा लाभ देतसे साच ॥ ८६ ॥
चन्द्रनखेची तनया अनङ्गकुसुमा दिली तया प्रेमें ।
याचें दर्शन होतां सर्वां आह्लाद होतसे नियमें ॥ ८७ ॥

---

१ लक्ष्मणाच्या वडील भावानें. २ क्रूरपणारहित. ३ प्रसिद्ध. ४ घोडा.

आहे प्रसिद्ध हनुमान् सगळ्या जगतीतलांत हा स्वगुणें ।
परि भूमिगोचरीचें केलें दूतत्व हेंचि यास उणें ॥ ८८ ॥
आश्चर्य मना भासे विशेष हें निन्दनीय कर्म असे ।
होउनि खेचर भूचर-किङ्कर झालास पावने कैसें ॥ ८९ ॥

( मंदोदरीच्या भाषणास मारुतीचें खमंग उत्तर:— )

रावणभार्या-भाषण ऐकुनि गम्भीर पवनसुत बोले ।
मूर्खपणा तव दिसतो अविचारें युक्त या तुझ्या बोलें ॥ ९० ॥
ज्याच्या प्रसन्नतेनें होउनि सम्पन्न जगत आहोत ।
इच्छी अकार्य जरि तो सुबुद्धि देणेंचि हें तया उचित ॥ ९१ ॥
जो अज्ञात-विषान्ना खाण्या उद्युक्त जाहला मनुज ।
करणें निवृत्त त्याला मित्राचें हें सुयुक्ततर काज ॥ ९२ ॥
सुख जो इच्छी मानव त्यानें सन्तत कृतज्ञ राहावें ।
स्वार्थचि जाणी त्याचें जीवन पशुतुल्य कां न समजावें ॥ ९३ ॥
मन्दोदरि मनिं विफलचि गर्वा तूं वाहतेस निःसार ।
अग्रमहिषी असूनहि दूतपणा वाहतेस लाचार ॥ ९४ ॥
गेलें सौभाग्य कुठें गेलें उन्नत तुझें कुठें रूप ।
झालीस स्वपतीची दूती तूं हें असे महापाप ॥ ९५ ॥
तुजला सोडुनि अन्यस्त्रींत पतीचें तुझ्या रमे चित्त ।
तूं महिषी नच झालिस गायीसम दीन दुर्भगा साच ॥ ९६ ॥

( मन्दोदरी कोपानें मारुतीला बोलतें तें ऐकून सीता तिला कोपून तिची हजेरी घेतें. )

मन्दोदरी म्हणाली कोपानें लालबुन्द होऊन ।
तूं अपराधी असुनि प्रगल्भता दावितोस रे कुजन ॥ ९७ ॥
होऊन दूत आला असशी सीतेकडे दशानन हें ।
जाणील जरी राहिल शासन केल्याविणें न तो पाहें ॥ ९८ ॥
दुर्दैवानें ज्यानें चन्द्रनखानाथ मारिला समरीं ।
सुग्रीवादिक त्याचे बनले हे दास लाजती न उरीं ॥ ९९ ॥
विसरुनि दशाननाचा भृत्यपणा बनुनि हे कृतघ्न खग ।
अवलंबिति भलत्याला करिती त्याच्यावरीच अनुराग ॥ १०० ॥

---

१ जमिनीवर विहार करणाऱ्याचा नोकर. २ पवनञ्जयाच्या पुत्रा मारुते. ३ दुर्दैवी; कष्टी. ४ नीचा.

खग गर्वोद्धत झाले बनली तच्चित्तवृत्ति अतिहीन ।
अकृतज्ञ मूढ बनले आलें यांचें समीपसें मरण ॥ १०१ ॥
हें रावणमहिषीचें भाषण ऐकून कोपली सीता ।
मन्दोदरि ! तूं मन्दा खरीच तव वचन जाण सर्व वृथा ॥ १०२ ॥
शूरजनीं विद्वज्जनिं माझा प्रिय राम वर्णिला गेला ।
अद्‌भुतपराक्रमी तो त्याच्या सुगुणा जगांत नैव तुला[1] ॥ १०३ ॥
वज्रावर्त-धनूचा ज्याच्या ध्वनि घोर ऐकतां सुभट ।
थरथर कम्पित होती होतें ज्यांच्या मनीं भय प्रगट ॥ १०४ ॥
लक्ष्मण अनुज जयाचा शरीर सुन्दर असे रमागेह[2] ।
जो दर्शनेंचि शत्रुक्षय करि तिळभरि न यांत सन्देह ॥ १०५ ॥
अधिक कशाला बोलूं येईल तरून सागरास पति ।
सौमित्रीच्या द्वारें मारिल तो रावणास शीघ्रगति ॥ १०६ ॥
पापप्रिय निजपतिच्या होउनि अनुकूल वागतेस सदा ।
फल त्याचें वैधव्या होशील प्राप्त दुःख जें बहुधा ॥ १०७ ॥

( मन्दोदरी आदि रावणस्त्रिया सीतेला मारण्यास उठल्या.
मारुतीनें त्यांना विरोध करून सीतेचें संरक्षण केलें. )

यापरि सकोप होउनि सीता अतितीव्र वचन जें वदली ।
मन्दोदरीस आला कोप नि मारावयास ती उठली ॥ १०८ ॥
सवती तिच्या हजारो सकोप होऊन मारण्याकरितां ।
उठतां रोधी मारुति शैल जसा रोधितो महासरिता ॥ १०९ ॥
वैद्य जसा रोग्याच्या हरि दुःखदवेदना दयाशील ।
तैसें श्रीशैलानें निवारिलें दुःखहेतु त्या प्रबल ॥ ११० ॥
त्या कुपित सर्व झाल्या गेल्या त्या आपटीत पायास ।
आल्या दशाननाच्या समीप कळविति तया अपायास ॥ १११ ॥

( पतिवार्ता कळल्यानंतर मी आहार घेईन ही प्रतिज्ञा पार पडली
म्हणून मारुतीच्या प्रार्थनेनें सीतेनें आहार घेतला. )

इकडे श्रीशैलानें म्हटलें सीतेस हात जोडून ।
भगिनी सतीशिरोमणि करि आतां शुद्ध भोजना ग्रहण ॥ ११२ ॥

---

१ उपमा. २ लक्ष्मीचें घर.

ती पूर्ण आज झाली केली होती मनीं प्रतिज्ञा जी ।
यास्तव साध्वी सीता झाली आहार घ्यावया राजी ॥ ११३ ॥
हे भगिनि ! सागरावधि पृथ्वी ही सकल रामदेवाची ।
होइल जाणुनि नियमें प्रवृत्ति भोजनिं घडो तुझी साची ॥ ११४ ॥
यापरि पवनसुताचें सीतेनें वचन मानिलें मोदें ।
घेइन भोजन बन्धो कष्टी होऊं नकोस तूं खेदें ॥ ११५ ॥
होतें नांव जियेचें इरा असे एक कुलवंती[1] कन्या ।
होती मारुति शिबिरीं कथिलें आणावयास मधुरान्ना ॥ ११६ ॥
श्रीशैलानें केला विभीषणाच्या घरांत आहार ।
सूर्योदय झाल्यावर भेटे त्याला विभीषण प्रवर ॥ ११७ ॥
सूर्योदय झाल्यावर चौथ्या तासीं इरास्त्रियें केला ।
आहार मैथिलीचा झाला निर्विघ्न मोद बहु झाला ॥ ११८ ॥
मानी श्रीशैला जी भावासम त्या इरास्त्रियें रचिला ।
आहार चतुर्विध जो सीतेनें तो यथेच्छ भक्षियला ॥ ११९ ॥
स्नानानन्तर वन्दुनि भक्तीनें श्रीजिनास पूजून ।
स्थापुनि हृदयीं रामा केलें सानन्द भोजनग्रहण ॥ १२० ॥
सूर्यकरांचा विपुल प्रकाश असतांचि जेवणें युक्त ।
ते दिनभोजन सुन्दर पवित्र आरोग्यपुण्यकृत्[2] खचित ॥ १२१ ॥

( हे देवि आपण माझ्या खांद्यावर बसून श्रीरामाकडे चला असें मारुतीनें म्हटल्यानंतर सीतेनें त्यास जें उत्तर दिलें तें हें:— )

भोजनविधि झाल्यावर घेउनि विश्रान्ति जेधवा बसली ।
पुनरपि वायुसुतानें यापरि विज्ञप्ति आदरें केली ॥ १२२ ॥
गुणभूषणा पवित्रा हे पूज्ये देवि या मम स्कन्धीं[3] ।
वसतां चढून नेइन उल्लङ्घुनि सागरा न त्या अवधि[4] ॥ १२३ ॥
त्वच्चिन्तनांत तत्पर त्या रघुराजासमीप नेईन ।
पाहून देवि तुजला होइल त्याचें प्रमोदपूर्ण मन ॥ १२४ ॥
जाइल वियोग विलया होतां संयोग आपुला मोद ।
होईल राघवाला तेणें मम कार्य होय हें सुखद ॥ १२५ ॥

१ कुलीन घराण्यांतील मुलगी. २ रोगरहितपणा व पुण्य देणारें.
३ खांद्यावर. ४ उशीर लागणार नाहीं.

( पकडण्यासाठीं आलेल्या रावणसैनिकांची मारुतीनें दाणादाण केली. त्यामुळें सगळ्या लंकानगरींत अतिशय क्षोभ उत्पन्न झाला. मारुति लंकेबाहेर आल्यावर त्याला मेघनादादिकांनीं घेरलें. )

इतुक्यांत दशग्रीवें पकडाया मारुतीस पाठविलें ।
शूर असे बहु किङ्कर त्यांनीं उद्यानरक्षकां म्हटलें ॥ १५३ ॥
स्वस्थ कसें हो बसला येथें कुणि दुष्ट खचरनर आला ।
त्या उद्भटास मारा पकडा त्यावरि करून द्या हल्ला ॥ १५४ ॥
तो कोणता असे हो आला कोठून वा कुणाचा तो ।
कोठें आहे धावा प्रवेशला या कसा अरि स्थलिं तो ॥ १५५ ॥
कोणी गदा, कुणी धनु, कोणी भाला नि खड्ग करिं कोणी ।
घेउनि आले कोणी कोठें कोठें अशी वदे वाणी ॥ १५६ ॥
तेजस्वी सूर्यासम कोपानें लालवुन्द नयनाचा ।
पाहून मारुतीला भटीं भयाचा प्रवेश हो साचा ॥ १५७ ॥
मारुततनयें बघतां किङ्करबल दांत ओठ खाऊन ।
इकडे तिकडे धावे झालें तें आवराया कठिण ॥ १५८ ॥
जे किङ्करेश[1] होते क्रूर तयें वळविलें महाकष्टें ।
केलें लढावयाला जमवुनि सन्नद्ध तेधवा दुष्टें ॥ १५९ ॥
तोमर-चक्रासिगदा-धनुष्य-खड्गादि घेउनि स्वकरीं ।
हाणा, मारा, ठोका ऐसें बोलून ते तया घेरी ॥ १६० ॥
केली तयें तयावरि बाणादिकशस्त्रवृष्टि कोपानें ।
आच्छादिती तयाला जैसें शैलास मेघ वृष्टीनें ॥ १६१ ॥
उपडून वृक्ष मोठे तैशा मोठ्या शिलाहि उचलून ।
फेकी तो सैन्यावरि मारुतसुत त्या करी त्वरें चूर्ण ॥ १६२ ॥
पिम्पळ साल वटासह अशोकचम्पकधवादि[2] वृक्षगणा ।
टाकी मोडुन मारुतसुत तो अत्यन्त कोपयुक्तमना ॥ १६३ ॥
कित्येक सैनिकांना करून मुष्टिप्रहार मारियलें ।
चरणप्रहार कोणा करून तज्जीविता तयें हरिलें ॥ १६४ ॥
उद्यानांतिल सदनें मारुतिनें मोडिलीं स्वकरपादें[3] ।
विध्वंस करुनि यापरि वनशोभा नाशिली तयें भयदें ॥ १६५ ॥

१ मालक सेनापति. २ धावडा वृक्ष. ३ आपल्या हातांनी व पायांनीं.

अत्युग्ररूप त्याचें पाहुनि अवशिष्ट सैन्य पळ काढी ।
करचरण नि वक्षःस्थल यांनीं त्यांना अनेकदा रगडी ॥ १६६ ॥
यापरि सगळ्या नगरीं झाला हाकार सकलपौरांत ।
भयभीत लोक झाले उरला दुःखां न तेधवा अन्त ॥ १६७ ॥
ज्यांच्या गळ्यांत घण्टा ऐसे ध्वजसहित गज भयें पळती ।
बन्धस्तम्भा मोडुनि अश्वांची ही अशीच होय गति ॥ १६८ ॥
चक्रारूढ नरापरि लङ्कापुर सकल विकल भयभारें ।
झालें स्त्रीगण सारा इकडे तिकडे पळे जसें वारें ॥ १६९ ॥

( इंद्रजितानें नागपाशानें बांधून मारुतीला लंकेला नेलें. )

आला लंकानगरांतुनि मारुतपुत्र कुपित बाहेर ।
घेरी निजसैन्यानें तोयद-वाहन तयास खगवीर ॥ १७० ॥
गज ज्यास जोडिलेले अशा रथीं बसुनि इन्द्रजित वीर ।
आला लढावयाला घेउनि सैन्य स्वकीय भरपूर ॥ १७१ ॥
पूर्वी सौमित्रीचें झालें खरदूपणासवें समर ।
तैसें हनुमन्ताचें खगासवें पाहती नभीं अमर ॥ १७२ ॥
घोडे चार जयाला अशा रथीं बसुनि राक्षसावरती ।
धावे शर भात्यांतुनि काढुनि मारुति लढे सुतीव्रगति ॥ १७३ ॥
लढला इन्द्रजितासह चिरकाल तयें नि नागपाशांनीं ।
दृढ मारुति बांधियला नेला नगरीं विचार करुनि मनीं ॥ १७४ ॥
ज्यानें विद्युद्दण्डासम[2] केली मोडतोड नगरीची ।
पूर्वी त्या हनुमन्ता प्रजा बघे दृष्टि करुनि शान्त शुचि ॥ १७५ ॥

( इंद्रजितानें मारुतीच्या दोषांचें रावणापुढें वर्णन केलें. )

रावणसभेंत नेउनि दोष तयाचे तयास सांगितले ।
तेणें चित्त तयाचें क्रोधाच्या कर्दमांत[3] बहु रुतलें ॥ १७६ ॥
दूतें सुग्रीवानें किष्किन्धपुरास वायुसुत नेला ।
तेथुनि निघून त्यानें महेन्द्रपुरनाश विक्रमें केला ॥ १७७ ॥
आज्ञाला वश केलें दधिमुखनगरास जाय तेथून ।
साधुद्वयोपसर्गा हरुनि जलें अग्निचें करी शमन ॥ १७८ ॥

१ आपल्या हातांनीं व पायांनीं. २ वज्रदण्डाप्रमाणें. ३ चिखलांत.

मारुति रामासाठी गन्धर्वसुतात्रयास अनुमोदी ।
तेथुनि लंकासाला[1] मोडी आकाशमान जो शोधी ॥ १७९ ॥
पुष्पोद्याना नाशुनि केल्या तद्रक्षिकांहि[2] भयभीत ।
किङ्कर मारुनि सगळे प्रपादि[3] केले प्रभो तयें ध्वस्त ॥ १८० ॥
पुत्रस्नेहें वृक्षा घटस्तनें पाजवून पय[4] ज्यांनीं ।
वाढविले ते सगळे टाकी हा नाथ दुष्ट मोडोनीं ॥ १८१ ॥
वृक्षवियोगें पडल्या भूवरि विधवासमान सकल लता ।
उद्यानाला आली श्मशानता ही निवेदिली वार्ता ॥ १८२ ॥
यापरि पवनसुताचे ऐकुनि अपराध रावणा राग ।
आला अतिशय तेणें भासे सगळ्या सभासदा आग ॥ १८३ ॥

( तुझें तोंड बघू नये असें मला वाटतें तूं येथून निघून जा
असें रावण मारुतीस म्हणाला. )

केलें बद्ध तयाला लोहाच्या शृङ्खला पदीं हातीं ।
घालुनि दशकण्ठानें म्हटला गेला असे तदा वातिं[5] ॥ १८४ ॥
पूजायोग्य असूनहि दुष्टाचरणें अयोग्य झालास ।
निर्लज्ज बनुनि मूढा भूगोचरनृपति-दूत बनलास ॥ १८५ ॥
केल्या बहु मी पूर्वी ज्या उपकृति त्या समस्त भुललास ।
बह्वपराधें दुष्टा कृतघ्नजनतेंत आद्य झालास ॥ १८६ ॥
तोण्ड तुझें न बघावें वाटे ऐसें मदीय-हृदयास ।
जा तूं येथुनि नीचा नातरि नेईन तुजशि विलयास ॥ १८७ ॥

( स्त्रियांनींही मारुतीची निंदा केली. )

कोपस्मितें विराजित भाग्यवती नवविलासयुत युवती ।
दशवदनाच्या तेव्हां अनादरें वायुसूनुला वदती ॥ १८८ ॥
ज्याच्या कृपाप्रसादें प्रभुत्व भूमण्डलीं तुला लाभे ।
त्याच्या प्रीतीचें तूं दिलेस फल जें अतीव तें शोभे ॥ १८९ ॥
दशकण्ठाच्या उपकृति विसरुनि तूं शत्रुभृत्य झालास ।
तूं पवनाचा सुत नच अन्यापासून जन्म तव खास ॥ १९० ॥

---

१ लंकेच्या तटाला. २ बगीच्याचें रक्षण करणाऱ्या. ३ पाणपोई आदिक. ४ पय– दूध; पाणी. ५ वाताचा पुत्र तो वाति– मारुति.

हीनाचरणें निश्चित अकुलीनपणा नरांत मानावा ।
देहांत फरक नसतो तो आचारीं मनीं सदा घ्यावा ॥ १९१ ॥
राहति सिंह वनामधिं अवलंबुनि राहती न कोल्ह्यास ।
नीचाश्रयास घेउनि कुलीन मानी न जीवनांत रसे[1] ॥ १९२ ॥
येतां अनेकदा ही देउनि सर्वस्व पूजिलें तुजला ।
आलास बहु दिनांनीं द्रोही निग्रांह्य[2] आज सकलाला ॥ १९३ ॥

( स्त्रियांच्या भाषणास मारुतीचें सडेतोड उत्तर. )

यापरि कोपें वदतां स्त्रीगण मारुति हंसून त्या वदला ।
उपजे कुबुद्धि ज्याला मानिति निग्राह्य सन्त जन त्याला ॥ १९४ ॥
आसन्नमरण ज्याचें केला आश्रय तुम्ही कुबुद्धीचा ।
निग्राह्य कोण याचा निर्णय आपण करा मनीं साचा ॥ १९५ ॥
श्रीरामासह येतां बलिष्ठ लक्ष्मण तया विरोधाया ।
मेघा शैल न होती समर्थ नृप यत्न जाय सर्व लया ॥ १९६ ॥

( रावणाकडे वळून मारुति त्याची कानउघाडणी करितो. )

अमृतोपम आहारा सेवुनि नर जो अतृप्त होईल ।
तो गरळाच्या थेंबें बोला कां नच विनाश पावेल ॥ १९७ ॥
भोगून जो हजारो स्त्रियास राही अतृप्त सेवाया ।
इच्छी परस्त्रियेला जाइल तो शीघ्र निश्चयें विलया ॥ १९८ ॥
शुभ वा अशुभ दृढा मति ज्याची इन्द्रहि तियेस फिरवाया ।
होय न समर्थ करितां प्रयत्न होईल सर्व तो वाया ॥ १९९ ॥
वज्रहठी[3] हा आहे दुर्मति याची न नष्ट होईल ।
कर्में अशुभें प्रेरित दुर्मतिचिखलीं बुडेल खल खोल ॥ २०० ॥
होतां विनाशकाल प्राप्त नराची सुबुद्धि लय पावे ।
दैवप्रेरित दुर्मति जाणा कुपथाकडेचि नित धावे ॥ २०१ ॥
कोणी मनुष्य अतिशय मधुर सुगन्धी नि गरलमिश्र असे ।
प्राशन करून दुग्धा मरणा पावें जसा प्रमादवशें[4] ॥ २०२ ॥
त्यापरि हे दशकण्ठा परनारीसौख्यलुब्ध होऊन ।
वमनाभावीं लौकर दारुणसें पावशील तूं मरण ॥ २०३ ॥

---

१ आनन्द. २ दंड भोगण्यास योग्य. ३ वज्राप्रमाणें अभेद्य हट्टाचा. ४ अज्ञान वश होऊन.

गुरुपरिजनवृद्धांना मित्रां प्रियबान्धवास मातेस ।
अवमानुनि तव दुर्मति उपजे हें पापकार्य करण्यास ॥ २०४ ॥
कुत्सित आचाराच्या सागरिं जे मदनभोवरें असती ।
सांपडलास तयामधिं नरकीं जाशील मनिं न कशि भीति ॥ २०५ ॥
रत्नश्रवानृपाच्या खलपुत्रा नाशिला तुवा वंश ।
राक्षसभूपालांचा त्यांचा उरणार अल्पहि न अंश ॥ २०६ ॥
ज्यांनीं निजवंशाची मर्यादा पाळिली असे भूप ।
झाले अनेक ज्यांचें होतें आचरण पूर्ण निष्पाप ॥ २०७ ॥
आचार पूज्य ज्यांचा ज्यांचें होतें प्रजेवरि प्रेम ।
ते तव पूर्वज भूपति सुगुणांचे होति सर्वदा धाम[१] ॥ २०८ ॥
त्यांच्या पवित्र वंशा केलेस कलंकयुक्त कुकृतीनें ।
केलीस दश दिशांचीं दशानना कृष्ण कीर्तिनें वदनें ॥ २०९ ॥

( मारुतीच्या भाषणानें रागावून रावणानें सर्व लंकानगरींत हा भूगोचरांचा दास बनला आहे असें सांगून याला फिरवा अशी आज्ञा नोकरांना दिली. )

यापरि भाषण ऐकुनि रावण कोपून किङ्करा वदला ।
बान्धुनि फिरवा सगळ्या लङ्कानगरींत मारुतीस खला ॥ २१० ॥
खगपतिपूजित असुनिहि भूमिचरांचा[२] बनून हा दूत ।
आला आहे जनहो पाहा याला करा असें विदित ॥ २११ ॥

( यानंतर बंधन तोडून मारुति रागानें आकाशांत उडून गेला. ही वार्ता ऐकून सीतेनें त्याला पुष्पांजलि वाहून तूं निर्विघ्न हो असें त्याचें अभीष्ट चिंतलें. )

यानन्तर भृत्यांच्या आक्रोशें कोप ज्यास बहु आला ।
ऐसा मारुति तोडुनि बन्धन नभिं उंच तत्क्षणीं गेला ॥ २१२ ॥
इन्द्राच्या सौधासम दशाननाचा विशालसा सौध ।
मारुतिपदघातांनीं झाला शतवार भग्न[३] सक्षोद[४] ॥ २१३ ॥
कपिमुकुटधरसुवीरप्रभु-हनुमन्त-प्रताप ऐकून ।
झाली सीता मुदिता बन्धश्रवणें विषादपरिपूर्ण ॥ २१४ ॥
वज्रोदरी सुनामा वदली रक्षण करी खगी[५] एक ।
देवि ! नभीं हा गेला तोडुनि बन्धन नसे तया रोक[६] ॥ २१५ ॥

---

१ घर. २ भूमीवर राज्य करणारे राजांचा. ३ पडला. ४ चुरा झाला. ५ विद्याधरी. ६ प्रतिबन्ध, अडथळा.

वचन तिचें हें ऐकुनि सीता झाली प्रसन्न हृदयांत ।
वार्ता माझी कळविल रामा जाऊन हा गमे त्वरित ॥ २१६ ॥
आनन्दें पुष्पाञ्जलि वाहुनि वदली परोक्ष तैं सीता ।
हे वायुनन्दना तूं निर्विघ्न सुखी प्रमोद कर सन्ता ॥ २१७ ॥
ज्यांनीं पूर्वभवामधिं महाव्रताचार पाळिला पूत ।
ते कीर्तिवन्त होती कदापि तद्विक्रमा न ये अन्त ॥ २१८ ॥
कार्य असें तें करिती जें ऐकुनि विस्मय प्रमोद मनीं ।
वाटे सकलजनांच्या होते शशिधवल यद्यशें अवनि ॥ २१९ ॥
यास्तव अकृत्य वर्जुनि सत्कृति संगास सर्वदा सेवा ।
जिनदास असें सांगे जिनभक्तीचा करांत घ्या मेवा ॥ २२० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे हनूमत्प्राभिगमनं नाम त्रिपञ्चाशत्तमं पर्व ॥ ५३ ॥

## चौपन्नाव्या पर्वांत आलेली संक्षिप्त कथा.

लंकेहून आलेला मारुति सुग्रीवाला बरोबर घेऊन रामचन्द्राकडे गेला. त्यांना नमस्कार करून त्यानें सर्व हकीकत जी सीतेनें कळवावयास सांगितली होती ती कळविली. सीतेनें दिलेला चूडामणि मारुतीनें रामचंद्रांना दिला. तो हातांत घेऊन त्यांनीं छातीला लाविला. त्या चूडामणिमुळें रामाला सीतालिङ्गन झाल्याप्रमाणें आनंद वाटला. सीतासतीनें जेव्हां आपली वार्ता समजेल तेव्हां आहार घेण्याची प्रतिज्ञा केली होती. मी जाऊन आपलें कुशल कळविलें तेव्हां त्यांनीं अकराव्या दिवशीं आहार घेतला. त्यांना मी आपल्या हातांतील आंगठी दिली तेव्हां त्यांना अत्यंत हर्ष वाटला. चूडामणि देतेवेळीं त्यांनीं अनेक गोष्टी सांगितल्या त्या सर्व हे रामप्रभु, मी आपणांस सांगितल्या आहेत.

सद्गुणसरिता सीतादेवीच्या मुखावरून अश्रु नेहमी गळतात व आपल्या वियोगानें तर पूर्वीपेक्षां त्या अधिक कृश झाल्या आहेत. नेहमीं आपल्या चिंतनांत त्या तत्पर राहतात. यास्तव आतां योग्य उपाय करण्याची वेळ आलेली आहे. लक्ष्मण म्हणाला– बन्धो, सुग्रीव हा दीर्घसूत्री आहे व भामण्डल केव्हां येणार हें समजत नाहीं. अशावेळीं आपण ' नावांनीं किंवा आपल्या बाहूंनीं समुद्र तरून जाऊं या. '

हें वचन ऐकून सिंहनादानें म्हटलें– लक्ष्मणा, मारुतीनें लंकेला जाऊन फार उपद्रव केला त्यामुळें रावण अतिशय रागावला आहे. रावण यमाप्रमाणें व लंका यमराज्याप्रमाणें आहे. लंकेला जाणें म्हणजे यमाच्या राज्यांत प्रवेश करणें होय. यास्तव हा विचार सोडा.

हें सिंहनादाचें भाषण ऐकून चन्द्रमरीचि असें बोलला– रावणाला कशासाठीं भ्यावें व आमचें कोणतें कार्य त्यावांचून अडून पडणार आहे. आपल्या बाजूलाही नल-नील, हनुमान, महेंद्र, प्रसन्नकीर्ति आदिक बलिष्ठ योद्धे आहेत म्हणून भिण्याचें

कारण नाहीं. रावण अन्यायी आहे– आपला पक्ष न्यायाचा आहे यास्तव आपण लंकानगरीकडे प्रयाण करावयास हरकत नाहीं. सर्व विद्याधर आपल्याला साहायक अवश्य होतील. याप्रमाणें चन्द्ररश्मीचें भाषण ऐकून सर्वांना उत्साह वाटला व त्यांनीं तयारी केली.

मार्गशीर्ष वद्य पंचमी तिथीच्या दिवशीं सूर्योदयासमयीं रामचंद्रांनीं लंकेकडे प्रयाण केलें त्यावेळीं त्यांना शुभशकुन झाले. निर्धूम अग्नि दक्षिण बाजूनें वलय घेत वर जाऊ लागला. मोर मधुर केकारव करूं लागले– अलंकारांनीं भूषित स्त्रीचें दर्शन झालें. घोडे गंभीरपणानें खिंकाळू लागले. दह्यानें भरलेल्या घटाचें दर्शन झालें. निर्ग्रन्थमुनीचें दर्शनानें त्यांच्या मनाला आनंद वाटला. अशा तऱ्हेचे शुभशकुन त्यांना झाले. ज्यांच्या ध्वजावर मगर, वृक्ष, वानर, हत्ती, अशीं चिन्हें होतीं असे विराधित, जांबव, मेघसुन्दर, भूतनाद, मारुति आदिक विद्याधर राजे हर्षानें विशालसेनेसह विमानांतून प्रयाण करूं लागले.

प्रथमतः ते वेलंधर पर्वतावर आले. या पर्वतावर वेलंधर नांवाचें नगर आहे व येथें 'समुद्र' नामक राजासह नलराजानें युद्ध करून त्यास जिंकिलें. तेव्हां त्यानें सत्यश्री, गुणमाला, कमला व मणिचूला या चार कन्या लक्ष्मणाला दिल्या. येथें सैन्यानें एकरात्रीं मुक्काम केला. नंतर ते सुवेल पर्वतावर सुवेल-नगरांत सुवेल नामक राजा राज्य करीत होता. त्यालाही विद्याधर राजांनीं जिंकिलें व या पर्वतावर सर्व राजे राहिले व तेथें त्यांनीं क्रीडा केली. यानंतर हंसद्वीपाच्या हंसरथ राजाला जिंकून हंसद्वीपांत विद्याधरांनीं निवास केला. येथून भामण्डलाकडे दूत पाठविला गेला व भामण्डलाची वाट पाहत येथें एक-दोन दिवस मुक्काम केला. यानंतर ते सर्व राजे लंकानगरीकडे जातील.

पुण्यवंतजन जेथें जेथें जातात तेथें तेथें सुखीच होतात. त्यांना आपत्तीची झळ तिळमात्रही लागत नाहीं. व ते जें जें इच्छितात तें तें त्यांना प्राप्त होतें. ज्यांना सुखाची इच्छा आहे त्या जिनाच्या दास असलेल्या भव्यांनीं सूर्याप्रमाणें उज्ज्वल अशा जिनधर्माची आराधना करावी. या जिनधर्मानें इहलोकचीं सुखें तर मिळतीलच. पण यापासून अनंत अशा सुखदायक मोक्षाचीही प्राप्ति होते.

# चौपन्नावें पर्व.

लङ्कानगरी ध्वंसुनि छत्रध्वज आदि सर्व मोडून ।
किष्किन्धापुरिं आला मारुति जो सज्जनास सुखसदन ॥ १ ॥
त्याचा ससैन्य नगरीं प्रवेश पाहावयास युवतिगण ।
जमला त्यांचीं वदनें दिसलीं जणु हें विशाल पद्मवन ॥ २ ॥
जैशी पिता हिताची चिन्ता मनिं वाहतो स्वसन्ततिच्या[1] ।
तैशी वाहे मारुति सेनेची भोजनादिकीं साच्या ॥ ३ ॥

( रामचंद्रांना वंदन करून सीतेनें दिलेला चूडामणि मारुतीनें त्यांना दिला व उभयतांच्या परिचित गोष्टी त्यानें सांगितल्या. )

सुग्रीवासह जाउनि मारुति कळवी निजागमा रामा ।
करुनि नमस्कार तया सांगे वृत्तान्त विश्वविश्रामा[2] ॥ ४ ॥
सीतेनें कथिल्या ज्या गोष्टी उभयास परिचिता होत्या ।
बोलुनि वातसुतें त्या हर्षविलें राघवास सुश्रोत्या ॥ ५ ॥
होता दिला सतीनें चूडामणि द्यावयास रामास ।
तो हर्षें त्या अर्पुनि कृतार्थ[3] करि मारुति स्वहृदयास ॥ ६ ॥
स्वाञ्जलिमध्यें पाहुनि चूडामणि राम हृष्ट मनिं झाला ।
आनन्दाश्रु-कणौघें तो तेजःपुञ्ज अल्पसा दिसला ॥ ७ ॥
हृदयीं मणि तो लावी सीता जणु भेटली असे मानी ।
अलिङ्गनजसुखाला तिच्या जणु प्राप्त होय राम मनीं ॥ ८ ॥
आलिङ्गुनि वायुसुता राम विचारी प्रिया मम प्राणा ।
धारण करि मृदुला कां घालुनि नानाविधा तया आणा ॥ ९ ॥
होऊन नम्र वदला मारुति रामा सती जिवन्त असे ।
कथिली सत्य सुवार्ता असत्यता लेशहीं न हींत वसे ॥ १० ॥
गुणसरिता सीतेच्या नेत्रांतुनि अश्रु वाहती संतत ।
त्वद्विरहें कृश झाली त्वल्लाभाशा धरी स्वहृदयांत ॥ ११ ॥

---

१ आपल्या पुत्र व कन्यांची. २ जगाला सुखाचा आधार. ३ कृतकृत्य.

स्वाभाविकचि कृशाङ्गी झाली अधिकचि तुझ्या वियोगानें ।
आराधिति रक्षःपतिललना[1] होऊनि कुपित नयनानें ॥ १२ ॥
आहारा त्यागुनि ती सती तुझ्या चिन्तनांत रत राहे ।
दुःखें जगे कशी तरि योग्य उपायाकडे मना वाहे ॥ १३ ॥

( बन्धो आपण शोक करूं नका कर्तव्यांत लक्ष लावावें.
लंकानगरीला आपण लौकर जाऊ या असें लक्ष्मण रामाला म्हणाला.)

मारुतिवचना ऐकुनि रघुपति झाला मनांत बहु खिन्न ।
दीर्घोष्णश्वासातें सोडी चिन्तेंत जाहला मग्न ॥ १४ ॥
जाणुनि तदभिप्राया लक्ष्मण रामास बोलला वचन ।
कां शोक करिशि सुज्ञा ! कर्तव्यीं लाव आपुलें सुमन ॥ १५ ॥
सुग्रीव दीर्घसूत्री[2] भामण्डल येइ केधवा नुमजे ।
बघणें वाट तयांची कार्यविनाशास हेतु हें समजे ॥ १६ ॥
जाऊ लङ्कानगरा तरुनि समुद्रा अनेक नांवांनीं ।
किंवा निजबाहूंनीं उशीर करणें न योग्य जाण मनीं ॥ १७ ॥

( सिंहनादाचें लक्ष्मणास उद्देशून भाषण. )

खग सिंहनाद नामें मधुररवें लक्ष्मणा असें वदला ।
आहेस शाहणा तूं अभिमानाच्या वदूं नको बोला ॥ १८ ॥
तुमची जशी परिस्थिति तशीच अमुची असे असें जाण ।
जें सर्वहिता करितें असेंच कर्तव्यबोल मनिं आण ॥ १९ ॥
वायुसुतानें जाउनि लङ्कातट उपवनें गृहें भग्न ।
केलीं तेणें रावण झाला मनिं तीव्र-कोप-संलग्न ॥ २० ॥
आतां दुर्दैवानें आम्हां सर्वांस मारण्या सज्ज ।
झाला यम जणु भासे लंका जणु वाटतेंच यमराज्य ॥ २१ ॥
चन्द्रमरीची बोले विद्याधर वचन पूर्ण तेजाचें ।
भीतोस सिंहनादा हरिणासम नांव तव नसे साचें ॥ २२ ॥

( आपल्या पक्षांतही अनेक विद्याधर राजे अत्यंत शूर व विद्यावैभवयुक्त आहे म्हणून आपण रावणास भिऊ नये असें चंद्रमरीचीचें सिंहनादास उद्देशून भाषण. )

कां रावणास भ्यावें त्यापासुनि कार्य कोणतें तुमचें ।
विघडेल मज न ठावें त्याचें आचरण हें नसे साचें ॥ २३ ॥

---

१ राक्षसांच्या स्वामीच्या– रावणाच्या स्त्रिया. २ लांबण लावणारा.

तो अन्यायी आहे मरण तयाच्या पुढें उभें राहे ।
पक्ष असे न्यायाचा अमुचा भय हृदय कां वरें वाहे ॥ २४ ॥
विद्यावैभव ज्यांचें हृदया साश्चर्य करि अनेक असे ।
असती महारथी खग अपुल्या पक्षांत म्हणुनि भयचि नसे ॥ २५ ॥
नल नील तडिद्वक्त्र नि मन्दर अर्णव नि अशनि हनुमान ।
चन्द्रज्योति मृगेन्द्र नि भामण्डल हे अतीव रणनिपुण ॥ २६ ॥
खगपति, महेन्द्र, केतु नि अत्युग्र, समीरणाख्य हे वीर ।
युद्ध-धुरन्धर असती समरीं शत्रूस करितिं जे ठार ॥ २७ ॥
खेचर पराक्रमाढ्य प्रसन्नकीर्त्याख्य खगप सुत त्याचे ।
असती महापराक्रमधारक शस्त्रास्त्रचतुर हृदयाचे ॥ २८ ॥
किष्किन्धास्वाम्यादिक अनेक सामन्त समरिं सुस्थिर जे ।
निर्भय योद्धे असती विक्रम ज्यांचा जगत्रयीं गाजे ॥ २९ ॥
यापरि वचना ऐकुनि चन्द्रकराचे खगेश ते सगळे ।
झाले विनम्र वघती रामा त्यांचे प्रफुल्लसे डोळे ॥ ३० ॥
अव्यक्त सौम्य ऐशा राममुखीं भ्रूकुटिचें दिसे जाळें ।
जणु यमराजाचें हें गेह लतांचेंच भासतें काळें ॥ ३१ ॥
लङ्केकडेचि रामें लावियली दृष्टि लालकान्ति जिची ।
रेखा जणु केतूची रक्षःक्षय सुचविते जनां साची ॥ ३२ ॥
श्रीरामचन्द्रमुख जैं झालें अत्यन्त लाल कोपानें ।
भासे खगभूपांना उत्पाताचाच सूर्य कान्तीनें ॥ ३३ ॥
रावणविनाश करण्या हालाहल घोर उपजलें काय ?
पाहुनि ऐसें तन्मुख घावरले खग दिसे न सदुपाय ॥ ३४ ॥
रामाभिप्रायानें प्रेरित खग चन्द्रराशि वचनास ।
मनिं आदरून झाले उद्यत ते जावयास लङ्केस ॥ ३५ ॥
( रामचंद्रादिकांचें युद्धासाठीं लंकेकडे प्रयाण व शुभशकुनें. )
वाद्यध्वनि प्रयाणा सूचक पसरे गुहादरीं विवरीं ।
अत्यन्तोत्साहानें निघती श्रीरामचन्द्र आणि हरि[१] ॥ ३६ ॥
जी मार्गशीर्ष वद्या होती तिथि पञ्चमी दिनीं केलें ।
रव्युदयीं[२] श्रीरामें प्रयाण शुभशकुन तेधवा झाले ॥ ३७ ॥

---

१ लक्ष्मण. २ सूर्योदयीं.

निर्धूमाग्निज्वाला ज्या फिरती स्निग्ध दक्षिणावर्तें[1] ।
केका मधुर जयाची रामादिक पाहती मयूरातें ॥ ३८ ॥
नारी परमालङ्कृत दिसली वारा सुगन्धसा वाही ।
निर्ग्रन्थमुनिवराचें दर्शन आनन्द मानसीं देई ॥ ३९ ॥
गम्भीर असा अश्वध्वनि घण्टेचा पडे मधुर कानीं ।
रव दधि कलशीं भरलें रामें तें पाहिलें स्वनयनांनीं ॥ ४० ॥
डाव्या बाजुस पाही गोमय[2] ताजें नि काक-मधुर रव ।
भेरीशङ्खाचा ध्वनि ऐके श्रीराम भावि शुभ भाव ॥ ४१ ॥
श्रीरामा सिद्धि तुला मिळो मिळो विघ्नरहित विजय भला ।
शब्द असे विद्याधर वदनांतुनि निघुनि तोष हो सकला ॥ ४२ ॥
चार दिशांतुनि आले विद्याधरभूप सैन्य घेऊन ।
सुग्रीव निघे त्यासह त्याचें आनन्दयुक्त होय मन ॥ ४३ ॥
नानायानविमानें नानावाहनसमूह घेऊन ।
जाती सध्वज ते खग शोभे तेणें अतीव कीं गगन ॥ ४४ ॥
सुग्रीव शल्य मारुति दुर्मर्षण कुमुदनील-नल काल ।
नामें सुषेणखगपति निघती घेऊन हे बल प्रबल ॥ ४५ ॥
या सर्व खगपतींच्या चिह्न कपींचें ध्वजांत बहु विलसे ।
ग्रासून जणु नभाला लङ्कानगरीस जाति हे हर्षे ॥ ४६ ॥
शोभे विराधिताच्या ध्वजभागीं मकरचिह्न सुविशाल ।
जाम्बवनृपध्वजावरि शोभे तरुचिह्न थोर अनुकूल ॥ ४७ ॥
सिंहरवाच्या शोभे ध्वजावरि व्याघ्रचिह्न चिरकाल ।
श्रीमेघसुन्दराचा गजचिह्नें ध्वज दिसे महाप्रबल ॥ ४८ ॥
या सर्व खगनृपामधिं तेजस्वी भूतनाद भूप दिसे ।
इन्द्रासम तत्पृष्ठीं मारुति जणु लोकपालसम विलसे ॥ ४९ ॥
जे सामन्त-समूहें युक्त नि सानन्द-चित्त तेजस्वी ।
लङ्केस जात असतां पद्मादिकभूप इन्द्रशोभा वी ॥ ५० ॥
श्रीरामाच्या संनिध विराधखग शोभतो विमानांत ।
त्याच्या पाठीमागें जाम्बव सचिवासवें वसे शान्त ॥ ५१ ॥

---

१ उजव्या बाजूनें गोल भ्रमण करणें. २ शेण.

वामीं सुषेण दक्षिणभागीं सुग्रीव शोभतो नृप ते ।
वेलंधरशैलावरि आले यद्वदनि वीरता स्फुरते ।। ५२ ।।
वेलंधरनगराचा भूपति नामें समुद्र तो लढला ।
नलराजानें त्याला जिंकुनि राघवपदीं प्रणत केला ।। ५३ ।।
( समुद्रराजानें सत्यश्री आदिक चार कन्या लक्ष्मणाला दिल्या. )
सत्यश्री, गुणमाला, कमला, लक्ष्मीसमान मणिचूला ।
भूप समुद्रें मोदें कन्या त्या वितरिल्या तदा हरिला ।। ५४ ।।
राहून एक रात्रीं गेले सगळे सुवेलशैलास ।
तो सर्वांच्या गमला हृदया आनन्ददायि कैलास ।। ५५ ।।
होते सुवेल यावरि पुर भूपालहि सुवेल नांवाचा ।
जिंकुनि त्यासहि केलें वश बोले तेधवा मधुर वाचा ।। ५६ ।।
नन्दनवनि सुर जैसें क्रीडा करिती सुवेलवनि खग ते ।
घालवुनि तेथ रजनी जाया उद्युक्त होति लङ्केतें ।। ५७ ।।
अत्युच्च तट जियेचा सुन्दर भासे सुवर्ण-सदनांनीं ।
कैलासासम शिखरें हरि जीं जनमानसास कलशांनीं ।। ५८ ।।
नानारत्नें निर्मित अङ्गण ज्यांचें अशा अनेक गृहें ।
शोभत होती नगरी बघुनि जिला अमर-मिथुन-मन मोहें ।। ५९ ।।
येथें श्रीजिनसदनें अत्युच्च अशीं जणु ध्वजकरांनीं ।
भव्यां वदतीं ऐसें रमवा निजमन जिनेन्द्रगुणगानीं ।। ६० ।।
ऐशी लङ्कानगरी येथुनि जाणून जवळ खग सारे ।
हंसद्वीपीं निवसति अदम्य उत्साह यन्मनांत शिरे ।। ६१ ।।
युद्धीं हंसरथाला जिंकुनि करिती प्रसन्नशी लीला ।
खगवर्ग द्वीपावरि हंसपुरी तन्मनास अनुकूला ।। ६२ ।।
भामण्डलाकडे श्रीरामानें प्रेषिला असे दूत ।
तो आज वा उद्या वा येइल येथेंच हंसनगरांत ।। ६३ ।।
सन्मार्ग प्रतिपालन करण्यासाठीं समस्त खेचर हे ।
येथें जमले नन्तर जातिल लङ्कापुराकडे स्नेहें ।। ६४ ।।

चन्द्रकान्तजाति.

पुण्यवन्त जन जाती तेथें सुखीच होतात ।
अरिगण जिंकुनि भोगासाठीं ते नित रमतात ।। ६५ ।।

---

१ देवाचें जोडपें.

आपत्तीची झळ न तयांना स्पर्शी केव्हांही ।
जें जें इच्छिति मनांत तें तें येतें करिं पाही ॥ ६६ ॥
असे सुखेच्छा हृदयीं ज्यांच्या त्यांनीं जिनधर्म ।
देहें वचनें मनें करावा मिळेल त्या शर्म ॥ ६७ ॥
हा पापांचें मर्म फोडितो देतो सुख सार ।
मुक्तिश्रीचें मन्दिर देतो भव्यजनां अमर ॥ ६८ ॥
धर्म असे हा रविसम उज्ज्वल हृदयीं प्रीतीनें ।
धरून मिळविति दास जिनाचे मोक्षा लीलेनें ॥ ६९ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे लंकाप्रस्थानं नाम चतुःपञ्चाशत्तमं पर्व ॥ ५४ ॥

# पंचावन्न व छप्पन्न पर्वांतील कथेचा सार.

शत्रूचें सैन्य लंकेच्या जवळ जवळ आल्यामुळें लंकेंतील लोकांना भय वाटूं लागलें. अशी वार्ता दूतानें रावणाला सांगितली. तेव्हां त्याला अतिशय राग आला. त्यानें आपल्या सैन्याला सज्ज राहण्याची आज्ञा दिली.

हस्त, प्रहस्त, मारीच आदिक सचिव आणि बिभीषण रावणाजवळ येऊन त्यांनीं त्याला नमस्कार केला. बिभीषणानें हितकर असें भाषण केलें. तो म्हणाला– बन्धो, तुला इंद्रासारखें वैभव प्राप्त झालें आहे. तुझें यश, जमीन, दिशा व आकाशांत पसरलें आहे. पण परस्त्रीच्या अभिलाषानें हें सर्व नष्ट होईल. तूं याचा चांगला विचार कर. सीता ही जळत्या अग्नीसारखी आहे. ती घरांत ठेवूं नकोस. ती रामाला देऊन टाक. तूं नेहमी सुखसागरांत निमग्न झाला आहेस. सीतेला रामाला देऊन टाक व कायमचा सुखी हो.

हें बिभीषणाचें भाषण ऐकून इंद्रजित म्हणाला– काका, तुम्हाला कोणी विचारलें ? तुम्हाला बोलण्याला कोणी अधिकार दिला आहे. तुम्हाला जर भय वाटत असेल तर तुम्ही घरीं स्वस्थ बसा. सीता हें उत्कृष्ट स्त्रीरत्न आहे तें प्राप्त झालें असतां कोण सुज्ञ सोडील बरें ? हें पुण्योदयानें मिळालें आहे. म्हणून आपण गप्प बसा.

बिभीषण म्हणाला– इंद्रजिता, तूं पुत्र नसून शत्रुच आहेस. घर जळूं लागलें असतां पाण्यानें ते शांत न करतां त्यांत तूं लांकडें टाकीत आहेस. लक्ष्मणाच्या तीव्र बाणपंक्तीनें हें शहर उद्ध्वस्त होण्याच्यापूर्वी रामाला सीता देऊन टाका म्हणजे राजाचें व प्रजांचें कल्याण होईल. इंद्रजिता, तुझ्या पित्याला दुष्ट बुद्धि सुचली आहे. तो राक्षसवंशांत साप जन्मला आहे. लङ्कानगरी हें त्याचें बिळ आहे. व सीता नागाचा नाश करणारी नागदमनी नामक औषधी आहे. लक्ष्मण व रामाला जिंकणें शक्य नाहीं. राम-लक्ष्मणाच्या बाजूला सुग्रीव, हनुमंतादिक हजारो विद्याधर राजे आहेत. लंकानगरीच्या आजूबाजूचे सर्व राजे रामाला वश झाले आहेत. यास्तव रावणानें सीतेला रामाला देऊन सुखी व्हावें असें मी सांगतो.

हें भाषण ऐकून रावण क्रुद्ध होऊन तरवारीनें बिभीषणाला मारावयास उठला. तेव्हां बिभीषणासही राग आला. त्यानें एक रत्नजडित खांब उपटून हातांत घेतला. आतां हे दोघे आपसांत लढणार अशावेळीं मारीचादिक मंत्र्यांनीं त्यांना आपआपल्या स्थानीं बैसविलें.

रावण बसून अतिशय मर्मभेदक भाषण बोलू लागला. तूं माझ्या नगरींतून आतांच चालता हो. मला तुझें काळें तोंड पाहावयाचें नाहीं. जर तूं येथें राहशील तर मी तुला ठार मारल्याशिवाय राहणार नाहीं.

बिभीषणही येथें अपमानानें राहणें योग्य नाहीं असा विचार करून तो आपलें सर्व सैन्य व अन्तःपुर घेऊन निघाला. त्याच्याबरोबर विद्युद्घन, इभ, इन्द्र, वगैरे अनेक राजे आपल्या सैन्यासह निघाले.

रामचंद्राला शरण जावयाचें असें ठरवून त्यानें त्याच्याकडे दूत पाठविला. त्यानें रामचंद्राला सर्ववृत्त सांगितलें. रामचंद्रांनीं प्रथमतः मंत्र्यांबरोबर वाटाघाट केली. दूतानें म्हटलें– प्रभो, माझ्या स्वामींना रावणाचा अन्याय बिलकूल सहन झाला नाहीं म्हणून ते आपल्याकडे येत आहेत. आपण प्रसन्न होऊन त्यांचा स्वीकार करावा. मंत्र्यांनींही बिभीषण मोठा धार्मिक आहे. त्याचें हृदय दयेनें ओलें आहे. जरी तो रावणाचा भाऊ आहे तरी त्याचें हृदय अन्यायाकडे केव्हांही वळत नाहीं. दोघांचे कर्मोदय बिलकुल वेगळ्या स्वभावाचे आहेत. बिभीषण हा लोभादिकांच्या वश होऊन पापाकडे प्रवृत्त होणार नाहीं. याविषयीं मी एक कथानक आपणास सांगतो. असें म्हणून मतिसागर सचिवानें याप्रमाणें कथा सांगितली :—

नैमिष नगरांत गिरिवर व गोभूति नामक दोन बंधु होते. त्यांचें एकमेकांवर प्रेम होतें. दोघे विद्वान्, धार्मिक व सदाचारी होते. लोकहृदयांतही त्यांच्याविषयीं आदर होता. नैमिषनगराचा राजा 'सूर्यदेव' या नांवाचा होता. त्याच्या राणीचें नांव 'मतिप्रिया' होतें तिनें पुण्यप्राप्ति व्हावी या इच्छेनें एक व्रत अतिभक्तिभावानें या दोघापासून घेतलें. व्रत चांगलें पाळून तिनें उद्यापन केलें. एका पात्रांत सुवर्णाचा राशि भातानें आच्छादून तो या दोघांना भक्तीनें दिला. गिरिवराच्या मनांत लोभ उत्पन्न झाला व त्यानें आपल्या भावाचा गोभूतीचा वध केला. इत्यादिक लोभानें भाऊ-भाऊही वैरी होतात म्हणून हा बिभीषण अन्यायी रावणापासून वेगळा होऊन आपणाकडे येत आहे.

आणखीही एक कथानक याविषयीं असें आहे:—

कौशाम्बी नगरांत बृहद्धन नामक व्यापारी कुरुविन्दा नामक पत्नीसह राहत होता. या उभयतांना 'अहिदेव' व 'महिदेव' असे दोन पुत्र होते. ते देशांतरीं व्यापार करण्यास गेले. सुदैवानें त्यांना खूप संपत्ति मिळाली. त्यांनीं एक अमूल्यमणि विकत घेतला व ते कौशाम्बीकडे निघाले. तो मणि जो आपल्या हातांत घेत असे त्याला आपल्या भावाला ठार मारावें अशी बुद्धि उत्पन्न होत असे. हा आपल्या मनांत मण्यामुळें येणारा विचार त्यांनीं एकमेकास कळविला व त्यांनीं आपलें मन निर्मल ठेविलें.

घरीं आल्यानंतर त्यांनीं तो मणि आपल्या आईला दिला. तिच्याहि मनांत त्या मण्यामुळें लोभ उत्पन्न झाला व आपण आपल्या दोन पुत्रांना विष घालून मारावें असें इच्छू लागली. तेव्हां तिनें आपले मण्यामुळें मलिन विचार झाले असें पुत्रांना सांगितलें. तेव्हां हा मणि आपण समुद्रांत फेकून द्यावा असें ठरवून तो त्यांनीं तिघानीं समुद्रांत फेकून दिला. तेथें एका माशानें मांसभ्रमानें तो मणि गिळून टाकिला.

एकेवेळीं धीवरांनीं समुद्रांत जाळें टाकिलें व त्यांत तो मासा अडकला तो त्यांनीं या दोघा बंधूंना विकला. त्यांनीं घरीं नेऊन दिला. त्यांच्या बहिणीनें तो मासा चिरला तेव्हां तो मणि त्याच्या पोटांतून बाहेर पडला. तो तिच्या हातांत आल्याबरोबर तिच्या मनांत आईला व दोघा भावांना विष घालून मारावें असा विचार आला. पण तिनें आपल्या मनाची परिस्थिति स्नेहानें आपल्या आईला व बंधुद्वयाला सांगितली शेवटीं त्या सर्वांनीं तो मणि फोडून त्याचा बारीक भुगा करून टाकून दिला व सर्वांनींच जिनधर्माची दीक्षा घेतली व उत्तम तप केलें.

रावण व बिभीषण यांच्यामधील वैर थोडावेळ टिकून नाहींसें होणारें नाहीं यास्तव "हे रामचंद्रा, तो तुमचा मित्र होईल व त्याचा तुम्ही स्वीकार करावा." या मंत्र्याच्या सल्ल्यानें रामचंद्रांनीं दूताला घेऊन येण्याची आज्ञा केली. थोड्यावेळानें बिभीषण आला त्यानें रामचंद्राला नमस्कार केला व मी तुमचा दृढमित्र होईन असें वचन दिलें. रामचंद्रांनींहि मित्रा, तुला मी अवश्य लंकेचें राज्य देतो असें म्हटलें. बिभीषण आपल्या तीस अक्षौहिणी सैन्यासह रामाला मिळाल्यामुळें रामाच्या शिबिरांत अत्यानन्द झाला.

येथेंच सीतेचा भाऊ भामण्डलही एक हजार एक अक्षौहिणी सैन्यासह रामाकडे आला. सर्व राजांचें सैन्य जमा होऊन रामाकडे चार हजार अक्षौहिणी सैन्य जमविलें. या सर्व सैन्यासह राम लंकानगरीकडे निघाले. रणभूमीचें क्षेत्र २० योजनें रुंद होतें. रामाच्या अंगीं चार हजार अक्षौहिणी सैन्याइतकें बळ होतें. विशाल पुण्य असलें म्हणजे शत्रुहि मित्र होतात. व अल्पपुण्यधारकाचे मित्रही शत्रु बनतात. हे जाणून मनुष्यानें बुद्धि धर्माचरणांत लावावी.

अक्षौहिणी सेनेचें प्रमाण किती असतें असा श्रेणिकानें गौतमगणधरास प्रश्न विचारला त्यांवेळीं त्यांनीं असें विवेचन केलें. सैन्याचे पत्ति, सेना, सेनामुख, गुल्म, वाहिनी, पृतना, चमू व अनीकिनी असे आठ भेद आहेत. त्यांचें कोष्टक याप्रमाणें :—

| रथ | गज | पायदळ | घोडे | |
|---|---|---|---|---|
| १ | १ | ५ | ३ | पत्ति |
| ३ | ३ | १५ | ९ | सेना |
| ९ | ९ | ४५ | २७ | सेनामुख |
| २७ | २७ | १३५ | ८१ | गुल्म |
| ८१ | ८१ | ४०५ | २४३ | वाहिनी |
| २४३ | २४३ | १२१५ | ७२९ | पृतना |
| ७२९ | ७२९ | ३६४५ | २१८७ | चमू |
| २१८७ | २१८७ | १०९३५ | ६५६१ | अनीकिनी |
| २१८७० | २१८७० | १०९३५० | ६५६१० | अक्षौहिणी |

एका अक्षौहिणी सेनेंत २१८७० रथ असतात. हत्तींची संख्याही तेवढीच असते. पायदळाची संख्या १०९३५० असते व घोड्यांची संख्या ६५६१० ही आहे.

रामाचे सैन्य चार हजार अक्षौहिणीचे होतें तसेंच रावणाचेंहि होतें.

कोणी रामचंद्राला या युद्धांत विजय मिळेल व कोणी रावण विजयी होईल असे म्हणत असे. कुम्भकर्ण, इन्द्रजितादि महायोद्धे रावणाच्या बाजूचे आहेत यामुळें तो विजयी होईल असें कांहीं सांगत तर मारुति, सुग्रीव, भामंडल हे महावीर रामाच्या बाजूस आहेत. शिवाय खरदूषणाचा ज्यानें वध केला असा रामाचा भाऊ लक्ष्मण हा लोकोत्तर शूर आहे व रामाची बाजू न्यायाची आहे म्हणून तोच विजयी होईल असें कित्येक सज्जन बोलत असत.

रागीद्वेषी होऊन जीवाचें चित्त अनादिकालापासून मलिन झालें आहे. अशुभ, शुभ व शुद्ध असे जीवाचे तीन प्रकारचे परिणाम आहेत. अशुभाचा त्याग करून गुणीसज्जन शुभांत व शुद्धांत तत्पर होतात. जे जिनेश्वर, निर्ग्रंथमुनि व जैन-शास्त्रांचे भक्त आहेत त्यांना जिनदास म्हणावें. जे शुभ व शुद्ध परिणामांत तत्पर राहतात त्यांना क्रमानें मोक्षसुख मिळतें. अशुभ परिणाम संसारांत फिरवितात म्हणून ते सतत त्यागावेत.

---

# पंचावन्नावें पर्व.

अरिसैन्य जवळ आलें प्रचण्ड जाणून जाहली लङ्का ।
क्षुब्ध [1]प्रलयोदधिसम का[2]तर हृदयांत उद्भवे शङ्का ॥ १ ॥
ही दूतमुखें वार्ता ऐकुनि रावणमनांत ये कोप ।
वीररणाची वदती सुकथा मनिं धरुनि तीव्र सन्ताप ॥ २ ॥
गम्भीर सागरासम भेरीरव भटमनांत उत्साह ।
वितरी वीररसाचा प्रसार वाढे हरून भयमोह ॥ ३ ॥
शङ्खादिकवाद्यांचा ध्वनि पसरे गगनमण्डलीं दूर ।
आली वीररसाला भरती भटसागरांत भरपूर ॥ ४ ॥
हस्त, प्रहस्त, भास्कर, मारीच, नि अमलचन्द्र नृप शूर ।
स्वामिहितैषी आले दशाननाजवळि जोडुनि स्वकर ॥ ५ ॥

[ विभीषणाचा रावणाला उपदेश. इन्द्रजिताचें विभीषणाचा
अपमान करणारें भाषण. ]

लंकाधीशासंनिध येऊन नमून बोलला विनयें ।
हितकर पसन्त सन्तां वचन विभीषण जयांत दोष न ये ॥ ६ ॥
" वैभव तुजला नाथा ! पुरन्द[3]रासम विशाल हें आलें ।
भूमि दिशा आकाशीं यश ईश ! व्याप्त शुभ्र तव झालें ॥ ७ ॥
परि परललनेसाठीं याचा होणें विनाश नच इष्ट ।
करि तूं विचार चित्तीं न तरी होईल तीव्रतर कष्ट ॥ ८ ॥
द्यावी सीता रामा शीघ्रचि सदनांत अग्नि नच ठेव ।
देण्यांत दोष न दिसे राहे गुण त्यांत तेवि शुभभाव ॥ ९ ॥
सुखसागरीं सदा तूं बुडला आहेस नाथ योग्यचि हें ।
रामासही सुखी कर देउनि सीतेस सर्वदा पाहें ॥ १० ॥
यापरि विभीषणाचें भाषण ऐकून इन्द्रजित् वदला ।
कोणी विचारिलें तुज किंवा अधिकार कोणता तुजला ॥ ११ ॥

---

१ खवळलेल्या प्रलयकालच्या समुद्राप्रमाणें. २ भित्रामनुष्य. ३ इन्द्रासारखें.

नाहीं धैर्य तुला वा कातर आहेस जा घरीं बैस ।
आम्ही अरीस मारुनि सीतेस करूं पराक्रमें स्ववश ॥ १२ ॥
हें स्त्रीरत्न सुदुर्लभ सर्वोत्तम कोण मुज्ञ सोडील ।
पुण्योदयें मिळालें मूर्खासम सर्व वचन तव फोल ॥ १३ ॥

[ बिभीषणाचें इन्द्रजिताला उद्देशून कठोर भर्त्सनेचें भाषण. ]

वदला इन्द्रजिताला वचन बिभीषण न पुत्र शत्रुच तूं ।
सर्वस्वनाशकारी वचन तुझें लवहि यांत नच किन्तु ॥ १४ ॥
अग्नीनें घर जळतां टाकित आहेस लांकडें त्यांत ।
मोहपिशाचें पीडित झालास न जाणसी तुझें अहित ॥ १५ ॥
जोवरि लक्ष्मण येउनि तीक्ष्णशरें नगर हें न नाशील ।
तोवरि सीता रामा देई वा क्षेम सकल होईल ॥ १६ ॥
आहे पिता कुमति तव राक्षसवंशांत जन्मला साप ।
लङ्का हें विळ त्याचें नागौषधि जानकी करी ताप ॥ १७ ॥
लक्ष्मण हा सिंह असे रणिं त्याला जिंकणें न शक्य असे ।
अत्यन्त कुपित होतां त्याच्या दाढेंत जाल हेंचि दिसे ॥ १८ ॥
अव्ध्यावर्त जयाचें धनुष्य शर सूर्य-तुल्य ज्या जवळीं ।
भामण्डल तत्पक्षीं कदापि जो जिंकिला न जाय वली ॥ १९ ॥
नम्र तयाला झाले खगनृप अत्यन्त शूरसे बहुत ।
किष्किन्ध मलय मारुति महेन्द्र यद्वीर्य भटजनां विदित ॥ २० ॥
त्रिपुर, श्रीपर्वतसुत, अलक नि सन्ध्याह्व तीर हैहय हे ।
रत्नद्वीपीं खतिलक वेलन्धर दधिमुखादि खग पाहे ॥ २१ ॥
आहेत हे महाबल विद्यावैभव तयांस विपुल असे ।
यांचा विचार चित्तीं करुनि अकार्यास शीघ्र सोडि कसें ॥ २२ ॥

[ बिभीषणास व रावणास मंत्र्यांनीं शान्त केलें पण रावणानें मर्मविद्ध करणारें भाषण केलें. ]

यापरि वदतां, रावण भीषणकोपें बिभीषणा उठला ।
करिं तीव्र खड्ग घेउनि माराया क्रूरता वरी ज्याला ॥ २३ ॥
आला बिभीषणासहि कोप नि उपडून मणिमयस्तम्भ ।
घेउनि करांत झाला उद्युक्त करावया रणारम्भ ॥ २४ ॥

अत्यन्त उग्र झाले सचिवें स्वस्थानिं शीघ्र वैसविले ।
परि रावण प्रकोपें विभीषणा मर्मभेदि वच बोले ॥ २५ ॥
अग्नि जसा स्वाश्रय जें इन्धन त्या जाळितो तसा खल तूं ।
माझ्या अहितीं तत्पर आहेस मला न वाटतो किन्तु ॥ २६ ॥
दुष्टा या नगरींतुनि माझ्या जा शीघ्र तोंड करि काळें ।
देहविनाशी अवयव छाटावा उपडुनी मुळेंपाळें ॥ २७ ॥
प्रतिकूल वागणें तव अनर्थकारी प्रवृत्ति सर्व तुझी ।
येथें तुज ठेवाया दुष्टा होई न चित्त मम राजी ॥ २८ ॥
तूं राहशील येथें तुजला मारिन न मी जरी ठार ।
रावण मी नच होइन या मद्वचनास सत्य अवधार ॥ २९ ॥

[ विभीषणानें रामाचा आश्रय घेण्यासाठीं जाण्यापूर्वी
प्रथमतः रामाकडे दूत पाठविला. ]

रावणचि फक्त रत्नश्रवसुत आहे न मी नसे काय ।
अपमानें मी येथें वसणें केव्हांहि योग्य नच होय ॥ ३० ॥
यापरि बोलुनि गेला लङ्का सोडून कुपित होऊन ।
श्रीरामाश्रय घेण्या करी विभीषण चमूसवें गमन ॥ ३१ ॥
घेऊन सैन्य मोठें सशस्त्र अक्षौहिणी अशा तीस ।
विद्युद्घन, इभ, इन्द्र, प्रचण्ड नृप ज्यास होति मदतीस ॥ ३२ ॥
नानाशस्त्रविराजित रथ, हत्ती, अश्व, पत्ति घेऊन ।
शूर विभीषण गेला सान्तःपुर रावणास सोडून ॥ ३३ ॥
जेव्हां विभीषणागम झाला तेव्हां हिमागमीं अधन ।
होती कम्पित तैसें भीतीनें सर्व कीशनृपतिगण ॥ ३४ ॥
अळ्यावर्तधनुष्या धरि तैसें सूर्यहास खड्गास ।
लक्ष्मण विभीषणाला पाही हृदयीं धरून मोदास ॥ ३५ ॥
वज्रावर्त धनुर्धर राघव हृदयांत कोपला फार ।
सचिवगणासह कोणी विचार होते करीत नृप शूर ॥ ३६ ॥
तरुण नि चतुर असा नर रामासन्निध विभीषण प्रेषी ।
वन्दुनि चरणा बोले तो मधुराक्षर मनांत बहु हर्षी ॥ ३७ ॥

१ संशय. २ हिंवाळयाचे आगमन. ३ वानर चिह्न मुकुटावर धारण करणारे राजे.

झाला दशवदनासह विभीषणाचा विरोध तो चतुर ।
अन्यायपक्ष सोडुनि समीप तव येइ जोडुनि स्वकर ॥ ३८ ॥
तो धर्म-कार्य-तत्पर वन्दुनि रामा विनन्ति करित असे ।
आलों शरण तुला मी हृदयीं करुणा तुझ्या अपार वसे ॥ ३९ ॥
यापरि नर तो वदलो सचिवासह राम अन्यसदनांत ।
वसला विचार करण्या शङ्का प्रगटे यदीय-हृदयांत ॥ ४० ॥

[ रामचन्द्र विभीषणाच्या स्वीकाराविषयीं सचिवगणावरोबर विचार करितात. ]

मतिकान्तसचिव वदला दशाननें कपटभाव ठेवून ।
पाठविलें स्वभ्रात्या विभीषणा सांगलें मदीय मन ॥ ४१ ॥
अथवा झाला उभयीं असेल तंटा परन्तु निवळेल ।
पुनरपि जैसें पाणी शरदागमनांत होतसें विमल ॥ ४२ ॥
मतिसागर सचिव वदे जनवदनें उभय कलह ऐकियला ।
न दिसे स्वभाव भीषण विभीपणाचा दयारसें ओला ॥ ४३ ॥
शास्त्रजलक्षालितमति करी अनुग्रह सदैव सुजनांत ।
धर्मज्ञ विभीषण तो अन्यायीं नच कदापि राहि रत ॥ ४४ ॥
भाऊ अन्योन्य जरी कर्म तयांचें सदैव भिन्न असे ।
कर्माच्या भिन्नत्वें जगांत वैचित्र्य सर्वदैव वसे ॥ ४५ ॥

[ रावण व विभीषणांच्या स्वभावभिन्नतेविषयीं सचिव दृष्टांतकथा सांगतात. ]

याविषयीं श्रीरामा एक कथानक तुम्हांस मी कथितो ।
ऐकावें स्थिरचित्तें जेणें हृदयस्थ संशया मथितो ॥ ४६ ॥
नैमिषनगरीं होते गिरिवर, गोभूति बन्धु हे दोघे ।
अन्योन्य-प्रीतीनें केव्हांही द्वेष उभयिं नैव रिघे ॥ ४७ ॥
विद्वान् धार्मिक होते सदा सदाचारपाठनांत रत ।
त्यांच्या सुगुणगणावरि जनता होती मनांत अनुरक्त ॥ ४८ ॥
होता नैमिषनगरीं राजा श्रीसूर्यदेव नाम जया ।
नामें मतिप्रिया त्या होती जी परमरूपिणी जाया ॥ ४९ ॥
पुण्येच्छेनें उभयापासुनि केलें तिनें व्रतग्रहण ।
आचरि ती भक्तीनें करी यथाविधि तयास सम्पूर्ण ॥ ५० ॥
ती उद्यापनसमयीं ठेवून सुवर्णराशि पात्रांत ।
भातानें आच्छादुनि देई उभयास भक्तिरतचित्त ॥ ५१ ॥

परि गिरिवर-विप्राच्या झाला उत्पन्न लोभ हृदयांत ।
होउनि गिरिसम कठिनचि केला गोभूतिचा तयें अन्त ॥ ५२ ॥
द्रव्यादिक-लोभानें असुनि सहोदरहि वैर उपजून ।
असुहरण करिति रामा हें घेई तूं मनांत उमजून ॥ ५३ ॥

[ सचिव दुसरी दृष्टान्त-कथा सांगतात. ]

दुसरें ऐक कथानक कौशाम्बीनाम नगर एक असे ।
'कुरुविन्दा' भार्येसह धनी 'बृहद्घन' तिथें प्रसिद्ध वसे ॥ ५४ ॥
या उभयांना झाले सुपुत्र 'अहिदेव' आणि 'महिदेव' ।
प्रेमळ उभयहि होते नव्हता त्यांच्यांत वैरमलभाव ॥ ५५ ॥
घेऊन माण्डवल ते समुद्रयात्रा करावया गेले ।
धन मिळविलें तयांनीं अमूल्य करिं रत्न त्यांचिया आलें ॥ ५६ ॥
परि जो तें करिं घेई इच्छी मारावयास अन्यास ।
दुश्चिन्ता ते कथिती सोडुनि देती अशुद्धभावास ॥ ५७ ॥
येऊन घरीं त्यांनीं रत्न दिलें तें स्वकीय-जननीस ।
मारावें विष घालुनि माता इच्छी स्वपुत्रयुगलास ॥ ५८ ॥
माता नि पुत्रयुगलें रत्न दिलें तें नदींत फेकून ।
मांसभ्रमम[1]तिमत्स्यें वदनें तें शीघ्र टाकिलें गिळुन ॥ ५९ ॥
तो मत्स्य धीवरांनीं जाळें टाकुनि नदीजलीं धरिला ।
विकिला बन्धुयुगानें देउनि धन निजगृहांत आणियला ॥ ६० ॥
बहिणीनें तो चिरिला पडलें बाहेर रत्न ती घेई ।
मातृभ्रातृयुगाला मारावें मति अशी तिची होई ॥ ६१ ॥
मातृभ्रातृस्नेहें झाला अविचार शान्त हृदयाचा ।
कथिलें हें वृत्त तियें ऐकुनि विस्मय मनांत ये साचा ॥ ६२ ॥
त्या सर्वांनीं मणि तो फोडुनि बारीक चूर्णमय केला ।
मुनिजवळ घेति दीक्षा आचरिती श्रेष्ठ जैन सुतपाला ॥ ६३ ॥
यास्तव धनादिलोभें माता, भ्राता, पिता, सुता यांना ।
जन मारितात होतें संसारीं वैर देइ दुःख मना ॥ ६४ ॥

[ बिभीषणांचें आगमन. तो रामाला मित्रतेचें वचन देतो.
रामचंद्रही त्याला लंका देण्याचें वचन देतात. ]

---

१ ज्याच्या बुद्धीला हा मणि मांस आहे असा भ्रम झाला अशा माशानें.

रावण-विभीषणामधिं जें झालें वैर तें न संपेल ।
यास्तव तुमचा होइल मित्र नि तुम्हां न तो विसंबेल ।। ६५ ।।
दूता रामें म्हटलें जा त्या येई सभेंत घेऊन ।
साधु विभीषण आला सर्वांचें जाहलें प्रसन्न मन ।। ६६ ।।
म्हटलें विभीषणानें करुनि नमस्कार रामचरणास ।
तूं राघवा इथें प्रभु परत्रें[1] मानिन जिनेन्द्रचरणास ।। ६७ ।।
यापरि निश्चय माझा गिरिसम नच वदल त्यांत होईल ।
रामा वदे विभीषण राहिल मरणान्त हेंचि मम शील ।। ६८ ।।
राम तयाला वदले मित्रा तुजला अवश्य मी लङ्का ।
देईन स्वमनीं वा तिळमात्रहि नच असो तुझ्या शंका ।। ६९ ।।
आगमन जाहल्यानें विभीषणाचें अमन्द[2] आनन्द ।
श्रीरामसैन्यवृन्दीं झाला वर्णू शके न कवि मन्द ।। ७० ।।
सिद्ध-महाविद्य असा भामण्डल जनकतनयही आला ।
जो विजयार्धखगाधिप ज्याच्या कण्ठीं सदैव मणिमाला ।। ७१ ।।
श्रीराम नि लक्ष्मीधर सुग्रीवादिक खगेश्वरें केला ।
भामण्डलागमें ही अहो महोत्सव समस्तमुखि झाला ।। ७२ ।।
दिन आठ हंसनगरीं राहुनि निश्चय करून समराचा ।
लङ्काभिमुख निघाले दिसती जणु हा समूह अमरांचा ।। ७३ ।।
रथ नानाविध यानें वेग जयांचा समीरतुल्य असे ।
अश्व असे गजवृन्द श्याम रवें दिग्गजास सतत हसे ।। ७४ ।।
स्वाम्यनुरागें उत्कट चिलखत घालून सज्ज वीरगण ।
निघती वीररसानें प्रफुल्ल ज्याचें दिसे मुखाब्जवन ।। ७५ ।।
नभ खगवीरगणांनीं भरलें कपि सैन्य अग्रगमन करी ।
तें प्राप्त सकल झालें येउनि निर्णीतसमरभूमिवरी ।। ७६ ।।
ही समरभूमि होती सपाटशी वीस योजनें रुन्द ।
परि लाम्बीचा निर्णय सांगू शकती न आगमीं विबुध ।। ७७ ।।
वाटे जणु मृत्यूची विहारभू ही असे जनां बघतां ।
नानायुध-चिह्नांनीं ती सर्वा सहज येइ ओळखतां ।। ७८ ।।

---

१ परलोकीं. २ पुष्कळ.

गज, अश्व, सिंह, दुन्दुभि यांचा रव ऐकुनि प्रमोद वरी ।
रावण मनिं जो होता वीररसाचा खराच अवतारी ॥ ७९ ॥
सामन्त-नृपसमूहा आज्ञा रावण अतित्वरें देई ।
युद्धास सज्ज व्हावें समयातिक्रम न सहन मज होई ॥ ८० ॥
भास्कर पयोद काञ्चन कम्पन गन्धर्व गीत शिवसदन ।
श्रीगगनवल्लभाभिध, सूर्योदय अमृत सिंहपुर, रत्न ॥ ८१ ॥
बहुनाद नृत्य, गीत नि शोभापुर किन्नराख्य बहुनाद ।
श्रीगुह सुर नूपुर नि श्रीपुर, रिपुजय तथा परिक्षोद ॥ ८२ ॥
ज्योतिर्दण्ड नि शशिपुर, विशालपुर, अश्वरत्नपुर ऐशा ।
नानाविध नगरांचे खगराजे रावणा त्रिखण्डेशा ॥ ८३ ॥
आले लंकेशाला समरीं साहाय्य सैन्य घेऊन ।
आदर त्यांचा केला दशाननें स्थान मान देऊन ॥ ८४ ॥
यापरि विशाल झालें सैन्य जमा उभयबाजुचें साचें ।
रथ, गज, अश्व नि पाइक अनेक अक्षौहिणीप्रमाणाचें ॥ ८५ ॥
चार सहस्राक्षौहिणि होतें जें सैन्य रामरायाचें ।
तितुकेच बलशरीरीं होतें बुध बोलतात निज वाचें ॥ ८६ ॥
एकसहस्राक्षौहिणी सैन्या घेऊन रामरायास ।
सुग्रीवनृपति सेवी हा पुण्याचा प्रभाव सविशेष ॥ ८७ ॥
भामण्डलभूपाचे सहस्रअक्षौहिणी नि वरि एक ।
श्रीराम-लक्ष्मणांना सेविति सैनिक जिनागमीं देख ॥ ८८ ॥
जे शत्रुभूतराजे महानरांचे सुमित्र ते झाले ।
पुण्यप्रभाव मोठा जेणें दुःसाध्यःसाध्य करिं आलें ॥ ८९ ॥
परि अल्पपुण्य जे नर मित्र तयांचेहि शत्रु होतात ।
हें जाणून नरानें धर्माचरणांत लावणें चित्त ॥ ९० ॥
भाऊ हा मम आहे हा माझा मित्र सर्व सुखदायी ।
भववैचित्र्यज्ञाता[1] ठेवि न जिनदास मति मनांठायीं[2] ॥ ९१ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे विभीषणसमागमाभिधानं नाम पञ्चपञ्चाशत्तमं पर्व ॥ ५५ ॥

---

१ संसाराची नानाविधता जाणणारा. २ मनांत.

# छप्पन्नावें पर्व.

गौतमगणीस वदला श्रेणिकभूपाल नाथ सांग मला ।
अक्षौहिणि-सैन्याचें प्रमाण तूं नाशितोस चित्तमला ॥ १ ॥

अक्षौहिणी असे जी प्रमाण कथिती तिचें पुराणज्ञ ।
श्रेणिक ऐक क्रमशः श्रोता मगधेश असिसि तूं सुज्ञ ॥ २ ॥

पत्ति नि सेना, सेनामुख, गुल्म नि वाहिनी तथा पृतना ।
सप्तमभेद चमू हा अनीकिनी भेद आठवा जाणा ॥ ३ ॥

रथ एक नि गज एकचि पदाति जे पांच अश्व ते तीन ।
'पत्ति' असे त्या संज्ञा 'सेना' जी त्रिगुणपत्ति तीच गण ॥ ४ ॥

त्रिगुणा सेना तिजला 'सेनामुख' नाम बोलतात बुध ।
त्रिगुणित सेनामुख जें 'गुल्म' तया नाम देति जन शुद्ध ॥ ५ ॥

त्रिगुणित गुल्मा देतो वीराचा वृन्द 'वाहिनी' नाव ।
या वाहिनीत्रयाला 'पृतना' हे बोलतात शुभभाव ॥ ६ ॥

पृतना तीन तयांना 'चमू' म्हणावें चमूत्रया वदती ।
सद्बुध "अनीकिनी" हें सुनाम हें बाळगा तुम्ही चित्तीं ॥ ७ ॥

दश या अनीकिनीचें प्रमाण अक्षौहिणीं तयास वदा ।
रथ यांत किती असती प्रमाण याचें असे गणा सुखदा ॥ ८ ॥

अक्षौहिणींत संख्या असे रथांची सहस्र एकविस ।
वरि आठशें नि सत्तर ऐसें वदतात तज्ज्ञ विद्वांस ॥ ९ ॥

गजसंख्या ही एथें रथसंख्येच्या समान जाणावी ।
संख्या पायदळाची कथितों जी ती मनांत आणावी ॥ १० ॥

ती एकलक्ष जाणा हजार नउ तीनशे नि पन्नास ।
अक्षौहिणींत संख्या पायदळाची अशी असे खास ॥ ११ ॥

---

१ पायदळ. २ तिप्पट. ३ रथसंख्या २१८७०, गजसंख्याही २१८७० असते. पायदळसंख्या १०९३५० व घोड्यांची संख्या ६५६१० याप्रमाणें अक्षौहिणीचें प्रमाण आहे.

घोड्यांची ही संख्या पासष्ट हजार साहशे नि दहा ।
यापरि संख्या कथिली अक्षौहिणिची नृपा मनें पाहा ॥ १२ ॥

[ दोन्हीं सैन्यें युद्धासाठीं सज्ज झालेली पाहून सज्जनलोक आपले विचार प्रगट करितात. ]

श्रीरामाचे यापरि आलें लङ्केसमीप बहु सैन्य ।
तेव्हां सज्जन वदती दशाननाविषयिं वचन अन्योन्य ॥ १३ ॥
" सुन्दर रथ-नक्षत्रें शास्त्रीं मति किरणवृन्द ज्या शीत ।
परललनेच्छामेघें[1] रावण हा चन्द्र हा ! तिरोभूत[2] ॥ १४ ॥
अठरा हजार भार्या सुन्दर असुनिहि मनांत सीतेचा ।
अभिलाष धरुनि रावण झाला आश्रयचि खचित शोकाचा ॥ १५ ॥
वानर, राक्षस, राजे यांतुनि होईल हानि कवणाची ।
दोघांचींहीं सैन्यें पाहत आहेत वाट मरणाची ॥ १६ ॥
मदनासमान सुन्दर मारुति वानरनृपांत बहु शूर ।
इन्द्रजित तेवि शोभे वीरगणीं सूर्यतुल्यसा चतुर ॥ १७ ॥
रावणसैन्य असे हें अत्युग्र विशाल सागरासदृश ।
रामास न संग्रामीं मिळेल जय नच तथैव त्या सुयश ॥ १८ ॥
ऐसें रावणपक्षी कांहीं नर बोलले परन्तु दुजे ।
विजयी रामचि होइल न्यायाचारेंचि तो सदा साजे ॥ १९ ॥
अत्यन्त शूर लक्ष्मण समरीं खरदूषणा तयें वधिलें ।
अनुपमचि बल तयाचें दशाननाचें कदापि हो न भलें ॥ २० ॥
वायुसुतें मारुतीनें मयतनयेला[3] कठोर बोलून ।
निर्भर्त्सनें[4] बहु केलें सीताहृदयास अमित तोषवुन ॥ २१ ॥
रावणसैन्या जिंकुनि तटवेशी निजबलेंचि मोडून ।
लङ्कानगरी ध्वंसुनि मारुति रामाकडे करी गमन ॥ २२ ॥
कोणी गर्वोद्धत नर वदला हें सैन्य रामरायाचें ।
गोष्पदें[5]समान आहे परि बल सागरसमान इतराचें ॥ २३ ॥
इन्द्रहि जयास जिंकू न शके रावण असा कसा इतरें ।
जाईल जिंकिला हो बोला ना केवि तीक्ष्ण रामशरें ॥ २४ ॥

---

१ परस्त्रीची इच्छारूप ढगानें. २ आच्छादित. ३ मन्दोदरीला. ४ मनाला झोंबणारें भाषण. ५ गायीच्या पावलासारखें स्थान.

तेजस्वी जनवृन्दीं जो प्रभु शोभे अशा त्रिखण्डेशा ।
जिंकायाची धरणें मनुजें ती सर्व होय विफलाशा ।। २५ ।।
भाऊ असे जयाला नामें श्रीकुम्भकर्ण विख्यात ।
देवहि जिंकु न शकती वीर असा जो अपूर्व विक्रान्त ।। २६ ।।
ज्याचें त्रिशूल शस्त्र प्रलयानलसम महोग्र वीरांना ।
भासे कोण तयाला शकेल जिंकू वदा तुम्ही वचना ।। २७ ।।
पाहून शरच्चन्द्रा समानसे छत्र शुभ्र शत्रुगण ।
पावे विनाश सगळा अंधारासम असें मनीं मान ।। २८ ।।
यापरि रावण-रामाविषयीं तैसेंच तज्जनाविषयीं ।
रागीद्वेषी होउनि वदती जन मोह हा असे विजयी ।। २९ ।।
रागद्वेषें मिश्रित चित्तजनांचें अनादिकालीन[1] ।
नानाविध भावा धरि अशुभांतचि होय सर्वदा लीन ।। ३० ।।
शुभ अशुभ शुद्ध ऐसे भावांचे तीन भेद आहेत ।
अशुभा त्यागुनि होती शुभांत शुद्धांत निरत गुणवन्त ।। ३१ ।।
जिनगुरुशास्त्रांचे जे असती नरभक्त त्यास जिनदास ।
म्हणतीं तयें करावा शुभांत शुद्धांत सतत रहिवास ।। ३२ ।।
जे शुभशुद्धीं करिती निवास अशुभास सतत टाळून ।
त्या जिनदासा मिळतें अनुक्रमें मुक्तिसौख्य अन्यून ।। ३३ ।।

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे उभयबलप्रमाणविधानं नाम षट्पञ्चाशत्तमं पर्व ।। ५६ ।।

---

१ अनादिकालपासून.

# सत्तावन्नाव्या व अट्ठावन्नाव्या पर्वांतील कथासार.

राम-लक्ष्मणांचें सैन्य जवळ आलें हें पाहून रावणाच्या सैन्यांतील वीर सज्ज होण्याची तयारी करूं लागले. एका वीराला शत्रुसैन्य जवळ आलें हें जेव्हां समजलें तेव्हां तो आपल्या पत्नीच्या करपाशांतून मुक्त होऊन रणभूमीकडे सिंहाप्रमाणें त्वेषानें गेला.

एका स्त्रीनें आपल्या पतीस म्हटलें– "नाथ, आपण युद्धांतून जर भिऊन परत याल तर मी आपलें दर्शन घेणार तर नाहींच पण मी प्राणांचाही त्याग करीन. कारण दुष्कीर्तिश्रवणापेक्षा प्राणत्याग करणें मला बरें वाटेल."

दुसरी एक स्त्री पतीला असें म्हणाली– "आपले नोकर निर्भय होऊन शत्रूचा समाचार घेतील व आपण जर भीतीनें पळून याल तर मला त्यांच्या स्त्रिया टोचून बोलतील व तें मला सहन होणार नाहीं."

कोणी स्त्री आपल्या पतीस म्हणाली– "नाथ, आपण धैर्यानें व शौर्यानें शत्रूला मारून व वक्षःस्थलीं व्रणयुक्त होऊन आलात तर मी तो व्रण भूषणाप्रमाणें मानीन."

"आपण शत्रूला मारून यशस्वी व्हाल तेव्हां मी सुवर्णकमलांनीं जिनाची पूजा करीन" असें एक स्त्री आपल्या पतीस म्हणाली.

कोणी स्त्री आपल्या पतीला दृढ आलिङ्गून म्हणाली– "जर आपण जय मिळवून याल तरच मी आपणास घरीं येऊ देईन अन्यथा नाहीं."

याप्रमाणें वीरपुरुषांच्या पत्नींनीं त्यांच्याशीं भाषण केलें.

तें ऐकून वीरपुरुषही याप्रमाणें बोलले—" जे रणांगणांत पराक्रमानें मरण पावतात तेच वीर स्तुत्य होत व त्यांची कीर्ति शत्रुही गातात. जे हत्तीच्या दांतावर झोके घेतात तेच वीर खरे व तेच जयलक्ष्मीच्या कण्ठांतील अमूल्य हिरे होत. हत्तीचें गण्डस्थल फोडतांना जे त्याच्या दांतांनीं विदीर्ण होतात अशा त्या नरसिंहांना जें अपूर्व सुख लाभतें. त्याचें कवि वर्णन करूं शकत नाहीं."

कोणी वीर आपल्या पत्नीला म्हणाला—" जो वीर भ्याला, शत्रूला शरण आला, ज्यानें पाठ दाखविली व ज्याच्या हातांतून भीतीनें शस्त्रही गळून पडलें त्याचा आम्ही त्याग करून शत्रुमस्तकांत भाले खुपसून त्यास ठार मारू." याप्रमाणें बोलून वीर हर्षानें लढावयास निघाले.

लंकेतून हस्त व प्रहस्त नांवाचे दोघे सेनापति रावणाच्या आज्ञेवांचून रणभूमींत शत्रूबरोबर लढण्यास सैन्यासह आले. चांगले जे नोकर असतात ते मालकाच्या आज्ञेवांचूनही त्याचें हित करण्यांत प्रवृत्त होतात. व हा त्यांचा दोषही प्रसंगविशेषीं गुणरूपाचा होतो.

रावणाच्या बाजूला ज्यांनीं उचलून धरिलें आहे असे असंख्य राजे रणभूमींत उतरले. त्यांचीं थोडक्यांत नांवें हीं होतीं. मारीच, स्वयंभू, शुक, सारण, चन्द्र, अर्क, वज्राक्ष, गंभीर, निनद, नक्र, कुम्भ, निकुम्भ, खरख, मकर, श्रीवज्ररव, विभ्रम, जम्बूमाली, दुर्धर्ष, क्रूर, सन्ध्याक्ष, वज्रोदर असे अनेक राजे वायुवेगी घोड्यांनीं युक्त अशा रथांत बसून रणांगणीं आले.

रावणाचे इन्द्रजित्, मेघवाहन, आदिक हजारो पुत्र सुंदर रथांत बसून आले. हे सर्व महापराक्रमी होते.

पुष्पक विमानांत बसून श्यामवर्णाचा रावणही युद्धांत आला. ज्योतिप्रभ विमानांत बसून कुम्भकर्णही आला होता.

त्यावेळीं रावणाला अशुभ सुचविणारीं अनेक अपशकुनें झालीं. भालू नामक पक्षी आकाशांत फिरू लागले. असंख्य गिधाडें आकाशांत पंख पसरून फिरू लागलीं. त्यामुळें अंधार पडला. कांहीं उत्पात जमीनीवर व कांहीं आकाशांत झाले. पण या अपशकुनांना न जुमानतां वीर रणभूमीकडे गेले.

कर्माचा उदय होऊन जीवाला कुफल किंवा सुफल मिळतें हें या शकुनांनीं जाणलें जातें. कर्माचें फल रोकण्याचें सामर्थ्य इन्द्रांतही नाहीं असें जाणून जिनभक्तांनीं नेहमीं चांगलीं कामें करावीत.

इकडे रामाच्या बाजूचे असंख्य विद्याधर रावणसैन्याशीं लढण्यास रथ वगैरे वाहनांत बसून शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन आले. नल, नील, जाम्बुवन्त, मारुति, सुग्रीव, विराधित, जयमित्र, रतिवर्धन, महेन्द्र, दृढरथ, सूर्य, संत्रास, विघ्नसूदन, कुमुदावर्त, इत्यादि. यांच्या रथाला वाघ जोडले होते. भीम, भीमरथ, अंग, अंगद, सुमेरु, पूर्णचन्द्र आदिक राजे घोडे जोडलेल्या रथांतून रणभूमीवर आले.

बिभीषण रत्नप्रभ नामक विमानांत बसून आला. सागर, मनोघ्न, अर्धचन्द्र, जिन, जिनप्रेमा हे राजे अनेक वर्णांच्या विमानांत बसून रणभूमींत आले. नानावाद्यें वाजत होती. वीरांत वीरश्रीचे वारे त्यामुळें भरले होतें. राक्षसांची सेना वानर सेनेवर तुटून पडली. पण तिनें त्यांचा तो हल्ला परतविला.

यानंतर राक्षसांच्या हस्त-प्रहस्त सेनापतींनीं आपल्या सैन्याला प्रोत्साहन देऊन वानरसेनेवर चाल करावयाला लाविली. तेव्हां वानरसेना मागें हटू लागली हें पाहून नल व नील यांनीं आपल्या सैन्याला धीर दिला. तें मोठ्या नेटानें लढू लागलें.

नल व नील यांचें हस्त व प्रहस्ताबरोबर घनघोर युद्ध झालें. त्यांचें युद्ध पाहतांना देवांना मोठा आनन्द वाटला. नल विद्याधरानें वेगानें उडी मारुन हस्ताच्या रथांत प्रवेश करुन त्याचें डोकें उडविलें. असाच पराक्रम गाजवून नीलानेंही प्रहस्ताला ठार मारलें. तेव्हां त्या उभयतांचें सैन्य पळून गेलें. कोणत्याही कार्यांत जो मुख्य असतो त्यामुळेंच फलप्राप्ति होत असते.

---

हटल्या पाहुनि अपुल्या सेनेला स्वामिभक्तिवश वीर ।
हस्त, प्रहस्त, घेउनि गजध्वजा पातले रणीं चतुर ॥ २४ ॥
'भय न धरा योधांनों' ऐसें वोलून धैर्य देऊन ।
उत्साहित निजसेना केली त्यांनीं सकोप होऊन ॥ २५ ॥
गाजवुनि विपुलशौर्या कपिध्वजांच्या प्रचण्ड सेनेला ।
केलें भग्न तयांनीं राक्षससेनेस मोद वहु झाला ॥ २६ ॥

( नल व नील या दोन वानर राजांचें हस्त-प्रहस्ताबरोबर युद्ध होतें.
युद्धांत नल व नील हस्त-प्रहस्तास ठार मारतात. )

गज जोडिले जयांना ऐशा वैसुनि महारथीं वीर ।
नल नील वानराधिप आले त्याशीं करावया समर ॥ २७ ॥
वहु-शौर्य-धैर्य-गर्वें झाला निर्माण देह जणु ज्यांचा ।
आले धांवत तेथें साठा गमले अपूर्व तेजांचा ॥ २८ ॥
हस्त-प्रहस्त यांच्यासह लढले नल नि नील वहुरोषें ।
नानाविधशस्त्रांनीं सुर नभिं पाहून नाचती तोषें ॥ २९ ॥
वेगें मारून उडी नीलनृपें हस्त विरथ झणिं केला ।
शस्त्रें मस्तक तोडुनि अविलम्वें यमगृहास पाठविला ॥ ३० ॥
तैसेंच नीलखचरें प्रहस्त विद्याधरास यमसदना ।
पाठविलें तैं झाली विनायका[1] खचित राक्षसी सेना ॥ ३१ ॥
तुम्वा फुटला असतां चक्राचे दाण्डके जसे गळती ।
हस्त-प्रहस्त-नाशें पळून गेली समस्त सैन्यतति[2] ॥ ३२ ॥
उन्नत दशा प्रभूची असतां आज्ञा तदीय शिरिं धरिती ।
किङ्कर हें अवधारा जातां सोडून त्यास ते जाती ॥ ३३ ॥
नसतां प्रधान मानव करूं न शकतात कार्य सज्जनही ।
मस्तक तुटतां सगळा देह विनाशास पावतो पाही ॥ ३४ ॥
मुख्येंचि सर्व जगतां मिळतें जिनदास फल असें म्हणती ।
राहूच्या सम्वन्धें सूर्याचे किरण मन्द वहु होती ॥ ३५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे 'हस्तप्रहस्तवधाभिधानं' नाम अष्टपञ्चाशत्तमं पर्व ॥ ५८ ॥

---

१ नायक-सेनापति, त्यानें रहित. २ सैन्यसमुदाय.

# एकोणसाठाव्या पर्वातील कथासार.

हस्त व प्रहस्त अजिंक्य होते. पूर्वी त्यांना कोणी जिंकू शकला नाहीं. असें असतां नल व नील या राजांनीं त्यांना कसें जिंकिलें या प्रश्नाचें उत्तर जिनवाणीनें त्यांचें परस्परांत पूर्वभवापासून वैर उत्पन्न झालें होतें असें दिलें आहे.

पापीजनांना पापाच्या उदयानें दुःख मिळतें. आपण एकाद्या प्राण्याला मारलें तर तो आपणास मारतो. पापोदयानें वधबन्धादिक संकटें भोगावीं लागतात. हस्त-प्रहस्त व नल-नील यामध्यें वैर याप्रमाणें उत्पन्न झालें:—

कुशस्थल नामक गावांत पुष्कळ शेतकरी राहत होते. त्यांतच इंधक, पल्लव नांवाचे दोघे भाऊ राहत होते. धार्मिकांच्या सहवासामुळें त्यांच्याठिकाणीं वात्सल्यादि गुण उत्पन्न झाले होते. ते साधुजनांची निंदा करीत नसत. त्यांना आहारादिक दानें देत असत. याच गांवांत यांच्याहून उलट स्वभावाचे असे दोघे भाऊ राहत होते. ते अतिशय निर्दयी, मिथ्यात्वी, साधुजनांची निंदा करणारे होते. एकेवेळीं राजाला कर देण्याच्या बाबतींत तंटा झाला व अतिशय क्रूर अशा त्या दोघांनीं इन्धक व पल्लव यांना मारून टाकलें. पण त्यांनीं साधुवर्गाना अनेकवेळां दान दिलें होतें त्यामुळें त्यांचा जन्म हरिक्षेत्राच्या मध्यमभोगभूमींत झाला. तेथें दोन पल्यकालपर्यंत कल्प-वृक्षापासून उत्पन्न होणाऱ्या सुखांचा त्यांनीं अनुभव घेतला. यानंतर ते स्वर्गात जन्मले.

इकडे अधार्मिक असे दुसरें बन्धुयुगल कालान्तरानें मरण पावून जरावनांत ससे होऊन जन्मले. तिर्यंचगतींत त्यांना दीर्घकाल दुःख भोगावें लागलें. यानंतर ते मनुष्य होऊन जन्मले.

तरुण झाल्यावर हे तपस्वी बनले. जटा वाढविल्या व फळें-पानें खाऊन त्यांनीं कुतप केलें. मरणानंतर ते विजयार्द्धपर्वताच्या दक्षिण श्रेणींतील अरिंजयनामक नगरांत 'वह्निप्रभ' नामक राजा अश्विनी राणीसह राज्य करीत होता. यांच्या पोटीं यांचा जन्म झाला. माता-पिता यांनीं त्यांचीं हस्त व प्रहस्त अशीं नांवें ठेविलीं. हे दोघे रावणाचे सचिव झाले.

पूर्वीं सांगितलेलें बंधुयुगल स्वर्गांतून च्युत होऊन मनुष्य झालें व गृहस्थधर्माचें उत्तम पालन करून पुनः स्वर्गांत जन्मून दिव्यसुखांचा अनुभव घेतला. यानंतर ते किष्कुपुरामध्यें नल व नील या नांवाचे पराक्रमी राजे झाले.

हस्त व प्रहस्त यांनीं भवांतरीं नल व नील यांना मारलें होतें त्याचें फल या जन्मीं हस्त व प्रहस्तास मिळालें.

ज्याला आपण पूर्वीं मारलें होतें तो पुढें आपला वध करितो— ज्याचें आपण संकटप्रसंगीं रक्षण केलें होतें तो आपलें संकट नाहींसें करितो व ज्याच्याविषयीं आपण उदासीन राहतो त्याची वृत्तिही आपल्याविषयीं उदास बनते.

ज्याला पाहिलें असतां आपले डोळे व मन आल्हादित होतात तो खात्रीनें आपला मित्र समजावा व परजन्मीं त्याच्याशीं मित्रत्वाचें संबंध होते असें म्हणावयास हरकत नाहीं.

समुद्र उसळून नांव फुटते व आपण मरण पावतो हें परजन्मीं केलेल्या पापाचें फल होय. पूर्वजन्मीं पुण्य केलें नसेल तर आपलें संरक्षण करण्याचा प्रयत्न विफल होतो.

यास्तव सम्यक्त्वासह अहिंसादि अणुव्रतें पाळावीं. शीलव्रत धारण करावें साधूंना दान द्यावें. प्राण्यावर दया करावी. अशीं कामें ज्यानें केलीं आहेत त्याल सुख मिळतें व जे अशीं कामें करीत नाहींत ते सुखी होत नाहींत. सज्जन आपणास सुखी करतात व दुर्जन दुःख देतात. या सुखदुःखास ते सज्जन दुर्जन कारण नसून आपलें पूर्वजन्माचें सुकृत व दुष्कृत मुख्य कारण आहे. म्हणून स्वहितेच्छुक जिनभक्त मनुष्यानें कुमार्ग त्यागावा व संयम धारण करावा त्यामुळें त्याला मोक्षसुख लाभेल.

# एकोणसाठावें पर्व.

हस्त-प्रहस्तभूपा पूर्वी कोणी न जिंकिलें होते ।
परि नल-नीलें वधिलें जिनवाणी वैर हेतु त्या वदते ॥ १ ॥
जे पापीजन असती पापोदय त्यास असुख फल देतो ।
जो कोणा जन मारी तेणें तो खचित मारला जातो ॥ २ ॥
वधबन्धादिक संकट नर हरितो जो दयार्द्र होऊन ।
त्याचें संकट हरितो तो सज्जन यांत लवहि विस्मय न ॥ ३ ॥

( धार्मिक बन्धुयुग व अधार्मिक बन्धुयुग. )

गांव कुशस्थल होतें तेथें राहत कुटुंम्बिजन[1] होते ।
इन्धक पल्लव नामें बन्धुद्वय जें दयागुणें न रितें ॥ ४ ॥
मुनिनिन्दा नच करिती भिक्षादानादि-कार्यरत होती ।
धार्मिकजन सहवासें वात्सल्यादिक गुणा मनीं धरिती ॥ ५ ॥
याहुनि विरुद्ध निर्दय सुजनाचारें विहीन बन्धुयुग ।
दुसरें होतें तेथें जणु विधिनिर्मित[2] विरुद्धसंयोग ॥ ६ ॥
नृप-करदानासमयीं झाला तण्टा वरील युगलाशीं ।
तेव्हां त्यांनीं वधिलें इन्धक पल्लव सुभद्र[3] मनुजाशीं ॥ ७ ॥
मुनिदानजसुकृतानें[4] झाले उत्पन्न ते हरिक्षेत्रीं ।
उत्तम भोगा भोगिति पल्यद्वयकाल विपुल सुखसत्रीं ॥ ८ ॥
यानन्तर उभयांची झाली उत्पत्ति देवलोकांत ।
तेथेंहि विविधसौख्यें भोगिति जीं कल्पतरुज दिनरात्र ॥ ९ ॥

( अधार्मिक बन्धुयुगल संसारांत भ्रमण करू लागले. )

तें क्रूरयुगल दुसरें अधर्म परिणामयुक्त होऊन ।
मेलें जरावनामधिं झालें शशयुग्म दुःख करि सहन ॥ १० ॥
जे मुनिनिन्दा करिती मन मिथ्यात्वें यदीय भरलेलें ।
पापीं पंडित त्यांचें संसारीं भ्रमण सर्वदा चालें ॥ ११ ॥

---

१ शेतकरी लोक. २ ब्रह्मदेवानें निर्मिलेला. ३ सज्जन. ४ मुनींना दिलेल्या दानापासून उत्पन्न झालेल्या पुण्यानें.

पशुगतिमध्यें फिरले नानायोनींत दोन ते जीव ।
कष्टें नृजन्म लाभे कुतपीं त्यांचा सदा रमे भाव ॥ १२ ॥
देह स्थूल जयांचा शिरिं वाढविला जयें जटाभार ।
फलपर्णभक्षणानें कृश त्यांचा देह जाहला फार ॥ १३ ॥
विजयार्धपर्वतावरि आहे नामें अरिंजयानगरीं ।
वह्निकुमार सुनामा खगेन्द्र तेथें सुखें सुराज्य करी ॥ १४ ॥
त्या अश्विनी सुभार्या झाले हस्त-प्रहस्त सुत दोन ।
झाले दशकण्ठाचे सचिवद्वय नीतिविक्रमैकधन ॥ १५ ॥
पूर्वोक्त बन्धुयुग जे स्वर्गातुनि नरभवांत येऊन ।
गेहाश्रमीं करुनि तप झाले सुरवर सुरालयीं दोन ॥ १६ ॥
पुण्यक्षय जैं झाला स्वर्गाहुनि अवतरून किष्कुपुरीं ।
नल-नील वीर झाले विजयरमा ज्यास सर्वदैव वरी ॥ १७ ॥
हस्त-प्रहस्त यांनीं भवान्तरीं नल नि नील उभयास ।
जें मारिलें तयाचें फल आलें परत भोग द्यायास ॥ १८ ॥

( जसे आपले भाव असतात तसें फल मिळतें. )

ज्याला पूर्वी वधिलें तो नन्तर वधक[१] निश्चयें होतो ।
रक्षियला जो पूर्वी रक्षक होऊन संकटा हरि तो ॥ १९ ॥
ज्याच्याविषयीं पूर्वी आपण जर जाहलों उदासीन ।
होतो उदास तोही प्राण्यांची स्थिति अशी वदे सुजन ॥ २० ॥
प्रत्यक्ष कारणाविण ज्याला पाहून कोप उद्भवतो ।
निःसंशय समजावा तो परलोकारि[२] बुध असें वदतो ॥ २१ ॥
ज्याला पाहुनि होतो मना नि नयना प्रमोद तो मित्र ।
निःसन्दिग्ध गणावा परजन्माचा असे कथी सूत्र ॥ २२ ॥
उसळुनि समुद्र फुटते नाव नि मकरादि पीडिती प्राणी ।
परजन्म-पापफल हें सांगे ऐसें जनास जिनवाणी ॥ २३ ॥
भूतलिं पीडिति जीवा म्लेच्छादिक जरि अकारणें जाणा ।
परलोक पाप फल हें सांगे आम्हास मुक्तिचा राणा ॥ २४ ॥
हातांत शस्त्र घेउनि रक्षाया सज्ज जाहले वीर ।
सावध सदैव असुनिहि अपुण्यजीवास मृत्यु अनिवार ॥ २५ ॥

---

१ मारणारा जीव घेणारा. २ मागच्या जन्माचा शत्रु.

केलें न पूर्वजन्मीं तप, जिनपूजा नि सुव्रतें दान ।
ज्यानें रक्षण त्याचें करु शकति न बन्धु देव मित्रगण ॥ २६ ॥
तपदान पूर्वजन्मज[1] रक्षी जीवा न बन्धु नैव सुर ।
जाणुनि तयांत तत्पर राहति जे तेचि विबुध अन्य खरे[2] ॥ २७ ॥
श्रीमन्त बन्धुवेष्टित अतिशय जरि विक्रमी तथापि नर ।
रक्षू शके न कोणी मरतांना हें मनांत अवधार ॥ २८ ॥
सम्यक्त्वासह पाळी शीलव्रत देइ साधुजनिं दान ।
युद्धांत वा अयुद्धीं जनरक्षित हो वदे असेंचि जिन ॥ २९ ॥
न दया केली न दिलें दान जयें जीवितास इच्छि जरी ।
इच्छा त्याची निष्फल होते ऐसें मनांत अवधारी ॥ ३० ॥
तप तीव्र जरि न केलें कर्माचा क्षय कदापि नैव घडे ।
अरिवरिहि जो क्षमा करि संसारीं तो कदापि नर न रडे ॥ ३१ ॥
सज्जन उपकृति करिती दुर्जन छळिती असें न मनिं आण ।
निजपूर्वार्जित कर्मचि याला कारण असेंचि वदति जिन ॥ ३२ ॥
सुखदुःख मानवा जें मिळतें त्या बाह्य हेतु गौण असे ।
कर्म शुभाशुभ कारण मुख्य गणी तोचि शान्तचित्त वसे ॥ ३३ ॥
गाढान्धकार मार्गा आच्छादी तेधवा न पाहु शके ।
सूर्याविण डोळसही पडतो खाचेंत तो हितास मुके ॥ ३४ ॥
अडखळतो पाषाणें सर्पावरि पाय पडुनि हो अहित ।
परि आगमसूर्याश्रय जीवाचें सर्वदा करी सुहित ॥ ३५ ॥
हे स्वहितेच्छुक मनुजा हो तूं जिनदास सोड कुपथास ।
पाळी सुसंयमातें तेणें लाभेल मुक्तिपुरवास ॥ ३६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे हस्तप्रहस्तनलनीलपूर्वभवानुकथनं नाम एकोनषष्टितमं पर्व ॥ ५९ ॥

---

१ मागच्या जन्मापासून उत्पन्न झालेले. २ गाढव.

## साठाव्या व एकसष्टाव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

नल व नील यांनीं युद्धांत हस्त व प्रहस्त या रावणाच्या पराक्रमी सचिवांना ठार मारलें व त्यादिवशीं युद्ध बंद ठेवलें. पुनः दुसरे दिवशीं संतप्त झालेले राक्षस वीर जोरानें युद्ध करण्यास रणांत आले. रावणाच्या बाजूचे योद्धे मारीच, सिंहजघन, स्वयम्भू, शंभु, चन्द्र, अर्क, शुक, बीभत्स, निःस्वन, सारण, गंभीर, निनद, हे लढण्यास आलेले पाहून रामाच्या बाजूचेही मदनाङ्कुर, संताप, प्रथित, आक्रोश, विघ्न, नन्दन, कुसुमास्त्र, अनघ, दुरित, प्रीतिंकर, हे राजे लढण्यास निघाले. एकमेकांनीं एकमेकांस लढण्यासाठीं आह्वान दिलें. दोघामध्यें घोर युद्धाला सुरुवात झाली.

संताप व मारीच, प्रथित व मृगेंद्रजघन, पापनामक विद्याधर व शुक विद्याधर, नन्दन व ज्वर असे हे विद्याधर अतिशय त्वेषानें लढले. त्यांत मारीचानें संतापाचा वध केला. नन्दनानें ज्वराला स्वर्ग दाखविला. मृगेंद्रजघनानें प्रथिताला मारलें. याप्रमाणें युद्ध होऊन सूर्यास्त झाला. ज्यांचे पति मारले गेले त्यांच्या स्त्रिया रडू लागल्या. ती रात्र त्यांना काळरात्रीप्रमाणें वाटली.

दुसरे दिवशीं सूर्योदय झाल्यावर पुनः युद्ध सुरू झालें. पुनः वानरध्वजी व राक्षसवीर लढू लागले. त्यांनीं आपल्या जीविताची पर्वा केली नाहीं. स्वयंभू नामक योद्ध्यानें विजय नामक योद्ध्याला ठार मारलें. वज्रोदरानें शार्दूल विद्याधराच्या पोटांत तरवार खुपसून प्राण घेतला. राक्षससेनेची सरशी होत आहे व त्यामुळें कपिसेना पळणार असें पाहून मारुति तेथें आला. तेव्हां वानरसेनेला धैर्य आलें व तिनें शत्रुसैन्याची दाणादाण केली. या कार्यामुळें कपिसेनेची मारुतीनें फार प्रशंसा केली.

सुवर्णरथावर चढून मारुतीनें मालीबरोबर लढाई केली. त्याचा रथ मोडून टाकला तेव्हां माली दुसऱ्या रथावर चढून मारुतीबरोबर लढू लागला. पुनः त्याला मारुतीनें विरथ केलें त्यावेळीं हत्तीच्या पायाखालीं मालीचा चेन्दामेन्दा झाला व तो मरण पावला.

यानंतर मारुतिबरोबर दशाननाचा जम्बूमाली नामक पुत्र लढू लागला. त्यानें अर्धचन्द्र बाणानें मारुतीचा ध्वज मोडला. त्यामुळें मारुतीनें रागावून त्याचें कवच फोडलें. तेव्हां दुसरें कवच धारण करून व दुसरें धनुष्य व बाण घेऊन तो मारुतिबरोबर लढला. ज्याला सिंह जोडले आहेत अशा रथावर तो बसला होता. मारुतीनें आपल्या बाणवृष्टीनें ते सिंह रथापासून वेगळे केल्यामुळें शत्रुसैन्यांत ते घुसले त्यामुळें रावणसैन्य पळत सुटलें व हानिही जबर झाली. यानंतर मारुतीनें आपला रथ रावणाच्या रथाजवळ नेला पण त्याचवेळीं महोदर राजानें मारुतीला लढाईसाठीं बोलाविलें महोदर व मारुतीचें घोर युद्ध झालें. त्यावेळीं राक्षससेनेनें मारुतीला घेरून त्याच्यावर बाणवृष्टि केली. पण मुनीला गालिदानानें जसा राग येत नाहीं तसा मारुतीला बाणसमूहानें आच्छादित होऊन राग आला नाहीं. राक्षसांनीं मारुतीला घेरलेले पाहून नल, नील, प्रीतिंकर, हरि, सुषेण, जाम्बूनदाचा पुत्र व विराधित असे राजे मारुतीच्या मदतीला आले. तेव्हां राक्षससेना दहादिशांत पळून गेली.

यानंतर कुंभकर्ण लढण्यासाठीं आला. त्यानें वानरसैन्यावर प्रस्वापनी अस्त्र सोडलें. त्यामुळें वानरांच्या हातांतील शस्त्रें गळून पडलीं व ते झोपले. इतक्यांत सुग्रीव तेथें येऊन त्यानें प्रबोधनास्त्र सोडलें त्यामुळें मारुति व वानरसेना जागी होऊन निकरानें लढाई झाली. व राक्षससैन्य हटू लागलें.

इंद्रजितानें हें पाहिलें व रावणाची आज्ञा घेऊन तो लढावयाला आला. त्यानें सुग्रीवाला शस्त्रहीन केलें. पण दुसरें शस्त्र घेऊन इंद्रजिताच्या हातांतलें शस्त्र मोडून त्यानेंही त्याला शस्त्रहीन केलें. भामण्डल व मेघवाहन यांचें युद्ध सुरू झालें. दोघेही निरनिराळया अस्त्रप्रयोगानें लढले. शेवटीं इंद्रजितानें नागपाशानें सुग्रीवाला बांधलें व मेघवाहनानें भामण्डलाला नागपाशानें बद्ध केलें. त्याचवेळीं कुम्भकर्णानें मारुतिजवळ जाऊन त्याला आपल्या दोन हातांनीं घट्ट पकडून धरलें.

हें पाहून अंगद गुप्तपणें कुम्भकर्णाच्या पाठीमागें आला व त्यानें त्याचें धोतर फेंडलें व वेगानें तो पळून गेला. दोन हातांनीं धोतर सावरतेवेळीं मारुति त्याच्या हातांतून निसटून तोही अंगदाबरोबर पळून गेला. सुग्रीव व भामण्डल हे दोन महावीर बांधले गेल्यामुळें आपला पराजय होईल असें बिभीषणानें, रामाला सांगितलें. व मी आतां इंद्रजित् व मेघवाहनाबरोबर लढण्यास जातो असें बोलून तो आपल्या दोन पुतण्याबरोबर युद्ध करावयाला आला.

चुलताही बापाप्रमाणेंच श्रेष्ठ आहे त्याच्याबरोबर आपण लढणें योग्य नाहीं असा विचार करून ते दोघे घराकडे निघून गेले. त्यांनीं मनांत विचार केला कीं, सुग्रीव व भामण्डल खात्रीनें आतां मरतील. तेव्हां आपण आतां लढणें बंद ठेवावें म्हणून ते घरीं निघून गेले.

लक्ष्मणानें त्या दोघांची आसन्नमरण दशा पाहून रामाला म्हटलें कीं,–रावणाला जिंकणें आतां संदेहप्राय आहे. रामचंद्रही चिंतायुक्त झाले पण तत्काल त्यांनीं महालोचन देवाचें स्मरण केलें. त्याचें विमान कंपित झालें. अवधिज्ञानानें सर्व प्रकार ध्यानांत आला. त्यानें तत्काल चिंतावेग नामक देव पाठविला. त्यानें येऊन उभयांना– राम-लक्ष्मणांना सिंहवाहिनी व गरुडवाहिनी अशा दोन विद्या क्रमानें दिल्या. तसेंच वारुणास्त्रादिक अस्त्रें, छत्रचामर, हे दोघांना त्यानें दिलें. रामाला हलमुशल दिलें व अमूल्य अशीं दिव्यरत्नें या उभयांना दिलीं.

या सिंहवाहिनीनें रामचंद्र व गरुडवाहिनीनें लक्ष्मण असे दोघे भाऊ आकाशांत शोभू लागले. गरुडवाहनाची सुवर्णाप्रमाणें प्रभा रणभूमींत पसरली. या विद्येच्या सामर्थ्यानें सुग्रीव व भामण्डल नागपाशमुक्त झाले. त्यांचें दुःख नष्ट होऊन ते सुखी झाले. चिंतावेगदेव याप्रमाणें त्यांचें माहात्म्य वाढवून व आशीर्वाद देऊन स्वस्थानीं निघून गेला.

सर्व मित्र विद्याधरांना मोठा आनंद वाटला. ते त्यांच्याजवळ येऊन देवानें असा महिमा करण्याचें कारण काय असा प्रश्न विचारल्यावर रामचंद्रांनीं याप्रमाणें सांगितलें– देशभूषण व कुलभूषण मुनींचा आम्ही उपसर्ग दूर केला त्यामुळें गरुडेंद्र महालोचन देव प्रसन्न झाला व तो तुम्ही वर मागा म्हणजे मी देतो असें म्हणाला. त्यावेळीं मी म्हणालों– संकटप्रसंगीं तुमचें आम्ही स्मरण करू त्यावेळीं तुम्ही येऊन आम्हाला संकटमुक्त करावें. देवानें तें कबूल केलें व यावेळीं त्यानें येऊन हें मोठें ऐश्वर्य आम्हाला दिलें.

जैनमुनिसेवा केल्यानें असें आश्चर्यकारक फल मिळतें असें जाणून जिनभक्त-भव्यांनीं साधुभक्ति करावी.

# साठावें पर्व.

हस्त-प्रहस्त मोठे वीर रथी समरिं मारिले गेले ।
कोपें दुसरे दिवशीं लढावया अन्य वीर बहु आले ॥ १ ॥
मारीच, सिंहजघन, स्वयम्भु, शम्भू, नि चन्द्र, अर्क, शुक, ।
बीभत्स, निःस्वनाभिध, सारण, गम्भीर, निनद, तेवि बक ॥ २ ॥

चिलखत चढवुनि अंगीं घेउनि शस्त्रास्त्रवृन्द बसुनि रथीं ।
त्वेषें वानरसैन्या येती जिंकावयास समरपथीं[1] ॥ ३ ॥
त्यांना पाहुनि वानरवंशाचे नृप समर्थ लढण्यास ।
आले अपुली विक्रमकीर्ति त्रिजगीं प्रसिद्ध करण्यास ॥ ४ ॥

मदनाङ्कुर, सन्ताप, प्रथित नि आक्रोश, विघ्न, नन्दन हे ।
कुसुमास्त्र, अनघ, दुरित, प्रीतिंकर, कोप यन्मनीं वाहे ॥ ५ ॥
बोलावुनि अन्योन्यां केलें अत्यन्त घोर समर तयें ।
शस्त्रांच्यावृष्टीनें व्यापुनि नभ टाकिलें तदा उभयें ॥ ६ ॥

समरीं सन्तापानें मारीच्या गांठलें लढायास ।
प्रथितें मृगेन्द्रजघना, आक्रोशें सारणा, सकोपास ॥ ७ ॥
पापखगानें वेगें शुकाक्ष हा घेरिला लढायाला ।
नन्दनखग ज्वराला घेरी दावी स्वकीय बहु लीला ॥ ८ ॥
अतिघोर समर झालें मारीचें कोपयुक्त होऊन ।
सन्तापाला वधिलें नन्दन दावी ज्वराहिं यमसदन ॥ ९ ॥
सिंहकटीनें प्रथिता, वधिलें उद्दामकीर्तिनें विघ्ना ।
होऊन समर यापरि झाला सूर्यास्त ये निशा कृष्णा ॥ १० ॥
पाहुनि मृत स्वपतिला स्त्रिया रडू लागल्या निशाकालीं ।
जणु वीरा भक्षाया वाटे ही क्रूर राक्षसी आली ॥ ११ ॥
सन्तत कोप जयांच्या हृदयीं सामन्त येति समरास ।
अन्यदिनीं सूर्योदयसमयीं जणु अरुण[2] करुनि नयनास ॥ १२ ॥

---

१ रणमार्गांत. २ लाल.

युद्धस्थलीं कपिध्वज राक्षसवर्गीय उभय भट आले ।
जीवितनिःस्पृह होउनि करून शरवृष्टि घोर ते लढले ॥ १३ ॥
पूर्वभवार्जित-कोपें मारी विजया स्वयम्भु भट शूर ।
वज्रोदर शार्दूला मारी खड्गें विदीर्ण करुनि उर ॥ १४ ॥
यापरि वानर सेना भिऊन जेव्हां पळावया लागे ।
आला मारुति वदला पुढें चलारे वळू नका मागें ॥ १५ ॥
आलें धैर्य ज़यांना ते वानर वीर शत्रुसंहार ।
करिते झाले तेव्हां मारुतिनें त्या प्रशंसिलें फार ॥ १६ ॥

( मारुतीचें मालीबरोबर युद्ध. )

जेव्हां हेमरथावरि होउनि आरूढ पवनतनय लढे ।
तेव्हां वानरवदनीं वीरश्रीचें अतीव तेज चढे ॥ १७ ॥
राक्षस वदले नाहीं हनुमन्तासारखा दुजा वीर ।
बहु वीर वधुनि अमुचे विधवा केल्या स्त्रिया न ज्या पार ॥ १८ ॥
माली नामक उत्तम राक्षसभट शस्त्रसज्ज होऊन ।
आला लढावयाला मारुति करि घोर त्यासवें कदन[1] ॥ १९ ॥
केलें विरथ तयाला तेव्हां माली दुज्या रथीं चढला ।
धावून मारुतीवर शरवृष्टि करीत तो पुढें आला ॥ २० ॥
पुनरपि विरथ तयाला पवनसुतें करुनि तीव्रवेगानें ।
त्याच्याजवळी स्वरथा नेलें सुर गाति यद्यशा गानें ॥ २१ ॥
स्वरथगजाच्या पादें मर्दित माली गतासु जैं झाला ।
मारुतिसंमुख जंबूमाली दशकण्ठपुत्र तैं आला ॥ २२ ॥
चन्द्रार्ध बाण सोडुनि कपिध्वजा शीघ्र छेदिता झाला ।
यापरि जम्बूमाली विक्रमकार्या करूनिया हसला ॥ २३ ॥
मारुति निजध्वजाच्या छेदानें तीव्र रुष्ट होऊन ।
जम्बूमालिधनुष्या कवचा तोडून होय हृष्ट मन ॥ २४ ॥
मन्दोदरीसुतानें घेउनि दुसरें धनुष्य चिलखतही ।
तीक्ष्णशरें ताडियलें मारुतिवक्षास मोद मनिं वाही ॥ २५ ॥
यानन्तर सिंहांचें शतक जया जुंपिलें अशा सुरथीं ।
सोडून अर्धचन्द्रा बाणा करि मुक्त सिंह यश साधी ॥ २६ ॥

१ युद्ध.

या कार्यें मारुतिनें परपक्षीं क्षोभ सैन्यवृन्दांत ।
केला तेणें झालें सैन्यपलायन नि हानि ही अमित ॥ २७ ॥
घोडे, हत्ती नि रथी विह्वल झाले दहादिशांत पळे ।
सामन्त पळुनि गेले मारुति मग रावणाकडेंचि वळे ॥ २८ ॥
अतिभासुर सिंहांनीं सहित अशा सुरथिं बसुनि वायुसुत ।
जोडुनि चापीं बाणा दशवदनाजवळि येइ तो त्वरित ॥ २९ ॥

( मारुति व महोदर यांचें युद्ध. )

इतुक्यांत रावणाच्याजवळि महोदर नृपाल जो होता ।
तो मारुतीस वदला माझ्याशीं युद्ध करि वळीव रथा ॥ ३० ॥
झालें युद्ध भयंकर उभयांचें सिंह हि स्ववश केलें ।
आले राक्षस धावुनि सभोंवती मारुतीस घेरियलें ॥ ३१ ॥
त्यांनीं वायुसुतावरि केली जी वृष्टि तीक्ष्ण बाणांची ।
कम्प न तयास वाटे मुनीश्वरीं जेवि गालिदानाची ॥ ३२ ॥
राक्षस-वेष्टित पाहुनि वायुसुता वानरध्वजी नृप जे ।
पडले तुटून राक्षसवृन्दावरि योग्य हें तया साजे ॥ ३३ ॥
नल, नील, प्रीतिंकर, हरि, कोटि, सुषेण, जाम्बुनदतनय ।
संवाहक नि विराधित जाणति जे सुज्ञ सकल राजनय ॥ ३४ ॥
हे रावण सैन्याच्या निवारणाला करावया आले ।
धावुनि जेव्हां तेव्हां तें राक्षससैन्य दशदिशीं गेलें ॥ ३५ ॥
व्याकुल सैन्या पाहुनि रावण युद्धार्थ पातला समरीं ।
श्रीकुम्भकर्ण आला वायुसुतावरि चढून जेवि हरी ॥ ३६ ॥
तो रावणास वदला नाथा मी क्षम अरीस वाराया ।
कां श्रम आपण घेता बैसा प्रेक्षक बनून या ठायां ॥ ३७ ॥
जो रणतेजें तळपे ऐसा श्रीकुम्भकर्ण पाहून ।
वीर-सुषेणाद्यांना यायाला धैर्य येति वीरगण ॥ ३८ ॥
रतिवर्धन, शशिमण्डल, अङ्ग, नि अङ्गद नि कुमुद, संमेद ।
चन्द्राभ, इन्द्ररश्मि नि रत्नजटी, जय तथा जयस्कन्द ॥ ३९ ॥
चण्डान्तरङ्ग सार नि वेलाक्षेपी वसन्त रामाचे ।
हे भट अरीस दुःसह धारण करिती निधान धामाचें ॥ ४० ॥

बाहुबली हे उद्भट पराक्रमा गाजवून शत्रुगणा।
लाविति पळावयाला त्यासमयीं येइ कुम्भकर्ण रणा ॥ ४१ ॥
प्रस्वापनीप्रयोगें रणामधे वीर रामपक्षाचे।
श्रीकुम्भकर्ण वीरें झोपविले सर्व कर्म अक्षांचें ॥ ४२ ॥
पडलें बन्द करांतुनि गळलीं शस्त्रें समस्त भूमिवरि।
प्रतिबोधिनीप्रयोगें विकार सुग्रीव सर्व नष्ट करी ॥ ४३ ॥
जागृत होतां आलें हनुमन्तादिक समस्त वीरास।
पुनरपि तेज तयांनीं गाजविलें नोपमा असे ज्यास ॥ ४४ ॥
तेणें रावणसैन्या दुरवस्था प्राप्त जाहली सगळें।
इकडे तिकडे धावें जावें कोणीकडे न हेचि कळें ॥ ४५ ॥
वन्दून तातचरणा तेजस्वी इन्द्रजित् असें बोले।
आज्ञा द्या रणि जाया शत्रूचें तोंड करिन मी काळें ॥ ४६ ॥
असतां मी रणि जाणें आपण हें योग्य वाटतें न मला।
येणें जनि ही माझी ताता होईल सर्वदा विफला ॥ ४७ ॥
जें छेद्य तृण नखानें कुऱ्हाड तोडावया तया नलगे।
जातो लढावया मी आपण जाऊं नका बसाचि उगे ॥ ४८ ॥
बोलुनि ऐसें हर्षे त्रिलोककण्टक-गजावरी बसला।
घेउनि शस्त्रसमूहा सचिवासह इन्द्रजित् रणीं घुसला ॥ ४९ ॥
ओढुनि धनुष्य दोरी कानापर्यन्त त्यास शर जोडी।
क्रोधें सोडुनि त्यातें शत्रूचें शीर्षकमल त्या तोडी ॥ ५० ॥
सुग्रीवाच्या सैन्यीं असा कपिध्वज न राहिला कोणी।
विद्ध न त्यानें केला केले विद्धहि गजादिक प्राणी ॥ ५१ ॥
हा इन्द्रजित् असे कां नाहीं हा इन्द्र अग्नि वा गमतो।
अथवा सूर्य असे हा होऊन स्वैर समरिं हा रमतो ॥ ५२ ॥

( इन्द्रजिताचें भामण्डल व सुग्रीवाबरोबर युद्ध. )

इन्द्रजितें निजसैन्य ग्रासियलें बघुनि खगप सुग्रीव।
भामण्डल हे दोघे तुटून करितात त्यावरी घाव ॥ ५३ ॥

१ जी विद्या झोप आणते. २ इन्द्रियांची हालचाल. ३ जी प्राण्यांना जागृत करते. ४ जन्म. ५ इंद्रजितानें. ६ विद्याधरस्वामी.

उभयांच्या सैन्यांतिल बोलाविति वीर एकमेकास ।
शस्त्रान्धकार करिती न जीविताची उरे तिथें आस ॥ ५४ ॥
हय लढतात हयासह कोपानें गज गजासवें लढती ।
रथ लढतात रथासह दाखविती भक्ति मालकावरती ॥ ५५ ॥
बोले अति रागावुनि सुग्रीवा इन्द्रजित् तुला आज ।
मारीन भूमिगोचर रक्षिति तव केवि पाहतो काज ॥ ५६ ॥
मत्पितृशासन लंघुनि कोठें जाशील पाहतो आतां ।
या बाणें तव मस्तक टाकिन तोडून कोण रे त्राता[1] ॥ ५७ ॥
व्यर्थ असे तव बडबड इन्द्रजिता मानशृङ्ग मोडीन ।
मी तीक्ष्णशा शरानें तव हें मुखकमल आज तोडीन ॥ ५८ ॥
सुग्रीववचन ऐकुनि इन्द्रजितें करुनि चापटङ्कार ।
येउनि समीप केला सुग्रीवीं दुर्निवार शरवार ॥ ५९ ॥
आकर्ण चाप ओढुनि सुग्रीवें बाण सोडिले प्रखर ।
निजरक्षमहारक्षक[2] इन्द्रजितीं करुनि मन कठोरतर ॥ ६० ॥
श्रीमेघवाहनानें भामण्डल वीर समर करण्यास ।
बोलाविला विराधित आदरि तो तेवि वज्रनक्रास ॥ ६१ ॥
भूपें विराधितानें वक्षःस्थल विद्ध वज्रनक्राचें ।
फेकून चक्र केलें तोही तेणेंचि विद्ध करि साचें ॥ ६२ ॥
रावणपुत्रें केलें सुग्रीवाला निरस्त्र समरांत ।
त्यानेंहि वज्रदण्डें पुण्यें उभयहि समानवृत्तिरत[3] ॥ ६३ ॥
नागावरून उतरुनि सिंहरथीं बसुनि इन्द्रजित् सोडी ।
सुग्रीवीं मेघास्त्रां[4] पवनास्त्रें तोहि त्यास झणि तोडी ॥ ६४ ॥
श्रीमेघवाहनानें भामण्डलिं अग्निबाण फेकून ।
चाप तयाचा केला करांतला धूमयुक्त संपूर्ण ॥ ६५ ॥
तेव्हां जनकसुतानें फेकियलें वरुणास्त्र लीलेनें ।
आग्नेयास्त्राचा शम झाला सानन्द होति वीरमनें ॥ ६६ ॥
मन्दोदरीसुतानें करून भामण्डलास रथहीन ।
तिमिरास्त्रें तत्सैन्या केलें गाढान्धकार परिपूर्ण ॥ ६७ ॥

---

१ रक्षक. २ या नावाचे बाण. ३ दोघेही समानतेनें एकमेकाबरोबर लढले. ४ जलवृष्टि करणारें अस्त्र.

(इंद्रजित् व मेघवाहनानें भामण्डलें व सुग्रीवाला नागपाशांनीं बांधून टाकिलें.)

केलें दशास्यतनयें जनकसुता अन्धतुल्य मूर्च्छितसें ।
विषफूत्कारा सोडिति केलें दृढ बद्ध तेवि अहिपाशें ॥ ६८ ॥
सर्पें वेष्टित चन्दनवृक्षासम जनकतनय दिसु लागे ।
दृढ-बन्धवेदना जणु भूतासम सतत लागल्या मागें ॥ ६९ ॥
यापरि इन्द्रजितेंही केलें दृढबद्ध नागपाशांनीं ।
सुग्रीवनृपा जैसा जीवा करि बद्ध मोह आशांनीं ॥ ७० ॥

( विभीषण रामचंद्राला सर्व विद्याधर सैन्य स्थिर करण्याची सूचना देतो.)

विद्यास्त्रयुद्ध-निपुणें विभीषणें करयुगास जोडून ।
श्रीपद्म-लक्ष्मणांना म्हटलें ऐका यथार्थ मम वचन ॥ ७१ ॥
इन्द्रजिताच्या बाणें दिशा नि आकाश तेवि पृथ्वी ही ।
झाली नागाकारें व्याप्त नि पसरे समीर विषवाही ॥ ७२ ॥
सुग्रीव नि भामण्डल केले दृढबद्ध नागपाशांनीं ।
पडले भूवरती ते अनुभवती घोर दुर्दशा मानी ॥ ७३ ॥
यांचें सैन्य बघा हें पलायनोद्यत दिसे दिशांत दहा ।
स्थिर करणें नच झालें अपयश येईल आपुले गेहा ॥ ७४ ॥
या कुम्भकर्ण-वीरें जिंकुनि युद्धांत पवनतनयास ।
पकडून स्वकरांनीं केलें दृढबद्ध होति आयास ॥ ७५ ॥
सुग्रीवा भाचेंक्षा जातो आणावयास मी आतां ।
विद्याधरसैन्या या उद्यत व्हा स्थिर करावया नाथा ! ॥ ७६ ॥
ऐसें बोलत असतां निपुण विभीषण सलक्ष्मणा पद्मा ।
श्रीकलशकर्णसंनिध तारासुत जाय गुप्त सच्छद्मा ॥ ७७ ॥
फेडून अधरवस्त्रा गेला तत्काळ पळुनि तेथून ।
रविकिर्ण होय लज्जित करयुग्में सावरी अधोवसन ॥ ७८ ॥
इतुक्यांत पळुनि गेला भुजपाशांतून शीघ्र पवनसुत ।
तारासुतासवें तो शोभे जाऊन दूर हास्ययुत ॥ ७९ ॥
अंगद, अंग नि हनुमान्, चन्द्रोदरसुत विराध वीर रथी ।
हे सर्व लक्ष्मणासह सैन्या समरीं सधैर्य थांबविती ॥ ८० ॥

---

१ मेघवाहनानें. २ नागपाशांनीं. ३ विष वाहून नेणारा. ४ भामंडलाला. ५ चांगल्या उद्देशानें. ६ कुंभकर्ण. ७ कंबरेचें वस्त्र.

( बिभीषणाबरोबर युद्ध न करतां इंद्रजित् व मेघवाहन स्वस्थानीं गेले.)

भीषण बिभीषणानें इन्द्रजितीं मेघवाहनावरती ।
आक्रमण तीव्र केलें घेउनि चापल्ययुक्त सैन्यतति ।। ८१ ।।
चुलता लाढावयाला आला पाहुनि सचिन्त मनिं झाले ।
इन्द्रजित मेघवाहन विचार तन्मानसीं असे आले ।। ८२ ।।
चुलता नि पिता यामधिं न्यायें बघतां न उभयिं भेद वसे ।
यास्तव अभिमुख जाणें केव्हांही स्तुत्य हें मना न दिसे ।। ८३ ।।
सुग्रीव नि भामण्डल केले हे नागपाश-बद्ध अरि ।
मरतील निश्चयानें जाऊं आतां सुखें स्वकीय घरीं ।। ८४ ।।
गेले तेथुनि उभयहि पाहून रथावरून उतरून ।
भामण्डल सुग्रीवासन्निध येतां दिसे दशा गहन ।। ८५ ।।
निष्कम्पदेह[1] उभयां पाहुनि लक्ष्मण वदे तदा रामा ।
या उभयांची गमते समाप्त होईल आयुची सीमा ।। ८६ ।।
विद्याधरपति मोठे असे महाशक्ति ज्यांचिया देहीं ।
मरतील चित्त माझें रावणघातांत होय संदेही ।। ८७ ।।

( रामचन्द्रानें महालोचन देवाचें स्मरण केलें व त्यानें येऊन राम-लक्ष्मणांना सिंहवाहिनी व गरुडवाहिनी विद्या व अनेक दिव्य अस्त्रें, छत्रचामरें, ' विद्युद्वक्त्रा ' गदा व हलादिक रत्नें दिलीं. )

पुण्योदयेंचि रामा स्मृति होतां लक्ष्मणास तो वदला ।
मुन्युपसर्गविनाशीं लब्धवरस्मरण होउ दे विमला ।। ८८ ।।
देव महालोचन जो तन्नामस्मरण जेधवा झालें ।
सुखपर अशा तयाचें विमानकम्पन तयास झणिं कळलें ।। ८९ ।।
अवधिज्ञानें जाणुनि चिन्तावेगाख्य देव पाठविला ।
विद्याद्वयास घेउनि येउनि रामासमीप तो वदला ।। ९० ।।
घे विद्या तूं रामा नाम जिचें सिंहवाहिनी आहे ।
ही गरुडवाहिनी वा घे लक्ष्मण आपुल्या करीं पाहे ।। ९१ ।।
तेज तयांचें पसरे दिक्चक्रीं[2] हेमतुल्य तेवि नभीं ।
विद्याद्वयलाभानें उभयांच्या हृदयिं राहिली नच भी ।। ९२ ।।

१ ज्यांच्या शरीरांतील हालचाल बंद पडली आहे. २ दिशासमूहांत.

वारुणमारुत-अनलाद्यस्त्रें भासुर सुरें तयास दिलीं।[1]
श्रीराम-लक्ष्मणांच्या हृदयीं आनन्द विपुल करि केली[2] ॥ ९३ ॥
छत्रें चन्द्रार्कासम उभयास दिलीं सुरें प्रमोदानें।
मणिजडित शुभ्रचामरयुग्मासह सुप्रसन्न मन जेणें ॥ ९४ ॥
विद्युद्वक्त्रा नामक गदा दिली लक्ष्मणास हल रामा।
दैत्यांना जें भिववी ऐसें मुशलहि तयास सुखसद्मा ॥ ९५ ॥
नानाविध-रत्नांचा वृन्द द्योतें[3] दहा दिशां उजळी।
चिन्तावेग सुरानें दिला असे जो अलभ्य भूमितलीं ॥ ९६ ॥
यापरि करून महिमा आशीर्वादें तयास गौरवुन।
गेला सुर सुरसदना अतिशय हृदयीं प्रसन्न होऊन ॥ ९७ ॥
निर्मल-धर्माचरणें उत्तम फल लाभतें असें जीवा।
धर्म अहिंसारूपी सुजनानें नित कृतींत आणावा ॥ ९८ ॥
ज्यानीं हा आचरिला उपसर्गाहून राहती दूर।
स्वपराचें हित करिती लाभे त्यांना अनन्त सुखपूर ॥ ९९ ॥
सद्धर्में जीवाला राज्यादिक सम्पदाच मिळतात।
ऐसें नच समजावें मोक्षाचें सुखहि त्यास हो प्राप्त ॥ १०० ॥
इच्छिति सुख जे मानव त्यानीं तद्धेतु[4] पुण्य मिळवावें।
होउनि जिनदास सदा पूजावें श्रीजिनेन्द्रपद भावें ॥ १०१ ॥
रविसम कान्ति शरीरीं मिळतें जिनपूजनेंचि समजून।
तद्गुणतत्पर व्हावें मुक्तिरमा त्या मिळेल सुखसदन ॥ १०२ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे विद्यालाभो नाम षष्टितमं पर्व ॥ ६० ॥

---

१ वारुणास्त्र, वायवस्त्र, अग्न्यस्त्र. २ क्रीडा. ३ प्रकाशानें. ४ सुखाचें कारण.

# एकसष्ठावें पर्व.

[ राम-लक्ष्मण सिंह व गरुड यावर आरूढ होऊन रणभूमीवर आले. ]

चिन्तावेग-सुरानें दिलें असे दिव्य कवच घालून ।
श्रीरामचन्द्र-लक्ष्मण सैन्यसमुद्रांत शोभती छान ॥ १ ॥
ते सिंह-गरुड-वाहनिं होउनि आरूढ शत्रुपक्षांत ।
शिरले निर्भय तत्क्षय करावया होउनि स्वमनिं मुदित ॥ २ ॥
सौमित्रि[1] मित्रवत्सल करी त्वरें तो प्रयाण समरांत ।
दिव्यच्छत्र जयाच्या शिरिं शोभे रविसमान कान्तियुत ॥ ३ ॥
स्वर्गीय देव जणु हा श्रीशैलप्रमुख-वीरवृत[2] शोभे ।
लक्ष्मण आकाशीं जणु तेजस्वीकिरण-सूर्यबिम्ब उभें ॥ ४ ॥
गरुडध्वज हा लक्ष्मण येतां रणिं तामसास्त्रविलयानें[3] ।
गरुडाचें तेज रणीं विषधर[4] तत्काल सकल विलया ने ॥ ५ ॥
पंखांतुनि उज्ज्वली पसरे जैं कान्ति सर्व गरुडाची ।
जणु हेमरसें भूतल निर्मितसे पन्नगास बहु डाची ॥ ६ ॥

[ सुग्रीव व भामण्डल नागपाशमुक्त झाले. ]

सुग्रीव नि भामण्डल पन्नगबन्धनविमुक्त होऊन ।
झाले सुखी नि गेले झोपी हो सर्वदुःखनिर्हरण ॥ ७ ॥
निद्रा क्षय जैं झाला नीरोगी सुप्त नर जसे उठले ।
अधिकचि शोभा आली पाहुनि विस्मित समस्तजन झाले ॥ ८ ॥
श्रीपद्मलक्ष्मणांचें वैभव वाहन नि अस्त्रवृन्दास ।
पाहून दिव्यरूपा विचारिती खग वनून तद्दास ॥ ९ ॥
वनवासवृत्त पद्में कथिलें उपसर्ग देशकुलभूषीं[5] ।
केवलबोधप्राप्तिहि सुरासुरागमन तेवि आकाशीं ॥ १० ॥

---

१ लक्ष्मण. २ मारुति मुख्य ज्यांत आहे अशा वीरांनीं वेढलेला. ३ अंधार उत्पन्न करणारें अस्त्र– नाश पावल्यानें. ४ सर्प. ५ देशभूषण व कुलभूषण या दोन मुनींना पूर्वभववैरी देवानें उपसर्ग केला होता.

गरुडेन्द्रतोष होतां झाला आम्हांस उचितवर-लाभ ।
तच्चिन्तनें मिळाल्या नाना विद्या नि जाहलेंचि शुभ ॥ ११ ॥
देशकुलभूषणांची राममुखानें श्रवून सकल कथा ।
हर्षित झाला खगगण वर्णी पुण्यास तेवि सुकृतिपथा ॥ १२ ॥

शालिनी—

जो भक्तीनें साधुसेवा करील । लाभे लोकीं कीर्ति त्याला अमोल ।
भेटे त्याला बुद्धिची प्रौढताही । होतो दानी भूषवी तो मही ही ॥ १३ ॥

वसन्ततिलक—

देतात साधुजन निर्मल धर्मबुद्धि । जी आत्मशुद्धि करिते नि गुणप्रवृद्धि ।
माता-पिता नि सुगुणी निजबन्धु मित्र । देतात ती नच नरास गुणज्ञ पुत्र ॥१४

यापरि साधुगुणांची करुनि स्तुति जिनपथांत रत खग ते ।
बलनारायण-वैभव, बघून अवलम्बिती तयां ज्ञाते ॥ १५ ॥
भव्याब्जा[१] जी खुलवी रविसम ऐशी पवित्र साधुकथा ।
ऐकुनि हर्षित झाले खग शंसिति जिनमतोक्तमोक्षपथा ॥ १६ ॥
देवें केला आदर ज्यांचा बलहरि जिनास पूजिति ते ।
विद्याधर-पुङ्गवही गाती त्यांचें चरित्र सुगुणशतें ॥ १७ ॥

अनुष्टुप्—

रचिले पूर्वजन्मांत जयांनीं पुण्य धन्य ते ।
महोत्सवांच्या संयोगें तयांना सौख्य लाभतें ॥ १८ ॥
सर्वार्थी[२] जो सदा जाणी पाही ऐशा जिनेश्वरा ।
नमिती भक्तिभारानें जोडून अपुल्या करा ॥ १९ ॥
जिनदास असे भव्य सेव्य होती सुरासही ।
सर्व-कर्मक्षयें त्यांना सिद्धांची लाभते मही ॥ २० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सुग्रीवभामण्डल-समाश्वासनं नाम एकषष्टितमं पर्व ॥ ६१ ॥

---

१ भव्यजीवरूपी कमळांना. २ जीव अजीव— चेतन व अचेतन सर्व पदार्थांना जाणणारा.

## बासष्ट व त्रेसष्टाव्या पर्वांचा सारांश.

दुसरे दिवशीं वानरसेना सज्ज होऊन रणांत आली. वाद्यांचा, घोड्यांचा व योद्ध्यांचा ध्वनि ऐकून रावणही आपल्या सैन्यासह रणांगणांत आला.

युद्धाला सुरुवात झाली. वानरसेनेचे पुढारी नल व नील यांनीं जोरानें शत्रु-सेनेवर हल्ला केला व त्यांनीं राक्षससेनेला पिटाळलें. तेव्हां मारीच, चन्द्र, सारण, कृतांत आदिक राक्षसराजांनीं आपल्या सैन्याला धीर दिला व पळणाऱ्यांना थांबविलें. त्यांच्या अंगांत वीरश्री उत्पन्न होईल असें उत्साही भाषण करून वानरसेनेवर पाठविलें. अतिशय निकरानें राक्षससैन्य लढू लागलें तेव्हां प्रचंड वारा सुटला म्हणजे पाचोळा जसा दूर उडून जातो तसें वानरसैन्य पळू लागलें.

हें पाहून बिभीषण स्वतः रावणाबरोबर लढण्यास निघाला. जेव्हां तो जवळ आला तेव्हां रावण त्याला म्हणाला— तूं लहान आहेस तुझ्याबरोबर लढणें मला योग्य वाटत नाहीं. तूं शत्रूचा आश्रय घेतला आहेस. आपल्या वंशाचा अभिमान तुला नाहीं. तुला धिक्कार असो.

तेव्हां बिभीषण म्हणाला— बन्धो, मी तुला तुझ्या कल्याणाची गोष्ट सांगतो— तिची अवहेलना करूं नकोस. रामावर स्नेह कर. त्याची पत्नी सीता त्याला परत दे व असें करण्यानें आपल्या वंशाचा कलंक नाहींसा होईल. माझ्या भाषणाचा अवमान करशील तर तुझा नाश होईल. हा सीतेविषयींचा मोह तुला मरणाकडे ओढून नेत आहे हें ध्यानांत घे.

बिभीषणाच्या भाषणानें रावण रागावला त्यानें एक बाण सोडून बिभीषणाचें धनुष्य तोडलें. बिभीषणानेंही दुसरें धनुष्य घेऊन बाण जोडून तो सोडला व रावणाचें धनुष्य तोडून टाकलें. या दोघांचें मोठें युद्ध झालें व तें पाहून आकाशांत देवांना मोठा आनंद वाटला.

त्याचवेळीं पितृभक्त इन्द्रजितही लढावयाला आला व समुद्राला जसा पर्वत अडवितो तसें लक्ष्मणानें त्याला अडविलें. त्याचवेळीं मृगेन्द्रजघन व नील, शंभू व नल, दुर्मर्ष व घटोदर, विघ्न व विराधित, मय व अंगद, केतुराजा व भामण्डल, सुग्रीव आणि शम यांचे एकमेकांशीं घोरयुद्ध झालें. दोन्ही बाजूचे वीर, हत्ती, घोडे आदिक मरण पावले व रणभूमीनें यमराजधानीचें स्वरूप धारण केलें.

जिकडे तिकडे रणभूमि रक्तांनीं लाल झाल्यामुळें पळसाच्या फुलांनीं आच्छादल्यासारखी वाटत होती.

लक्ष्मणानें इन्द्रजिताला अडवून त्याच्याबरोबर लढण्यास सुरुवात केली. दोघांचीं मनें कोपानें निर्दय झालेलीं होतीं. अतिशय निकरानें ते दोघे लढू लागले. तीक्ष्ण बाणांनीं त्यांनीं एकमेकांस आच्छादिलें. नंतर त्यांचें अस्त्रयुद्ध झालें. इन्द्रजितानें लक्ष्मणावर तामसास्त्र सोडलें. तेव्हां चोहोंकडे काळोख निर्माण झाला. पण त्याचा प्रतीकार करणारें सूर्यास्त्र लक्ष्मणानें सोडल्यामुळें अंधार नाहींसा होऊन चोहोंकडे लख्ख प्रकाश पडला. यानंतर इंद्रजितानें नागास्त्र सोडलें व अनेक नाग उत्पन्न होऊन लक्ष्मणाला व त्याच्या रथाला त्यांनीं वेढलें. पण तत्काल लक्ष्मणानें गरुडास्त्र सोडून सर्व नागांचा ध्वंस करून टाकिला. यानंतर लक्ष्मणानें नागास्त्र सोडून इंद्रजिताला नागपाशांनीं बांधून टाकिलें. नागपाशांनीं बद्ध झाल्यामुळें इंद्रजित रथावरून खालीं कोसळला व मूर्च्छित झाला. विराधितानें लक्ष्मणाच्या आज्ञेनें इंद्रजिताला उचलून आपल्या यानांत ठेविलें.

रामचन्द्र व कुम्भकर्णाचेंही भयंकर युद्ध झालें व रामचन्द्रांनीं नागपाशानीं त्याला बांधलें तेव्हां भामण्डलानें रामाच्या आज्ञेनें कुम्भकर्णाला उचलून आपल्या रथांत ठेविलें.

रावण व बिभीषणाचें युद्ध चाललें होतें. रावणानें कोपून त्याच्यावर शूलायुध फेकलें. त्याचवेळीं लक्ष्मण तेथें आला व त्यानें आपल्या तीक्ष्ण बाणांनीं शूलायुध जाळून टाकिलें.

रावणानें लक्ष्मणाला कोपानें माझें शूलायुध जाळण्याचा तुला काय अधिकार आहे ? कोणी तुला तो अधिकार दिला ? असें विचारून त्याच्यावर शक्त्यस्त्र फेकिलें.

त्या शक्त्यस्त्रांतून अग्नीच्या ठिणग्या सारख्या बाहेर पडत होत्या. तें अस्त्र वीज जशी पर्वततटावर पडते तसें लक्ष्मणाच्या वक्षःस्थलावर पडलें. वज्रानें हत झालेला पर्वत जसा ढासळतो तसा लक्ष्मण जमिनीवर पडून मूर्च्छित व निश्चेष्ट झाला.

हें दृश्य पाहिल्याबरोबर रामचन्द्र रागावले व त्यांनीं रावणावर धावा केला. आपल्या तीक्ष्ण बाणांनीं त्यास रथहीन केलें. तो दुसऱ्या रथावर चढून त्याच्याबरोबर लढू लागला. रामचन्द्रांनीं रावणाला सहा वेळा रथहीन केलें. या घोरयुद्धांत रावण अगदीं थकून गेला. रावणाचें चिलखत रामचन्द्रांनीं सहा वेळा तीक्ष्ण बाणांनीं तोडलें. तथापि रामचन्द्र त्याला जिंकू शकले नाहींत. रामचंद्रांना आश्चर्य वाटलें व ते त्याला म्हणाले— खगेशा रावणा, माझ्या तीक्ष्ण बाणांनीं पर्वताचेंही चूर्ण होतें पण तुझा नाश त्यांनीं झाला नाहीं यास्तव तुझें आयुष्य बळकट आहे. अद्यापि तुझें पूर्वजन्माचें पुण्य दृढ आहे. असो.

तुझ्या शक्त्यस्त्रानें ताडिला गेलेला माझा भाऊ मेला असेल. मला त्याचें मुख पाहण्यास जावें अशी चिंता उत्पन्न झाली आहे..

रामचन्द्राचा अभिप्राय रावणानें मान्य केला व एका बलवान् पराक्रमी वीराला मी ठार मारिलें अशा विचारांनीं हर्षित होऊन तो लंकेला निघून गेला.

पण आपला प्रियबंधु कुम्भकर्ण व आपले दोन पुत्र इंद्रजित व मेघनाद हे शत्रूंनीं नागपाशांनीं बांधून टाकिले आहेत या विचारानें त्याचें मन खिन्न झालें.

जगांत जीव नानाप्रकारच्या परिणामांनीं पुण्य व पाप बांधून घेतात त्यामुळें त्यांचें जीवन सुखदुःखमय झालेलें असतें. नानाप्रकारचें कर्म त्यांनीं बांधलेलें असतें. त्यामुळें त्यांना नानाप्रकारचें फल मिळतें. अशुभ कर्मांच्या उदयानें कोणी जीव शत्रूकडून मारला जातो तर कोणी जीव शुभोदयानें शत्रूला मारून ऐश्वर्याच्या शिखरावर चढतो. कोणाचें विशाल सामर्थ्यही नष्ट होऊन तो बन्धनांत पडतो असें जाणून जे जिनेन्द्रभक्ति करतात जिनाचे दास होतात ते सुखी होतात.

यानंतर रामचंद्र शोकयुक्त होऊन लक्ष्मणाकडे आले. लक्ष्मण निश्चेष्ट पडलेला पाहून त्यांना दुःखातिशयानें मूर्च्छा आली. सावध झाल्यावर ते याप्रमाणें विलाप करूं लागले.

वत्सा, माझ्यावर तुझें अतिशय प्रेम होतें. तुझा वियोग मला बिलकुल सहन होणार नाहीं. माझ्या कार्यासाठीं तुला अतिशय कष्ट सहन करावे लागले आहेत. तुझे हात गुडघ्यापर्यंत लांब होते व तुझ्या शरीरांत अप्रमाण सामर्थ्य होतें पण आतां तें शरीर निश्चेष्ट पडलें आहे. रामा, वनवासांत लक्ष्मणाचा चांगला सांभाळ कर असें वडीलवृद्धांनीं सांगितलें होतें आता मी त्यांना कोणत्या तोंडानें सांगू ?

अयोध्येला गेल्यावर स्नेही-सोबती लक्ष्मण कोठें आहे असें विचारतील तर त्यांना मी काय बरें उत्तर देऊं? माझें मन अगदीं कठिण आहे सीतेसाठीं श्रेष्ठरत्नाप्रमाणें असलेल्या तुला गमावून बसलों आहे. पृथ्वींतील पुष्कळ अमूल्य पदार्थ हरवलेले पुनः मिळतील पण माता, पिता आणि भाऊ हे पुनः मिळणें शक्य नाहीं. हे सुग्रीवा, तुझ्या मैत्रीमुळें मला फार आनंद झाला. हे भामण्डला, तुझेंही मला मोठें साहाय्य झालें आहे. पण आतां मी जानकीप्रमाणें जगण्याची आशा सोडून दिली आहे. मी आतां भावाबरोबर चितेंत प्रवेश करून मरणार आहे. हे बिभीषणा, मला बन्धूचा व सीतेचा शोक तितका दुःखदायक वाटत नाहीं पण मी तुझ्यावर कांहींच उपकार करू शकलों नाहीं याचें मला अत्यंत दुःख झालें आहे.

हे भामण्डला व हे सुग्रीवा आतां तुम्ही चिता रचा मी माझ्या भावासह परलोकीं जाणार आहे. असें म्हणून रामचंद्र लक्ष्मणाच्या शरीराला स्पर्श करण्यासाठीं उत्सुक झाले. तें पाहून जाम्बूनदानें दिव्यास्त्रानें मूर्च्छित झालेल्या व्यक्तीला स्पर्श करू नये असें वृद्धांचें वचन आहे यास्तव आपण लक्ष्मणाला स्पर्श करू नका असें रामचन्द्रांना म्हटलें.

यावेळीं आपण धैर्य धरा, शोक करूं नका. अवश्य उपाय होईल कारण लक्ष्मण हा नारायण आहे. हा अवश्य जगेल हें ध्यानांत घ्या. या दिव्यशक्तीच्या आघातावर अनेक प्रकारचीं औषधें उपयोगी होणार नाहींत. सूर्योदयानंतर लक्ष्मण जगणें कठिण दिसतें असा विचार करून लक्ष्मणाच्या आजूबाजूचा प्रदेश विद्याधरांनीं अतिशय स्वच्छ केला. त्याच्या सभोंवती सात तटांची व वेशींची रचना केली व प्रत्येक वेशीवर क्रमानें द्वाररक्षक याप्रमाणें योजले– नील, नल, बिभीषण, कुमुद, सुषेण, सुग्रीव, व भामण्डल. पूर्वद्वारावर शरभ, पश्चिमद्वारावर जाम्बव, उत्तरद्वारावर चन्द्ररश्मि वालिपुत्र, दक्षिणद्वारावर अनेक कपिवीर योजलेले होते. हे सर्व वीर लक्ष्मणाच्या जीविताचें रक्षण करण्यासाठीं सज्ज होते. लक्ष्मणाच्या ठिकाणीं शुभकर्माचा उदय होता म्हणून तेथें यमाला अशा कठिण अवस्थेंतही प्रवेश करता आला नाहीं. घोडे, हत्ती, माणसें व देव हे जीवित रक्षणास समर्थ होत नाहींत पण शुभकर्म जिनाचे दास असणाऱ्या भव्यांचें रक्षण करितें असें जिनेश्वराचें वचन आहे.

# बासष्टावें पर्व.

दुसरे दिवशीं वानरसैन्यानें व्याप्त सर्व नभ झालें ।
शस्त्रादिसज्ज होउनि नगराङ्गणि तें अपार अवतरलें ॥ १ ॥
दुन्दुभिनादध्वनिमद गजाश्वरव हा श्रवून अरिसेना ।
आली लढावयाला निश्चय हो रावणाचिया स्वमनां ॥ २ ॥
आला लढावयाला सेनासागर अपार घेऊन ।
समरीं महाप्रतापी ज्याच्या हृदयीं अनून अभिमान ॥ ३ ॥
नानायानीं बैसुनि खड्गगदाधनुशरादि शस्त्रगण ।
निजबन्धु पुत्रभूपालद ये रावण करांत घेऊन ॥ ४ ॥
अश्व लढे अश्वाला लढती गज अरिगजासवें कोपें ।
रथिक रथीवरि धावे कातरजन बघुनि थरथरा कापे ॥ ५ ॥
सिंहासद सिंहांचें होतांना युद्ध गर्जना करिती ।
पादात पदातीना लढुनि पराक्रम अपूर्व गाजविती ॥ ६ ॥
यापरि लढतां राक्षस-सैन्यें कपिसैन्य हटविलें मागें ।
नलनीलादि नृपांनीं रात्रिचरसैन्य पळविलें रागें ॥ ७ ॥
मारीच चन्द्र सारण कृतान्त जीमूतनाद अर्क शुक ।
सङ्क्रोधन मृत्युञ्जय राक्षससैन्येश विक्रमी देख ॥ ८ ॥
यांनीं स्वसैन्य आहे पळत असें पाहिलें यदा रोपें ।
धावा कपिसैन्यावरि केला धुर समर बघति बहुतोपें ॥ ९ ॥
तेव्हां बलवान रावण होउनि अति कुपित शत्रुवरि धावे ।
भांबावुनि कपिसेना पळ काढे स्थिर न राहि भयभावें ॥ १० ॥
पवनप्रेरित उडते शुष्क जशी पर्णराशि चोहिकडे ।
रावणवातप्रेरित कपिसेना पळतसे सुचे तिकडे ॥ ११ ॥

( रावण-बिभीषण युद्ध. )

पाहुनि पळती सेना शीघ्र बिभीषण लढावयास निघे ।
करुनि सधैर्या तिजला तिच्यासवें तो रणांत वीर रिघे ॥ १२ ॥

पाहुनि रावण त्याला निरादरें कोपयुक्त होऊन ।
वदला लहान असशी तुजला वधणें कदापि योग्यचि न ॥ १३ ॥
तव मुख पहावयाला इच्छिल मम मन न केधवाहि खला ।
येथून चालता हो शतदा धिक्कार रे असो तुजला ॥ १४ ॥
वदला तदा विभीषण पहला आहेस आज नजरेस ।
जाईन न मी येथुनि हो तूं उद्युक्त शीघ्र लढण्यास ॥ १५ ॥
रावण वदे तयाला मूढा सोडुनि खगान्वया इतरां ।
अवलम्बिशि निर्लज्जा वसे अभिप्राय मनिं तुझ्या दुसरा ॥ १६ ॥
पुनरपि वदे विभीषण बन्धो ! तव ऐक कथिन कल्याण ।
स्नेह करी रामासह दे सीता त्यास त्यजुनि अभिमान ॥ १७ ॥
रामा प्रसन्न करि तूं निजवंशाचा कलङ्क करि दूर ।
वाहो सुकार्यकरणें हर्षजलाचा प्रसन्नसा पूर ॥ १८ ॥
अवमानिशि मद्वचना तरि तुजला मरण वाटतें इष्ट ।
मोह करी न कुणाचें भलें वलिष्ठांहि देतसे कष्ट ॥ १९ ॥
भाषण विभीषणाचें ऐकुनि ये रावणा महाकोप ।
काढून तीक्ष्ण बाणा धावे उत्फण[1] जसा महासर्प ॥ २० ॥
रथ-अश्वगजावरती होउनि आरूढ अन्यवीर-नृप ।
स्वप्रभु हर्षित करण्या लढले अरिवरि करून पृथुकोप ॥ २१ ॥
अभिमुख होउनि लढला दशाननाच्या रणीं विभीषणही ।
अर्धेन्दुवक्त्र[2]बाणें तोडी ध्वज ज्यास भी मनीं नाहीं ॥ २२ ॥
जोडून धनुष्यावरि सोडी रावण सुतीक्ष्ण बाणास ।
करगत विभीषणाचे धनुष्य तोडी न ज्यास आयास ॥ २३ ॥
कोपें विभीषणेंही रावणकरगतधनुष्य तोडियलें ।
अन्योन्य खूप लढले यद्युद्धें सुरगणास तोषविलें ॥ २४ ॥
पितृभक्त इन्द्रजित हा विभीषणासह लढावया आला ।
शैल समुद्रा जैसा लक्ष्मीधर त्यास रोधिता झाला ॥ २५ ॥

( वानरराजे व राक्षसराजे यांचें अन्योन्याबरोबर युद्ध. )

१ ज्यानें फणा वर केला आहे असा. २ अर्धचन्द्रमुख नामक बाणानें.

सिंहकटीवरि नीलें धावा केला नि युद्धशंभुघरी ।
केला नलभूपानें लढती अन्योन्य जेवि मत्त करी ॥ २६ ॥
होऊन कुपित दुर्मति करी स्वयम्भू नृपासवें समर ।
दुर्मर्ष वीर लढला घटोदरें चकित होति सर्व सुर ॥ २७ ॥
दुष्ट नृपाचें झालें शक्राशनिसह नि चन्द्रनख लढला ।
कालिनृपासह रोषें भीषण दिसली जनास युद्धकला ॥ २८ ॥
स्कन्ध नि भिन्नाञ्जन हे, विघ्न विराधित परस्परें लढले ।
निजचातुर्यें ज्यांनीं नभांत सुर परममुदितसें केले ॥ २९ ॥
मयदैत्यासह अंगद लढला कुम्भासवें समीरसुत ।
सुग्रीवासह शक्रनृप कामासह भूप दढरथ ख्यात ॥ ३० ॥
केतुनृपासह लढला भामण्डल जनकपुत्र युद्ध असें ।
झालें जिकडे तिकडे यमनगरासम भयाण दृश्य दिसे ॥ ३१ ॥
भट अन्योन्यां वदती प्रहार करि असि करांत घेऊन ।
करि सहन भिऊ नको या पळू नको वीरधर्म सोडून ॥ ३२ ॥
आहेस शूर किंवा अशूर तें याच समयिं समजेल ।
लाडू खाण्याची ही वेळ नसे जाण ही असे शूळ ॥ ३३ ॥
ऐसें जणु वाद्यांचा ध्वनि मोठा दशदिशांत पसरून ।
सांगे समस्त वीरां लोकांचे कान बधिरसे करून ॥ ३४ ॥
असि, चक्र, गदा, भाले, बाणांची वृष्टि सतत होऊन ।
रणभूमि राक्षसांच्या जणु दंष्ट्रांनीं दिसे महागहन ॥ ३५ ॥
जिकडे तिकडे धरणी जणु अंथरली पलाशपुष्पांनीं ।
वीरांच्या रक्तांनीं झाली सर्वत्र लाल भयद मनीं ॥ ३६ ॥
बन्द जयाचे तुटले चिलखत कुणि वीर आपुलें बांधी ।
जैसें छिन्नस्नेहा प्राणिगणीं साधु आपुलें सांधी ॥ ३७ ॥
कोणी भट दन्ताग्रें धरून असि परिकरास दृढ बांधी ।
त्येपें पुनरपि विक्रम रणाङ्गणीं श्रम करून तो साधी ॥ ३८ ॥
गजदन्ताघातानें वक्षःस्थल जाहलें असे जखमी ।
तत्कर्णचामरांनीं कोणी भट वारिलां तदा नामी ॥ ३९ ॥

---

१ सिंहजघन नामक राजा. २ या नावाचा राजा. ३ मारुति. ४ कासोटा. ५ वारा घातला गेला.

हातांत शस्त्र ज्यांच्या दांतांनीं ओठ दंशिला ज्यांनीं ।
भूवरि कोणी पडले भट जणु विश्रान्ति घेति ते मरणीं ॥ ४० ॥
शस्त्रा त्यागुनि कोणी भट रागद्वेषरहित होऊन ।
जिननाम मुखें घेउनि सुशान्त हृदयेंचि साधिती मरण ॥ ४१ ॥
कोणी वीर गजाच्या दंतां स्वकरें धरून लोंबकळे ।
आन्दोला[1]भ्यासश्रमिं तत्पर झालाचि काय नेत्र कळे ॥ ४२ ॥
शस्त्रें ज्यांच्या हातीं अशीं धडें नाचतीं रणांत कितीं ।
रक्तच्छटा जयांतुनि उसळति वीरहि बघून ज्या भीति ॥ ४३ ॥

( लक्ष्मणानें इंद्रजिताला नागपाशांनीं दृढ केलें. )

इन्द्रजित तीक्ष्णबाणें आच्छादी लक्ष्मणास तोहि तया ।
लढती अतिरोषानें उभय जयांच्या न येइ लवहि दया ॥ ४४ ॥
इन्द्रजितानें तामस[2] सोडियलें अस्त्र लक्ष्मणावरती ।
सूर्यास्त्रिं रामानुज नाशी झणि सकल अन्धकारतति ॥ ४५ ॥
पुनरपि इन्द्रजितानें नागास्त्रें सरथ-लक्ष्मणा क्रोधें ।
वेढियलें गरुडास्त्रें सौमित्रीनें विनाशिलें रोधें ॥ ४६ ॥
सचिवगणावृत ऐशा इन्द्रजिता विरथ लक्ष्मणा केलें ।
नागास्त्रानें त्याच्या समस्त देहास सुदृढ वेढियलें ॥ ४७ ॥
तेव्हां अतिशय पीडित होउनि तो भूतलावरी पडला ।
भामण्डलाप्रमाणें पूर्वी निश्चेष्ट तेधवा झाला ॥ ४८ ॥

( रामचंद्रांनीं कुंभकर्णास नागपाशांनीं बांधलें. )

श्रीरामानें देखिल सोडुनि नागास्त्र कुम्भकर्णास ।
बान्धियलें दोर्वेलिनें श्रीकण्ठा जेवि नमि-सुपुत्रास ॥ ४९ ॥
निघती चापा[3]पासुनि शर आर्धी अग्निमुख शरीरास ।
स्पर्शुनि नागाकृति ते धरिती आश्चर्य होय हृदयास ॥ ५० ॥
हे अमरबाण होउनि दण्डाकृति पाशरूप होतात ।
यापरि इच्छितरूपा धरुनि अरा[4]तीस दुःख देतात ॥ ५१ ॥
संसारी जीवाला दुःख जसें कर्मपाश देतात ।
हे नागपाश देती कलशश्र[5]वणास दुःख तैं अमित ॥ ५२ ॥

---

१ झोका घेण्याच्या अभ्यासाचा श्रमांत. २ अंधारास उत्पन्न करणारें अस्त्र. ३ धनुष्यापासून. ४ शत्रूला. ५ कुंभकर्णास.

कलशश्रवणा स्थापी भामण्डल निजरथांत उचलून ।
रामाज्ञेनें झडकरि देह जयाचा बने अतिम्लान ॥ ५३ ॥
मन्दोदरीसुताला बांधि विराधित नि आपुल्या यानीं ।
स्थापी सौमित्रीची आज्ञा जो नम्रमस्तकें मानी ॥ ५४ ॥

( रावणानें लक्ष्मणावर शक्त्यस्त्र फेकलें त्यामुळें तो जमिनीवर पडून मूर्च्छित झाला. )

इकडे रावण कोपुनि शूलायुध जें विभीषणीं फेकी ।
लक्ष्मण दारुणबाणें मध्यें तें करुनि दग्धसें टाकी ॥ ५५ ॥
सौमित्रीनें केलें शूलायुध भस्म बघुनि कोप मनीं ।
येई दशाननाच्या आणी शक्त्यायुधा तदा स्मरणीं ॥ ५६ ॥
इन्दीवरवर्णाच्या[1] भासुरपुरुषोत्तमास[2] तो वदला ।
मम शूल जाळण्याचा कोणी अधिकार वा तुला दिधला ॥ ५७ ॥
हे लक्ष्मण मरण्याची झाली इच्छा तुझ्या मनीं काय ? ।
शक्तिप्रहार सोशी करीन मी सहन हा न रे अनय[3] ॥ ५८ ॥
मानी लक्ष्मण धावे दशाननावरि धरून कोपास ।
चिरकाल लढुनि तेणें केलें अतिखिन्न जेधवा त्यास ॥ ५९ ॥
अग्निस्फुलिंग निघती सदा जिच्यांतून शक्ति दिव्या जी ।
सौमित्रीवरि फेकी कोपाची जणु दिसे जना राजि[4] ॥ ६० ॥
शैलतटावरि पडतां वीज जशी कडकडून त्या फोडी ।
दृढ-लक्ष्मण-वक्षःस्थलिं पडून ती दिव्यशक्ति त्या मोडी ॥ ६१ ॥
ती दिव्य भासुराङ्गा लक्ष्मण वक्षःस्थलावरी शोभे ।
प्रेमळ जणु आलिङ्गी स्वपतिस दृढ युवति जेवि रतिलोभें[5] ॥ ६२ ॥
वज्राहतशैलासम लक्ष्मण गाढप्रहारदुःखानें ।
कोसळला भूवरती तत्पातध्वनि न सोसवे कानें ॥ ६३ ॥

( रामाचें रावणाबरोबर घोर युद्ध. )

पडला लक्ष्मण पाहुनि झालेलें दुःख दूर सारून ।
दशमुखनाश कराया गेला अभिराम[6] राम धांवून ॥ ६४ ॥

---

१ नीलकमलाप्रमाणें ज्यांची शरीरकांति आहे. २ लक्ष्मणाला. ३ अन्याय. ४ समूह पंक्ति. ५ संभोगसुखाच्या लोभानें, इच्छेनें. ६ सुंदर.

ज्या सिंह जोडलेले अशा रथीं दशमुखास पाहून ।
रामें शरवृष्टीनें केलें तत्काल त्यास रथहीन ॥ ६५ ॥
दुसऱ्या रथांत पुनरपि वसला रावण सुचाप घेऊन ।
रामें तयेंहि विरहित केला पुनरपि तथैव रथहीन ॥ ६६ ॥
झाला जर्जर रावण रामाच्या सततवाणवृष्टीनें ।
घेण्या अक्षम झाला धनुष्य जोडावया नि तें वाणें ॥ ६७ ॥
तीव्र अशा बाणांनीं पुनरपि धरणीवरी जरी पडला ।
खिन्न असा तो रावण पुनरपि दिसला रथांत बसलेला ॥ ६८ ॥
चिलखत धनुष्य तोडुनि रामानें रावणा सहा वेळं ।
जरि रथ-विहीन केलें तथापि जिंकू शके न तो त्याला ॥ ६९ ॥
विस्मय वाटुनि वदले श्रीराघव रावणास तूं असशी ।
दीर्घायुषी खरोखर कारण आलें न मरण रे तुजशी ॥ ७० ॥
मी तीक्ष्ण सोडिलें जे शर त्यांनीं होति शैलही ध्वस्त ।
परि जीवित तव राहे पूर्वभवाचेंचि हेतु त्या सुकृत ॥ ७१ ॥
राहो युद्धखगेशा आतां तव शक्तिहत मम भ्राता ।
मेला असेल तन्मुख पाहावें उद्भवे मनीं चिन्ता ॥ ७२ ॥
रामाभिप्रायातें ऐकुनि तन्मान्य करुनि वचनास ।
वासवसमविभवाचा[1] दशमुख तेथून जाय लंकेस ॥ ७३ ॥
बलवन्त विक्रमी मी ऐशा शत्रूस मारिलें ठार ।
रावण अशा विचारें आनन्दित होय मानसीं प्रचुर ॥ ७४ ॥
परि अपुला प्रियभाऊ कलशश्रवणाख्य आणि सुत दोन ।
हे नागपाशनिगडित[2] जाणुनि तच्चित्त होय अतिखिन्न ॥ ७५ ॥

मालिनीवृत्त.

चरित जगिं जनांचें नाढळे एकरूप ।
सुख-असुखमयी तें हेतु त्या पुण्य-पाप ॥
प्रतिभविं परिणामें बांधिती कर्म नाना ।
फल बहुविध लाभे हें मनीं शीघ्र आणा ॥ ७६ ॥

१ इन्द्रासारखें वैभव ज्याचें आहे असा. २ नागपाशानें जखडलेले.

शार्दूलविक्रीडितवृत्त.

कर्माच्या उदयें विनाश फल हें कोणा मिळे या जगीं ।
कोणी मारुनि शत्रुवृन्द चढतो कीं वैभवाच्या नगीं ॥
कोणाची पृथुशक्ति जाय विलया तो बन्धनीं सांपडे ।
हें जाणून जिनेन्द्रदास वनती ते जाति सौख्याकडे ॥ ७७ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे शक्तिसम्पाताभिधानं नाम द्वाषष्टितमं पर्व ॥ ६२ ॥

# त्रेसष्टावें पर्व.

[ रामचन्द्रांचा लक्ष्मणाविषयीं विलाप. ]

नंतर विह्वल शोकें पीडित राम स्वबान्धवा पाही ।
निश्चेष्टता तयाची त्याच्या हृदयास तीव्रतर दाही ॥ १ ॥
शक्त्यालिङ्गितवक्षःस्थल[1] भूतलमण्डना[2] हरीस बघे ।
दुःखोर्मि[3] उसळतां बहु मूर्च्छा त्याच्या हृदन्तरांत[4] रिघे ॥ २ ॥
सावध होउनि वदला वत्सा ! सागर सुदैवयोगानें ।
लङ्घुनि दशेस दारुण झालास प्राप्त हाय अशुभानें ॥ ३ ॥
प्रीति तुझी माझ्यावरि वत्सा होती जिला नसे माप ।
माझ्या कार्यासाठीं असह्यसा सोशिलास हा ! ताप ॥ ४ ॥
कां मौन धरिशि बाला वदनांतुनि तव निघोत मधु बोल ।
सहन न होई मजला वियोग वत्सा ! तुझा जसा शूल ॥ ५ ॥
आजानुदीर्घ[5] भुज तव होतें बल अप्रमाण जें त्यांत ।
आतां निष्क्रिय झालें पाहुनि मम दुःख होय हृदयांत ॥ ६ ॥
रामा ! वनवासामधिं सांभाळी लक्ष्मणास वृद्धजनें ।
म्हटलें होतें आतां सांगू मी काय कोणत्या वदनें ॥ ७ ॥
लक्ष्मण कोठें आहे ऐसें पुसतील जेधवा स्नेही ।
तेव्हां उत्तर देऊं काय वरें वचन बोल रे कांहीं ॥ ८ ॥
हे नररत्ना ! तुजला हारवुनी जन्म विफल मम झाला ।
काचेसम मी वत्सा आतां पावेन केवि बहुमोला ॥ ९ ॥
मी आणिक सीतेनें आचरिलें घोर पाप पूर्वभवीं ।
उदया येउनि आम्हा त्वन्मृतिकुफलास[6] आज हा ! दावी ॥ १० ॥
कठिण मनाचा बहु मी सीतेसाठीं तुला गमावून ।
वसलों भ्राता तुजसम मजला लाभेल या त्रिलोकीं न ॥ ११ ॥

---

१ ज्याच्या छातीला शक्तीनें आलिंगिलें आहे. २ पृथ्वीचें भूषण. ३ दुःखांचे तरङ्ग. ४ हृदयाच्या आंतल्या भागांत. ५ गुडघ्यापर्यंत लांब. ६ तुझें मरणरूपी दुःख फलाला.

सगळ्या पृथ्वीमध्यें सगळीं स्थानें फिरून पाहियलीं ।
जनक भ्राता जननी दुर्लभ मूर्तित्रयी मला दिसली ॥ १२ ॥
हे सुग्रीव खगेशा तव मैत्रीनें प्रमोद मज झाला ।
भामण्डलासह तुम्ही आतां सज्जन करा प्रयाणाला ॥ १३ ॥
मी जानकीप्रमाणें त्यजिली आशा प्रिया जगायाची ।
भावासह मी अनलीं करिन तयारी प्रवेश करण्याची ॥ १४ ॥
नच बन्धूचा मजला सीतेचाही बिभीषणा शोक ।
उपकार न मी तुजवरि केला याचेंच वाटतें दुःख ॥ १५ ॥
उत्तम करिती उपकृति[1] आधीं नंतरचि लोक मध्यम जे ।
जे नन्तरहि न करिती जनीं अशा अधमता सदा साजे ॥ १६ ॥
साधो बिभीषणा तूं बन्धुविरोधा करून उपकार ।
केला आधी मी नच म्हणून मद्धृदयिं दुःख अनिवार ॥ १७ ॥
भामण्डल सुग्रीवा चिता रचा मी प्रवेश अनलांत ।
शीघ्र स्वीकारिन मी परलोकाचाच आदरें सुपथ ॥ १८ ॥

[ दिव्यास्त्रानें मूर्च्छित झालेल्या व्यक्तीला स्पर्श करणें
अनिष्ट असतें असें जाम्बूनदवचन. ]

स्पर्श कराया इच्छी यापरि बोलून लक्ष्मणा राम ।
जाम्बूनदें निवारण केलें स्पर्शे न होय आराम ॥ १९ ॥
दिव्यास्त्रानें मूर्च्छित झाला लक्ष्मण करूं नका स्पर्श ।
देव ! प्रमाद होइल वदति असे वृद्धवचन जे आर्ष ॥ २० ॥
धैर्य धरी बा रामा भय हृदयांतून टाक काढून ।
या सङ्कटपरिहारीं उपाय वदती अनेक विबुधजन ॥ २१ ॥
करणें विलाप हा नच उपाय रामा उदात्तवीराचा ।
स्थान विवेका हृदयीं देउनि धरि धैर्य सुपथ शूराचा ॥ २२ ॥
हे रामदेव होइल उपाय यावरि अवश्य जाण मनीं ।
कारण तव हा भाऊ नारायण हा जगेल घे ध्यानीं ॥ २३ ॥
विद्याधरेश सगळे उपायचिन्तेंत होति अनुरक्त ।
खिन्न मनीं बहु झाले उपाय त्या लाभला न उपयुक्त ॥ २४ ॥

१ उपकार.

ही दिव्यशक्ति आहे त्यावरि नानौषधें न उपयोगीं ।
सूर्योदयसमयावधि दुःखें लक्ष्मण जगेल मन सांगी ॥ २५ ॥
[ सात तटांची रचना करून लक्ष्मणाचें रक्षण विद्याधर करितात. ]
यापरि विचार चित्तीं करून केली जमीन बहु शुद्ध ।
तट सात रचुनि वेशी दौवारिक[1] करिति त्या स्वयं रुद्ध ॥ २६ ॥
पहिल्या वेशीतोंडीं नील बसे करिं धनुष्य घेऊन ।
दुसऱ्या द्वारीं वसला नल करिं ज्याच्या असे गदा छान ॥ २७ ॥
तिसऱ्या गोपुरिं रक्षक असे विभीषण करांत शूल धरी ।
मणिमाला गळिं ज्याच्या ईशानदिगीशवत्[2] प्रभेस वरी ॥ २८ ॥
चिलखत अंगीं घालुनि पाठीला शरधि[3] बांधिला होता ।
चौथ्या वेशीं राही कुमुद उभा वीर धरुनि वेत्रलता[4] ॥ २९ ॥
पंचमवेशद्वारीं सुषेण भाला करांत घेऊन ।
राही उभा जयाला बघतां कातर पळे भयें दीन ॥ ३० ॥
षष्ठद्वारीं पुष्ट नि दीर्घभुजाचा प्रचण्ड वीर उभा ।
सुग्रीव करीं गोफण ज्याच्या देहांत वज्रधरशोभा ॥ ३१ ॥
भामण्डल करिं घेउनि उभा सदा खड्ग सातव्या द्वारीं ।
यापरि सेवा करिती रामीं स्नेहा सदैव धरुनि उरीं ॥ ३२ ॥
पूर्वद्वारीं फिरतो शरभध्वज करिं धरून शरभ खग ।
शोभे पश्चिमदारीं कुमार जाम्बव धरी करीं खड्ग ॥ ३३ ॥
जो चन्द्ररश्मि नामें सुत वालीचा उभा सदा द्वारीं ।
उत्तरदिक्स्थितवेशीं रक्षण कार्यांत एकचित्त धरी ॥ ३४ ॥
दक्षिणवेशद्वारीं कपिध्वजा निजकरांत घेऊन ।
राहति अनेक वीर प्रचण्ड दण्डा नभांत फिरवून ॥ ३५ ॥
यापरि लक्ष्मणरक्षणदक्ष असे यत्न वीर करितात ।
परि तज्जीवनचिन्ता त्यांच्या खेळे सदैव वदनांत ॥ ३६ ॥
[ लक्ष्मणाच्या शुभकर्मानें त्याचें रक्षण झालें. ]
हस्त्यश्वपत्तिसेना[5] घेउनि राहे तिथें न शमन[6] शिरे ।
शुभकर्म लक्ष्मणाचें रक्षण होतें करीत हेंचि खरें ॥ ३७ ॥

---
१ द्वारपाल. २ ईशानदिशेचा स्वामी महादेव. ३ बाण ठेवण्याचा भाता. ४ वेताची छडी. ५ हत्ती, घोडे, पायदळे. ६ यम.

घोडा हत्ती माणुस देवहि जीवास रक्षणीं क्षम न ।
शुभकर्मेचि जिनदासा रक्षी कथितें असेंचि जिनवचन ॥ ३८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिंनदास फडकुलेकृत पद्यानुवादे शक्तिभेद-रामविलापाभिधानं नाम त्रिषष्टितमं पर्व ॥ ६३ ॥

## चौसष्टाव्या पर्वातील कथा.

लक्ष्मण निश्चित मरेल असें वाटून रावणाच्या मनांत चिंता उत्पन्न झाली. ती अशी:— लक्ष्मणाच्या मरणानें राम रागावेल व माझा बंधु कुम्भकर्णाला आणि माझ्या दोन बाहुप्रमाणें पराक्रमी दोन पुत्रांना– इंद्रजित् व मेघनाद– यांना ठार मारील. कारण नागपाशानें त्यांना त्यानें जखडून आपल्या शिबिरांत आणून ठेवलें आहे. या विचारानें रावण अतिशय दुःखी झाला.

इकडे ही वार्ता सीतेलाही समजली. "मी मोठी दुर्दैवी आहे माझ्यासाठीं हे लक्ष्मणा वत्सा, तुला हें दुःख भोगावें लागत आहे वत्सा, अशा अवस्थेंतही तुला मी पाहू शकत नाहीं. देवता तुला रक्षोत व तूं शल्यरहित होऊन दीर्घकाल जग" असे म्हणून ती शोक करूं लागली. दुष्ट रावणानें तुझ्यावर शक्त्यस्त्राचा प्रहार केला तो फारच भयंकर असल्यामुळें तुझें जीवित कसें टिकेल याची मला फारच काळजी वाटतें. भावावरील प्रेमानें तूं माता वगैरेंना सोडून वनवासाचीं दुःखें भोगलीस. नेहमीं तूं सत्य, सुंदर व हितकारक भाषण करीत होतास. "बाळा, तुझें मुख मला पुनः पाहावयास मिळेल काय?" अशा रीतींचा विलाप सीता करूं लागली. तेव्हां तिच्या संरक्षिका विद्याधरी म्हणाल्या– बाईसाहेब, आपण चिंता करूं नका. या महापुरुषाला मरण येणार नाहीं असें आम्हाला वाटतें. अशा रीतीचें सांत्वन त्यांनीं केल्यामुळें सीतेचें दुःख कमी झालें. इकडे भामण्डलानें एका मनुष्याला रामचंद्राकडे आणिलें. तो रामचंद्राला म्हणाला– प्रभो, लक्ष्मणवीर निश्चित जगेल असें मी स्वानुभवावरून सांगतों असें म्हणून त्यानें आपली हकीकत याप्रमाणें सांगितली:—

सुरगीत नामक नगरांत मी राहत होतों. माझ्या पित्याचें नांव शशिमण्डल, मातेचें सुप्रभा व माझें नांव चन्द्रप्रतिम. एकेवेळीं मी आकाशांतून जात असतां सहस्रविजय नामक शत्रूनें मला पाहिलें. आम्हां दोघांचें घोर युद्ध झालें. त्यानें माझ्यावर 'चण्डरवा' नामक शक्ति फेकली. मी आकाशांतून खालीं 'महेंद्रोदय' नामक बगीचांत पडून मूर्च्छित झालों. माळ्यानें अयोध्यापति भरताला ही वार्ता कळविली.

त्यानें दयार्द्र होऊन माझ्यावर चन्दनजल शिंपडलें त्यामुळें शक्तिदेवता पळून गेली व मी जीवन्त झालों. पूर्ववत् मी निरोग झालों. हे रामचंद्रा, भरतानें चन्दनजल शिंपडून बरें केलें नसतें तर मला आज आपलें दर्शन झालें नसतें. एवढें बोलून तो पुरुष थांबल्यावर रामचंद्रांनीं चन्दनजलाच्या उत्पत्तिविषयीं प्रश्न केला व त्या नवागतमनुष्यानें त्याविषयीं भरतानें जी कथा त्याला सांगितली होती ती याप्रमाणें रामचंद्रांना सांगितली.

एकदा अयोध्या प्रांतांतील सर्व लोक, अन्तःपुर, भरत व घोडे वगैरे पशुही अनेक रोगांनीं आक्रांत झाले. पण त्याचवेळीं भरताचा मामा द्रोणमेघ, त्याचे अमात्य, बंधुगण एवढेंच नव्हे तर द्रोणमेघाचे हत्ती वगैरे देखिल बिल्कुल रोगरहित होते. त्यांना रोगांनीं कांहींच पीडा झाली नाहीं. ही वार्ता भरताला समजल्यावर भरतानें मामाला घरीं बोलावून घेतलें व आपण जसें नीरोग आहांत तसें मला करा असें म्हटलें. तेव्हां ज्याचा गंध दूर पसरतो असें चन्दनजल सिंचून मामानें त्याला नीरोग केलें. तसेंच त्यानें अन्तःपुर, नगर व देशांतील लोकांनाही बरे केलें. भरताला आश्चर्य वाटलें व हें असें कसें घडलें हें मला सांगा असें त्यानें मामाला विचारलें तेव्हां त्यानें आपल्या मुलीच्या– विशल्येच्या ठिकाणीं असा आश्चर्यकारक गुण आहे असें सांगितलें. पुनः तो म्हणाला जेव्हां ती माझ्या पत्नीच्या गर्भांत आली तेव्हां जे रोग पत्नींत होते ते सर्व नाहींसे झाले व ती अगदीं नीरोगी झाली. तिच्या ठिकाणीं जिनधर्माविषयीं श्रद्धालुपणा उत्पन्न झाला व जिनेंद्रभक्ति अतिशय वाढली. हें मामाचें भाषण ऐकून भरताच्या मनांत विशल्येविषयीं आदरभाव उत्पन्न झाला व त्यानें तिचा आदरसत्कार केला.

एकेवेळीं नगराच्या बाहेरील उद्यानामध्यें मति, श्रुत, अवधि, व मनःपर्यय या चार ज्ञानांचे धारक असे 'सत्त्वहित' आचार्य संघासहित आले होते. भरतानें त्यांना वंदन करून विशल्येचें चरित्र सांगा म्हणून विनंति केली तेव्हां त्यांनीं याप्रमाणें सांगितलें. हे भरता, जम्बूद्वीपांतील विदेहक्षेत्रांत पुण्डरीक नांवाच्या देशांत आनन्द नामक नगरांत 'चक्रधर' नांवाचा चक्रवर्ती होऊन गेला. त्याला 'अनङ्ग-बाणा' नामक अत्यंत सुंदर कन्या होती. तिच्या सौंदर्यावर 'वसु' नामक एक विद्याधर राजा लुब्ध झाला. त्यानें तिचें हरण केलें. विमानांत वसवून त्यानें तिला नेलें. चक्रवर्तीला ही वार्ता समजल्यावर त्यानें आपल्या सैन्यासह त्याला गांठलें. खूप लढाई झाली. वीरांनीं वसुविद्याधराचें विमान मोडलें तेव्हां त्यानें पर्णलघु नामक विद्येच्या-द्वारें अनङ्गबाणेला आकाशांतून खालीं सोडलें व तो चक्रवर्तीच्या वीरांबरोबर लढूं

लागला. इकडे ती चक्रवर्तिकन्या एका 'श्वापदरौरव' नामक भयंकर जंगलांत उतरली. तिला फार दुःख झालें. आपण चक्रवर्तीची कन्या असून या भयंकर जंगलांत येऊन पडलों. या ठिकाणीं वृक्षादिकांची अतिशय गर्दी असल्यामुळें सूर्याचे किरण जणु भीतीनें प्रवेश करीत नाहींत. माझा पिता षट्खण्डांतील सर्व लोकांचीं दुःखें नाहींशी करितो या त्याच्या स्वतःच्या कन्येचीं दुःखें त्यानें नाहींशीं करूं नयेत काय? असा शोक तिनें केला.

माते, मला उदरीं धारण करून अनेक दुःखें सहन केलीस व आतां ही तुझी कन्या या जंगलांत दुःखें भोगीत आहे. तिचीं हीं दुःखें कां नाहींशी करीत नाहींस? तूं माझा कां त्याग केलास? तुझ्या मनाला माझ्याविषयीं दया कां वाटत नाहीं? इत्यादि विचारांनीं ती घाबरून गेली. त्या भयंकर जंगलांत नदीच्या काठीं राहू लागली. पूर्वी रात्रीं झोपतांना जिला तिच्या केशांतील फुलेंहि टोचत होतीं आतां तिला याठिकाणीं कर्कश जमिनीवर झोपावें लागत असे. उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा यांचीं दुःखें ती सहन करूं लागली. दुःखांनीं तिचें शरीर कृश झालें त्याची कांति नाहींशी झाली.

त्या वनांतून दुसरे ठिकाणीं जाणें शक्य नव्हतें. झाडाचीं फळें खाऊन ती जगू लागली. पूर्वभवाच्या पापोदयानें हें दुःख प्राप्त झालें आहे. हें भोगलेंच पाहिजे असा विचार करून तिचें अंतःकरण तपाकडे प्रवृत्त झालें. तिनें तीन हजार वर्षेपर्यंत दुःखें सहन केली. आयुष्याचा शेवट होणार असें तिला जेव्हां वाटू लागलें तेव्हां तिनें अन्न, पान, खाद्य व लेह्य या चार आहारांचा त्याग केला. या जंगलांतील शंभर हाताच्या जमिनींतच राहण्याचा तिनें निश्चय केला. या निश्चयाप्रमाणें सहा दिवस गेले. सातव्या दिवशीं लब्धिदास नामक एक विद्याधर तेथें आला. त्यानें ही चक्रवर्तीची कन्या आहे हें ओळखलें व मी तुला चक्रवर्तीकडे नेतो असे तो म्हणाला असतां तिनें मी सल्लेखना धारण केली आहे व मी येत नाहीं. शंभर हाताच्या जमिनीवर राहण्याचें मी प्रमाण केलें आहे असें तिनें सांगितलें. तो विद्याधर चक्रवर्तीकडे जाऊन त्याच्यासह त्या वनांत आला. त्यावेळीं एका लठ्ठ अजगरानें तिला गिळावयास सुरुवात केली होती. चक्रवर्तीनें यावेळीं कषायवश होऊ नकोस असा उपदेश आपल्या मुलीला केला. तिनेंही तो उपद्रव सहन केला. त्याला दुःख देण्याचा विचारही मनांत आणिला नाहीं. शांतचित्तानें प्राणत्याग केला व ती तिसऱ्या सानत्कुमारस्वर्गांत उत्पन्न झाली.

इकडे चक्रवर्तीलाही वैराग्य उत्पन्न झालें व त्यानें बावीस हजार पुत्रासह दीक्षा घेतली व तपश्चरण केलें. तो स्वर्गांत उत्पन्न झाला.

ज्या वसु विद्याधरानें अनंगशरेचें हरण केलें होतें. त्यानें युद्ध संपल्यावर तिचा पुष्कळ शोध केला पण त्याला ती सांपडली नाहीं म्हणून विरक्त होऊन त्यानें द्रुमसेन आचार्याजवळ दीक्षा घेऊन निदानवश होऊन दुश्चर तपश्चरण केलें. व तोही स्वर्गांत देव झाला. तेथून च्युत होऊन तो लक्ष्मण झाला आहे.

अनंगशराही स्वर्गांतलें आयुष्य संपल्यावर द्रोणमेघ राजाची कन्या विशल्या झालेली आहे. पूर्वजन्माच्या दुश्चर तपश्चरणाच्या प्रभावामुळें तिच्या स्नानोदकांत सर्व रोगदुःखें नाहींसें होण्याचें सामर्थ्य आलें आहे.

ही सर्व कथा ऐकून पुनः भरतानें सर्वसत्त्वहित आचार्यांना प्रश्न विचारला– " प्रभो ! माझ्या राज्यांत विषमय हवा पसरून सर्व लोक आजारी पडले. हवा अशी विषमय होण्याचें कारण काय ? " या प्रश्नाचें उत्तर आचार्यांनी असें दिलें :—

राजा भरता, हस्तिनापुराहून एक श्रीमंत व्यापारी रेडे, बैल व हत्ती घेऊन तुझ्या साकेता-नगरींत व्यापारासाठीं राहिला. येथें त्याचा एक रेडा तीव्र रोगांनीं अतिशय गांजून गेला. त्याच्या अंगांत पुष्कळ व्रण झाले होते. तो दुःख सहन करून मेला व वायुकुमारजातीच्या देवामध्यें अश्वकेतु नामक देव झाला. त्याला अवधि-ज्ञानानें मागील भवाचें ज्ञान झालें. " मला मागीलजन्मीं दुष्ट लोकांनीं फार दुःख दिलें होतें. मी गाळांत फसलों होतों त्यावेळीं लोक माझ्या पाठीवरून व डोक्यावरून चिखल उल्लंघून पलिकडे जात असत. कित्येक लोक हातांत लांकूड घेऊन मला बडवीत असत. मी त्यावेळीं असमर्थ होतो. आतां मला देवावस्था प्राप्त झाली आहे. मी यावेळीं लोकांना नाहीं पीडा दिली, तर ही समर्थअवस्था प्राप्त होऊन व्यर्थ दवडली असें होईल." असा विचार करून त्यानें विषारी हवेनें अनेक लोकांना रोगी केलें होतें. पण ते सर्व रोग विशल्येच्या स्नानजलानें नाहींसे झाले ही सर्व कथा आचार्यांनीं भरताला सांगितली. भरतानें मला सांगितली व हे रामचंद्रा मी आपणास सांगितली आहे. यास्तव विशल्येचें स्नानजल आणण्याचा प्रयत्न करा व त्यानें लक्ष्मण वाचेल असें निश्चित समजावें.

जे जन जिनभक्ति करतात– त्या जिनदासभव्यजनांना अमरपद प्राप्त होतें. त्यांचा जीवनमार्ग विषम राहत नाहीं व ते दुःखी होत नाहींत.

# चौसष्टावें पर्व.

[ लक्ष्मण मरण पावला तर माझ्या भावाला व माझ्या दोन पुत्रांना रामचंद्र मारून टाकील या विचारांनीं रावण मनांत खिन्न झाला. ]

निश्चित मरेल लक्ष्मण जाणुनि चिन्ती मनीं दशग्रीव ।
मारील राम माझ्या पुत्रां भावास करुनि अरिभाव[1] ॥ १ ॥

येतां विचार ऐसा झालें त्या दुःख अमित शोक करी ।
हा ! मद्बन्धो, तुजसम माझा अन्य न जगांत हितकारी ॥ २ ॥

माझे पराक्रमी जणु पुत्रांनों दोन बाहु आहांत ।
परि हा ! दुर्दैवानें बन्धन तुम्हांस जाहलें प्राप्त ॥ ३ ॥

तुमच्या बन्धनदुःखें मच्चित्त व्यथित जाहलें फार ।
ज्याचा यूथ जाहला बद्ध करीन्द्रासमान अनिवार ॥ ४ ॥

अरि केवि दुःख देइल तुमजे आतां उपाय काय करूं ।
यापरि रावणहृदया झालें शैलासमान दुःख गुरु ॥ ५ ॥

[ रावणाच्या शक्त्यस्त्रानें लक्ष्मण मूर्च्छित व निश्चेष्ट झाला हें वृत्त ऐकून सीतेनें जो शोक केला तो असाः— ]

रावणशक्त्यस्त्राच्या घातें लक्ष्मण पडून भूवरती ।
मूर्च्छितमृतवत् झाला सीतेच्या येइ वृत्त कर्णपथीं ॥ ६ ॥

हे गुणभूषण लक्ष्मण, मदर्थ ही दुर्दशा तुला प्राप्त ।
झाली दुर्दैवी मी म्हणुनि तुझ्या दुःख येइ पदरांत ॥ ७ ॥

या दुरवस्थेंतहि तुज वत्सा ! मी पापिणी न पाहु शकें ।
रक्षोत देवता तुज विशल्य होऊन दीर्घजीव सुखें ॥ ८ ॥

अनुपम वीरा तुजवरि शक्त्यस्त्राचा प्रहार जो केला ।
दुष्टाधम शत्रूनें होइल तो मृतिद[2] वाटतें मजला ॥ ९ ॥

भ्रातृप्रेमें सोडुनि आप्त नि मात्रादि-[3]बन्धुवर्गास ।
आलास भोगिशी ही विपदा लंघून तूं समुद्रास ॥ १० ॥

---

१ शत्रुपणा. २ मरण देणारा. ३ माता वगैरे.

सत्य नि शिव सुन्दर जें ऐसें भाषण सदा मुखांतून ।
होतें निघत नि विनयी पुनरपि मज तव दिसेल कां वदन ॥ ११ ॥
यापरि सीता असतां करीत शोकास खेचरी वदली ।
शोक न देवि! करावा मरेल निश्चय असा नसे जगतीं ॥ १२ ॥
धैर्य धरी वीराची गति होते रणि अशीच जाणावें ।
किंवा उपाय असती जगेल त्यांनीं मनांत तें ध्यावें ॥ १३ ॥
यापरि सान्त्वन करतां किञ्चित् सीता अनाकुला झाली ।
वृत्त पुढें जें घडलें जिनवाणी सत्य तें असें वदली ॥ १४ ॥
आला कोणी पुरुष प्रसन्न भामण्डलें तया म्हटलें ।
कोण कुणाचा कोठुनि आलास किमर्थ सांग मजसि भलें ॥ १५ ॥
वदला येथें येउनि मासाहुनि अधिक दिवस मज झाले ।
रामाश्रय लाभावा इच्छित साफल्य[2] त्या न परि आलें ॥ १६ ॥
लक्ष्मण शीघ्र जगावा वाटे तुम्हां उपाय सांगेन ।
न्या मज रामासन्निध पुनरपि मिळतील लक्ष्मणा प्राण ॥ १७ ॥
[ भामंडलानें आलेल्या पुरुषाला रामाजवळ नेलें. त्यानें याप्रमाणें उपाय सांगितला. ]
यापरि भाषण ऐकुनि दारीं प्रतिनिधि मनुष्य योजून ।
रामासंनिध नेई भामण्डल त्यास तो करी कथन ॥ १८ ॥
वदला राजन् रामा ! कुमार लक्ष्मण जगेल निश्चित हें ।
माझा अनुभव जैसा मी कथितों त्यावरून हें पाहें ॥ १९ ॥
जनक असे शशिमण्डल जननीचें नांव सुप्रभा आहे ।
'चन्द्रप्रतिम' सुनामा सुरगीत[3]पुरीं निवास मम पाहे ॥ २० ॥
कोणें एके वेळीं आकाशांतून जात मी होतों ।
वेलाध्यक्ष[4] सुत 'श्रीसहस्रविजय' हि वधे मला अरि तो ॥ २१ ॥
वैर स्मरून त्यानें माझ्याशीं घोर युद्ध तें केलें ।
चण्डरवा शक्तीचा प्रहार मजवर करून पाडियलें ॥ २२ ॥
आकाशांतुनि खालीं रात्रौ पडलों महेन्द्र[5]उद्यानीं ।
हें वृत्त वदे माळी जाउन भरतासमीप त्या नमुनी ॥ २३ ॥

१ रक्षण करणाऱ्या विद्याधर स्त्रिया. २ सफलपणा. ३ देवगीत नामक नगरांत. ४ वेला नामक नगराच्या अधिकाऱ्याचा पुत्र. ५ अयोध्येच्या 'महेंद्र' नामक बगीच्यांत.

साकेताधिप भरतें करुणेनें द्रवितहृदय होऊन ।
चन्दनजल सिञ्चियलें तेणें झालों जिवन्त मी जाण ॥ २४ ॥
ती शक्ति पळुनि गेली लाभे पूर्वस्वरूपही मजला ।
चन्दनगन्धजलानें माझा आत्मा महासुखी झाला ॥ २५ ॥
पुरुषश्रेष्ठें भरतें जन्मान्तर[1] जणु दिलें मला वाटे ।
त्वद्दर्शन हे नाथा ! झालें नसतें कदापि मजला तें ॥ २६ ॥

[ रोग नष्ट करणाऱ्या गन्धोदकाचें वृत्त जें मला भरतानें सांगितलें हे रामचन्द्रा तें मी आपणास सांगतों. ऐका. ]

आनन्दानें सुन्दर रामें मजला विचारिलें त्वरित ।
होते उत्पत्ति कशी सांग मला जरि तुला असे विदित ॥ २७ ॥
उत्पत्ति केवि झाली गन्धजलाची विचारिलें भरता ।
मी जेव्हां सांगितली तयें मला तीच सांगतों आतां ॥ २८ ॥
भरत मला तैं वदला माझा हा देश निष्प्रतीकार ।
सर्व पुरासह झाला व्याधिशतें आर्त दुःसहें घोर ॥ २९ ॥
दाहज्वर, वक्षःक्षत[2], गळणें लाला सदा मुखांतून ।
ठणका अंगांत सदा फोडांनीं अंग जातसें भरुन ॥ ३० ॥
सूज चढे देहावरि होइ उत्पन्न अरुचि वदनांत ।
जीवगणावरि झाला जणु सगळा कुपितसा रुजाव्रात[3] ॥ ३१ ॥
श्रीद्रोणमेघ माझा मामा त्याचे अमात्य बन्धुगण ।
हस्त्यश्वादिक पशुगण झाले हे सर्व रोगबाधित न ॥ ३२ ॥
ही ऐकतांचि वार्ता मामाला स्वगृहिं शीघ्र आणविलें ।
आपण नीरोग जसें करा मला शीघ्र त्यास मी म्हटलें ॥ ३३ ॥
ज्याचा सुदूर पसरे सुगन्ध सिंचून चन्दनोदक तें ।
केलें नीरोग मला अन्तःपुरनगर-सकलदेशातें ॥ ३४ ॥
ज्यानें रोग हजारों उद्भवले वायु पावला नाश ।
चन्दनगन्धजलानें विस्मय वाटे मदीयहृदयास ॥ ३५ ॥
मामास विनविलें मी रोगविनाशा कसें करी जल हें ।
हेतु तयाचा बोला उत्सुक माझें अतीव मन पाहे ॥ ३६ ॥

---

१ दुसरा जन्म. २ छातींत भोकें पडणें. ३ रोगांचा समूह.

श्रीद्रोण मला वदला नृपते ! गुणशालिनी मला दुहिता ।
आहे नाम विशल्या जी जिनपदपूजनांत सतत रता ॥ ३७ ॥
जेव्हां मम पत्नीच्या आली गर्भांत रोग सर्व तिचे ।
होऊन नष्ट झाले नीरोग शरीर गेह कान्तीचें ॥ ३८ ॥
झाली जिनेन्द्रधर्मी श्रद्धालु नि ती जिनेन्द्रपदभक्ता ।
घाला माझी वाढे सकलगुणांची अपूर्व कल्पलता ॥ ३९ ॥
स्नानोदक देहाचें महासुगन्धित समस्त रोग हरी ।
ऐशी कथा तियेची वद वत्सा कां न विस्मया वितरी ॥ ४० ॥
हें मामाचें भाषण ऐकुनि आदर तिचा धनें केला ।
गेलों परत अयोध्यानगरीं बहु मोद मन्मनीं झाला ॥ ४१ ॥
पुरबाह्योपवनामधिं नामें मुनिराज सत्त्वहित आले ।
ज्ञानचतुष्कें शोभित तच्चरणीं शीर्ष नम्र मी केलें ॥ ४२ ॥
दिव्य-विशल्याचरिता मजला हे भव्यवत्सला सांगा ।
भव्यमनोमलनाशी[1] तुमची ही नाथ ! दिव्यवाग्गङ्गा[2] ॥ ४३ ॥
[ विशल्येचें चरित सत्त्वहित आचार्यांनीं भरताला याप्रमाणें सांगितलें. ]
ऐक विशल्याचरिता भरता दुरितास हें विनाशील ।
सांगेल सज्जनांना पाळावें व्रत कसें दयाशील ॥ ४४ ॥
जम्बूद्वीपविदेहीं स्वर्गासम पुण्डरीक देश असे ।
आनन्द नाम नगरीं चक्री जो 'चक्रधर' सुनाम वसे ॥ ४५ ॥
होती सुता तयाला 'अनङ्गबाणा' अपूर्व गुणखाणी ।
रतितुल्य सुन्दरी ती सत्यमुखांतुनि निघे तिच्या वाणी ॥ ४६ ॥
सामन्त एक होता प्रतिष्ठनगरेश नाम 'वसु' त्याचें ।
पाहुनि रूप तियेचें हरणाची तन्मनांत मति सांचे ॥ ४७ ॥
कामाकुल तो आला हरुनि विमानांत बैसवी तिजला ।
नेई विमान वेगें परि गांठी चक्रिसैन्य झणिं त्याला ॥ ४८ ॥
घनघोर युद्ध झालें सुभटांनीं तद्विमान मोडियलें ।
पर्णलघुनामविद्यायोगें त्यानें तियेस तें त्यजिलें ॥ ४९ ॥

---

१ धार्मिक लोकांच्या मनःपातकाचा नाश करणारी. २ दिव्यवचनांची जणु गंगानदी.

आकाशांतुनि उतरे जणु चन्द्राची प्रभा दुजी खालीं ।
'श्वापदरौरव' नामक वनिं चक्रीची सुता तदा पडली ॥ ५० ॥
तरुपङ्क्ति दाट जेथें दिवसांही अंधकार वास करी ।
विद्यासाधक जे नर त्याचेंही मन तिथें भयास वरी ॥ ५१ ॥
नानावल्ली जेथें आलिंगिति उच्चवृक्षवृन्दास ।
सूर्याचे कर त्यांना भिवून त्यजिती वनांत जणु वासे ॥ ५२ ॥
सिंह, व्याघ्र नि अस्खल वनपशु फिरतात जेथ चोहिंकडे ।
नीचोच्च भूमि जेथें आकाशा भेटतात शैलकडे ॥ ५३ ॥

[ अनङ्गबाणा शोक करीत दिवस कंठू लागली. ]

ऐशा पडली बाला वनीं तिला वाटली मनीं भीति ।
बन्धुगणाच्या स्मरणें शोका लागे करूं अनावर ती ॥ ५४ ॥
देवेन्द्रासम ज्याचें वैभव षट्खण्डपति पिता माझा ।
परि दुःख भोगणें मज पडेल ज्याचा असह्यसा वोझा ॥ ५५ ॥
ताता! सकलजनांचा त्राता तूं परि असे तुझी दुहिता ।
अतिशय दुःखी वद ना हरीन पीडा नकोस करु चिन्ता ॥ ५६ ॥
माते! मजला उदरीं करून धारण असह्य दुःखास ।
तूं भोगिलेस आतां करुणा कां तव न येइ हृदयास ॥ ५७ ॥
माते! मी नच दिसले क्षणहि जरी दुःख वाटलें तुजला ।
कां त्यागिलेस मजला सोसु कशी दुःखशैल मी अबला ॥ ५८ ॥
मरणास इच्छिते मी परि तें सोडून दूर मज गेलें ।
पुण्याविण कोणाला अभिलषित प्राप्त केधवा झालें ? ॥ ५९ ॥
आतां काय करूं मी जाऊं कोणास शरण मज नुमजे ।
कष्ट कसें हें साहू कोण वरें हरिल दुःख हें ताजें ॥ ६० ॥
घोर वनीं मी कैसें राहू या थोरशा नदीतीरीं ।
दुःखनदी ही लंधुनि जाया होईन केंवि अधिकारी ॥ ६१ ॥
स्वप्नांत मी असे कां? मम झाला काय जन्म नरकांत ?।
हें दुःख नष्ट होउनि होइल मम चित्त केधवां शान्त ॥ ६२ ॥
यापरि बोलुनि वचना बालेनें दीर्घ शोक जो केला ।
द्रवलें मनहि पशूंचें तेणें परि विफलताचि ये त्याला ॥ ६३ ॥

१ राहणें. २ समर्थ.

शोकसमुद्रीं बुडली क्षुधा-तृषेची व्यथा तिला झाली ।
फलपर्णादिक सेवुनि ती बाला त्या वनांत चिर वसली ॥ ६४ ॥

[ अनेक पावसाळे, हिंवाळे व उन्हाळे यांचें दुःख
त्या वनांत राहून तिनें सहन केले. ]

वनकमलांची शोभा नेई विलयास शीतकाल असा ।
केला सहन तियेनें कर्मोदय कोण दूर करिल कसा ? ॥ ६५ ॥
तरुहि प्रचण्ड सुकवी जेणें पशुवृन्द टाकितो धापा ।
सोशी असा उन्हाळा बाला ती पूर्वजन्मिच्या पापा ॥ ६६ ॥
चमके वृन्द विजांचा जलधारा सतत सोडिती मेघ ।
वर्षाकाला सोशी पाषाणीं ओढिली तिनें रेघ ॥ ६७ ॥
गेली कान्ति तनूची अवयव फुटले मळी चढे देहीं ।
वर्षाहत-चित्रासम झाली उरलें न रक्तही कांहीं ॥ ६८ ॥
दिवसां रवितेजानें चन्द्रकला क्षीण तेवि चक्रिसुता ।
कान्तिविहीन जहाली तद्देहीं प्राप्त जाहली तनुता ॥ ६९ ॥
पाकाभिमुख जहाली म्हणून ज्या पांढरेपणा आला ।
स्थूलकपित्थफलांनीं कपित्थतरुवृन्द नम्र हा झाला ॥ ७० ॥
जनकस्मृति मनिं होतां अनङ्गबाणा रडे सुदीनपणें ।
मी चक्रवर्तितनया दुरवस्था होय ही ! अघें कवणें ॥ ७१ ॥
पिकलीं म्हणून पडलीं ऐशीं गोळा करून अहह ! फलें ।
खाऊन पोट भरि ती सेरल सम पाप कोणत्या कालें ॥ ७२ ॥
निजकेशच्युतपुष्पें कोमलदेहास होति टोचत हीं ।
पाषाणाचे तुकडे देती येथें वपुर्व्यथा पाही ॥ ७३ ॥
मी जनकाचें सदनीं ऐकुनि सङ्गीत होतसे जागी ।
येथें स्वर कोल्ह्याचे ऐकुनि होते अतीव भयभागी ॥ ७४ ॥

[ तीन हजार वर्षे तिनें दुःखें सहन केलीं, पितृगृहाकडे ती
जाऊं शकली नाहीं, व तिनें पुष्कळ तप केलें. ]

---

१ हीं सर्वप्रकारचीं दुःखें मी सहन करीत असें म्हणून जणु तिनें पाषाणावर रेघ ओढली. २ मल. ३ कृशपणा. ४ पिकण्याच्या अवस्थेस. ५ कवठाचीं फलें. ६ पापानें. ७ शरीरपीडा.

यापरि पितृगृहसौख्यें स्मरून ती खिन्न होतसे हृदयीं ।
जाया पित्याकडे नच उपाय लाभे कुदैव हा ! अदयी ॥ ७५ ॥
त्रिसहस्त्रवत्सरावधि[1] चक्रिसुतेनें वनांतलीं दुःखें ।
अत्यन्त भोगिलीं परि लवहि सुखाचा न ती हहा ! चाखे ॥ ७६ ॥
प्रासुकआहारें[2] ती करीतसे पारणा करून तप ।
नाना साहुनि दुःखें सारुनि बाजूस हृदयसन्ताप ॥ ७७ ॥

[ सल्लेखना धारण करून तिनें शंभर हातांच्या भूप्रदेशाचीच मर्यादा केली.]

देहीं विरक्त होउनि चतुर्विधाहारें[3] त्यागिला धैर्यें ।
निःस्पृह झाली हृदयीं केली सल्लेखना तिनें स्थैर्यें ॥ ७८ ॥
शम्भर हातांची जी सभोंवती भूमि तींत विहरेन ।
बाहेर न मी जाइन नियम असा घेतला तिनें कठिन ॥ ७९ ॥
जिनशासनांत पूर्वी नियम असा ऐकिला तिनें होता ।
त्या पाळित ती असतां निशा सहा संपल्या अहो बघतां ॥ ८० ॥
सप्तमरात्रीं कोणी विद्याधर लब्धिदास नांवाचा ।
वन्दून मेरुमन्दिर जिनेन्द्रबिम्बास मधुर यशाचा ॥ ८१ ॥
स्वगृहास जात असतां पाहून तिला स्वजनकसदनास ।
नेतों ऐसें वदला असतां केलें तिनें निषेधास ॥ ८२ ॥
सल्लेखना खगेशा धारण आमरण मी असे केली ।
पितृगृहिं येईन न मी निजस्वरूपींच करिन मी केलि[4] ॥ ८३ ॥
तो लब्धिदास गेला तेथून त्वरित चक्रिसदनास ।
घेउनि पुनरपि आला चक्रेशा शीघ्र घोरविपिनास ॥ ८४ ॥
अत्यन्त रौद्र मोठा अजगर होता गिळीत कन्येस ।
पाहुनि चक्रपतिनें उपदेशुनि शमविले कषायास ॥ ८५ ॥
जी क्षीण फार झाली रूप जणू पावली सती दुसरें ।
सल्लेखनेंत तत्पर पाहुनि वैराग्य चक्रिचित्तिं शिरे ॥ ८६ ॥

[ चक्रवर्तीनें कन्येची सल्लेखना पाहून विरक्त होऊन दीक्षा घेतली व स्वहित साधलें.]

स्वपुरीं जाउनि वाविस हजार पुत्रासवें विरक्तमनें ।
चक्री घेउनि दीक्षा साधी स्वहितास सावधानपणें ॥ ८७ ॥

---

१ तीन हजार वर्षेंपर्यंत. २ निर्जंतुक फळांच्या आहारानें. ३ अन्न, पान, खाद्य व लेह्य या चार आहारांचा त्याग. ४ क्रीडा.

[ क्रूर अजगर तिला गिळीत असतांही त्याला पीडा देण्याचा विचार तिनें ननांत आणिला नाहीं. शांतीनें प्राण सोडून तिनें सानत्कुमारस्वर्गांत देवपद मिळविलें.]

क्रूर बुभुक्षितें अजगर गिळीत असतांही सावधान मनीं ।
कन्या दृढतर राही कोण तिचें धैर्य साधु नच वानीं ॥ ८८ ॥
जाणून मृत्यु अपुला निश्चित नच सारिलें शयूंस तिनें ।
होऊन मनिं दयाळू पीडेच्या भावनेस विलया ने ॥ ८९ ॥
सानत्कुमार-नाकीं प्राप्त तिला अष्टगुणसमृद्ध असे ।
सुरपद धर्माचें फल झालें सुखनिधि अपार ज्यांत वसे ॥ ९० ॥

[ वसुविद्याधरानें वनांत अनङ्गशरेचा शोध केला. त्याला ती मिळाली नाहीं. म्हणून विरक्त होऊन त्यानें दीक्षा घेतली. तप केलें व स्वर्गांत देव झाला. तेथून च्युत होऊन तो लक्ष्मण झाला. ]

इकडे वसुविद्याधर लढून पळवी समस्त-खचरगणा ।
आला वनांत शोधी परि ती दिसली न त्याचिया नयना ॥ ९१ ॥
विरहें दुःखित झाला दीक्षा ‘ द्रुमसेन ’ मुनिवरापाशी ।
घेउनि केलें दुश्चर तप ‘ वसुनें ’ वनुनि तन्निदानवशी ॥ ९२ ॥
स्वर्गांत देव झाला तेथें भोगून दीर्घकाल सुखें ।
होऊन च्युत लक्ष्मण झाला यच्छौर्य गाति विबुध मुखें ॥ ९३ ॥

[ अनंगशरा विशल्या झाली. पूर्वतपामुळें तिच्या स्नानोदकांत रोगविनाशक गुण प्रगटले. ]

पूर्वानङ्गशरा जी सुरलोकांतून चवुनि इहलोकीं ।
द्रोणसुता ‘ सुविशल्या ’ धर्माचें सुफल राम ! अवलोकी ॥ ९४ ॥
ती तन्नगरीं देशीं किंवा या भारती अपूर्व असे ।
महिमा तिचाच लोकीं इतरांचा नच कदापि जाण दिसे ॥ ९५ ॥
पूर्वार्जित-शुभकर्म-प्रभावयोगें महागुण प्रगटे ।
स्नानजलांत तियेच्या जन होती रोगमुक्त सुख भेटे ॥ ९६ ॥
केलें पूर्वभवामधिं उपसर्गें युक्त सुतप वहु घोर ।
कां फल असें तयाचें नाहीं होणार सांग साचार ॥ ९७ ॥
राजन् त्या देशामधिं चोहिंकडे विषम वायु पसरून ।
झाले रोग भयंकर अनुपायें जाहली प्रजा खिन्न ॥ ९८ ॥

---

१ भुकेलेला. २ अजगरास. ३ तिसऱ्या स्वर्गांत.

विषमय हवा कशी ही विचारिला प्रश्न जेधवा भरतें ।
उत्तरलें मुनिवर जें कथितों तुज नाथ मी कथानक तें ॥ ९९ ॥
गजपुरनगरापासुनि आला श्रीमन्त एक व्यापारी ।
साकेतानगरामधिं घेउनि रेडे नि बैल मत्त करी ॥ १०० ॥
अकरा महिने राही व्यापारी तो पुरी अयोध्येंत ।
रेडा त्याचा झाला रोगांनीं तीव्रशा तदा व्यथित ॥ १०१ ॥

[ रेडा अतिशय दुःख सहन करून अकामनिर्जरेनें मेला व वायुकुमार देव झाला. त्याला दिव्यज्ञानानें लोकांनीं आपल्याला दुःख दिल्याचें समजलें व त्यानें अनेक रोग उत्पन्न केले. ]

अंगीं अनेक झाले व्रण सोसुनि दुःख पावला मरण ।
देवभव त्यास लाभे अकाम निर्जरण जाहलें म्हणुन ॥ १०२ ॥
तो अश्वकेतुनामक झाला बलशालि देव वायुकुलीं ।
जो पातालनिवासी क्रूर जयाचा स्वभाव जेवि कलि[1] ॥ १०३ ॥
अवधिज्ञानें त्यानें स्वपूर्वभव जाणला यदा सगळा ।
अत्यन्त कुपित झाला खललोकें दुःख हा ! दिलें मजला ॥ १०४ ॥
फसलों मी गाळामधिं झाले व्रण मम समस्त अंगांत ।
घेउनि करांत लांकुड ठोकित होते सदैव पाठींत ॥ १०५ ॥
पाठीवरि डोक्यावरि ठेवुनि ते पाय चिखल लंघून ।
होते जात अशा परि दिलें तयें दुःख ज्यास गणना न ॥ १०६ ॥
यावेळीं मी त्यांना दिलें न जरि दुःख देवपद विफल ।
होइल माझें यास्तव छळीन उत्पन्न करुनि रोगकुलें[2] ॥ १०७ ॥
चिन्तन करून हृदयीं साकेतापुरिं नि सर्व देशांत ।
रागावुनि रोगांचा उत्पादक वात पसरि तो त्वरित ॥ १०८ ॥
श्रीद्रोणमेघतनयास्नानजलें सर्व रोग विलयास ।
गेले देशपुरामधिं झाला सर्वत्र सौख्यसंवास ॥ १०९ ॥
श्रीसत्त्वहित-मुनींनीं सुविशल्याचरित पूत हें कथिलें ।
भरता तेणें मजला मीही हें पद्म तुजसि सांगितलें ॥ ११० ॥
अभिषेकजल तियेचें आणायाचा प्रयत्न शीघ्र करा ।
नाहीं उपाय दुसरा लक्ष्मणजीवितिं मनांत अवधारा ॥ १११ ॥

---

१ कलीप्रमाणें तो अश्वकेतु क्रूर होता. २ रोगसमूह.

पडले मृतिपथिं ज्यांचें पाउल ऐसेहिं पुण्यवन्त जगीं ।
मिळतां उपाय जीवितलाभा वरितात ही असत्य न गी ॥ ११२ ॥
असती महान् महात्मे विपत्ति जरि थोर त्यावरी पडली ।
वदती उपाय त्यांना त्यांची नौका कदापि नच नडली ॥ ११३ ॥
जिनभक्ति करिति जन जे ते श्रीजिनदास अमर होतात ।
जीवनपथ न तयांचा विषमित होतो न दुःख वरितात ॥ ११४ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे विशल्यापूर्वभवाभिधानं नाम चतुःषष्टितमं पर्व ॥ ६४ ॥

# पासष्टाव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

चंद्रप्रतिमाचें वचन ऐकून रामचंद्रांना आनंद वाटला व त्यांनीं त्याचा चांगला आदर केला. यानंतर श्रीमारुति, भामंडल व अंगद हे तिघे तत्काल अयोध्येला गेले. त्यांनीं भरताला याप्रमाणें सांगितलें. " रावणानें सीतेला हरून लंकेला नेलें. युद्धांत त्यानें शक्त्यस्त्र लक्ष्मणावर सोडलें. त्याच्या प्रहारानें तो मूर्च्छित होऊन पडला आहे. व आम्हाला विशल्येचें स्नानजल पाहिजे. त्यानें तो बरा होईल अन्यथा त्याची जीवन-लीला समाप्त होईल." भरतानें हें ऐकिल्याबरोबर द्रोणमेघमामाकडे आपला मनुष्य पाठविला. " विशल्येला आपण तत्काल मारुती वगैरेबरोबर पाठवा. तिच्या स्नानजलानें लक्ष्मणाची मूर्च्छा नाहींशीं होऊन तो वाचेल. " असें त्या मनुष्यानें द्रोणमेघाला सांगितलें. भरताच्या मातेनें-कैकेयीनेंही द्रोणमेघाला म्हटलें– बंधो, विशल्येला तत्काल तूं लक्ष्मणाला बरें करण्यासाठीं पाठवून दे. ती लक्ष्मणाची पत्नी होईल असें जैन-मुनींचें वचन आहे. द्रोणमेघानें तत्काल विशल्येला तिच्या मैत्रिणीबरोबर पाठविलें.

मारुति, भामंडल व अंगद यांनीं विशल्या व तिच्या मैत्रिणींना विमानांत बसविलें व मोठ्या वेगानें विमान चालू केलें. थोड्याच वेळांत तें विमान लंकेच्या समरभूमींत आलें. सर्व विद्याधरांनीं विशल्येसह सर्व कन्यांचें स्वागत केलें.

सात तट उल्लंघून विशल्या लक्ष्मणाजवळ येऊन पोहोंचली. तेथें रामचंद्रादिक वडील माणसें बसलीं होतीं. त्यांना तिनें नमस्कार केला. सर्वांनीं तिला शुभाशीर्वाद दिले.

लक्ष्मणाजवळ येत असतां त्याच्यांत फरक पडू लागला. त्याच्या वेदना नाहींशा झाल्या. त्याला शांति वाटू लागली. व त्याच्या वक्षःस्थलांतून 'अमोघ-विजया' शक्तिदेवता बाहेर पडून जात असतां तिला मारुतीनें पकडलें. तेव्हां तिनें म्हटलें– " विशल्येच्यापुढें मी बलहीन झालें आहे. माझ्याठिकाणीं कोणत्याही देवाला जिंकण्याचें सामर्थ्य आहे. पण विशल्येनें तपश्चरणानें जें बल प्राप्त केलें आहे त्याच्यापुढें माझें बल फिकें पडतें. आम्ही मालकाच्या आज्ञेप्रमाणें कार्य करणाऱ्या देवता आहोत. यास्तव आमचा अपराध आपण ध्यानांत घेऊ नये. मी आपली क्षमा मागते मला आपण सोडून द्या." असें म्हटल्यावर मारुतीनें तिला सोडून दिलें व ती तेथून निघून गेली.

इकडे लक्ष्मणाजवळ उभी राहिलेली विशल्या मदनाजवळ उभी राहिलेल्या रतिप्रमाणें शोभूं लागली. तिनें त्याच्या सर्वांगाला गोशीर्षचन्दनाची उटी लाविली. रामचंद्रांच्याही अंगाला तिनें लावली. याचप्रमाणें चन्दनाच्या उटीला विशल्येनें हातानें स्पर्श केल्यानंतर तिच्या मैत्रिणींनीं इतर विद्याधरांच्या अंगाला उटी लाविली.

रामचंद्रांनीं म्हटलें कीं– इंद्रजित, कुंभकर्ण वगैरे शत्रु आपल्या ताब्यांत आहेत; त्यांच्या अंगालाही विशल्येनें स्पर्शिलेली उटी लावावी म्हणजे तेही दुःखमुक्त होऊन सुखी होतील. तेव्हां त्याच्या आज्ञेनें तिच्या मैत्रिणींनीं उटी लाविली व त्यांचेंही दुःख दूर केलें. ज्यांच्या अंगांना शस्त्राच्या जखमा झालेल्या होत्या त्या सर्वांना विशल्येच्या स्नान-जलस्पर्शानें आनंद वाटला व त्यांच्या जखमा बऱ्या झाल्या. एवढेंच नव्हे तर जे हत्ती, घोडे, पायदळ तेंही तिच्या स्नानजलस्पर्शानें बरें झालें.

चन्दनाच्या उटीनें लक्ष्मणाची मूर्च्छा नाहीशी झाली व त्यानें डोळे उघडून 'कोठें गेला रावण, कोठें त्यानें आपलें तोंड काळें केलें.' असें म्हटलें. तेव्हां रामचंद्रांना आनंद झाला. ते म्हणाले– वत्सा, तुझ्यावर शक्तीचा प्रहार करून व आतां शत्रु निश्चयानें मरेल असें समजून घरीं निघून गेला आहे. ही द्रोणराजाची कन्या विशल्या हिच्या आगमनानें तुला जीवनलाभ झाला आहे. असें रामचंद्रांनीं म्हटल्यावर त्यानें तिच्याकडे वळून पाहिलें. त्याला ती लक्ष्मीपेक्षाही अत्यंत सुंदर दिसली. तिच्या मैत्रिणींनीं लक्ष्मणाला म्हटलें– प्रभो, हिच्याबरोबर आपला विवाह व्हावा असें आम्हाला वाटतें. लक्ष्मणानें त्यांच्या भाषणाला संमति दिली. सर्वांनाच मोठा आनंद झाला.

विद्याधरांनीं विद्यांच्या सामर्थ्यानें रत्नसुवर्णमय विशाल विवाहमंडप रचिला. यानंतर लक्ष्मण व विशल्या यांचा विवाह मोठ्या थाटांत पार पडला.

पूर्वभवीं लक्ष्मणानें व्रत, तप, दान, पूजन केलें होतें. त्यामुळें त्याच्या विशाल पुण्याच्या संचयानें आयुष्य समाप्त होण्याचें टळलें म्हणून भव्यजीवांनीं व्रत, तप, दान, जिनपूजनादिक कार्यें करावीत म्हणजे त्यांना इष्टप्राप्ति होईल व अनिष्ट टळेल व सुख मिळेल.

# पासष्टावें पर्व.

प्रतिचन्द्र-वचन ऐकुनि झाला अत्यन्त मोद रामास ।
आदर केला त्याचा वाटे त्या देहिं वाढले मास ॥ १ ॥

( मारुति, भामंडल व अंगद अयोध्येस गेले. त्यांनीं सीताहरण, रावणाच्या शक्त्यस्त्राचा लक्ष्मणावर प्रहार हें वृत्त कळविलें. भरत व शत्रुघ्नांची युद्धास जाण्याची तयारी व अयोध्येंत प्रजाजनांत भीतीनें क्षोभ. )

श्रीमारुति भामण्डल तारासुत हे तिघे अयोध्येस ।
अत्यन्त शीघ्र गेले घडलेलें वृत्त कथिति भरतास ॥ २ ॥
हरिली दशाननानें सीता लक्ष्मण करून घोर रण ।
रावणशक्त्याघातें पडला बेशुद्ध युद्धिं होऊन ॥ ३ ॥
ही ऐकतांचि वार्ता भरताच्या उद्भवे मनीं क्रोध ।
रणभेरी वाजविली झाले युद्धास योध सन्नद्ध ॥ ४ ॥
वाटे प्रजाजनांना अतिवीर्यनृपालपुत्र जणु आला ।
अर्ध्यारात्रीं खलमति सैन्यासह कां करावया घाला ॥ ५ ॥
कोणी सुभट निघाला घेउनि हातांत तीक्ष्ण तरवार ।
युद्धीं लढेन निकरें शत्रुवरी करुनि तीव्रसा वार ॥ ६ ॥
कोणी स्त्री मांडीवरि घेउनि बाला स्तनावरी हात ।
ठेवून घाबरी मनिं बसली सगळ्या दिशा न्याहाळीत ॥ ७ ॥
कोणी धनिकश्रेष्ठी भार्येला आपुल्या असें वदला ।
कां झोपतेस हो गे जागी ही शोभना नसे वेळा ॥ ८ ॥
राजालयांत दिसतो उजेड सन्नद्धसुभट हे जमले ।
हो जागी धन अपुलें गुप्तस्थानांत पाहिजे पुरलें ॥ ९ ॥
सोन्याचे चांदीचे हे पुष्कळ कुम्भ तेवि मणिरत्नें ।
ठेवू तळघरिं झडकरि वस्त्रालङ्कार सर्व जे यत्नें ॥ १० ॥
डोळे लाल जयाचे निद्रेनें सुजड अल्पसे झाले ।
शत्रुघ्न शीघ्र चढला गजावरी वीर घेति करिं भाले ॥ ११ ॥
युद्धोद्यत भरतानें केली आज्ञा अनेक नृपतिगणा ।
सन्नद्ध तेहि झाले उत्सुक दिसती करावयास रणा ॥ १२ ॥

विनयें नमून म्हटलें मारुति-भामण्डलादिकें भरता ।
लङ्का दूर असे बहु सागरिं तेथें न येतसे जातां ॥ १३ ॥

( आपण विशल्येबद्दल त्या ही लक्ष्मणपत्नी होईल असें जैनमुनिवचन आहे
असें भरतानें मारुति आदिकांना म्हटलें. )

कर्तव्य काय मार्गें या समयीं शीघ्र मारुते बोला ।
लक्ष्मण विशल्य करण्या स्नानोदक शीघ्र देइ आम्हाला ॥ १४ ॥
श्रीद्रोणमेघतनयास्नानोदक पापनाशि पुण्य असे ।
जें जीवित रक्षाया समर्थ या भूतलावरी विलसे ॥ १५ ॥
करुनि कृपा दे आम्हां रव्युदयापूर्विं जाउं लङ्केस ।
नातरि लक्ष्मणजीवित भरता जाईल सर्व विलयास ॥ १६ ॥
स्नानोदक राहू दे येवो तुमच्यासवें विशल्याच ।
होइल लक्ष्मण-भार्या वदले मुनि जैन वाक्य तें साच ॥ १७ ॥

( कैकयीनें द्रोणमेघाला तत्काल विशल्येला पाठविण्यास सांगितलें.
भामंडलादिकांनीं विशल्येला विमानांत बसवून लंकेला नेलें. )

द्रोणघनाच्या सदनीं भरतानें प्रेषिला तदा स्वजन ।
वार्ता तयास कळतां उद्यत झाला करावया कदंन ॥ १८ ॥
कैकेयीनें कथिलें द्रोणा होतां उशीर लक्ष्मण रे ।
बन्धो मरेल पाठव शीघ्र विशल्येस योग्य हा वर रे ॥ १९ ॥
द्रोणघनें हर्षानें दिली विशल्या तदा विमानांत ।
श्रीभामण्डल वसवी मानी हृदयांत मोद ती अमित ॥ २० ॥
गेल्या सहस्रकन्या नृपवंशज रुचिररूप धरिती ज्या ।
होत्या सखी तियेच्या वरिती अंगांत चन्द्रिकातेजा ॥ २१ ॥
गेलें विमान वेगें आलें तें शीघ्र समरभूमिवरी ।
त्या सर्व कन्यकांना खगगण देऊन अर्घ्य सत्कारी ॥ २२ ॥
उतरून विमानांतुनि कन्यांनीं वेष्टिली विशल्या ती ।
चामर वारुनि दासी प्रवासखेदा तिच्या जणू हरिती ॥ २३ ॥
पद्ममुखी ती बाला द्वारीं हयगजसमूह पाहून ।
सप्ततटद्वारांतुनि सौमित्रीच्या समीप करि गमन ॥ २४ ॥

१ द्रोणमेघ राजाच्या. २ युद्ध.

जैसें जैसें जाई पुढें विशल्या तशी तशी लाभे ।
शान्ति सुमित्रा-तनया मुखीं तयाच्या प्रसन्नता शोभे ॥ २५ ॥

( अमोघविजयाशक्तीनें रावणानें मला कसें प्राप्त करून घेतलें हें मारुतीला सांगितलें व मी विशल्येपुढें हतबल आहे हेंहि तिनें सांगितलें व ती क्षमा मागून निघून गेली. )

लक्ष्मीधर[1]वक्षांतुनि[2] बाहेर निघे प्रभावती शक्ति ।
ठिणग्या नभांत जाती जिच्या धरी वायुपुत्र तिज हातीं ॥ २६ ॥
रूपवती ती देवी कर जोडुनि बोलली समीरसुता[3] ।
दोष न माझा कांहीं सोडा मजला प्रसन्न व्हा नाथा ॥ २७ ॥
जे प्रभु कार्या कथिती करणें तें भाग सेवकास घडे ।
दशकण्ठसेविका मी भृत्यांना[4] पारतन्त्र्यरोग जडे ॥ २८ ॥
नामें 'अमोघविजया' प्रज्ञप्तीची बहीण मी आहे ।
प्रख्यात मी त्रिलोकीं दशकण्ठें साधिलें मला पाहे ॥ २९ ॥
पूर्वी कैलासनगीं प्रतिमायोगांत वालिमुनि लीन ।
असतां रावण येउनि जिनेन्द्रभक्तींत करि मन प्रवण[5] ॥ ३० ॥
काढून निजकरांतिल शिरा मनोहर तिला करी वीणा ।
शुभ दिव्य जिनेन्द्राचें गाई तो चरित भक्तियुक्तमना ॥ ३१ ॥
तेणें कम्पित झालें आसन धरण प्रसन्न होऊन ।
आला कैलासनगीं दिलें मला त्यास आग्रहा करून ॥ ३२ ॥
दुःसह तेज जियेचें अशा विशल्येस फक्त सोडून ।
अन्य न समर्थ माझ्या पराजया मारुते ! मनीं जाण ॥ ३३ ॥
देहीं ज्याच्या अतिशय बल मी ऐशा सुरास जिंकीन ।
या द्रोणमेघतनयेपुढें असे मी खरीच बलहीन ॥ ३४ ॥
सूर्या थण्ड करी जें जें चन्द्राला करील अत्युष्ण ।
केलें अत्युग्र हिनें तप त्याचें तेज मज न हो सहन ॥ ३५ ॥
असतां शिरीषकुसुमासमान कोमल शरीर पूर्वभवीं ।
दुश्चर मुनीस देखिल तप आचरिलें हिनें वदे सुकवि ॥ ३६ ॥

---

[1] लक्ष्मणाला. [2] छातींतून. [3] मारुतीला. [4] चाकरांना. [5] तत्पर.

ऐशी ही इहलोकीं सुतपें ज्यांनीं अनेक आचरिलीं ।
त्यांनीं सुसार भूतल झालें त्यांचीच कीर्ति करि केली[1] ॥ ३७ ॥
घोर हिमातपवर्षा दुःसह वारेंहि हीस करु शकलें ।
कम्पित नच मेरूची शिखा[2] जशी केधवाहि नच हाले ॥ ३८ ॥
रूपानें ही अनुपम धैर्यें धर्में नि सुदृढ चित्त हिचें ।
अन्य स्त्रीजन असलें करावया तप समर्थ नच साचें ॥ ३९ ॥
श्रीजिनमतांत असलें तप आढळतें कदापि नान्यमतीं ।
लोकत्रयांत याचें अपूर्व फल बोलतात मुनि सुमति ॥ ४० ॥
अथवा यांत न विस्मय ज्यानें जीवास मुक्तिवास मिळे ।
इतर फलप्राप्ति तयें कठिन न केव्हांहि बोलतात भले ॥ ४१ ॥
मी तर परतन्त्र असे तपें पराजित हिनें मला केलें ।
जात्यें स्वगृहीं आतां क्षमा करावी अयोग्य हें घडलें ॥ ४२ ॥
यापरि मारुततनया वदतां शक्तीस देइ सोडून ।
पवनञ्जयखगनन्दन राहे सानन्दचित्त होऊन ॥ ४३ ॥

( विशल्येनें रामचंद्रादिकांना वन्दन केलें. नंतर तिनें लक्ष्मणाच्या अंगाला चन्दनाची उटी लाविली. व तिनें स्पर्शिलेली चन्दनाची उटी तिच्या मैत्रिणींनीं इतर विद्याधरांना व इंद्रजितादिक शत्रूंनाही लाविली. )

ती द्रोणमेघतनया सलज्ज होऊन रामपादयुगा ।
करयुग जोडुनि करिती झाली वन्दन धरून अनुरागा ॥ ४४ ॥
विद्याधरसचिवांनीं प्रशंसिले गुण तिचे प्रमोदानें ।
वन्दन केलें असतां जीवाद्याशीर्वचःप्रदानानें[3] ॥ ४५ ॥
इन्द्रासन्निध शोभे जशी शची लक्ष्मणासमीप तशी ।
शुभलक्षणा विशल्या शोभे कामासमीप रति जैशी ॥ ४६ ॥
एकान्तीं आलिङ्गी सुखसुप्ता[4] लक्ष्मणा विशल्या ती ।
सुकुमार-हस्तकमलें तत्पदयुगमर्दना करून सती ॥ ४७ ॥
गोशीर्षचन्दनाचा लक्ष्मणदेहास लाविला लेप ।
किञ्चित्कम्पित-हस्तें रामाज्ञासहि हरून सन्ताप ॥ ४८ ॥

---

१ क्रीडा. २ शिखर. ३ जीव, जय, आदिक आशीर्वादांनीं. ४ सुखानें झोपलेल्या.

गोशीर्षचन्दनाची उटी करें स्पर्शिली विशल्येनें ।
इतर खगांच्या अंगा केला मग लेप आलिवृन्दानें[1] ।। ४९ ।।
श्रीरामचन्द्र वदले इन्द्रजितादिक खगेश शत्रुगणा ।
चन्दन तें लावावें स्पर्श विशल्या करी जया सुमना ।। ५० ।।
रामाज्ञेनें शीतल लावियला लेप शत्रुगात्रास ।
आनन्द परम झाला ज्वर गेला नष्ट जाहला त्रास ।। ५१ ।।
जखमा ज्यांच्या अंगीं अनेक झाल्या सुवीर बहुत असे ।
श्रीद्रोणमेघकन्यास्नानजलें मुदित होति सौख्यरसें ।। ५२ ।।
गजपत्ति नि हय हेही स्नानजलस्पर्शनें वरे झाले ।
कान्ति चढे देहावरि सौख्याच्या ते पुरांत जणु बुडले ।। ५३ ।।
सुन्दर लक्ष्मण झाला जणु तो जन्मांतरास संप्राप्त ।
स्वाभाविक जणु निद्रित मुख त्याचें नच जना दिसे विकृत ।। ५४ ।।
मूर्च्छा विनाश पावे हळूं हळूं उघडिले तयें डोळे ।
वदला रावण कोठें गेला निजमुख करून तो काळें ।। ५५ ।।
ऐकून लक्ष्मणाच्या वचना आनन्द जाहला रामा ।
रोमांच देहिं उठले वदला तो त्यास शीघ्र हितकामा[2] ।। ५६ ।।
वत्सा ! रावण फेकुनि तुजवरि शक्त्यस्त्र मोद मानून ।
गेला स्वगृहीं आतां विनाश पावेल शत्रु मम म्हणुन ।। ५७ ।।
द्रोणात्मजा-विशल्यागमनें[3] जीवन तुला पुनः लाभे ।
ऐसें बोलुनि कथिलें चरित तिचें सुजनिं नित्य जें शोभे ।। ५८ ।।
पाहे वळून लक्ष्मण तयास लक्ष्मीसमान ती दिसली ।
किंवा चन्द्राची द्युति निजपद सोडून या स्थलीं आली ।। ५९ ।।
यापरि विचार असतां करित तिच्या बोलल्या प्रधान सखी ।
व्हावा विवाह अपुला हिच्यासवें नाथ ! व्हाल परमसुखी ।। ६० ।।
लक्ष्मण वदला त्यांना होइल हें युक्त केवि मज न कळे ।
स्वामिन् ! चित्त जहालें अनुरक्त हिचें तुम्हाकडेचि वळे ।। ६१ ।।
( लक्ष्मणानें विशल्येबरोबर स्वतःचा विवाह करण्यास संमति दिली. )
झाला स्पर्श हिचा जो तुमच्या देहा तुम्हा न तो कळला ।
परि रत्न-काञ्चनाचा गमेल संयोग हा विभो सकलां ।। ६२ ।।

---

१ सखीसमूहानें. २ लोकहिताची इच्छा करणारा. ३ विशल्येच्या येण्यानें.

भाषण ऐकुनि ऐसें लक्ष्मण अनुकूल हो विवाहास ।
सर्वसखींच्या हृदयीं तेव्हां प्रगटे अतीव उल्हास ॥ ६३ ॥
विद्यांच्या साहाय्यें कार्यें केलीं प्रशस्त तत्काल ।
रचिला विवाहमण्डप रत्नसुवर्णें करून सुविशाल ॥ ६४ ॥
जणु अमरांचें वैभव येथें एकत्र जाहलें वाटे ।
सर्वांच्या हृदयामधिं आत्यन्तिक हर्षपूरभरें[1] दाटे ॥ ६५ ॥
लक्ष्मण आणि विशल्या याचा झाला विवाह समरांत ।
पुण्याचा हा महिमा करोत सज्जन सुपुण्य दिनरात ॥ ६६ ॥
व्रत-तप-पूजनदानें पूर्वभवीं विपुल पुण्य सांचविलें ।
आयुर्विराम[2] होणें सौमित्रीचें म्हणून तें टळलें ॥ ६७ ॥
पुण्य करी जिनदासा त्याविण सङ्कट टळे न केव्हांही ।
इष्टप्राप्ति-अनिष्टत्याग-फलें त्यास येति जगिं पाही ॥ ६८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे विशल्यासमागमाभिधानं नाम पंचषष्टितमं पर्व ॥ ६५ ॥

---

१ हर्षपूरांचा समूह. २ आयुष्य समाप्त होणें.

## शासष्ट ते एकोणसत्तराव्या पर्वांतील कथासार.

विशल्येच्या आगमनानें लक्ष्मणावर फेकलेलें शक्त्यस्त्र व्यर्थ गेलें. तो बरा झाला व विशल्येबरोबर त्याचा विवाहही झाला हें वृत्त दूताकडून ऐकल्यावर रावणाच्या आनंदावर विरजण पडलें. मनांत थोडासा मत्सर उत्पन्न झाला. पण हंसून तो म्हणाला– कांहीं हरकत नाहीं. माझें याच्यांत कांहीं नुकसान नाहीं.

हें भाषण ऐकून मृगाङ्क वगैरे मंत्र्यांनीं त्याला दुराग्रहापासून परावृत्त करावें या हेतूनें याप्रमाणें बोलावयास प्रारंभ केला. ते म्हणाले– "स्वामिन्, आपणाला राग येवो किंवा हर्ष होवो सेवकांनीं नेहमी मालकाचें हितच पाहिलें पाहिजे व हितच केलें पाहिजे. श्रीरामचंद्र व लक्ष्मण यांना प्रयत्नावांचून पूर्वपुण्योदयानें सिंहवाहिनी व गरुडवाहिनी विद्या मिळाल्या हें आज सर्वांना माहित झालें आहे. आपले दोन पुत्र जे आपल्या दोन बाहुप्रमाणें पराक्रमी होते ते व आपला पराक्रमी भाऊ कुंभकर्ण हे तिघे नागपाशांनीं बद्ध करून शत्रूनें आपल्या अटकेंत ठेवले आहेत. हे देव, शत्रु जगला पण आपले पुत्र व बंधु यांना शत्रु मारून टाकतील असें वाटतें. यास्तव आपण आमचें हिताचे शब्द ऐकावेत."

"हे प्रभो, आपण रामाबरोबर संधि करावा व सीता त्याला अर्पण करावी. म्हणजे लोक सुखी होतील व आपली कीर्ति पसरेल. नीतीचे नियम पाळणारा राजा सर्वमान्य होतो. असा राजा धर्माला वाढवितो." याप्रमाणें बोलून त्या वृद्धमंत्र्यांनीं रावणाच्या चरणावर आपलें डोकें ठेविलें. रावणानें त्यांना आदरानें उठविलें व आपलें भाषण मला मान्य आहे व आपण रामाकडे संधि करण्याला दूत पाठवावा.

मंत्र्यांना आनंद वाटला. त्यांनीं एका कुशल दूताला पाठवावयाचें ठरविलें. दूत रावणाला नमस्कार करून निघाला तेव्हां डोळ्याच्या खुणेनें आपला अभिप्राय शत्रूला कळविण्यास त्यास बाध्य केलें. हें रावणानें खुणावणें विषयुक्त अन्नाप्रमाणें पुढें त्याला अहितकर झालें. असो.

दूत आपल्याबरोबर रक्षक म्हणून कांहीं वीर घेऊन भामण्डलाकडे गेला. रामाकडे त्याला भामण्डलानें नेलें. रामचंद्रांना नमस्कार करून दूत याप्रमाणें आपल्या मुखानें रावणाचा अभिप्राय बोलूं लागला– "रामचंद्रा, आतां युद्धाचें प्रयोजन नाहीं. युद्धानें राजे नरकांत दुःख भोगतात. युद्धानें जरी कार्यसिद्धि झाली तरी वैर शांत होत नाहीं. तें मनांत राहतेंच. यास्तव हें युद्ध बंद कर व प्रेम कर. रामचंद्रा, प्रेमानें मी तुझें हित करीन. सिंह जरी पराक्रमी असला तरी पर्वताच्या गुहेचा आश्रय करून तों सुखी होतो. तसा तूं माझ्या आश्रयानें राहा. तुझें त्यामुळें हितच होईल. मी सुरासुरांना जिंकिलें आहे. लक्षावधि राजांना युद्धांत मी मारलें आहे. त्याच्या हाडांचा हा शुभ्र समूह कैलासाप्रमाणें उंच दिसत आहे. ही सागरान्त पृथिवी व ही लंकाही मी तुला देतो. हर्षानें हिचा स्वीकार कर व यांच्या ऐवजीं मला तूं माझे दोन पुत्र व भाऊ परत कर. तसेंच सीता माझ्याजवळ राहण्यासाठीं तिला अनुमति दे. जर हें कार्य तूं करणार नाहींस तर तुझें कुशल होणार नाहीं. मी तर माझ्या बाहुबलानें माझ्या पुत्रांना व भावाला परत आणीन हें ध्यानांत घे."

यावर रामचंद्र म्हणाले– "मला तुझें राज्य नको आहे व अन्यस्त्रियाही मला नकोत. माझी सीता मला आदरानें दे. मी सुखानें तिच्यासह वनांत राहीन. तूं सगळ्या पृथ्वीचा पति होऊन आनंदानें राहा असें हे दूता, लंकेला जाऊन तूं रावणास सांग." रामचंद्राच्या या भाषणाची सर्वांनीं प्रशंसा केली.

पुनः दूत रावणाचा अभिप्राय सांगू लागला. "रामचंद्रा, तूं समुद्र उल्लंघून येथपर्यंत आलास परंतु स्वतःचें कल्याण कसें करून घ्यावें याचें तुला ज्ञान नाहीं. रावण रागावला तर सीता परत मिळावयाची नाहीच पण आपले प्राणही तूं गमावून बसशील. रावणाच्या बंधूला व पुत्रांना कैदेंत टाकलें म्हणून गर्व करूं नकोस. रावण त्यांना सोडवून आणण्यास समर्थ आहे."

दूताचें हें भाषण ऐकून भामण्डल रागावला. त्यानें हातांत तरवार घेतली व त्याच्या अंगावर धावणार इतक्यांत लक्ष्मणानें त्याचा हात धरला. या क्षुद्र दूतावर पराक्रम गाजविणें योग्य नाहीं. वीज कडाडून परळावर पडावी तसें हें कार्य तुझें हास्यास्पद होईल. खरा क्षत्रिय ब्राह्मण, यति, स्त्री, गाय व दूत यांना मारीत नसतो. असें म्हणून त्यानें त्याचा राग शांत केला.

पुनः दूत रामास म्हणाला– " रामचंद्रा, हे मंत्री तुला हिताचा सल्ला देत नाहींत. तूं सीता रावणास दे व पुष्पकयानांत बसून आनंदानें विहार कर. " असें पुनः पुनः बडबडू लागल्यामुळें वीरांनीं त्याला हाकालून दिलें.

तो दूत परत रावणाकडे गेला व त्यानें– " प्रभो, आपण कळविल्याप्रमाणें मी रामचंद्राला पुष्कळ समजावून सांगितलें. परंतु त्याच्या मनांत तिळाच्या टरफला-एवढाही लोभ उत्पन्न झाला नाहीं. "

सुग्रीवादिकांनीं हें प्रभो, आपल्याविषयीं अयोग्य असें भाषण केलें. ते म्हणाले– " रावण नीचकुली माणसाप्रमाणें बोलतो. असें बोलतांना त्याच्या जिभेचे शेंकडों तुकडे कां होत नाहींत ? त्याचें तोंड म्हणजे विष्ठेनें भरलेल्या कुंड्याप्रमाणें आहे. हे दूता, तुझ्या मालकाला पिशाच लागलें असेल किंवा सन्निपात तरी झाला असेल. लक्ष्मण हा उत्तम मांत्रिक व उत्तम वैद्य आहे. तो तुझ्या मालकाचें पिशाच नाहींसें करील. व सन्निपात नष्ट करील." सुग्रीवादिकांनीं केलेली निंदा मला सहन झाली नाहीं. मी त्यांच्या अंगावर धांवून गेलों तेव्हां भामण्डल माझ्यावर वार करण्यासाठीं आला. मी तेथून निघून आपल्या चरणाकडे धांवत आलों.

ग्रंथकार येथें म्हणतात–" रावण शास्त्रज्ञ होता, नीतिचतुर होता पण मोहरूपी मेघानें त्याचा विवेकसूर्य आच्छादला गेला होता. "

( पर्व सदसष्टावें )

दूताचें भाषण ऐकून रावणानें मंत्रिगणाला बोलाविलें व पुढें काय करावें असा प्रश्न विचारला. मी शत्रुसैन्य झोपल्यावर अंधाऱ्यारात्रीं शत्रूच्या शिबिरांत घुसून बंधु व पुत्रांना सोडवून आणीन पण हा विषय संशयग्रस्त आहे.

पण मला एक उपाय सुचला आहे तो आपणापुढें सांगतो असें म्हणून त्यानें ' बहुरूपिणी ' विद्या सिद्ध करण्याचा विचार कळविला. ही विद्या माझें कार्य अस्खलित करील. मंत्रिगणानें संमति दिल्यावर रावणानें आपल्या नोकरांना आज्ञा दिली– माझ्या प्रासादांत असलेलें शांतिजिनेश्वराचें मंदिर उत्तम सजवा. तसेंच लंकेंतील सर्व जिनमंदिरेंही सुशोभित करा.

यानंतर मंदोदरीला बोलावून रावणानें हा कार्यभार सोंपविला व मंदोदरीनें राष्ट्राधिपति, श्रेष्ठी, ग्रामपति इत्यादिकांना बोलावून सर्व जिनमंदिरें ध्वजातोरणादिकांनीं भूषित करवून दररोज सर्वांनीं ' बहुरूपिणी ' विद्या सिद्ध होईपर्यंत फाल्गुन शुद्ध

अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत जिनमंदिरांत अभिषेक-पूजादिक धर्मकार्यें करावींत. या पर्वांत हिंसा वर्ज करावी. नियम पाळावेत. कोणी उपसर्ग त्रास दिला तर सहन करावा.

चतुर्णिकाय देव देखिल या पर्वकालांत नंदीश्वरद्वीपांत जाऊन तेथें जिन-प्रतिमांचा क्षीरसागरजलांनीं अभिषेक करितात व सुवर्णरत्नखचित कमलें जिनचरणी वाहतात.

यासाठीं प्रजाजनांनीं जिनमंदिरांत अभिषेक पूजनासाठीं भव्यजनांना आमंत्रण देऊन बोलवावें व सर्वांनीं अभिषेकपूजा पाहावी. नियमादिक धारण करावेंत.

शांतिजिनेश्वराचें मंदिर मंदरपर्वताप्रमाणें उंच होतें. त्या मंदिरांत रावण स्नानानें शुचिर्भूत होऊन गेला. तेथें वाद्यें वाजत होतीं. मंदिरांत शांतिप्रभूचा मोठ्या भक्तीनें पञ्चामृताभिषेक त्यानें केला नंतर पूजन करून त्यांच्या गुणांची स्तुति केली. यानंतर गुडघे टेकून व दोन हात जोडून विनयानें प्रभूला नमस्कार केला. नंतर प्रभूच्या मुखापुढें पर्यङ्कार्धासनानें बसून अत्यंत शांतभावनेनें हातांत जपमाला घेऊन नासाग्रावर दृष्टि स्थिर करून तो विद्यासाधनांत लीन झाला.

लोकदेखिल दररोज जिनमंदिरांत पूजाभिषेक करू लागले. मंदोदरी राणीच्या आज्ञेला अनुसरून लोक नियमादिक यथाशक्ति पाळू लागले.

# शहासष्टावें पर्व.

शक्त्यस्त्र विफल झालें लक्ष्मण झाला बरा लढायास ।
लाभ विशल्येचा त्या लग्नहि त्याशीच हो अनायास ॥ १ ॥
दूतोक्त वृत्त ऐकुनि विस्मय रावणमनास बहु वाटे ।
मत्सरहि वाटला त्या जणु तद्धृदयास टोंचले कांटे ॥ २ ॥
वदला हंसून रावण एणें माझी न हानि कांहींही ।
परि मनिं खिन्नपणा ये वाटे हा शत्रु दुर्निवार अहि[1] ॥ ३ ॥
जे मन्त्रचतुर मन्त्री मृगाङ्क आदिक सुपथ्य त्या वदले ।
राजन्! भाषण अमुचें ऐकावें शान्तचित्त करुनि भलें ॥ ४ ॥
जरि आपणास आला प्रकोप किंवा प्रमोद मनिं झाला ।
सत्यार्थचि भृत्यांनीं निर्भय होऊन पाहिजे कथिला ॥ ५ ॥

[ मृगाङ्क वगैरे मंत्र्यांनीं रामाशीं संधि करावा व सीता त्याला द्यावी म्हणजे आपलें यश निर्मल होईल असा उपदेश रावणाला केला व तो मान्य केल्यावर रामचंद्राकडे जो दूत पाठविला त्याला रावणानें खुणेनें आपला अभिप्राय बोलण्यास बाध्य केलें. ]

श्रीरामचन्द्र लक्ष्मण यांना यत्नाविणें महापुण्यें ।
सैंही-गारुडविद्या[2] वश झाल्या आज कोण नच जाणें ॥ ६ ॥
श्रीकुम्भकर्ण नाथा, सुपुत्रयुग मेघनाद इन्द्रजित ।
केलें बन्धन यांना शत्रूंनीं हें मनांत घ्या त्वरित ॥ ७ ॥
जी दिव्य, ओज अनुपम जिचें अशी शक्ति लक्ष्मणावरि ती ।
फेकून वृथा गेली झाली असमर्थ नाथ अरिघातीं ॥ ८ ॥
हे देव! शत्रु जगला परि निश्चित नाश बन्धु-पुत्रांचा ।
होईल असें दिसतें विफलपणा तेवि दिव्य अस्त्रांचा ॥ ९ ॥
हें जाणुनि करुणा करि या उपदेशा न नाथ! अव्हेरी ।
अमुच्या वचनां आपण समजावें स्वमनिं पूर्ण हितकारी ॥ १० ॥

---

१ सर्प. २ सिंहवाहिनी व गरुडवाहिनी विद्या.

सीता त्यागुनि नाथा! हृदयीं सद्धर्मबुद्धि ठेवावी।
होतील लोक सगळे सुखी सुरें कीर्ति सतत तव गावी॥ ११॥
संधि श्रीरामाशीं करून समरीं जनक्षया वारी।
ऐशा कृतींत दोष न अयशोऽनल[1] शमविण्यास ही वारि[2]॥ १२॥
जो नीतिनियम पाळी राजा तो लोकमान्यता पावे।
नृपधर्माचा कर्ता रत्नें रत्नाकरींच जन्मावें॥ १३॥
बोलून असें केला वृद्धांनीं रावणा नमस्कार।
उठवून आदरानें म्हटलें मज मान्य वचन हें थोर॥ १४॥
मी दूत रामचन्द्रासन्निध तत्काल पाठवुनि देतो।
ऐसें बोलुनि निपुणा संज्ञेनें स्वमत शीघ्र कळवी तो॥ १५॥
होता नयज्ञ ऐसा मन्त्र्यांनीं दूत मुदित होऊन।
सामन्त एक तत्क्षणि पाठविला स्वमत त्यास सांगून॥ १६॥
परि रावणें तयाला खुणवून स्वेष्ट[3] तेंच सांगाया।
तत्काल बाध्य केलें सविषौषधसमचि[4] जाय तें वाया॥ १७॥
सन्तुष्ट दूत गेला करुनि नमस्कार रावणा चतुर।
घेउनि कांहीं रक्षकबल निर्भयता मनीं धरी धीर॥ १८॥
बाहेर सैन्य ठेवुनि कांहीं निवडक मनुष्य रक्षाया।
घेऊन दूत भामण्डलसन्निध येइ करुनि नमन तया॥ १९॥
नेलें तयें तयाला रामासन्निध नमून विनयानें।
सांगे दशकण्ठाभिप्राया रामास सकल मधुरपणें॥ २०॥

[दूतमुखानें रावणानें रामाला सगळी पृथ्वी मी तुला देतो. पण मला माझा भाऊ दोन पुत्र व सीता दे असें सांगितलें.]

श्रीरामा मद्वचनें स्वामी रावण तुम्हासवें वदतो।
कर्णपुटें तें घ्यावें स्वपरहितास्तव सदैव तो झटतो॥ २१॥
आतां नच युद्धाचें वाटे राघव मला प्रयोजनसे।
युद्धाभिमान नरका नेतो लोकत्रयांत करुनि हसें॥ २२॥
जी कार्यसिद्धि होते प्रेमंचि कारण तियेस वदति बुध।
युद्धें होय जनक्षय तथापि होईल कार्य नच सिद्ध॥ २३॥

१ अकीर्तिरूपी अग्नि. २ पाणी. ३ आपला अभिप्राय. ४ विष मिसळलेल्या औषधासारखें.

अथवा सिद्ध जहालें शुद्ध मनें राहतीं न उभयांचीं ।
ती कार्यसिद्धि निन्द्यचि उरीं सदा द्वेषभावना जाची ॥ २४ ॥
दुर्वृत्त नरक शंख नि धवलाङ्ग नि असुर शम्वरादिक हे ।
सङ्ग्रामप्रेमानें मरून कुगतींत फिरति हें पाहें ॥ २५ ॥
प्रीति करी माझ्यावर रामा हितहेतु तीच होईल ।
सिंह महाशैलाच्या गुहाश्रयानेंचि सौख्य मिळवील ॥ २६ ॥
ज्याचा अमरां दुःसह वाटे विक्रम जयें सुरेन्द्रास ।
वन्दीगृहांत टाकुनि वश केलें मित्र तूं करी त्यास ॥ २७ ॥
पातालीं वा भूतलि आकाशीं स्वेच्छया विहार करी ।
क्रुद्ध सुरासुर देखिल समर्थ होति न लढावया समरीं ॥ २८ ॥
नानाप्रचण्ड समरीं वरिलें ज्या सतत वीरलक्ष्मीनें ।
तो मी असे दशानन तत्कीर्ति न ऐकिली तुवा कानें ॥ २९ ॥
ही सागरान्त पृथिवी विद्याधरयुक्त राघवा तुजला ।
लङ्काहि सर्व देतो तद्दानीं हर्ष वाटतो मजला ॥ ३० ॥
परि कुम्भकर्ण माझा भाउ नि सुतयुग्म दे मला रामा ।
सीतेची ही अनुमति दे ती आहे त्रिलोकिं अभिरामा ॥ ३१ ॥
हें कार्य न जरि करिशिल केंव्हांही तव न कुशल होईल ।
आणिल वद्ध भ्रात्या पुत्रयुगा मम समर्थ बाहुवल ॥ ३२ ॥
[ दूतमुखानें रावणानें केलेल्या भाषणाला रामचंद्राचें उत्तर.]
श्रीरामचन्द्र वदले राज्य मला दे असें न मागेन ।
अन्य स्त्रियाहि मजला नकोत इच्छाहि अन्य विभवीं न ॥ ३३ ॥
परमादरभावानें सीतेला पाठवून देशील ।
तव वन्धु नि सुतयुग्मा राघव सोडील हा दयाशील ॥ ३४ ॥
सीतेसह मी राहिन वनांत सन्तोष हृदयिं मानून ।
तूं सकलभूमिपति हो माझें राहिल सदा प्रसन्न मन ॥ ३५ ॥
यापरि जाउनि दूता लङ्कापरमेश्वरास हें सांग ।
कर्तव्य हेंचि हितकर होइल तत्कीर्तिवृद्धि निर्भङ्ग ॥ ३६ ॥
हें रामचन्द्रभाषण सर्व सभेंतिल जनास आवडलें ।
ऐकुनि सामन्तानें वचन तयाचें पुनः असें म्हटलें ॥ ३७ ॥

१ अविनाशी.

[ पुनः दूतमुखानें रावणाचें रामाबरोबर भाषण. ]

आलास राघवा तूं निर्भय होऊन उदधि लङ्घून ।
नृपकार्य परि न समजे साधुनि घे वा स्वकीय कल्याण ॥ ३८ ॥
सीता परत मिळावी आशा टाकून दे मनांतून ।
दशकण्ठ कुपित होतां न जीविताशाहि हें मनीं आण ॥ ३९ ॥
जे बुद्धिमन्त असती निजजीवितरक्षणार्थ ते त्यजिती ।
धनदाराही कां कीं, जीवित हेंचि प्रधान[1]तम जगतीं ॥ ४० ॥
जरि सिंह-गरुडविद्या लाभ तुला जाहला असे रामा ।
दशकण्ठ कुपित होतां नाहीं येतील त्या तुझ्या कामा ॥ ४१ ॥
जरि पुत्रबन्धु माझे निगडित[2] केलेस नागपाशांनीं ।
तूं सोड गर्व त्याचा करून आणीन मुक्त झणि जाणी ॥ ४२ ॥
करिशील सन्धि नच जरि न जानकी न स्वजीविताशाही ।
उभयभ्रष्टचि होशिल सीताशा सोड मृगजलासम ही ॥ ४३ ॥
मी चतुर सर्वशास्त्रीं इन्द्रादिक खगगणास जिंकून ।
झालों पृथ्वीस्वामी मिळेल सीता न परत तुज जाण ॥ ४४ ॥
माझ्या बाहुबलानें असङ्ख्य-उद्ध्वस्त जाहले राजे ।
हा अस्थिवृन्द[3] त्यांचा कैलासाचलसमान सितें[4] साजे ॥ ४५ ॥
बोलुनि यापरि थाम्बे जेव्हां सामन्तदूत चतुरपणें ।
भामण्डल कोपानें वदला अतिलाल करुनि निजनयनें ॥ ४६ ॥

[ दूताला भामण्डल कोपानें बोलून त्याला तरवारीनें मारण्यास धावला.
तेव्हां लक्ष्मणानें त्याचा हात पकडून त्याला थांबविलें. ]

लज्जा कशी न वाटे दुर्बुद्धे बोलतोस तूं काय ।
कोल्ह्यासमान वडवड करिशी स्वगृहास पळुनि तूं जाय ॥ ४७ ॥
सीता आम्ही आणू अधमा मारून रावणा त्वरित ।
पशुतुल्यराक्षसाचा विक्रम आम्हास जाहला विदित[5] ॥ ४८ ॥
बोलुनि यापरि काढुनि कोशांतुनि खड्ग मारण्या धावे ।
भामण्डल लक्ष्मण कर धरि त्याचा हें अकार्य नच व्हावें ॥ ४९ ॥

---

१ अतिशय मुख्य. २ बद्ध केलेस. ३ हाडांचा समूह. ४ पांढरा.
५ माहीत झाला.

[ सचिवांनीं भामण्डलाचा राग शांत केला. ]

गरल-स्फुलिंग ज्याचे पडति मुखांतुनि असा महासर्प ।
मान्त्रिक मन्त्रें करिती वश त्याचा गळुनि जातसे दर्प ॥ ५० ॥
सोडून दे नरेन्द्रा दूता मारून काय उपयोग ।
वीज कडाडुनि पडली परळावरि विफल तो असे योग ॥ ५१ ॥
जो गण्डस्थल फोडी हत्तीचे प्रबल विक्रमी सिंह ।
ऐकून मेघगर्जन होउन कां क्षुब्ध पावतो मोह ॥ ५२ ॥
प्रतिशब्द दूत वदतो पोपट जैसा न कोप त्यावरती ।
रागावणें उचित कां सचिव द्युतिमण्डला[2] असे वदती ॥ ५३ ॥
यापरि बोलुनि सचिवें भामण्डलकोप शान्त जैं केला ।
निर्भय होउनि रावणदूत तदा नृपसभीं असें वदला ॥ ५४ ॥

[ पुनः दूत बडबडू लागला असें पाहून इतर वीरांनीं त्याला हांकालून दिलें. ]

हे सर्व सचिव राघव अव्यापारांत योजिती तुजला ।
निजमतिवैभवनयनें[3] स्वहितविलोकन करीं सदा विमला ॥ ५५ ॥
सीताग्रह दे सोडुनि पुष्पकयानीं[4] बसून विहर सुखें ।
इन्द्रासम तव गाइन निर्मल यश रामचन्द्र एकमुखें ॥ ५६ ॥
यापरि बडबड त्याची असह्य होऊन इतर वीरांनीं ।
हाकालून दिलें त्या गेला तो दूत दशमुखास्थानीं ॥ ५७ ॥

[ रामचंद्राला मी अनेकप्रकारें लोभ दाखवून सीतेविषयीं अनुज्ञा घेण्याचा प्रयत्न केला. पण रामचंद्र सीता देण्याचें कबूल करीत नाहीं असें दूतानें रावणाला सांगितलें. ]

तो रावणास वदला नाथा रामास मी अनेक परी ।
सांगितलें परि त्याच्या शिरला तिळमात्रही न लोभ उरीं ॥ ५८ ॥
नानादेश जियेमधिं मणिरत्नांच्या अनेक खनि जींत ।
पृथ्वी समुद्रवेष्टित देतो घे सज्जना तुला त्वरित ॥ ५९ ॥
मोठे सुलक्षणी गज घोडे रथ पुष्पयान कामग[5] जें ।
त्रिसहस्र परमसुन्दर कन्या घे वाक्य हें मनीं न रुजे ॥ ६० ॥

---

१ विषाच्या ठिणग्या. २ भामण्डलाला. ३ आपल्या विशाल बुद्धिरूपी डोळ्यांतील. ४ पुष्पक विमान. ५ इच्छित वेगानें जाणारें.

सूर्यासम सिंहासन, चन्द्रासम शुभ्र कान्तिमच्छत्र ।
देतों मी वदलों परि राघव लोभा न जाहला पात्र ॥ ६१ ॥
सीता आज्ञा मानुनि तुझी मला जरि वरील हें राज्य ।
निष्कण्टक मी देतो आहे लोकत्रयांत जे प्राज्य[1] ॥ ६२ ॥
ऐसें मी बहु वदलों परि रामा मान्य हें नसे कांहीं ।
सीताचि परत द्या मज एकचि आग्रह मनांत तो वाही ॥ ६३ ॥
वेत्रासनेंचि आम्ही मानू सन्तोष बोललों त्यास ।
परि मान्य हें तयाला नसे असे तो दुराग्रहावास[2] ॥ ६४ ॥
लोकत्रयांत सुन्दर लोकोत्तर वस्तु नाथ ! देशील ।
तरिही त्याच्या हृदया तिलतुषमात्रहि न रुचिर होईल ॥ ६५ ॥
नाथा ! तुम्हा वदला दशानना सर्व निन्द्यवचन असे ।
वदणें कदापि योग्य न मजला हें मान्य केंधवाहि नसे ॥ ६६ ॥

[ हे प्रभो, रामचंद्र आपल्याविषयीं असें म्हणाले असें दूतानें रावणास सांगितलें.]

नीचकुली मनुजासम भाषण करितोस जीभ शतखण्ड ।
कां न बरें तव होते मुख जणु तव गूथ[3]भरितसें कुण्ड ॥ ६७ ॥
शचिपतिभोग मिळाले सीतेवांचून विफल ते सगळे ।
तूं भोग मही सगळी नको मला मन वनाकडेचि पळे ॥ ६८ ॥
तूं परवनितेसाठीं झालास मरावयास उद्युक्त ।
माझ्या प्रियभार्येस्तव लढून मरणें मला गमे शस्त[4] ॥ ६९ ॥
सर्व जगाच्या कन्या भोग सुखें मी नको म्हणेन नच ।
वनिं फलपर्णा सेवुनि सीतेसह वास मज रुचे साच ॥ ७० ॥

[ सुग्रीवादिकांनीं हे प्रभो, आपल्याविषयीं जें भाषण केलें तें असे.]

सुग्रीवादिक वदले हसून मजला तुझा असे झाला ।
स्वामी पिशाचपीडित विपरीत त्वन्मुखें असे वदला ॥ ७१ ॥
झाला काय तयाला प्रचण्डसा सन्निपातवात जरी ।
लक्ष्मण वैद्य असे हा रोगा त्याच्या अवश्य नष्ट करी ॥ ७२ ॥
सुग्रीवें जी केली निन्दा मज अग्नितुल्यशी गमली ।
श्वान गजावरि भुंके जैसें वदलों तयास वचनाली[5] ॥ ७३ ॥

१ उत्तम. २ दुराग्रहाचें घर. ३ विष्टा. ४ प्रशंसनीय. ५ वाक्यपङ्क्ति.

[ मी सुग्रीवादिकांना याप्रमाणें उत्तर दिलें. ]

वाटे रामाविषयीं सुग्रीवा गर्व जो तुझ्या हृदयीं ।
निन्दुनि दशाननाला मृति येइल शीघ्र रे तुझ्या उदयीं ॥ ७४ ॥
वदला विराध कोपें स्वामी तव शान्त कां वरें वसला ।
युद्ध करो माझ्यासह सीताहृतिजन्य[1] चाखवीन फला ॥ ७५ ॥
उत्तर तया दिलें मी रामासह युद्ध घोर खगेनाथें[2] ।
केलें तदा तयाचा दिसला विक्रम न तें तुला स्मरतें ॥ ७६ ॥
राघव सोनकिड्यासम चमके रावण असे सहस्रकर[3] ।
कूपासम राम कुठें कोठें रावण समुद्रगंभीर ॥ ७७ ॥
लोकत्रयांत त्याचा असे दरारा कुणा न अज्ञात ।
रावण-महासमुद्रा तरून जायास कोण रे शक्त[4] ॥ ७८ ॥
हयगजसर्प भयंकर असंख्य पादात[5] होचि सघन तरु[6] ।
रावण महाटवीही राम म्हणे कोणता उपाय करूं ॥ ७९ ॥
कम्पित करी न वारा सुरशैला सागरा न रवि सुकवी ।
रामा दशाननाला जिंकाया जन्म अन्य तूं घेईं ॥ ८० ॥
यापरि मम वचनानें भामण्डल कोपरक्तनयन वने ।
मारावयास धावे अविवेकी करगृहीतखड्गानें[7] ॥ ८१ ॥
लक्ष्मण धरून त्याला वदला भामण्डला न वार करी ।
कोल्ह्यावरी न धावे मृगेन्द्र मारी करीस तोचि अरि ॥ ८२ ॥
आहेस तूं नरेश्वर शौर्याचा मूर्तिमन्त अवतार ।
नीतिज्ञा नच मारी आहे हा क्षुद्र दूत निःसार ॥ ८३ ॥
क्षत्रिय वीर असे जो सभयावरि टाकितो न तो हात ।
ब्राह्मण, यति, बालस्त्री गाय तयें वध्य होति नच दूत ॥ ८४ ॥
ऐशा उपदेशानें भामण्डल चित्त जाहलें शान्त ।
आलों पळुनि भयानें मम मन तव चरणिं होय विश्रान्त ॥ ८५ ॥
रिपुचरित देव कथिलें आतां जें योग्य तें करा कार्य ।
वचनीं बल दूताचें क्षत्रिय कृति करिति ज्यांत बलवीर्य ॥ ८६ ॥

---

१ सीतेचें हरणापासून उत्पन्न झालेलें. २ विद्याधरांच्या स्वामीनें— रावणानें. ३ सूर्य. ४ समर्थ. ५ पायदळ. ६ दाटवृक्ष. ७ हातांत घेतलेल्या तरवारीनें.

जाणुनि अनेक शास्त्रें होती जरि नीतिचतुर नर थोर।
जिनदास मोहमेघें विवेकरवि रुद्ध होतसे तीव्र ॥ ८७॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे रावणदूतागमाभिधानं नाम षट्षष्टितमं पर्व ॥ ६६ ॥

## सदसष्टावें पर्व.

निजदूतवचन ऐकुनि राक्षसपति मन्त्रिवृन्द जो अपुला ।
बोलावून करावें काय पुढें प्रश्न हा तया वदला ॥ १ ॥
या भयद संगरांमधि[1] शत्रूंना जिंकिलें सुदैवानें ।
बन्धु नि सुतद्वयाची स्थिति होइल काय कोण हें नेणें ॥ २ ॥
अरिसैन्य झोपल्यावरि सहसा आक्रमण करुनि तिमिरांत ।
आणू पुत्रां भ्रात्या हितकर परि हो न संशयाक्रान्त ॥ ३ ॥

( शत्रूंना जिंकण्यासाठीं रावणानें बहुरूपानामक विद्या सिद्ध करण्याचा निश्चय केला.)

यापरि विचार असतां करीत सुचला उपाय एक तया ।
झालें प्रसन्न त्याचें मन संमुख जाहलें न तें अनया ॥ ४ ॥
' बहुरूपा ' नांवाची विद्या साधीन जी प्रसिद्ध असे ।
अस्खलित कार्य करि जी विघ्नांचा नाश जींत पूर्ण वसे ॥ ५ ॥
यापरि विचार चित्तीं करून किङ्करगणास आज्ञापी ।
शान्तिजिनमन्दिरा द्रुत सजवा शिखरें नभास जणु जें पी ॥ ६ ॥
लङ्केमधील सगळ्या जिनमन्दिरिं थाटमाट करवून ।
पूजन बहु भक्तीनें करोत जन भव्य शुद्ध होऊन ॥ ७ ॥
हा कार्यभार सगळा राणी मन्दोदरीकडे राहे ।
आज्ञा तिची जनांनीं मानावी शिरिं धरून नित पाहे ॥ ८ ॥
मुनिसुव्रतनाथाच्या युगांत धर्मप्रकर्ष होऊन ।
झाली भरतक्षेत्रीं जिनमन्दिरभूषिता धरा[2] पूर्ण ॥ ९ ॥
राष्ट्राधिपति नि भूप श्रेष्ठी ग्रामेश आदि सुजनांनीं ।
केलीं जिनालयें बहुभूषित सत्तोरणें पताकांनीं ॥ १० ॥
सद्धर्मपक्ष घेउनि रक्षण करण्यांत दक्ष भक्तजनीं ।
शासनदेवाधिष्ठित-जिनसदनें शोभली तदा अवनि ॥ ११ ॥
जाऊन भव्य जेथें जिनाभिषेका नि पूजना करिती ।
ऐशीं तीं जिनसदनें स्वर्गीयविमान कान्ति जणु वरिती ॥ १२ ॥

---

१ युद्धांत. २ पृथ्वी.

पर्वत-पत्तननगर-ग्रामवनीं प्रतिगृहीं जिनेन्द्रांचीं ।
बिम्बें शुभकर होतीं जीं हरितीं दुःखपङ्क्ति दुरितांची ॥ १३ ॥
सङ्गम असे नद्यांचा जेथें चौकांत तेवि वागेंत ।
होतीं सुव्रततीर्थीं जिनसदनें विपुलपुण्य वितरीत[1] ॥ १४ ॥
शारदचन्द्रासम जीं सुन्दर संगीत चालतें सतत ।
नानावाद्यांचा ध्वनि समुद्र जणु गर्जना असे करित ॥ १५ ॥
जेथें त्रिकाल येती वन्दन करण्यास साधुसन्दोहें[2] ।
दर्शन ज्यांचें हरितें मनुजांच्या मानसांतला मोह ॥ १६ ॥
नानामणिरत्नांची कान्ति हरी अन्धकार दिनरात्रीं ।
जिनमन्दिरें अशीं वहु देतीं आनन्द भव्यजननेत्रीं ॥ १७ ॥
त्यांतील जिनप्रतिमा परिवारें सहित पञ्चवर्णांच्या ।
पूजी भव्यांचा गण कार्या ज्या करिति जन्महरणाच्या ॥ १८ ॥
लंकानगरीं तैशीं जीं विद्याधरपुरें तिथें प्रचुर ।
विजयार्धपर्वतावरि हरिती जिनसौधें[3] मानसा रुचिर ॥ १९ ॥
प्रासाद फार मोठा दशाननाचा विमान सुरपतिचें ।
जणु तो भासे तेथें शोभे मन्दिर जिनेन्द्र शान्तीचें ॥ २० ॥
अत्युच्च तें जयाला दशशत[4] होते सुवर्णरत्नांचे ।
खांब जयाची शोभा हसुनि स्वर्गा शतध्वजें नाचें ॥ २१ ॥
वन्दन करीत असतां देवांची मुकुटकान्ति यच्चरणीं ।
पडते ते जिन हरिती भव्यांचे क्लेश सकल मोहरणीं[5] ॥ २२ ॥
त्यांचें मन्दिर सुन्दर मन्दरगिरितुल्य वाटतें सुजना ।
रचितो धन्य जगीं तो होतो जगिं भव्य मुक्तिचा राणा ॥ २३ ॥
जें धन भव्यां लाभे सुकृताचा राशि हेंचि फल त्याचें ।
जिनधर्माचरणानें रविसम जिनदास मानिती साचें ॥ २४ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे शान्तिगृहकीर्तनं नाम सप्तषष्टितमं पर्व ॥ ६७ ॥

---

१ देत. २ मुनिसमूह. ३ जिनमंदिर. ४ एक हजार. ५ मोहाबरोबर युद्ध करतांना.

# अडसष्टावें पर्व.

फाल्गुन महिन्यामध्यें घेउनि धवलाष्टमीस[1] आरम्भ ।
नन्दीश्वरपर्वाचा होतो कीं अन्त पौर्णिमेस शुभ ॥ १ ॥
या अष्टदिनीं नियमग्रहणीं[2] तत्पर वलद्वयीं वीर ।
राहून तयें केला पुण्योच्चय[3] देइ सौख्य भरपूर ॥ २ ॥
या आठदिनीं युद्ध न करुं आम्ही तेवि अन्यहिंसाही ।
राहूं स्वहितीं तत्पर पूजुनि जिन ठेवु पूत[4] चित्तमही[5] ॥ ३ ॥
या आठदिनीं देवहि तत्पर राहति जिनेन्द्रपूजेंत ।
क्षीरसमुद्रजलांनीं जिनाभिषेकांत राहती निरत ॥ ४ ॥
पळसादिक पानांच्या द्रोणांत भरून कूपजल विमल ।
दीनजनेंहि करावें जिनाभिषेकास धुउनि चित्तमल ॥ ५ ॥
नन्दीश्वरसद्द्वीपीं जाउनि सुरपति जिनेश्वरा यजिती ।
आम्ही क्षुद्रनरांनीं इथेंच ते पूज्य कां वरे नसती ॥ ६ ॥
देव जिनांचें पूजन रत्नसुवर्णादिरचित पद्मांनीं ।
करिती आम्ही येथें नानाविध पुष्पफल समर्पोनी ॥ ७ ॥
यापरि करुनि विचारा लङ्काद्वीपस्थ सर्व सुजनांनीं ।
उत्साहें जिनसदनें भूषविलीं ध्वजघटादिवस्तूंनीं ॥ ८ ॥
नाट्यगृहें नि सभागृहवापीमञ्चादि[6] सर्व शोभविलें ।
वस्त्रें कदलीस्तम्वें[7] तोरणमालादिकें दिसेचि भलें ॥ ९ ॥
दूध-दही घृत यांनीं गन्धजलें कलश कमलमुख[8] पांच ।
मोत्यांच्या मालांनीं शोभा त्यांची न वर्णवे साच ॥ १० ॥
जिनविम्वांचा करण्यासाठीं अभिषेक पाहण्याकरितां ।
आमन्त्रण भव्यजनां जात असे येइ भक्तिरत जनता ॥ ११ ॥

---

१ शुक्लअष्टमीस. २ आम्ही या आठ दिवसांत हिंसादिक पापें करणार नाहीं व जिनपूजनादिक कार्यें करूं असा संकल्प करून वागणें यास नियम म्हणतात. ३ पुण्यसमूह. ४ पवित्र. ५ मनरूपी भूमि. ६ आसनें वगैरे. ७ केळीच्या खांबांनीं. ८ ज्यांच्या मुखावर कमलें ठेविलीं आहेत.

मन्दार-पारिजातक-चम्पक-अतिमुक्त-कुन्द-कुसुमांच्या ।
माला जिनचरणावरि अर्पिति जणु भक्त मुक्तिवरणांच्या[1] ॥ १२ ॥
भेरी-मृदङ्गकाहल-शंखादिक-वाद्यनाद दुमदुमला ।
भव्यांच्या कण्ठांतुनि जयजय जिन नाद दीर्घ उद्भवला ॥ १३ ॥
लङ्कानगरनिवासी सुजनांनीं वैरभाव विसरून ।
महिमा जिनचरणांचा केला वर्णू शकेल कवि कोण ॥ १४ ॥
नन्दीश्वर-चैत्यालयिं देव जसे पर्व साजरा करिती ।
जिनभक्ति-रक्तखगगण करुनि तसें पापपङ्क्ति संहरिती ॥ १५ ॥
राक्षसकुञ्जर[2] रावण महाप्रतापी जिनेन्द्रशान्तिगृहीं ।
स्नानें पवित्र होउनि करि पूजा भक्तिभार मनिं वाही ॥ १६ ॥
वैभवशाली जे नर हृदय जयांचें अपार भक्तिरत ।
पूजिति जिनास त्याचें पुण्य गणायास कोण जन शक्त ॥ १७ ॥
भोगुनि ते सुरविभवा मिळविति ते चक्रवर्ति भोगास ।
रवितीव्र[3] जैनसुतपें वरिती जिनदास मोक्षलक्ष्मीस ॥ १८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे फाल्गुनाष्टाह्निकमहिमावर्णनं नाम अष्टषष्टितमं पर्व ॥ ६८ ॥

१ मुक्तिबरोबर विवाह करण्याच्या. २ राक्षसवंशांत श्रेष्ठ. ३ सूर्याप्रमाणें प्रखर.

# एकोणसत्तरावें पर्व.

होतें शान्तिजिनाचें मन्दिर जें शान्तिचें खरें सदन ।
कैलासशिखर-सुन्दर करि कम्पित यद्ध्वजा सदा पवन[1] ॥ १ ॥
जम्बूद्वीपाच्या बहुमध्यें शोभे सुमेरुशैल जसा ।
अत्युच्च शान्तिसदना सौधावलि गोल घालिते वळसा ॥ २ ॥
विद्यासाधन-निश्चय करून केला प्रवेश जिनसदनीं ।
दशकण्ठानें केली पूजा एकाग्रता धरून मनीं ॥ ३ ॥
वाद्यें वाजत असतां केला पञ्चामृताभिषेक तयें ।
नन्तर पूजा केली जिनगुण गाऊन भक्तिनें विनयें ॥ ४ ॥
जोडून हात दोन्ही गुडघे टेकून भूमिवरि केला ।
श्रीमद्दशाननानें प्रणाम जिनशान्तिच्या पदाब्जाला ॥ ५ ॥
अभिमुख होउनि रावण पर्यङ्कार्धासनें सुभूमिवरी ।
बसला करिं जपमाला घेउनि अतिशान्तिभावनेस वरी ॥ ६ ॥
नासाग्रीं निजलोचन करुनि स्थिर एकचित्त होऊन ।
मेघश्याम[2] दशानन विद्येच्या साधनांत हो लीन ॥ ७ ॥
मन्दोदरीसतीनें यमदण्डाला दिला निदेश असा ।
कळवा प्रजाजनाला सेवा आपण सदैव नियम-रसा ॥ ८ ॥
पूजा जिनपादाब्जा, द्या दुर्बल-दीन-निर्धनास धन ।
करुणा ठेवुनि हृदयीं द्या अभया स्थिर करा स्वकीय मन ॥ ९ ॥
जोवरि रावण साधी योगा श्रद्धान संयमीं ठेवा ।
पञ्चणमोकाराचा करा तुम्ही जप असेचि हा ठेवा ॥ १० ॥
कोणी ऐशा समयीं केला उपसर्ग[3] वा तिरस्कार ।
तो सोसा शान्तपणें राहो तुमच्या मनीं न असिधार ॥ ११ ॥
होऊन कोपवश जरि कोणीं हृदयीं विकार पावेल ।
तो वध्य असे मातें पिता असो अन्य वा असे मूल ॥ १२ ॥

---

१ वारा. २ मेघाप्रमाणें. ३ उपद्रव, पीडा.

## सत्तराव्या पर्वाचा कथासारांश.

लंकेंत घडलेलें वृत्त गुप्तहेरांनीं रामचन्द्रादिकांना सांगितलें तें ऐकून रावणाला जयलाभाची आशा उत्पन्न झाली आहे व त्यासाठीं तो 'बहुरूपिणी' विद्या सिद्ध करून घेण्याकरितां तिची आराधना करणार आहे हें समजलें.

त्यावेळीं बिभीषणानें असें सांगितलें– या विद्येची आराधकाला चोवीस दिवसांनीं प्राप्ति होते. रावण ध्यानस्थ बसला आहे. यावेळीं लंकेंत जाऊन त्याला उपद्रव करा म्हणजे तो रागावेल व त्यामुळें ती सिद्ध होणार नाहीं. व आपण उपद्रव न केल्यास त्याला ती सिद्ध झाल्यावर तो इन्द्रालाही असाध्य होईल व आपले सर्व युद्धश्रम व्यर्थ होतील. कांहीं विद्याधर रामचन्द्राकडे गेले व म्हणाले– प्रभो, यावेळीं रावण ध्यानांत तत्पर होऊन विद्याराधना करीत आहे. लंका हस्तगत करण्यास ही वेळ चांगली आहे. आपण आम्हाला आज्ञा द्यावी किंवा या कार्याला आपली संमति असावी.

रामचन्द्र महापुरुष होते. त्यांना हें विद्याधरांचें बोलणें पसंत पडलें नाहीं. ते म्हणाले– जे भिऊन शरण आले आहेत त्यांना मारणें जसें योग्य नाहीं, तसेंच जिनमंदिरांत ध्यानस्थित रावणाला उपद्रव करणें, मारणें हें योग्य नाहीं. उच्चकुलीन क्षत्रिय या कार्याला निंद्य समजतात. नियमस्थित धार्मिकांना ते शत्रु समजत नाहींत. हें रामचन्द्राचें भाषण ऐकून विद्याधर परत आले.

पण कांहीं विद्याधर राजांनीं विद्याधरकुमारांना 'तुम्ही लंकेंत जाऊन उद्या रावणाला पीडा द्या' असें सांगितलें. पण या आठ दिवसांतच हें कार्य करावें यानंतर तें तुम्हाला करतां येणार नाहीं. विद्याधरकुमार दुसरे दिवशीं जाऊ शकले नाहींत. ते पौर्णिमेच्या दिवशीं ( फाल्गुन पौर्णिमा ) नाना वाहनांवर आरूढ होऊन लंकेंत गेले. मकरध्वज, साटोप, चन्द्राभ, सिंहरथ, सूर्य, महारथ, वातायन, नील आदिक

कुमारांनीं कांहीं सैन्यासह शस्त्रास्त्रें घेऊन लंकेंत प्रवेश केला. बिभीषणाचा पुत्र भूषण हा त्यांना साहाय्य करीत होता. लंकेंत हे शिरल्यावर स्त्रिया फार घाबरल्या. कांहीं स्त्रिया पळत आपल्या पतीकडे गेल्या. कांहींच्या अंगावरचे अलंकार धावतांना गळून पडले. कांहीं विद्याधरदंपती घाबरून आकाशांत फिरू लागले. गडबडीनें कित्येकांचीं वस्त्रें गळून पडलीं. रावणाच्या महालांत मंगल व गंभीर वाद्यध्वनि होत होता. कांहीं स्त्रिया जिनप्रभुपुढें नृत्य करीत होत्या व कांहीं जिनपूजा करीत होत्या.

अन्तःपुरांत हे कुमार शिरले तेव्हां तेथील स्त्रिया विचार करू लागल्या. हे अविचारी कुमार आम्हाला छळतील, आम्हाला निर्वस्त्र करून समुद्रांत फेकून देतील, किंवा बन्दिगृहांत टाकतील. अशारीतीनें स्त्रिया व्याकुळ झाल्या व गावांतही जिकडे तिकडे क्षोभ झाला.

त्यावेळीं मय (मन्दोदरीचा पिता) अतिशय रागावून लढण्यासाठीं सज्ज झाला. आपल्याबरोबर त्यानें बरेच सहायक वीर घेतले होते. तो रावणाच्या महालांत आला त्यावेळीं मन्दोदरीनें म्हटलें— पिताजी, आपण सगळ्या लंकेंत काय घोषणा केली होती ती ऐकिली नाहीं काय?

या पवित्र पर्वांत युद्ध करण्याची इच्छा देखील मनांत आणू नये अशी ती घोषणा होती. यास्तव आपण हातांतील ही तरवार टाकून द्या. चिलखत काढून टाका व मनांत क्षमेला जागा द्या. असें आपल्या मुलीचें भाषण ऐकून त्याप्रमाणें मयराजानें केलें व तो जिनमन्दिरांत जाऊन जिनगुणगायन करीत बसला.

इकडे हे कुमार त्यांना प्रतिबंधक न भेटल्यामुळें लंकानगरींत इतस्ततः धुमाकूळ घालू लागले. कोणी कुमार एका स्त्रीच्या पाठीमागें धरण्यासाठीं जात असतां ती पळू लागली व ठेच लागून पडली. कोणी एक स्त्री एका हातानें वस्त्राचे ओचे धरून व दुसऱ्या हातानें बालकाला घेऊन पळू लागली. कोणी स्त्री पळत असतां तिच्या गळ्यांतील मोत्याची माला तुटून मोतीं अनेक ठिकाणीं गळून पडलीं. तेव्हां लहानशी मेघरेखा जलबिन्दु टाकीत गेल्याप्रमाणें भास झाला. एक स्त्री हरिणीप्रमाणें आपले चञ्चल डोळे भीतीनें इकडे तिकडे वळवून पळत असतां तिचा केशबन्ध ढिला झाला व आपल्या पतीच्या वक्षःस्थलाचा आश्रय घेतल्यावर तिचें थरथर कांपणें थोडेंसें कमी झालें.

याप्रमाणें नगरांत सर्व लोक भयाकुल झालेले पाहून शान्तिजिनेश्वरांच्या मन्दिरांतील शासनदेव डोळे लाल करून बाहेर आले व सिंह, हत्ती, अग्नि इत्यादिकांचें स्वरूप धारण करून इतस्ततः फिरू लागले तेव्हां तें विद्याधरकुमाराचें सैन्य पळत सुटलें. पण त्याचवेळीं वानरपक्षाचे देवही तेथें रागानें आले व त्या दोन्ही बाजूच्या देवांचें युद्ध सुरू झालें. तें पाहून ते कुमार व त्यांचें सैन्य पुनः परत नगरांत आले.

रावणाला हे कुमार पीडा द्यावयास आले आहेत पण त्याला हें पराभूत करूं शकणार नाहींत. पण त्यांना साहाय्य करणाऱ्या ह्या वानरपक्षीय देवांना आपण पिटाळून लाविलें पाहिजे म्हणून पूर्णभद्र व माणिभद्रदेवांनीं मोठी गर्जना केली व पाषाणवृष्टि करावयास सुरुवात केली. तेव्हां ते देव पळून गेले व विद्याधरकुमार पळून आपल्या शिबिराकडे गेले.

पूर्णभद्र व माणिभद्रही त्याच्या पाठीमागें धांवत जाऊन रामचंद्राला याप्रमाणें बोलले– " दाशरथी रामा, तूं आपल्या सद्गुणांनीं आम्हाला पूज्य आहेस. तूं निंद्य दोषांना त्यागून सद्गुणाचें ग्रहण करितोस तुला पाहून आम्हाला मोठा आनंद झाला. पण तुझ्या या सैन्यानें लंकेंत प्रवेश करून लोकांना फार त्रास दिला आहे. मोठ्या कष्टानें लोकांनीं मिळविलेलें धन यानीं हरण केलें. असंख्य रत्नें यांनीं लुटून आणिली आहेत. कुलीन स्त्रियांना या लोकांनीं त्रास दिला आहे. असे अनर्थ यांनीं केले हें चांगलें केलें काय ? बोल. "

पूर्णभद्राचें हें भाषण ऐकून लक्ष्मणानें रागावून म्हटलें– " हे पूर्णभद्रयक्षा, तुझ्या या भाषणाचें उत्तर ऐक– " या दुष्ट दशाननानें या रघुचंद्राची महाशीलवती सीतापत्नी हरण करून आणिली आहे. त्याला शेंकडो धिक्कार असोत. " " हे यक्षा, अशा दुष्टावर तूं प्रेम करतोस हें योग्य आहे काय ? आम्ही तुझ्यावर कोणता अपकार केला व त्यानें कोणता उपकार केला ! सांग. हे पूर्णभद्रा तुझें हें भाषण बिलकुल अन्यायाचें आहे. "

यानंतर सुग्रीवानें सुवर्णपात्रांत अर्घ्य घेऊन तो यक्षाला अर्पण करून म्हटलें– "माझ्या बाळावर तुझी कृपा असो. अमुच्यावर व रावणावर तूं समता ठेव. आमच्यावर रोष व रावणावर तोष करणें सोडून दे व समता धारण कर. रावण जैन व आम्ही मिथ्यात्वी आहोत काय ? ही समज मनांतून काढून टाक. आमच्यावर क्षमा कर व

आमच्याबरोबरही गोडीनें वाग. आम्ही रावणाच्या मनांत क्षोभ उत्पन्न करूं. तूं आतां स्वस्थानीं जा.

यानंतर यक्ष म्हणाला–"सुग्रीवा, लंकानगरींतल्या जीर्ण गवतालाही तुम्ही पीडा देऊ नका. सर्व लोकाविषयीं मनांत दया ठेवा. रावणाच्या मनाला तुम्ही क्षुब्ध करा पण त्याच्या देहाला पीडा देऊ नका." असें सांगून ते दोन यक्ष अन्तर्धान पावले. लक्ष्मणाच्या ठपक्यानें त्या यक्षांनीं समता धारण केली.

जोपर्यंत एकाद्याचे दोष समजले नाहींत तोपर्यंत त्यावर सज्जन प्रेम करितात. पण दोष समजल्यावर ते तत्काल प्रेमत्याग करितात. जोपर्यन्त सूर्य हितकारक वाटतो तोपर्यन्त मनुष्यांना तो प्रिय वाटतो पण उत्पात करणारा सूर्य तसा वाटत नाहीं.

# सत्तरावें पर्व.

लङ्केतिल वृत्तान्ता चरपुरुषांनीं निवेदिल्या श्रवुन ।
जयलाभाशा उपजे रावणमनिं एतदर्थ तद्यत्न ॥ १ ॥
शान्तिजिनांच्या सदनीं त्यांना जाऊन शरण आराधी ।
विद्या जयलाभास्तव दशास्य वहुरुपिणी तिला साधी ॥ २ ॥
ती चोवीस दिनांनीं होते आराधकास सम्प्राप्त ।
देवांचाही करि ती विनाश मानव न राहि जगतांत ॥ ३ ॥
नियमस्थिता दशास्या करुनि उपद्रव तया करा कुपित ।
सिद्ध न होइल विद्या यत्न करा वा असा तुम्ही त्वरित ॥ ४ ॥
ती सिद्ध जाहल्यावर इन्द्रहि जिंकू शकेल नच त्यास ।
आम्हा क्षुद्र नरांची काय कथा विफल होय आयास ॥ ५ ॥
वदला तदा विभीषण जाउनि लङ्केंत द्या तया पीडा ।
अवलम्बा न विलम्बा असाध्यरोगास काय करि काढा ॥ ६ ॥

[ रावण नियमस्थित असल्यामुळें लंकेंत जाऊन घातपातादिक अधर्म कार्य करूं नका अशी रामाज्ञा. ]

कांहीं खग त्यावेळीं जाउनि रामासमीप त्या वदले ।
रावण नियमीं तत्पर लङ्का घ्यायास समय वदति भले ॥ ७ ॥
जाउनि द्यावी पीडा दशानना उचित कार्य साधावें ।
आज्ञा आपण द्यावी किंवा संमत कृतीस या व्हावें ॥ ८ ॥
भाषण ऐकुनि त्याचें राम महापुरुष बोलला ऐसें ।
लङ्केवरि आक्रमणा प्रवृत्त होणें कदापि उचित नसे ॥ ९ ॥
भ्याले नि शरण आले छळून त्या मारणें न योग्य जसें ।
नियमस्थित जिनमंदिरिं वधणें त्या सर्वथा अयोग्य असे ॥ १० ॥
उच्चकुलीन क्षत्रिय त्यांना हें सर्वथा असे निन्द्य ।
नियमस्थित जे धार्मिक असती ते सुजन सर्वथा वन्द्य ॥ ११ ॥
भाषण ऐकुनि ऐसें रामाचें देव ह्या विधर्मात ।
करि न प्रवृत्ति जाणुनि खग आले स्वस्थलांत ते परत ॥ १२ ॥

[ कांहीं विद्याधरराजांनीं लंकेंत जायाला विद्याधरकुमारांना प्रेरणा केली. ]

कांहीं खगराजांनीं एकान्तीं खगकुमार जे त्यांना ।
म्हटलें लङ्केमध्यें जाउनि द्या रावणास पीडा ना ॥ १३ ॥
उद्दइक जावें ऐसें निश्चित केलें कुमारवृन्दानें ।
परि आठ दिनापैकीं एके दिवशींच ठरविलें जाणें ॥ १४ ॥
ते पौर्णिमादिनीं खगकुमार जायास जाहले सिद्ध ।
नानावाहनिं वैसुनि निघती अविवेक वाटतो शुद्ध ॥ १५ ॥
भवनासुराप्रमाणें कुमार लंकेस जावया निघती ।
क्षोभ दशास्याच्या मनिं उत्पन्न करावयास ते सजती ॥ १६ ॥
मकरध्वज, साटोप नि गुरुभर, चन्द्राभ, सूर्य, सिंहरथ ।
ज्योति, महारथ, सर्वद ज्यांच्या रथिं जोडलें तुरंगशत ॥ १७ ॥
वातायन नीलादिक कुमार गेले पदाति घेऊन ।
शस्त्रास्त्रासह लङ्कानगरीं विस्मित मनांत होऊन ॥ १८ ॥
अत्यन्त शान्त तेथें दिसले भट त्या कुमारवृन्दास ।
युद्धाची शङ्काही स्पर्शि न ज्यांच्या विशुद्ध हृदयास ॥ १९ ॥
लङ्केंत शान्ति नान्दे कोठेंहि क्षोभ तेंवि गडवड न ।
अत्यन्त रावणाचें धैर्यानें शोभतें प्रसन्न मन ॥ २० ॥
श्रीकुम्भकर्ण भाऊ इन्द्रजित नि जलदनाद[1] हे पुत्र ।
वन्दींत शत्रु टाकी रावणमन तरिहि धीरतापात्र ॥ २१ ॥
अक्षादिकभट अरिनें समरीं मारून टाकिलें वहुत ।
निष्कम्पचित्त दिसतें तथापि याचें अपूर्व हा शान्त ॥ २२ ॥
यापरि विचार चित्तीं करून अन्योन्य वचन बोलून ।
आश्चर्यचकित झाले कुमार शङ्कित[2] वने तदीय मन ॥ २३ ॥
भूषण नामें होता विभीषणाचा सुपुत्र तो वदला ।
श्रीमारुतायनाला[3] भय सोडुनि शीघ्र पत्तनांत चला ॥ २४ ॥
तेथें कुलीन नारी सोडुनि सर्वांस लोळवीन वलें ।
निर्भय व्हा मित्रांनों तुमच्या शौर्यास कोण शूर तुले ॥ २५ ॥
मानून वचन त्याचें कलहप्रिय खगकुमार ते सगळे ।
उद्धत निजसैन्यासह शस्त्रें घेऊन तीक्ष्णतर शिरले ॥ २६ ॥

---

१ मेघनाद. २ भययुक्त. ३ वातायन नामक विद्याधर कुमाराला.

[ भयानें स्त्रियांच्या मनांत आलेले विचार. ]

शब्द तयांचे ऐकुनि चञ्चलनयना भयें स्त्रिया पळती ।
गळती शरीरभूषा पतिसन्निध जाउनि स्थिरा होती ॥ २७ ॥
कांहीं विह्वल होउनि विद्याधरदंपती नभीं फिरती ।
वस्त्रें गळतीं त्यांचीं निघे मुखांतून बोबडी उक्ति ॥ २८ ॥
रत्नप्रकाश जेथें जगमगतो त्या दशास्यसौधांत ।
मङ्गलगम्भीर असा वाद्यध्वनि जनमना हरी सतत ॥ २९ ॥
नर्तन करिती नारी गायन गाऊन भक्तिभावानें ।
कन्या करिती पूजन जिनपतिचें एकतानचित्तानें ॥ ३० ॥
तेथें कुमार आले कलहप्रिय समरभेरिरव घोर ।
अन्तःपुरस्त्रियांना ऐकुनि मनिं भीति वाटली थोर ॥ ३१ ॥
कोणी चिन्ती अबला संकट मज दुर्निवार हें वाटे ।
हे क्रूर शत्रु छळतिल आतां जावें पळून मी कोठें ॥ ३२ ॥
दुसरी स्त्री मनिं चिन्ती वन्दिगृहीं ठेवतील मज काय ।
निर्वस्त्र करुनि देतिल सागरिं टाकून दुष्ट वा हाय ॥ ३३ ॥
व्याकुल यापरि झाल्या पुरस्त्रिया समरवाद्य ऐकून ।
हाहाकार जहाला चोहिंकडे भीतियुक्त होय मन ॥ ३४ ॥

[ युद्धोद्यतमयानें मन्दोदरीच्या भाषणानें शस्त्रत्याग करून जिनमंदिरांत जिनस्तुतिसाठीं प्रवेश केला. ]

मयदैत्य कुपित झाला चिलखत घालून सज्ज युद्धास ।
सन्नद्धसचिव घेउनि येई तो श्रीदशास्यसौधास ॥ ३५ ॥
मन्दोदरी तयाला परि वदली तात ! घोषणा श्रवणीं ।
पडली न काय कां तव शस्त्रोद्यत सांग जाहला पाणि ॥ ३६ ॥
इच्छा आत्महिताची असेल तरि खड्ग देइ टाकून ।
शुभपर्वी युद्धेच्छा पातकबन्धास हेतु तूं जाण ॥ ३७ ॥
ऐकुनि हितकर भाषण कन्येचें शान्त होय मयदैत्य ।
त्यागून शस्त्र केलें ग्रहण तयें तूर्ण जें असे सत्य ॥ ३८ ॥
चिलखत फेकून दिलें दिलें क्षमेला तयें मनीं स्थान ।
जिनमन्दिरांत गेला करी तिथें तो जिनेन्द्रगुणगान ॥ ३९ ॥

---

१ शरीरावरचे डागिने. २ रणनगाऱ्यांचा ध्वनि. ३ शस्त्र घेतलेला. ४ हात.

क्षुब्धसमुद्रासम ते कुमार पाहून नगरतटशिखरें ।
गोपुरकपाट तोडुनि शिरले लङ्कापुरींत हर्षभरें ॥ ४० ॥
ठेवुनि उपद्रवाची अभिलाषा घालिती धुमाकूळ ।
पळती स्त्रिया भयानें कुमार करितात हास्यकल्लोळ ॥ ४१ ॥
सारून कमरपट्टा वरती धावें भयें कुणी नारी ।
लागून ठेच पडली माझें संकट वदे जिना वारी ॥ ४२ ॥
बन्धो रक्षी माते हा हा जाऊं कुठें लपायास ।
झालें प्राप्त महाभय चुकेल हा केधवा महायास ॥ ४३ ॥
एककरें वस्त्राचें धरून ओचे दुज्या करें वाला ।
घाबरली कोणी स्त्री कम्प तनूला तिच्या त्वरें सुटला ॥ ४४ ॥
माळ गळ्यांतिल तुटली मोत्यें मार्गीं अनेक ओघळलीं ।
जलबिन्दु मेघरेखा वर्षुनि गेली अशी जना दिसली ॥ ४५ ॥
हरिणीसमान भ्याली केशांचा बन्ध तेधवा सुटला ।
पतिवक्षःस्थल मिळतां कम्प तनूचा तिच्या तदा मिटला ॥ ४६ ॥

[ शान्तिजिनशासन देव अनेकरूपें धारण करून बाहेर आले. त्यांचें वानरपक्षीय सुरांबरोबर युद्ध. ]

यापरि नगरीमध्यें लोक भयाकुल बघून ये करुणा ।
शान्तिजिनप्रासादीं शासन सुर करिति दृष्टि बहु अरुणा ॥ ४७ ॥
आले कोपानें ते बाहेर जिनेन्द्रमन्दिरांतून ।
आकार भयद त्यांचा दाढांनीं क्रूरसें दिसे वदन ॥ ४८ ॥
नेत्र तयांचे दिसती मध्याह्नार्कासमान[1] तेजस्वी ।
देह प्रचण्ड त्यांचा पाहून कुमारहृदय भीतिस त्री ॥ ४९ ॥
सिंहस्वरूप केव्हां अहिकरिंचे[2] वा स्वरूप ते धरिती ।
शैलाग्निवायुजलद[3]-स्वरूप घेऊन देव ते फिरती ॥ ५० ॥
पाहुनि अशा स्वरूपा कपिसैन्य पळे तिथून वेगानें ।
परि वानरपक्षाचे आले सुर त्या स्थलास रागानें ॥ ५१ ॥
उभयसुरांचें चाले युद्ध भयंकर बघून कपिसेना ।
पुनरपि आली नगरीं गंमत बहु वाटली तदीयमना ॥ ५२ ॥

---

१ दिवसाच्या मध्यभागांत आलेल्या सूर्यासारखे. २ सर्प व हत्तींचे. ३ पर्वत, अग्नि, वारा व मेघ.

अपुले सुर हटती हे इतरांचें वल वघून वहु झाले।
पुनरपि आलें कपिवल रागानें लालवुन्द तें वनलें ॥ ५३ ॥
ज्या पूर्णभद्र होतें नांव असा यक्ष माणिभद्रास।
वदला कुमार सगळे वघ धरिती हे अभद्ररूपांस ॥ ५४ ॥
ध्यानीं निमग्न होउनि निःस्पृह देहांत जाहला आहे।
ऐशा दशाननाला पीडा देती कुमार हे पाहे ॥ ५५ ॥
पाहून सन्धि आले वीराचारास सोडिलें ज्यांनीं।
क्षुद्रकुमार कपिध्वज पीडिति हे रावणास जिनचरणीं ॥ ५६ ॥
मणिभद्रयक्ष वोले सुरेन्द्रही रावणा पराभूत।
न करुं शके क्षुद्रांचे प्रयत्न होतील विफलचि त्वरित ॥ ५७ ॥
आपण उभयहि आतां प्रस्तुतविघ्नास दूर सारून।
या इतरा देवगणा देऊ येथून वा पिटाळून ॥ ५८ ॥
पाहून कुपित दोघे यक्षेश्वर जेधवा लढायास।
लज्जान्वित भीतीनें इतर सुरें गाठिला निजावास ॥ ५९ ॥
ते दोघे यक्षाधिप मेघासम करुनि गर्जना थोर।
पाषाणवृष्टि करिती खगसेना धावली दिशा चार ॥ ६० ॥
वेगें धावत असतां पानांचा शुष्क राशि जेंवि उडे।
विद्याधर वल गेलें नभिं धावत तें पडे उडे नि रडे ॥ ६१ ॥

[ यक्षाचें रामचन्द्राबरोबर भाषण. ]

त्याच्यामागें धावत गेलेले यक्ष उभय रामास।
वदले दशरथपुत्रा सुगुणें आहेस पूज्य आम्हास ॥ ६२ ॥
अश्लाघ्यातें[1] त्यागुनि जे सुगुण श्लाघ्य तेचि घेतोस।
शास्त्रार्णवपारंगत[3] तव दर्शन देतसे जना तोष ॥ ६३ ॥
परि तव आश्रितसैन्यें सुन्दर लङ्कापुरीं प्रवेशून।
पौरजनांना[4] पीडित केलें अन्यून तें असे कथन ॥ ६४ ॥
द्रव्य जनांचें हरिलें जें त्यांनीं मिळविलें महाकष्टें।
धनवर्जित जें जीवित मरणासम बुधसभा[5] तया म्हणते ॥ ६५ ॥

---

१ अहितकर कार्यास. २ निन्द्य. ३ शास्त्रसमुद्राच्या दुसऱ्या किनाऱ्याला पोहोंचलेला. ४ नागरिक लोकांना. ५ विद्वानांचा समूह.

वैडूर्य[1] वज्र विद्रुम आदिकरत्नें अमूल्य नगरीचीं ।
तव पक्षस्थ जनांनीं हरिलीं तुज रीत वाटते साची ? ॥ ६६ ॥
त्रास दिला लङ्केंतिल कुलाङ्गनांना न युक्त हें झालें ।
ऐसे अनर्थ केले हे झाले सर्व काय बोल भले ॥ ६७ ॥

[ यक्षांना लक्ष्मणानें प्रत्युत्तर दिलें. ]

हें यक्षवचन ऐकुनि लक्ष्मण होऊन कुपित त्या वदला ।
हे पूर्णभद्रयक्षा ! ऐके आतां मदीयवचनाला ॥ ६८ ॥
या श्रीरघुचन्द्राची प्राणप्रिय गुणवती महाशीला ।
हरिली दशाननानें पत्नी धिक्कार शेकडो त्याला ॥ ६९ ॥
प्रेम तुझें या दुष्टीं कैसें ही काय उचित तव लीला ।
पक्ष तयाचा घेउनि येथें आलास हें वदायाला ॥ ७० ॥
अपकार काय केला आम्हीं उपकार वा तयें काय ? ।
याचा विचार चित्तीं नाहीं हृदयीं नसे तुझ्या न्याय ॥ ७१ ॥
सन्ध्यारुण-भालावरि[2] भिवया चढवून कुपित होऊन ।
आलास विनाकारण उचित दिसेना त्वदीय आचरण ॥ ७२ ॥

[ सुग्रीवानें यक्षांना अर्घ्य देऊन जी विनंति केली ती अशी— ]

स्वामी कपिध्वजांचा काञ्चनपात्रांत अर्घ्य देऊन ।
यक्षा सुग्रीव वदे मम वाळीं तव असो दयाचरण ॥ ७३ ॥
अमुच्यावरी नि रावणि ठेवी समता नि रोप तोपास ।
म्हणि सोड यक्षनाथा ! वरी दयाळा सदा उपेक्षेस ॥ ७४ ॥
रावण जैन नि आम्ही मिथ्यात्वी भावनाच ही सोड ।
आम्हावरि क्षमा करि राही आम्हासवेंहि तूं गोड ॥ ७५ ॥
क्षोभ करूं रावणमनि जेणें विद्या न सिद्ध होईल ।
हृदयीं विचार करि वा स्वस्थानीं जाय तूं दयाशील ॥ ७६ ॥
सुग्रीवा यक्षाधिप वदला मजला समस्त कळलें हें ।
जीर्णतृणींही पीडा लङ्केंत न करि दया मनीं वाहे ॥ ७७ ॥
क्षोभ करा रावण-मनि परंतु त्या देहवेदना न करा ।
परि त्या क्षोभ न होइल ऐसें तुम्ही मनांत अवधार ॥ ७८ ॥

---

१ इन्द्रनील, हिरा व पोवळें. २ सन्ध्या प्रकाशाप्रमाणें लाल झालेल्या कपाळावर.

[ यक्ष अन्तर्धान पावले. ]

नेत्र प्रसन्न ज्यांचे भव्यजनीं प्रीति जे सदा करिती ।
मुनिसङ्घभक्ति ठेवुनि तद्दुःखोपद्रवास जे हरिती ॥ ७९ ॥

चन्द्रासमान ज्यांचें मुख जे स्वामी समस्त यक्षांचे ।
रामादिकां प्रशंसुनि ते अन्तर्धान[1] पावले साचे ॥ ८० ॥

लक्ष्मणवचनें मिळतां ठपका ते यक्ष लाजले दोन ।
समता चित्तीं आली त्यांच्या वरिलें तयें तदा मौन ॥ ८१ ॥

प्रेम तयांचें जडतें तोवरि निर्दोषता मना वाटे ।
परि दोष उघड होतां सुजनांचें प्रेम तत्क्षणीं फाटे ॥ ८२ ॥

प्रिय रवि होतो मनुजा जोवरि तो भासतो सुहित-कारी ।
उत्पात[2]हेतु होतां इच्छि न जिनदास त्यास गुणधारी ॥ ८३ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सम्यग्दृष्टिदेवप्रातिहार्यकीर्तनं नाम सप्ततितमं पर्व ॥ ७० ॥

---

१ गुप्त झाले. २ अहिताला कारण.

# एकाहत्तराव्या पर्वांतील कथासारांश.

पूर्णभद्र व मणिभद्र यक्ष शान्त होऊन स्वस्थळीं गेल्यावर अंगद, सुस्कन्द, इन्द्र, नील वगैरे कुमार आपल्या मित्रासह लंकानगरीकडे निघाले. किष्किन्धाकाण्ड नामक हत्तीवर अंगद बसला होता व त्याचे मित्र घोड्यावर आरूढ झाले होते. या सर्वांच्या पुढें थोडेसे पायदळ सैन्य गर्वानें छाती पुढें करून चाललें होतें. लंकानगरींत आल्यानंतर पुनः हे सगळे कुमार अनार्याप्रमाणें आम्हाला त्रास देणार कीं काय असें स्त्री-पुरुषांना वाटू लागलें. पायदळ सैन्यानें रावणाच्या प्रासादाच्या बाहेरील प्रदेशांत प्रवेश केला तो रत्नजडित प्रदेश सरोवरासारखा दिसत होता. पण त्याचें निश्चल स्वरूप पाहून हें सरोवर नाहीं अशी त्यांना खात्री वाटली. यानंतर तें सैन्य थोडेसें पुढें जाऊन दाराजवळ आलें.

प्रासादाच्या दारावर अत्यंत मौल्यवान रत्नांचें तोरण लावलें होतें व पृथ्वी-तलावर यासारखें उत्कृष्ट तोरण कोठेंच नसेल असें सैनिकांना वाटलें. दरवाजाच्या दोन्ही बाजूला अंजनपर्वताप्रमाणें काळे व विशाल गण्डस्थलाचे, मुसळाप्रमाणें लठ्ठ दांतांचे दोन हत्ती उभे असलेले त्यांनीं पाहिले. त्यांच्या गण्डस्थलावर बसून तें जणु फोडीत आहेत असें दोन सिंह त्यांना दिसले. ते जिवन्त सिंहाप्रमाणें त्यांना वाटलें. त्यामुळें ते सैनिक भीतीनें येथून पळून जावें असा विचार करू लागले. पण हे जिवन्त सिंह नाहींत असें लक्षांत आल्यावर त्यांनीं मागें घेतलेले पाऊल पुढें टाकिलें. यानंतर तें सैन्य राजवाड्यांत शिरलें तेव्हां जणु सिंहाच्या गुहेंत प्रवेश केलेल्या हरिणाप्रमाणें घाबरून इकडे तिकडे पाहू लागलें. राजवाड्याला अनेक दरवाजे होते व चोहिकडे बुद्धीला भ्रान्त करणारी रचना आढळून आल्यामुळें आपण कोठून आलों व कोठें जावयाचें आहे हें त्यांना समजेना म्हणून ते जन्मान्धाप्रमाणें तेथल्या तेथेंच फिरू लागले. त्यांच्या पुढील प्रासादप्रदेश आकाशस्फटिकांनीं रचलेला होता. त्यामुळें येथें फक्त आकाशच आहे असें वाटून सैनिक पुढें चालले असतां अडखळून खालीं पडले. त्यांचें डोकें, कपाळ व गुडघे फुटले. तेथून परतण्याची त्यांची इच्छाही विफलच झाली. कसेंतरी चाचपडत पुढें गेल्यावर त्यांना हा इंद्रनील-मण्यांनीं रचलेला प्रदेश आहे असें वाटलें. पण तेथें तळघर असल्यामुळें बरेच लोक त्यांत पडले.

तेथून कसेंतरी निघाल्यावर पुढें त्यांना शान्तिजिनेश्वराच्या मन्दिराचें शिखर दिसलें पण मंदिरांत जाण्याचा मार्ग दिसेना तेव्हां त्यांनीं बिल्कुल द्वारपालासारखा दिसणारा पुतळा पाहिला. त्याला त्यांनीं प्रवेशद्वार कोठें आहे म्हणून विचारलें. तो उत्तर देत नाहीं म्हणून हा किती गर्विष्ठ आहे याला बडवू या असा विचार करून त्याला त्यांनीं बुक्क्या मारल्या तेव्हां त्यांचीं बोटें फुटलीं व हा पुतळा आहे असें त्यांच्या ध्यानांत आलें.

आतां कसें करावें याचा विचार करीत असतांना एक मनुष्य त्यांच्याकडे येत असलेला दिसला. त्याला विचारल्यावर त्यानें दरवाजा दाखविला व तें सैन्य जिनमंदिरांत आलें.

थोड्यावेळानें अंगदादिक कुमारही आले. त्यांनीं शान्तिप्रभूला पाहून भक्तीनें नमस्कार केला. प्रभूच्या मुखासमोर मुख करून अर्धपर्यङ्कासनानें जप करीत असलेला श्यामवर्णाचा रावण सूर्यापुढें बसलेल्या राहुप्रमाणें त्यांना वाटला.

अंगदाला रावणाला पाहून राग आला. " यमदेखील जी दुरावस्था करणार नाहीं ती आज मी तुझी करणार आहे. पाप्या रावणा, रामपत्नी महाशीलवती स्त्री सीता तिचें हरण करून आज येथें दंभानें ध्यानस्थ बसलास काय ? " असें म्हणून त्यानें तोंड्यानें खूप ठोकलें. त्याच्या हातांतील जपमाला त्यानें काढून घेतली. ती तोडून पुनः जुळवून त्याच्या हातांत दिली.

रावणाच्या स्त्रिया हें पाहून भीतीनें स्वस्थ बसल्या. कित्येकींच्या अंगावर त्यानें फुलें फेंकिलीं. कांहींजणींचीं डोकीं धरून टक्कर करविली. मंदोदरीला त्यानें फरफर ओढून आणिलें व आतां हिला हरण करून नेतों व हिला सुग्रीवावरून चामर वारावयास लावतों असें म्हणाला. हा सगळा उपद्रव होत असतां रावणाला अतिशय एकाग्रतेमुळें कांहींही समजलें नाहीं. अशा एकाग्रतेनें त्याला बहुरूपिणी विद्या प्रसन्न झाली. ती प्रगट झाली तेव्हां तिच्या शरीरप्रकाशानें तें शान्तिजिनमन्दिर प्रकाशित झालें. ती रावणाला म्हणाली– ' हे प्रभो, चक्रवर्तीशिवाय सर्वांचा नाश करण्याचें माझ्यांत सामर्थ्य आहे. या क्षुद्रविद्याधरांपैकीं जे तुझा द्वेष करीत असतील त्यांचा मी तुझ्या आज्ञेनें नाश करूं शकेन. ' असें म्हणून रावणाला तिनें नमस्कार केला. रावणानें आपलें विद्याराधन समाप्त केलें. त्यावेळीं सगळे कुमार व त्यांचें सैन्य तेथून पळून गेलें. शान्तिजिनांना रावणानें नमस्कार केला व तो आपल्या प्रासादांत भोजनादि क्रिया करण्यास गेला.

# एकाहत्तरावें पर्व.

( अंगदाबरोबर सुस्कन्द, इन्द्र, नील, चन्द्र आदिक कुमार लंकानगरींत प्रवेश करितात. )

यक्षेश शान्त झाला ज्ञाणुनि केला प्रवेश लङ्केंत ।
सुग्रीवनन्दनानें[1] होऊनि समशीलखग-कुमारवृत[2] ॥ १ ॥
किष्किन्धकाण्ड नामक करिवरि बैसून चालतां दिसला ।
मेघाच्या पाठीवर शार्कोंचन्द्रासमान[3] जनतेला ॥ २ ॥
सुस्कन्द, इन्द्र, नील नि चन्द्रादिक खगकुमार वैसून ।
अश्वादिकिं बहु विभवें करिती लङ्काप्रवेश नवतरुण ॥ ३ ॥
चन्दन अङ्गीं ज्यांच्या ताम्बूलें लाल ओठ दिसतात ।
पायदळ सैन्य ऐसें चालें ज्यांच्यापुढें दिसे त्वरित ॥ ४ ॥
पाठीस ढाल बान्धुनि तरवार धनुष्य आदि हातांत ।
छाती काढुनि गर्वें चालें तें पदिकसैन्य[4] झोकांत ॥ ५ ॥
देवपुरीसम लंकानगरीं असुरासमान शिरतात ।
पाहुनि कुमारवृन्दा अन्योन्यां वृत्त युवति वदतात ॥ ६ ॥
ज्याच्या कानावरती अतिकोमल तालपत्रिका[5] शोभे ।
मणिकुण्डलही कानीं ग्रह नव जणु शोभतात ज्यांत उभे ॥ ७ ॥
वाटे अपूर्व ऐशी ज्योत्स्ना ही अङ्गदेन्दुची भासे ।
ऐशी विशदा कुण्डलकान्ति न अन्यत्र कोठवाहि दिसे ॥ ८ ॥
निर्भय होउनि आला या नगरीं काय हा इथें कार्य ।
करिल न उमजे आम्हां क्रीडा याची अनार्य वा आर्य ॥ ९ ॥

( रावणाच्या प्रासादाची आश्चर्यजनकता. )

हा सौध रावणाचा रत्नजडित बाह्यभूमि ही याची ।
मगरीयुक्तसराचें भय उपजवि सैन्यहृदयिं ही साची ॥ १० ॥

---

१ अङ्गदानें. २ समान स्वभावाच्या विद्याधर कुमारांनीं वेढलेला. ३ पौर्णिमा चन्द्रासारखा. ४ पायदळ. ५ कोवळें तालाचें पान.

निश्चलरूपा पाहुनि रत्ननिबद्धाचि भू नसे सरं[1] हें ।
ऐसा निर्णय घेउनि पुढती चाले नि कुतुक मनिं वाहे ॥ ११ ॥
मेरुगुहाकृति वाटे वैडूर्यें रचित हें गृहद्वार ।
मणितोरणें प्रकाशित जणु या पृथ्वींतले दिसे सार ॥ १२ ॥
अञ्जनशैलासम हे मोठे द्वारांत गज उभे असती ।
पृथुगण्डस्थल ज्यांचें मुशलाकृतिदन्त तन्मुखीं दिसती ॥ १३ ॥
हे सिंहबाल त्यांच्या मस्तकिं दंष्ट्राकरालवदनाचे[2] ।
शेपूट उंच मस्तकिं डोळे जणु दावितात भय साचे ॥ १४ ॥
मानेवरती दिसती सटा जयांच्या बघून सैन्यमनीं ।
जणु सत्यसिंह हे भय उपजे पळण्यास इच्छितें तिथुनी ॥ १५ ॥
सुग्रीवनन्दनाङ्गद वदला भट हो न सत्य हे सिंह ।
टाका पाऊल पुढें तेव्हां तें सैन्य त्यजुनि निजमोह ॥ १६ ॥
भटगण धरून भय मनिं शिरला रावणगृहांत सिंहगृहीं ।
हरिणगणासम इकडे तिकडे तन्नेत्र वळुनि नित पाही ॥ १७ ॥
द्वारें अनेक लंघुनि जाण्यास पुढें न दीन ते धजले ।
रचना भ्रामक पाहुनि जन्मान्धासम तिथेंचि ते भ्रमले ॥ १८ ॥
स्फटिकाच्छादितगेहीं आहे आकाश या स्थलीं वाटे ।
डोक्यास लागतां तें पडती बहु वेदना तदा दाटे ॥ १९ ॥
सञ्चारमार्ग जाणुनि दुसऱ्या चौकांत जेधवा जाती ।
आकाशस्फटिकाशीं सैनिक ते धडक तेधवा घेती ॥ २० ॥
गुडघे, कपाळ, डोकें फुटून त्यांतून रक्त बहु वाहे ।
तेथुनि परतायाची इच्छा तैं विफल होतसे पाहे ॥ २१ ॥
ही इन्द्रनीलरचिता भूमि असे हें मनांत समजून ।
जातां पडती धडकन् प्रविष्ट होतात तळघरीं सुजन ॥ २२ ॥
कोणी स्त्री स्फटिकाच्या जिन्यावरी चढुनि जाय माडींत ।
आकाशांतचि टाकी पाउल ऐसें जनास हो विदित ॥ २३ ॥
मार्ग विचारावा तिज म्हणून पाऊल टाकितां लागें ।
स्फाटिकभिन्त कपाळा तेणें ये दुःखवेदना मागें ॥ २४ ॥

---

१ सरोवर, २ दाढांनीं भयंकर.

श्रीशान्तिमन्दिराचें शिखर तयांना दिसे, न मार्ग दिसे ।
स्फटिकाच्या पुतळीला स्त्री समजुनि एक पदिक मार्ग पुसे ॥ २५ ॥
ज्याच्या हातीं आहे वेत्रलता द्वारपालपुरुषास ।
श्रीशान्तिगेहमार्गा दाखव बोले वदे-न शब्दास ॥ २६ ॥
किति गर्विष्ठ असे हा ऐसें समजून मूठ त्या मारी ।
फुटतां बोटें त्याची रडतो स्वमुखें नि हाय हाय करी ॥ २७ ॥
हस्तस्पर्शनयोगें दरवाजा जाणिला अनेक जनें ।
मोठ्या कष्टें शिरती भ्रान्ति न परि सोडतात ते स्वमनें ॥ २८ ॥
हरिनीलरत्नरचिता असेल ही भिन्त हें नसे द्वार ।
ऐसा संशय येतां हस्तस्पर्शेंचि जाणती चतुर ॥ २९ ॥
आले ज्या मार्गानें जाणें तेणेंहि शक्य वाटे ना ।
भ्रान्ता बुद्धि तयांची गोन्धळ उत्पन्न करितसे नाना ॥ ३० ॥
इतक्यांत एक मानव भाषण ऐकून जाणिला त्यांनीं ।
पकडून त्यास म्हटलें ने आम्हा शान्तिजिनगृहस्थानीं ॥ ३१ ॥

( शान्तिजिनमन्दिरांत अंगदादिकांचा प्रवेश. )

तेणें प्रवेश होता झाला आनन्द त्यांचिया हृदया ।
कुसुमाञ्जलीस अर्पुनि जय जय बोलून दाविती विनया ॥ ३२ ॥
सुन्दर किति ही आहे ही करि विस्मित मनास विबुधांच्यां ।
ऐसें म्हणून दाविति परस्परा वस्तु सर्व गमतीच्या ॥ ३३ ॥
अंगदकुमार आला स्थापुनि शिरिं पाणिकमलमुकुलास[१] ।
करुनि प्रदक्षिणात्रय वर्णी जिनगुण धरून उल्हास ॥ ३४ ॥
भगवच्छान्तिजिनाच्या शान्तमुखीं दृष्टि निश्चला ठेवी ।
प्राशन करून दृष्ट्यञ्जलिनें तद्रूप अमृत मनिं भावी ॥ ३५ ॥
शान्तिजिनाच्या उज्ज्वल वदना पुढती करून मुख वसला ।
सूर्यासमोर जैसा राहु वसे नीलगात्र तो दिसला ॥ ३६ ॥
पाही अङ्गद विद्याध्यानीं एकाग्रलीन दशकण्ठा ।
भरतासमान ज्याला दीक्षेची लागली सदोत्कण्ठा ॥ ३७ ॥

( शान्तिजिनाला वन्दन करून अंगद रावणास उपसर्ग करितो. )

---

१ हातरूपी कमलकळीला.

वदला रावण ! आतां काय करूं सांग शीघ्र तें मातें ।
क्रुद्ध कृतान्तहि नाहीं करूं शके त्या करीन दुःखातें ॥ ३८ ॥
वसुनि जिनेन्द्रापुढती सांग तुवा दम्भें काय धरिलास ।
पाप्या ! धिक्कार तुला व्यर्थचि आरंभिलेस कार्यास ॥ ३९ ॥
यापरि बोलुनि त्यानें तोंड्यानें रावणास ठोकियलें ।
परि मन त्याचें तेव्हां क्रोधानें लाल मुळिच नच झालें ॥ ४० ॥
याच्या पुढची घेउनि पुष्पें घालून मान ज्या खालीं ।
वसल्या ललना त्यावर फेकी जणु मदन कुसुमबाणाली ॥ ४१ ॥
दुःखद भाषा बोलुनि जपमाला घेइ तत्करांतून ।
टाकी तोडुनि पुनरपि देई त्याच्या करांत जोडून ॥ ४२ ॥
घेई पुनरपि काढुनि घाली त्याच्या गळ्यांत तो तिजला ।
यापरि उपद्रवेंही रावणचित्तांत कोप नच आला ॥ ४३ ॥

( रावणाच्या अन्तःपुरांत येऊन अंगदानें स्त्रियांची टक्कर लावणें गळ्यांत दगड बांधणें आदिक क्रीडा केल्या. )

अन्तःपुरांत येउनि ललनाकण्ठांत बांधि पाषाण ।
ऐशा कार्यें मानीं प्रमोदें बान्धी परस्परा सुजन ॥ ४४ ॥
दीनार पांच घेउनि सभूषणां स्त्रीस तो विकी चतुर ।
क्रीडा ऐशी करितो कोणाच्या नच करी विरोध कर ॥ ४५ ॥
पैंजण कानीं बान्धी बान्धी काञ्चीस केशपाशांत ।
चूडामणि चरणासधिं बांधुनि हासे नि बैसतो गात ॥ ४६ ॥
केशें परस्परांना बान्धी टक्कर करी तया उभयीं ।
दुःखद विनोद ऐसा करून आनन्द मानितो हृदयीं ॥ ४७ ॥
तो रावणास कोपुनि बोले सीतेस आणिलेस घरीं ।
हरितो तुझ्या समस्त स्त्रिया प्रतीकार वा यथेष्ट करी ॥ ४८ ॥
यापरि बोलुनि त्याच्या पुढेंचि सिंहासमान धावून ।
मन्दोदरीस ओढी फरफर ज्याच्या मनांत करुणा न ॥ ४९ ॥
सुग्रीव सकलखगपति सभेंत त्याच्यावरून वारील ।
मन्दोदरी करामधिं चामर घेऊन उचितें होईल ॥ ५० ॥

---

१ ढोंग, २ आनन्द. ३ अलंकारसहित. ४ योग्य.

( नाशें या अंगदापासून रक्षण करा असें मन्दोदरी रावणास म्हणू लागली. )

ती सावरून बोले स्तनकलशावरुनि वस्त्र जें गळलें ।
नाथा, रक्षा मातें, दुरवस्थेप्रति मला खलें नेलें ॥ ५१ ॥
निर्ग्रन्थमुनिवरांचें आपण वैराग्य धारिलें अंगीं ।
या दुष्ट वृश्चिकाची बोला ठेचील कोण हो नांगी ॥ ५२ ॥
धरिलें जें या समयीं आपण सुध्यान विफल तें आहे ।
व्यर्थ पराक्रम तुमचा खड्गें याचें न तोडि शिर पाहे ॥ ५३ ॥
रविचन्द्रासम जे नर केला अपमान जो तयें सह्न ।
होय न तुम्हां केला क्षुद्राचा घोर सह्न अपमान ॥ ५४ ॥
गाढध्यानीं तत्पर लङ्केशें जाणिलें न ऐकियलें ।
मत्सररहित तयाचें मनदेहहि शैलसदृश दृढ झालें ॥ ५५ ॥
सम्पूर्ण इन्द्रियांच्या क्रिया जयाच्या स्वकार्य करिती न ।
अर्धे पर्यङ्कासन घालुनि विद्याजपांत रममाण ॥ ५६ ॥

( बहुरूपिणी विद्या सिद्ध होऊन चक्रधराशिवाय इतरांचा मी नाश करण्यास समर्थ आहे असें ती रावणास म्हणाली. )

यापरि जपांत तत्पर असतां विद्या करून जयकार ।
येऊन पुढें राही प्रकाश जिनमन्दिरीं पडे थोर ॥ ५७ ॥
वदली सिद्ध जहाल्ये दे मज आदेश सर्व साधीन ।
चक्रधरांना सोडुनि नाथा तुमचें करीन कल्याण ॥ ५८ ॥
सांग मला जे असती दैत्य तयांचा विनाश करण्यास ।
अप्रिय नाथा तुजला चिन्ता जाईल सर्व विलयास ॥ ५९ ॥
विद्या सहाय करिती क्षुद्र जयांना सगर्व खगपति जे ।
मी मानिते तयांना तृणसम आदर तयांत न विराजे ॥ ६० ॥

उपजाति—

विद्या नमस्कार करून राही । पुढें यदा रावण तीस पाही ।
प्रदक्षिणा शान्तिगृहास देई । जिनास वन्दून गृहास जाई ॥ ६१ ॥
जेव्हां करी रावण योग पूर्ण । पळून तो अङ्गद जाय तूर्ण ।
मन्दोदरीला त्यजिलें तयानें । राहील तो केवि तिथें भयानें ॥ ६२ ॥

विवेक ज्याच्या हृदयीं विराजे मनुष्य ऐसा जिनदास साजे ।
कुमार उच्छृङ्खल सर्व होते । पळून गेले सगळे गृहातें ।। ६३ ।।

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे बहुरूपविद्यासन्निधानाभिधानं नाम एकसप्ततितमं पर्व ।। ७१ ।।

## अहात्तराव्या पर्वांतील कथासार.

रावण विद्या प्राप्त झाल्यावर शान्तिजिनेश्वराला वन्दन करून घरीं आला. तेव्हां त्याच्या सर्व राण्यांनीं अंगदानें आम्हाला फार छळिलें. फार त्रास दिला असें सांगितलें. तें ऐकून रावण रागावला व त्यानें म्हटलें– "तुम्ही तें दुःख विसरा. मी त्याचा चांगला समाचार घेणार आहे. त्याच्या गळ्यांत मृत्युचे पाश पडले आहेत असें निश्चित समजा.

मी त्या सुग्रीवाला उद्या युद्धांत निर्ग्रीव ( गळारहित ) करीन व भामण्डलाला तमोमण्डल ( अन्धकाराचा समूह ) करीन. अर्थात् या उभयतांना ठार मारीन. हे राम-लक्ष्मण तर किड्यासारखे आहेत. त्यांना चुटकीसरसे नाहींतसे करीन. या सर्व शत्रु असलेल्या विद्याधरांना मारून मृत्युनगरींत त्यांची रवानगी करीन. बहुरूपिणी विद्येच्या साहाय्यानें त्यांचा नाश करण्यास मला बिलकुल आयास वाटणार नाहीं."

असें बोलून तो स्नान करण्यासाठीं गेला. स्नानगृहांत त्याच्या अंगाला सुगंधित उटी स्त्रियांनीं लाविली व चांदीच्या, सोन्याच्या व रत्नजडित कलशांनीं त्याला स्नान घातलें. यानंतर रावण जिनमंदिरांत जाऊन शान्तिजिनाचें पूजन व स्तुति करून आणि जिनेश्वराला हृदयांत स्थापन करून घरीं आला. चार प्रकारचें भोजन करून तो प्रसन्न झाला. नन्तर विद्येची परीक्षा करण्याकरितां क्रीडाभूमीवर गेला. त्यानें तिच्याद्वारें स्वतःचीं अनेकरूपें उत्पन्न केलीं. विद्याधरांना न करतां येणारीं अशीं अशक्य कार्यें त्यानें करून पाहिलीं. त्यानें आपल्या हातानें जमिनीवर आघात केल्याबरोबर ती थरथर कांपू लागली. त्याला सचिवांनीं म्हटलें– 'प्रभो, आपणाला विद्येची निश्चित प्राप्ति झाली आहे. आपल्याला राघवाचा नाश करण्याचें सामर्थ्य प्राप्त झालें यांत तिळमात्रही संशय राहिला नाहीं.'

यानंतर रावण उपवनांत गेला. तेथें त्यानें फार मोठें सैन्य उत्पन्न केलें. रक्षिका-विद्याधरींनीं सीतेला म्हटलें– " देवि, रावण चन्द्रापेक्षांही सुन्दर दिसत आहे व त्याचें सैन्यही अपरंपार दिसत आहे आपण बघा " सीतेनें निर्मल व निर्विकार दृष्टीनें रावणाला पाहिलें व त्याच्या अपार सेनेस पाहून ती सचिन्त झाली. या अपार सैन्याला राम-लक्ष्मण कसें जिंकितील हें एक मोठें संकट मला प्राप्त झालें, मी मोठी दुर्भाग्या आहे. युद्धामध्यें राम-लक्ष्मणाचें अथवा भामण्डलाचें मरण ऐकण्याचा प्रसंग माझ्यावर येईल असें वाटतें. हा विचार मनांत येऊन तिचें शरीर थरथर कांपू लागलें.

रावणानें तिला म्हटलें–" देवि, तूं व्यर्थ भीत आहेस. तूं क्षत्रिय कुलांत उत्पन्न झालेली आहेस. तूं निष्कारण मनांत भय धरलें आहेस. मी दुष्टानें कपटानें तुला हरण करून आणिलें. तुझ्याविषयीं माझ्या मनांत अत्यन्त स्नेह व मोह उत्पन्न होऊन हें अकार्य मी केलें आहे. पूज्य अनन्तवीर्यकेवलींच्या चरणाजवळ साधुसमूहांत जी परस्त्री मला इच्छिणार नाहीं तिच्याबरोबर रतिसुख मी सेवणार नाहीं असें परस्त्रीत्यागव्रत मी घेतलें. ती परस्त्री रम्भा किंवा उर्वशीप्रमाणें सुन्दर असली तरीही तिला मी त्याज्य मानीन. त्या व्रताचें पालन मी करीत आहे म्हणून मी तुझ्यावर बलात्कार केला नाहीं.

पण आतां मी युद्धांत रामाला व लक्ष्मणाला निःसंशय ठार मारणार आहे. यानन्तर आपण पुष्पकविमानांत बसून विहार करूं. अकृत्रिम जिनमंदिरांचें दर्शन घेऊ व पुढील आयुष्य सुखांत व्यतीत करूं. गंगादिक नद्यांच्या तटावर विहार करून संभोगसुख भोगू व वियोगदुःख नाहींसें करून टाकू."

हे रावणाचें भाषण ऐकून सीता हात जोडून रावणाला म्हणाली– " रावणा, तुझा माझ्यावर स्नेह किंवा प्रसाद आहे असें म्हणतोस म्हणून मी तुझ्या चरणाजवळ एक विनंति करीत आहे ती ध्यानांत घे. "

जेव्हां तूं युद्धांत रागावून रामचन्द्राला मारशील तत्पूर्वी " जी भामण्डलाची बहिण आहे व जी तुझ्या संगमाची अभिलाषा सतत हृदयांत धारण करीत आहे त्या तुझ्या प्रिय सीतेनें तुझा वध झाला असतांही वज्राप्रमाणें कठिण हृदयांत स्वतःचें प्राण धारण केलें आहेत. ती मेली नाहीं असा माझा संदेश त्याला सांग. " एवढें वाक्य उच्चारून ती दुःखावेगानें मूर्च्छित झाली.

तिची ही अवस्था पाहून रावणाचें मन दयार्द्र झालें. "मी हें अयोग्य कार्य केलें मजला धिक्कार असो. एकमेकावर अत्यन्त अनुरक्त असलेल्या जोडप्याला वियुक्त केलें. हें अनार्य कृत्य मी करणें योग्य नव्हतें. परस्त्रीची अभिलाषा करून मी धर्म व अर्थपुरुषार्थांचा नाश केला. ही जनककन्या मला जेव्हां दिसली तेव्हां अमृतासारखी वाटली पण ही विषकुम्भासारखी आहे. ही मला जीर्ण गवतापेक्षाही तुच्छ मानीत आहे. हिच्या हृदयांत मला केव्हांच स्थान मिळणार नाहीं. जरी मिळालें तरी प्रीतीनें रहित अशा त्या स्थानाचा काय उपयोग? माझा भाऊ बिभीषण मला अनुकूल होता तेव्हां त्याचा उपदेश मी मानला नाहीं. माझ्या मनांत त्यावेळीं शमभावना उत्पन्न झाली नाहीं. आतां ती उत्पन्न झाली पण वेळ निघून गेली. युद्धापूर्वी मला सचिवांनीं उपदेश केला पण मला तो आवडला नाहीं. आतां रामचन्द्राबरोबर मैत्री करावी असें मनाला वाटतें पण तिचा उपयोग होणार नाहीं."

"मी जर दयार्द्र होऊन रामाला सीता दिली तर लोक मला रावण भ्याला असें म्हणतील. तो असमर्थ आहे असें म्हणतील. आतां मी मन कठिणच केलें पाहिजे जे दया सोडून कठिण बनतात तेच सुखी होतात. मी दयार्द्र झालों तर सुखी होणार नाहीं. या राम-लक्ष्मणाना युद्धांत सशाप्रमाणें पकडीन नंतर वैभवासह रामाला सीता देईन. आणि हाच उपाय मला बरा वाटतो." असा विचार करून रावण अन्तःपुरांत गेला. पुनः त्याच्या मनांत आपल्या स्त्रियांना अंगदादिकांनीं छळल्याची आठवण झाली; त्यामुळें त्याचें डोळे क्रोधानें लाल होऊन यमाप्रमाणें दांत ओठ खाऊन असें बोलूं लागला.

"या सुग्रीवाला व त्याच्या कारट्याला— (अंगदाला) कान पकडून आणीन व त्यांचे शेंकडो तुकडे करून दहा दिशांत बलि म्हणून फेकून देईन. भामण्डलाला बान्धून त्याच्या डोक्याच्या चिंधड्या लोहमुद्गराच्या आघातांनीं करीन तेव्हां माझ्या मनाला शान्ति वाटेल. वायुपुत्र मारुतीला बांधून त्याला लांकडाप्रमाणें करवतीनें चिरून टाकीन. फक्त रामाला मात्र सोडीन. बाकीच्या शत्रूंचीं पाळीमुळीं उपटून टाकीन." याप्रमाणें विचार करीत असतां अनेक दुर्निमित्तें उत्पन्न झालीं. सूर्याला चक्रास्त्राप्रमाणें खळें पडलें. नंतर गाढ अन्धकार पडला. विद्युत्पात होऊं लागले. जमीन गदगदा हालूं लागली. आकाशांतून रक्ताची वृष्टि होऊं लागली. कोल्हे रडूं लागले. हत्ती आपल्या सोंडा जमिनीवर आपटूं लागले. घोडे कर्कश खिंकाळले. देवांच्या प्रतिमांच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. कावळे सूर्याकडे तोंड करून तीक्ष्ण

शब्द करू लागले. सरोवरांत पुष्कळ पाणी असूनही तत्काळ आटून गेलें. पर्वतांची शिखरें कोसळू लागलीं. हीं सर्व दुर्निमित्तें पाहून लौकरच राजाचा मृत्यु होईल असें शहाणे लोक बोलू लागले.

हा रावण नीतिशास्त्रज्ञ व व्यवहारांत कुशल असूनही उन्मार्गी झाला. याची बुद्धि मोहानें भ्रष्ट झाली तथापि हा अतिशय गर्वोद्धत आहे. याला मरणाचें भय मुळींच वाटत नाहीं. याला नक्षत्रबल नाहीं. कुटिल ग्रहांची पीडा याला आहे तरी हा लढण्याची इच्छा करीत आहे.

भावाला व पुत्रांना मी सोडून आणीन व लंकानगरींत सुखानें राहीन असें हा इच्छित आहे. असें विद्वान् म्हणू लागले.

रात्रीं हा झोपेंतही दिवसा घडलेल्या गोष्टी पाहू लागला. आचार्य म्हणतात– या रावणानें जें पूर्वी अगदीं दृढ कर्म बांधलें आहे तें उदयाला येऊन याला दुःख दिल्याशिवाय राहणार नाहीं. पण रावण हें सर्व बदलून टाकीन असें म्हणतो पण हें केव्हांही शक्य नाहीं.

# चव्हात्तरावें पर्व.

[ [illegible] ]

आल्या स्त्रिया हजारो रावणनरनाथ नमुनि त्या रडती ।
हर्षिलें अङ्गदानें आम्हांस म्हणुनि असें तया वदती ॥ १ ॥
ज्यांची निमग्न असतां आपण आधार परमतेजानें ।
विद्याधरखद्योतादि पीडी आम्हांस पुन हें सांगे ॥ २ ॥
सुग्रीवाचा बालक अङ्गद नेऊन दुर्दशा अनुची ।
फांसा झाला आपण पाहुणी जी मनास दडु जाची ॥ ३ ॥
ऐकुनि वचन तयांचें दुःखानें त्यां बोलला असें वचन ।
मोठा दुःख मनांतील जीवित त्याचें अवश्य मी हरिन ॥ ४ ॥
पडले गळ्यांत त्याच्या मृत्यूचे पाश निश्चयें समजा ।
केली ज्यानें तुमची दुरवस्था त्यास मीच यमराजा ॥ ५ ॥
त्या सुग्रीवा समजा निर्ग्रीव करीन मी उणा समरीं ।
मी करिन नभोमण्डल भामण्डल रहित त्यास खचित मरी ॥ ६ ॥
ते रामचन्द्र-लक्ष्मण भूगोचर कीटतुल्य आहेत ।
सर्व खगांना मारुनि पाठवितों शीघ्र मृत्युनगरींत ॥ ७ ॥
तुमच्या भ्रुक्षेपानें शत्रूंचा नाश करुन टाकीन ।
यापुढ़ें चिंतनें तम्हांसी लवहि नच मला यत्न ॥ ८ ॥

[ नंतर स्नान-भोजन करून क्रीडाभूमींत जाऊन विद्येच्या द्वारें
अनेक रूपें धारण करून तिचें परीक्षण करितो. ]

यापरि करुन सान्त्वन प्रियभार्यांचें करावया स्नान ।
स्नानगृहा तो जाई त्रिखण्डपृथ्वीस जो असे शरण ॥ ९ ॥
संपूर्ण चन्द्र जैसे चांदीच्या कान्तिवन्त-कलशांनीं ।
स्नाना घालिति कान्तिज्योत्स्नाजलि पोहतात ज्या तरुणी ॥ १० ॥

---

१ विद्याधररूपी काजवे. २ कण्टकरहित. ३ शुळई वर चढविण्यानें.

ज्या कमल-कान्ति धरिती देहीं घेउनि सुवर्णकलश करीं ।
दशकण्ठा जणु घालिति सन्ध्या-स्नाना स्त्रिया अनेक परी ॥ ११ ॥
मरकतमणि-कलशांनीं[1] आल्या लक्ष्मी अनेक जणु तरुणी ।
स्नान दशास्या घालिति उटी तदङ्गा सुगन्धि लावोनी ॥ १२ ॥
यापरि करुनि स्नाना भक्ति मनीं धरुनि जाइ जिनभवना ।
पूजा करी जिनांची रावण गाऊन मधुरशा गाना ॥ १३ ॥
हृदयिं जिनेशा स्थापुनि भोजनगृहिं भोजनार्थ तो गेला ।
भोजन चतुर्विधोत्तम जेवून दशास्य तृप्त मनिं झाला ॥ १४ ॥
विद्यापरीक्षणार्थ क्रीडाभूमीस मोद मानून ।
गेला तिथें स्वताचें अनेक रूपांत तो करी सृजन[2] ॥ १५ ॥
विद्याधरास देखिल अशक्यकार्यें करून तो पाही ।
यापरि करुनि परीक्षण विद्येचें तोष हृदयिं बहु वाही ॥ १६ ॥
भीषण करुनि करांचा भूवरि आघात कांपवी तिजला ।
मरण प्राप्त जहालें ऐसें जणु वाटलें विपक्षबला[3] ॥ १७ ॥
सचिव तयाला वदले विद्येची सिद्धि आपणा झाली ।
नाथा ! राघवनाशीं समर्थता आपणा खरी आली ॥ १८ ॥
कोपें सन्तप्त अशा रामधनुष्यापुढें उभे कोण ।
नाथा ! एकचि आपण राहू शकता कदापि नान्यजन ॥ १९ ॥
विद्येनें श्रीरावण अपारसें सैन्य रचुनि जाइ वनीं ।
शोभे इन्द्रासम तो वदती सीतेस खेचरी बघुनि ॥ २० ॥
सीते शुभे पहा गे रावण-मुख-कान्ति केवि खुलुनि दिसे ।
जणु चन्द्राची शोभा भरती आणून सागरा विलसे ॥ २१ ॥
निरुपम रूप तयाचें बघून तव दृष्टि सफल होईल ।
रूपहि त्याचें सुन्दरि अनुरूप तुझ्या मनास भासेल ॥ २२ ॥

[ रावणाचें अपार सैन्य पाहून सीता मनांत घाबरून राम-लक्ष्मण व भामण्डल यांच्या मरणाविषयीं चिंता व्यक्त करिते. ]

निर्मल विकारविरहितदृष्टीनें रावणास पाहून ।
सेना अपार त्याची वैदेहीचें बने सचिन्त मन ॥ २३ ॥

---

१ पांचरत्ननिर्मित कुंभांनीं. २ निर्माण. ३ शत्रुसैन्याला.

पार दिसेना ज्याचा ऐशा सैन्यास राम-लक्ष्मण या ।
जिंकू शकतिल कैसें संकट हें गजघटी करी धावा ॥ २४ ॥
दुर्वार्ता मी राघव-लक्ष्मणमृतिवृत्त सत्वरि ऐकेन ।
किंवा या पापिनें आक्रन्द-भरणा ऐकतिल कान ॥ २५ ॥
यापरि चिन्ता होतां थरथर कांपे शरीर सीतेचें ।
रावण वदे गिरेला अश्रूंनीं भय न होय कामाचें ॥ २६ ॥

[ मी रामलक्ष्मणांना मार्गीनें मारुन टाकीन असें रावण बोलला. ]

देवि, तुला मी पापें कपटानें हरण करुनि आणियलें ।
क्षत्रियकुलोद्भवा तूं भय निष्कारण मनीं वृथा धरिलें ॥ २७ ॥
माझें अवश्य भावी कर्म असे तें चुके न कव्हांही ।
या स्नेह-मोह अतिशय वल्लिष्ठ दुर्जविपत्ति ते असे पाही ॥ २८ ॥
पूज्य मुनीश्वर भवती अनन्तवीर्याख्यकेवलीचरणीं ।
व्रत घेतलें असे मी परललनात्याग सकलसाधुगणीं ॥ २९ ॥
जी स्त्री वरी न मजला रतिकर्म तिच्यासवें न मी करिन ।
ती उर्वशी असो या रम्भा या त्याज्य तीस मानीन ॥ ३० ॥
तें व्रतपालन केलें म्हणुनि बलात्कार मी नसे केला ।
परि लक्ष्मणा नि रामा आतां मारीन सोड शङ्केला ॥ ३१ ॥
पुष्पकयानीं बसुनि स्वच्छन्दें मजसवें विहार करी ।
जिनमन्दिरें अकृत्रिम वन्दुनि तूं पोह विपुलसौख्यसरीं ॥ ३२ ॥
गङ्गासिन्ध्वादिक ज्या सरिता त्यांच्या तटीं विहार करू ।
संभोगसौख्य भोगू वियोग दुःखास दूर क्षणिं वारूं ॥ ३३ ॥
यापरि रावणभाषण ऐकुनि करकमलमुकुल जोडून ।
सकरुण वदली सीता बाष्पांनीं रुद्धकण्ठ होऊन ॥ ३४ ॥
स्नेह तुझा माझ्यावरि किंवा आहे प्रसाद म्हणतोस ।
या एक वाक्य माझें मम विज्ञप्ति त्वदीयचरणास ॥ ३५ ॥

[ रावणा माझा सन्देश याप्रमाणें माझ्या पतीला सांग ]

होऊन कुपित युद्धीं जेव्हां मारावयास होशील ।
उत्सुक प्रियनाथा, माझा सन्देश वद दयाशील ॥ ३६ ॥

---

१ वार्ता. २ कळी.

हे पद्मराघवा वा कळवित आहे तुझी प्रिया सीता ।
जी भामण्डलभगिनी सतत त्वत्सङ्गमाभिलाषरता ॥ ३७ ॥
वातें दीपशिखेसम पीडित होऊन शोकभारानें ।
तव वध होतांही न प्राणा त्यजिलेचि वज्रहृदयेनें ॥ ३८ ॥

[ सीतेला मूर्च्छित पडलेली पाहून हिला मी हरण करण्याचें अयोग्य कार्य केलें इत्यादिक विचारांनीं रावण पश्चात्ताप व्यक्त करितो. ]

यापरि बोलुनि पडली मूर्च्छित होऊन जनकतनया ती ।
पाहुनि अशी अवस्था रावण करुणार्द्र मानसीं चिन्ती ॥ ३९ ॥
मम कर्मोदय ऐसा स्नेह तुझ्यावरि अखण्डसा राहे ।
नच अन्त त्यास येइल केलें मी हरण म्हणुनि तुज पाहे ॥ ४० ॥
मजला धिक्कार असो केलें मी अप्रशस्त हें कार्य ।
मी मिथुन[1] वियुत केलें म्हणेल मज कोण नर वरें आर्य ॥ ४१ ॥
पापीं प्रवृत्त झालों खल मी लोकांत सर्वथा ठरलों ।
अपकीर्तिमळें मळलों सुजनगणें निन्द्य मानिला गेलों ॥ ४२ ॥
निर्मल कमलासमशा विशुद्धवंशास मलिन मी केलें ।
केलें अकार्य दुःखद कल्पान्तस्थायि[2] हें असे झालें ॥ ४३ ॥
नारी पुरुषश्रेष्ठा सहसा मृत्यूस हेतु ही आहे ।
किंपाकफलासम ही क्लेशोत्पत्तीस भूमि ही पाहे ॥ ४४ ॥
सर्प-फणा-रत्नांच्या कान्तीसम मोह मानवास करी ।
सामान्यें स्त्री ऐशी विशेषमोहा पराङ्गना वितरी ॥ ४५ ॥
आहे नदीप्रमाणें कुटिला धर्मार्थनाश करणारी ।
वर्जावी साधूनें अशुभ महाखनि विवेक हरणारी ॥ ४६ ॥
जेव्हां प्रथम मला ही दिसली अमृतासमान मज गमली ।
देवाङ्गनेहुनीही प्रिय ही माझ्या मनास बहु झाली ॥ ४७ ॥
ही जनकाची कन्या सदा परासक्तमानसा आहे ।
विषकुम्भीसम[3] माझ्या उद्विग्न मना करीतसे पाहे ॥ ४८ ॥

[ रावणाच्या मनांत विवेकपूर्ण विचार येतात मी रामाला सीता देईन पण त्याला जिंकून ती देईन. ]

---

१ पति-पत्नी. २ प्रलयकालाच्या शेवटापर्यंत. ३ विषानें भरलेल्या बिंदगीसारखी.

पूर्वी ही मज इच्छित नव्हती परि मन अशून्यसें होतें ।
आतां जीर्णतृणासम माझ्याविषयीं अनादरा धरिते ॥ ४९ ॥
स्थान हिच्या मनिं अन्या आहे मजला मिळे न तें तेथें ।
जरि लाभेल मला तें प्रीतीनें रहित काय कामा तें ॥ ५० ॥

माझा बन्धु बिभीषण होता अनुकूल तेधवा त्याचा ।
उपदेश मानिला नच जो होता सर्वथैव सुहिताचा ॥ ५१ ॥
परि त्यासमयीं माझ्या मनांत शमभावना न उद्भवली ।
आतां उदय तियेचा झाला परि वेळ निघुनि ती गेली ॥ ५२ ॥

होतां प्रमाद होतें विकारवश मन सुपुण्यवन्ताचें ।
परि तें पुनरपि निवळे होउनि वश करितसेचि हित त्याचें ॥ ५३ ॥
युद्धापूर्वी केला सचिवें सुविचार परि न मज रुचला ।
मैत्री-विचार आतां उपयोगी नच असे जरी सुचला ॥ ५४ ॥

युद्ध नि करुणा दोघे भाव परस्पर विरुद्ध हे असती ।
आतां सङ्कट मोठें आलें हरण्या समर्थ हो न मति ॥ ५५ ॥
रामाला अर्पिली मी सीता हृदयीं दयार्द्र होऊन ।
परि जन मजला म्हणतिल रावण निर्बल नि जाहला ऊन ॥ ५६ ॥

जे जन करुणा सोडुनि निर्दय होतात ते सुखी होती ।
करुणामृदुहृदयाचे आम्ही होऊं सुखी न या जगतीं ॥ ५७ ॥
सिंहें गरुडें उद्धत ऐशा रामा नि लक्ष्मणास वश ।
समरीं निरस्त्र पकडुनि करुन उभयास जेवि अबल शशें ॥ ५८ ॥
नन्तर देऊन विभवें सीता रामा उपाय हाचि बरा ।
ऐसा विचार केला दशाननें शान्त होय मति चतुरा ॥ ५९ ॥
अन्यायभयापासुनि जननिन्दा जी जगांत होईल ।
पूर्वोक्तकृतीनें ती सगळी माझी विनाश पावेल ॥ ६० ॥

[ अन्तःपुरांत गेल्यावर स्त्रियांची विटंबना अंगदादिकांनी केली या विचारानें पुनः सन्तप्त होऊन सुग्रीवादिकांना मारण्याचा विचार रावण करितो. ]

यापरि करुनि विचारा रावण झाला मनांत निश्चिन्त ।
निजवैभवासवें तो गेला अन्तःपुरामध्यें त्वरित ॥ ६१ ॥

---

१ परन्तु माझें मन तिच्याविषयीं रिकामें नव्हतें. २ ससा.

अन्तःपुरांत परिभव[1] येतां ध्यानांत शत्रुकृत थोर ।
क्रोधें लाल जहाले डोळे दिसतात खादिराङ्गार[2] ॥ ६२ ॥
झाला भीम यमासम बोले तैं दांत ओठ खाऊन ।
मारीन धरुनि पाप्या दुर्ग्रीवाचा सहाङ्गदा कान ॥ ६३ ॥
खड्गें सहस्र त्याचे करून तुकडे दहा दिशांत वलि ।
देईन शान्त होइल तेव्हां मत्क्रोध-देवता काली ॥ ६४ ॥
भामण्डलास बान्धुनि दृढ त्याला लोहमुद्गराघातें ।
जीवितविरहित करितों त्याविण मत्क्रोध-आग नच शमतें ॥ ६५ ॥
धार भयंकर ज्याची तीक्ष्ण असा क्रकच[3] घेउनि स्वकरीं ।
कापीन पवनपुत्रा बांधुनि काष्ठासमान मी समरीं ॥ ६६ ॥
रामास फक्त सोडिन अवशिष्ट-समस्त-शत्रुवृन्दास ।
मारीन ठार जाळिन त्यांच्या पुत्रादिवंशकंन्दास ॥ ६७ ॥

[ रावणाचा विनाश सुचविणारीं अनेक दुर्निमित्तें झालीं. ]

यापरि निश्चय केला दशाननें त्याचसमयिं उत्पात ।
झाले नानाभयकर नैमित्तिक यत्स्वरूप वदतात ॥ ६८ ॥
पडले सूर्याभोंती चक्रास्त्रासम खळे महा अरुण ।
गाढान्धकार पडला निशिं गेला चन्द्र तेधवा पळुन ॥ ६९ ॥
विद्युत्पात भयंकर झाले ही भूमि गदगदा हाले ।
शोणितवृष्टि[5] नभांतुनि झाली जणु त्यांत खुपसले भाले ॥ ७० ॥
विरस असे कोल्ह्यांचें रडणें ऐकुनि मनांत जन भ्याले ।
हलवून मान अश्वें कर्कश खिंकाळणें सुरू केलें ॥ ७१ ॥
हत्ती अतिशयखेदें आपटती सतत सोंड भूवरती ।
कर्कश करून गर्जन रावण-लक्ष्मीविनाश सूचविती ॥ ७२ ॥
देवांच्या प्रतिमांच्या नेत्रांतुनि अश्रु सतत ओघळती ।
वृक्ष प्रचण्ड कारण नसतांही उन्मळून कोसळती ॥ ७३ ॥
मुख करुनि रविकडे खर[6] रव करिती काक खिन्न होऊन ।
एकेकटे जयांचे पंख ढिले जाहले महादीन ॥ ७४ ॥

---

१ अपमान, तिरस्कार. २ खैराचा विस्तव. ३ करवत. ४ वेळूच्या गांठीस, गठ्यास. ५ रक्ताचा पाऊस. ६ तीक्ष्ण शब्द.

पुष्कळ पाणी ज्यामधिं सरोवरें तींहि आटलीं सहसा ।
पर्वतशिखरें पडलीं रक्ताची हो नभांतुनि वर्षा ॥ ७५ ॥
अत्यल्पशा दिनांनीं विकार हे कथिति नृपतिमरणास ।
नाहींतर हीं चिह्नें झालीं नसतींच वदति विद्वांस ॥ ७६ ॥
पुण्याचा क्षय होतां स्वस्थानच्युत सुरेशंही[1] होतो ।
जन कर्मतन्त्र[2] असती प्रयत्न तैं गौणतेस झणि वरतो ॥ ७७ ॥
जें कर्म जीव करितो फल नच देतां कदापि तें न गळे ।
दैवाधीन असे जन त्यापासुनि तो कदापि नैव पळे ॥ ७८ ॥
नयशास्त्र-निपुण रावण लोकव्यवहार जाणता होता ।
परि उन्मार्गी झाला झाली तद्बुद्धि पूर्ण मोहरता ॥ ७९ ॥
मरणाहुनि नच मोठें दुःख असे या जगांत कोठेंही ।
अतिशय गर्वोद्धत हा लवहि तयाचें मनांत भय नाहीं ॥ ८० ॥
नक्षत्रबल न याला कुटिल ग्रह पीडिती अशा समयीं ।
लढण्यास इच्छितो हा वचन कुणाचें न मान्य त्या होई ॥ ८१ ॥
वीररसाचा पुतळा रावण यद्यपि असे महाविबुध ।
तीव्रप्रतापसंयुत युक्तायुक्ता न पाहतो भयद ॥ ८२ ॥
जिंकुनि शत्रुगणाला पुत्रां बन्धूस मुक्त मी करिन ।
करुनि प्रवेश लङ्कानगरीं सावध सदैव राहीन ॥ ८३ ॥
जे भूप भूमिगोचर सर्वांचें राज्य हरुनि घेईन ।
विद्याधरनृप तेथें स्थापुनि भूमण्डलास रक्षीन ॥ ८४ ॥
म्हणजे खगवंशामधिं जिनेन्द्र[3] चक्री[4] नि राम[5] होतील ।
कृष्ण[6] प्रतिकृष्ण[7] असे पुरुष शलाकाख्य जन्म घेतील ॥ ८५ ॥
यापरि विचार चित्तीं करून तो मृदुलशुभ्र शयनांत ।
झोपे परि तो पाही स्वप्नीं दिनजातकार्यसंघात[8] ॥ ८६ ॥
केलें कर्म निकाचित[9] ज्यानें नियमेंचि भोगणें लागे ।
फल त्याचें त्या मनुजा बदल न होतो तयांत जिन सांगे ॥ ८७ ॥

---

१ इन्द्र. २ कर्मांच्या आधीन. ३ तीर्थंकर. ४ चक्रवर्ती षट्खण्डाधिप. ५ बलभद्र. ६ नारायण. ७ प्रतिनारायण. ८ दिवसा घडलेल्या कार्यांचा समूह. ९ ज्या कर्मांत उपशम, उदीरणा वगैरे नसतात व जें नियमानें उदयाला येऊन आपलें फल देतें तें निकाचित होय.

आगमरविप्रकाशित वस्तूचें जें स्वरूप घदले न।
परि जो जिनदास नसे नरघूका वाटतें तसें त्या न ॥ ८८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे युद्धनिश्चयकीर्तनाभिधानं नाम द्वासप्ततितमं पर्व ॥ ७२ ॥

# त्र्याहत्तराव्या पर्वाची कथा.

दुसरे दिवशीं दशानन सूर्योदय झाल्यावर रत्नमयसिंहासनावर बसला असतां चन्द्राप्रमाणें दिसू लागला. अनेक राजेही सभेंत आपआपल्या स्थानीं बसले होते. परंतु पराक्रमी इन्द्रजित, मेघवाहन व कुंभकर्ण तेथें नसल्यामुळें ती सभा शोभत नव्हती. हे तिघे नसल्यामुळें रावणाला शत्रूविषयीं राग आला व डोळे खदिरांगाराप्रमाणें लाल झाले. भुवया वर चढल्या व रागावलेल्या सर्पाप्रमाणें तो फूत्कार टाकू लागला. दांतांनीं ओठ चावून तो चारही दिशाकडे पाहूं लागला. त्याची क्रुद्ध दशा पाहून जवळ बसलेल्या सचिवांनाही भय वाटलें. त्याचवेळीं रत्नखचित खिडकींतून मंदोदरीनें क्रुद्ध रावणाकडे पाहिलें. तिच्याहि मनांत भय उत्पन्न झालें.

यानंतर डोळे लाल केलेला रावण उठून आयुधशाळेकडे जात असतांना मार्गांत अपशकुन झाले. त्याच्या पाठीमागें कोणी शिंकलें. मार्गांत सर्प आडवा आला. तुला धिक्कार असो. तूं कोठें जातोस, असे शब्द कानीं पडले. पण कोण बोलला हें त्याला दिसलें नाहीं. वारा सुटून छत्राचा दंड मोडला व खांद्यावरचा शेला खालीं गळून पडला. असे अपशकुन त्याला युद्धपरावृत्त करीत होते.

मंदोदरीला शकुनांचें ज्ञान होतें. तिनें सचिवांना, तुमच्या मालकाला युद्धाला जाऊ नको असें सांगा आपण स्वामीचें हित कशांत आहे हें सांगत नाहीं. हें मला बिलकुल पसंत नाहीं. तुम्ही शत्रुबरोबर संधि करा असें स्वामीस सांगा, असें ती म्हणाली. शत्रूनें कुंभकर्णादिकांना बंधनांत टाकिलें आहे. त्यांना सोडवून कां आणीत नाहीं.

मंदोदरीला सचिवांनीं म्हटलें— बाईसाहेब, रावण यमासारखा आहे. त्याचें राज्यशासन अतिशय कडक आहे व तो स्वप्रधान आहे. अर्थात् दुसऱ्याचें सांगणें त्याला पसंत पडत नाहीं. ज्याचें वचन तो मानील असा कोणी मनुष्य आम्हाला आढळून आला नाहीं. त्याची बुद्धि कर्मप्रेरित असल्यामुळें आमचें सांगणें व्यर्थ होत आहे. आतां आपणच चारगोष्टी सांगून पाहा. आपलें वचन त्याला पसंत पडलें तर फारच चांगलें झालें असें आम्ही समजू.

मंदोदरीनें सचिवांचें म्हणणें मान्य केलें. व ती सुवेष करून जेव्हां रावणाकडे चालली तेव्हां जणु राजलक्ष्मी त्याच्याकडे जात आहे असें वाटलें.

अंगांत चिलखत घालून व हातांत तीक्ष्ण तरवार घेऊन शस्त्रागाराच्या द्वारांतून येत असलेल्या रावणानें मंदोदरीला पाहिलें. व देवि कां आलीस ? तूं फार सुकुमार आहेस. इकडे येण्याचें श्रम कां केलेस ? मला सांग.

मंदोदरी म्हणाली– नाथ, मी पतिभिक्षा मागण्यासाठीं आले आहे. नाथ, आपण आपल्या कुलकमलवनाला सूर्यासारखें आहांत. आपण त्याची उपेक्षा करूं नये. अकीर्तिरूपी हिमापासून त्याचें रक्षण करा. मी थोडेसें कठोर भाषण करीन पण आपण न रागावतां तें ऐकून घ्यावें. आपलें मन उन्मार्गांत धावत सुटलें आहे त्याला ताब्यांत ठेवा. शरभ नामक प्राणी आडाच्या स्वच्छ जलांत आपलें प्रतिबिंब पाहून त्यांत उडी टाकतो तसें आपण परस्त्रीरूपी आडाच्या पाण्यांत उडी टाकून आपलें शरीर गमावूं नका. समुद्राप्रमाणें गंभीर अशा कुलाला आपण भूषवा. भूगोचरी स्त्रीचा त्याग करून सन्मार्गांत तत्पर राहा. सीतेचा आग्रह सोडा. तो अकीर्ति पसरविणारा आहे. इतर व्रतें दूरच राहोत फक्त परस्त्रीत्यागव्रत ज्यानें मनःपूर्वक पाळलें आहे त्या शीलवंताची सर्व जग प्रशंसा करतें. पुरुष मेरुपर्वताप्रमाणें मोठा असला तरी परस्त्रीच्या अभिलाषेनें तो गवताप्रमाणें हलका होतो. अर्ककीर्ति, सुमुख, अशनिघोष वगैरे राजे परस्त्रीची अभिलाषा धरून मरण पावले व दुर्गतीला गेले. मंदोदरीचें हें भाषण ऐकून रावणानें म्हटलें– प्रिये, मी अर्ककीर्ति, सुमुख किंवा अशनिघोष नाहीं. तूं असें कुत्सित भाषण कां बोलतेस. मी शत्रुवनाला जाळण्यास अग्निसारखा आहे. मी सीता देणार नाहीं व लौकर रामाला मारून टाकीन. सीतेचें रक्षण करण्यासाठीं मी तुझ्या ताब्यांत तिला दिलें आहे. जर तिचें रक्षण तूं करूं शकत नसशील तर ती मला दे.

हें त्याचें निर्लज्जपणाचें भाषण ऐकून मंदोदरीनें हातांतल्या कमलानें त्याच्यावर आघात केला. त्या आघातानें त्याला विशेष आनंदच वाटला.

मंदोदरी पुनः म्हणाली– प्रभो, सीतेमध्यें आपणास काय विशेषता आढळून आली ? ती मोठी गुणवती किंवा अतिशय सुंदर अथवा कलाचतुर आहे असेंही दिसून आलें नाहीं. ती एका खेडवळ स्त्रीप्रमाणें वाटते– अज्ञबालक सुंदर वैडूर्यरत्न टाकून कांचेला घेतो तसा प्रभो, आपल्याला तिच्याविषयीं मोह उत्पन्न झाला आहे.

मी लक्ष्मी, श्री, रति किंवा इंद्राणीचें रूप धारण करून आपल्या मनाला रमवू शकते. मंदोदरीचें हें भाषण ऐकून रावणानें खालीं मान घालून तिला म्हटलें– "खरेंच परस्त्रीची अभिलाषा मी मनांत धारण केली त्यामुळें मला हलकेपणा प्राप्त झाला आहे. मला धिक्कार असो. मी विषयासक्तीच्या खोल चिखलांत बुडालों आहे. देवि! तूंच मला प्रिय आहेस. प्राणापेक्षांही तुझ्यावर माझें प्रेम आहे."

मंदोदरी म्हणाली– "नाथा, आपण नीतिज्ञ-चतुर आहांत. पण प्रमादवश होऊन आपलें चित्त परस्त्रीची अभिलाषा करीत आहे. विष्णुकुमारमुनींना विक्रिया-ऋद्धीची प्राप्ति झाली तेव्हां त्यांना आत्मस्वरूपाची विस्मृति झाली. सिद्धान्तगायकांनीं त्यांना संबोधण्याचा प्रयत्न केला व तो सफल झाला. तसें आपणाला परस्त्रीच्या अभिलाषेविषयीं वाईट वाटत आहे हें चांगलें झालें.

मी आतां जानकीला घेऊन रामाजवळ जाते. त्याला ती देऊन इंद्रजित्, मेघवाहन व कुंभकर्णांना सोडवून आणते. यामुळें वैर मिटेल, युद्ध टळेल व बहु-जन-प्राणांचें रक्षण होईल. दोन्ही पक्षांत शांति व सुख उत्पन्न होईल."

हें भाषण ऐकल्याबरोबर रावण रागानें उसळून तिला म्हणाला– "तूं आतां भलतीच शहाणी झाली आहेस. आपला मोठेपणा सोडून शत्रूची स्तुति करूं लागली आहेस. तूं वीरजननी आणि माझी पट्टराणी होऊन भ्याड मनुष्याप्रमाणें जें तूं भाषण केलेंस तें तुला शोभत नाहीं." पुनः मंदोदरी म्हणाली– "नाथ, त्रिपृष्ट आदिक सात नारायण होऊन गेले. आतां राम व लक्ष्मण हे आठवे बलभद्र व नारायण आहेत. तेच आतां या ठिकाणीं युद्ध करण्यास आले आहेत. अश्वग्रीवादिक सात प्रतिनारायण नाश पावले. आतां आठव्या प्रतिनारायणाचा हा समय आहे. हे प्रभो, आपला नाश होऊ नये व जें सौभाग्य आमचें भूषण आहे तें चिरकाल राहावें असें आम्हाला वाटतें.

आतां आपलें आयुष्य गृहस्थधर्माचरणांत व्यतीत करावें. अणुव्रताची तरवार आपण कंबरेला लावा. नियमरूपी छत्र मस्तकावर धारण करा. सम्यग्दर्शनरूपी चिलखत धारण करा. शीलध्वज हातांत घ्या. सम्यग्ज्ञानरूपी धनुष्य खांद्यावर धारण करा. वश झालेली इंद्रियें हेंच आपलें सैन्य आहे. मर्यादारूपी अंकुश हातांत घेऊन निश्चयरूपी हत्तीवर चढून बसा. मैत्र्यादिभावनारूपी चंदनाची उटी आपल्या अंगाला लावा. धर्मध्यानरूपी पराक्रम करून जिनभक्तिरूपी शक्त्यायुध घेऊन

दुर्गतिरूपी सैन्याला मारून टाका. असा गृहस्थरूपी राजा आपण व्हा व हिमवान्-मन्दर आदिक पर्वतावरील अकृत्रिम जिनमंदिरांचें पूजन करून माझ्याबरोबर विहार करा. माझें हें भाषण आपण ऐका व सुखी व्हा." असें बोलून ती मंदोदरी पति-हिताच्या तळमळीनें रावणाच्या पाया पडली.

रावण हंसून म्हणाला– " तूं विनाकारण मनांत भय बाळगीत आहेस. जगांत माझ्यापेक्षां सामर्थ्यशाली कोणीच नाहीं. नारायण व बलभद्र या नांवाचीं हजारों माणसें आहेत. नांव मोठें व लक्षण खोटें हें तूं पक्कें समज व मनांतून भय काढून टाक. रथनूपुरचा राजा इंद्र होता त्याला जिंकून मी अनिंद्र केलें हें तुला माहीत आहेच."

याप्रमाणें भाषण करून मन्दोदरीला घेऊन रावण अन्तःपुरांत गेला. त्यावेळीं सूर्य अस्ताला गेला. रात्र आली चंद्राचा उदय होऊन त्याच्या किरणांनीं भूतल दूध सांडल्याप्रमाणें शुभ्र व शांत झालें. मंदोदरीबरोबर रात्र रावणानें सुखानें घालविली.

पहाट झाली. कोंबडा आरवू लागला. संध्येचा लाल प्रकाश पूर्वेकडे पसरला. जिनभक्त जिनमंदिरांत जिनस्तुति करण्यांत मग्न झाले. सूर्योदय झाला. चोहींकडे आपले उष्ण किरण फेकून सूर्यानें सर्व दिशा उज्ज्वल केल्या. युद्धाचे नगारे वाजू लागले. योद्धे युद्ध करण्यासाठीं निघाले. स्त्रियांचीं अंतःकरणें आपल्या पतिबरोबर युद्धस्थळीं गेलीं पण शरीरें खिन्न होऊन शय्येवर पडलीं.

एक सम्यक्त्वी व अणुव्रतधारक योद्धा युद्धस्थलाकडे जात असतां त्याच्या स्त्रीनें त्याच्या पाठीकडे वारंवार पाहिलें व सुरकन्यांनीं त्याचें मुख पाहिलें अशा रीतीनें दोघींनीं त्याच्याविषयीं आपल्या मनांत इच्छा धरिली. चतुरंगसैन्य घेऊन मारीच, श्रीचन्द्र, विमल, अम्बुद वगैरे अनेक राजांनीं विद्यारथ निर्माण करून त्यांत बसून रणांगणीं प्रयाण केलें.

पूर्वभवीं जें शुभ किंवा अशुभकर्म संचित केलेलें असतें त्याला अनुसरून जीवाचें शुभ किंवा अशुभ घडत जातें. इंद्र, चंद्र, रवि त्याच्या त्या कर्मांत फरक करण्यास समर्थ होत नाहींत. त्यांनीं तसा प्रयत्न केला तर तो विफल व प्रयास-रूपाचाच होईल. असें जिनाचे दास असलेल्या भव्यांनीं समजावें.

# ऱ्याहत्तरावें पर्व.

दुसरें दिनीं दशानन दिनकर उदयाचलावरी येतां ।
चढला मणिसिंहासनि चन्द्रापरि मानित तया जनता ॥ १ ॥
पाही सभेंत इकडे तिकडे चिन्ता मनांत त्या उपजे ।
इन्द्रजित विक्रमी जो सुत त्याविण ही सभा कशी साजे ? ॥ २ ॥

( रागावलेल्या रावणाला पाहून मंत्रिगण व मंदोदरी आदिक स्त्रिया भ्याल्या. )

तव वीर मेघवाहन दिसतो येथें न कलशकर्ण दिसे ।
ऐसी चिन्ता होतां वदनीं ग्रीष्मार्क[1]तुल्य कोप वसे ॥ ३ ॥
मुखच्या वरतीं चढल्या सरोषसर्पासमान फूत्कार ।
टाकी दन्तें ओष्ठा डसून नयनें दिशा बघे चार ॥ ४ ॥
पाहून कोपरूपा सचिवजनीं भीति उघडे वदले ।
राजन् ! प्रसन्न व्हावें अञ्जलि जोडून नम्र पदिं झाले ॥ ५ ॥
कैलासासम उन्नत सौधांतुनि रावणाकडे पाहे ।
नारीगण तत्कोपें मृगीगणासम अतीव भय वाहे ॥ ६ ॥
रत्नगवाक्षा[2] उघडुनि पाहे मन्दोदरी दशास्यास ।
क्रोधाग्नी जणु पाहुनि मूर्ति तया ती घडे भयावास ॥ ७ ॥
डोळे लाल जयाचे महाप्रतापी दशास्य तेथून ।
उठला नि करूं लागे अमोघ[3]शस्त्रालयाकडे गमन ॥ ८ ॥

( शस्त्रागाराकडे जातांना रावणाला अनेक अपशकुन झाले. )

शस्त्रगृहीं करितांना प्रवेश अपशकुन त्यास बहु झाले ।
मागें शिंके कोणी सर्पें मार्गीं तयास आडविलें ॥ ९ ॥
हाहा धिक्कार असो तुला कुठें जाशि सांग जणु त्यास ।
उद्देशुनि कुणि वदला कोणाला समजलें न वचनास ॥ १० ॥
वारा सुटून मोठा तुटला वैडूर्यदण्ड छत्राचा ।
खांद्यावरून गळला पडला परि पदर ऊर्ध्ववस्त्राचा ॥ ११ ॥

---

१ ग्रीष्मऋतूच्या सूर्यासारखा. २ रत्नजडित खिडकी. ३ अवश्य जय देणाऱ्या शस्त्रगृहाकडे.

यापरि अनेक झालीं अनिमित्तें जीं निषेधितीं त्यास ।
जाऊ नकोस युद्धा निश्चित होईल त्यांत तव नाश ॥ १२ ॥
नानाशकुनज्ञानी प्रवीण मन्दोदरी अशा शकुना ।
पाहुनि सचिवा वदली सांगा जाऊ नका प्रभूस रणा ॥ १३ ॥

( शत्रुबरोबर संधि करण्याला आपण रावणाला सांगा असें मंदोदरीनें म्हटल्यावर सचिव तिला असें बोलले. )

हित त्याचें न कथावें सचिवांनीं हें मला न योग्य गमे ।
अरिशीं सन्धि करावा लक्ष्मीचें मन तरीच येथ रमे ॥ १४ ॥
श्रीकुम्भकर्ण आदिक अरिबन्धन पावले महावीर ।
कां त्या सोडविता नच झाले दुःखांत जे सदा चूर ॥ १५ ॥
मन्दोदरीस वन्दुनि वदले रावण कृतान्तसम आहे ।
शासन तीव्र तयाचें आहे तो स्वप्रधान गे पाहे ॥ १६ ॥
मानी वचन जयाचें असा नसे एकही जगांत नर ।
कोणीं कसें करावें हित त्याचें वद बरें नरें चतुर ॥ १७ ॥
कर्मप्रेरित ज्याची बुद्धि असे इन्द्रही प्रवृत्त हितीं ।
त्याला करूं शकेना असुची त्याच्यापुढें किती शक्ति ॥ १८ ॥
उत्तम अर्थ भरलीं शास्त्रें तो शुक्रनीतिही जाणी ।
परि मोह तया बांधी हित त्याचें करूं शके न नर कोणी ॥ १९ ॥
सांगितलें बहु आम्ही प्रकार त्याचा न राहिला कांहीं ।
इष्टापासुनि त्याचें निवृत्त होतें न चित्त गे पाही ॥ २० ॥
पाऊस पडुनि फुटल्या नदप्रवाहास रुद्ध कोण करी ।
कर्मप्रेरित जीवा हिततत्पर करूं शके न जरिहि हरि[1] ॥ २१ ॥
हे देवि ! तूं प्रभूला सांगू शकशील चार शब्द खरे ।
ऐकेल तो कदाचित् उपेक्षणें हें कधींहि नैव बरें ॥ २२ ॥
सचिवोक्ति अशी ऐकुनि हित सांगायास चार शब्द निघे ।
मन्दोदरीसुवेषें हृदयिं पतिप्रेमपूर भूरि[2] रिघे ॥ २३ ॥
सुच्छत्र शिरीं धरिती चामरयुग वारिती अशा नारी ।
निघती तैं ती शोभे राज्यरमा चालली जणु दुसरी ॥ २४ ॥

१ इन्द्र. २ पुष्कळ.

चिलखत चढवुनि देहीं करांत तरवार तीक्ष्णशी धरिली।
ज्यानें अशा दशास्या द्वारीं मन्दोदरीं वरा[१] दिसली ॥ २५ ॥
आलीस देवि! वद गे किमर्थ कां पदयुगा दिला त्रास?।
सुकुमार फार असती दिलास देहा[२] कशास आयास? ॥ २६ ॥

( मंदोदरी– नाथ; आपण सीतेचा त्याग करा, परस्त्रीच्या आसक्तीनें आपला नाश करून घेऊं नका असा उपदेश करिते. )

करुनि प्रणाम वदली द्या पतिभिक्षा प्रसन्न होऊन।
प्रेमें धर्में नि दयें युक्त असे नाथ! आपुलें सुमन ॥ २७ ॥
विरहनदीदुःखजलीं संकल्पतरङ्ग रङ्गती ज्यांत।
बुडत असे मी नाथा तारा मज व्हा दयारसस्वान्त ॥ २८ ॥
कुलकमलवन असे भो विपुल उपेक्षा करूं नका त्याची।
बान्धवनभास भास्कर आहा मति निर्मला असो तुमची ॥ २९ ॥
स्वामिन् माझें भाषण कठोर किंचित् तथापि ऐकावें।
हृदयीं क्षमा धरावी रोषाकुल तें कधींहि न करावें ॥ ३० ॥
परिणामीं सुख देतें स्वभाव अविरुद्ध जें सदा धरितें।
अप्रियहि मित्र-भाषण ऐकावें तें सदैव हित करितें ॥ ३१ ॥
संशयतुलेवरि प्रिय! होउनि आरूढ दुःख आम्हांस।
कां देता कां आपण भोगित आहांत दुःखराशीस ॥ ३२ ॥
हानि न कांहीं झाली नाथा! ही भू असे तवाधीन।
उन्मार्गीं जें धावें ठेवी ताब्यांत तें स्वकीय मन ॥ ३३ ॥
नाथा चित्तरथा तव नेती हे इन्द्रियाश्व कुपथास।
धरुनि विवेकलगामा खेचा स्थापन कराचि सुपथांत ॥ ३४ ॥
गम्भीरता नि धैर्यहि नाथ न दिसतात आज तव ठायीं।
इन्द्रियहयवशबाही कुपथीं नेई मनोरथा पाहीं ॥ ३५ ॥
शरभ जसा स्वच्छाया कूपजलीं बघुनि मारि त्यांत उडी।
परनारीकूपजलीं पडतां होईल नष्ट नाथ कुडी ॥ ३६ ॥
सागरगम्भीरकुला श्लाघ्या भूषित करी पुनर्नाथा।
भूगोचरस्त्रियेला सोडुनि घे तूं सदा सुवृत्तपथा[३] ॥ ३७ ॥

१ सुन्दर. २ शरीर. ३ सदाचाराचा मार्ग.

वीर विरोधा करिती असतो तो सुप्रयोजनासाठीं ।
मानुनि मनिं इतरांचें अपुलें वा मरण हाणिती काठी ॥ ३८ ॥
जरि अरिसमूह जिंकुन वश केला मिळविलें तुवा काय ?
आग्रह सीताविषयक अकीर्तिकर हा जगत्रयीं होय ॥ ३९ ॥
व्रत इतर दूर राहो परललनात्याग जो करी भावें ।
त्या शीलवान् नराची करिति स्तुति शुभ अनेकशतगावें ॥ ४० ॥
असती परस्त्रिया या कज्जलसम यांत लम्पटी झाला ।
नर मेरुतुल्य गुरु जरि असेल तृणतुल्यताचि ये त्याला ॥ ४१ ॥
देव सहायक ज्याला होते तो चक्रवर्तिपुत्र जरी ।
परललनाचिखलानें सुलिप्त होउनि अकीर्तिराशि वरी ॥ ४२ ॥
जो नर अन्यस्त्रीवरि करि रति तो मूढ तीव्र दुःख वरी ।
सविषभुजंगीसह तो करि केली जीवितास हाय हरी ॥ ४३ ॥
निर्मल कुल तव नाथा ! अकीर्तिमलमलिन त्यास नैव करी ।
करि न स्वतः मलिन वा दुर्मति सोडी नि दुर्गतीस हरी ॥ ४४ ॥
परपुरुषाच्या स्त्रीची इच्छा ज्यांच्या मनांत करि केली ।
सुमुखाशनिघोषादिक मेले तत्स्वामिनी कुगति झाली ॥ ४५ ॥

( रावणाचें भाषण. )

चन्दनचर्चित-देही नवमेघश्याम रावणें म्हटलें ।
गे मन्दोदरि आहे भीरुस्त्रीगणिं सुनाम तव पहिलें ॥ ४६ ॥
मी अर्ककीर्ति नाहीं किंवा मी अशनिघोष नाहींच ।
किंवा मी सुमुखहि नच कां ऐसें बोलतेस गे कुवच ॥ ४७ ॥
आहे अरितरुनिकरा जाळाया मी वनाग्निसम जाण ।
सीता मी नच देइन रामाचे मी हरीन गे प्राण ॥ ४८ ॥
रक्षण तिचें कराया तुजला मी योजिलें असे नच तें ।
करिशी तूं तरि मजला दे तिजला तूं समर्थ नच कान्ते ॥ ४९ ॥
मन्दोदरी तयाला वदली रतिसुख तिचें तुला रुचतें ।
यास्तव मजला दे ती निर्लज्जासम असे तुझें वच तें ॥ ५० ॥
ईर्ष्येनें कोपुनि त्या हरिणाक्षीनें करस्थकमलानें ।
ताडन केलें जेणें दशास्यमन हो प्रफुल्ल हर्षानें ॥ ५१ ॥

---

१ विषयुक्त सर्पिणीसह. २ क्रीडा.

( मंदोदरीचें पुनः भाषण. )

मन्दोदरी तयाला वदली माहात्म्य तींत काय तुला ।
नाथा ! दिसलें जेणें आत्मा अत्यन्त मूढ तव झाला ॥ ५२ ॥
ती गुणवती न दिसली अनुपम वा रूपही तिचें न दिसे ।
नच ती कलाकलापीं[1] चतुर तिच्या मनिं सुभावनाहि नसे ॥ ५३ ॥
ऐशी ती असतांही मोह तिच्याविषयिं कां तुला वाटे ।
नाथा ! येणें झाला आत्मा तव हीन हें तुला न पटे ॥ ५४ ॥
करितां निजप्रशंसा गौरव आत्म्यांत त्याचिया नुपजे ।
गुण गायिले परांनीं असतां तो जीव गौरवें साजे ॥ ५५ ॥
मी माझे गुण गाते नसे असे जाणतोस त्यां नाथ ।
सीताच काय लक्ष्मी देखिल अनुसरु शके न सुगुणपथ ॥ ५६ ॥
सीतासमागमेच्छा नाथा ! तूं सोड कठिण ही वाट ।
होइल अनर्थ तेणें भरली दुःखेंचि पूर्ण ही दाट ॥ ५७ ॥
नाथा ! मज अवमानुनि इच्छिसि भूगोचरी परस्त्रीला ।
वैडूर्यरत्न सोडुनि वाञ्छी शिशु जेवि अज्ञ काचेला ॥ ५८ ॥
रूप न दिव्य हिचें प्रिय ! परि तें ठसलें तुझ्या मनांत कसें ? ।
ग्रामीणस्त्रीसम ही हिचाच अभिलाष केवि हृदयिं वसे ॥ ५९ ॥
जी रूप-कल्पना मनिं असे तुझ्या मी तशीच होईन ।
लक्ष्मी-श्री-रति किंवा शचि होउनि तव मनास रमवीन ॥ ६० ॥

( मी परस्त्रींत आसक्त झालों. मला धिक्कार असो असें मंदोदरीपुढें रावण बोलला.)

ऐकून मयसुतेच्या वचना खालीं करून निजवदना ।
वदला रावण तिजला अभिलाषिलि मी खरेंच परललना ॥ ६१ ॥
आसक्त परस्त्रीवर होउनि हलकेपणाचि पदरांत ।
पडला माझ्या झाली लोकश्रवणीं अकीर्ति दिनरात ॥ ६२ ॥
धिक्कार असो मजला विषयासक्तींत खोल मी बुडलों ।
चञ्चलशा मम हृदयें पापाच्या कर्दमांत[2] हा ! पडलों ॥ ६३ ॥
देवि प्रिया मला तूं प्राणाहुनि तुजवरीच रुचि माझी ।
जीवित तूंचि असे मम तुझ्यावरि प्रीति नित्य मम ताजी ॥ ६४ ॥

---
१ गायनादिक कलासमूहांत. २ चिखलांत.

ऐकुनि या पतिवचना झाली मन्दोदरी मनीं तुष्ट ।
वदली नाथा ! तुजला अप्रिय बोलून मी दिलें कष्ट ॥ ६५ ॥
नीतिज्ञ पूर्ण असुनिहि दुर्दैवानें प्रमादवश झालें ।
चित्त तुझें तेणें मी नाथा ! अत्यल्प कटुकसें वदले ॥ ६६ ॥
हितकाम नरें स्वप्रभु बोधावा तो प्रमादवश होतां ।
स्वामिद्रोही बोध[2] न करितो इच्छून त्याचिया अहिता ॥ ६७ ॥
विष्णुकुमारमुनींना होतां सम्प्राप्त विक्रियर्द्धि तया ।
आत्मस्वरूप-विस्मृति झाली तेव्हां तयास बोधाया ॥ ६८ ॥
सिद्धान्तगायनांनीं केला नाथा ! प्रयत्न तो सफल ।
झाला मुनीश नन्तर निजस्वरूपांत राहिले अचल ॥ ६९ ॥
हा पुरुष नि ही नारी विकल्प हे मूर्खहृदयिं उद्भवती ।
पण्डितजन सर्वांच्या हितोक्तिचें ग्रहण आदरें करिती ॥ ७० ॥
आहे प्रसादलव जो नाथा माझ्यावरी सदा अपुला ।
वदते बलें तयाच्या त्यागा परसुन्दरींत रतिलीला ॥ ७१ ॥

( मी सीतेला रामाकडे घेऊन जाते व इन्द्रजितादिकांना सोडवून आणते अशा रीतीनें वैर नाहींसें होईल असें बोलतांच मंदोदरीवर रागावून रावण असें बोलला.)

मी जानकीस घेउनि जाते रामास तीस देईन ।
इन्द्रजित मेघवाहन घटकर्णा सोडवून आणीन ॥ ७२ ॥
येणें बहुजनहिंसा नाहीं होईल वैर विलयास ।
जाईल शान्ति होइल तेणें लाभेल सौख्य उभयास ॥ ७३ ॥
मन्दोदरी असें जैं वदली रावण तिला वदे कोपें ।
जा जा येथुनि झडकरि पाहिन तव मी मुखा न गे पापे ॥ ७४ ॥
भलतीच शाहणी तूं अपुल्या मोठेपणास सोडून ।
परपक्षस्तुति करण्या प्रवृत्त झालीस जेवि जन दीन ॥ ७५ ॥
होऊन वीरजननी माझी होऊन पट्टराणी ही ।
षण्ढ नि भीरुनरासम भाषण तव गे न शोभतें पाही ॥ ७६ ॥

( लक्ष्मण हा नारायण आहे व आपण प्रतिनारायण आहा यास्तव आपला नाश होऊं नये म्हणून सीता देऊन आपण गृहस्थधर्म धारण करावा असें मंदोदरीचें भाषण. )

---

१ परस्त्रीहरणाच्या दोषाचे आधीन. २ उपदेश.

वदली दशाननाला नारायण आगमीं नऊ वदती ।
नाथा ! त्रिपृष्ट आदिक प्रसिद्धसे सात जाहले भरतीं[1] ॥ ७७ ॥
पद्म नि नारायण हे याकाळीं बोलतात विबुधजन ।
हे नाथ तेचि आले येथें समरीं असें मनीं आण ॥ ७८ ॥
अश्वग्रीव नि तारक आदि प्रतिहरिहि[2] जाहले सात ।
ते पावले विनाशा हरिपासुनि समज हे मनीं कान्त ॥ ७९ ॥
होऊ नये प्रभो तव विनाश हरि जो दयानिधे आज ।
त्यापासुनि रक्षावें अमुचें सौभाग्य जें असे साज[3] ॥ ८० ॥
जे बुद्धिवन्त असती इहपर-सुखकरचि कार्य ते करिती ।
निन्दा नि दुःख जेणें अकार्य ते नच कदापि आचरती ॥ ८१ ॥
बहुकाल विषय भोगुनि झाला जो तृप्त एकही नर न ।
कोणी असेल सांगा प्राणप्रिय द्याचि पाप सोडून ॥ ८२ ॥
भोगून सकल भोगा मुनिव्रता सेवणें अशक्य गमे ।
गृहिधर्मीं तत्पर व्हा दुःखा नाशुनि सुखांत चित्त रमे ॥ ८३ ॥

( गृहस्थधर्म धारण करणारा मनुष्य राजा आहे. तो याप्रमाणें- )

ज्याच्या अणुव्रताची कटींत[4] तरवार मस्तकीं शोभे ।
नियमच्छत्र[5] जयाचें दर्शन[6] चिलखत न रोधि जो लोभें ॥ ८४ ॥
शीलध्वज[7] करिं शोभे खांद्यावरि बोधरूप धनु[8] धरितो ।
वश इन्द्रियबल[9] ज्याचें मर्यादाङ्कुशें[10] मदास संहरितो ॥ ८५ ॥
मैत्र्यादिभावना ज्या उटी असे आर्द्र-चन्दनाची ती ।
धर्मध्यानपराक्रम आरोहण निश्चयाख्य करिवरती ॥ ८६ ॥
जिनभक्ति शक्तिआयुध ज्याचे गेहीं असा नृपाल असे ।
दुर्गतिसैन्या मारी राज्य तयाचें शचीपतीस हसे ॥ ८७ ॥
दुर्गतिसेना आहे कुटिल हिचा पापवेग अतिकठिन ।
विद्वान् जिंकिति तिजला जिंकुनि हो नाथ सत्य सुखसदन ॥ ८८ ॥

---

१ भारतदेशांत. २ प्रतिनारायण. ३ भूषण. ४ कंबरेला. ५ पुण्यकार्ये करण्याचा स्वीकार व पापकार्यांचा त्याग याला नियम म्हणतात. नियमरूपी छत्र. ६ सम्यग्दर्शनरूपी चिलखत. ७ गुणव्रतें व शिक्षाव्रतरूपी ध्वज. ८ सम्यग्ज्ञानरूपी धनुष्य. ९ इंद्रियें ताब्यांत ठेवणें हेंच सैन्य. १० मर्यादारूपी अंकुश.

हिमवन्मन्दर आदिक शैलीं जिनगृहगणास पूजून ।
जम्बूद्वीपीं माझ्यासह प्रभो ! करि विहार सुखसदन ॥ ८९ ॥
अठरा हजार राण्यासह प्रभो मन्दरादि-कुञ्जांत ।
मन्दाकिनीतटावरि करुनि क्रीडा रहा प्रमोदांत ॥ ९० ॥
हे विद्वन् युद्धाचें कार्य नसें वा प्रसन्न होऊन ।
ऐकावें मद्वचना होइल तें सर्वथा सुखस्थान ॥ ९१ ॥
लोकापवाद आहे विषाप्रमाणें तयास झणि सोड ।
अपकीर्तिसागरीं कां बुडशी नाथा ! हितास तूं जोड ॥ ९२ ॥
करण्या प्रसन्न यापरि बोलुनि ती हात दोन जोडून ।
पतिहित करण्यासाठीं पाया पडली दयार्द्र होऊन ॥ ९३ ॥

( माझ्यापेक्षा अधिक बलवान् कोणीच नाहीं. तुला स्त्रीत्वामुळें भय वाटत आहे. नांवाचे नारायण व बलभद्र पुष्कळ असतात असें रावणाचें भाषण. )

रावण हसून बोले ज्याचें निर्भय सदैव मन राहे ।
मन्दोदरीस उठवुनि निर्हेतुक हृदय भय तुझें वाहे ॥ ९४ ॥
बलवान् अधिक न कोणी माझ्याहुनि या जगांत गे आहे ।
मिथ्या भय तुज वाटे स्त्रीत्व जया हेतु वदति बुध पाहे ॥ ९५ ॥
जगिं अन्य पक्ष झाला नारायण नाम ज्यास उत्पन्न ।
ऐसें तूं जें म्हटलें ऐक तदुत्तर न करि मना खिन्न ॥ ९६ ॥
नारायण या नावें असती बलदेव याहि नांवानें ।
जन जगतीं बहु असती परि होतें कार्य फक्त भावानें ॥ ९७ ॥
कोणी पशु वा मानव सिद्ध असे त्यास ठेविलें नांव ।
हे भययुक्ते सुन्दरि ! सिद्धाचें काय मिळवि तो भाव ॥ ९८ ॥
रथनूपुरनगरीचा राजा जो फक्त इन्द्र नांवाचा ।
केलें अनिन्द्र त्याला नारायण हा असत्य नच साचा ॥ ९९ ॥
यापरि निर्भय बोलुनि घेउनि मन्दोदरीस तो गेला ।
क्रीडागृहीं दशानन शचियुत इन्द्रासमान तो दिसला ॥ १०० ॥

---

१ मैत्री, प्रमोद, कारुण्य व माध्यस्थ्य. सर्व प्राण्यांना दुःख होऊ नये अशा विचाराला मैत्री, गुणिलोकाविषयीं आदरभावाला प्रमोद, रोगादिक-दारिद्र्यादिकांनीं पीडित जीवाविषयीं करुणाभाव व मिथ्यात्वीजीवाबद्दल उपेक्षा. २ स्त्र्या अवस्थेनें.

सायंकाल जहाला संकोचुनि किरण सूर्य अस्तास ।
चाले शोभे तेव्हां कषायसंकोचयुक्त यतिसदृश ।। १०१ ।।

( निशाकाल-वर्णन )

अस्तास सूर्य गेला नलिनी[1] कमलाञ्जलीस जोडून ।
जणु चक्रवाकशब्दें बोलाविति त्यास दीन होऊन ।। १०२ ।।
ग्रहनक्षत्रा देउनि चन्द्रें रजनी नभांत पाठविली ।
आला नन्तर तोही प्रफुल्ल झाली समस्त कुमुदाली[2] ।। १०३ ।।
लङ्कानगरीं प्रतिगृहिं रत्नांचे दीप जाहले प्रगट ।
पसरे प्रभा तयांची मेरुशिखेसम पुरी दिसे स्पष्ट ।। १०४ ।।
यानन्तर चन्द्रोदय झाला अन्तःपुरीं प्रवेश करी ।
रावण समस्त राण्यासह स्वहृदयीं प्रसन्नतेस वरी ।। १०५ ।।
मन्दोदरी दशास्या देउनि आलिङ्गना तदीयमुखा ।
पाही वारंवार स्नेहें सम्प्राप्त हो अपारसुखा ।। १०६ ।।
वदली समरीं मिळवुनि जेव्हां जय याल परत सदनास ।
आलिङ्गिन मी तुम्हां क्षणहि न सोडीन आपल्या तनुस[3] ।। १०७ ।।
वेली सर्वाङ्गांना वाहुबलीच्या जशी सदा लपटे ।
तैसें मी तव नाथा देहा लपटेन त्यजिन नच त्यातें ।। १०८ ।।

( सूर्योदय झाला. रणवाद्यें वाजू लागलीं. वीर युद्धाला निघाले. )

यापरि बोलत असतां अत्यन्त प्रेमरक्त होऊन ।
सम्पुनि निशा करि ध्वनि कुक्कुट[4] उजळून पातलाचि दिन ।। १०९ ।।
नक्षत्रकान्ति गेली विलया प्रगटे प्रकाश बहु लाल ।
आली अरुणा सन्ध्या भक्त जिनस्तवनिं जाहले लोल ।। ११० ।।
प्रलयाग्नीचें मण्डल जणु ऐसा सूर्य दशदिशा व्यापी ।
निजकिरणावलि फेकी रावणभार्या समस्त संतापी ।। १११ ।।
गम्भीर समरभेरी वाजे त्याच्यांत शङ्खरवहि घुमे ।
ऐकून दुःख झालें रावणभार्यागणा न चित्त रमे ।। ११२ ।।
तरवार बाण भाला गदादि शस्त्रें करांत घेऊन ।
योद्धे लढावयाला गेले निर्भय असे यदीय मन ।। ११३ ।।

---

१ कमलांची वेल. २ रात्रिविकासिकमल समूह. ३ शरीरास. ४ कोंबडा.

झाल्या पुरस्त्रिया बहु खिन्न तयांना बघून खलहि रडे ।
चित्त तयांचें गेलें पतिसह शय्येंत फक्त देह पडे ॥ ११४ ॥
कोणी भट समराप्रति निघतां जाया तयास अनुसरली ।
मुग्धे! परत घरीं जा चिन्ता वाहू नकोस मनिं कसली ॥ ११५ ॥
ऐसें वदून तिजला परतवि तो वीर बहुत सांगून ।
ती परतें देहानें मन नच परतें नि जाहलें खिन्न ॥ ११६ ॥
कोणी स्त्री निजनयनें पाही स्वपतीस दूरपर्यन्त ।
झाली मूर्च्छित दृष्टिस लङ्घुनि गेला तिचा यदा कान्त ॥ ११७ ॥
सम्यक्त्वाणुव्रतधर भट समरा जावया निघे त्याची[1] ।
जाया तत्पृष्ठ बघे मुख सुरकन्या नि उभय त्या इच्छी ॥ ११८ ॥
जे भट पूर्वी होते चन्द्रासम सौम्य युद्धसमयीं ते ।
अत्यन्त शूर झाले मागें ते टाकिती कृतान्तातें ॥ ११९ ॥
( मारीच, श्रीचन्द्र, विमल आदिक राजे युद्धास निघाले. )
चतुरङ्ग सैन्य घेउनि मारीच निघे सगर्व समरास ।
श्रीचन्द्र विमल अम्बुद सुनन्द आनन्द धरुनि उल्हास ॥ १२० ॥
विद्यांनीं रथ निर्मुनि अगणित भट दिव्य चालले समरा ।
करुनि दिशा दश उज्ज्वल अग्निकुमारासमान अवधारा ॥ १२१ ॥
दिव्यास्त्रें जे चमकति हिमवच्छैलासमान विपुल करी ।
आच्छादिती दिशा दश विद्युन्मेघासमान कान्ति वरी ॥ १२२ ॥
लक्षावधि विद्याधर बसुनि हयावरि अतीववेगानें ।
उडुनि नभीं जणु जाती उडुमण्डल भेदण्यास लीलेनें ॥ १२३ ॥
नानाविधवादित्रें गजगर्जन वीर-सिंह-नादांनीं ।
हयहेषित भाटांचे जयशब्द नि पत्तिशब्दवृन्दांनीं ॥ १२४ ॥
दुमदुमलें नभ सारें जणु वाटे प्रलयमेघरव[2] चण्ड ।
होत असे कीं जेणें फुटून जाईल सकल जगदण्ड ॥ १२५ ॥
अश्व रथ पत्ति सैन्या घेउनि भूपाल धरुनि विजयाची ।
इच्छा मनीं निघाले अनुकूल विरुद्ध वा असे साची ॥ १२६ ॥
घेऊन खड्ग हातीं प्रभुचित्ता तोषयुक्त करण्यास ।
प्यादे निघती वेगें स्वकर्मवश जीव असति निःशेष ॥ १२७ ॥

---

१ त्याची पाठ. २ यमाला.

पूर्वभवीं जें सञ्चित केलें शुभ अशुभकर्म जीवानें ।
घडतें तसेंच जाणी मनांत जिनदास अन्य नच होणें ॥ १२८ ॥
रवि चन्द्र इन्द्र देखिल विरुद्ध अविरुद्ध वा करायास ।
कर्मोदय जिनदासा यततिल[1] तरि विफल होय आयास ॥ १२९ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे उद्योगाभिधानं नाम त्रिसप्ततितमं पर्व ॥ ७३ ॥

---

१ प्रयत्न करतील.

# चौऱ्याहत्तराव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

आनन्दानें रात्र व्यतीत झाल्यावर प्रातःकालीं युद्धाला पुनः सुरुवात होण्याचे-वेळीं रावण मन्दोदरी आदिक स्त्रियांना म्हणाला— आतां पुनः तुमचें दर्शन होईल किंवा नाहीं याची मनाला काळजी वाटत आहे. तेव्हां सर्व स्त्रियांनीं म्हटलें— 'नाथ, आपण शत्रूला जिंकून पुनः अवश्य परत याल. आमचें हें वचन अन्यथा होणार नाहीं. आपलें वैभव वाढेल व चन्द्रसूर्य असेतों आपण राज्य कराल.' असें बोलून सर्व स्त्रियांनीं रावणाला स्नेहानें पाहिलें. यानन्तर रावण रणभूमीवर पोहोंचला. तेथें बहुरूपिणीविद्येनें सुन्दर शुभ्र रथ बनविलेला होता. त्याला हजार हत्ती जोडले होते. त्यांच्या तोंडांत चार चार दांत होते. त्यांच्या कानांला सुवर्णाच्या दाण्ड्यांचीं शुभ्र चामरें बांधलीं होतीं. त्यांच्या गळयांत मोत्यांच्या माळांच्या मध्यभागीं मंजुळ शब्द करणाऱ्या घंटा बांधल्या होत्या. रथाचें 'इन्द्र' असें नांव होतें. या रथाच्या सभोंवती दहा हजार विद्याधर सशस्त्र उभे होते.

रावण अशा रथांत बसून क्रोधानें भामण्डल व सुग्रीवाला जिंकण्यासाठीं निघाला असतां वाटेंत अनेक अपशकुन झाले ते महाक्षयाचे सूचक होते.

रामचन्द्रानीं रावणाचा रथ दुरून पाहिला. त्यांना तो उंच कैलासशिखरा-प्रमाणें वाटला. हें पर्वताचें उंच शिखर आहे काय असा प्रश्न विचारल्यावर जाम्बव आदिक विद्याधरांनीं सांगितलें कीं— "नाथ, बहुरूपिणीविद्येनें हा रथ बनविला आहे व त्यांत रावण बसून लढण्यासाठीं येत आहे."

लक्ष्मणानें हें वचन ऐकल्यावर 'माझा रथ आणा' असें सांगितल्यावर गरुड-वाहनाचा रथ सारथ्यानें आणिला. हातांत गरुडध्वज घेऊन लक्ष्मण रामचन्द्राला नमस्कार करून त्यांत बसला. रामचन्द्राच्या रथाला विद्येनें रचलेले सिंह जोडलेले होते. त्यांत रामचन्द्र बसले होते. रामचन्द्राबरोबर सुग्रीव, हनुमान्, भामण्डल आदिक अनेक विद्याधर युद्धास निघाले होते.

दोन्हीं सैन्यांत वाद्यें वाजू लागलीं व दोन्हीं सैन्यें निकरानें लढू लागलीं. कोणी योद्धे केस धरून, कोणी मुठींनीं, कोणी तरवार, भाला आदिक शस्त्रांनीं लढत होते. दोन्ही बाजूचे पुष्कळ वीर रणभूमिवर पडून त्यांच्या रक्तानें ती लाल व भयंकर दिसत होती. ज्यांनीं आपल्या घरीं पलंगावर आपल्या भार्यासह अनेक सुखविलास भोगले होते असे वीर येथें चिरनिद्रा घेत होते. त्यांच्या सभोंवती गिधाडे वगैरे पक्षी जमून त्यांचे लचके तोडीत होते.

दोन्ही बाजूंचे राजे रणांत शत्रुपक्षांत घुसून लढू लागले. मारुतीनें शत्रुसैन्याची दाणादाण केली. तेव्हां मयराजा त्याच्याबरोबर युद्ध करूं लागला. त्यानें क्रोधानें मारुतीवर बाण फेंकले पण त्यानें ते चुकविले. यानन्तर मयावर बाणवृष्टि करून त्याला रथहीन केलें तेव्हां तो दुसऱ्या रथांत बसून लढूं लागला. दोघेही कसलेले योद्धे असल्यामुळें कोणाचीच हार व जीत झाली नाहीं. परन्तु मारुतीनें बाणांच्या वृष्टीनें मयाला विह्वल केलें. तेव्हां रावणानें बहुरूपिणीनें बनविलेला रथ मयाला दिला. त्यांत बसून त्यानें मारुतीला रथरहित केलें व अस्त्रांनींहि रहित केलें. हें पाहून भामण्डल त्याच्यावर धांवला पण त्यालाही त्यानें अस्त्र व रथानें रहित केलें. यानंतर सुग्रीव बिभीषण हे लढावयास आले असतां मयानें त्या दोघांनाही अस्त्ररहित केलें. बाणानीं बिभीषणाचें चिलखत मयानें फोडलें तेव्हां तो रक्तधारांनीं लाल दिसू लागला व थरथर कापू लागला.

हें पाहून रामचन्द्रानें त्याला धीर देऊन मयाबरोबर लढण्यास रामचन्द्र त्याच्यापुढें आले. त्यांनीं तीक्ष्णबाणांनीं मयाला अगदीं बेचैन बनविलेलें पाहून रामचन्द्राबरोबर लढण्याला रावण पुढें आला. लक्ष्मण रावणाला अडवून म्हणाला— "आधी माझ्याशी लढ व नंतर पुढें जा" असें म्हणून क्रोधानें रावणाला असें म्हणाला, "चोरा, पाप्या, रावणा, माझ्याशीं युद्ध कर. तुला आज मी यमाचा अतिथि (पांहुणा) करितो. रामचन्द्र हा राजा आहे त्याच्या आज्ञेनें मी तुझा आज वध करणार आहे." रावणानें याप्रमाणें त्याला उत्तर दिलें :—

"मूर्खा, मीच त्रिखण्डाधिपति आहे. जी सुन्दर, सारभूत व सुखदायक वस्तु असते ती राजाची असते. अर्थात् ती वस्तु माझीच आहे. सीता ही मलाच योग्य आहे. हत्तीच्या गळ्यांतच घंटा शोभते ती कुत्र्याच्या गळ्यांत शोभत नाहीं. अरे तुम्ही कोल्हे आहात व मी गजपति आहे. सुग्रीवादिक वाईट लोकांनीं तुम्हाला फसविलें आहे. तूं माझ्याशीं युद्ध करण्याची इच्छा करतोस याचा अर्थ तूं यमाबरोबर

लढण्याची इच्छा करतोस असें मी समजतों. तुझें जीवित मी हरणार नाहीं तूं माझ्या चरणाला शरण ये." यानंतर दोघामध्यें घोरयुद्ध झालें. आधीं शस्त्रांनीं झालें व नंतर अस्त्रांनीं झालें. रावणानें जें जें अस्त्र फेंकलें लक्ष्मणानें त्याच्याविरुद्ध अस्त्रांनीं त्याचा प्रतीकार केला. शेवटीं रावणानें विघ्नअनायक नामक अस्त्र सोडलें तेव्हां त्याच्याविरुद्ध कोणतें अस्त्र उपयोगावें हें लक्ष्मणास न समजल्यामुळें तो रावणाबरोबर वज्रशरांनीं लढू लागला. पुनः त्रिपृष्ट व अश्वग्रीवाचें जसें घोरयुद्ध झालें होतें तसें या उभयाचें झालें.

कोणाला पूर्वीचें शुभकर्म उदयाला येऊन तें सुख व वैभव देतें तर कोणाला दारुणकर्माच्या उदयानें अत्यंत दुःख प्राप्त होतें.

कांहीं माणसें विघ्न आलें तरी हातांतलें कार्य सोडीत नाहीं. अशी चिकाटी असणाऱ्याचें कार्य सिद्धीस जातें.

लक्ष्मण रावणाचें युद्ध पुनः चालू झालें पण त्यांत काय निष्पन्न झालें हें पुढील पर्वांत कळेल.

---

# चौऱ्याहत्तरावें पर्व.

---

सानन्द दशास्य वदे सादर मन्दोदरीस गे ऐक ।
पुनरपि दर्शन होइल किंवा नच वाटतो मना धाक[1] ॥ १ ॥
सर्वस्त्रिया तयाला वदल्या नाथा रिपूस जिंकून ।
याल तुम्ही समरांतुनि होइल असुचें न अन्यथा वचन ॥ २ ॥
होईल प्रिय दर्शन तुमचें वैभव पुनःहि वाढेल ।
यावच्चन्द्रदिवाकर[2] नान्दा तुम्ही जगांत चिरकाल ॥ ३ ॥
ऐसें वदून सर्वस्त्रीवृन्दें स्नेहपूर्णनयनांनीं ।
अवलोकिला दशानन जायास निघे न भीति ज्यास मनीं ॥ ४ ॥

[ रणांत बहुरूपिणीविद्येनें रचलेल्या रथांत रावण बसला. ]

लङ्काबहिःप्रदेशीं विद्या बहुरूपिणी तिनें सुरथ ।
रचिला शारदघनसम[3] वेगें आक्रामि जो नभःपन्थ ॥ ५ ॥
हत्ती हजार ज्याला जुंपियले चार चार रदं[4] वदनीं ।
शुभ्र नि पिवळे सुन्दर दिसती ज्यांच्या सुचामरें कानीं ॥ ६ ॥
मोत्यांच्या माळामधिं घंटांचा मधुर हो महानाद ।
ऐरावणसम दिसती गण्डांतुनि गळतसे अखण्डमद ॥ ७ ॥
इन्द्र जयाचें होतें नाम अशा त्या महारथीं रूढ[5] ।
झाला रावण मानी इन्द्राचें पद नसे महागूढ ॥ ८ ॥
कमलाक्ष निरुपमाकृति तेजस्वी सूर्यतुल्य त्यांत दिसे ।
ज्याच्या सभोंवती दशसहस्र खेचर सुरक्षणार्थ वसे ॥ ९ ॥
सुग्रीव नि भामण्डल यांच्यावरि कुपित तीव्र होऊन ।
जातां मार्गीं झाले अशकुनगण त्या निवारिती कोण ॥ १० ॥
होईल महाक्षय हें जाणुनि देखील शूर अभिमानें ।
होऊन कुपित अरिगणिं जाती त्यां भावि अशुभ ओढुनि ने ॥ ११ ॥

---

१ काळजी, चिन्ता. २ सूर्यचन्द्र असेतोपर्यन्त. ३ शरदऋतूच्या मेघासारखा शुभ्र. ४ दांत. ५ चढला.

पद्माभ दुरुनि पाही अतिशय हा उंच पर्वताकार ।
तेजस्वी बहु दिसतो नाम तयाचें वदा तुम्ही सार ॥ १२ ॥
जाम्बव आदिक खेचर वदले रथ हा असे प्रभाप्रचुर ।
रावण वसला त्यांत प्रभावशाली असे महावीर ॥ १३ ॥
ऐकुनि वचन तयाचें लक्ष्मण सूतास बोलला वीर ।
रथ दुसरा मज आणा आणी तत्काल तो तिथें चतुर ॥ १४ ॥
क्षुब्धसमुद्रासम मग भेरीध्वनि शङ्खकोटिरव ज्यांत ।
मिसळे वाद्यांचा ध्वनि ऐकुनि भट होति सज्ज तैं त्वरित ॥ १५ ॥
भेरीरवास ऐकुनि आले उद्दाम सज्ज होऊन ।
संग्रामचतुर भट ते करिती श्रीराम-लक्ष्मणा नमन ॥ १६ ॥
स्पर्द्धा मनांत ठेवुनि वेगानें वाहनास चालविती ।
वैसुनि रथादिकामधि समराङ्गणिं सुभट शीघ्र ते जाती ॥ १७ ॥
गज जोडिले रथाला गम्भीर उदाररव असे ज्याचा ।
भूतस्वन खचराधिप शोभे ज्याची प्रसन्नशी वाचा ॥ १८ ॥
विद्याधरेश यापरि दशकण्ठावरि करून बहु कोप ।
हर्षें समरिं निघाले मानून तयास दुष्टसा साप ॥ १९ ॥
शुभ्र असे यश ज्याचें सुन्दर आकृति जनास मोहविते ।
स्वावासाहुनि निघती लढावया रामचन्द्र-लक्ष्मण ते ॥ २० ॥

[ रामचन्द्र व लक्ष्मण सिंहरथ व गरुडरथावर वसून लढावयास निघाले. ]

ज्या सिंह जोडिलेले ऐशा सुन्दर रथांत बैसून ।
राम निघे चन्द्रासम कान्ति जयाची करी प्रसन्न मन ॥ २१ ॥
गरुडरथावरि चढला गरुडध्वज निजकरांत घेऊन ।
मुकुटी धन्वी लक्ष्मण दिसे न ज्याच्या समान अन्य जन ॥ २२ ॥
नाना-यान-विमानीं वसून भामण्डलादि वीरगण ।
युद्धार्थ ते निघाले झाले ज्यांना अनेक शुभशकुन ॥ २३ ॥
त्यांच्या अभिमुख आला रावण सेना विशाल घेऊन ।
मोठ्या वनानलासम कोपानें लालबुन्द होऊन ॥ २४ ॥

[ रणभूमीवर अनेक मनोहर व भयानक दृश्यें दिसलीं. ]

जे वीर उभयसैन्यीं होते गन्धर्व अप्सरा करिती ।
सुमवर्षण त्यावरती नभांत राहूनि संमदा वरिती ॥ २५ ॥

निपुण महात ज्यांना प्रेरिति पादात घेरिती ज्यांना ।
गज मन्द मन्द जाती हालविती निजकरां नि कानांना ॥ २६ ॥
घोडे चञ्चल ज्यांचे करिती चीत्कार रविरथाकार ।
वेग जयां वातासम रथ जाती भूवरून वहु थोर ॥ २७ ॥
बोलत हर्षे जातीं ज्यांचीं शस्त्रें उन्हांत लखलखतीं ।
पायदळें गर्वोद्धत युद्धार्थ सुसज्ज तत्क्षणीं होतीं ॥ २८ ॥
ते अश्ववीर जाती भाले तरवार बाण घेऊन ।
पाठीस ढाल बांधुनि रणाकडे धैर्य वीर्य मनिं धरुन ॥ २९ ॥
कोठें व्याकुल होउनि भडकुनि वा अश्व धावतात रणीं ।
कचमुष्टियुद्ध कोठें हातीं घेउनि गदा लढे कोणी ॥ ३० ॥
खड्गें जखमी झाले कोणी हो विद्ध तीक्ष्णवाणानें ।
कुन्तें ताडित होतां ताडन करिती अरीस कुणि तेणें ॥ ३१ ॥
कोणास इन्द्रियांचा गण सोडी पुष्ट इष्ट देउनिही ।
जैसा कुमित्र सोडी आश्रय देते अशास रणभू ही ॥ ३२ ॥
अतडीं ज्यांचीं पडलीं वाहेर असे अनेक वीरमणि ।
पडले अरिसहि पाडुनि रुधिरानें लाल करिति ते धरणी ॥ ३३ ॥
सौधीं पल्यङ्कावरि ललनेसह भोगिले विलास जयें ।
ते वीर या रणाङ्गणिं भक्षियले गृध्द्रगण-शिवातनयें[1] ॥ ३४ ॥
कोणी पक्षी समजुनि मृत वीराजवळ येइ परि त्यास ।
जीवन्त वघुनि भ्याला उडून गांठी स्वकीय आवास ॥ ३५ ॥
प्रत्यक्षानें दिसते वरून अविशिष्टता मनुष्याची ।
परि भंग-विजययोगें शुभाशुभा प्रकृति जाणती साची ॥ ३६ ॥

[ जय, पराजय व त्यांचीं कारणें. ]

शुभसामर्थ्यें कोणा विजयरमा माळ घालिते प्रेमें ।
पदरीं पडे पराजय पापानें वदति सर्वदा वामें ॥ ३७ ॥
मिश्र शुभाशुभकर्में विजय-पराजयहि लाभती जीवां ।
यापरि शुभाशुभाच्या उदयें धरितात विविधशा भावा ॥ ३८ ॥
धर्मचि मर्मा रक्षी धर्मचि दुर्जय अरीस जिंकितसे ।
धर्मचि पक्ष असावा हित जीवांचें सुधर्म पाहतसे ॥ ३९ ॥

१ कोल्ह्यांनीं.

पुण्यें त्यजिला नर जो रथघोडे गज नि पायदळ त्यास ।
रक्षावया समर्थ न पुण्य करा वदति यति सुभव्यास ॥ ४० ॥
आकाशीं जाणारे खालीं तेथून तेवि पडणारे ।
ऐशा सशस्त्रवीरें भासे उत्पातयुक्त नभ सारें ॥ ४१ ॥
[ केव्हां राक्षससैन्य व केव्हां रामसैन्य एकमेकांना मागें हटवीत असे. ]
मारीच चन्द्र निकर नि शुक सारण तेवि वज्र अक्ष असे ।
या राक्षसपक्षानें शत्रुबला दूर सारिलें सरसें ॥ ४२ ॥
श्रीशैल-इन्दुकिरणें नीलानें तेवि कुमुदनृपतीनें ।
भूतस्वनादिकानें रक्षोबल नाशिलें द्रुतगतीनें ॥ ४३ ॥
कुम्भ निकुम्भ नि विक्रम कुन्द तसे क्रमण विक्रमी वीर ।
जम्बूमाली राक्षसपक्षीय असाध्य तेवि बहु चतुर ॥ ४४ ॥
सूर्यार नि मकरध्वज अशनि स्यन्दन असे महाराजे ।
निजपक्ष स्थिर करण्या उठले त्यांना अतीव हें साजे ॥ ४५ ॥
भूधर, अचल नि अंगद विकालसंभेद कुटिल कपिपक्षी ।
ऊर्मि तरंग, सुषेण नि सुकाल चक्राख्य नृपति हे लक्षी ॥ ४६ ॥
राक्षस नृपाभिमुख हे होउनि लढु लागले नि कपिसेना ।
स्थिर होउनि बहु लढली राक्षससेनेस गणुनि तुच्छ तृणा ॥ ४७ ॥

[ मारुतीचें मयाबरोबर युद्ध. ]

गजयुक्तरथीं बैसुनि मारुति राक्षसबलीं तदा शिरला ।
जैसें सरीं सपद्मीं क्रीडाया पृथुगजेन्द्र अवतरला ॥ ४८ ॥
राक्षससेना शूरें वातसुतें लढुनि नाशिली फार ।
तेणें उद्यत झाला मयदैत्य लढावया महाचतुर ॥ ४९ ॥
क्रोधें मरुत्सुतावरि केला त्यानें प्रहार बाणांचा ।
परि चुकविला तयानें ठेवुनि अवधान वार तैं त्याचा ॥ ५० ॥
यानन्तर उभयांचें झालें घनघोर युद्ध अद्भुत जें ।
वर्णावयास शक्य न उद्धत बघण्यास सर्व योध सजे ॥ ५१ ॥
शरवृष्टि करुनि पुष्कळ केला मय विरथ अञ्जनातनयें ।
अपररथीं तो चढला लढला बहु हार तैं न कोणा ये ॥ ५२ ॥
परि मारुतिनें विह्वल केलें त्याला पुनःहि रथहीन ।
बहुरूपाविद्येच्या द्वारें रथ रावणें दिला छान ॥ ५३ ॥

[ मयानें मारुति, भामण्डल, सुग्रीव, बिभीषण यांच्याशीं लढून त्यांना निरस्त्र केल्यावर रामानें मयाला शरवृष्टीनें विह्वल केलें. ]

वैसुनि वहुरूपारथिं मयें महाद्युतिधरें समुत्साहें ।
केलें लढून मारुततनया रथहीन तत्क्षणीं पाहे ॥ ५४ ॥
अस्त्रेंहि रहित केलें ऐसें पाहून वानरीसेना ।
धावे इकडे तिकडे झाली ती तेधवा अधीरमना ॥ ५५ ॥
पाहून अस्त्ररहिता मरुत्सुता धावला मयावरती ।
भामण्डल परि त्याला निरस्त्र करि तो तदैव चतुरमति ॥ ५६ ॥
नन्तर किष्किन्धाधिप लढावया तो मयापुढें ठाके ।
केलें विशस्त्र त्यासहि भूवरि त्या पाहिलें तदा लोकें ॥ ५७ ॥
आला पुढें विभीषण नन्तर उभयांत जाहलें समर ।
अन्योन्यावरि सोडिति शरधारा दृश्य तें दिसे घोर ॥ ५८ ॥
चिलखत विभीषणाचें निशितशरें तोडिलें मयें कोपें ।
रुधिरें लाल अशोकासम भासे तो जनास बहु वेपे[3] ॥ ५९ ॥
ऐशी पाहून दशा कपिसैन्य भयें दिशांत दश धावें ।
श्रीरामचन्द्र आले लढावया स्थैर्य तेधवा पावें ॥ ६० ॥
विद्यासिंह जयाला जुंपियले त्या रथांत वैसून ।
वदला विभीषणाला राघव करि धैर्ययुक्त दे स्वमन ॥ ६१ ॥
बालार्ककान्ति राघव विद्युन्मेघासमान सेनेंत ।
शिरला ध्वंस तियेचा करावया पूर्ण होय उद्युक्त ॥ ६२ ॥
भामण्डल सुग्रीवा वातसुता मोद वाटला फार ।
कपिवल पुनरपि करण्या झालें उद्युक्त तेधवा समर ॥ ६३ ॥
रामापासुनि मिळतां वल निर्भय होय चित्त सकलांचें ।
उत्फुल्ल जाहलें मुख सूर्योदयिं होय जेवि कमलांचें ॥ ६४ ॥
राम-मय युद्ध पाहुनि नभिं झाला मोद सर्व अमरगणा ।
हें उभययुद्ध पाहुनि उभयांची चकित जाहली सेना ॥ ६५ ॥
पद्मं शरवृन्दानें मयास आच्छादितां गळें तेज ।
होतां युद्ध सुरेन्द्रें खिन्न गमे चमर असुरगणराज ॥ ६६ ॥

---

१ सुग्रीव. २ तीक्ष्णबाणानें. ३ थरथर कांपूं लागला. ४ बालसूर्या-सारखी कान्ति असलेला. ५ विजेने सहितमेघाप्रमाणें.

[ रामचन्द्राच्या बाणांनीं मय विह्वल झालेला पाहून रामाबरोबर लढण्यास रावण आला असतां त्याला लक्ष्मणानें अडविलें तेव्हां त्या दोघांचीं युद्धाला सुरुवात होण्यापूर्वी क्रोधयुक्त भाषणें झालीं. ती याप्रमाणें—]

रामशरें अतिविह्वल पाहून मया दशास्य धावुनि ये ।
तेजें कृतान्तसम ज्या कपि झाले बघुनि खिन्न सर्व भयें ॥ ६७ ॥
अतितेजस्वी लक्ष्मण वीरें म्हटलें तदा दशास्यास ।
तूं चाललास कोठें माझ्याशीं सज्ज हो लढायास ॥ ६८ ॥
क्षुद्रा-चोरा-पाप्या परललनादीपशलभ[1] अधम नरा ।
माझ्याशीं करि युद्धा पाठवितों मी तुला कृतान्तपुरा ॥ ६९ ॥
हा रामचन्द्र झाला आज स्वामी समस्तभूमीचा ।
या चोराचा करि वध पाळिन आदेश आज मी त्याचा ॥ ७० ॥
कोपी रावण वदला मूढा प्रख्यातवस्तु जी लोकीं ।
ती राजाची तिजला भूपचि योग्य प्रसिद्ध अवलोकीं ॥ ७१ ॥
सुन्दर सार असे जें सुखदायक नृपति त्यास अधिकारी ।
मीच असे वसुधापति[2] म्हणतो जो चोर त्यास मी मारी ॥ ७२ ॥
हत्तीस योग्य घण्टा श्वानगळीं ती कदापि नच शोभे ।
मजलाचि योग्य सीता सुदैव माझें असे सदैव उभें ॥ ७३ ॥
आहेस मूर्ख नर तूं कांहींतरि बोलतोस दुर्वचन ।
तूं कोल्हा मी गजपति युद्धा तूं योग्य नच कदापि गण ॥ ७४ ॥
सुग्रीवादिक कुजनें मूढा तुज फसविलें न तुज उमजे ।
तूं युद्ध इच्छिसी जरि इच्छियलें आज तुजसि यमराजें ॥ ७५ ॥
अप्रिय तुजला वाटे निजजीवित इच्छितोस मरणास ।
तव जीवित मी हरिन न माझ्या तूं येइ शरण चरणास ॥ ७६ ॥
लक्ष्मीधर त्या वदला प्रभु कसला असशि पाहतो आज ।
कां व्यर्थ गर्जसी रे दुष्कृत्याची न वाटते लाज ॥ ७७ ॥

[ लक्ष्मण व रावण यांचें प्रथम शस्त्रयुद्ध व त्यानंतर अस्त्रयुद्ध झालें. ]

यापरि वदतां लक्ष्मण रावण फेकुनि अनेक बाणगणा ।
रोधी त्याला जैसा घनकालीं मेघ सकल-शैलवना ॥ ७८ ॥

---

१ परस्त्रीरूपी दिव्यावर फडफडणाऱ्या कीड्याप्रमाणें. २ पृथ्वीपति-राजा.

वज्रासम तीक्ष्णशरें दशकण्ठशरावलीस तोडून ।
चूर्ण विशल्यारमणें केलें साश्चर्य होय विबुधमन ॥ ७९ ॥
रावण लक्ष्मीरमणें केला जैं व्यस्त्र[1] सोडिलें त्यानें ।
माहेन्द्रास्त्रा त्यावरि मेघांनीं व्याप्त होय नभ जेणें ॥ ८० ॥
अस्त्रक्रमज्ञ लक्ष्मण सोडी वाय्वस्त्र मेघविलयास ।
गेले तेव्हां झालें चोहिकडे मेघरहित आकाश ॥ ८१ ॥
पुनरपि रावण सोडी अग्न्यस्त्रा पसरल्या नभीं ज्वाला ।
नाश तयाचा करण्या लक्ष्मण वरुणास्त्र सोडि त्या कालां ॥ ८२ ॥
सोडी लक्ष्मण तेव्हां पापास्त्रा त्या समूळ निरसाया ।
धर्मास्त्र सोडि रावण गेलें पापास्त्र तेधवा वाया ॥ ८३ ॥
लक्ष्मण इन्धनअस्त्रा सोडी दशकण्ठ त्यास नाशाया ।
रोन्धन नामक अस्त्रा तेणें तें सकल जाहलें वाया ॥ ८४ ॥
फलपुष्पवृष्टि करि जें रावण वृक्षास्त्र सोडिता ऐसें ।
तरुपङ्क्ति नभीं पसरे तिळमात्रहि पोकळी तिथें न वसे ॥ ८५ ॥
सौमित्रीनें[2] तामस बाणांचा वृन्द सोडला गगनीं ।
गाढान्धकार पसरे रावण अच्छादिला असे त्यांनीं ॥ ८६ ॥
सूर्यास्त्रानें रावण करि दूर समस्त अन्धकारास ।
नागास्त्रातें सोडी लक्षावधि सर्प निर्मिति त्रास ॥ ८७ ॥
लक्ष्मणकुमार सोडी गरुडास्त्रा हेमकान्ति नभिं त्याची ।
पसरे पळती पन्नग त्यांची रेखाहि नच दिसे साची ॥ ८८ ॥
नभिं गर्जना जयांची प्रलयघनासम सुघोर भासावी ।
उरगास्त्र सोडि लक्ष्मण विषाग्निकण निकर सर्वदा जे वी ॥ ८९ ॥
सोडुनि मायूरास्त्रा रावण उरगास्त्र विफल करि धीर ।
विघ्नअनायकअस्त्र प्रयोग करितो दशास्य अतिचतुर ॥ ९० ॥
यावरि उपयोगावें सुरास्त्र तें कोणतें न हें जाणी ।
लक्ष्मण वज्रशरांना सोडी स्मृति परि न निजमनीं आणी ॥ ९१ ॥
पुनरपि हो उभयांचें स्वाभाविकबाणनिकर सोडून ।
युद्ध त्रिपृष्ट अश्वग्रीवांचें जाहलें पुरा कदन ॥ ९२ ॥

---

१ अस्त्ररहित. २ लक्ष्मणानें.

येऊन कर्म उदयास पुराण कोणा ।
देतां महाविभवसौख्य जगांत नाना ।।
कोणास दारुण अघोदय पापकार्यीं ।
प्रेरी अकीर्ति अतिदुःख तयास देई ।। ९३ ।।
प्रारब्धकार्य नच सोडिति जे कदापि ।
विघ्नें जरि अडथळा करिती तथापि ।।
ऐसे मनुष्य न जुमानिति तीव्र शस्त्र ।
नाग्नीस वायुस रवीस न तेवि अस्त्र ।। ९४ ।।
अशांचें कार्य सिद्धीस जातें ऐसें कथी जिन ।
त्या श्रीमज्जिनदासाचें जयास वर्तें मन ।। ९५ ।।

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे रावण-लक्ष्मणयुद्धवर्णनाभिधानं नाम चतुःसप्ततितमं पर्व ।। ७४ ।।

# पंचाहत्तर व शहात्तर पर्वांची संक्षिप्त कथा.

रणभूमींत खिन्न झालेल्या, तहानेल्या वीरांना थंड पाणी दिलें जातें. भुकेल्यांना अन्न व थकलेल्यांच्या अंगांना चन्दनाचा विलेप केला जातो. पंख्यानें थंडगार वारा घालून श्रम नाहींसा केला जातो. अशाच इतर कार्यांनीं वीरांचे श्रम नाहींसे करून त्यांना उत्साह वाढविण्याची पद्धति उभय पक्षामध्यें होती.

लंकेच्या रणभूमीवर हें युद्ध सुरु होऊन नऊ दिवस झाले होते. आजचा दहावा दिवस होता. नऊ दिवस चाललेल्या युद्धांत कोणाचा जय कोणाचा पराजय झालेला नव्हता.

आज दहाव्या दिवशीं लक्ष्मण व रावण यांचें अतिशय घोर युद्ध झालें. ते पाहून यक्ष, किन्नर, गंधर्वादिकांना आश्चर्य वाटलें व त्यांनीं या दोघां महावीरावर पुष्पवृष्टि करून त्यांना गौरविलें.

या उभयतांचें युद्ध चालत असतां चन्द्रवर्धन नामक विद्याधर राजाच्या आठ मुली विमानांत बसून आल्या होत्या. त्यांचें सौंदर्य देवाङ्गनाप्रमाणें होतें. अप्सरांनीं— "कन्यांनों, तुम्ही फार सुन्दर आहांत व तुमचें प्रेम लक्ष्मणावर अखंड दिसत आहे. याचें कारण काय? आम्हाला सांगा पाहू?" असें म्हटल्यावर त्यांनीं याप्रमाणें सांगितलें— "अप्सरांनों, ज्यावेळीं सीतेचा स्वयंवरविधि झाला त्यावेळीं आमच्या माता-पित्यांनीं स्वयंवर-मंडपांत लक्ष्मणाला पाहिलें. त्यावेळीं आम्हांला लक्ष्मणाला द्यावें असा विचार त्यांच्या मनांत आला. आमच्या मातेनें त्यावेळीं ही गोष्ट आम्हाला सांगितली व आम्ही त्यावेळीं लक्ष्मणाला मंडपांत पाहिलें तेव्हांपासून त्याच्याविषयीं आमच्या मनांत स्नेह उत्पन्न झाला. पण आज या युद्धांत त्याचें बरें होईल कां वाईट होईल याविषयीं आमचें मन सचिन्त झालें आहे. हृदयवल्लभ लक्ष्मणाची जी

गति होईल तीच आमची होईल असें आम्हांला वाटतें. याप्रमाणें अप्सरांना लक्ष्मण-विषयक वृत्तान्त कन्या सांगत असतां लक्ष्मणानें वर विमानाकडे पाहिलें. लक्ष्मणाचें दर्शन होतांच 'हे हृदयवल्लभा लक्ष्मणा, या युद्धांत तूं सिद्धार्थ होशील अर्थात् तूं सफल-विजयी होशील' असें कन्यांनीं म्हटलें. तेव्हां विघ्नविनायक अस्त्र जें रावणानें सोडलें होतें-त्यावर 'सिद्धार्थ' नामक अस्त्र सोडलें म्हणजे त्याचा प्रतिबंध होतो असें लक्ष्मणाच्या ध्यानांत आलें व त्यानें तत्काल त्याचा प्रयोग करून प्रतिबंध केला. त्यामुळें त्याच्या अंगांत विशेष उत्साह व दीप्ति उत्पन्न झाली.

यानंतर रावण बहुरूपिणीविद्येंत शिरून लक्ष्मणाबरोबर युद्ध करूं लागला. रावण आपलीं मस्तकें व बाहु द्विगुण, चतुर्गुण, अष्टगुण अशीं दुप्पट दुप्पट करू लागला व लक्ष्मणही आपल्या तीक्ष्ण बाणांनीं तीं तोडूं लागला. जसें जसें लक्ष्मण तोडी तसें तसें तीं दुप्पट चौप्पट आठपट अशीं होऊन सर्व रणभूमि त्यांनीं व्याप्त होऊ लागली. लक्ष्मणही न थकतां व न भीतां तीं बाणांनीं अखंड रीतीनें तोडीत चालला. हत्तीच्या लठ्ठ सोंडेप्रमाणें असंख्यबाहूंनीं व रत्नमय किरीटांनीं युक्त अशा मस्तकांनीं ती रणभूमि व्याप्त झाली. लक्षावधि तोडलेल्या बाहु व मस्तकांतून रक्ताच्या असंख्य धारा वाहून तें रण रक्तमय झालें. लक्ष्मणानें असें अपार शौर्य दाखविलें. रावणच थकून गेला व त्यानें बहुरूपिणीचें विसर्जन केलें. तो घामानें ओला चिंब झाला. लक्ष्मणास मारण्यासाठीं त्यानें चक्राचें मनांत स्मरण केलें. तत्काल तें रावणाच्या हातांत आलें. रावणाला आनंद वाटला. चक्ररत्नाची प्रभा चोहोंकडे पसरली. सूर्याचेंही तेज त्याच्यापुढें फिक्कें पडलें. आकाशांत राम-लक्ष्मणाची प्रशंसा करणारे यक्षकिन्नरादि देव पळून गेले.

लक्ष्मणाला आज या चक्रानें मरण पाऊं असें वाटलें तथापि धैर्य धारण करून त्यानें रावणास कृपणाप्रमाणें चक्ररत्न हातांत घेऊन स्वस्थ कां बसलास. तुझ्या ठिकाणीं कांहीं सामर्थ्य असेल तर हे नराधमा, तें फेक. असें म्हटलें. त्यामुळें अतिशय रागावून रावणानें तें चक्र फेंकलें. कल्पान्ताच्या सूर्याप्रमाणें तेजस्वी, मेघाप्रमाणें गर्जना करणारें, अग्नीच्या ठिणग्या बाहेर चोहीकडे फेकणारें तें चक्ररत्न लक्ष्मणाकडे येत आहे असें पाहून स्वतः लक्ष्मण, रामचंद्र, सुग्रीव, भामण्डल, बिभीषण आदिकांनीं क्रमानें वज्रमुखी बाणांनीं, वज्रावर्त धनुष्यानें, गदेनें, खड्गानें व शूलानें, मुद्गर, कुन्हाड यांनीं प्रतिबंध करण्याचा प्रयत्न केला. पण या सर्व आयुधांना न जुमानतां तें चक्र लक्ष्मणाजवळ आलें त्याला त्यानें तीन प्रदक्षिणा दिल्या व शान्त होऊन

त्याच्या हातांत तें शोभूं लागलें. पुण्योदयानें लक्ष्मणाचा ऐश्वर्योत्कर्ष झाला व पुण्यक्षयानें रावणाचा वैभवापकर्ष झाला. रामासह लक्ष्मण वैभवाच्या पर्वतावर चढला व रावण आपत्तीच्या खोल दरींत कोसळला.

लक्ष्मणाला चक्ररत्न प्राप्त झालें म्हणून सर्व विद्याधरांनीं आनन्दानें त्याचें अभिनन्दन केलें व त्यांनीं असें सांगितलें:— "या भरतक्षेत्रांत पूर्वी अनन्तवीर्य केवली होऊन गेले व त्यांनीं राम व लक्ष्मण हे क्रमानें आठवे बलभद्र व नारायण होतील" असें सांगितलें. त्याप्रमाणें यावेळीं त्यांना या पदांची प्राप्ति झाली. या लक्ष्मणाचें सौंदर्य आकर्षक व याच्या देहांत अपरिमित बल आहे. श्रीरामचन्द्र यांचा रथ विद्यानिर्मित सिंह ओढतात व यांचें हलायुध शत्रूला भय उत्पन्न करणारें आहे. या आयुधानें यानें नयंदलाला जिंकिलें आहे. या राम-लक्ष्मणांचें परस्परावर ज्याचें वर्णन करतां येत नाहीं असें प्रेम आहे.

त्यावेळीं रावणाचे मनांत चिन्ता उत्पन्न झाली. अनन्तवीर्य केवलीचें वचन आज सत्य झालें. माझ्या दुष्कर्माङ्कुराची उत्पत्ति होण्यास तें बीजरूप झालें.

माझें छत्र पाहिल्याबरोबर सर्व विद्याधरराजे रणांतून पळून जात असत. त्रिखण्डपृथ्वी मी वश केली. त्या मला हा भूगोचर लक्ष्मण जिंकणार ना! अरेरे कर्माची ही क्रीडा जीव घेणारी झाली. ही राज्यलक्ष्मी कुलटेसमान आहे. ती परिचिताला त्यागून अपरिचिताच्या गळ्याला आज मिठी मारीत आहे.

हें राज्य विषान्नासमान मानून भरतादिकांनीं त्यागलें व रत्नत्रयानें मुक्तिरमा मिळविली. खरोखर ते धन्य होत. मी आज दीन झालों. मला शतदा धिक्कार असो."

त्यावेळीं लक्ष्मणानें बिभीषणाकडे पाहून रावणास— "हे विद्याधरपूज्य रावणा, रामचन्द्राच्या चरणांना नमस्कार करून सीता दे व खुशाल त्रिखण्डाधिपत्वाचा उपभोग घे. अभिमान सोडून रामाला शरण ये" असें म्हटलें.

रावण हंसून म्हणाला— "मी त्रिखण्डाधिपति आहे व तूं क्षुद्रभूमिगोचर मनुष्य आहेस. खोल दरी पर्वताच्या शिखराची कदापि बरोबरी करूं शकत नाहीं."

लक्ष्मणानें म्हटलें— "आतां अधिक बडबड करूं नकोस. मी नारायण आहे. आज तुला यमाचें घरीं अवश्य पाठवीत आहे." रावण म्हणाला—"मला तूं कोण आहेस हें चांगलें माहीत आहे. तुला बापानें हाकालून दिलें व जंगलांत दुःख भोगीत फिरत

होतास. चक्रप्राप्तीनें मोठा झालों असें वाटतें पण या चक्रासह तुला मी दडपून टाकणार आहे.

असें म्हटल्याबरोबर लक्ष्मणानें रावणावर तें चक्र फेकलें. चंद्रहासखड्गानें रावणानें प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला पण तो व्यर्थ गेला. छातीवर तें चक्र आदळून रावण जमिनीवर धाडकन् कोसळला व प्राणरहित झाला. जणु स्वर्गातून इन्द्र कोसळून पडल्याप्रमाणें वाटूं लागला. सर्व रावणसैन्य भिऊन पळूं लागले. मारुति, सुग्रीव आदिकांनीं सर्वांना अभय दिलें. लक्ष्मी अतिशय चंचल आहे असें समजून जिनदास असलेल्या भव्यांनीं अभिमान सोडून जिनभक्ति करावी.

# पंचाहत्तरावें पर्व.

---

( रणाङ्गणांत क्षुधितादि सैनिकांची कशी व्यवस्था असते. )

जे खिन्न तृषापीडित जल शीतल प्यावयास देतात ।
क्षुधितांस अन्न देती थकल्या चन्दनाविलेप करितात ॥ १ ॥
जे जखम लोक असती वारा त्या घालितात पंख्यांनीं ।
थंड तुषारकणांनीं हरिती श्रम तेवि अन्यकृत्यांनीं ॥ २ ॥
यापरि युद्धामध्यें कार्यक्रम हा प्रसिद्ध उभयांत ।
असतो पालन त्याचें करिती त्या सोडिती न जन सन्त ॥ ३ ॥
हें युद्ध उभयपक्षीं प्रतिदिनि चाले नि दशमदिन आज ।
होता जय न पराजय सुखदुःखाचें असेचि जें बीज ॥ ४ ॥
जें रावणाबरोबर पद्मानुजयुद्ध जाहलें घोर ।
जें लक्ष्मणाबरोबर दशकण्ठाचेंहि जाहलें समर ॥ ५ ॥
पाहून यक्षकिन्नर गन्धर्वांना मनांत विस्मय दे ।
सुमवर्षण उभयावरि करून सुरनिकर साधु साधु वदे ॥ ६ ॥

( अप्सरांना चंद्रवर्धनाच्या आठ कन्यांनीं सांगितलेलें वृत्त. )

श्रीचन्द्रवर्धनाभिध खचरपतीच्या मुली विमानांत ।
बैसून आठ आल्या विचारिला अप्सरें स्ववृत्तान्त ॥ ७ ॥
देवीसमान दिसतें तुमचें हें रूप भक्ति सौमित्रीं ।
श्रीलक्ष्मणांत दिसतें प्रेम जयाचें अखण्ड सन्मित्रीं ॥ ८ ॥
किञ्चित् सलज्ज होउनि वदल्या कौतुक तुम्हास जरि वाटे ।
वृत्तान्त असा आहे जेणें आनन्द हृदयिं बहु दाटे ॥ ९ ॥
सीताविवाहसमयीं पूर्वी आम्हास आमुचा तात ।
घेउनि विवाहमण्डपिं गेला हें वृत्त ध्या स्वहृदयांत ॥ १० ॥
श्रीलक्ष्मणास पाहुनि अमुच्या जनकें विचार मनिं केला ।
यातें कन्याष्टक हें सुन्दर शोभेल सर्वथा त्याला ॥ ११ ॥

---

१ तहान. २ भूक. ३ बर्फ. ४ लक्ष्मण. ५ सुमित्रेच्या मुलांत.

अमुच्या मातेनेंही सांगितलें वृत्त सकल आम्हांस ।
तद्दर्शनेंचि अमुच्या मनांत केला तयेंचि विनिवास ॥ १२ ॥
परि आज संशयावह या समरीं जाहला प्रवृत्त असे ।
होईल काय याचें ऐसें भय आमुच्या मनांत वसे ॥ १३ ॥
हृदयेश लक्ष्मणाची गति जी होईल आमुची तीच ।
होईल वचन ऐकुनि लक्ष्मण पाही तयाकडे साच ॥ १४ ॥
( सिद्धार्थ शब्द ऐकून सिद्धार्थास्त्राचा प्रयोग लक्ष्मणानें केला. )
दर्शन होतां त्याचें कन्यांच्या जाहला मनीं मोद ।
सिद्धार्थ सर्वथा तूं होशिल वदल्या असा मुखें शब्द ॥ १५ ॥
सिद्धार्थ शब्द ऐकुनि सिद्धार्थास्त्रा स्मरून हास्य करी ।
लक्ष्मण विघ्नविनायक अस्त्रा मिटवून दीप्ति देहिं धरी ॥ १६ ॥
रावण ज्या ज्या अस्त्रा अस्त्रविशारद करांत जैं घेई ।
परमास्त्रनिपुण लक्ष्मण तोडी तें तें करून अति घाई ॥ १७ ॥
नन्तर सौमित्रीचा गरुडध्वज विपुल गरुडवृन्दास ।
उत्पन्न करुनि शीघ्र व्यापि दिशा मेघ जेवि शैलास ॥ १८ ॥

( रावण बहुरूपिणीविद्येंत शिरून त्यानें लक्षावधि रूपें धारण केलीं. तथापि लक्ष्मणानें न भितां त्याचीं बाहु-मस्तकें वगैरे तोडण्याचा विक्रम केला. तो खिन्न झाला नाहीं. )

तत्समयीं बहुरूपा करि त्या विद्येंत शिरुनि दशकण्ठ ।
युद्धक्रीडा करण्यासाठीं अत्यन्त होय सोत्कण्ठ ॥ १९ ॥
बहुरूपाविद्येमधिं शिरला रावण तदा शिरश्छेद ।
लक्ष्मण करी तयाचा शिर होइ द्विगुण जेवि नभिं अब्द[1] ॥ २० ॥
पुनरपि तीक्ष्णशरानें दोन शिरें तोडिलीं चतुर्गुण तीं ।
झालीं यापरि अगणित शिरें रणीं राहिलीं तया न मिति[2] ॥ २१ ॥
बाणें रावण बाहुद्वय लक्ष्मण तोडितां चतुर्गुण तें ।
झालें पुनरपि तोडी वाढुनि यापरि असंख्यता वरितें ॥ २२ ॥
जैसें सरोवरामधिं अगणितकमलें प्रफुल्ल दिसतात ।
शिर-बाहु रावणाचे शोभा वरिती अपूर्व समरांत ॥ २३ ॥
शस्त्रें जयांत दिसतीं रावणकर पुष्टकरिकराकार[3] ।
भय वाटे ज्या बघतां पळति रणांतून वीर बहु दूर ॥ २४ ॥

---

१ मेघ. २ प्रमाण. ३ हत्तीच्या सोंडेच्या आकृतीचे.

रत्नांच्या मुकुटांनीं असंख्य रावणशिरें नभीं खुलतीं ।
जणु रोहणगिरि-शिखरें असंख्य रत्नें सुवेष्टिलीं दिसतीं ॥ २५ ॥
जणु हा रावणसागर वाहु तयाचे तरंग दिसतात ।
अगणित उग्रग्राहासम मस्तकराशि भासते खचित ॥ २६ ॥
ज्याला असङ्ख्य शिखरें ऐशा मेघासमान हा वाढे ।
करविद्युद्दण्डांनीं चमके गर्जे प्रचण्ड हा गाढे ॥ २७ ॥
वहु-वाहु-मस्तकांनीं एकहि रावण अनेक सैन्यसम ।
होऊन लक्ष्मणाशीं युद्ध करी जें दिसे महाविषम ॥ २८ ॥
पूर्वीं मी वहुताशीं लढलों परि आज एकट्याशींच ।
लढणें योग्य न केलें हरिनें जणु रावणास वहु साच ॥ २९ ॥
मणिवस्त्रशस्त्रकिरणें वेष्टित शोभे असङ्ख्यरूपाचा ।
हा राक्षसेश रावण जळतें वन जणु दिसे जनां साचा ॥ ३० ॥
लक्षावधि-वाहूंनीं शस्त्रांचीं करुनि वृष्टि वहु घोर ।
रामानुजास रावण आच्छादायास इच्छितो वीर ॥ ३१ ॥
अत्यन्त कुपित झाला लक्ष्मण परि नच विषाद लवहि जया ।
ज्वलिताग्रशरसमूहें अरीस उद्युक्त होय झांकाया ॥ ३२ ॥
तो एक दोन तीन नि चार नि पांच नि सहा दहा वीस ।
शंभर सहस्र अयुतहि तोडि शिरें हरि न ज्या गमे क्लेश ॥ ३३ ॥
वाहु नि शिरें हजारों तोडुनि हरि टाकि भूमिवरि राशि ।
सर्पफणावृन्दांचें वाटे जणु शैल शोभती मजशी ॥ ३४ ॥
कर्मगणा मुनि टाकिति तोडुनि जणु त्या समान वृन्द गमे ।
मस्तकवाहूंचा तो पुनरपि रावण तयें अखण्ड रमे ॥ ३५ ॥
रुधिरांच्या धारांनीं रणभूमि व्याप्त होय चोहिकडे ।
प्राप्त जहाला सन्ध्यासमय भ्रम हा असा जनास पडे ॥ ३६ ॥

( वहुरूपाविद्येला त्यागून रावण प्रगट झाला व त्यानें लक्ष्मणावर कोपानें चक्ररत्न फेंकलें. )

असुनि द्विवाहु लक्ष्मण असङ्ख्यभुज रावणा करी क्रान्त ।
तेणें व्यर्थचि झाली वहुरूपा होय रावण प्रगट ॥ ३७ ॥

---

१ क्रूर मगरासारखे. २ हातरूपी विजांनीं. ३ दहा हजार. ४ लक्ष्मण. ५ दमविलें.

दीर्घोच्छ्वासी दिसला घामानें चिंब जाहलें वदन ।
व्याकुळ झाला क्षणभरि कोपानें लाल जाहले नयन ॥ ३८ ॥
प्रलयाच्या मध्यन्दिनिं सूर्यासम कान्ति जें धरी देहीं ।
अरिपक्षक्षयकारी रावण चक्रास निजमनें बाही ॥ ३९ ॥
अमितप्रभा जयाची नानारत्नें जयांत जडलेलीं ।
मोत्यांच्या मालांनीं अनुपम शोभा जयास आलेली ॥ ४० ॥
तुंबा ज्या वज्राचा अग्निप्राकार-तुल्य[2] ज्या धारा ।
ज्याला सहस्र आरे वैडूर्याचें सुदिव्य अवधारा ॥ ४१ ॥
यक्षसहस्र जयाचें करिती रक्षण सदा प्रयत्नानें ।
चिन्तेनन्तर आलें रावणकरिं चक्र तीव्रवेगानें ॥ ४२ ॥
पसरे प्रभा जयाची जेणें झाली रविप्रभा मन्द ।
तें चक्ररत्न येतां करिं झाला रावणास आनन्द ॥ ४३ ॥
गन्धर्व नि विश्वावसु तुम्बुरु नारद मनांत धरुनि भया ।
गेले पळून तेथुनि आले रामादिकास जे गाया ॥ ४४ ॥
मरणार आज आपण ऐसें श्रीलक्ष्मणास वाटून ।
धीर तथापि मनामधिं धरि तो श्रीरावणा वदे वचन ॥ ४५ ॥
घेउनि करिं हें स्वस्थचि कृपणासम कां दशास्य बसलास ।
शक्ति असेल तुला जरि नराधमा ! फेक धरुनि मनिं रोष ॥ ४६ ॥
ऐसें लक्ष्मण वदतां क्रोधें दन्तें निजौष्ठ चावून ।
रावण चक्रा फेकी अन्त अरीचा करावया यत्न ॥ ४७ ॥
मेघासम गर्जुनि तें कल्पान्तार्कासमान तेजस्वी ।
चक्र निघे बहुवेगें नभांत अग्निस्फुलिङ्ग-वृन्दा[3] वी ॥ ४८ ॥

( लक्ष्मण, रामचन्द्र, सुग्रीव, सुग्रीव, भामण्डल, बिभीषण यांनीं अनेक आयुधांनीं चक्राला अडविण्याचा प्रयत्न केला. परन्तु तें शान्त होऊन लक्ष्मणाच्या हातांत शोभूं लागलें. )

उत्पाताच्या रविसम येणारें चक्ररत्न पाहून ।
वज्रमुखीबाणांनीं लक्ष्मण रोधावयास करि यत्न ॥ ४९ ॥
वज्रावर्त धनुष्यें तेवि हलें रोधण्या तया राम ।
इच्छी बहु प्रयत्नें तथापि तें राहिलेंचि अविराम ॥ ५० ॥

---

१ सोळावी. २ अग्नीच्या तटाप्रमाणें. ३ अग्नीच्या ठिणग्यांच्या समूहाला.

सुग्रीव गदा घेउनि रोधायाचा महाप्रयत्न करी ।
वाराया खड्गानें भामण्डल विक्रमा अपूर्व वरी ॥ ५१ ॥
शत्रुक्षयकरशूलें विभीषणें यत्न त्यास रोधाया ।
केला वायुसुतानें मुद्गर घेउनि करांत अडवाया ॥ ५२ ॥
अङ्गद चमचमणारी करांत घेउनि कुन्हाड हाणाया ।
सज्ज जहाला झडकरि इतरहि खेचर तया निवाराया ॥ ५३ ॥
जीवितनिःस्पृह होउनि झाले उद्युक्त जमुनि ते सगळे ।
सुररक्षित-चक्राला वाराया व्यर्थता तया न कळे ॥ ५४ ॥
येऊन चक्र घाली प्रदक्षिणा तीन शान्तवपु[1] होय ।
लक्ष्मणकरीं विराजे पुण्यें तो पावला महाभ्युदय[2] ॥ ५५ ॥
लाभे विशाल वैभव कोणा पुण्योदयें नरास जगीं ।
पुण्यक्षयें कुणावरि विनाश होतो अतीव अनुरागी ॥ ५६ ॥
ये चन्द्र उदयशिखरीं जातो अस्ताचलावरी सूर्य ।
होतो उदय कुणाचा कोणाचें पतन बोलती आर्य ॥ ५७ ॥
रामासह नारायण झाला आरूढ विभवशैलशिरीं[3] ।
जिनदास वंदे रावण पडला आपत्तिच्या विशालदरीं ॥ ५८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे चक्ररत्नोत्पत्तिवर्णनं नाम पञ्चसप्ततितमं पर्व ॥ ७५ ॥

---

१ शान्तस्वरूपाचें. २ फार मोठें ऐश्वर्य– त्रिखण्डपतित्व. ३ ऐश्वर्य-पर्वताच्या शिखरावर.

# शहात्तरावें पर्व.

श्रीलक्ष्मणास झालें प्राप्त श्रीचक्ररत्न पाहून ।
अभिनन्दन खेचरपति करिती सानन्दचित्त होऊन ॥ १ ॥
वदले होउनि गेले अनन्तवीर्याख्य केवली भरतीं ।
कथिलें अष्टम होइल नारायण चक्रपाणि[1] या जगतीं ॥ २ ॥
त्या या श्रीहरिचें वलवर्णन करणें न शक्य आम्हांस ।
अत्युत्तम वपु सुन्दर कान्तीचें जें सदैव आवास ॥ ३ ॥
बलदेव राम अष्टम ज्याचा रथ सिंह ओढिती क्रूर ।
शोभे हलरत्न[2] करीं मयदैत्या जिंकिलें जयें शूर ॥ ४ ॥
हे राम नि नारायण पुरुषोत्तम जाहले सुपुण्यानें ।
अन्योन्यीं प्रेम असे यांचें जें नैव वर्ण्य उपमेनें ॥ ५ ॥

[ लक्ष्मणाचें हातांत चक्ररत्न गेलेलें पाहून रावणानें जो विचार केला तो असा. ]

रावण मनांत चिन्ता हरिकरिं उपजे बघून चक्रास ।
जें कथन केवलीचें कदापि येइ न असत्यता त्यास ॥ ६ ॥
केवलि अनन्तवीर्यें जें कथिलें दिव्यवचन तें आज ।
दुष्कर्माङ्कुर[3] उदया येण्याला जाहलेंचि जणु बीज ॥ ७ ॥
बघुनि च्छत्र जयाचें खेचरपति होति सकल भयभीत ।
सोडुनि सेना मोठी असत रणांतून शीघ्र ते पळत ॥ ८ ॥
सागरवस्त्रें शोभित हिमवद्विन्ध्याद्रिसुस्तना[4] धरणी ।
दासीसमान आज्ञा मानी ज्याची त्रिखण्डगुणखाणी[5] ॥ ९ ॥
त्या मजला भूगोचर जिंकायाचा विचार करितो हा ।
कष्टावस्था आली कर्मक्रीडा विचित्र किति पाहा ॥ १० ॥
कुलटेसमान वागे नृपतिरमा परिचितास ही सोडी ।
भलत्याच्या पडते गळिं वाटे तिज जारसेवनीं गोडी ॥ ११ ॥

---

१ ज्याच्या हातांत चक्र आहे असा. २ हल नांवाचें आयुध. ३ अशुभकर्मांच्या अङ्कुरांची उत्पत्ति होण्यास. ४ हिमवान् व विन्ध्यपर्वतरूपी स्तनांनीं युक्त. ५ दोन म्लेच्छखंडें व एक आर्यखण्डरूपी पृथ्वी.

किंपाकफलासम हे आधीं बहु गोड वाटती भोग।
विरस विपाकीं होती देतात अनन्तदुःखसंयोग ॥ १२ ॥
भरतादिक भुवनोत्तम झाले ते पुरुष धन्य जगतांत।
ज्यांनीं षट्खण्डांचें चक्राङ्कित राज्य सोडिलें त्वरित ॥ १३ ॥
राज्य विषान्नासमसें त्यागुनि जैनव्रतास सेवून।
आराधुनि रत्नत्रय झाले ते मुक्तिसौख्यसम्पन्न ॥ १४ ॥
वाढवि जो संसारा करी पराजित असा मला मोह।
मी दीन आज झालों शतदा धिक्कार मज असो अहह ॥ १५ ॥

[ रामचन्द्राला वन्दन करून सीता रामचन्द्राला दे व प्रभो, तुमच्या प्रसादानें जगतों असें म्हण, म्हणजे पुनः तूं त्रिखण्डाचा अधिपति होशील असें रावणाला लक्ष्मणानें म्हटलें त्यावर रावणानें जें उत्तर दिलें तें असें— ]

सौमित्रीनें म्हटलें विभीषणाच्या मुखास पाहून।
खगपूज्य रावणा हे सीता रामास देइ वन्दून ॥ १६ ॥
रामप्रभु-प्रसादें जगतों ऐसें मुखें वदे वचन।
भोगी त्रिखण्डलक्ष्मी पुनरपि हे खेचरेश अन्यून ॥ १७ ॥
अभिमानातें त्यागुनि रामपदाब्जास येइ तूं शरण।
अभिमानास विनाशुनि सज्जन होती कृतार्थतासदन ॥ १८ ॥
रावण हसून वदला करिती जे क्षुद्र विफलगर्वास।
न स्वावस्था जाणति टाकिन मारून आज सर्वांस ॥ १९ ॥
आहे त्रिखण्डपति मी रावण तूं तुच्छ मनुज आहेस।
खोल दरी कां पावे कदापि उन्नत गिरीन्द्रभावास ॥ २० ॥

[ लक्ष्मण व रावणाचें अन्योन्यास उत्तर प्रत्युत्तर. ]

लक्ष्मण तयास बोले आतां वडवड न येइ कामास।
नारायण मी आहे पाठवितों तुज कृतान्तधामास ॥ २१ ॥
रावण म्हणे तयाला नारायण तूं स्वतःस घे म्हणुन।
म्हणति कपाला मङ्गल परि तें आहे अमङ्गलस्थान ॥ २२ ॥
केलें तव जनकानें निर्वासित जाहलास वनवासी।
दुःखांत जन्म गेला केशवता योग्य वाटते तुजशीं ! ॥ २३ ॥
नारायण स्वतःला अथवा तूं अन्य मान कांहींही।
सर्वमनोरथ दुष्टा करितों मी आज नष्ट तव पाही ॥ २४ ॥

चक्रप्राप्तीनें तुज झालों कृतकृत्य मी असें वाटे ।
क्षुद्रा पेण्डीचाही तुकडा मिळतां प्रमोद बहु दाटे ॥ २५ ॥
या सर्वखलखगासह तुजला दडपिन सचक्र[1] पातालीं ।
अधिक कशाला बोलूं माझ्यासम अन्य कोण बलशाली ॥ २६ ॥

[ चक्ररत्नाला रावण रोकूं शकला नाहीं. त्यानें त्याची छाती फोडली..
जमिनीवर कोसळून रावण मरण पावला. ]

ऐकुनि दशास्यवचना नारायण रोषयुक्त होऊन ।
दशकण्ठावरि फेंकी वेगें चक्रास खूप फिरवून ॥ २७ ॥
जैशी वीज कडाडे त्यापरि घनघोर गर्जना करित ।
प्रलयार्कासम गेलें चक्र दशास्याकडे अतित्वरित ॥ २८ ॥
रावण फेकुनि बाणा झाला उद्युक्त चक्र रोधाया ।
ताडीहि वज्रदण्डें पापें झालें समस्त तें वाया ॥ २९ ॥
तें चक्र जवळ आलें रावण त्या ताडि चन्द्रहासानें ।
आघात चण्ड होतां व्याप्त वनें नभ तदा स्फुलिङ्गगणें[2] ॥ ३० ॥
रावण अभिमुख असतां उभा तदा चक्ररत्न येऊन ।
फोडी छाती त्याची वज्र जसें पर्वतास करि भिन्न ॥ ३१ ॥
उत्पाताच्या वातें अञ्जनगिरिथोर कोसळे जैसा ।
होतां पुण्याचा क्षय पडला रावण महीवरी तैसा ॥ ३२ ॥
जणु रतिचा पति निजला स्वर्गातुनि वा सुरेश कोसळला ।
पडला भूवरि रावण नृसुरासुरगण समस्त हळहळला ॥ ३३ ॥
स्वामी अपुला पडला पाहुनि पळु लागली महासेना ।
छत्रध्वजगण भिटले कोण कुणाला तदा विचारी ना ॥ ३४ ॥
रथ बाजूला सारुनि आम्हां द्या मार्ग सुजन ! करुनि दया ।
हत्ती लागे पाठीं गेली हो जीवनस्पृहा वाया ॥ ३५ ॥
जिकडे फुटेल तिकडे वाट पळे सैन्य घाबरें झालें ।
दुःस्थिति पाहुनि ऐशी सुजनांचें चित्त जाहलें ओलें ॥ ३६ ॥
सुग्रीव नि भामण्डल मारुतसुत फिरुनि शत्रुसैन्यांत ।
वदले अभय तयांना जनहो नच भीति व्हा तुम्ही शान्त ॥ ३७ ॥

१ चक्रासह. २ अग्नीच्या ठिणग्यांच्या समूहानें.

## सत्त्याहत्तराव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

लक्ष्मणानें फेकलेल्या चक्ररत्नाचा रावणाच्या छातीवर फार जोराचा आघात झाल्यामुळें रावण जमिनीवर धाडकन् कोसळला व मरण पावला. आपला भाऊ मरण पावला हें पाहून बिभीषणाला फार दुःख झालें व आत्मवध करण्यासाठीं त्यानें हातांत तीक्ष्ण तरवार घेतली. पण त्याचवेळीं मूर्च्छा येऊन तो निश्चेष्ट झाला. सावध झाल्यावर आत्मघात करण्यास उद्युक्त झाला असतां त्याला रामचन्द्रांनीं उपदेश करून आत्मघातापासून परावृत्त केलें.

बिभीषणानें याप्रमाणें शोक केला. "बंधो, तूं सर्व विद्याधरांचा स्वामी असून आज जमिनीवर झोपत आहेस ऊठ. मला एक शब्द तरी बोल. मी या शोकसमुद्रांत बुडालों आहे. मला यांतून वर काढ. बंधो, तुला मी हितकर उपदेश केला पण तूं तो मानला नाहींस. युद्धांत चक्राच्या आघातानें तुला फार मोठें दुःख भोगावें लागलें म्हणून माझ्या मनाला अत्यन्त दुःख होत आहे." याप्रमाणें शोक करीत असतां, ही रावणमृत्युवार्ता अन्तःपुरांत समजून रावणाच्या मंदोदरी, रंभा, श्रीकान्ता आदिक अठरा पट्टराण्यासह अठराहजार राण्या रणांगणीं येऊन शोक करूं लागल्या. त्यांच्या त्या शोकानें देव, मनुष्य व पशूंचेंही मन द्रवलें. त्यांच्या शोकाश्रूंनीं तेथील जमीन भिजून ओली झाली. रावणाच्या शरीराला आलिंगून कांहींजणींना मूर्च्छा आली असतां त्या अञ्जनशैलावर सन्ध्यारेखेसारख्या दिसूं लागल्या. सावध झाल्यावर त्या दुःखानें आपली छाती बडवून घेत असतां मेघांत विजेची पंक्ति जशी दिसावी त्याप्रमाणें रावणाच्या शरीरावर त्या शोभूं लागल्या. कोणी राणी त्याचें मुख आपल्या मांडीवर ठेवून व त्याच्या वक्षःस्थलावर आपला हात ठेवून मूर्च्छित झाली. "हे नाथ, आम्हांला दुःखांत लोटून आपण कसें बरें निघून गेला ? आमच्याविषयीं आपलें मन इतकें कसें हो निष्ठुर झालें. आपण या भारतांतलें युगपुरुष आहांत असें

[illegible] बिभीषण [illegible] असतात. असा शोक [illegible] आनन्दोत्साह मधुर भाषण कर. असुरनायका मधुर एक शब्द जरी आपल्या मुखांतून बाहेर पडला तरी आम्हाला आनन्द होईल." याप्रमाणें [illegible] स्त्रियांनीं अत्यन्त शोक केला.

बिभीषणाचा शोक कमी व्हावा म्हणून रामचन्द्र याप्रमाणें बोलूं लागले:—
"राजन् बिभीषण, शोक सोडून दे. या शोकाचें कारण आपणें अनुभवलें आहे हे समज. [illegible] अकार्य करतो त्यामुळें पापबन्ध होतो. त्यानें दुःख उत्पन्न होतें, तें दुःख [illegible] समर्थ नाहीं. रावणानें जगाच्या [illegible] आहेत. [illegible] आहे. रावण [illegible] त्यामुळें [illegible] होतो व त्यामुळें [illegible]. म्हणून बिभीषणा शोक सोडून दे." बिभीषणाचा शोक रामाच्या [illegible] झाला. [illegible]

[illegible] याप्रमाणें स्तुति केली—

"रावण वीर होता. वीरपुरुष समरांगणांत मरतात पण शत्रूला शरण जात नाहींत. त्याचा अभिमान नष्ट झाला नाहीं तो मरण आलें म्हणजे सुदैवानें आहे. क्षत्रियवंशांत जन्मलेले हे अभिमानाचा त्याग करतात. त्यांच्याविषयीं शोक करणें योग्य आहे. रावणानें अभिमान त्यागला नाहीं म्हणून तो स्तुत्य आहे. याविषयीं मी एक कथा सांगतो तूं ऐक" असें म्हणून त्यानें एक कथा बिभीषणास सांगितली.

अक्षपुरनगरांत अरिन्दम नामक पराक्रमी राजा होता. त्यानें दिग्विजय करून पुष्कळ राजांना जिंकिलें होतें. एका राजाला जिंकण्यासाठीं राजा गेला होता पण कांहीं दिवसांनीं राणीला पाहण्याची इच्छा त्याच्या मनांत आली व तो तिला पाहण्यास परत आला. नगरांत प्रवेश करतांना तें उत्तमरीतीनें शृङ्गारित केलेलें पाहून राणीला मी येणार हें कसें तुला समजलें? सांग असें म्हटलें. तिनें म्हटलें— नाथ, एक कीर्तिधर नामक अवधिज्ञानी मुनि आहारासाठीं आले होते. आहारानन्तर माझे पति केव्हां येतील असा प्रश्न विचारला. अवधिज्ञानानें जाणून त्यांनीं निश्चित वेळ सांगितला म्हणून हें नगर मी सुशोभित करण्यास आज्ञा केली असें सांगितलें. राजानें मुनिजवळ जाऊन म्हटलें— मुनिराज, माझी मनांतील चिंता काय आहे सांगा मुनि म्हणाले— 'मी केव्हां मरेन' हा विचार तूं करीत आहेस व मी तुला असें

सांगतों कीं आजपासून सातव्या दिवशीं तुझ्या अंगावर वीज पडून तूं मरशील व शौचकूपांत एक मोठा किडा होऊन जन्मणार आहेस.

राजा घरीं येऊन प्रीतिङ्कर मुलाला सांगू लागला. मी सातव्या दिवशीं मरून शौचकूपांत किडा होऊन जन्मेन. तूं मला त्यावेळीं मारून टाक. सातव्या दिवशीं त्यानें किड्याला मारण्याचा विचार केला पण तो किडा जीवितमोहाला बळी पडून विष्ठेच्या राशींत घुसला. प्रीतिङ्करानें ही सर्व हकीकत मुनींना सांगितली. मुनि म्हणाले– वत्सा, तूं मनांत खिन्न होऊ नकोस. जीव ज्या योनींत जन्मतो तेथेंच त्याला प्रेम उत्पन्न होतें. यास्तव तूं आतां स्वहित साधून घे. तूं निश्चयानें पापमुक्त होशील. जगांत सर्व जीव आपल्या कर्माला अनुसरून सुखदुःखाचा उपभोग घेतात. प्रीतिङ्कराला संसाराची स्थिति जाणून वैराग्य झालें. त्यानें दीक्षा घेऊन आपलें हित करून घेतलें.

बिभीषणा, तूं जगताचें स्वरूप जाणतोस यास्तव आपलें मन शोकरहित कर. प्रीतिङ्करानें पित्याची दुर्गति पाहून आपलें हित करून घेतलें. जे जिनाचे दास असतात त्यांचें नेहमी चांगलेंच होतें.

# सत्याहत्तरावें पर्व.

( मृत रावणाला पाहून बिभीषणाचा शोक. )

भाऊ भूवरि पडला दुःख जाहलें बिभीपणा फार ।
निजवध करावयाला घेई हातांत तीक्ष्ण तरवार ॥ १ ॥
परि त्यापननधिं आली मूर्च्छा केला महोपकार तिनें ।
निश्चेष्ट तो जहाला क्षणभरि नो होय रिक्त दुःखानें ॥ २ ॥
सावध होतां दुःखसंतापें तो आत्मघात करण्यास ।
उद्यत पाहुनि रामें अतिशय कष्टें निवारिलें त्यास ॥ ३ ॥
अस्त्र नि कवचा त्यागुनि पुनरपि मूर्च्छा करि तया जवळी ।
सावध होतां झडकरि करुणावह शोक त्यास कवटाळी ॥ ४ ॥
हे बन्धो ! करुणाकर होतास उदार शूर चित्तहर ।
धरिला पापदशेनें पद कैसा आज हा तुझा सुकर ॥ ५ ॥
हितकर तुजला वदलों परि तूं नच मानिलेंस मद्वचना ।
युद्धीं चक्रें ताडन झालें तव होय घोर दुःख मना ॥ ६ ॥
विद्याधर-परमेश्वरभोगीं अतिलुब्ध आज भूमितलीं ।
निजलास दुर्दशा ही कोणी लिहिली असेल तव भालीं ॥ ७ ॥
बन्धो ! ऊठ नि करुणा करून मधु बोल बोल वा मजला ।
पडलों शोकसमुद्रीं देई आधार विनवितों तुजला ॥ ८ ॥

( रावण मेल्या हें वृत्त कळल्यावर मंदोदरी वगैरे अठरा हजार राण्या रणभूमीवर येऊन शोक करूं लागल्या. )

इतुक्यांत वृत्त कळलें अन्तःपुरिं रावणास समरांत ।
लक्ष्मणचक्रें वधिलें शोकें स्त्रीवृन्द होय आक्रान्त ॥ ९ ॥
ज्यांनीं ओली केली अश्रूंनीं भूमि त्या स्त्रिया सकल ।
आल्या रणाङ्गणावरि शोकें यद्वात्र होय बहु विकल ॥ १० ॥
चूडामणि जो भासे पृथ्वीचा निजपतीस पाहून ।
पडल्या भूमीवरती देह-मनोवचनविकल होऊन ॥ ११ ॥

---

१ रहित. २ व्याप्त. ३ सामर्थ्यरहित. ४ शरीर मन व वचनांनीं दुःखी.

मन्दोदरी नि रम्भा, श्रीकान्ता, रुक्मिणी, मनोवेगा ।
पद्मावती नि भद्रा, प्रभावती, उर्वशी सुखासंगा ॥ १२ ॥
रतिकान्ता, श्रीमाला, वसुन्धरा, मानवी, तडिन्माला ।
पद्मा, मनोवती नि प्रीति नि सन्ध्यावली अशा विमला ॥ १३ ॥
या मुख्य पट्टराण्या अठरा अठराहजार रूपवती ।
राण्या आल्या समरीं होत्या सगळ्या अखण्डशीलवती ॥ १४ ॥
दुःखें मूर्च्छित झाल्या असतां चन्दनजलास सिंचून ।
सावध केल्या दिसल्या उत्पाटितकमलिनीसमा[1] खिन्न ॥ १५ ॥
आलिङ्गून दशास्या कांहींना मूर्च्छना यदा आली ।
दिसल्या अञ्जनशैलीं सन्ध्यारेखासमान त्या कालीं ॥ १६ ॥
सावध होउनि कांहीं दुःखें वक्षःस्थलास बडवून ।
घेती मेघीं विद्युच्छ्रेणीसम[2] भासल्या न त्या कोण ॥ १७ ॥
मांडीवरि मुख घेउनि त्याच्या वक्षःस्थलावरी हात ।
ठेउनि मूर्च्छित झाली कोणी रमणी पुनः पुनः क्लान्त[3] ॥ १८ ॥
हा नाथ नाथ ! आपण त्यजून आम्हांस कां बरें गेला ? ।
दुःखांत मग्न आम्हाविषयीं निष्ठुर कसें बरें झाला ? ॥ १९ ॥
सत्त्वगुणी परमद्युति वैभव इन्द्रासमान हें अपुलें ।
युगपुरुष[4] खेचराधिप भूवरि हें झोपणें नसेचि भलें ॥ २० ॥
नाथा किति झोपावें उठुनि वसा स्वजनवत्सला बोला ।
अमृतासमान एकचि वाक्य जयें मोद होय आम्हांला ॥ २१ ॥
प्राणेश्वर ! कां रुसला घडला अपराध आमुचा काय ।
सांगा तुमच्यासाठीं ओवाळुनि टाकु आमुचा काय[5] ॥ २२ ॥
मुखचन्द्र नाथ ! तुमचा खुलत असे हास्यसमयिं परि आज ।
तें हास्य कुठें कोठें दन्तज्योत्स्ना समाप्त हो काज ॥ २३ ॥
सुन्दरललनाक्रीडास्थानीं वक्षःस्थलीं सुविस्तृत जें ।
चक्राच्या धारेनें केलें जें चिह्न नैव तें साजें ॥ २४ ॥
कोरण्टीपुष्पासम तुमचा हा नाथ ओष्ठ बहु लाल ।
स्फुरत नसे नर्मोत्तर[6] देण्यास्तव लोटला किती काल ॥ २५ ॥

---

१ उपटून टाकलेल्या कमळाच्या वेलीसारख्या. २ विजांच्या पङ्क्तीप्रमाणें. ३ थकली. ४ या युगांतील मुख्य पुरुष. ५ शरीर. ६ थट्टेचें उत्तर.

नाथा प्रसन्न व्हा हे कोप न केला कधींहि चिरकाल ।
अमुचेंच उलट आपण सान्त्वन केलें असूनही भूल ॥ २६ ॥
होऊन स्वर्गच्युत झाले जे पुत्र आपुले दोन ।
इन्द्रजित मेघवाहन बन्धनिं करितात कष्ट ते सहन ॥ २७ ॥
जे वीर नि गुणशाली कृतज्ञ[1]सा राम त्यावरि प्रेम ।
करुनि भ्रातृसुतांना[2] मुक्त करा नाथ व्हाचि सुखधाम ॥ २८ ॥
हे नाथ उठा आतां बोला आम्हास मधुरसें वचन ।
बहु निजणें योग्यचि नच नृपकर्म करा प्रसन्न होऊन ॥ २९ ॥
विरहाग्नीनें नाथा अंगें अमुचीं प्रदीप्त जीं झालीं ।
प्राणप्रिय शान्त करा प्रसन्न व्हा हास्य येउ द्या गालीं ॥ ३० ॥
हें हृदया प्रिय पतिचें म्लान असें वदनकमल पाहून ।
कां तूं विदीर्ण होशि न वज्रासम जाहलेंस कां कठिन ॥ ३१ ॥
हा दैवा ! तव केली आम्ही वद कोणती बरें हानि ।
निर्दय होउनि दुष्कर केली आहेस अशुभशी करणी ॥ ३२ ॥
आलिङ्गनमात्रानें अभिमान समस्त दूर सारून ।
केल्या नाना क्रीडा त्यांचें आम्हास होतसें स्मरण ॥ ३३ ॥
नांव जिचें बोलावें त्याहुनि येई मुखांत दुसरीचें ।
तेव्हां कोपें आम्हीं बान्धियलें हेमरज्जुनें[3] साचें ॥ ३४ ॥
जीं भोगिलीं सुखें बहु आम्ही नाथा सदैव तत्स्मरण ।
होतें तेणें हृदया होतो अत्यन्त दाह हे सुगुण ! ॥ ३५ ॥
नाथ उठावें व्हावें प्रसन्न नमितों त्वदीय-पायांस ।
आम्हां प्रियजनिं नाथा ! कोपाचा नच कराचि आयास ॥ ३६ ॥
रावणपत्नींचा हा शोक गुणस्मरणपूर्व ऐकून ।
नरसुर-पशुपक्ष्यांचीं द्रवलीं हृदयें नि जाहलीं खिन्न ॥ ३७ ॥

( रामानें बिभीषणास शोक सोडून दे असा उपदेश केला. )

नन्तर राम नि लक्ष्मण करुणेनें अश्रुपूर्ण-नयनांनीं ।
वदले बिभीषणाला लोकव्यवहार आणुनि ध्यानीं ॥ ३८ ॥
राजन् रुदन पुरें हें आतां देई विषाद सोडून ।
दुःख असें उद्भवलें कर्मचि कारण तयास तूं जाण ॥ ३९ ॥

१ उपकार जाणणारा. २ भाऊ व मुलांना. ३ सोन्याच्या साखळीनें.

करिति प्रमादवश जे अकार्य त्या पापकर्मबन्ध घडे ।
दुःखें मिळतीं तेणें नाश तयांचा करूं शके न रडें ॥ ४० ॥
जेव्हां अकार्य करितो नर मेला त्याचसमयिं जाणावें ।
मेल्यावरि शोकाचा उपयोग न हें मनीं सदा ध्यावें ॥ ४१ ॥
जगताच्या हितकार्यीं दक्ष सदा हा दशास्य राहियला ।
केलें प्रजाजनांचें हितचि कधींही अनर्थ नच केला ॥ ४२ ॥
शास्त्रें जाणत होतां पंडित होता तथापि मोहबली ।
करवी अकार्य तेणें भोगी दारुणदशा न ती चुकली ॥ ४३ ॥
होतो विनाश मोहें विनाशकालांत होय मति अन्ध ।
जाणून शोक सोडी विभीषणा शोक करिति मतिमन्द[2] ॥ ४४ ॥
यापरि रामें कथिलें सान्त्वनपर शब्द चार करुणेनें ।
झाला विभीषणाचा शोक कमी शान्तवृत्ति हृदय बने ॥ ४५ ॥

( भामण्डलपण्डितानें विभीषणास दृष्टान्तपूर्वक उपदेश केला )

यानन्तर भामण्डलपंडित अतिमधुर बोलला वचन ।
मित्रा विभीषणा वा, शान्तमनें कथिन तें करी श्रवण ॥ ४६ ॥
रावण महामना तो भीमरणीं लढुनि पावला मरण ।
वीरपणानें आला नाहीं शत्रुस कदापि तो शरण ॥ ४७ ॥
ज्याचा मान न पडला तो प्रभु पडला न, धन्य वीरांत ।
कां कीं अभिमानांचें रक्षण करितोचि पूज्य समरांत ॥ ४८ ॥
सत्त्वगुणाचा सागर रावण अभिनन्दनास पात्र असे ।
शोक तयाचा न करी गुण अनुकरणास त्यांत योग्य वसे ॥ ४९ ॥
जे अभिमाना त्यजिती क्षत्रियवंशांत जन्मुनी भूप ।
ते शोच्यचि[3] समजावें 'शत्रुन्दम' नृप असे जसा पाप ॥ ५० ॥
अक्षपुरीं नृप होता शत्रुन्दम इन्द्रवैभवें साजे ।
ज्याच्या चरणीं नमवित होते मस्तक अनेकशत राजे ॥ ५१ ॥
जाउनि अनेकदेशीं शत्रुसमूहास जिंकिलें त्यानें ।
राणीस पाहण्याच्या आला स्वस्थानि परत इच्छेनें ॥ ५२ ॥

---

१ क्रोधादिकषायांच्या स्वाधीन होऊन. २ बुद्धीनें मन्द— मूर्ख. ३ शोक करण्यास योग्य.

वेग मनासम ज्याचा ऐशा अश्वावरून निजनगरीं ।
ध्वजतोरण-मण्डित जें आला भूपाल विसावयास घरीं ॥ ५३ ॥
स्वगृह सुशोभित पाहुनि राणीस विचारिलें नृपालानें ।
येणार मी कसें गे जाणियलें बोल मजशि विधुवदने ॥ ५४ ॥
कीर्तिधर नांव ज्याचें अवधिज्ञानी अशा मुनीशानें ।
जो पारणार्थ आला होता स्वगृहीं निवेदिलें त्यानें ॥ ५५ ॥
ईर्ष्या मनांत ठेवुनि भूपें जाउनि मुनीश्वरापाशीं ।
म्हटलें नाथा माझी मानसचिन्ता वदा तपोराशी ॥ ५६ ॥
कथिलें मुनिवर्यानें " येइल मज मरण केधवा केवी ।
धरिला विचार ऐसा स्वमनीं भूपाल बोल तूं भावी " ॥ ५७ ॥
तूं आजच्या दिनाला धरून मरशील सातव्या दिवशीं ।
वज्रें ताडित होउनि होशिल विष्टेंत कीट तूं अवशी ॥ ५८ ॥
येउनि निजगृहिं वदला राजा प्रीतिङ्कराख्य-तनयास ।
मी शौचकूपिं होउन कीटक मोठा नि मार तूं त्यास ॥ ५९ ॥
राजा मरून झाला कीटक त्या मारण्यास पुत्र वधे ।
मृत्युभयानें धावुनि विष्टाराशींत शीघ्र हाय रिघे ॥ ६० ॥
प्रीतिङ्करें मुनीशा म्हटलें जाऊन नाथ नृप वदला ।
कीटास मार तैसें करितां विष्टेंत कां वरें शिरला ? ॥ ६१ ॥
मुनिवर तया म्हणाले वत्स ! विषादा मनांत तूं न धरी ।
योनींत जन्मतो ज्या तेथें तो प्रीति निश्चयेंचि वरी ॥ ६२ ॥
स्वहिता यास्तव साधी होशिल तूं पापमुक्त नियमानें ।
जगिं जीव सर्व घेती स्वकृताचा भोग सिद्ध हें मानें ॥ ६३ ॥
जाणुनि दुःखाकारण संसारस्थिति अशी विरक्तमनें ।
प्रीतिङ्कर विगतस्पृह झाला मुनि मान्य करुनि जिनवचनें ॥ ६४ ॥
यापरि विविध विभीषण जगताची स्थिति असें मनीं जाण ।
स्वार्थांत चित्त ठेवी शोकानें कार्य सिद्ध होतें न ॥ ६५ ॥
दृढ शूर निश्चयी जो संग्रामीं मुख्यपुरुष दैववश ।
त्या रावणास मारुनि लक्ष्मण झाला त्रिखण्डलक्ष्मीश ॥ ६६ ॥

---

१ चन्द्राप्रमाणें जिचें तोंड आहे अशा हे राणी. २ उपवासानन्तर आहाराकरितां. ३ अंगावर वीज पडून. ४ शौचखान्यांत. ५ निःस्पृह, निरिच्छ.

विविधस्वभाववर्णन केलें भामण्डलें कथा कथुन ।
ऐकुनि विभीषणाचें झालें बहु तेधवा विशोक मन ॥ ६७ ॥
प्रीतिङ्करें पित्याची दुर्गति पाहून आत्महित केलें ।
जिनदास असति जे जागे होतें त्यांचेंच सर्वथैव भलें ॥ ६८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे प्रीतिङ्करोपाख्यानं नाम सप्तसप्ततितमं पर्व ॥ ७७ ॥

## अठ्ठ्याहत्तराव्या पर्वांतील कथासारांश.

'नृपहो आतां आमचें रावणाविषयींचें वैर संपलें. विवेकी लोकांचें वैर मरणान्त असतें' या म्हणीप्रमाणें आतां रावण आमचा मित्र झाला आहे. यास्तव त्याचा देह उत्तम पुरुषाचा असल्यामुळें त्याचा संस्कार मोठ्या आदरानें केला पाहिजे ही गोष्ट आपण ध्यानांत घ्यावी.' रामचन्द्राचें हें भाषण सर्वांना मान्य झालें. नंतर ते विद्याधरराजे राम-लक्ष्मणासह जेथें मंदोदरी हजारो स्त्रियांसह रडत होती तेथें आले. तिचें रडणें निर्दयी अंतःकरणालाही ओलें करणारें होतें.

हत्तीवरून उतरून ते दोघे भाऊ विद्याधरासह मंदोदरीजवळ आले. सर्व स्त्रियांचीं तोंडें सुकलीं होतीं. देह मातीनें मलिन झाला होता—हातांतील कंकणें फुटलीं होतीं. रामचंद्रांनीं द्वेषाचा लवहि ज्यांत नव्हता अशा भाषणांनीं सर्व स्त्रियांचें सांत्वन केलें व नंतर गोशीर्ष, अगुरु, चन्दन, कापूर आदिक सुगंधी पदार्थांनीं रावणाच्या शरीराचा दाह-संस्कार केला.

पद्मसरोवराच्या तटावर सर्व राजे खिन्नमनानें बसले होते, रामचंद्रांनीं निर्द्वेष-मनानें सर्वांना म्हटलें कीं— "इंद्रजित्, कुंभकर्ण, मेघवाहन, मय, मारीच वगैरेंना आपण बंधनांत ठेवलें आहे. त्यांना आतां सोडून द्या." कांहीं विद्याधर म्हणाले— प्रभो, 'ते क्रूर अंतःकरणाचे आहेत त्यांना मारूनच टाकले पाहिजे— कारण त्यांच्या हृदयांतील वैर केव्हांही नाहींसें होणार नाहीं.' रामप्रभु म्हणाले— 'नाहीं. असें करणें हा सज्जनांचा आचार नव्हे. उत्तम क्षत्रिय ज्यांना कैदेंत टाकलें आहे, जो दुःखपीडित आहे, जो शरण आला आहे, जो झोपला आहे व ज्यांनीं दांतीं तृण धरलें आहे अशांना मारीत नसतात. हें ध्यानांत घ्या.' रामचंद्राच्या भाषणाला सर्वांनीं संमति दिली, कांहीं शस्त्रधारी सैनिक त्यांना आणविण्यासाठीं रामचंद्रांनीं पाठविलें.

कांहीं विद्याधर म्हणाले– 'रावणाचें शरीर जळत आहे हें पाहून इंद्रजित्, कुंभकर्णादिकांना राग येईल व ते लढावयास उद्युक्त होतील बिभीषणाचीहि बुद्धि त्यावेळीं फिरून तोही युद्धाला उद्युक्त झाला म्हणजे यांच्याशीं लढावयाचें सामर्थ्य आम्हा कोणामध्येंही नसल्यामुळें मोठा अनर्थ होईल. पण त्याच्या बोलण्याकडे कोणी लक्ष्य दिलें नाहीं.

थोड्यावेळानें कुंभकर्णादिकांना तेथें सैनिक घेऊन आले पण त्या सर्वांची शांतवृत्ति दिसली. त्यांचें वैराग्य वाढलें होतें. रागद्वेष मावळले होते. ते शांत नेत्रांनीं पाहत रामाजवळ आले.

"या संसारांत अल्पही सार नाहीं. धर्मच जीवाचा बंधु आहे. त्यानेंच खरें सुख मिळतें. या बंधनांतून आम्ही मुक्त झालों म्हणजे निर्ग्रंथ दीक्षा घेऊन करपुट भोजन करूं अशी त्यानीं मनांत प्रतिज्ञा केलेली होती."

इंद्रजितादिकांना रामचंद्र व लक्ष्मण यांनीं घडलेलें वृत्त कथन केलें. तें ऐकून इंद्रजितादिकांनीं "हे रामा व हे लक्ष्मणा तुमच्या ठिकाणीं अनेक सद्गुण आहेत व अपूर्व बल आहे, तुम्ही सुरदुर्जय रावणाला जिंकून आपलें बल व्यक्त केलें आहे व स्तुतीस पात्र आहात."

लक्ष्मणानें म्हटलें–"इंद्रजितादिक श्रेष्ठ पुरुषहो, आपण आम्हाला बंधु समजून भोगांचा उपभोग घेत आनंदानें राहावें. इंद्रजितादिक म्हणाले– आम्हाला दुर्गतींतून फिरविणाऱ्या भोगांना भोगण्याची इच्छा नाहीं. हे तृष्णा वाढवितात व ती तृष्णा संसाररोगाला वाढविते म्हणून आम्ही त्यापासून विरक्त झालों आहोत."

यानंतर सर्वांनीं पद्मसरोवरांत उतरून स्नानें केलीं. कांहीं विद्याधर रावणाच्या गुणांना आठवून निःशब्द रडू लागले. कांहींनीं दुष्कर्मांची विचित्रता व त्यांच्या कुफलांचें वर्णन केलें. कोणी रावणाच्या गर्वाची प्रशंसा करूं लागले. कोणी लक्ष्मणाच्या शक्तीची जिनें रावणाचा नाश केला तिची स्तुति करूं लागले.

सगळ्या लंकानगरींत शोक पसरला होता. डोळ्यांतून अश्रु वाहत होते. सर्व नगरी त्यानीं जलमय झाली होती. कांहीं सज्जनांनीं या प्रसंगानें विरक्त होऊन दीक्षा घेण्याचा विचार निश्चित केला होता.

याच दिवसाच्या अंतभागांत 'कुसुमायुध' नामक उद्यानांत छप्पन्नहजार मुनिगणासहित 'अप्रमेयबल' नामक आचार्य आले. हे मुनिराज, रावण जिवंत

असतां आले असते तर नारायण प्रतिनारायण यांत अर्थात् लक्ष्मण व रावण यांत प्रेम उत्पन्न होऊन वैर नष्ट झालें असतें; कारण ऋद्धिधारक मुनि व केवली जेथें विहार करितात तो प्रदेश स्वर्गासारखा सुखमय व निर्वैर होतो. तेथें असणाऱ्या राजांचें वैर नष्ट होऊन ते अन्योन्य मित्र होतात. योगिजनाशिवाय इतरांत असा प्रभाव आढळून येत नाहीं.

ते 'अप्रमेयबल' मुनिराज एका प्रासुक शिलेवर बसले. शुक्लध्यानानें त्याच-दिवशीं त्यांनीं घातिकर्मांचा नाश केला व ते अनंतज्ञान, अनंतसुख, अनंतशक्ति आणि अनंतदर्शनयुक्त झाले. त्यांना वंदन करण्यासाठीं चतुर्णिकायदेव आले. ते नगारे आदिक वाद्यें आकाशांत वाजवू लागले.

राम-लक्ष्मण, कपि-राक्षसवंशी राजे, इंद्रजित, मेघवाहन, कुंभकर्ण, मय, मारिच हे सर्व प्रभूंच्या समवसरणांत गेले. त्यांना वंदन करून हर्षानें बसल्यावर प्रभूंनीं याप्रमाणें उपदेश केला:— या देव, मनुष्य, पशु, व नरकगति चक्रासारख्या आहेत. यावर आरूढ झालेले सर्व जीव संसारांत फिरत असतात. ज्ञानावरणादिक कर्मांनीं बद्ध झालेले जीव शुभ व अशुभ अशीं कामें करतात. रौद्रध्यान व आर्तध्यानानें त्यांची बुद्धि मोहयुक्त होऊन ते हिंसा, चोरी, परस्त्रीसेवनादिक पापें करितात. तीव्रलोभानें धनधान्यादि परिग्रहांत आसक्त होतात. त्यामुळें त्यांच्यावर मृत्यूचा वज्रदण्ड पडून नरकांत जन्म घेतात.

जे दान, तप, जिनपूजा व व्रतांत चित्त लावतात ते स्वर्गीय सुखांचा दीर्घकाल अनुभव घेतात. ज्यांना व्रत, तप, नियम नसतात जे निष्कपटी व विनयशील असतात त्यांना मनुष्यजन्म मिळतो व कपटी जीव पशु होऊन जन्मतात.

देवगतीहून येथें मनुष्य झाल्यावर जे धर्माचरण करीत नाहींत ते संसारांत फिरतात. पण ज्यांना जिनवचन आवडतें, शील, तप, सम्यक्त्व, संयमांत तत्पर राहतात ते रत्नत्रय पूर्ण धारण करून कर्मक्षयानें मुक्त होतात. कित्येक येथील विशाल भोग भोगून निर्ग्रंथमुनि होऊन पुनः स्वर्गसुखाचा भोग घेतात.

मुक्तिसुख हेंच खरें सुख आहे. तो आत्म्याचा गुण आहे व अविनाशी आहे.

याप्रमाणें धर्मोपदेश ऐकल्यावर इंद्रजित् व मेघवाहनांनीं आपल्या पूर्वभवाचा प्रश्न विचारला. मुनिवर्यांनीं याप्रमाणें पूर्वभवचरित सांगितलें.

कौशाम्बी नगरींत ' प्रथम ' व ' पश्चिम ' या नांवाचे दोन दरिद्री भाऊ राहत होते पण जिनधर्मावर त्यांचें प्रेम होतें. एकेवेळीं भवदत्त नामक आचार्यांच्या दर्शनाला ते गेले. विनयानें त्यांनीं त्यांना वंदन केलें. धर्मस्वरूप ऐकल्यानंतर त्यांनीं त्यांच्या चरणाजवळ क्षुल्लक दीक्षा घेतली. आचार्यांना वंदन करण्यासाठीं श्रीनंदिश्रेष्ठी आला. तो जिनेंद्रभक्त असल्यामुळें आचार्यांनीं त्याचा आदर केला. त्याचें विशाल वैभव पाहून पश्चिमाच्या मनांत पुढील जन्मीं मी या श्रेष्ठीचा पुत्र व्हावें असा विचार आला. उपदेशानें देखील तो विचार मनांतून त्यानें काढून टाकला नाहीं व कांहीं काळानें मरण पावून श्रीनंदिश्रेष्ठीच्या इंदुमुखी नामक मुख्य धर्मपत्नीच्या गर्भांत आला. हा गर्भांत वाढत असतां कौशांबी नगराचा तट पडणें वगैरे उत्पात झाले त्यामुळें राजाचें मन खिन्न झालें. अशा निमित्तांनीं उग्र महापुरुषाचा जन्म होईल असें जाणून त्याच्या जन्मापासून राजेही आदर करू लागले. सर्व लोकांच्या मनांत त्यानें प्रेम उत्पन्न केलें म्हणून श्रेष्ठीनें त्याचें नांव ' रतिवर्धन ' ठेविलें.

हा थोर झाल्यावर यानें अनेक राजांना नम्र केलें. वैभवशाली झाल्यामुळें कौशांबीचा राजाही नम्र झाला. हा स्वैराचारी होऊन गुरूचा अवमान करून सुखमग्न झाला.

इकडे वडीलभाऊ क्षुल्लक ' प्रथम ' हा समाधिमरणानें मरून स्वर्गांत जन्मला. त्याला लहान बंधूनें प्रतिबोध करावयास सांगितलें होतें याची आठवण झाली व तो क्षुल्लकरूप धारण करून राजवाड्याजवळ आला. पण द्वारपालांनीं त्याला हाकालून दिलें. तेव्हां त्यानें रतिवर्धनाचेंच रूप धारण करून राजवाड्यांत प्रवेश केला व खऱ्या रतिवर्धनाला हाकालून दिलें व त्याला याप्रमाणें तो बोलला :— तूं पूर्वीं क्षुल्लक होऊन निदानदोषानें राजा झाला आहेस. ही तुला उपदेश करण्याची वेळ आली आहे, व्यर्थ दवडूं नकोस. देवगुरुशास्त्रावर श्रद्धान ठेव सम्यक्त्वी हो. त्याचा उपदेश त्याला आवडला. त्यानें राज्यत्याग केला व दीक्षा घेऊन अट्ठावीस मूल गुण धारण केले. कांहीं दिवसांनीं मरण पावून समाधीनें तो प्रथमस्वर्गांत देव झाला. तेथें आपल्या बंधूसह सुखें भोगून मरण पावला. ते दोघे बंधुदेव तेथून च्युत होऊन विजयपुरांत उर्व व अर्वस या नांवाचे राजपुत्र झाले. तेथें इंद्रियसुख भोगून ते दोघे मुनि झाले व समाधिमरणानें स्वर्गांत जन्मले. तेथील आयु समाप्त झाल्यावर तुम्ही दोघे रावणाचे इंद्रजित् व मेघवाहन नामक पुत्र झालेले आहात.

श्रीनंदिश्रेष्ठीची पत्नी इंदुमती ही अनेकभव फिरून मयविद्याधराची कन्या व रावणाची पत्नी झाली. अशी ही पूर्वभवाची कथा समजा. याप्रमाणें पूर्वभववर्णन ऐकून ' अप्रमेयबल ' मुनीश्वरांना वंदन करून इंद्रजित व मेघवाहन यांनीं मुनिदीक्षा घेतली व ते तपांत तत्पर राहिले. कुंभकर्ण, मारीच हेहि भवविरक्त होऊन कषाय त्यागून सुतपोलक्ष्मींत रममाण झाले. तपश्चरणाच्या प्रभावानें नानाऋद्धि त्यांना प्राप्त झाल्या. मयविद्याधरानेंही दीक्षा घेतली.

इकडे पति, पुत्र व पिता यांच्या विरहामुळें अतिशय दुःखी होऊन मंदोदरी मूर्च्छित होऊन पडली. सावध झाल्यावर ती शोकानें म्हणू लागली— बाप, नवरा व मुलगा हे स्त्रीचे रक्षक असतात पण हे तिघेही मला सोडून गेले. आतां मी कोणास शरण जाऊ? मी पुण्यहीन झाले असा शोक करीत असतां शशिकान्ता नामक आर्यिकेनें म्हटलें—' मूढे, हा शोक भवसमुद्र तरून जाण्याचा उपाय नाहीं. तुझे पशु व मानवांत अनेक जन्म झाले. असंख्यवेळा तूं शोक केलास. त्यानें तुला दुःखच झालें. यास्तव तूं तो सोड. संयम धारण कर व तोच तुझें कल्याण करील. हें आर्यिका-वचन ऐकून तिनें तिच्याजवळ आर्यिकेची दीक्षा घेतली. निर्मलपणानें त्या आर्यिका-व्रताचें पालन केलें. तिच्याबरोबर अट्ठेचाळीस हजार स्त्रियांनीं आर्यिकाव्रत धारण केलें. याप्रमाणें मुनिसुव्रतनाथांच्या तीर्थांत अनेक आर्यिकांनीं व मुनीश्वरांनीं कल्याण करून घेतलें. त्या सर्वांना जिनभक्ति करणारे आम्ही भव्य भक्तीनें वंदन करितों.

# अठ्ठ्याहत्तरावें पर्व.

[ रामचंद्रांनीं मंदोदरी आदि रावणाच्या सर्व स्त्रियांचा शोक नानाप्रकारच्या भाषणांनीं शांत केल्यानंतर रावणाच्या शरीराचा दाह चंदनादिकांनीं केला. ]

श्रीरामचन्द्र वदले आतां कर्तव्य कोणतें पुढचें ।
मरणान्त वैर असतें विबुधांचें वचन हें असें साचें ॥ १ ॥

लङ्केश महानर हा गेला परलोकिं देह परि त्याचा ।
उत्तम संस्कृत[1] करणें विचार आणा मनांत हा साचा ॥ २ ॥

अनुमोदन सर्वांनीं जेव्हां या रामभाषणास दिलें ।
हरिवल विभीषणासह खगनृप घेऊन त्या स्थलीं गेले ॥ ३ ॥

मन्दोदरी हजारो स्त्रियांत कुररीसमान शोक करी ।
श्रवण जयाचें होतां निर्दयमानसहि आर्द्रतेस धरी ॥ ४ ॥

उतरुनि महागजाहुनि बलकेशव बहु खगेश घेऊन ।
मन्दोदरीजवळ ते आले पाहून होति मनिं खिन्न ॥ ५ ॥

भूधूलिमलिन दिसल्या मणिवलयें यत्करांतलीं तुटलीं ।
पाहुनि नारी अतिशय रडती यत्कान्ति सर्वथा सुकली ॥ ६ ॥

नानाविध-वचनांनीं मन्दोदरिसह समस्त ललनांचें ।
सान्त्वन केलें रामें द्वेषाचा लवहि ज्यांत नच नाचें ॥ ७ ॥

[ पद्मसरोवराच्या तटावर बसून रामचंद्रानें निर्द्वेषमनानें इंद्रजितादिकांना बंधनमुक्त करण्याची आज्ञा दिली. ]

गोशीर्ष अगरुचन्दन कर्पूरादिक सुगन्धि वस्तूंनीं ।
संस्कारुनि दशकण्ठा पद्मसरा जाति सर्व खिन्न मनीं ॥ ८ ॥

बसुनि तटावरि त्याच्या निर्द्वेषमनें वदे तदा राम ।
सामन्तासह सोडा इन्द्रजिताद्यां मनांत धरुनि शम ॥ ९ ॥

कांहीं खेचर वदले आहेत क्रूरचित्त ते सगळे ।
मारावेतचि वैर न यद्धृदयांतील केधवाहि गळे ॥ १० ॥

---

१ रावणाच्या मोठेपणाला अनुसरून त्याचा देहदाह करणें.

श्रीराम तया वदले जनहो हा काय सज्जनाचार ।
क्षत्रिय उत्तम न वधिति, वधणें आहेचि हा अनाचार[1] ॥ ११ ॥
जो निगडबद्ध[2], दुःखी झाला जो नम्र, सुप्त[3] जो आहे ।
धरिलें दन्ताग्रीं तृण त्यांना क्षत्रिय न मारिती पाहें ॥ १२ ॥
या रामाच्या वचना सादर संमति दिली समस्तजनें ।
नानायुधधर गेले आणाया सुभट हरिबलाज्ञेनें ॥ १३ ॥
इन्दजित कुम्भकर्ण नि मय घनवाहन नि तेवि मारीच ।
पायीं गळीं नि हातीं निगडांनीं बद्ध होति जे साच ॥ १४ ॥
जे शूर कार्यतत्पर असति सदा सावधानचित्त भट ।
ते त्या आणित असतां गडबड होइल तथापि हें स्पष्ट ॥ १५ ॥
इन्द्रजित-कुम्भकर्णा पाहुनि रावणशरीर जळणारें ।
येईल कोप तेव्हां कपिसैन्यीं कोण त्यास लढणारें ॥ १६ ॥
नृप वा सैन्यांहि नाहीं समर्थ अनुभूत[4] ही असे गोष्ट ।
जो जेथें तो तेथें बसलेला हें दिसेल तैं स्पष्ट ॥ १७ ॥
इन्द्रजिताच्या विकृतां[5] बघुनि विभीषण तसाच होईल ।
भामण्डलें स्वसुभटा कथिलें तें केवि होय निर्मूल[6] ॥ १८ ॥
ऐसा विचार चित्तीं असतां ते करित लोक त्या समयीं ।
इन्द्रजितादिक आले ज्यांच्या वैराग्य वाढलें हृदयीं ॥ १९ ॥
रागद्वेषें विरहित मनेंचि जे मुनिपणास जणु गेले ।
जे सौम्य-लोचनांनीं पाहत रामासमीप तैं आले ॥ २० ॥

[ इन्द्रजितादिकांनीं विरक्त होऊन केलेला विचार. ]

या संसारीं अल्पहि नच दिसतो सार खचित जीवास ।
धर्मचि एक तयाचा बन्धु असे तोचि सार सुखवास ॥ २१ ॥
या मुक्त बन्धनांतुनि झालों जरि पूर्ण नम्र होऊन ।
आम्ही करपुटभोजन[7] करूं प्रतिज्ञा करी तदीयमन ॥ २२ ॥
इन्द्रजित मेघवाहन कलशश्रुति[8] आदि खचरभूपगणा ।
बलनारायण यांनीं झाली कथिली यथार्थशी घटना ॥ २३ ॥

---

१ दुराचार. २ बेड्यांनीं जखडलेला. ३ झोपलेला. ४ अनुभवलेली.
५ क्रोधानें युक्त. ६ व्यर्थ. ७ हातांच्या ओंजळींत भोजन. ८ कुंभकर्ण.

[ इन्द्रजितादिकांनीं राम-लक्ष्मणाच्या यथार्थगुणांचें वर्णन केलें. ]

इन्द्रजितादिक वदले वृत्ति जयांची प्रशान्त वहु होती ।
हे रामा सौमित्रे ! ठायीं तुमच्या अपूर्व सुगुणतति ॥ २४ ॥
गाम्भीर्य धैर्य उद्यम वल अद्भुत आपुलें जनां दिसलें ।
सुरदुर्जयदशकण्ठा कारण आपण रणांत संहरिलें ॥ २५ ॥
दुष्कर कार्या जो करि उन्नतगुण वास ज्यांत करितात ।
मानी अपकारीही अरि तो होतो स्तुतीस संप्राप्त ॥ २६ ॥

[ आम्हाला बंधु मानून आपण भोगांचा उपभोग घ्या असें लक्ष्मणांचें भाषण ऐकून इन्द्रजितादिकांनीं जें उत्तर दिलें तें हें— ]

सान्त्वन करून चक्री हृदयंगम वचन बोलला त्यांना ।
घ्या भोगांचा अनुभव आम्हां वान्धवसमान सतत गणा ॥ २७ ॥
इन्द्रजितादिक वदले विषसम दारुण नकोत ते भोग ।
संसारीं फिरती ते जे त्यावरि करिति सतत अनुराग ॥ २८ ॥
नानोपायें सान्त्वन केलें त्यांनीं न इच्छिलें भोगा ।
हे वाढविती तृष्णा ती वाढविते सदैव भवरोगा ॥ २९ ॥
नारायण-वलरामीं झाली संलग्न दृष्टि जरि त्यांची ।
भोगापासुनि विमुखचि सूर्यापासून जेवि ती साची ॥ ३० ॥
पद्मसराच्या नीरीं कमलरजांनीं असें सुगन्धित जें ।
स्नानें केलीं सकलें गेले स्वगृहा विषाद हृदयिं रुजे[1] ॥ ३१ ॥

[ रावणमरणानें विद्याधरांच्या मनांत आलेले विचार जे त्यांनीं बोलून दाखविले. ]

कांहीं विद्याधर या सरस्तटीं बसुनि मण्डलाकारें[2] ।
शूर कथानक वदती विस्मय ज्यांच्या मनांत अनिवार ॥ ३२ ॥
निष्ठुरशा दैवाला कित्येकांनीं दिला महादोष ।
रडले अशब्द[3] कांहीं स्मरून दशकण्ठ-सुगुणगणकोष ॥ ३३ ॥
कांहीं दुष्कर्मांची विचित्रता वर्णिती फलें विविध ।
त्यांचीं कथिती सज्जन होइल आत्म्यास ज्यामुळें वोध ॥ ३४ ॥
ठेवुनि मनिं भोगांचा द्वेष फळें कटुक वर्णिती त्यांचीं ।
नृपलक्ष्मी वहु चञ्चल जननी ती मानिती अनर्थांची ॥ ३५ ॥

---

१ अंकुरला. २ गोलाकार. ३ शब्दांनीं रहित.

युद्धीं लढून मरणें निर्भय होऊन पळुनि नच जाणें ।
विजयश्रीला वरणें गाती कित्येक वीरजन गाणें ।। ३६ ।।
उत्तम बुद्धि जयांचीं वदले खेचर अकार्यफल कैसें ।
दशकण्ठास मिळालें तत्त्यागें सुफल लक्ष्मणास जसें ।। ३७ ।।
कोणी रावणगर्वा कोणी श्रीरामसद्गुणा शंसी[1] ।
कोणी लक्ष्मणशक्तिस जी दशकण्ठास पूर्ण विध्वंसी ।। ३८ ।।
निर्मल हृदय जयांचें ऐसे बुध पुण्यहेतु यास असे ।
ऐसें वदले जेथें दानादिक त्या नरांत हें विलसे ।। ३९ ।।

[ सगळ्या लंकेत शोक पसरून लोकांनीं केलेले विचार. ]

स्नानादिक क्रिया ज्या प्रतिगृहिं त्या बन्द पडुनि शोकाचें ।
वातावरण पसरलें विषण्णता[2] मूर्तिमन्त जणु नाचें ।। ४० ।।
लङ्केंत सर्वजनतानेत्रांतुनि अश्रु वाहती सतत ।
जलमयचि सर्व दिसलें अग्न्यादिक जाहले परांभूत[3] ।। ४१ ।।
पूर्वीं कधीं न घडलें ऐसें आश्चर्य हें कसें घडलें ।
भूगोचरमनुजानें विद्याधरराज-रावणा वधिलें ।। ४२ ।।
उद्गार जनमुखांतुनि पडले नयनाश्रुसमचि बाहेर ।
पडले भूवरती ते शोकें निष्कम्प[4] होति पादकर ।। ४३ ।।
संसारविरत होउनि परिग्रहा त्यजुनि सकल मुनि व्हावें ।
ऐसा विचार केला कोणी सुजनें विरक्तिपरभावें ।। ४४ ।।

[ लंकेच्या कुसुमायुध-उद्यानीं ' अप्रमेयबल ' नामक मुनि ससंघ आले व त्यांना केवलज्ञान झालें. ]

त्या दिवसाचे अन्तीं मुनीश ज्या ' अप्रमेयबल ' नाम ।
आले लङ्कानगरीं मोठा घेऊन संघ सुखधाम ।। ४५ ।।
असतां जिवन्त रावण आले असते जरी महामुनि हे ।
प्रीति हरिप्रति झाली असती पुष्कळ न किन्तु[5] मनिं वाहे ।। ४६ ।।
परमर्द्धिधर मुनीश्वर निवास करितात ज्या प्रदेशांत ।
वैरानुबन्ध-विरहित होउनि जनता बने तिथें शान्त ।। ४७ ।।

---

१ स्तवितात. २ शोकखिन्नता. ३ व्यर्थ. ४ चलन-वलनरहित.
५ संशय.

केवलि विहार करिती जेथें तो भूप्रदेश शत दोन[1]।
योजनमित सुरलोकासन्निभ होतोचि यांत संशय न ॥ ४८ ॥
तेथें असणारे नृप त्यागुनि वैरास मित्रता वरिती।
योगिजनाविण ऐसा प्रभाव जन अन्य कोण हो धरिती ॥ ४९ ॥
असते अमूर्तता नभि जैशी वार्ती[2] निसर्ग-चञ्चलता।
श्रीमुनिवर्यामध्यें असते तैशी प्रमोददायकता[3] ॥ ५० ॥
नानाद्भुतऋद्धींनीं सम्पन्न श्रमणसङ्घ घेऊन।
कुसुमायुध-उद्यानीं[4] निवास त्यांचा घडे सुखस्थान ॥ ५१ ॥
छप्पन हजार खेचर-मुनि ज्याच्या शोभतात संघांत।
तो 'अप्रमेयबल' मुनि नाशी भव्यौघपापसंघात[5] ॥ ५२ ॥
शुक्लध्यानीं तत्पर एकान्त-शिलातलावरी बसला।
मुनिराज घातिकर्मक्षयेंचि निशि केवलेश तो झाला ॥ ५३ ॥

[ केवलीच्या अतिशयाचें वर्णन. ]

अतिशय त्याचा कथिती गणिगौतम मगधनायका विमल।
पापविनाशक अद्भुत अतिशय करि भव्यचित्त उत्फुल्ल[6] ॥ ५४ ॥
झाले प्राप्त जयाला सुखशक्त्यादिक अनन्त जे चार।
सिंहासनीं समुन्नत बसले करितों तया नमस्कार ॥ ५५ ॥
दश[7] आठ पांच सोळा भेद जयांचे असे समस्त सुर।
आले स्तविती ध्याती आदर ज्यांच्या वसे मनीं प्रचुर ॥ ५६ ॥
दुन्दुभि मृदंग वीणा शंखादिकरव नभांत दुमदुमती।
दिङ्मण्डल भामण्डल पाहुनि हरि राम मुदित मनि होती ॥ ५७ ॥
कपिराक्षसविद्याधर राम नि लक्ष्मण सुभक्ति-चित्तानें।
इन्द्रजित मेघवाहन कलशश्रुति[8] जाति गाति गुणगाणें ॥ ५८ ॥
केवलिपदकमलद्वय पूजिति वन्दून योग्य भूमिवरी।
धर्मश्रवणेच्छेनें बसती जो धर्म या भवांत तरी ॥ ५९ ॥

---

१ दोनशे योजन प्रमाणाचा पृथ्वीप्रदेश– आठशें कोसाचा पृथ्वीप्रदेश. २ वाऱ्यांत. ३ आनन्द देण्याचा स्वभाव. ४ या नांवाच्या बगीचांत. ५ भव्यलोकांचा पापसमूह. ६ अतिशय आनंदित. ७ भवनवासीदेव, व्यंतर, ज्योतिष्क व स्वर्गदेव याचे क्रमानें दहा, आठ, पांच व सोळा असे भेद आहेत. ८ कुंभकर्ण.

केवलिमुखचन्द्रांतुनि धर्मसुधावृष्टि सुखद जी झाली ।
भवमोहग्रीष्माचीं दुःखें संपूर्णशीं लया गेलीं ॥ ६० ॥

[ जीव पाप करून नरकांत उत्पन्न होऊन दुःखें भोगतात. ]

सुरनरनारकपशु या दुःखद संसारिं चार गति असती ।
चक्रासमान ज्यावरि होउनि आरूढ जीव नित फिरती ॥ ६१ ॥
ज्ञानावरणादिकशा कर्मांच्या अष्टबन्धनें बद्ध ।
शुभ अशुभ कर्म करिती या भवकारागृहांत हे रुद्ध ॥ ६२ ॥
रौद्रार्तध्यानांनीं मति ज्यांची मोहयुक्त होऊन ।
करिती हिंसा, वदती असत्य, चोरींत राहती निपुण ॥ ६३ ॥
परललनासम्भोगीं आतुर होऊन तीव्रलोभानें ।
धनधान्यादि-परिग्रहिं होती आसक्त विपुललाभानें ॥ ६४ ॥
वहुपापसञ्चयानें पडून शिरिं मृत्युवज्र[१] नरकांत ।
रत्नप्रभादिकामधिं जाती दुःखा न येतसे अन्त ॥ ६५ ॥
रत्नप्रभाख्य पहिली दुजी तिचें शर्कराप्रभा नाम ।
ती वालुकाप्रभा गण चौथी पङ्कप्रभा असुखधाम ॥ ६६ ॥
धूमप्रभा नि पञ्चम तमःप्रभा साहवी नि सप्तम जी ।
वदति प्रभामहातम[२] तिजला या सर्वदा असुखराजी ॥ ६७ ॥
या सर्व नरकपृथिवीमध्यें गाढान्धकार करि वास ।
दुर्गन्ध तीव्र असतो दुःस्पर्श असह्य वदति विद्वांस ॥ ६८ ॥
नरकांतिल पृथ्वी जी अतिशय-सन्तप्त-लोहसम भासे ।
तेथील नारक्यांचा समूह दुःखीं सदैव चूर वसे ॥ ६९ ॥
वहुसागरोपमायुष दुःखांतचि जातसे सदा त्यांचें ।
एक क्षणहि सुखाचा नच त्यांचें पाप शैलसम[३] साचें ॥ ७० ॥

[ कोणते जीव देवगतींत जन्म घेतात ? ]

जाणुनि अतिशय नारकदुःखा बुध पापदूर होतात ।
दानतपोजिनपूजन-कार्यांतचि सतत ठेविती चित्त ॥ ७१ ॥
ते स्वर्गीं सुर होती महर्द्धिधारी जिनेन्द्रपदभक्त ।
सुन्दर-सुराङ्गनासह सुख भोगिति दीर्घकाल अनुरक्त ॥ ७२ ॥

[ मनुष्यजन्माचीं व पशुजन्माचीं कारणें. ]

---

१ मृत्युरूपी वज्रदण्ड. २ महातमःप्रभा. ३ पर्वतासारखें मोठें.

व्रत नियम ज्या न असती स्वभाव ऋजुता[1] नि विनय जे धरिती ।
त्यांना नरजन्म मिळे मायेनें हो पशुत्वसंप्राप्ति ॥ ७३ ॥

[ धर्माचरण न करणारे मानव दीर्घसंसारी होतात. ]

देवगतीहुनि होउनि जे च्युत नरजन्म येथ मेळविति ।
जरि धर्मा नाचरिती भवभ्रमा त्यांचिया उरे न मिति ॥ ७४ ॥

[ धर्माचरणानें स्वर्ग व मोक्ष मिळतो. ]

धर्मीं स्थिर जे असती ज्यांना जिनवचन सर्वदा रुचतें ।
शीलतपःसम्यक्त्वीं संयमिं ज्यांचें सदैव मन रमतें ॥ ७५ ॥
रत्नत्रयास उत्तम मिळवुनि कर्माष्टकांस[2] नाशिति ते ।
मुक्तिसुखामधिं रमती अनन्तता ज्यांत सर्वदा असतें ॥ ७६ ॥
कांहीं स्वर्गसुखाचा घेउनि उपभोग मनुजलोकांत ।
वैभव-भोग-विशालश्रीचे पति बनुनि मान्य होतात ॥ ७७ ॥
पुनरपि राज्या त्यागुनि निर्ग्रन्थमुनीन्द्र बनुनि तप घोर ।
करिती सद्ध्यानानें केवलबोधास पावती प्रवर[3] ॥ ७८ ॥
आयुष्य-क्षयकालीं सगळ्या कर्में प्रमुक्त होऊन ।
आरोहण लोकान्तीं करिती होतात सिद्धिसुख मग्न ॥ ७९ ॥
मुक्तिसुख हेंचि आत्मस्वभाव आहे अनन्त शिव अजर[4] ।
अक्षय बाधाविरहित शुद्धात्म्याचें असेंचि हें सार ॥ ८० ॥
धर्मोपदेश यापरि ऐकुनि रामादिकास हो मोद ।
इन्द्रजित मेघवाहन निजपूर्वभवा विचारिती सुखद ॥ ८१ ॥

[ अप्रमेयबल केवलींनीं इन्द्रजित व मेघनादाचे पूर्वभव याप्रमाणें सांगितले— ]

बल अप्रमेय ज्यांचें नांवहि अन्वर्थ अप्रमेयबल ।
कथु लागले सुभव्यहि ऐकाया चित्त करिति निर्लोल[5] ॥ ८२ ॥

[ प्रथम व पश्चिम या दोन भावांनीं क्षुल्लक दीक्षा घेतली. ]

कौशाम्बी नगरीमधिं भाऊ दोघे सदा धनाभाव[6] ।
होता ज्यांच्या जवळीं परि जिनधर्मांत ठेविती भाव ॥ ८३ ॥
पहिल्याचें ' प्रथम ' असे ' पश्चिम ' हें नांव तेवि दुसऱ्याचें ।
अन्वर्थ नामधारी अनुरूप अशाच हे विचाराचे ॥ ८४ ॥

---

१ कपटरहित स्वभाव. २ ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय, मोहनीय, आयु, नाम, गोत्र व अन्तराय. ३ श्रेष्ठ. ४ जरारहित. ५ निश्चल. ६ दारिद्य.

कोणे एकेवेळीं आले भवदत्त नाम सूरिवर ।
त्यांना वन्दन केलें विनयें उभयेंहि जोडुनि स्वकर ॥ ८५ ॥
धर्मस्वरूप त्यांनीं सूरि-मुखांतून ऐकिलें विनयें ।
क्षुल्लक[1]दीक्षा धारण केली तत्सूरिचरणिं तैं उभयें ॥ ८६ ॥
भवदत्तसूरिदर्शन घ्याया तन्नगरपति तिथें आला ।
करुनि उपेक्षा त्याचीं सूरिवरें हृदयिं तो न आदरिला ॥ ८७ ॥
मिथ्यादर्शन याचें अनुपाय असे न नाश पावेल ।
जाणुनि सूरिवरें हें आदरिला तो न हेतु हा मूल ॥ ८८ ॥
त्या नगरीचा श्रेष्ठी आला श्रीमज्जिनेन्द्रपदभक्त ।
विभवें भूपासम जो रूपानें पूर्णचन्द्रसम कान्त ॥ ८९ ॥

[ पश्चिम नामक क्षुल्लक निदानानें मरून नन्दिश्रेष्ठीचा पुत्र झाला.
राजा होऊन राज्य करू लागला. ]

केला सूरिवरानें आदर त्याचा बघून पश्चिम तो ।
श्रीनन्दिश्रेष्ठीचा व्हावें मी पुत्र भावना वरितो ॥ ९० ॥
धर्माचरण करी तो व्हावें तत्पुत्र याच भावानें ।
उपदेशानें देखिल निदानभावा न सोडिलें त्यानें ॥ ९१ ॥
अनिवृत्तचित्त होउनि पावे तो मरण त्याच भावानें ।
करिती निदान[2] जे नर होती ते ग्रस्त विषयलोभानें ॥ ९२ ॥
तो नन्दिश्रेष्ठीच्या इन्दुमुखी-मुख्य-धर्मपत्नींत ।
झाला सुपुत्र सद्गुण जणु तद्रूपेंचि जन्मले तींत ॥ ९३ ॥
गर्भी जेव्हां होता भूपांच्या तेधवा प्रदेशांत ।
तटपतनादिक चिह्नें होतां नृपचित्त खिन्न हो त्वरित ॥ ९४ ॥
या विविध-निमित्तांनीं उग्रमहापुरुषजन्म होईल ।
जाणुनि जन्मापासुनि तदादरीं सज्ज होति नृप सकल ॥ ९५ ॥
सर्वजनांच्या हृदयीं वाढविली रति म्हणून त्या नांव ।
रतिवर्धन जनकानें दिलें जयामधिं यथार्थसा भाव ॥ ९६ ॥
झाला मोठा राजा झाले राजे अनेक नम्र तया ।
वैभव विपुल मिळालें कौशाम्बीनृपहि नम्र होय जया ॥ ९७ ॥

---

१ उद्दिष्टाहारत्यागप्रतिमा धारण केली. २ मी, इन्द्र, राजा वगैरे व्हावें अशा भावनेनें केलेलें जें तप तें निदान होय.

रतिवर्धन नृप झाला स्वैराचारी गुरुस अवमानी ।
सुखमग्न सतत होउनि आगमवचना न येउ दे कानीं ।। ९८ ।।

[ प्रथम नामक क्षुल्लक स्वर्गांत जन्मला. ]

इकडे वडील भाऊ धर्माचरणांत मग्न राहून ।
मेला समाधिमरणें त्याचें स्वर्गांत जाहलें जनन ।। ९९ ।।

[ रतिवर्धनराजाचें रूप धारण करून त्या रतिवर्धनाला हाकालून दिलें. नंतर रतिवर्धनाला उपदेश दिला. तो ऐकून त्यानें मुनिपद धारण केलें व तो स्वर्गांत देव झाला. ]

पूर्वी लघुबन्धूनें प्रतिबोधायास विनविलें होतें ।
राजासमीप आला सुर धरुनि क्षुल्लकस्वरूपातें ।। १०० ।।
राजगृहीं तो जातां दिलें हकालून रक्षकें दूर ।
रतिवर्धनराजाच्या रूपानें प्रकट जाहला अमर ।। १०१ ।।
कृत्रिम त्या राजानें अकृत्रिमा त्या दिलें हकालून ।
वदला तयास तो सुर आतां तुज वाटतें समाधान ? ।। १०२ ।।
पूर्वी क्षुल्लक राहुनि निदानदोषें नृपाल झालास ।
उपदेशाची आली वेला ध्यानांत घेइ सविशेष ।। १०३ ।।
उपदेशश्रवणानें रतिवर्धन देवगुरुशास्त्रास ।
मानी श्रद्धा ठेवी सम्यक्त्वी तो मनांत धरि तोष ।। १०४ ।।
नन्द्यादिक राजेही झाले सम्यक्त्ववन्त गुणकोष ।
सम्यक्त्वी जीवाचा निजस्वरूपांत होय रहिवास ।। १०५ ।।
राजा दीक्षा घेउनि अट्ठाविसमूल[1] धारणा करुन ।
कांहीं दिन गेल्यावरि समाधि साधून पावला मरण ।। १०६ ।।
प्रथमस्वर्गी त्याला झालें सम्प्राप्त अमरपद जाण ।
दिव्यसुखें भोगुनि तो पूजी सन्तत जिनेन्द्र वर-चरण ।। १०७ ।।

[ स्वर्गच्युत होऊन ते दोघे देव उर्व व अर्वस राजपुत्र झाले मुनि होऊन स्वर्गी देव झाले. यानंतर ते इन्द्रजित व मेघवाहन झाले. ]

---

१ दि. जैनमुनीचे मूलगुण अट्ठावीस. अहिंसादि पांच महाव्रतें, पांच समिति, पांच इन्द्रियनिरोध, सामायिकादि सहा आवश्यकें. लोच, नग्नता, स्नान न करणें, जमिनीवर झोपणें, दांत न घासणें. उभें राहून जेवणें व एकदा जेवणें.

तेथून च्युत होउनि विजयपुरीं राजपुत्र ते झाले ।
उर्व नि अर्वस नामें उभयहि इन्द्रियसुखांत वहु रमले ॥ १०८ ॥
पुनरपि विरक्त होउनि महाव्रती वनुन मरण साधून ।
स्वर्गांत देव झाले करिती जेथें सदा सुधापान ॥ १०९ ॥
आयुःसमाप्ति होतां झाले लंकेन्द्रपुत्र गुणखाण ।
इन्द्रजित मेघवाहन कथिले हें सर्व पूर्वभव-कथन ॥ ११० ॥

[ इन्दुमुखी ही मन्दोदरी झाली. ]

श्रीनन्दिश्रेष्ठीची इन्दुमखी नाम धर्मपत्नी जी ।
वहुभव फिरून झाली मयखगकन्या मळे न पापरजीं ॥ १११ ॥
मन्दोदरी दशाननभार्या स्नेहाकुला भवन्माता ।
ऐशी पूर्वभवाची जाणावी सुजनहो विचित्रकथा ॥ ११२ ॥

[ इन्द्रजित, मेघवाहन, कुम्भकर्ण, मारीच हे मुनि झाले. ]

यापरि पूर्वभवांचें वर्णन ऐकुनि विरक्त होऊन ।
जिनदीक्षा उभयांनीं घेउनि केलें तपीं सदा रमण ॥ ११३ ॥
श्रीकुम्भकर्ण आणिक मारीचहि भवविरक्त होऊन ।
सोडुनि कषायभावा करिती सुतपोरमेंत ते रमण ॥ ११४ ॥
तृणसम खेचरविभवा[1] त्यागून सुधर्मलीन होऊन ।
नानर्द्धियुक्त करिती विहार भूवरि तपें न जे खिन्न ॥ ११५ ॥

[ शशिकान्ता आर्येनें केलेला उपदेश ऐकून मन्दोदरी विरक्त झाली व तिनें आणि तिच्यासह अट्ठेचाळीस हजार स्त्रियांनीं शशिकान्ताआर्यिकेजवळ दीक्षा घेऊन तपश्चरण केलें. ]

पति-पुत्रविरहदुःखें झुरे जिचें मन सदैव सन्तप्त ।
मन्दोदरी सती ती झाली मूर्च्छित पडे शुचाक्रान्त ॥ ११६ ॥
होऊन पुनः सावध शोक करी कुररकामिनीसम ती ।
हा पुत्रा इन्द्रजिता तूंही सोडून जासि कां अन्तीं ॥ ११७ ॥
हे मेघवाहना वा सत्पुत्रा सोडिलेस जननीस ।
या दीन जाहलेल्या व्यर्थचि माझ्यावरी कसा रोष ॥ ११८ ॥
मी उग्रदुःखतप्ता बाळांनो कां उपेक्षिलें मजला ।
श्रीजिनदीक्षा घेउनि विहार कोठें बरें तुम्ही केला ॥ ११९ ॥

---

१ विद्याधरांचें ऐश्वर्य.

विद्यावैभव सोडुनि देहावरचें ममत्व टाकून ।
कठिण अशा भूमीचा बाळानो ! स्पर्श केवि हो सहन ॥ १२० ॥
ताता उत्तमभोगा आपण तत्काल सकल सोडून ।
कन्यास्नेहालाही करीत आहा कसें तपश्चरण ॥ १२१ ॥
बाप नि नवरा मुलगा करिती स्त्रीरक्षणास हे तीन ।
त्यजिलें मज सर्वांनीं जाऊ कोणास मी वदा शरण ॥ १२२ ॥
मी पुण्यहीन झालें झाला मजला वियोग सकलांचा ।
मन्दोदरी स्मरुन हें रडे करी शोक दीनवाणीचा ॥ १२३ ॥
शशिकान्ताआर्येनें केला उपदेश शोकहरणाचा ।
मूढे ! रडू नको गे उपाय हा नच भवाब्धितरणाचा ॥ १२४ ॥
पशुमानवांत झाले जन्म तुझे गे असंख्यदा मंदे ।
अगणितवेळां केला शोक तुवा सर्व तुजशि तापचि दे ॥ १२५ ॥
हा शोक भवीं फिरवी नसेचि हा मोक्षमार्ग तूं जाण ।
हो शोकविरत सत्वर घे संयम तोच करिल कल्याण ॥ १२६ ॥
ऐकुनि उपदेशाचीं वचनें भवभीति वाटली तिजला ।
सोडुनि गृहस्थवेषा स्वीकारी आर्यिकापदा विमला ॥ १२७ ॥
शुक्लैकवस्त्र नेसुनि विशुद्ध-धर्मव्रतास ती पाळी ।
शशिकान्तार्यासंनिध राहुनि पापव्रजास ती जाळी ॥ १२८ ॥
निर्मल मानस ज्यांचें अठ्ठेचाळिस हजार नारींनीं ।
आर्याव्रतास घेउनि पाळियलें तें विशुद्ध रातदिनीं ॥ १२९ ॥
मुनिसुव्रतजिनतीर्थीं आर्या आणिक मुनीश बहु झाले ।
या सर्वांना वन्दन करिती जिनदास तत्पदीं रमले ॥ १३० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे इन्द्रजितादिनिष्क्रमणाभिधानं नाम अष्टसप्ततितमं पर्व ॥ ७८ ॥

# एकोणऐंशीच्या पर्वांतील कथासारांश.

लंकेत राम-लक्ष्मणांचा जेव्हां प्रवेश झाला तेव्हां त्यांचें वैभव पाहून जनतेला आश्चर्य वाटलें. मिरवणुकींत अनेक वाद्यें वाजत होतीं. हत्ती, घोडे, रथ व पायदळ यांचा आवाजही त्यांत मिसळला होता. बलभद्र रामचन्द्र व नारायण लक्ष्मण हे इन्द्रासारखे दिसत होते व विद्याधरसमूह देवगणाप्रमाणें वाटत होता. राम-लक्ष्मणाचें वैभव पाहून त्यांना पूर्वभवार्जित धर्माचें फल मिळालें असें जनता म्हणत होती. ही मिरवणूक प्रासादाच्या खिडक्यांतून स्त्रिया पाहत होत्या. त्यांचीं तोंडें कमलाप्रमाणें, त्यांचे डोळे भुंग्याप्रमाणें व त्यांचें स्तुतिपर भाषण गुंजारव किंवा वीणेच्या झंकारासारखें वाटत होतें.

अग मैत्रिणी, हा राम दशरथ राजाचा पुत्र आहे. अतिशय सुन्दर आहे. जिला हा सुपति लाभला आहे तिनें पूर्वजन्मीं आर्यिकेचें व्रत आचरणांत आणिलें असेल. याच्या पत्नीचें नांव सीता ती जनकराजाची कन्या. रावणानें हिचें हरण करून आणिलें. दुर्जय अशा रावणाला चक्ररत्नानें ठार मारून लक्ष्मणानें भावावरचें मोठें संकट दूर केलें व रामचन्द्राबरोबर पुनः तिचा संयोग झाला.

लक्ष्मण इन्द्रनीलवर्णाचा व राम शुभ्रकान्तीचा. या दोन कांति मिसळून प्रयागतीर्थाची शोभा उत्पन्न झाली.

सुग्रीव हा किष्किन्धानगरीचा राजा. राम व सुग्रीव यांच्यामध्यें दाट मैत्री आहे.

हा भामण्डल सीतेचा भाऊ. कोणी देवानें हरण करून याला चन्द्रगतीच्या सौधावर सोडलें. चन्द्रगति विद्याधरानें याला घेऊन सांभाळ केला व त्याला विद्याधरपद दिलें.

अंगद हा सुग्रीवाचा उद्धट व पराक्रमी पुत्र. यानें रावणाच्या विद्यासाधनांत पुष्कळ विघ्न आणिलें होतें.

हा मारुति. याच्या रथाला चार मोठे हत्ती जोडले आहेत. याचें रामचन्द्राला फार मोठें साहाय्य मिळालें.

हा विराधित. याचें लक्ष्मणावर अत्यंत प्रेम. लक्ष्मणाच्या कृपेनें याला पुनः राज्यप्राप्ति झाली. अशारीतीनें मैत्रिणी ती मिरवणूक पाहून एकमेकींना माहिती सांगत होत्या.

रामचन्द्रांनीं पुष्पप्रकीर्णक उद्यानाजवळ येऊन एका दासीला सीता कोठें आहे असें विचारलें. या बगीचांत एक छोटासा पर्वत झऱ्यांनीं शोभत आहे. त्यांचे तुषार उडत असल्यामुळें तो हंसत आहे असें वाटतें. अशा पर्वतावरील सौधांत सीता आहे. हें दासीवचन ऐकून तिकडे रामचन्द्र निघाले. मैत्रिणींनीं रामचन्द्र येत आहेत अशी सूचना सीतेला दिली. तिला अतिशय आनन्द झाला. ज्याच्या कानांत रत्नकुण्डलें चन्द्रसूर्याप्रमाणें चमकत आहेत व शुक्रबृहस्पतिप्रमाणें तीं कुण्डलें तुझ्या शीलव्रताची निर्मलता जणु रामचन्द्राच्या कांतीं प्रभेच्या मिषानें सांगत आहेत. त्यांच्या मस्तकावर शुभ्रच्छत्र चन्द्राप्रमाणें शोभत आहे. असे वर्णन मैत्रिणी करीत असतां रामचन्द्र हत्तीवरून उतरून तिच्यापुढें येऊन उभे राहिले. अत्यादरानें सीता उठून उभी राहिली. पतीचें दर्शन होतांच तिचें मुख उज्ज्वल दिसू लागलें. स्वाभाविक कृश असलेली सीता विरहानें अधिकच कृश झाली होती. पण रामचन्द्रांना पाहिल्या-बरोबर हर्षामुळें तिचा कृशपणा नाहींसा झाला. सर्वाङ्गांत अपूर्व सौन्दर्य चमकू लागलें. ती रामचन्द्राजवळ आली. तिच्या नेत्रांतून आनन्दाचे अश्रु वाहू लागले. रामचंद्रांनीं आपल्या दोन बाहूंनीं तिला दृढ आलिंगिलें. दोघांच्या अंगीं हर्षानें रोमांच उद्भवले. हा सीता-रामसमागम देवांना फार आवडला. त्यांनीं कल्पवृक्षाच्या फुलांची आकाशांतून त्यांच्यावर वृष्टि केली व त्यांच्यावर गन्धोदक शिंपडलें. सीतेच्या शीलांत तिळाएवढेंही दूषण नाहीं असें म्हणून तिच्या शीलाची त्यांनीं स्तुति केली. रावणानें अनेक उपसर्ग केले पण मनानेंहि सीतेनें त्याला इच्छिलें नाहीं अशी देवस्तुति ऐकून सर्व आनंदित झाले.

लक्ष्मणानें सीतेच्या चरणांना वंदन केलें व नम्र होऊन हात जोडून तो उभा राहिला. इन्द्राप्रमाणें सुन्दर व चक्रिपदधारक लक्ष्मणास पाहून मातेप्रमाणें सीतेला आनन्द झाला. ज्ञानीमुनीश्वरांनीं लक्ष्मण नारायणपदधारक होईल असें सांगितलें होतें. तें त्यांचें वचन मिथ्या कसें होईल असें सीता म्हणाली.

इतक्यांत तिचा भाऊ भामण्डलही तेथें आला. त्याला पाहून सीतेच्या मनाला आनन्द वाटला. सुग्रीव, मारुति, नल, नील, विराधित, अङ्गद वगैरे विद्याधरांनीं आपलें नांव सांगून सीतेच्या चरणांना नमस्कार केला. तिला त्यांनीं नानाप्रकारचे वस्त्रालंकार, लेपनहारादिक अर्पण केले. "देवि, आपण शीलादिसद्गुण-रत्नांचा करंडा आहात. आपला देह पवित्र व जयलक्ष्मीचें स्थान आहे. आपली आमच्यावर कृपा असो" असें ते म्हणाले. जे भव्य आहेत त्या जिनदासांचा मोह सदा गळो.

# एकोणऐंशीवें पर्व.

( लंकेंत राम-लक्ष्मणांचा प्रवेश. त्यांना पाहून स्त्रीपुरुषांचे प्रशंसनीय उद्गार. ]

लङ्केंत राम-लक्ष्मण यांचा झाला प्रवेश थाटांत ।
वैभव त्यांचें पाहुनि जनता झाली सुविस्मयाक्रान्त ॥ १ ॥
वाद्यें वाजत होतीं शङ्खस्वन[1] त्यास देतसे साथ ।
घोडे, विमान, हत्ती, रथादिकांचाहि शब्द हो त्यांत ॥ २ ॥
इन्द्रासमान दिसती बलनारायण जनास खगवृन्द ।
देवासमान भासे प्रवेश लङ्केंत होय सानन्द ॥ ३ ॥
पाहुनि जनता हृदया झाला आनन्द मानि धर्मफल ।
हें राम-लक्ष्मणांचें वैभव पाप्यास केंवि अनुकूल ॥ ४ ॥
लङ्केच्या राजपथीं रामासह लक्ष्मण प्रवेश करी ।
त्यांना बघण्यासाठीं उत्सुकता जनमुखीं विहार वरी ॥ ५ ॥
खिडक्या प्रासादांच्या सुन्दर नारीमुखाम्बुजें दिसतीं ।
तन्नेत्रपङ्क्ति निश्चल भृङ्गांची कान्ति तेधवा धरिती ॥ ६ ॥
भाषण मधुर तयांचें भृङ्गांच्या गुञ्जनासमान गमे ।
वीणाझङ्कारासम सुजनमनोवृत्ति त्यांत नित्य रमे ॥ ७ ॥
सखि ! बघ राम असे हा राजा दशरथसुपुत्र हा आहे ।
उत्तम राज्यश्रीनें शोभे जणु रत्नराशिवत् पाहे ॥ ८ ॥
पूर्ण अशा चन्द्रासम शोभे हा कमलदीर्घनेत्राचा ।
उत्तम शुभकर्मानें जन्मे स्तुतिपात्र सुन्दराकृतिचा ॥ ९ ॥
लाभे जिला सुपति हा कन्या ती धन्य या त्रिलोकांत ।
कीर्तिस्तम्भ तिनें जणु रोवियला आपुल्या स्वरूपांत ॥ १० ॥
उत्तम आर्या-धर्मा जन्मान्तरिं दीर्घकाल आचरुन ।
ऐशा नाथा मिळवी ती शुभनारी असें मनीं जाण ॥ ११ ॥
जी स्वर्गच्युत होउनि जनकाची जाहली सुता सीता ।
इन्द्राला शचि जैसें पति रामा रमवि निर्मलस्वान्ता[2] ॥ १२ ॥

---

१ शंखांचा ध्वनि. २ निर्मल अन्तःकरणाची.

असुरेन्द्रासम दुर्जय रावण मारून रणधुमाळींत ।
वश चक्ररत्न केलें लक्ष्मण हा जाण चक्रिपङ्क्तींत[1] ॥ १३ ॥
अञ्जनसमकान्तीचा लक्ष्मण हा राम शुभ्रशोभेचा ।
मिसळून कान्ति दोन्ही सङ्गम हा हो प्रयागतीर्थाचा ॥ १४ ॥
चन्द्रोदरखगपतिचा पुत्र विराधित सुभक्त हा हरिचा ।
लक्ष्मणसाहायक हा युद्धीं पति जाहला असे श्रीचा ॥ १५ ॥
किष्किन्धपुरेश्वर हा राजा सुग्रीव सत्त्वगुणवन्त ।
श्रीरामानें केली प्रेमाची स्थापना परा ज्यांत ॥ १६ ॥
हा भामण्डल पण्डित खेचरपद इन्दुनें[2] जयास दिलें ।
सीताभ्राता रामस्नेहाचें स्थान हा असे पहिलें ॥ १७ ॥
अङ्गदकुमार आहे सखि हा उद्भट पराक्रमी वीर ।
यानें केलें होतें रक्षोनाथास[3] विघ्न भरपूर ॥ १८ ॥
वातप्रेरित मेघासमान करितात गर्जना थोर ।
ऐसे हत्ती ज्याच्या रथास सखि जोडिले पहा चार ॥ १९ ॥
समराङ्गणांत ज्याचा बघुनि कपिध्वज विपक्ष[4] थरथरती ।
ऐसा मारुतसुत हा सुन्दर ज्या बघुनि होय चित्ति रति ॥ २० ॥
यापरि सुन्दरवचनें पूजितरामादि राजमार्गांत[5] ।
करिती प्रवेश विक्रमशाली यन्मन वसे प्रमोदांत ॥ २१ ॥
( रामचन्द्रांनीं सीता कोठें आहे असें विचारलें तेव्हां दासी उत्तर देते. )
प्रेमरसानें ओलें ज्याचें मानस असा वदे राम ।
दासीस कुठें सीता जी आहे रतिसमान अभिराम[5] ॥ २२ ॥
जी माझ्या विरहानें अतिशय दुःखास जाहली प्राप्त ।
भामण्डलस्वसा[6] ती कोठें आहे वदा मला त्वरित ॥ २३ ॥
मणिकङ्कणप्रभांनीं बाहु जिचे चमकती अशी दासी ।
राममना तोषाया वदली ती वाक्यपंक्ति सुन्दरशी ॥ २४ ॥
जो निर्झरोदकांनीं[7] जणु फेकी विपुल अट्टहासास ।
गिरिवरि शोभे उपवन करी सुगन्धित सदा दिशास्यांस[8] ॥ २५ ॥

---

१ चक्रवर्तीच्या पङ्क्तींत— नारायणांच्या पंक्तींत. आठवा नारायण. २ चन्द्रगति विद्याधरानें. ३ रावणाला. ४ शत्रु. ५ सुंदर. ६ बहीण. ७ झऱ्यांच्या पाण्यांनीं. ८ दिशांच्या तोंडाला.

पुष्पप्रकीर्ण ज्याचें नांव असे नन्दनासमान दिसे ।
तत्र कीर्तिशीलपरिवृत-सीतारमणी प्रभो ! तिथेंचि वसे ॥ २६ ॥

( सीतेच्या मैत्रिणींनीं रामचंद्र तुझ्याकडे येत आहेत असें सांगितलें. )

इकडे सीतेसन्निध वसलेल्या मैत्रिणी तिला वदती ।
अङ्गुलिनिर्देशानें स्वामिनि ! घ्या वचन आमुचें चित्तीं ॥ २७ ॥
अत्यन्तशुभ्र ज्याचें जणु धरिलें पूर्णचन्द्रविम्ब शिरीं ।
छत्र जयाचें शोभे तेणें जो द्विगुणकान्ति वदनिं वरी ॥ २८ ॥
कानीं कुण्डल-जोडी चन्द्रादित्यासमान जी खुलते ।
शुक्रबृहस्पतिजोडी तव शीलव्रत तयास जणु कथिते ॥ २९ ॥
कण्ठांत हार शोभे नक्षत्रांचा समूह सेवाया ।
आला भ्रान्तीनें जणु जाणुनि मनिं पूर्णचन्द्र या राया ॥ ३० ॥
खेद मुखावरि ज्याच्या तुझ्या वियोगें दिसे असा राम ।
येत असे भेटाया होउनि कृतकृत्य आज अभिराम ॥ ३१ ॥
बहुदिवसांनीं मजला पडलें सुस्वप्न आज जणु मानी ।
पतिमुखकमला पाहुनि सीता अत्यन्त हृष्ट हो वदनीं ॥ ३२ ॥
हत्तीवरून उतरुन गेला श्रीराम जानकीजवळ ।
आनन्दित बहु होउनि चन्द्र जसा रोहिणीकडे सकल ॥ ३३ ॥

( राम व सीतेची भेट. लक्ष्मण तिला वन्दन करितो. )

श्रीराम नाथ येतां सीता हर्षें उठून राहि उभी ।
उद्भवला मनिं आदर राहि न संकोच तेधवा नच भी[1] ॥ ३४ ॥
भूमिरजानें[2] धूसर केश जिचे मलिन देह होय जिचा ।
लालपणा ओठाचा फिकटसा[3] जाहला जिच्या साचा ॥ ३५ ॥
स्वाभाविककृशदेहा विरहानें जाहली विशेषकृश ।
परि पतिदर्शन होतां गेला जणु कृशपणाचि निःशेष ॥ ३६ ॥
हातांच्या बोटांचा लालपणा जाहला तिच्या प्रगट ।
बाहेर येइ निर्मलनेत्रांतुनि शुभ्र तेज तें स्पष्ट ॥ ३७ ॥
सौन्दर्यसम्पदेचें विशिष्टसें स्थान शीघ्र ती बनली ।
स्निग्ध श्रीरामाची दृष्टि तिच्यावरि सुनिश्चला खिळली ॥ ३८ ॥

१ भय. २ जमीनीच्या धूळीनें. ३ मळकट.

श्रीजानकी निकट बहु आली श्रीराम बघुनि तें तिजला ।
ज्याचें वर्णन शक्य न अपूर्वभावास तो असा गेला ॥ ३९ ॥
सीतेच्या नेत्रामधि तत्समयीं अश्रु येति हर्षाचे ।
आली पतिसन्निध ती फुटति मुखांतून शब्द नच साचे ॥ ४० ॥
इन्द्राला शचि भेटे मदनाला भेटली जशी रति ती ।
जिनधर्मास अहिंसा सीता रामास भेटली सुदंती[1] ॥ ४१ ॥
दीर्घवियोगानन्तर झाली मज आज भेट सीतेची ।
नवसंगती तियेची शतसंकल्पें घडे सुसौख्याची ॥ ४२ ॥
दृढ बाहूंनीं रामें सीता आलिङ्गिली महास्नेहें ।
कल्पलता सुरतरुनें भरतें स्त्रीरत्न शोभली पाहे ॥ ४३ ॥
अङ्गावरि उभयांच्या हर्षें रोमाञ्च गाढ उद्भवले ।
चिरदुःखमुक्त होउनि उभयहि सुखसागरांत जणु बुडले ॥ ४४ ॥
सीता-राम-समागम सकल सुरांनाहि मधुरसा गमला ।
आकाशांतुनि त्यांनीं उभयावरि पुष्पवृन्द वर्षियला ॥ ४५ ॥
भृङ्गे सुगन्धलोभें गुञ्जारव करित घेरिती ज्यास ।
गन्धोदक शिंपडलें अमरगणें मनिं धरून उल्हास ॥ ४६ ॥
मेघांच्या पाठीवर बसून हृदयीं प्रसन्न होऊन ।
वदले स्तुति सीतेची सुरगण झाले प्रहृष्ट जीवगण ॥ ४७ ॥
निर्मलचित्ता सीता धैर्य तिचें ज्या अपूर्व उपमा न ।
गाम्भीर्य नैव ढळलें सुन्दरशीलांत दोषलेशहि न ॥ ४८ ॥
व्रत निष्कम्प खरोखर झाली उत्तीर्ण सत्त्वसुगुणांत ।
इच्छा न रावणाची मनेंहि केली जरी वधे अन्त ॥ ४९ ॥
अत्यन्त आदरानें लक्ष्मण सीतापदास वन्दून ।
होऊन नम्र विनयें राहि उभा हस्तयुगल जोडून ॥ ५० ॥
इन्द्रासमान सुन्दर चक्रधरा लक्ष्मणास पाहून ।
मातेसम सीतेचे झाले मोदाश्रुपूर्णसे नयन ॥ ५१ ॥
ज्ञान विशाल जयांचें मुनीश्वरें प्राप्त सुपद होईल ।
श्रीलक्ष्मणास कथिलें जें त्यांचें वचन जाहलें सफल ॥ ५२ ॥

---

१ सुन्दर दात जिचे आहेत अशी.

चक्रधराचें तुज पद झालें संप्राप्त मोद मज वाटे ।
निर्ग्रन्थाचें सुवचन कदापि जातें न अन्यशा वाटें ॥ ५३ ॥
वत्सा ! ज्येष्ठभ्राता बलदेवपदास जाहला प्राप्त ।
विरहाग्नितप्त माझ्यावरि करुणा दाविली जयें प्रगट ॥ ५४ ॥
श्रीभामण्डलमण्डित आला भगिनीसमीप त्या समयीं ।
पाहुनि त्याला सीता अतिशय सानन्द जाहली हृदयीं ॥ ५५ ॥
सुग्रीव, वायुसुत, नल, विराधिताङ्गद नि नील, चन्द्राभ ।
जाम्बव, सुषेण आदिक नाम निवेदून वन्दितात शुभ ॥ ५६ ॥
वस्त्राभरणें सुन्दर लेपन हारादि विविधपुष्पांचे ।
सीताचरणीं अर्पण करिती खेचर महादरें साचे ॥ ५७ ॥
वदले खेचरपति ते प्रभाव तव देवि गे प्रसिद्ध असे ।
विपुलश्री गुणसम्पत् प्रेमें ठायीं तुझ्याच सतत वसे ॥ ५८ ॥
शीलादिकरत्नांचा तूंच करण्डक असें वदति देव ।
मङ्गल तव देह असे जयलक्ष्मीचा तुझ्यावरी भाव ॥ ५९ ॥
सूर्यप्रभा जगामधिं पसरे पसरो तुझा तसा स्नेह ।
अतिशय आम्हावरि गे जिनदासांचा गळो सदा मोह ॥ ६० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सीतासमागमाभिधानं नाम एकोनाशीतितमं पर्व ॥ ७९ ॥

---

१ असत्यमार्गानें.

## ऐंशीव्या पर्वांतील कथेचा सारांश.

रामचंद्रांना पाहिल्याबरोबर सीतेला फार आनंद झाला. यानंतर त्यांनीं सीतेचा हात आपल्या हातांत घेतला व तिला घेऊन ते हत्तीवर चढून बसले. नंतर तेथून ते लक्ष्मणासह रावणाच्या विशाल प्रासादांत आले. बरोबर सुग्रीवादि अनेक विद्याधरही होते. या प्रासादाच्या मध्यभागीं शांतिजिनेंद्राचें सुंदर मंदिर होतें. मंदिराच्यापुढें सुवर्णाच्या हजार खांबांचा सुंदर मण्डप होता.

मंदिरांत येऊन सामायिकविधीनंतर शांतिप्रभूची त्यांनीं याप्रमाणें स्तुति केली. हे प्रभो, आपला जन्म झाला त्यावेळीं जीवमात्रांत शांति उत्पन्न झाली. रोग नाहींसे झाले. लोकांच्या मुखावर प्रसन्नता दिसू लागली. आपल्या जन्मसमयीं इंद्रांचीं आसनें चञ्चल झालीं त्यामुळें आपला जन्म जाणून ते हस्तिनापुरीं आले. व मेरुपर्वतावर आपणास नेऊन तेथें त्यांनीं भक्तिभावानें मोठा स्नानोत्सव केला. हे प्रभो, आपण सुदर्शनचक्रानें बाह्यशत्रूंना जिंकिलें व ध्यानचक्रानें कषायरूपी अंतरंगशत्रूंना जिंकून केवलज्ञानी झालांत. हे प्रभो, हरिहरादिकांना कर्मशत्रूवर असा विजय मिळविता आला नाहीं. प्रभो, आपण हिताचा उपदेश करता म्हणून गुरु आहात व हितकार्यांत साहाय्य करता म्हणून आपण बंधु आहात. आपण प्राप्त करून घेतलेलें मुक्तिस्थान रागद्वेषांनीं रहित, अखंड सुखाचें व नित्य आहे. याप्रमाणें स्तुति करून रामचंद्र, लक्ष्मण व सीता यांनीं प्रदक्षिणा घातल्या व नंतर ते सगळे जिनमंदिराच्या अंगणांत सर्व राजासह बसले. तेथें रावणाचे आजोबा, पिताजी वगैरे संबंधीजन आले होते व त्यांना बिभीषणानें वस्तूंचा अनित्यपणा ध्यानांत घेऊन शोक आपण करूं नका असें सांगितलें. बिभीषण म्हणाला— 'आजोबा व पिताजी, सगळे प्राणी आपल्या कर्मांचें फल अनुभवतात म्हणून त्यांच्याविषयीं शोक करणें व्यर्थ आहे. आपण आपल्या मनाला हितकार्यांत जोडा. जो जन्मला त्याला मरण हें असतेंच. जीवित व मरण हें प्राण्यांचें नेहमी चालत

असतें. जर प्राण्यांना मरण नसतें तर भवांतरीं कोण गेला असता. किंवा अन्य-भवांतून प्राणी आलाही नसता. आत्म्याचें जगणें हें स्थिर नाहीं. जगांत जीव भव घेत फिरत असल्यामुळें अनंत जीवाशीं संबंध येतो व त्यामुळें अमुक जीवच पुत्र, अमुक नातु, अमुक भाऊ असें मानणें शक्य नाहीं. यास्तव शोक सोडून जिनेशांच्या शासनांत आपण आपल्या मनास लावावें म्हणजे शोकापासून होणारें भवभ्रमण नाहींसें होईल असें बोलून वृद्धजनांचा शोक विभीषणानें नाहींसा केला.

यानंतर विभीषणानें घरीं जाऊन त्यानें आपल्या अतिथिसत्कारांत दक्ष असलेल्या विदग्धा नामक राणीला रामचंद्राकडे पाठविलें. तिनें राम, लक्ष्मण व सीता यांच्या चरणांना नमस्कार करून आमचें घर हें आपलेंच आहे असें समजून आपल्या चरणरजानें तें पवित्र करण्याची त्यांना विनंति केली. इतक्यांत विभीषणही तेथें आला व नाथ उठा, आमच्यावर प्रसन्न होऊन आपण घरी यावें म्हणजे आम्ही कृतार्थ होऊ. अशी विनंति केल्यावर सर्व विद्याधर राजासह रामचंद्र, लक्ष्मण, सीता हें त्रिक विभीषणाचें घरीं गेलें. दारामध्यें हजार स्त्रियांनीं या त्रिकाला ओवाळलें. नंतर घरांत प्रवेश केला. रावणाच्या प्रासादाप्रमाणें विभीषणाच्या प्रासादांतही पद्मप्रभ-जिनाचें सुंदर मंदिर होतें. मंदिरांत प्रवेशून रामचंद्रादिकांनीं पद्मप्रभजिनेश्वराला भक्तीनें वंदन केलें. श्रीमारुति आदिक राजे, राम व लक्ष्मणास विचारून स्वस्थानीं गेले.

यानंतर रामचंद्र, लक्ष्मण व सीता यांना विद्याधर स्त्रियांनीं अंगाला सुगंधित उटी लावून स्नान घातलें. पुनः जिनमंदिरांत जाऊन पद्मप्रभजिनास वंदून आल्यानंतर अतिशय मधुर अन्न सेवन करून तें हर्षित झाले. रामचंद्रांना सीतासंयोग झाल्यामुळें त्यादिवशीं अन्न फारच मधुर लागलें. प्रियविरहानें स्वर्गदेखिल प्राण्याला आनंद देऊ शकत नाहीं व प्रियसंयोगानें क्रूरश्वापदांनीं भरलेलें जंगलही नंदन-वनाप्रमाणें वाटू लागतें.

सर्व विद्याधर राजांनाही मधुरान्न, वस्त्रें, अलंकार यांनीं विभीषणानें प्रसन्न केलें. सगळ्या लंकानगरींत प्रजाजन विभीषण व राम, लक्ष्मण, सीता यांचें गुणवर्णन करू लागले. याप्रमाणें त्यांचे आनंदांत दिवस जात होते.

एकेदिवशीं विभीषण सुग्रीवादिकांनीं राम-लक्ष्मणांचा अभिषेक करण्याची इच्छा व्यक्त केली. रामचंद्र म्हणाले— आमच्या पित्यानें— दशरथ महाराजानें भरताचा

राज्याभिषेक केला आहे तो भरत आमचा राजा आहे यास्तव आमचा राज्याभिषेक आपण करूं नये.

बिभीषणादिक म्हणाले— आपल्या राज्याभिषेकाला भरताची संमतिच मिळेल, तो विरोध करणार नाहीं. आपणास बलभद्रपद व नारायणपदाची प्राप्ति झाली असल्यानेंही हा राज्याभिषेक अवश्य केलाच पाहिजे असें बोलून राम-लक्ष्मणांची अनुमति मिळवून मोठ्या विनयानें त्यांचा अभिषेक विद्याधरराजांनीं केला. रामचंद्र, लक्ष्मण व सीता यांचे दिवस सुखांत जाऊं लागले. पूर्वीचें वियोगजन्य दुःख रामचंद्र बिलकुल विसरून गेले. वनवासांत असतांना लक्ष्मणाचा ज्या राजकन्यांशीं विवाह झाला होता त्या सर्व कन्यांना बोलावून आणण्याची आज्ञा त्यानें विराधित विद्याधरराजाला केली. तेव्हां त्यानें प्रथमतः दशांगभोग नगरांत जाऊन वज्रकर्णाला लक्ष्मणाचा लेख दिला. तेव्हां तो वाचून त्याला आनंद झाला व त्यानें आपली 'रूपवती' नामक कन्या मोठ्या थाटानें पाठविली. पृथ्वीपुर-नगराच्या पृथ्वीधर राजाकडे जाऊन त्यालाही लेख दाखविला. त्यानें आपली कन्या वनमाला पाठविली. कूबरनगराच्या बालखिल्य राजानें आपली कन्या कल्याणमाला पाठविली. क्षेमाञ्जलि-नगराच्या जितशत्रु राजानें आपल्या जितपद्मा कन्येला पाठविलें. उज्जयिनी नगरीच्या सिंहोदर राजानेंही आपल्या कन्या पाठविल्या. याप्रमाणें या सर्व कन्यांना घेऊन विराधित राजा लक्ष्मणाकडे गेला. या सर्व कन्यांना लक्ष्मणाला पाहून अत्यानन्द झाला.

ज्यांनीं पूर्वजन्मीं, प्राणिदया, सत्पात्रदान, शीलव्रतपालन केलेलें असतें, ज्यांनीं रात्रिभोजन त्यागिलेलें असतें अशा स्त्रियांना महापदाचे धारक पति प्राप्त होतात. चन्द्रवर्धनाच्या आठ कन्यांचाही लक्ष्मणाशीं विवाह झाला होता त्याही लक्ष्मणाला प्राप्त झाल्या. याप्रमाणें लंकानगरींत राम-लक्ष्मणांचीं सहा वर्षें अत्यानंदांत व्यतीत झालीं.

इंद्रजित् व मेघवाहन यांनीं दीक्षा घेऊन घोर तप केलें व त्यांना घाति-कर्मक्षयानें केवलज्ञान झालें. त्यांनीं पुष्कळ वर्षें विहार केला व विंध्यारण्यांत ते दोघे कर्ममुक्त झाले. त्यांच्या मोक्षस्थानास 'मेघरव' तीर्थ असें म्हणतात.

तूर्णीपर्वतावर जम्बूमालि मुनीश्वरांनीं तप केलें व समाधि साधून ते अहमिंद्र झाले. तेथून आयुष्य संपल्यानंतर च्युत होऊन पुढील भवांत ऐरावतक्षेत्रांत जन्मून यति होऊन कर्मक्षय करतील व मुक्त होतील.

श्रीकुंभकर्ण मुनिराजही घातिकर्मक्षयानें केवली झाले व नर्मदा नदीच्या किनाऱ्यावर अघातिकर्मांचा क्षय करून ते मुक्त झाले. त्याच्या मोक्षस्थानाला 'पिठरतीर्थ' असें नांव आहे.

मारीचमुनिही रत्नत्रयाचें उत्तम पालन करून उत्कृष्ट तपश्चरणानें पापनाश करून स्वर्गांत उत्पन्न झाले.

मयमुनींनाही उत्तम तपश्चरणामुळें आकाशगामिनी ऋद्धि प्राप्त झाली व ते उत्तम मुनिचारित्राचें पालन करीत विहार करू लागले.

जगामध्यें शीलव्रताचें पालन करणाऱ्या स्त्रिया फार थोड्या असतात. जी जी लता असते ती ती ककडीची अथवा कोहाळ्याची असते असें नाहीं. तसें जी जी स्त्री असते ती ती पतिव्रता असते असें समजू नये. येथें प्रसंगाला अनुसरून एका शीलरहित स्त्रीची कथा ग्रंथकार सांगतात ती अशी:—

अभिमाना नांवाची एक सुंदर ब्राह्मणस्त्री होती. तिच्या पतीचें नांव 'नोदन' असें होतें. 'धान्य' नामक गांवांत हें जोडपें राहत होतें. या गांवांत हवा बिघडून लोक आजारी पडले व कांहीं मरण पावले. तेव्हां हें जोडपें दुसरीकडे जाण्यासाठीं निघालें. 'गजवन' नामक वनांतून जात असतां दोघांना भूक लागली. खाण्याचे पदार्थ संपले होते त्यामुळें ते भुकेने अगदीं दुःखी झाले. तेव्हां अभिमानेनें आपल्या पतीला त्यागलें व ती पुढें निघून गेली. पुष्पप्रकीर्ण नगराच्या कररुह नामक राजानें तिला पाहिलें. त्याच्याबरोबर ती निघून गेली. राजाचें तिच्यावर अतिशय प्रेम जडलें. एके दिवशीं प्रेमभरांत तिनें राजाला लाथ मारली.

सभेंत राजानें— "राजाला ज्या व्यक्तीनें लाथ मारली त्याला काय करावें" असा प्रश्न विचारला. कोणी त्यावेळीं म्हणाले— ज्यानें लाथ मारली त्याचा पाय तोडावा किंवा त्याचा जीव घ्यावा. हें म्हणणें राजाला रुचलें नाहीं. सभेंत हेमाङ्क नांवाचा विद्वान् होता. तो म्हणाला— महाराज, ही प्रेमाची खूण समजून त्या व्यक्तीचा पाय अलंकारानें भूषित करावा.

तूं हें कसें ओळखलेंस असें राजानें विचारलें असतां त्यानें स्वतःच्या भार्येनें केलेलें दंतक्षत राजाला दाखविलें. राजाला आनंद झाला व त्यानें पुष्कळ धन देऊन त्याला समृद्ध केलें.

येथें प्रस्तुत कथेशीं संबंध ठेवणारी दुसरी कथा अशी आहे:—

भार्गववंशी एक ब्राह्मण होता. तो धनुर्वेदविद्येंत अतिशय निष्णात होता. त्याचें नांव 'अमोघशर' व त्याच्या स्त्रीचें नांव मित्रयशा, या उभयतांना एक मुलगा झाला. त्याचें नांव 'श्रीवर्द्धित' असें ठेविलें. कांहीं वर्षांनीं तो अमोघशर मरण पावला. मित्रयशेला फार दुःख झालें. ती या हेमाङ्काजवळ पुत्रासह येऊन राहिली. हेमाङ्क चतुर होता. त्याचें उदाहरण ती आपल्या पुत्राला सांगत असे हेमाङ्काप्रमाणेंच तुझा बाप 'अमोघशरही' फार विद्वान् होता. तूं 'अमोघशराचा' पुत्र असूनही मूढ कसा झालास. तुझा हा मूर्खपणा पाहून मला फार दुःख होतें असें ती त्याला नेहमी बोले. या तिच्या भाषणानें आपल्या पित्याविषयीं त्याच्या मनांत अभिमान उत्पन्न झाला व तो व्याघ्रपुर नामक गावीं शिकण्यासाठीं गेला. तेथें गुरुजवळ त्यानें काळजीनें धनुर्विद्येचा अभ्यास केला. त्यांत तो अतिशय चतुर झाला. इतर कलामध्येंही तो फार चतुर झाला. यानंतर एकेदिवशीं सुकान्त राजाच्या शीला नामक कन्येचें हरण करून तो चालला असतां तिचा भाऊ सिंहचंद्र ससैन्य लढण्यासाठीं आला पण त्या श्रीवर्धितानें सिंहचंद्र व त्याचें सैन्य दोघांचाही पराभव केला. शीलेला घेऊन तो आपल्या आईकडे आला. दोघांनींहि तिच्या चरणांना नमस्कार केला.

कररुह राजाला त्यानें आपलें सर्व विद्यामधील चातुर्य दाखवून प्रसन्न केलें. राजानें त्याला पोदनपुराचा स्वामी बनविलें. अशारीतीनें तो राजा झाला.

इकडे सुकान्त व द्युति या दोन राजांचें युद्ध झालें. द्युतीनें सुकान्ताला ठार मारिलें व सिंहचंद्राचा पराभव केला तेव्हां सिंहचंद्र आपल्या पत्नीसह सुरुंगानें तेथून पळून गेला. सैन्यही त्याला अनुसरलें नाहीं. आपल्या बहिणीकडे जावें असा विचार करून तें जोडपें निघालें. वाटेंत पानानीं भरलेले करण्डे घेऊन तांबोळी लोक चालले होते. त्यांनीं जबरदस्तीनें त्याला ओझें वहावयास लाविलें. पोदनपुरनगराजवळ असलेल्या वनांत हे पति-पत्नी आले. तिथें सिंहचंद्राला एक विषारी साप चावला. तो मूर्च्छित होऊन पडला. राणी विलाप करूं लागली. तिनें आपल्या पतीला खांद्यावर घेतलें व मयमुनीच्या चरणाजवळ ती आली. त्यांच्या चरणाला स्पर्श करून नंतर ते हात आपल्या पतीच्या मस्तकावर ठेवित असे. मयमुनींना सर्वौषधि प्राप्त झाली होती म्हणून त्यांच्या हस्तस्पर्शानें सिंहचंद्र निर्विष होऊन उठून बसला. त्यानें मयमुनीश्वराच्या चरणांना वंदन केलें.

सूर्योदय झाल्यावर विनयदत्त नांवाचा श्रावक मुनिराजांना वंदन करण्यासाठीं आला. वंदन करून सिंहचंद्राची वार्ता त्यानें श्रीवर्द्धिताला कळविली. तेव्हां श्रीवर्द्धित आदरानें मुनीश्वरास वंदन करण्यासाठीं आला व त्यानें आपल्या सपत्नीक मेहुण्याला आपल्या घरीं नेलें व त्याचा चांगला आदर सत्कार केला.

एकेदिवशीं श्रीवर्द्धितानें मयमुनीला स्वतःचे व स्वतःच्या संबंधीजनांचे पूर्व-भव विचारले. मुनींनीं याप्रमाणें त्याचे भव सांगितले:—

शोभापुर नगरांत एकेदिवशीं 'सुभद्र' नामक आचार्य आले. नगरपति 'अमल' राजा त्यांना वंदन करण्यास गेला. त्यांच्याविषयीं मनांत भक्ति उत्पन्न होऊन तो दररोज त्यांच्या दर्शनास जात असे. याप्रमाणें त्यानें पुष्कळ पुण्यसंचय केला.

एकेदिवशीं तो पुनः आचार्यांना वंदन करण्यासाठीं गेला. तेथें एक कुष्ठी स्त्री आचार्यांना वंदन करण्यासाठीं आली होती. तिच्या अंगाचा दुर्गंध तेथें पसरला होता. राजाला तो सहन झाला नाहीं. तो तत्काल तेथून वाहनावांचून परतला व घरीं गेला.

इकडे त्या कुष्ठी स्त्रीनें आपलें दुःख आचार्यांना सांगितलें. त्यांनीं पांच अणुव्रतें तिला दिलीं. तिनें त्यांचें आमरण निर्दोष पालन केलें व समाधि साधून ती स्वर्गांत जन्मली. तेथून ती च्युत होऊन सुकान्त राजाची शीला नामक कन्या झाली. हे श्रीवर्द्धिता हीच तुझी पत्नी आहे.

त्या अमल राजानेंही पुत्राला राज्य दिलें व आपणाकडे आठ गांवांचें उत्पन्न ठेऊन घेऊन त्यांत संतुष्ट होऊन श्रावकधर्माचें पालन केलें. कालांतरानें मरून तो स्वर्गांत देव झाला. तेथील आयुष्य संपल्यावर तूं श्रीवर्द्धित झाला आहेस.

आतां तुझ्या मातेचें भवांतर ऐक—एक परदेशी माणूस एका गावांत आला. त्याला कडकडून भूक लागली म्हणून त्यानें प्रतिगृहीं भोजन मागितलें पण कोणीही त्याला अन्न वाढलें नाहीं. त्यामुळें त्यानें रागावून गावाला आग लावली व तो निघून गेला. त्याला ग्रामस्थांनीं पकडून आणिलें व आगींत फेकून दिलें. तो मरण पावून कालांतरानें राजाच्या घरीं स्वैपाकीण झाला. नंतर नरकांत त्यानें जन्म घेतला. तेथें पुष्कळ दुःखें त्यानें भोगिलीं. तेथून निघून तो तुझी माता मित्रयशा झाली आहे. आतां सिंहचंद्र व त्याच्या पत्नीचे रतिवर्धनेचें पूर्वभव वर्णन ऐकः—

पूर्वी पोदनपुरांत 'गोवाणिज' नांवाचा एक धनिक मनुष्य राहत होता. त्याच्या पत्नीचें नांव भुजपत्रा होतें. त्यांचा सर्व काल सुखांत जात होता. ते दोघेही मरण पावून या भवीं सिंहचंद्र व रतिवर्द्धिनी झाले. अर्थात् या भवींही पति-पत्नी झाले आहेत.

पूर्वभवामध्यें त्यांनीं बैल, घोडा, गाढव यांच्यावर अतिशय ओझें लादलें होतें. त्यांचें अंतःकरण निर्दयी होते. त्यामुळें या भवांत श्रुति नामक शत्रूनें पराजित करून जेव्हां राज्यपदहीन केलें तेव्हां आपल्या पत्नीसह जात असतां मार्गांत लोकांनीं या दोघावर ओझें लादून असह्य दुःख दिलें होतें.

याप्रमाणें मययोगीन्द्रांनीं सर्वांचें भववर्णन केलें तें ऐकून श्रीवर्द्धिताला आनंद झाला. यानंतर मयमुनि तेथून इष्टस्थानीं गेले.

पूर्वपुण्यानें कोणाला राज्य प्राप्त होतें तर कोणाचें पापोदयानें नष्ट होतें. एका सद्गुरुपाशीं दोघांनीं धर्माराधन केलें असलें तरी एक निदानानें व दुसरा निदानरहित अंतःकरणानें भिन्न भिन्न गति प्राप्त करून घेतो. कोणी समुद्रपर्यटन करून अगणित संपत्ति मिळवितो तर कोणी समुद्रांत बुडून मरतो. एकादा मनुष्य समुद्रकिनाऱ्याला येऊनही बुडतो. असा विचार करून सुजनांनीं विनय, दया, आगमाध्ययन व सुतपानें आत्महित करून घ्यावें.

याप्रमाणें मयमुनींच्या धर्मोपदेशानें सर्व पोदनपुराचे लोक शांत झाले. त्यांच्या मुखावर प्रसन्न कांति खेळू लागली.

अतिशय शांत, सद्गुणपुञ्ज असलेले ते निर्विकारमयमुनि पण्डितमरणानें मरून ईशानस्वर्गांत श्रेष्ठ देव होऊन जन्मले.

जे या मयमुनीश्वराचें माहात्म्य शांतचित्तानें वाचतात त्या भव्य जिनदासांना शत्रु व हिंस्र प्राण्यापासून बाधा होणार नाहीं असें समजावें.

# ऐंशीवें पर्व.

( रावणाच्या प्रासादांतील शांतिजिनालयांत श्रीरामादिक जाऊन शांतिजिनेश्वराची स्तुति करितात. )

श्रीरामसूर्यसङ्गम होतां सीतामुखाब्ज हें फुललें ।
करिं कर घेऊन तिचा हलधर तेथून शीघ्रगति चाले ॥ १ ॥

ऐरावताप्रमाणें स्थूलगजीं जानकीस वसवून ।
तेजस्वी श्रीरामें केलें तेथून तूर्ण निर्गमन ॥ २ ॥

चञ्चलघण्टासुन्दरगजमेघारूढ रामचन्द्र खुले ।
सीताख्यरोहिणीसह आनन्दित होति सर्व बघुनि भले ॥ ३ ॥

विद्याधर ज्या सेविति करिं ज्याच्या चक्ररत्न जें स्फुरतें ।
वदनीं प्रभा जयाची सुजनांच्या मानसा सदा हरिते ॥ ४ ॥

श्रीलक्ष्मणें नि विद्याधरवृन्दें युक्त रामचन्द्र शिरे ।
स्वर्गविमानासमशा रावणसदनांत मोद हृदयिं भरे ॥ ५ ॥

या सदनाच्या मध्यें विशालसे शान्तिनाथजिनगेह ।
शोभे ज्याचें दर्शन हरितें सज्जनमनांतला मोह ॥ ६ ॥

स्तम्भसहस्र जयाला सुवर्णमय त्या जिनेन्द्र-सदनांत ।
श्रीशान्तिनाथ शोभे मूर्ति जयाची हरी अघव्रात[1] ॥ ७ ॥

उतरून गजावरुनी सीतेसह रामचन्द्र जिनगेहीं ।
करुनि प्रवेश मोदें शान्तिजिनाचें प्रसन्नमुख पाही ॥ ८ ॥

कायोत्सर्गविधीनें[2] खालीं सोडून आपुले हात ।
श्रीरामचन्द्र धारण करि सामायिक[3] करून मन शान्त ॥ ९ ॥

सीतेसह निजकरयुग जोडुनि पापप्रशान्ति जें करितें ।
पुण्या प्रसवें ऐसें स्तवन करी राम वितरि मोदा तें ॥ १० ॥

---

१ पापसमूह. २ शरीरावरील प्रेम त्यागणें तो कायोत्सर्ग. अर्थात् उभा राहून कांहीं वेळपर्यंत पञ्चणमोकार जपणें तो कायोत्सर्गविधि. ३ आत्मस्वरूपाचें चिन्तन करणें.

ज्यांच्या जन्मासमयीं झाली सर्वत्र शान्ति जगतांत ।
गेले रोग लयाला आली सत्कान्ति जीवमात्रांत ॥ ११ ॥
चञ्चल आसन होतां शतेन्द्र येऊन विपुल विभवानें ।
सुरशैलीं न्हाणियलें तुजला बहु हृष्ट-भक्तिभावानें ॥ १२ ॥
बाह्यसुदर्शनचक्रें बाह्यारि समस्त नाथ ! जिंकून ।
षट्खण्डाधिपपद तुज झालें सम्प्राप्त वैभवें पूर्ण ॥ १३ ॥
सुध्यानचक्र घेउनि कषाय जे अन्तरारि त्या वधिले ।
मुनिपुङ्गवा तुवा वा हरादिकांना न साध्य हें झालें ॥ १४ ॥
जन्मजरामृति आदिक आयुधगण निजकरांत घेऊन ।
जो भावासुर[1] आला वधिलें त्या नाथ नच तुला गहन ॥ १५ ॥
उपमारहित विशुद्ध नि आत्माश्रयसें विमुक्तिसाम्राज्य ।
दुर्लभ इतरा झालें प्राप्त तुला नाथ नित्य जें प्राज्य[2] ॥ १६ ॥
त्रैलोक्यशान्ति-कारण असशी-तूं शान्तिनाथ म्हणुनि तुला ।
मनवचकायें नमितों अनन्त तव शान्ति जीस नैव तुला[3] ॥ १७ ॥
सर्वचराचर-जीव-स्वामी तूं तूंच रक्षितोस जगा ।
शुक्लध्यान नि रत्नत्रयास देऊन राहसी जागा ॥ १८ ॥
तूं गुरु हित कथणारा बान्धव तूं हितिं सहाय होतोस ।
तूं आगमप्रणेता परमेश्वर तूंच एक जगतास ॥ १९ ॥
पूजिति शतेन्द्र तुजला समस्तदेवासवें सदा मान्य ।
तूं धर्मतीर्थकर्ता पूजी तुज तोच होय जगिं धन्य ॥ २० ॥
तव तीर्थाचा आश्रय करील तो दुःखरहित होईल ।
सुख त्यास परम लाभे समस्त कर्मास तो विनाशील ॥ २१ ॥
तूं देव-देव तुजला असो नमस्कार शान्तिकर्त्यास ।
तूं कर्मगणविनाशें कृतकृत्यपदांत[4] राहसी ईश ॥ २२ ॥
तूं ज्ञान शक्ति दर्शन सुख अविनाशी अनन्त जे चार ।
त्यां मिळविलेस लभ्या[5] सुलब्धलभ्या[6] ! तुला नमस्कार ॥ २३ ॥

---

१ मोह परिणामरूपी असुर. २ उत्कृष्ट. ३ उपमा. ४ कर्मनाशाचें कार्य ज्यानें संपविलें असा तूं. ५ मिळविण्यास योग्य. ६ प्राप्त करून घेण्यास योग्य असे अनंतचतुष्टय ज्यानें उत्तमरीतीनें मिळविलें आहे.

सम्पूर्ण-दोषविरहित असे महाशान्तिचें जगीं स्थान।
जें नित्य देहविरहित प्रसन्न हो दे मला सुशान्ति जिन ॥ २४ ॥
यापरि शान्तिजिनाची करुनि स्तुति राम पुण्यकर्मात।
चतुर प्रदक्षिणा करि जी पापाचा करीतसे अन्त ॥ २५ ॥
श्रीरामपृष्ठभागीं सीता राहुनि उभी जिनस्तवना।
करि करुनि कमलकलिकाकृति[1] कर भासे जनास मधुवीणा ॥ २६ ॥
राममुखांतुनि होते निघत असे शब्द जणु नगाऱ्याचे।
सीतावदनांतुनि जणु वीणाझङ्कार वाटती साचे ॥ २७ ॥
सविशल्य[2] तेविं चक्री[3] भामण्डल वायुपुत्र सुग्रीव।
जिनभक्त करां जोडुनि करिति स्तुति जींत विपुल शुभभाव ॥ २८ ॥
निघति मृदङ्गांतुनि रव शब्द असे निघति तन्मुखांतून।
मेघरवासम समजुनि नर्तन करुं लागले मयूरगण ॥ २९ ॥
करुनि जिनस्तुतिवन्दन पुनः पुनः जिनगृहाङ्गणांत सुखें।
वसले ते नृप सगळे ज्यांचीं दिसतीं जनां प्रफुल्ल मुखें ॥ ३० ॥

( रावणमरणानें दुःखी झालेल्या आजे व पिता आदिकांना
बिभीषणाचें सांत्वनपर भाषण. )

इतुक्यांत माल्यवन्ता सुमालि-रत्नस्रवादिकां बोले।
शान्त विभीषण वचनां अनित्य वस्तुस्वभाव सकल खुले ॥ ३१ ॥
रावणमरणजदुःखें ज्यांच्या हृदयांत खिन्नता आली।
सान्त्वन विभीषणानें केलें योजून उचित शब्दालि[4] ॥ ३२ ॥
आजोबा नि पिताजी सगळे प्राणी स्वकीय कर्मफला।
अनुभवती शोक वृथा हितांत लावा स्वकीय हृदयवला ॥ ३३ ॥
आहात चतुर आपण जाणत आहात आगमा स्वमना।
शोकापासुनि काढा म्हणजे स्वहितीं करील तें गमना ॥ ३४ ॥
जो जन्मला तयाला मरण असे नियम हा असे अढळ।
जीवित-मरणाचें हें चक्र फिरे अदय हा असे काल ॥ ३५ ॥
पुष्पासमान नाजुक यौवन सौंदर्य विलय तें पावें।
लक्ष्मी पल्लवशोभा[5] धरितें क्षणकाल चल सदा धावें ॥ ३६ ॥

---

१ कमळाच्या कलिकेप्रमाणें आकृतीचे हात. २ विशल्याराणीसहित. ३ लक्ष्मण. ४ शब्दपंक्ति. ५ कोवळ्या पानाची शोभा.

वन्धूचा हा सङ्गम पाण्याच्या बुडबुड्यासमान असे ।
सन्ध्येच्या लालीची अनुकृति[1] भोगांत सर्वदा विलसे ॥ ३७ ॥
प्राण्यांना जरि मरण न भवान्तरीं गमन होय कोणाचें ।
किंवा अन्यभवांतुनि येणें वा सम्भवेल नच साचें ॥ ३८ ॥
आत्म्याचें हें जीवन नियमें स्थिर नच विनाशयुक्त असे ।
हें जाणुनि मन अपुलें शान्त करी चतुरता तिथेंचि वसे ॥ ३९ ॥
संसृति असार आहे ऐसें चिन्तन करी मनीं मनुज ।
त्याचा विनाश पावे शोक मिळे त्यास सौख्य जें सहज[2] ॥ ४० ॥
जो मनुज पावला मृति त्याचे आचार भाषणें मधुर ।
अनुभूत दृष्ट आणिति सज्जन हृदयींहि शोक भरपूर ॥ ४१ ॥
वान्धववियोग ज्याला झाला त्या शोकसंग उद्भवतो ।
तो प्रबल होय जेव्हां स्मरणाचा नाश तेधवा होतो ॥ ४२ ॥
फिरतो या संसारीं अनादि हा जीव कोण बन्धु नसे ।
करितो विचार जो नर शोकीं त्याचें कदापि मन न वसे ॥ ४३ ॥
भवनाशक-जिनपतिच्या शासनिं निजमन करून जो वागे ।
स्थिर चित्त होय त्याचें शीघ्र भवभ्रमण तेधवा भागे ॥ ४४ ॥
इत्यादिभाषणांनीं हृदयङ्गम मधुर शान्त चित्त करी ।
आजा नि जनक यांचा तदा विभीषण समस्त शोक हरी ॥ ४५ ॥

( सांत्वन केल्यानंतर विभीषण घरीं गेला व आपल्या मुख्य राणीला आमच्या घरीं आपण चलावें असें आमंत्रण देण्याकरितां रामादिकाकडे त्यानें पाठविलें व स्वतःही तो त्यांना नेण्यास आला. )

नन्तर विभीषणानें सदनीं जाऊन मुख्य राणीस ।
पाठविलें श्रीरामासंनिध हृदयीं जिच्या वसे हर्ष ॥ ४६ ॥
नाम विदग्धा होतें तिचें नि ती चतुर अतिथिसत्कारी ।
वन्दून राम-सीतासु-लक्ष्मणांना अशी विनन्ति करी ॥ ४७ ॥
अमुचें प्रभु ! गृह देवा आहे अपुलेंच भाव धरुनि मनीं ।
पदतलसङ्गानुग्रह[3] करावया मति करा निजागमनीं ॥ ४८ ॥

१ अनुकरण. २ स्वाभाविक खरें सुख. ३ पायाच्या सहवासाचा अनुग्रह—उपकार.

यापरि चालत असतां कुशलप्रश्नादि त्या स्थलीं आला ।
आदरभाव जयाला असा विभीषण वला असें वदला ॥ ४९ ॥
नाथा उठा चला घरिं करा प्रसादा कृतार्थ होईन ।
देऊन मान रामें केलें तत्सदनिं सानुजें[1] गमन ॥ ५० ॥

( विभीषणाच्या घरीं प्रवेशानंतर रामादिकांच्या स्नान-भोजनादिक क्रिया. )

नानाविधयानावरि होउनि आरूढ अश्वगजवृन्दीं ।
जाया विभीषणगृहीं उद्यत झाले अतीव आनन्दी ॥ ५१ ॥
ध्वज-तोरणादिकांनीं भूषविले भूपमार्ग लङ्कत ।
भूपविभीषणसदना जाया सर्वास हर्ष हो अमित ॥ ५२ ॥
भेरीमृदङ्गदुन्दुभि वाद्यांचा रव करी दिशा वधिर ।
अन्योन्यांच्या कानीं कथिती नेऊन वदन नर चतुर ॥ ५३ ॥
वाघाच्या पाठीवर बसले कोणी कुणी मृगारूढ ।
सिंहाधिरूढ कोणी जाती शौर्यादिसद्गुणांत दृढ ॥ ५४ ॥
नटभण्डनर्तकींचें चाले मार्गीं अनेकविध नृत्य ।
वन्दिजन-भाट गाती पद्मादिनृपाल-गुणगणा सत्य ॥ ५५ ॥
अनवसरीं जणु चन्द्रज्योत्स्ना प्रगटे अनेक-छत्रगणें ।
नानायुधतेजांनीं सूर्याचीं लुप्त जाहलीं किरणें ॥ ५६ ॥
दिव्यस्त्रीसुखकमलानन्दा जे करिति पद्मचक्री ते ।
आले विभीषणाच्या प्रासादीं शोभतो विभूतिशतें ॥ ५७ ॥
श्रीराम-लक्ष्मणांचें शुभ-वैभव वर्णवे न कोणातें ।
आश्चर्यचकित केलें ज्यानें स्वर्गस्थ सकल अमरातें ॥ ५८ ॥
मन्दिरिं विभीषणाच्या सहस्रनारीगणें महानन्दें ।
ओवाळिलें जयांना रत्नार्घ्यें यद्यशेंचि नभ कोन्दे ॥ ५९ ॥
सीता-लक्ष्मण यासह उतरून गजावरून वलराम ।
करिती प्रवेश मन्दिरिं वाटे तें त्यास परमविश्राम[2] ॥ ६० ॥
सौधाच्या बहुमध्यें श्रीपद्मप्रभजिनेन्द्रसदन असे ।
जें रत्न-तोरणांनीं सुवर्णनिर्मित विशालसें विलसे ॥ ६१ ॥
ज्याचें दर्शन हरितें पापांच्या विपुलराशि सुन्दर जें ।
पुण्यशतांना प्रसवें पद्मप्रभविम्ब त्यांत बहु साजें ॥ ६२ ॥

---

१ अनुजा– लक्ष्मणास घेऊन. २ अत्यन्त विसाव्याचें.

राम नि सीता-लक्ष्मण जिनगुण गाऊन वन्दिती त्यास ।
आत्म्यांत तत्त्वरूपा चिन्तुनि ते जाति परममोदास ॥ ६३ ॥
हनुमन्तादिक खेचरपति पद्मप्रभजिनास वन्दून ।
योग्य अशा स्वस्थाना गेले उभयास ते विचारून ॥ ६४ ॥
नन्तर खचरस्त्रीगण पद्म नि लक्ष्मण नि तेवि सीतेस ।
लावुनि उटी सुगन्धि स्नाना घालून मानिती तोप ॥ ६५ ॥
नेसून धौतवस्त्रा भूषणभूषित करून देहास ।
जिनमन्दिरिं प्रवेशुनि वन्दिति पद्मप्रभा अमोहास ॥ ६६ ॥
नन्तर भोजन झालें अमृतासम मधुर अन्न सेवून ।
रामास मोद झाला सीतासंयोग हेतु अन्यून ॥ ६७ ॥
इष्टसमागम होतां पञ्चेन्द्रियविषय गोड गमतात ।
तेणेंचि जीव विषयीं होउनि बहुमुग्ध[१] सतत रमतात ॥ ६८ ॥
प्रियविरहें जीवाला स्वर्गासम मधुर विषय नरक गमे ।
श्वापदसेवितवनही प्रियसंयोगें स्वर्गतुल्य त्यांत रमे ॥ ६९ ॥
विद्याधरनृप सगळे परिवारासह विभीषणें प्रेमें ।
आदरिले विविधान्नें वस्त्रें तच्चित्त बहुत दिवस रमे ॥ ७० ॥
भ्रमर जयावरि गुञ्जति ऐशा गन्धें नि कुसुममालांनीं ।
नानासुरत्नदानें मानियले खेचरेश बहु मानी ॥ ७१ ॥
पूर्ण मनोरथ केलें खेचरपति दिवसयामिनीं रमले ।
नानाकथाविनोदें अत्यन्त सुखांत दिवस बहु गेले ॥ ७२ ॥
राक्षसवंशा भूषण असे विभीषण उदार हृदयाचा ।
श्रीराम-लक्ष्मणांचा आराधक वाटला जना साचा ॥ ७३ ॥
( विभीषणा तूं मत्सररहित आहेस असें रामचंद्रादिक त्याला बोलले. )
सीता राम नि लक्ष्मण विभीषणाच्या घरांत राहून ।
आनन्दले नि वदले तुझें असे मत्सरें अलिप्त मन ॥ ७४ ॥
सगळ्या लङ्कानगरीं नागरिकांच्या घरीं कथा चाले ।
सीता, राम नि लक्ष्मण, विभीषणाचीच तींत जन रमले ॥ ७५ ॥
हलरत्न हेंचि लक्षण ज्याचें बलदेवपद ज्या प्राप्त ।
ज्या चक्ररत्न लाभे नारायणपद म्हणे गणी आप्त ॥ ७६ ॥

१ मोहित.

( बिभीषणादिकांनी बलनारायणपदप्राप्त्यर्थ राम व लक्ष्मणांचा अभिषेक केला.)

त्या श्रीरामा आणिक सुलक्ष्मणाच्या समीप येऊन ।
वदले बिभीषणादिक अभिषेकायास इच्छिती सुजन ॥ ७७ ॥
अनुमति द्यावी आपण आम्ही संनद्ध तो करायास ।
सर्वा प्रमोद होइल वाटे आम्हांस नैव आयास ॥ ७८ ॥
पूर्वी अमुच्या तातें केला राज्याभिषेक भरतास ।
तोचि असे अमुचा प्रभु असे अयोध्यापुरींतद्वास ॥ ७९ ॥
सत्यचि अपुलें आपण तथापि या मङ्गलाभिषेकांत ।
भरतहि अनुमति देइल होईल मनांत मोद त्या अमित ॥ ८० ॥
बलदेवचक्रिपदता झाली संप्राप्त आपणा उभया ।
ऐसें वदून केला त्यांचा अभिषेक धरुनि बहु विनया ॥ ८१ ॥
यापरि उन्नत लक्ष्मी झाली उभयास वदिती सकल ।
लङ्केंत राहिले ते स्वर्गी जणु सौख्य भोगिती विपुल ॥ ८२ ॥
स्वर्गासमान सुन्दर लङ्कानगरींत विपुल जी सुखद ।
क्रीडा खगेन्द्र करिती तिळभरही नच जिच्यामधें खेद ॥ ८३ ॥
श्रीरामचन्द्र सीतावदना पाहून तृप्त नच होती ।
ते रमणीयस्थानीं क्रीडा विविधा तिच्यासवें करिती ॥ ८४ ॥
चिन्तामात्रें इष्टप्राप्ति जया सतत होइ लक्ष्मण तो ।
क्रीडा करी 'विशल्या' राणीसह हर्षसागरीं रमतो ॥ ८५ ॥

( लक्ष्मणानें विराधिताला कूबर आदिक नगरांना पाठवून आपल्या विवाहित स्त्रिया आणविल्या व तो सुखोपभोगांत गढून गेला.)

लक्षणसुन्दरदेही लक्ष्मण खगपतिविराधिता प्रेषी ।
कूबर आदिक नगरीं यत्पालकभूप वघुनि ज्या हर्षी ॥ ८६ ॥
नगरीं दशाङ्गभोगी कुलिशश्रुतिनृपसमीप जाऊन ।
लेखा विराधितानें देउनि केलें तदीय हृष्ट मन ॥ ८७ ॥
'रूपवती' नांवाची तत्कन्या प्राप्त लक्ष्मणा झाली ।
अन्वर्थचि नाम तिचें जणु ती रतिची दुजी असे आली ॥ ८८ ॥
जो 'पृथ्वीधर' भूपति पृथ्वीपुरनाथ त्यास 'वनमाला' ।
कन्या जिला अतिप्रिय लक्ष्मण ज्याच्या गळ्यांत मणिमाला ॥ ८९ ॥

१ वज्रकर्ण राजा. २ मैत्रीण.

ती आली आनन्दें वघून लक्ष्मण निधानसम गमला ।
भोगी सौख्य तिच्यासह यापरि लक्ष्मण रतोदधीं रमला ॥ ९० ॥
कूबरनगराचा पति ज्याचें अभिधान ' बालखिल्य ' असे ।
' कल्याणमालिका ' त्या कन्या कल्याण यत्करांत वसे ॥ ९१ ॥
क्षेमाञ्जलिनगरीचा नृपाल ' जितशत्रु ' सार्थ नांवाचा ।
' जितपद्मा ' त्या कन्या यन्नामीं अर्थ सर्वदा साचा ॥ ९२ ॥
उज्जयिनीनगरीच्या नृपकन्या त्याहि पूर्वपुण्यानें ।
श्रीलक्ष्मणा मिळाल्या वियोग ज्यांना पुनः सुयोगानें ॥ ९३ ॥

( काहीं स्त्रियां महापुरुषांच्या पत्नी होतात त्यांचीं कारणें. )

ज्यानीं गुरुसाक्षीनें शीलाची पालना सुदृढ केली ।
पात्रीं दानें देउनि ज्यांची इन्द्रियजयांत मति रमली ॥ ९४ ॥
हृदयीं प्राणिदयेचा निवास होता अशा सुनारींनीं ।
जें तप केलें तेणें पति ऐसा प्राप्त होतसे जाणी ॥ ९५ ॥
अस्तास सूर्य गेला असतां भोजन कदापि नच केलें ।
मुन्यार्यिकासुसेवा केली पतिरत्न त्या स्त्रियेस मिळे ॥ ९६ ॥
लक्ष्मण योग्य तयांना त्याही त्याला सुयोग्य जन वदले ।
यापरि सुखांत त्यांचे लङ्कानगरींत सुदिन बहु गेले ॥ ९७ ॥
श्रीराम-लक्ष्मणांचें वैभव पाहून खचरजनवृन्दा ।
विस्मय मनांत वाटे तप हेतु गमे समस्त सुखकन्दा ॥ ९८ ॥
ज्या चन्द्रवर्धनाच्या सुता तयांचा विवाह कृष्णाशीं ।
झाला तेणें त्यासह भोगियल्या दिवसरात्रि सुखराशि ॥ ९९ ॥
इच्छितभोग तयांना मिळती नच अन्तराय त्यांत घडे ।
इन्द्रद्वय जणु भासे राम नि लक्ष्मण तयां उणें न पडे ॥ १०० ॥
सीतेंत लुब्ध झाली रामाची सर्व इन्द्रियें सतत ।
लङ्केंत सहा वर्षे सुखांत गेलीं न जाहलीं विदित ॥ १०१ ॥
सुखसागरांत झालें अत्यन्त निमग्न चित्त रामाचें ।
पूर्वानुभूतदुःख स्मरण हि उरलें न जें असे साचें ॥ १०२ ॥

१ संभोगसमुद्रांत. ४ लक्ष्मणाशी.

( इन्द्रजित्, मेघवाहन व कुम्भकर्ण केवलज्ञानी होऊन मुक्त झाले.)
आतां येथें कथितों दुसरी सम्बन्धयुक्तशी सुकथा ।
जी श्रोतृचित्तनेत्रा दाखविण्याला समर्थ पुण्यपथा ॥ १०३ ॥
सम्पूर्ण पापकाष्ठा जाळाया अग्नितुल्य इन्द्रजित ।
भगवान् विहार करिती महातपस्वी करीत भू पूत ॥ १०४ ॥
ध्यानाग्नि सबल झाला ज्याला वैराग्यवायु सहकारी ।
सम्यक्त्वारणिजन्मा ज्यांच्या पातकवनास भस्म करी ॥ १०५ ॥
श्रीमेघवाह मुनिवर जे होते अग्नि विषयकाष्ठास ।
केवलबोधधनी ते झाले सारून कर्मकष्टास ॥ १०६ ॥
इन्द्रजित मेघवाहन होउनि सर्वज्ञ वस्तुमात्रास ।
जाणून शेषकर्मक्षय होतां वरिति मुक्तिललनेस ॥ १०७ ॥
यानन्तर कलशश्रुति[1]-मुनिवर रत्नत्रयांत परिपूर्ण ।
होउनि केवलबोधें लोकालोकास जाणती तूर्ण[2] ॥ १०८ ॥
नाशुनि अघातिकर्मा अन्तीं वरिली तयें सुमुक्तिरमा ।
जिनदास भव्य नमिती ठेवुनि हृदयांत सतत हितकामा[3] ॥ १०९ ॥
उत्तमकीर्ति जयांची गाति सुरासुर असे महर्षिगण ।
जे शुद्धशील धरिती ज्यांच्या नाहीं गुणास उपमान ॥ ११० ॥
ज्यांच्या ज्ञानसमुद्रीं जग भासे गोष्पदासमान सदा ।
जे भवजाला तोडुनि अनन्तसुख भोगिती न ज्या बाधा ॥ १११ ॥
जेथून च्युत होति न ऐशा मोक्षीं विराजती सतत ।
आरोग्य बोधि आम्हा देवोत जिनेशशासनीं सुरत ॥ ११२ ॥
विन्ध्यारण्यस्थानीं इन्द्रजितासह सुमेघनादास ।
मोक्षप्राप्त जहाला 'मेघरवाभिध' सुतीर्थ वद त्यास ॥ ११३ ॥

( जम्बूमालीमुनि समाधिमरणोत्तर अहमिन्द्र झाले व ते
ऐरावत क्षेत्रांत कर्मक्षय करून मुक्त होतील.)

वृक्षलता बहु जेथें नानाश्वापद निवास करितात ।
नानापक्षी विहरति तूणीगतिपर्वतावरी सतत ॥ ११४ ॥
जम्बूमालि महामुनि राहत होते महातपस्वी जे ।
मानित होती जनता पवित्र अपणा यदीयपादरजें ॥ ११५ ॥

१ कुम्भकर्ण. २ लौकर. ३ हितेच्छा.

अहमिन्द्रपदिं विराजित झाले साधुनि समाधिमरणास ।
जिनदास नमन करिती त्यांच्या जोडून हात चरणास ॥ ११६ ॥
ऐरावतसुक्षेत्रीं उत्तरभविं हे महाव्रताचरणें ।
केवलबोधा मिळवुनि होतिल ते मुक्त मुक्त कर्मगणें ॥ ११७ ॥
झाला नीरंज[1] निस्तम[2] योगी श्रीकुम्भकर्ण करुनि तपा ।
ज्या नर्मदातटीं तें तीर्थ हरी 'पिठर' भव्यजनपापा ॥ ११८ ॥

( मयमुनि व मारीचमुनि यांचें तपोवर्णन. )

आकाशगामिनी मयमुनीस परमर्द्धि जाहली सुतपें ।
निर्वाणभूमिवन्दन करून हरि तो सदा स्वभवपापें[3] ॥ ११९ ॥
देवागमनें सेवित वृषभादिजिनप्रदेश जो पाही ।
जो रत्नत्रयमण्डित मारीचमुनीन्द्र सत्तपीं राही ॥ १२० ॥
अन्तीं समाधिमरणा साधुनि तो कल्पवासिसुर झाला ।
सत्त्व जयाचें जैसें तैशी त्या प्राप्त होय फलमाला ॥ १२१ ॥

( सत्त्वगुणाचा प्रकर्ष व त्याचें उत्कृष्ट फल. )

शील दृढव्रत पाळुनि माहात्म्य प्राप्त जें तिला झालें ।
वर्णन त्याचें शक्य न शत्रु जयें सर्वथा लया गेले ॥ १२२ ॥
सौन्दर्य धैर्य शुभमति रूप जियेचें जयास उपमा न ।
पतिविषयीं प्रेम जिचें कल्याणगुणेंचि सर्व हें पूर्ण ॥ १२३ ॥
नित्यचि निजपतिमध्यें अपूर्व सन्तोषधारिणी सीता ।
होती स्वर्गामध्यें अवश्य लाभे न कां तिला सुरता[4] ॥ १२४ ॥
अपुल्या शीलगुणानें सीतेनें रामचरित भूषविलें ।
सुन्दररत्नें मण्डित-करकङ्कण-तेज मधुर जेवि खुलें ॥ १२५ ॥
अन्यपति-त्यागाख्य-व्रतरत्नें येइ सुबल अबलेंत ।
स्वर्गारोहण जेणें लाभे राहे न अल्पही दुरितें[5] ॥ १२६ ॥
केलें प्राणिवधाचें तीव्र असें पाप जें मयें मायें ।
परि वीतरागसंयमलाभें त्या कुफलता न लवही ये ॥ १२७ ॥
इन्द्रजितादि ऋषींचें कथिलें माहात्म्य येथपर्यन्त ।
आतां श्रीमययतिचें ऐकावें चित्त करुनि निजशान्त ॥ १२८ ॥

१ पापरहित. २ अज्ञानरहित. ३ स्वजन्मपापें. ४ देवपणा. ५ पाप.

ज्या या भूमितलावरि शीलवती अन्य युवति आहेत ।
निजभर्तृभक्तितत्पर सुरलोकीं जाति कां न त्या त्वरित ॥ १२९ ॥
सीतेसमान निश्चय ज्यांच्या हृदयांत नान्दतो व्रतही ।
सुगुणी पतिव्रता त्या लाभे त्यांना अवश्य अमरमही ॥ १३० ॥
पुण्यापुण्यस्वादीं असें मनोवृत्ति निश्चला ज्यांची ।
येतां बुरे भले वा प्रसङ्ग शीलांत वृत्ति नित साची ॥ १३१ ॥
त्यांना सुरगति लाभे जीवन त्यांचें सदा यशस्वीच ।
लाभे नरता त्यांना मुक्तिरमा माळ घालिते साच ॥ १३२ ॥
वृक्ष नि लता समान न घोडा हत्ती न सारखे असती ।
लोखण्ड आणि धोंडा अन्तर या वस्तु सर्वदा वरिती ॥ १३३ ॥
तैसें पुरुष नि नारी अन्तर यांच्यांत सर्वदा असते ।
वस्तुस्थिति ही ऐशी विशेषता नच कदापि ही टळते ॥ १३४ ॥
जी जी वल्ली दिसते कोहाळें लागतें न जाणावें ।
वेली सगळ्यां असती ककडीच्या हें मनांत नाणावें ॥ १३५ ॥
यापरि सगळ्या नारीगणीं सदाचार राहतो न गणी ।
मिळतील केंवि जगतीं पदोपदीं पद्मरागमणिखाणी ॥ १३६ ॥
कांहीं स्त्रिया मनामधिं पातिव्रत्याभिमान धरितात ।
शीलाङ्कुशा न मानिति जगांत त्या खचित निन्द्य होतात ॥ १३७ ॥
लोक नि शास्त्राची जी मर्यादा अंकुशास चित्तगज ।
मानी न वश न होतो तो कुगतीलाच नेतसे समज ॥ १३८ ॥
चित्तगज सुवश होतो जिनेन्द्रवचनाङ्कुशेंचि जाणावें ।
होतां सुवश तयाला दयासुखाच्या पथांत योजावें ॥ १३९ ॥
युक्तायुक्तविचारी आहे जो भव्यजीव तोचि तया ।
रत्नत्रयमार्गामधिं शकेल जोडूं कदापि अन्य न या ॥ १४० ॥

( शीलाचें पालन न करणाऱ्या स्त्रीची कथा. )

अभिमाना नांवाच्या स्त्रीचें येथें अशीलवर्णन हें ।
चालत आलें करितों विबुधांच्या जें परम्परीं पाहे ॥ १४१ ॥
एका देशामध्यें रोगट पसरून वायु जन झाले ।
दुःखी अतिशय कितितरि मनुष्य-पशु तेधवा तयें मेले ॥ १४२ ॥

१ स्वर्ग.

धान्यग्रामांतुनि तैं पत्नीसह एक विप्र बाहेर ।
पडला ' नोदन ' नामें नीरोगस्थान शोधण्या चतुर ॥ १४३ ॥
अभिमाना तत्पत्नी सुन्दर परि जी असे अशीलवती ।
क्षुद्बाधेनें त्यजिला गजवनिं नवरा नि चालली सुदती ॥ १४४ ॥
पुष्पप्रकीर्णनगरीं कररुहभूपें तिला स्वसदनांत ।
नेलें त्याशीं रमली निमग्न झाली सदैव सुरतांत ॥ १४५ ॥

( ज्यानें मस्तकावर लाथ मारली त्याला कोणती शिक्षा द्यावी
या राज-प्रश्नाचें हेमाङ्कानें उत्तर दिलें. )

प्रेम तिच्यावरि जडलें राजाचें लुब्ध जाहला तींत ।
लाथ तिनें नृपशीर्षी प्रेमानें मारिली प्रमोदांत ॥ १४६ ॥
उठुनि प्रभातसमयीं सभेंत येऊन भूप विबुधांना ।
वदला निर्णय द्यावा माझें ऐकून सुज्ञ हो वचना ॥ १४७ ॥
भूपशिरावरि कोणी केला लत्ताप्रहार त्या काय ? ।
सांगा सुजन करावें जेणें निर्णय यथार्थसा होय ॥ १४८ ॥
कोणी वदले राजन्! तोडावा पाय जीव वा घ्यावा ।
ऐशा अपराध्याला शिक्षेचा हा प्रकार समजावा ॥ १४९ ॥
हेमाङ्कविप्र वदला तदभिप्राया यथार्थ जाणून ।
तच्चरण भूषवावा प्रेमाची गणुनि ही मनीं खूण ॥ १५० ॥
ओळखलेंस कसें हें नृप वदतां दाखवी स्वभार्येनें ।
केलेलें दन्तक्षत करि भूप तया समृद्ध विभवानें ॥ १५१ ॥

( ब्राह्मणपुत्र श्रीवर्धिताची कथा. )

भार्गववंशी ब्राह्मण नांव जयाचें अमोघशर होतें ।
मित्रयशा त्या भार्या सपुत्र राहून भोगि सौख्यातें ॥ १५२ ॥
कालें तन्मृति होतां मित्रयशा दुःख पावली फार ।
हेमाङ्काच्या गेहीं विधवा ती राहिली सती चतुर ॥ १५३ ॥
निजपतिसद्गुणवृन्दा स्मरून अपुल्या सुता सदैव म्हणे ।
विद्यागम बालपणीं होतां होतें अवश्य हित तेणें ॥ १५४ ॥
बालपणीं हेमाङ्कें विद्याराधन असे सदा केलें ।
तेणें प्रभाव त्याचा पडला पाहून चित्त मम धालें ॥ १५५ ॥

बाप तुझा शरविद्या मिळवुनि झाला प्रवीण बहु तींत।
त्याचा पुत्र असूनिहि मूढ कसा हें गमे न मज उचित ॥ १५६ ॥
यापरि अपुल्या तनया बोलुनि डोळ्यांत अश्रु आणून।
रडली तदा तयाचें अत्युद्धत चित्त पावलें शमन ॥ १५७ ॥
स्वपित्याविषयीं त्याच्या हृदयांत प्रगट होय अभिमान।
विद्या शिकण्यासाठीं व्याघ्रपुरीं गुरुगृहीं करी गमन ॥ १५८ ॥
गुरुविनय हृदयिं ठेवुनि झाला नानाकलांत तो निपुण।
हरिली सुकान्तकन्या शीला नामक तिथून करि गमन ॥ १५९ ॥
सिंहेन्दु तिचा भाऊ लढून नेण्या ससैन्य तो आला।
परि एकटाचि जिंकी श्रीवर्द्धित शीघ्र सिंहचन्द्राला ॥ १६० ॥
नन्तर तो शीलेला घेउनि जननीसमीप येऊन।
वन्दन करी तियेच्या चरणा सानन्दचित्त होऊन ॥ १६१ ॥

( श्रीवर्धिताच्या चातुर्यानें प्रसन्न झालेल्या कररुहराजानें
श्रीवर्धिताला पोदनपुर दिलें. )

त्याच्या चातुर्यानें कररुहराजा प्रसन्न बहु झाला।
तो पोदननगरीचा अधिपति हर्षें करीतसे त्याला ॥ १६२ ॥
इकडे सुकान्त मेला द्युतिशत्रूनें लढून युद्धांत।
केला सिंहेन्दूचा परिभव त्या दुःख जाहलें अमित ॥ १६३ ॥
परि तो निजदेवीसह पळून गेला सुरुंगमार्गानें।
खेद तया बहु झाला झाला तो रहित सैन्यवर्गानें ॥ १६४ ॥
वहिणीकडेचि जावें विचार ऐसा करून तो चाले।
पोदननगरा मार्गीं तांबूलिक लोक तेधवा आले ॥ १६५ ॥
ताम्बूलकरंड्यांचें ओझें वाहावयास लावून।
पोदननगरासंनिध सभार्य त्या येति शीघ्र घेऊन ॥ १६७ ॥

( मयमुनींच्या चरणस्पर्शानें सिंहेन्दूचें सर्पविष उतरलें. )

परि कांहीं सुभटांनीं त्रास दिला म्हणुनि तो सभार्य वनीं।
गेला तयास चावे सर्प विषारी विलाप करि राणी ॥ १६८ ॥
खांद्यावरि पति घेउनि मयमुनिसंनिध पतिव्रता आली।
तच्चरणा स्पर्श करी स्वकर पुनः ठेवि ती स्वपतिभालीं ॥ १६९ ॥

सर्वौषधर्द्धिधारक-मयमुनिसंस्पर्श लाभतां त्याला ।
विष दूर सर्व झालें आनन्दें उठुनि तो तदा बसला ॥ १७० ॥
जिनवन्दन भार्येसह करून मुनिवन्दना तयें केली ।
वारंवार तयाच्या हृदयीं मुनिभक्ति तीव्र करि केली[१] ॥ १७१ ॥
सूर्योदय झाल्यावरि मुनिवर्यें नियम पूर्णसा केला ।
श्रीविनयदत्तनामा श्रावक मुनिदर्शनार्थ तैं आला ॥ १७२ ॥

( श्रीवर्धितानें सिंहेन्दूला स्वगृहीं आणिलें. )

श्रीवर्द्धितास कळवी श्रावक सिंहेन्दु या स्थलीं आला ।
ऐकुनि त्याचें वचना श्रीवर्द्धितहृदयिं मोद बहु झाला ॥ १७३ ॥
आदरभावें गेला श्रीवर्द्धित मुनिवरास वन्दून ।
आणी सिंहेन्दूला स्वगृहीं त्याचा करून बहु मान ॥ १७४ ॥

( 'श्रीवर्द्धितानें' मयमुनीला स्वतःचे व स्वसम्बन्धिजनाचे पूर्वभव सांगा म्हणून विनंति केली. मुनिवर्यांनीं याप्रमाणें पूर्वभव सांगितलें. )

एकेदिनीं विचारी श्रीवर्द्धित मयमुनीस वन्दून ।
अपुलें नि स्वजनांचें पूर्वभवांचें करा मुने ! कथन ॥ १७५ ॥
मुनि वदले शोभापुरिं सुभद्र आचार्य एकदां आले ।
पुरपति अमलनृपानें आचार्यांच्या पदास वन्दियलें ॥ १७६ ॥
निर्मलमना अमलनृप जाई प्रतिदिनिं मुनीस वन्दाया ।
यापरि बहुभक्तीनें पुण्योपार्जन करीतसे राया ॥ १७७ ॥
एकेदिनिं तो गेला वन्दन करण्यास भूप सूरिपदां ।
तेथें कुष्ठी नारी वन्दुनि सांगे मुनीस निजविपदा ॥ १७८ ॥
तो गन्ध भूपतीला झाला नच सहन येइ परतून ।
निजगृहिं जाई त्वरित स्वपदांनीं भूप वाहनें हीन ॥ १७९ ॥
भद्राचार्यापासुनि अणुव्रतें घेतलीं नि आमरण ।
तीं पाळिलीं तियेनें सुरलोकीं जाहलें तिचें जनन ॥ १८० ॥
तेथून च्युत होउनि झाली कन्या सुकान्तभूपाची ।
शीलव्रती नांवाची भार्या श्रीवर्द्धितास ती साची ॥ १८१ ॥
जो अमलनृपति होता त्यानें पुत्रास राज्यभार दिला ।
सन्तुष्ट आठ गांवें स्थिर तो श्रावकपदांत रत झाला ॥ १८२ ॥

---

१ क्रीडा.

तो मरुनि देव झाला श्रीवर्द्धित चवुनि जन्मलास बुधा ।
आतां तव मातेचें कथितों भव कोप देइ ज्या बाधा ॥ १८३ ॥
वैदेशिक नर आला एका गांवास भूक ज्या बाधे ।
भोजन मागें प्रतिगृहिं परन्तु कोठेंहि त्या न तें लाधे ॥ १८४ ॥
सम्पूर्ण गांव जाळिन अशी प्रतिज्ञा सकोप होऊन ।
केली नि अग्नि लावुन केलें त्यानें प्रयाण तेथून ॥ १८५ ॥
ग्रामस्थानीं[1] पकडुनि अग्निसमूहांत फेकिला मेला ।
तो राजाच्या सदनीं स्वैपाकिण जाण हे बुधा झाला ॥ १८६ ॥
नन्तर मरून नरकीं दुःखें बहुघोर भोगिली त्यानें ।
तेथुनि निघून माता मित्रयशा होय तव सुनामानें ॥ १८७ ॥
गोवाणिज नांवाचा पोदनपुरिं धनिक एक वास करी ।
भुजपत्राभार्येसह पोहत होता सदैव सौख्यसरीं[2] ॥ १८८ ॥
झाला मरून नन्तर सुकान्तसुत सिंहचन्द्र नांवाचा ।
भुजपत्रेचा जीवहि पत्नी रतिवर्धिनी तया साचा ॥ १८९ ॥
घोडे बैल नि गर्दभ यांच्यांवरि खूप भार लादून ।
पूर्वभवीं उभयांनीं दुःख दिलें करुणभाव सोडून ॥ १९० ॥
केलें द्युतिशत्रूनें करुनि पराभूत राज्यपदहीन ।
सिंहेन्दु शरण गेला भगिनीला स्वमनिं खिन्न होऊन ॥ १९१ ॥
मार्गीं निजभार्येसह असतां तो जात धरुनि उभयास ।
लादून भार शीर्पीं जनें दिला त्या असह्य आयास ॥ १९२ ॥
यापरि मययोगीशें कथिलें भववृत्त सकल सकलांचें ।
श्रीवर्द्धितमन झालें ऐकुनि सानन्द तेधवा साचें ॥ १९३ ॥
नन्तर मयमुनि गेले इष्टस्थानीं प्रसन्नभावानें ।
श्रीवर्द्धित स्वसौधीं मयमुनिचरिता सदैव निजमनि नें ॥ १९४ ॥
नानाविध कर्माच्या संसारीं राज्य पूर्वसुकृतानें ।
कोणा मिळतें जातें कोणाचें कर्मविविधता जाण ॥ १९५ ॥
एका सद्गुरुपाशीं दोघाला धर्मलाभ जरि झाला ।
कोणी निदान बान्धुनि अनिदानें भिन्न भिन्नगति गेला ॥ १९६ ॥

---

१ गावांत राहणाऱ्या लोकांनीं  २ सुखसरोवरांत.

कोणी रत्नें मिळवुनि सौख्यें सागर तरून जातात ।
कोणी मध्यें बुडती कोणी तटनतटिं नष्ट होतात ॥ १९७ ॥
ऐसें जाणुनि चतुरें आत्महिताचेंच कार्य साधावें ।
जिनपदद्यागमसुतनें सुदृशें तैसें विशुद्धशा भावें ॥ १९८ ॥
यापरि मयोपदेशें पोदनपुर सकल शान्तसें झालें ।
सद्धर्मचिन्तनानें त्यांच्या वदनीं प्रसन्नपण आलें ॥ १९९ ॥
धर्मज्ञाता मयमुनि प्रासुस्थानीं सदा विहार करी ।
अतिशान्त आणि सुगुणी चित्त ज्याचें सदैव अविकारी ॥ २०० ॥
ऐसे ते मय मुनिवर पण्डितमरणें मरून ईशानीं ।
श्रेष्ठ सुराधिप झाले वन्दी जिनदास त्याचिया चरणीं ॥ २०१ ॥
मयमुनिमाहात्म्या जे पढती जिनदास शान्तचित्तानें ।
शत्रु नि हिंस्रप्राणी बाधा त्यांना न देति हें जाणें ॥ २०२ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यप्रोक्त पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे पद्मपुराणे मयोपाख्यानं नाम अशीतितमं पर्व ॥ ८० ॥

---

१ जैनशास्त्रांत सांगितलेल्या सम्यग्दर्शन ज्ञानयुक्ततपानें. २ इन्द्रियजयानें. ३ निर्जन्तुक ठिकाणीं.

# एक्क्याऐंशीव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

रामचंद्र व लक्ष्मण यांनीं लङ्कानगरींत पुष्कळ दिवस सुखाचा अनुभव घेतला. त्यांत ते इतके गढून गेले कीं आपल्या वियोगानें आपली माता कौसल्या व सुमित्रा या अतिशय दुःखी झाल्या असतील या कल्पनेचाहि त्यांच्या मनाला स्पर्श झाला नाहीं. पण कौसल्या व सुमित्रा यांना पतिचा व पुत्रांचा वियोग अतिशय व्यथित करीत होता. त्यांचें शरीर कृश झालें होतें. डोळ्यांतून अश्रु अखंड वाहत असत. 'बाळांनो, तुम्ही सुखांत वाढलेले होतां. अंगणांतलें ऊनही तुम्हाला माहीत नव्हतें. तुम्हाला वनवासांत फार दुःख झालें असेल.' याप्रमाणें शोक करीत असतां नारद तेथें आले. दोघींना शोकयुक्त पाहून त्यांना भय वाटलें. येथें काय घटना घडल्या होत्या त्यांचें त्यांना ज्ञान नव्हतें. अपराजितेनें आदरानें त्यांना आसनावर बसविलें.

नारदानें त्या दोघींना विचारलें— आपण अगदीं कृश कशा झाल्या आहात ? आपणांस कोणी दुःख दिलें ? दशरथ महाराजांना आपल्या शोकाचें कारण माहीत झालें नाहीं काय ? वगैरे प्रश्न नारदानें विचारले. तेव्हां अपराजितादेवी म्हणाली— ऋषे, आपण फार वर्षांनीं आज येथें आला आहांत यास्तव येथील घडलेल्या घटनांचें आपणास ज्ञान नाहीं. नारदांनीं म्हटलें— देवि, मी तेवीस वर्षांनीं आज येथें आलो आहे. मी इतक्या दीर्घकालांत धातकीखंडाच्या विदेहक्षेत्रांत होतों. सुरेंद्ररमण नामक नगरांत तीर्थंकरांचा जन्म झाला व देवेंद्रांनी मेरुपर्वतावर त्यांचा अभिषेक केला. तो पाहण्यासाठीं मी मेरुपर्वतावर गेलों होतो. तो अभिषेक पाहून मला मोठा पुण्यसंचय करता आला व जिनभक्तिमध्यें तत्पर होऊन तेवीस वर्षें विदेहक्षेत्रांतच मी घालविलीं. मला माझ्या जन्मभूमीचें— भारतवर्षाचें स्मरण झालें व मी येथें आलों.

यानंतर अपराजितेनें आपल्या शोकाचें कारण याप्रमाणें सांगितलें :— येथें सर्वहितआचार्य आले होते. त्यांच्या उपदेशानें विरक्त होऊन दशरथ महाराजांनीं भरताला राज्य देऊन दीक्षा घेतली. राम व लक्ष्मण सीतेसह वनवासाला निघून गेले. दण्डकवनांत सीतेला रावणानें हरण करून लंकेला नेलें. सुग्रीव, विराधितादिक विद्या-

धरांनीं रामचंद्राला साहाय्य केलें. त्यामुळें रामचंद्र-लक्ष्मण यांचें रावणाबरोबर युद्ध सुरू झालें. रावणानें शक्ति फेकून लक्ष्मणाला विद्ध केलें. तेव्हां विद्याधरांनीं येथें येऊन विशल्येला नेलें. यापुढें तेथें काय घडलें हें समजलें नाहीं. लक्ष्मण जिवंत आहे किंवा मरण पावला व पुढें काय घडलें हें समजलें नाहीं. आम्ही दोघी पुत्रवियोगानें अतिशय दुःखी झालों आहोत.

हें सर्व वृत्त ऐकून नारद अतिशय चिंतामग्न झाले. सुग्रीवादिकांनीं रावणाला कुपित केलें हें चांगलें झालें नाहीं असें नारद म्हणाले. असो. मी माझें जेवढें सामर्थ्य आहे त्याचा उपयोग करून लंकेला जाईन व तेथील सर्व हकीकत मी आपणास कळवीन. तुम्ही शांत व्हा. सर्व कांहीं ठीकच होईल. असें बोलून नारद आकाश-मार्गानें लङ्कानगरीकडे जाण्यास निघाले. अनेक देश, पर्वत, नद्या उल्लंघून ते लंकानगरीस पोहोंचले. तेथील पद्मसरोवरांत अंगद आपल्या कांहीं मित्रासह जलक्रीडा करीत होता. सरोवराच्या तटावर असलेल्या माणसांना त्यानें रावणाचें कुशल विचारलें. तेव्हां त्या लोकांनीं नारदाला अंगदाकडे नेलें व हा रावणाचें कुशल विचारीत आहे असें सांगितलें. नारद घाबरले व रावणाच्या कुशलपणाशीं माझें कांहीं प्रयोजन नाहीं असें म्हणाले. अंगदानें त्यांना पद्मनाभाकडे घेऊन जा म्हणजे ते यांना शिक्षा करतील असें सांगितलें. लोकांनीं त्याला ढकलीत रामचंद्राकडे नेलें. रामचंद्राला पाहिल्याबरोबर नारदाला आपल्यावरचें संकट टळलें असें वाटून आनंद झाला.

नारद रामचंद्राला आशीर्वाद देऊन म्हणाले– "रामा व लक्ष्मणा तुम्ही येथें सुखांत निमग्न झालेले आहांत पण तुमच्या माता कौसल्या व सुमित्रा तुमच्या वियोग-समुद्रांत गटंगळ्या खात आहेत. त्या सदैव रडतात. अगदीं कृश झाल्या आहेत. केश सुटलेले व अंग धूळीनें मळकट झालें आहे. तुम्ही क्षणाचाही विलंब न लावतां त्यांच्या दर्शनास जा. त्या शोकानें आपली छाती व मस्तक नेहमीं बडवून घेत आहेत. तुम्ही जाऊन त्यांना शोकरहित करा" हें नारदाचें भाषण ऐकून राम व लक्ष्मण म्हणाले– "अरेरे! आम्ही मातेला विसरून येथें सुख भोगीत राहिलों. खरोखर आम्ही कुपुत्र आहोत. हे ऋषे, आपण मातांची आठवण करून देऊन आम्हावर मोठा उपकार केला आहे. हा आम्ही कसा फेडावा समजत नाहीं." असें म्हणून त्यांनीं नारदाचा आदर केला व रामचंद्र बिभीषणाला म्हणाले– "माझी पहिली माता कौसल्या व दुसरी माता अयोध्या आहे. या दोघींना पाहण्याची मला अत्यंत उत्कंठा लागली आहे."

बिभीषणानें विनंतिपूर्वक सांगितलें कीं— "आपण उत्कंठित झाले आहांत व तिला मी आड येत नाहीं. पण मी ही शुभवार्ता कळविण्यासाठीं दूत लौकरच पाठवितों. प्रभो, आपण सोळा दिवस आतां येथें राहा. मी सतराव्या दिवशीं अयोध्येला आपणास जरूर पाठवितों." असें म्हणून त्यानें विद्याधरदूत पाठविले. ते अयोध्येंत भरताला भेटले व याप्रमाणें त्यांनीं हकीकत सांगितली :—

आधीं पुष्पवृष्टि करून दूतांनीं भरताचा जयजयकार केला. रामचंद्रांना हलरत्न व सिंहवाहिनी विद्या प्राप्त होऊन बलदेवपद मिळालें आहे. लक्ष्मणाला गरुडवाहिनी विद्या व सुदर्शनचक्र मिळून नारायणपदप्राप्ति झाली आहे. चक्ररत्न फेंकून लक्ष्मणानें रावणाचा वध केला व दोघे भरतक्षेत्राचे अधिपति झाले आहेत. हें सर्व ऐकून भरताला आनंद वाटला व त्यानें त्या विद्याधरदूतांना दोघी माताकडे नेलें. त्यांनीं त्यांना ही सर्व हकीकत सांगून आनंदित केलें.

यानंतर सगळें अयोध्यानगर असंख्यरत्नांची वृष्टि करून धनसंपन्न केलें. सर्व अयोध्यानगरांतील घरें रत्नादिकांनीं अतिशय सुंदर दिसू लागलीं. सर्वांच्या घरांतील जागा रत्नसुवर्णांनीं पूर्ण भरल्या. अयोध्यानगरांत व देशांत कोणीहि दरिद्री राहिला नाहीं. अयोध्यानगरींतील प्रत्येक जिनमंदिरांत नेहमी अभिषेक व पूजा होत असत. विद्याधर शिल्पकारांनीं अयोध्या इतकी सुंदर बनविली कीं येथें राहणारे प्रजाजन जणु देवाप्रमाणें दिसत असत. येथील अनेक विहिरी व बारवें सुवर्णांच्या पायऱ्यांनीं शोभत होतीं. यांचें पाणी कधीच आटत नसें.

राम-लक्ष्मणांना लंकेंत एक दिवसही अनेक महिन्याप्रमाणें वाटू लागला. सोळा दिवस तेथें राहणें मोठें कष्टदायक वाटू लागलें. आकाशगमन करणाऱ्या नारदानें मातांची हकीकत या बंधुयुगांना सांगितल्यामुळें ते मातृदर्शनास अतिशय उत्कंठित झाले. ज्यांनीं पुण्य केलें आहे त्यांना इष्टसंयोग संकल्प न करतांही प्राप्त होतो. म्हणून जिनाचे दास असणाऱ्या भव्यजीवांनीं नेहमी पुण्य करीत राहावें.

---

# एक्क्याऐंशीवें पर्व.

[ रामाच्या मातेचा शोक. ]

लक्ष्मण[1]-पूर्वजरामें लक्ष्मी लङ्कापुरींत अनुभविली ।
बहुत दिनावधि विसरे जननी अपराजितेस[2] त्याकालीं ॥ १ ॥
पति-पुत्रवियोगानें झाला सन्तप्त शुष्क[3] देह जिचा ।
कष्टी ती बहु झाली भासे आकार मूर्त चिन्तेचा ॥ २ ॥
डोळ्यापुढें न दिसतां वत्स जशी गाय घाबरी होते ।
झाली दशरथजाया दहा दिशां ती पुनः पुनः बघते ॥ ३ ॥
केव्हां मम पुत्राचें दर्शन होइल असा विचार मनीं ।
कौसल्या सन्तत करि पडली ती शोकसागरीं राणी ॥ ४ ॥
कांका[4] माझ्या सौधध्वजावरी बसुनि मधुर शब्द करी ।
सांग मला पुत्रागम तुजला देईन मधुर खीरपुरी ॥ ५ ॥
ऐसें बोलुनि माता रामाच्या रूपचिन्तनीं रमली ।
नेत्रास परि न दिसतां शोक करी अश्रुपूर ये गालीं ॥ ६ ॥
वाढविलें बाळा तुज सुखांत नच दुःखलेशही ठावा ।
गेलास विदेशीं मी दुःखोदधि सांग केवि सोसावा ॥ ७ ॥
कोमल पाय तुझे रे झाले बहु दुःख कठिणमार्गांत ।
पर्वतशिरिं घोरवनीं झाला असशील तूं अतिक्लान्त[5] ॥ ८ ॥
बहुमन्द भाग्य माझें झालें अत्यन्त दुःख वा मजला ।
तूं वत्स लक्ष्मणासह गेलास कुठें वदे मला बोला ॥ ९ ॥

[ नारद अपराजितेला शोक करण्याचें कारण विचारतो. ]

यापरि वदून असतां कौसल्या रडत तीव्रदुःखानें ।
आला तेथें नारद पाही हें दृश्य भीतनयनानें ॥ १० ॥
मस्तकिं जटा जयाच्या दिसती मुकुटासमान पिङ्गटशा ।
छातीवरि बहु दाढी व्यापी स्वदेहकान्ति सकल दिशा ॥ ११ ॥

---

१ लक्ष्मणाच्या आधीं जन्मलेला. २ कौसल्येस. ३ वाळलेला.
४ हे कावळ्या. ५ अतिशय थकलेला.

शुभ्र अशा वस्त्रानें आवृत ज्याचें शरीर वहु शोभे ।
आला नारद ऐसा स्कन्धीं वीणा धरून राहि उभे ॥ १२ ॥
त्या आदरून वसवी आसनिं अपराजिता वहुस्नेहें ।
शोकवशा तिज वदला बाई ! झालें शरीर कृश कां हें ॥ १३ ॥
कां म्लान वदन दिसतें अश्रु कपोलावरून ओघळती ।
आकारें दीर्घ दिसे शोक वदे कोण त्यास हेतु सति ! ॥ १४ ॥
भूपसुकोशल-कन्या पत्नी दशरथमहानृपालाची ।
माता श्रीरामाची असतां तुज शोक कां वरें जाची ? ॥ १५ ॥
जो शोकहेतु झाला दशरथभूपति तयास दण्डील ।
श्रीरामचन्द्र कोपें तच्छिर देहावरून खण्डील ॥ १६ ॥
अपराजिता वदे त्या देवर्षे ! सर्ववृत्त ऐकावें ।
चिरतरकालें आला आपण तेणें न तें असे ठावें ॥ १७ ॥
वात्सल्य आपुलें तें आम्हांप्रति कां दिसे न पूर्वीचें ।
कां स्नेह शिथिल झाला कारण त्याचें कळे न मज साचें ॥ १८ ॥
येथें ज्या ज्या घडल्या घटना तज्ज्ञान आपणा नाहीं ।
अतिदूरस्थानाहुनि आले आहांत वहुत वर्षांहीं ॥ १९ ॥

[ नारद आपली हकीकत सांगतो. ]

यापरि भाषण ऐकुनि नारद अपराजितेस निजवृत्त ।
वदले तेविस वर्षें नव्हतों मी निखिल-भरतवर्षात ॥ २० ॥
द्वीप असे जो दुसरा नांव असे ज्यास धातकीखण्ड ।
पूर्वविदेहीं त्याच्या सुरेन्द्ररमणाख्य नगर धनकुण्ड ॥ २१ ॥
तेथें त्रैलोक्याचा पति जन्मे नाथ जो अनाथांचा ।
जो सर्वपापनाशक दाखवि जनतेस मुक्तिपथ साचा ॥ २२ ॥
केला सुरगिरिवरती इन्द्रांनीं विपुलपुण्यवर्धकसा ।
अभिषेक जिनविभूचा जो उपजवि भव्यहृदयिं भक्तिरसा ॥ २३ ॥
मी तो सुदैवयोगें हर्षानें गमन करुनि पाहियला ।
आली तेणें माझ्या सार्थकता खचित नयनयुगलाला ॥ २४ ॥
अभिषेक संपल्यावरि सुरविद्याधरसमूह नृत्य करी ।
संचित अपार केला पुण्यांचा राशि सर्व पाप हरी ॥ २५ ॥

जिनदर्शनरतचित्तें मी त्या द्वीपीं निवास आजवरी ।
केला नि आज आलों स्वजन्मभूमीस हें मनांत धरी ॥ २६ ॥
जननीतुल्य अशा या भारतभूमीस मी मनीं स्मरुन ।
आलों चिरसेवित ही आनन्दाचें खरें असे स्थान ॥ २७ ॥
तुजला वधावयाला आलों मी प्रथम या महालांत ।
वार्ता जाणायाची उत्कण्ठा धरुनि मानसीं त्वरित ॥ २८ ॥

[ कौसल्यां नारदाला अयोध्येंत घडलेल्या घटनांचें वर्णन करिते.]

श्रीनारदास वदली नन्तर अपराजिता सती वृत्त ।
जें जें घडलें तें तें ऐके सावध करून निजचित्त ॥ २९ ॥
सर्वप्राणिहिताभिध[1] आले आचार्य निजगणासहित ।
तत्समयीं भामण्डल विद्याधरभूप ये धरून हित ॥ ३० ॥
राजा दशरथ माझा पति दीक्षा ग्रहण करुनि वनिं गेला ।
सीता-लक्ष्मण-रामें त्यागुनि राज्या प्रवेश वनिं केला ॥ ३१ ॥
दण्डकवनांत रावण सीतेस हरून नेइ लंकेंत ।
सुग्रीवविराधादिक-साहाय्यें राम जाहला मुदित ॥ ३२ ॥
घनघोरसमरिं रावणशक्तीनें विद्ध लक्ष्मणा केलें ।
येथून विशल्येला खचरांनीं शीघ्र त्यास्थलीं नेलें ॥ ३३ ॥
यापरि वदून राणी स्मरणांनीं व्यथित तीव्र होऊन ।
शोक करी नेत्रजलें मुख झालें तेधवा बहुम्लान ॥ ३४ ॥
पुण्यें रहित असे मी तव मुखदर्शन मला न तैं घडलें ।
आजी दुःखाग्नि मला मज्जीवनें[2] हाय सर्वदा सुकलें ॥ ३५ ॥
जी सुखवर्द्धित सीता रावणबन्दीगृहांत ती पडली ।
वनहरिणीसम बाला वियोगदुःखाग्निदग्ध बहु झाली ॥ ३६ ॥
जो रावणशक्तीनें लक्ष्मण झाला अतीव विद्ध उरीं ।
आहे संजीव अथवा मृत वार्ता समजली न हाय परि ॥ ३७ ॥
हे राम-लक्ष्मणांनो ! हे सीते ! घोरसागरीं तुमची ।
काय अवस्था झाली वार्ता मज समजली न कीं साची ॥ ३८ ॥
वृत्तान्त असा जाणुनि नारद ठेवून भूवरी वीणा ।
मस्तकिं ठेवुनि करयुग राहि ऊभा जाहला नि शून्यमना ॥ ३९ ॥

---

१ सत्त्वहित या नांवाचे. २ माझें जगणें.

शब्द निघे न मुखांतुनि झाला निष्कम्प देह मुखमलिन।
पाहे केवळ नयनें जणु असुनिहि जीव पावला मरण॥ ४० ॥
[ मी लंकानगरींत जाऊन खरी हकीकत तुला लौकरच कळवीन
असें म्हणून नारद लङ्केकडे निघाला. ]
कष्टें वदला बाळे! सगळें हें अशुभ वाटतें मजला।
जाऊन परत येउनि तथापि सांगेन सत्य वृत्त तुला॥ ४१ ॥
आहे त्रिखण्डपति हा रावण विद्याधरेश थोर असे।
भामण्डलसुग्रीवें केलें सन्तप्त[1] त्यास उचित नसे॥ ४२ ॥
कौसल्ये शोक न करि लौकर मी वृत्त सकल कळवीन।
संशय मनीं न धरि गे भलेंचि होईल होइ नच खिन्न॥ ४३ ॥
जितुकें सामर्थ्य असे तितुकें आणून सकल उपयोगीं।
कार्य करीन तुझें गे माझी आहे अतीव गति वेगी[2]॥ ४४ ॥
यापरि बोलुनि घेउनि वीणा काखेंत शीघ्र नभिं गेला।
उल्लङ्घुनि बहु देशा लङ्कानगरीसमीप तो आला॥ ४५ ॥
लङ्केंत जात असतां वार्तेचें ज्ञान केंवि मिळवावें।
काय उपाय करावा कैसें हें कार्य शीघ्र साधावें॥ ४६ ॥
श्रीराम-लक्ष्मणाची वार्ता तेथें कुणा विचारावी।
कां रावणा कथावी यथार्थ वार्ताची केंवि लाभावी॥ ४७ ॥
[ अंगदाच्या लोकांनीं नारदाला रामचंद्राकडे आणिलें. ]
पद्मसरोवरिं गेला यापरि नारद विचार मनिं करुन।
क्रीडत होता जेथें तारा-सुत[3] घेउनि स्वमित्रगण॥ ४८ ॥
दशकण्ठ-कुशल-वार्ता तटस्थपुरुषा विचारिली तेणें।
सुग्रीवसुतासंनिध पकडुनि नेलें तयास कोपानें॥ ४९ ॥
रावणपक्षाचा हा मुनि आम्ही आज पकडला आहे।
कुशल विचारित आहे त्याचें आम्हांस सुज्ञ किति पाहे॥ ५० ॥
नारद वदले कांहीं मम प्रयोजन तयासवें नाहीं।
कुशलप्रश्न तयाचा किमर्थ उत्तर वदा त्वरें पाही॥ ५१ ॥
अंगद हसून वदला या मूढ कुतापसास येथून।
न्या पद्मनाभसंनिध[4] शिक्षा वदतील यास पाहून॥ ५२ ॥

१ राग आणला. २ वेगाची. ३ अंगदकुमार. ४ रामचंद्राजवळ.

दण्डास धरुनि नेती पाठीमागून ढकलिती कोणी ।
बघुनि निजस्थिति ऐशी चिन्ता उत्पन्न जाह्ली स्वमनीं ॥ ५३ ॥
असती भूमितलावरि मानव बहु पद्मनाभ नांवाचे ।
कोण असेल न ठावें ज्याला सम्बोधतात हें वाचें ॥ ५४ ॥
श्रीजिनशासनवत्सल मजला रक्षील देवता कोण ।
मी संकटांत पडलों जातिल मम रक्षिले कसें प्राण ॥ ५५ ॥
थरथर शरीर कांपे गोळा कण्ठांत जाह्ले प्राण ।
ऐसा नारद नेला बिभीषणाचें घरांत निस्त्राण ॥ ५६ ॥

[ रामाला पाहून आनंदित झालेला नारद याप्रमाणें बोलला. ]

आपादकण्ठ[1] ज्याचा घामानें चिम्ब जाह्ला देह ।
पाहून पद्मनाभा झाला निजजीवितीं असन्देह[2] ॥ ५७ ॥
रामा अन्याय घडे मजला बान्धून आणिलें यांनीं ।
बहु मजला हे छळिती गेलें बा पळुनि तोंडचें पाणी ॥ ५८ ॥
यापरि नारदवचना ऐकुनि पद्माभ बोलला त्यांना ।
सोडा सोडा यांना हे असती पूज्य सकल-नृपतिगणा ॥ ५९ ॥
रामा बघून झाला नारदचित्तांत थोर आनन्द ।
सङ्कट टळलें मोठें विनाश मम पावला महाखेद ॥ ६० ॥
श्रीराम-लक्ष्मणांना आशीर्वादा वदून राहि उभा ।
आसन देतां बसला आली तेव्हां सभेस बहु शोभा ॥ ६१ ॥

[ रामचंद्राला नारद असें बोलतात. ]

श्रीरामचन्द्र वदले इकडे केलें कसें बरें गमन ।
कोठुनि येणें झालें कळवा तें वृत्त करिन मी श्रवण ॥ ६२ ॥
श्रीरामा माता तव वियोगदुःखार्णवांत मग्न असे ।
आलों पासून तिच्या तद्वार्ताकथनहेतु हृदयिं वसे ॥ ६३ ॥
रडते सदैव अश्रुक्षालितमुख मलिन कान्ति-हीन तिचें ।
दुःसह तुझ्या वियोगें कृश झाली कार्य कोणतें न सुचें ॥ ६४ ॥
सिंही निजशावाविण[3] जैशी व्याकुल तशीच ती दिसते ।
केश सदा सुटलेले धूळीनें अङ्ग सर्वदा मळतें ॥ ६५ ॥

१ पायापासून गळयापर्यंत. २ संशयरहित. ३ आपल्या बच्चावांचून.

ऐकुनि तिच्या विलापा रामा पाझर फुटेल दगडास ।
तूं तर सुखांत येथें कैसें तूं विसरलास जननीस ॥ ६६ ॥
असतां तिचा सुसुत तूं दुःख सहावें कसें तिनें सांग ।
नच भेटशील तिज तूं प्राणा सोडील रे तिचें अङ्ग ॥ ६७ ॥
तव विरहसूर्यतापें देह तिचा शुष्क जाहला आहे ।
दर्शन तुझें घडे न प्राणविसर्जन करील ती पाहे ॥ ६८ ॥
जा ऊठ भेट तिजला रामा ! आतां वसू नकोस इथें ।
माताचि परम हितकर बन्धु असे सत्य बोलती ज्ञाते ॥ ६९ ॥
जैशी कौसल्येची तैशी दुःस्थिति असे सुमित्रेची ।
नच वेगळें तियेचें वर्णन लक्ष्मण ! अभिन्नता साची ॥ ७० ॥
आहार झोप यामधिं न दिनीं रात्रींहि शान्तवृत्तीनें ।
होते प्रवृत्ति त्यांची परि शोकीं वृत्ति सतत एकमनें ॥ ७१ ॥
कुररी जैशी करिते बालवियोगें सदैव आक्रन्द ।
वाढे शोक तयांचा प्रतिदिनिं अल्पहि न होतसे मन्द ॥ ७२ ॥
शोकें विह्वल होउनि निजहस्तें वडविती शिरा नि उरा ।
येऊन शीघ्र त्यांचा उभयांहि शोकाग्नि पूर्ण शान्त करा ॥ ७३ ॥
सुतविरहाग्निज्वाला जाळिति त्यांच्या सदैव देहास ।
दर्शनसुधाजलाच्या वृष्टीनें न्याचि शीघ्र शमनास ॥ ७४ ॥
ऐकून नारदाचें भाषण ते उभयबन्धु हळहळले ।
ये अश्रुपूर नेत्रीं उत्कण्ठित मातृदर्शनीं झाले ॥ ७५ ॥

[ मातृविषयक आदरानें राम नारदाला याप्रमाणें बोलला. ]

सुग्रीवादिक-सुहृदें अतिकष्टें विगतशोक ते केले ।
धैर्य धरून कसें तरी वचन श्रीराम नारदा वदले ॥ ७६ ॥
येउनि वार्ता-कथनें उपकृत आम्हांस हे मुने ! केलें ।
उपकारभार अपुला फेडावा केंवि हें मना न कळे ॥ ७७ ॥
वाटे कुपुत्र आम्ही जननीविस्मरण होय आम्हांस ।
स्मरण तयांचें देउनि झालास मुने ! सुधन्यतावास ॥ ७८ ॥
जो मातेचा करितो विनय असे पुण्यवन्त तोच जगीं ।
किङ्कर होउनि करितो शुश्रूषा मातृचरणिं अनुरागी ॥ ७९ ॥

---

१ पिलाच्या विरहानें. २ उपकारयुक्त.

नारदोक्तवृत्तानें उभयांचें मन अतीव थवथवलें ।
हर्षें उभयें नारदमुनीस आदर करुन पूजियलें ॥ ८० ॥
[ मातृदर्शनाच्या उत्कण्ठेनें रामचंद्रांनीं बिभीषणाला याप्रमाणें कळविलें. ]
भामण्डलसुग्रीवां समक्ष रामें बिभीषणा म्हटलें ।
लङ्केंत तुझ्या सदनीं अत्यानन्दांत दिवस बहु गेले ॥ ८१ ॥
आज मनीं मातेची झाली स्मृति तेंवि दर्शनेच्छाही ।
तेंवि नगर अयोध्या बघण्या सोत्कण्ठ चित्त मम पाही ॥ ८२ ॥
कौसल्याही माझी पहिली माता जशी तशी दुसरी ।
आहे पुरी अयोध्या उत्सुकता पाहण्यास चित्त धरी ॥ ८३ ॥
[ बिभीषणानें आपण आतां सोळा दिवसच लङ्केंत रहावें
अशी रामचंद्रांना विनंति केली व ती त्यांनीं मान्य केली.]
म्हटलें बिभीषणानें सुन्दर अपुला विचार मज भासे ।
जननी नि जन्मनगरी बघण्या उत्सुक जगांत कोण नसे ॥ ८४ ॥
ही शुभवार्ता नाथा ! कळवाया दूत मी अयोध्येंत ।
पाठवितों की जेणें जननीयुग होय मुदित हृदयांत ॥ ८५ ॥
लङ्केमध्यें आपण रहावें शान्त चित्त ठेवून ।
सोळा दिवसचि नाथा प्रसाद हा इच्छितें मदीयमन ॥ ८६ ॥
बोलुनि बिभीषणानें कर जोडुनि राम-चरण वन्दियले ।
रामें वचन तयाचें ऐकुनि तें मान्य तेधवा केलें ॥ ८७ ॥
[ माझ्या पुत्रानें रामानें संदेश कळविण्यासाठीं हे विद्याधरदूत पाठविले असतील
असें सुमित्रेला कौसल्या म्हणत आहे तोंच विद्याधर तेथें उतरले. ]
इकडे राघव-माता सौधावरि चढुनि दक्षिणेस बघे ।
खगदूतगणा पाही पुरी अयोध्येंत जो सहर्ष रिघे ॥ ८८ ॥
लक्ष्मणजननि सुमित्रे ! वातेरितमेघतुल्य हे दिसती ।
येती दुरुन खग गे जणु शुभवार्ता कथावया गमती ॥ ८९ ॥
सानुज माझ्या पुत्रें शोभनवार्ता असेल पाठविली ।
कथितील दूत हर्षें लङ्केमध्यें समस्त घडलेली ॥ ९० ॥
यापरि सांगत असतां श्रीकौसल्या तदा सुमित्रेला ।
खेचरदूतांचा गण आकाशांतून तेथ अवतरला ॥ ९१ ॥

१ कृपा. २ वाऱ्यानें पुढें ढकललेले.

[ विद्याधरदूतांनीं भरताच्या सभेंत प्रवेशून राम-लक्ष्मणाच्या अभ्युदयाचें वर्णन केलें. तें ऐकून त्याला आनन्द वाटला. त्यांना भरतानें मातृयुगाजवळ नेलें त्यांनीं सांगितलेलें वृत्त ऐकून त्यांना अत्यानन्द झाला. ]

आकाशांतुनि पुष्पें उधळित त्यांनीं प्रवेश नृपसदनीं ।
केला हर्षित झाले भरतनृपाला बघून ते स्वमनीं ॥ ९२ ॥
भरतें आनन्दाचें आलें होतें तदा जया भरतें ।
सन्मान बहुत केला रामाच्या सुगुणचिन्तनांत रतें ॥ ९३ ॥
योग्यासनीं विराजुनि आशीर्वचनें अनेक बोलून ।
घडलें वृत्त तयांनीं निवेदिलें परम हृष्ट होऊन ॥ ९४ ॥
आयुधहल हें ज्याचें ऐशा पद्माभ रामचन्द्रास ।
बलदेवपद मिळालें भरता हें वृत्त देइ मोदास ॥ ९५ ॥
श्रीलक्ष्मणास लाभे नारायणपद नि चक्रलाभ घडे ।
भरतक्षेत्रस्वामी उभयहि हें वृत्त भरतकर्णीं पडे ॥ ९६ ॥
रामास सिंहविद्या लाभे श्रीलक्ष्मणास लाभे जी ।
तिज नाम गरुडविद्या नमिते उभयास सतत नृपराजी[1] ॥ ९७ ॥
फेकून चक्ररत्ना केला रावणविनाश सौमित्रें ।
या कार्यें तो शोभे उभयांचीं परम शोभतीं गात्रें[2] ॥ ९८ ॥
इन्द्रजिताजिक झाले होते जे बंद बन्दिशाळेंत ।
होतांचि मुक्त मुनिपद घेउनि ते जाहले खरे मुक्त ॥ ९९ ॥
यापरि राघव-लक्ष्मण यांची उन्नति समस्त ऐकून ।
भरतास हर्ष झाला तो दूतादर करी तदा तूर्ण[3] ॥ १०० ॥
भरतें दूता नेलें मातृयुगाजवळि वृत्त सांगून ।
शोक तयांचा नाशुनि केलें सानन्द तैं तदीयमन ॥ १०१ ॥

[ विद्याधरांनीं असंख्य रत्नांची वृष्टि केली त्यामुळें अयोध्यावासियांच्या घरीं पर्वताएवढे रत्नांचे ढीग जमले. ]

इतुक्यांत खगजनांचीं नभांत आलीं असङ्ख्यशीं यानें ।
जीं हेमरत्नमोत्यें यांनीं भरलीं अखण्ड बहुयत्नें ॥ १०२ ॥
जिनजन्मसमयिं जैसे तेजस्वी देव येति आकाशीं ।
खगवृन्द तसें येउनि वर्षिति मोदें असंख्य मणिराशि ॥ १०३ ॥

---

१ नृपपंक्ति. २ शरीरें. ३ लौकर.

साकेतानगरीमधिं पौरजनांच्या घरांत जणु शैल ।
हेममण्यांचे पडले झाले लक्ष्मीश तेधवा सकल ॥ १०४ ॥
वाटे प्रजाजन न हे स्वर्गांतुनि अमर या स्थलीं आले ।
पूर्वभवाच्या पुण्यें अखण्डसम्पत्तिवंत ते झाले ॥ १०५ ॥
भरत नगारा वढवुनि कळवी पुरवासिसकल-जनतेस ।
असती अतृप्त त्यांनीं यावें निर्भय नृपालसदनास ॥ १०६ ॥
इच्छेनुसार घ्यावा स्त्रीपुरुषें रत्नराशि मोदानें ।
होय न विरोध त्यांना सुन्दर सजवोत आपुलीं सदनें ॥ १०७ ॥
ऐकून घोषणा ही पौर नि देशांतलेहि सकल जन ।
वदले भरता राजन्! रिक्त न अमुच्या गृहीं असे स्थान ॥ १०८ ॥
सुखकमलावरि ज्यांच्या शोभे आश्चर्य बोलती ललना ।
दारिद्र्यनाश केला रामें तत्सम[1] न भूप भूतलिं ना ॥ १०९ ॥

[ विद्याधरशिल्पींनीं सुवर्णरत्नमय अयोध्या रचिली. या नगरींतील घरें, उपवनें, जिनमंदिरें, वापी, सरोवरें यांची रचना अतिशय सुंदर असल्यामुळें ही नगरी स्वर्गतुल्य वाटत होती. ]

विद्याधरशिल्पींनीं सुवर्ण चान्दी नि रत्नमोत्यांनीं ।
गृहभित्ति[2] जडविल्या बहु सुन्दर दिसती सुरूपललनांनीं ॥ ११० ॥
दिव्य अशीं जिनसदनें प्रासाद अनेक विन्ध्यशिखर गणा ।
हसतीं ऐसे रचिले वाटे आश्चर्य पाहतां नृमना ॥ १११ ॥
मण्डप अनेक रचिले हजार ज्या खांब रत्नहेमांचे ।
श्रीरामराज्यलक्ष्मी ध्वजहस्तांनीं जिथें सदा नाचे ॥ ११२ ॥
अतितेजस्वी रत्नें ज्यांच्या द्वारास जडविलीं बहुत ।
ऐशा वेशी कथिती रामाच्या वैभवास दिनरात ॥ ११३ ॥
नानाविध आश्चर्ये सदा महोत्सव जिच्यांत बहु असती ।
नगरी अशी अयोध्या देते प्रेक्षकगणास मोदतति ॥ ११४ ॥
शिखरें उन्नत ज्यांचीं अभिषेकोत्सव जिथें सदा चाले ।
जिनमन्दिरें अशीं तीं भक्तगणा देति मधुरपुण्यफलें ॥ ११५ ॥
भृङ्गे ज्यावर करिती गुंजारव उपवनें अशीं विपुल ।
मिळतीं जयांत बहुविध फळें फुलें जीं कदापि नच विरल ॥ ११६ ॥

---

१ त्यांच्यासारखा-रामासारखा. २ घरांच्या भिंती.

वाहेर या पुरीच्या आनन्दित करिति सकल जनतेस ।
चोहीकडून होती कदापि ज्यांच्यांत नाढळे शोषं ॥ ११७ ॥
नन्दनतुल्यवनांनीं शोभे नगरी सुमेरुतुल्य सदा ।
सुरसम विहार करिती नर ज्यांत न आपदा वसेचि कदा ॥ ११८ ॥
विस्तारें नवयोजन लांबीनें दीर्घ योजनें बारा ।
अठ्ठावीस जियेचा घेरा होता मनांत अवधारा ॥ ११९ ॥
ऐशी सुन्दर नगरी सोळा दिवसांत पूर्णशी रचली ।
विद्याधरशिल्पींनीं वर्णन न करूं शकेचि विबुधाली ॥ १२० ॥
वापी अनेक होत्या होतीं ज्यांना सुवर्णसोपानें ।
वहु वारवेंहि होतीं संतोषति नर यदीयजलपानें ॥ १२१ ॥
कमळें सुन्दर दिसतीं ग्रीष्मदिनांतहि अशुष्क ज्या असतीं ।
विहरति हंस जयामधिं नरहि सदा देति ज्या प्रमोदतति ॥ १२२ ॥
तटसंनिध जिनसदनें होतीं जेणें अपूर्व शोभा ये ।
वृक्षावली सुवेष्टित करिती जेथें प्रवेश जन विनयें ॥ १२३ ॥
स्वर्गपुरीसम जाणुनि नगरी आनन्द होय रामास ।
एकदिनावधि देखिल वाटे त्याच्या मनास वहु मास ॥ १२४ ॥
गगनगति नारदानें वार्ता कथिली श्रवून वन्धुयुग ।
अत्युत्कण्ठित झाले जननीविषयीं अतुल्य अनुराग ॥ १२५ ॥
पुण्य जयांनें केलें ऐशा जीवास मधुरयोग घडे ।
सङ्कल्प न मनिं ज्याचा पदार्थ येऊन मधुर चरणिं पडे ॥ १२६ ॥
म्हणुनि सदा जिनदासें पुण्याचरणांत निरत राहावें ।
चिन्तारवितापाचें तिळमात्रहि दुःख केवि त्या व्हावें ॥ १२७ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे साकेतानगरीवर्णनं नाम एकाशीतितमं पर्व ॥ ८१ ॥

---

१ सुकणें. २ विद्वानांचा समूह.

# ब्याऐंशीव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

सूर्योदय झाल्यावर रामचंद्र, लक्ष्मण व सीता हे पुष्पक विमानांत बसून अयोध्येकडे निघाले. इतर अनेक विमानें व वाहनावर आरूढ होऊन सुग्रीव, बिभीषणादिक अनेक विद्याधर राजेहि रामचंद्रास अनुसरले. विमान फार वेगानें व अतिशय उंचीवरून चाललें होतें. अनेक प्रदेश त्यानें उल्लंघिले. थोड्यावेळानें तें विमान सुमेरुपर्वताकडे गेलें. नाथ, या जम्बूद्वीपाच्या मध्यभागीं हें अत्यंत उज्ज्वल काय दिसत आहे? मला सांगा. रामचंद्रांच्या मांडीवर बसलेल्या सीतेनें प्रश्न विचारला. रामचंद्र म्हणाले– " प्रिये, हा सुमेरुपर्वत आहे. जणु जम्बूद्वीप मोजण्याची ही काठी आहे असें वाटतें. याच सुमेरुपर्वतावर पाण्डुकशिलेवरील सिंहासनावर श्रीमुनिसुव्रतनाथांचा इन्द्रांनीं क्षीरसागरजलांनीं अभिषेक केला होता. प्रिये, आपण पुढें केव्हां तरी येथील अकृत्रिम जिनमन्दिराचें दर्शन घेण्यासाठीं अवश्य येऊ. " नंतर मेरुपर्वताला ओलांडून अनेक प्रदेश उल्लंघून विमान भरतक्षेत्रांत आलें. दाट अशा दण्डकारण्यांत त्यानें प्रवेश केला तें पाहून सीतादेवीला रामचंद्र पुनः म्हणाले:– " प्रिये, हें दाट दण्डकारण्य पाहा. येथून तुला दुष्ट रावणानें हरण करून लंकेला नेलें होतें. पण या पापकार्यानें तो नरकामध्यें आतां दुःख भोगीत आहे. आपण या नदीच्या कांठीं दोघां चारणमुनींना आकाशांतून उतरतांना पाहिलें व त्यांना नवधा-भक्तीनें आहार दिला होता. "

यानंतर तें विमान वंशस्थलपर्वताजवळ आलें. तेव्हां रामचंद्रांनीं सीतेला म्हटलें– " प्रिये, याच पर्वतावर देशभूषण व कुलभूषण मुनिवर्यांना एका दैत्यानें उपसर्ग केला व तो आम्ही दूर केला. त्यावेळीं त्यांना केवलज्ञानाची प्राप्ति झाली. प्रिये, हें बालखिल्यपुर येथें लक्ष्मणाला कल्याणमालेनें वरिलें. हें दशाङ्गपुर आलें पाहा. येथील राजा वज्रकर्णानें लक्ष्मणाबरोबर ' रुपवती ' कन्येचा विवाह केला होता."

येथून विमान अनेक देश उल्लंघून अयोध्येच्या प्रदेशांत प्रवेशलें. स्वर्गाप्रमाणें अतिशय सुन्दर असें तें अयोध्यापुर पाहून सीतेनें हें कोणत्या विद्याधराची राजधानी आहे असा प्रश्न रामचंद्रांना विचारला. रामचंद्रांनीं लंकानगरीला हसणारें तें नगर पाहिलें व थोडावेळ विचार करून त्यांनीं ओळखलें व म्हटलें कीं,– प्रिये, विद्याधर-शिल्पींनीं येथें येऊन ही अयोध्या सुवर्णरत्नमय बनविली आहे. असें सांगून आपलें पुष्पक विमान त्यांनीं जमिनीवर उतरविलें. भरत बन्धुप्रेमानें स्वागत करण्यासाठीं आला होता. त्याला राम-लक्ष्मण कडकडून भेटले. अत्यन्त आनन्द सर्वांना वाटला. नंतर अयोध्येतून रामचंद्रादिकांची मिरवणूक मोठ्या वैभवानें निघाली. अनेक वाद्यें वाजूं लागलीं. सुवासिनीसमूह मंगलगाणीं म्हणूं लागला. परिचित लोक भेटून राम-लक्ष्मणांना उन्नति होवो, जय प्राप्त होवो, दीर्घायुष्य लाभो असे आशीर्वाद देऊन जात असत. स्त्रिया प्रासादावर बसून ही सुन्दर मिरवणूक पाहूं लागल्या. कांहीं स्त्रियांच्या मैत्रिणी मिरवणुकींतील मुख्य व्यक्तींची माहिती सांगूं लागल्या. सखी, हा रामचंद्रराजा, याचें शरीर पूर्णचन्द्राप्रमाणें शुभ्र व सतेज आहे. यानें सुग्रीवाची आकृति धारण करणाऱ्या साहसगतीला युद्धामध्यें ठार मारिलें आहे. याच्या मांडीवर सीतादेवी बसली आहे व श्यामवर्णाचा, चक्रधारी हा लक्ष्मण पाहा. यानें युद्धामध्यें रावणाला मारिलें. हा आतां त्रिखण्डेश झाला आहे. हा सुग्रीवराजा, याचें रामचंद्रावर दृढ प्रेम आहे. सुग्रीवाचा पुत्र हा अङ्गद आहे. हा अतिशय पराक्रमी आहे.

हा सीतेचा भाऊ भामण्डल. याला जन्मल्यावर एका देवानें हरण करून नेलें व दया उत्पन्न होऊन त्यानें त्याच्या कानांत रत्नकुंडलें घालून पर्णलघ्वी विद्येच्या साहाय्यानें आकाशांतून खालीं सोडलें असतां चन्द्रगति विद्याधरानें त्याला घेऊन आपल्या पुष्पवती राणीजवळ दिलें. हा अनेक विद्यांनीं युक्त झाला आहे.

गडे, हा चन्द्रोदय राजाचा पुत्र विराधित आहे. शूर लक्ष्मणावर याचें अतिशय प्रेम आहे व हा पवनंजय राजाचा पुत्र मारुति– हा तर रामचंद्रांचा उजवा हात आहे. याप्रमाणें नगरवासि स्त्रियांनीं ती मिरवणूक पाहिली.

रामचन्द्रादि नंतर राजवाड्यांत आले. त्यांनीं कौसल्या, सुमित्रा, केकया व सुप्रजा अशा आपल्या चार मातांना नमस्कार केला. मातांच्या मनांत अत्यंत स्नेह उत्पन्न होऊन त्यांच्या स्तनांत दूध उत्पन्न झालें. त्यांनीं रामचंद्र व लक्ष्मणाचें मुख कुरवाळलें. पाठीवरून हात फिरविला व अनेक शुभाशीर्वाद दिले. सीता वगैरेंनीं सासूंच्या चरणांना नमस्कार केला. त्यांनाही त्यांनीं अनेक आशीर्वाद दिले.

इष्टसमागम होऊन मातांना अत्यंत आनंद झाला. जे जिनाचे दास आहेत ते निर्मलबुद्धीचे भव्य हा इष्टसमागमाचा अध्याय वाचून पूर्णायुष्य मिळवोत. जिनधर्माचा एकही नियम जे नियमानें पाळतात त्यांना सर्वसुखांची प्राप्ति होते. हे जिनदास तूं नियमानें नियम पाळून इहपरसौख्यें मिळव म्हणजे तुला मोक्षलक्ष्मी वश होईल.

# ब्याऐंशीवें पर्व.

[ राम, लक्ष्मण, सीता यांचें पुष्पकविमानांत बसून अनेक विद्याधरराजासह अयोध्येकडे प्रयाण. ]

सूर्योदय झाल्यावरि पुष्पकयानीं बसून बन्धुयुग ।
करिति प्रस्थान[1] सुखें साकेतेचा धरून अनुराग ॥ १ ॥
परिवार विविधयानें घेऊन सवें नभोगनृप[2] निघती ।
श्रीराम-लक्ष्मणांच्या सेवेची यन्मनीं दृढा प्रीति ॥ २ ॥
छत्रध्वजवृन्दांनीं नभांत रविकिरण सकल रोधून ।
शैलविभूषित पाहत धरेस करिती नभांत ते गमन ॥ ३ ॥
नानाजलचरशोभित ऐशा लवणार्णवास[3] लङ्घून ।
जाती खेचर हर्षें राघवचरणानुराग मनिं धरुन ॥ ४ ॥
श्रीरामाङ्कीं बसली सीता लक्ष्मीसमान बहु शोभे ।
गुञ्जन मुखिं अलि[4] करिती तच्छ्वासाच्या सुगन्ध मधुलोभें ॥ ५ ॥

( चन्द्रकान्त जाति. )

बहुवेगानें विमान जाई नभांत अति उंच ।
हर्षें सीतासतीशरीरीं उठती रोमाञ्च ॥ ६ ॥
उल्लंघुनि तें प्रदेश नाना जाई बहु दूर ।
दिसू लागला सुमेरुपर्वत तियेस सामोर ॥ ७ ॥
नाथा ! जम्बूद्वीपाच्या बहुसुमध्यभागांत ।
दिसत असे हें काय समुज्ज्वल सांगा मेघांत ॥ ८ ॥

[ श्रीरामचन्द्र हा मेरुपर्वत आहे असें उत्तर देऊन त्याची विशेष माहिती सीतेस सांगतात. ]

सुन्दर सीते ! हा आहे गे सुमेरुगिरि थोर ।
शोभे ज्याच्या शिखराग्रीं ऋतुविमान[5] चित्तहर ॥ ९ ॥

---

१ प्रयाण. २ आकाशांतून जाणारे विद्याधरराजे. ३ लवणसमुद्र. ४ भुंगे. ५ पहिल्या सौधर्मस्वर्गाचें ऋतु नामक विमान मेरुपर्वताच्या शिखराच्या अग्रभागावर आहे.

पाण्डुशिलेवरि पूर्वी देवें सुव्रतनाथास ।
स्नान घातलें जन्मवासरीं त्रिलोकनाथास ॥ १० ॥
तोच असे हा मणिमय-शिखरें रमवी मनुजमना ।
सुवर्णगिरि हा ज्याचें वर्णन यथार्थ करवेना ॥ ११ ॥
'मन्दर' याला वदती सुन्दरि ! तथा सुदर्शन ही ।
मध्यमलोका जणु मोजाया कांठी हा पाही ॥ १२ ॥
येथें असती शाश्वतसदनें[1] श्रीजिनवर्यांचीं ।
पाहू आपण केव्हांतरि गे घातक दुरितांची ॥ १३ ॥
अतिशयवेगें व्योमयान हें चालें बहु दूर ।
असलेलेही देशादिक गे येती सामोर ॥ १४ ॥
दण्डक वन हें पाहे येथें दिनिंही घनतिमिर ।
नान्दे करण्या प्रवेश वाटे देवां भय थोर ॥ १५ ॥

[ दण्डकारण्यापासून अयोध्येपर्यंतचे वर्णन करतांना वनवासांत घडलेल्या गोष्टीचें रामचन्द्र वर्णन करितात. ]

लङ्कानाथें तुजला दुष्टें हरिलें येथून ।
परि या कार्यें दारुण नरकीं पडला जाऊन ॥ १६ ॥
दोघा चारणमुनिवर्यांना आपण दोघांनीं ।
नवधाभावें[2] जिथें पारिलें[3] तीच नदी जाणी ॥ १७ ॥
केला जेथें नष्ट उपद्रव श्रीमुनियुग्माचा ।
तो वंशस्थल गिरि हा आहे पुण्यप्रद साचा ॥ १८ ॥
देशविभूषण[4] वंशविभूषण[5] नामक मुनियुग्मा ।
निर्मल केवलबोध जहाला येथें निश्छद्मा ॥ १९ ॥
बालखिल्यपुर हें आलें बघ सुन्दर राजसुता ।
वरी लक्ष्मणा कल्याणादिकमाला[6] स्नेहयुता ॥ २० ॥

---

१ नित्य अविनाशी जिनमंदिरें. २ सत्पात्र आलें असतां त्याचा स्वीकार करणें, उंच आसनावर बसविणें, पाय धुणें, पूजन करणें, नमस्कार करणें, वचन, मन व शरीर शुद्ध करणें व आहारशुद्धि यांना नवधाभाव– भक्ति म्हणतात. ३ आहार दिला. ४ देशभूषण व ५ कुलभूषण हे दोन मुनि. ६ कल्याणमाला.

पाही सुन्दरि ! दशाङ्गपुर हें वज्रश्रवणाचें[1] ।
जनक असे जो रूपवतीचा जिनागमा वाचे ॥ २१ ॥
पाहुनि सुन्दर पुनरपि भूमिप्रदेश हर्षानें ।
विचारिलें मनिं संशय येतां रामा सीतेनें ॥ २२ ॥
कोणा विद्याधरराजाची नगरी ही सांगा ।
सुवर्णमणिसदनांनीं शोभे लाजवि जी स्वर्गा ॥ २३ ॥
पूर्वीं केव्हां नच ही पाहिलि आपण उभयांनीं ।
लोभवुनी ही नयना विस्मय उपजवि शीघ्र मनीं ॥ २४ ॥

[ विचार करून ही अयोध्या आहे असें निश्चित जाणून सीतेपुढें अयोध्येचें वर्णन रामचंद्र करितात. ]

सीतावचना ऐकुनि पाही राघव सर्व दिशा ।
संशय संपे सुनिर्णयें मनिं पावुनि बहु हर्षा ॥ २५ ॥
हासुन वदला असे अयोध्या स्वर्गा हंसणारी ।
नगरी सुन्दर दिसती जेथें सुरसम नरनारी ॥ २६ ॥
खगशिल्पींनीं रचिली शोभा अपूर्व जी धरिते ।
जिंकुनि लङ्कानगरा मणिमय कान्तींनीं हसते ॥ २७ ॥
रविसम पाहुनि बहुतेजस्वी विमान आकाशीं ।
विस्मय होई पौरगणांच्या बहुमानसदेशीं ॥ २८ ॥
मत्तगजावरि बसुनि विनीतेंतून[2] निघे भरत ।
विभवें इन्द्रासमान दिसला बन्धुप्रेमरत ॥ २९ ॥
नानायानें बहुत विमानें समस्त आकाश ।
व्यापुनि गेलें विपुल खगांनीं पाही भरतेश ॥ ३० ॥

[ राम व लक्ष्मणांनीं भरताला दृढ मिठी मारली व त्यानें तिघांस नमस्कार केला. ]

पुष्पकयाना स्थापुनि भूवरि पाहुनि भरतास ।
राम नि लक्ष्मण गाढ भेटले प्रेमभरें त्यास ॥ ३१ ॥
भरतें केलें राघव-लक्ष्मण-सीताचरणास ।
प्रणमन त्याच्या आनन्दाश्रू आले नयनास ॥ ३२ ॥

[ अयोध्येंतून निघालेल्या मिरवणुकीचें वर्णन. ]

---

१ वज्रकर्णराजाचें. २ अयोध्येंतून.

भरतें आदर केल्यानन्तर पुष्पकयानांत ।
वसुनि तयासह आले त्रिक ते शीघ्र अयोध्येंत ॥ ३३ ॥
गजहयवृन्दें वाहनयानें पदातिनिवहानें ।
दाटी झाली राजपथामधिं हो न जिचें कथणें ॥ ३४ ॥
प्रलयाचे जणु वारिद गर्जति वाद्यध्वनि ऐसे ।
शंखकोटिरव होती तेव्हां जयजयरव तैसें ॥ ३५ ॥
सुवासिनीगण गाउ लागला राघवयश मधुर ।
श्रवणें ज्याच्या सुजना गमलें अमृत असे अधर[१] ॥ ३६ ॥
सूर्यरथाला निजतेजानें जिंकाया सजले ।
चक्ररवाला[२] करीत सुन्दर रथगण बहु चाले ॥ ३७ ॥
राघव लक्ष्मण इन्द्रचि गमले विद्याधर देव ।
स्वर्ग अयोध्या प्रगटे ऐसा सुजनमनीं भाव ॥ ३८ ॥
राघवचन्द्रा बघून भरती लोकसमुद्रास ।
आली हर्षे करि गर्जन तो धरुनी उल्हास ॥ ३९ ॥
पदोपदीं जन परिचित येउनि आशीर्वच देती ।
होवो उन्नति जय नि वाढ बहु महादरा करिती ॥ ४० ॥
दृश्य सर्व हें मिरवणुकीचें प्रासादांवरुन ।
ललना बघती सुन्दर ज्यांचे कमलासम नयन ॥ ४१ ॥
पूर्णचन्द्रसम शुभ्रशरीरी रामा पद्माक्षा[३] ।
कृष्णमेघसम कान्ति जयाची सुलक्ष्मणा दक्षा ॥ ४२ ॥
बघती ललना ठेवुनि अपुलीं बाजुस गृहकामें ।
खिडक्या त्यांनीं भूषित केल्या स्वमुखें अभिरामें ॥ ४३ ॥
गर्दी अतिशय होतां त्यांची कण्ठांतिल हार ।
तुटुनी झाली मौक्तिक वर्षा लाह्यासम फार ॥ ४४ ॥
चित्तैकाग्र्यें पाहत असतां पैंजण गळलेलें ।
सुन्दर कोण्या एका स्त्रीला मुळिंच न तें कळलें ॥ ४५ ॥
गळुनी पडलें कुण्डलभूषण कोण्या ललनेचें ।
काञ्ची गेली गळुनि कुणाची वृत्त असे साचें ॥ ४६ ॥
[ स्त्रिया राम, लक्ष्मण, सुग्रीव, भामण्डल, मारुति यांचें वर्णन करितात.]

१ हीनप्रतीचें. २ चाकाच्या शब्दांना. ३ कमलाप्रमाणें डोळे ज्याचे.

वदल्या त्या सुन्दरी सखीनां अन्योन्यास जसें ।
होतें तें तें भाषण रुचिकर अन्नासम सुरसें ॥ ४७ ॥
ज्याच्या अङ्कावरती वसली सीता शीलवती ।
राम असे हा विक्रमशाली प्रेमाची मूर्ति ॥ ४८ ॥
सुग्रीवाकृति धरिली ज्यानें साहसगति चोर ।
श्रीरामानें वधिलें त्याचें झालें यश थोर ॥ ४९ ॥
लक्ष्मण हा सखि शक्रविक्रमी झालें प्राप्त जया ।
चक्र तयानें मारुनि रावण अपूर्व मिळवि जया ॥ ५० ॥
वैसुनि रथिं हा जात असे गे विभवें सुग्रीव ।
राम नि लक्ष्मणिं सन्तत ज्याचा सुदृढसुहृद्भाव ॥ ५१ ॥
अङ्गद याचा पुत्र असे हा समरीं वहु धीर ।
भामण्डल हा सीताभ्राता ज्याची मति चतुर ॥ ५२ ॥
जन्मक्षणिं हा देवें हरिला परन्तु करुणेनें ।
सोडि नभांतुनि कुण्डलभूषित करुनी लीलेनें ॥ ५३ ॥
सुपर्णलघ्वी विद्यायोगें हळू हळू खालीं ।
येतां धरिलें इन्दुगतीनें[1] जया दया आली ॥ ५४ ॥
पुत्र तुझा हा बोलुनि ऐसें देइ नभश्चर तो ।
पुष्पवती तद्भार्या करिं घे संमदें[2] तिज होतो ॥ ५५ ॥
तोच असे हा कुण्डलमण्डित भामण्डल शूर ।
रामप्रेमप्रवाह वाहे यन्मनिं भरपूर ॥ ५६ ॥
हा चन्द्रोदर-पुत्र विराधित लक्ष्मण मित्र असे ।
समरमृगेन्द्र[3] प्रीति सुलक्ष्मणिं ज्याची अतुल वसे ॥ ५७ ॥
हा पवनंजयपुत्र विक्रमी उजवा राम-कर ।
मारुति नामें प्रसिद्ध जगतीं गुणवन्त नि चतुर ॥ ५८ ॥
मिरवणूक ती यापरि बघती विस्मित पुरललना ।
हर्षित झाल्या सर्व भूप ते गेले नृपसदना ॥ ५९ ॥

[ राम-लक्ष्मणांनीं सर्व मातांना नमस्कार केला. ]

ज्यांच्यां पुत्रस्नेह दाटला त्या जननी हृदयीं ।
खालीं आल्या सौधावरुनी दुग्ध स्तनिं येई ॥ ६० ॥

---

१ चन्द्रगति नामक विद्याधर राजानें. २ आनन्द. ३ युद्धसिंह.

अतिशयसुगुणी निर्मलशीला कौसल्यादेवी ।
सती केकयी आणि केकया नि सुप्रजा सुदयी ॥ ६१ ॥
राम नि लक्ष्मण भरत नि चौथा अरिघ्न सुत शूर ।
माता त्यांच्या आल्या तेथें ज्या सद्गुणपूर ॥ ६२ ॥
मातृगणा या राम-लक्ष्मणा बघून बहु मोद ।
झाला यानांतुनि उतरुनि ते वन्दिति पद सुखद ॥ ६३ ॥
जोडुनि करयुग विनम्र होउनि निजस्त्रियासहित ।
वन्दन केलें अनुसरुनि क्रम उभयें भक्तियुत ॥ ६४ ॥
सर्वहि माता उभयसुतांना अतिशयहर्षानें ।
नाना देती आशीर्वादा अन्तःकरणानें ॥ ६५ ॥
सगळ्या माता उभयसुतांना हर्षें भेटून ।
स्वसंवेद्यशा सुखा पावल्या जयास उपमा न ॥ ६६ ॥

[ राम-लक्ष्मणांच्या मुखावरून मातांनीं प्रेमानें हात फिरविला. व त्यामुळें त्यांना अपूर्व सुख वाटलें. ]

राघव लक्ष्मण यांच्या वदनावरुनी त्या हात ।
फिरवुनि घेती चुम्बन त्यांचें हो त्या सुख अमित ॥ ६७ ॥
आनन्दाचे नेत्रीं भरले अश्रु महासुखद ।
सुखदुःखांच्या गोष्टी कथिल्या झाला आल्हाद ॥ ६८ ॥
मातांनीं जे स्वमनिं मनोरथ केले फल त्यांचें ।
सहस्रगुणितक्रमें मिळालें न वर्णवे वाचें ॥ ६९ ॥
होत्या सगळ्या सुवीर माता निर्मल हृदयाच्या ।
स्नुषा[1] सेविती ज्यांना सन्तत वदनीं मधुवाचा ॥ ७० ॥
पुण्यवती त्या भूपतिमाता सुपूज्य सकलांना ।
आज्ञा त्यांच्या मान्य जहाल्या त्रिखण्डसकलजनां ॥ ७१ ॥
'इष्टसमागम' नांवाचा हा आहे अध्याय[2] ।
निर्मलमति जो पढतो त्याला मिळते सुखसोय ॥ ७२ ॥
मिळतें त्याला इच्छित वहुधन सुपुण्य भरपूर ।
जिनदासा त्या पूर्णायुष्यहि लाभे सुत चतुर ॥ ७३ ॥

१ सुना. २ पर्व.

जिनधर्माचा पालन केला एकहि नियम जयें ।
समस्तसौख्यें प्राप्त घेतलीं करुनी खचित तयें ॥ ७४ ॥
यास्तव पाळी तूं नियमानें नियमा जिनदासा ।
इहपर-सौख्यें मिळतिल तुजला होइल मुक्ति वशा ॥ ७५ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे ' राम-लक्ष्मणसमागमाभिधानं ' नाम द्व्यशीतितमं पर्व ॥ ८२ ॥

# त्र्याऐंशी व चौऱ्याऐंशीच्या पर्वांची संक्षिप्त कथा.

---

रामचन्द्र व लक्ष्मण हे आठवे बलभद्र व आठवे नारायण आहेत. यांचें भरत व शत्रुघ्नावर अतिशय प्रेम होतें. या चौघा बन्धूंच्या मनांत तिळमात्रही द्वेष नव्हता.

रामचन्द्र व लक्ष्मण यांचें वैभव गौतमगणधरांनीं श्रेणिकराजाला याप्रमाणें सांगितलें. त्यांच्या प्रासादाचें नांव 'नन्द्यावर्त' होतें. हा प्रासाद लक्ष्मीदेवीच्या घराप्रमाणें सुन्दर होता. त्याच्या सभोंवती उंच शिखरांनीं शोभणारा तट होता.

'वैजयन्ती' या नांवाचें सभागृह इतकें सुन्दर होतें कीं तें पाहून इन्द्राला स्वतःच्या सभागृहाची आठवण होत नसे.

सर्व दिशांचा दूरचा प्रदेश दाखविणारें एक सौधकूट नांवाचें पर्वत-शिखराप्रमाणें उंच गृह होतें.

विन्ध्यपर्वतासारखें विशाल 'वर्धमान' नामक प्रेक्षागृह होतें. कोंबड्याच्या अंड्याच्या आकृतीचें गर्भगृह होतें व त्याच्या सभोंवतीं सीता वगैरे राण्यांचे महाल होते. ते सर्व रत्नखचित व अत्यंत सुंदर होते.

जिचा स्पर्श अत्यंत मऊ अशी कमलाकार शय्या सिंहांच्या मस्तकावर शोभत होती.

राम-लक्ष्मणांचें सिंहासन उगवलेल्या सूर्यासारखें तेजस्वी होतें व चन्द्राच्या किरणाप्रमाणें अतिशय शुभ्र अशा चामरांनीं तें शोभत होतें. शुभ्र व सुखदायक छाया देणारें व स्वकान्तीनें चन्द्राला जिंकणारें असें छत्र या राम-लक्ष्मणाच्या मस्तकावर फार खुलून दिसत होतें.

विषमोचिका नांवाच्या पादुका राम-लक्ष्मणांनीं पायांत घातल्यावर आकाशांतून त्या त्यांना नेत असत. व त्या त्यांना अतिशय आनंदवीत असत. यांचीं वस्त्रें अमूल्य, अलंकार दिव्य, कवच कदापि न फुटणारें व रत्नकुंडलें सूर्यास लज्जित करणारीं होतीं. यांच्याजवळचा खड्ग अमोघ, गदा व बाणसमूहही अमोघच होते व यांना त्यांच्याद्वारें अवश्य जयप्राप्ति होत असे. राम-लक्ष्मणांच्या राज्यांत अनेक कोटी नांगर होते व कोट्यवधि गाई व म्हशी होत्या. अयोध्यानगरींत ७० कोटी प्रजा होती. यांचें ऐश्वर्य पाहून कुबेरालाही आश्चर्य वाटत असे.

प्रजाजनांचीं घरें सुंदर शुभ्र व सुवर्णरत्नांनीं भरलेलीं होतीं. प्रत्येक घर चार मजल्यांचें होतें.

बगीचांतील विहिरी सुवर्णाच्या पायऱ्यांनीं शोभत होत्या व तेथें पाण्यांत हंस, सारस वगैरे पक्षी आणि नर-नारी क्रीडा करीत असत. शेतकऱ्यांचीं घरें नेहमी गाई व म्हशींनीं आणि धान्यांनीं शोभत असत. यांच्या राज्यांत कोणीही दुःखी नव्हता.

रामचंद्र व लक्ष्मण इंद्राप्रमाणें शोभत असत व प्रजा– स्त्री-पुरुष देवदेवांगनाप्रमाणें शोभत असत. रामचंद्रांनीं हजारों जिनमंदिरें अयोध्येंत बांधविलीं होतीं. या अयोध्येचा तट रत्नशिखरांनीं चमकत असे. अयोध्येचें वैभव पाहण्यासाठीं आलेल्या लोकांना ही नगरी रामचंद्रांनीं स्वर्ग आणल्याप्रमाणें वाटत होती.

रामचंद्राच्या सगळया गोष्टींची लोक प्रशंसा करीत होते, पण एका गोष्टीबद्दल ते आपसांत कुजबुजत असत. रामचंद्र ज्ञानी, मानी, कुलीन असा क्षत्रियोत्तम आहे पण त्यानें रावणानें हरण करून लंकेस नेलेल्या सीतेला परत आणिलें, हें योग्य झालें नाहीं. सीतेविषयीं असे निंद्य विचार लोकांच्या मनांत उत्पन्न व्हावयाला सीतेनें पूर्वजन्मीं उपार्जिलेलें अशुभकर्म कारण होतें. असो.

रामचंद्र लक्ष्मण यांचें सीतेसह अयोध्येंत आगमन झाल्यावर कांहीं दिवसांनीं भरताच्या मनांत वैराग्यबीज रुजूं लागलें. भरताला दीडशें स्त्रिया होत्या व त्या देवाङ्गनाप्रमाणें सुंदर होत्या व राज्यलक्ष्मीही निष्कंटक होती पण त्यावरचें प्रेम कमी होऊन तो आत्मस्वरूपाचें चिंतन करण्यांत गुंग होत असे. त्याच्या हृदयांत संसार-भय वाढू लागलें. हरिणाला जसें पारध्याचें भय वाटत असतें तसें भरताला संसाराचें भय वाटत होतें. हें चंचल यौवन दोषांचा पुञ्ज आहे. त्यामुळें तरुण माणसें माणुसकी सोडून पापकर्मांत तत्पर होतात. शेकडों खंडी सर्पण जरी अग्नीला मिळालें तरी तो

तृप्त होत नाहीं तसें या जीवाला विषयसुख कितीही मिळालें तरी तृप्ति होतच नाहीं. इत्यादि विचारांनीं भरताच्या मनांत वैराग्य वाटलें व तो राजवाड्यांतून त्वरेनें दीक्षा घेण्यासाठीं निघणार असें पाहून केकया रामचंद्राकडे आली व 'भरत विरक्त झाला आहे. वत्सा! तूं त्याला थांबव' असें म्हणाली.

राम-लक्ष्मण भरताकडे आले व त्याला म्हणाले– "भरता! तुला आपल्या पिताजीनें राज्याभिषेक करून राज्य दिलें हें तुला आठवते ना! तूं अयोध्येचाच राजा नसून आमचाही राजा आहेस. हें सुदर्शनचक्र व हे सगळे विद्याधर तुझी आज्ञा पाळतील. भरता, मी स्वतः तुझ्या मस्तकावर छत्र धारण करीन. लक्ष्मण तुझा मंत्री होईल व शत्रुघ्न तुझ्यावरून चामरें वारील. ही माझी विनंती जर तूं मान्य करणार नाहीस तर मी पुनः वनांत निघून जाईन. रावणाला जिंकून तुझ्या दर्शनासाठीं मी आलों आहे यास्तव ही माझी इच्छा तूं पूर्ण कर. या निष्कंटक राज्यांचा उपभोग घे. नंतर आमच्याबरोबर दीक्षा घेऊन तप कर" यानंतर रामचंद्राला भरतानें असें म्हटलें– हे बन्धो, माझ्या विरक्तमनाला ही राज्यलक्ष्मी आवडेनाशी झाली आहे तिचा त्याग करून तपश्चरणानें मुक्तिराज्य मिळवावें असें त्याला वाटत आहे. आतापर्यंत मी पित्याच्या आज्ञेला अनुसरून प्रजापालन केलें आहे. विषयभोग भोगले आहेत. सुपात्रांना दानें दिलीं आहेत व आतां पित्याच्या मार्गाचें अनुसरण करावें असें वाटू लागलें आहे. यास्तव जिनेश्वराच्या रत्नत्रयमार्गात प्रवृत्त होऊन मोक्ष मिळवीन. या माझ्या मंगलकार्यास तूं मला अनुमति दे. असें बोलून भरत आसन सोडून त्वरेनें गमन करूं लागला. इतक्यांत लक्ष्मणानें त्याला प्रतिबंध केला.

माता कैकेयीनेंही डोळ्यांत अश्रु आणून त्याला प्रतिबंध केला. रामचंद्राच्या आज्ञेनें सती सीता, सती विशल्या, उर्वी, बंधुमती, पद्मा इत्यादिक स्त्रियांनीं भरताला धरलें व त्या भरताला– भाऊजी, आपण जलक्रीडा करण्यासाठीं आमच्याबरोबर यायलाच पाहिजे असा आग्रह धरला. यामुळें भरत आपल्या स्त्रिया व सीता वगैरे भावजयाबरोबर जलक्रीडा करण्यासाठीं निर्विकार मनानें गेला. सर्वांनीं भरताच्या अंगाला सुगंधी लेपन लावलें. नंतर जलक्रीडा करून तो सरोवरांतून तटावर आला व तेथें भक्तीनें जिनपूजा करूं लागला.

इतक्यांत 'त्रिलोकमण्डन' नांवाचा हत्ती खांब मोडून व गर्जना करीत गांवांतून पळत सुटला. त्याच्या मदधारांनीं जमीन ओली झाली. सरोवराकडे येत असतां वाटेंतली रत्नमय वेस त्यानें उद्ध्वस्त केली. त्या प्रचण्ड हत्तीला पाहून सर्व

स्त्रिया भरताला शरण आल्या. आतां हा हत्ती भरताला मारून टाकील असें वाटून कौसल्यादिक माता स्नेहानें रडूं लागल्या.

रामचंद्र व लक्ष्मण यानीं त्याला नागपाशानें बांधण्याचा प्रयत्न केला पण तो हत्ती धांवत भरताकडे आला. भरताला पाहिल्याबरोबर गुरुदर्शनानें नम्र होणाऱ्या शिष्याप्रमाणें तो नम्र झाला. त्याचा क्रोध मावळला. तो शान्त झाला.

प्रमानें भरतानें त्याला मधुरशब्दांनीं म्हटलें— गजराज, बाबा तुला कोप कां बरें आला? कां तुला कोणी ताडन केलें काय? हें भाषण ऐकून हत्तीनें प्रेमानें भरताला पाहिलें व तो आपल्या हीनस्थितीचा विचार करूं लागला. त्याला जातिस्मरण झालें. पूर्वी आम्ही दोघे सहाव्या ब्रह्मोत्तर स्वर्गात देव होतो. एकमेकाचे मित्र होतो. पण तीं देवसुखें भोगून पुण्यांशानें हा श्रेष्ठ पुरुष भरत झाला. पण मी अशुभोदयानें ह्या पशुदशेला प्राप्त झालों आहे. या पशुदशेंत मला कार्याकार्याचा विवेक राहिला नाहीं. आतां मला पश्चात्ताप होत आहे. आतां ज्यानें आत्महित होईल असेंच कार्य मी करीन. याप्रमाणें त्या गजेन्द्राच्या मनांत विचार उद्भवून तो शान्त झाला.

भव्य हो! अशुभ नष्ट करण्यासाठीं व शुभ प्राप्त व्हावें म्हणून जिनेश्वराचे दास व्हावें. म्हणजे भवनाश होतो. असें जिनवाणी सांगते.

याप्रमाणें चिंता करणाऱ्या गजराजाला राम-लक्ष्मणांनींही मधुर भाषण करून वश केलें. हा प्रचंड हत्ती शांत झाल्यावर सर्व अयोध्येचें भय दूर झालें.

ज्याला प्रथम विकार उत्पन्न झाला पण नंतर पुण्योदयानें जो शांत झाला अशा हत्तीची कथा नगरवासीलोक करूं लागले.

यानंतर त्या हत्तीला अलंकारांनीं भूषित केलें व त्यावर सती सीता व सती विशल्या यांच्यासह भरत आरूढ झाला. इतर स्त्रियाही अनेक वाहनांवर आरूढ होऊन त्या भरताबरोबर निघाल्या. शत्रुघ्न अश्वरथांत बसून निघाला. नाना वाद्यें वाजत होतीं. याप्रमाणें सरोवराहून निघून भरत राजवाड्यांत आला. भोजनशाळेंत जाऊन साधूंना त्यानें आहार दिला. नंतर मित्र, मंत्रिगण व भावजयासह भरतानें जेवण केलें.

इकडे हत्तीनें आहारपाण्याचा त्याग केला. हत्तीच्या सेवकांनीं अनेक प्रकारें विनवण्या करून त्यानें आहार घ्यावा म्हणून प्रयत्न केला, उत्तम वैद्यांना बोलावून

# त्र्याऐंशीवें पर्व.

[ राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न या चौघा बंधूंत अखंड स्नेह होता.]

राम नि लक्ष्मण बलनारायण अष्टम हे असती ।
भरत भूमिपति नृपशत्रुघ्नहि अन्योन्यावरती ॥ १ ॥
स्नेह निरन्तर करिती चौघे द्वेष न हृदयांत ।
वसे तयांच्या सौख्या भोगिति अखण्ड दिनरात ॥ २ ॥

[ श्रेणिकराजाला या बलनारायणांचें वैभव गौतमगणधरांनीं याप्रमाणें सांगितलें.]

वैभव यांचें गौतमगणिनें श्रेणिकभूपास ।
कथिलें जें तद्वर्णन येथें करितो सविशेष ॥ ३ ॥
दरवाजे बहु उच्च गोपुरें[1] ऐसा प्रासाद ।
भासे इन्द्रालय जणु लक्ष्मीगृह दे जें मोद ॥ ४ ॥
सुनाम नन्द्यावर्त जयाचें विशाल तट ज्यास ।
शिखरें ज्याचीं उंच नभामधिं भिडती मेघास ॥ ५ ॥
असे वैजयन्त्यभिधा[2] ज्याची उच्च सभास्थान ।
इन्द्रालाही जें बघतां हो स्वसभाविस्मरण[3] ॥ ६ ॥
चन्द्रकान्तमणिनिर्मित ऐसें सुवीथि नांवाचें ।
शालागृह बहु रम्य नि शीतल सुखकर जें साचें ॥ ७ ॥
अतिशय उंचस्थान दिशांना जें अवलोकाया ।
सौधकूट या नांवें शोभे कदापि नच वाया ॥ ८ ॥
विन्ध्याचलसम अतिशय मोठें प्रेक्षागृह[4] साचें ।
नाम जयाचें वर्धमान हें बुध वदती वाचें ॥ ९ ॥
कुक्कुट अण्डासमान आकृतिधारक गर्भगृह[5] ।
एकस्तम्भी कल्पतरूसम अद्भुत जें गेह ॥ १० ॥
गर्भगृहाला गोलाकारें घेरुनि देवींची ।
रत्नगृहांची पङ्क्ति तरङ्गावली सुनामाची ॥ ११ ॥

---

१ वेशी. २ नांव. ३ आपल्या सभेचें स्मरण न होणें. ४ नाटकगृह.
५ मध्यगृह— माजघर.

मृगपतिमस्तकिं शोभे मृदुलस्पर्श जिचा फार ।
शय्या ऐसी झोपायाची जी कमलाकार[1] ॥ १२ ॥
सिंहासन जें उद्गतसूर्यासम अतिशय चमके ।
चन्द्रकरासम निर्मल चामर बघतां मन हरखें ॥ १३ ॥
जें चन्द्रासम शुभ्र नि विस्तृत इष्टच्छायेस ।
वितरी दिव्यच्छत्र कलङ्की सतत हसे शशिस ॥ १४ ॥
दोन पादुका सुन्दर गगनीं गमन सुखें होतें ।
गरलमोचिका[2] नाम जयांचें सुखविति चित्तातें ॥ १५ ॥
अनर्घ्यवस्त्रें दिव्यभूषणें कवच न फुटणारें ।
कुण्डलयुगही बहु तेजस्वी सूर्या हसणारें ॥ १६ ॥
अमोघखड्ग नि गदा नि शरगण अन्यमहास्त्रेंही ।
अतितेजस्वी विजया देती संशय नच लवही ॥ १७ ॥
नांगर होते राघवराज्यीं ज्यांची नच गणती ।
गोधन तेंही अनेक कोटिप्रमाण बुध वदती ॥ १८ ॥
साकेतापुरिं सत्तरकोटीहुनि जनता अधिक ।
समृद्धि ज्यांची बघुनि कुबेरहि विस्मित हो देख ॥ १९ ॥
घरें जनांचीं शुभ्र नि सुन्दर रत्नांनीं भरलीं ।
अखण्ड अक्षय जणु निधिसम तीं लक्ष्मी करि केली ॥ २० ॥
होते नानाविध धान्यांचे ढीग जसे शैल ।
सदनें तेथिल चार जयांना मजले सुखशील ॥ २१ ॥
उद्यानामधिं सोपानांनीं युक्त अशा विहिरी ।
क्रीडा करिती हंसादिक खग सुजलीं नरनारी ॥ २२ ॥
शेतकऱ्यांचीं सदनें सन्तत गायीमहिषींनीं ।
शोभत होतीं दुःखी तेथें दिसत नसे कोणी ॥ २३ ॥
तेथें सेनापति सामन्त नि दिसती दिक्पाल ।
नृप तेजस्वी विभवें होते सुरेन्द्रसमलील ॥ २४ ॥
सुराङ्गनासम ललना सुन्दर सौख्यांच्या खाणी ।
इच्छित सौख्यें मनुजां मिळतीं दुःखी नच कोणी ॥ २५ ॥

---

१ कमळाच्या आकाराची. २ दुसऱ्यांनीं पायांत घातल्याबरोबर बाहेर विष फेकणाऱ्या.

भारतभूही समृद्ध केली राघवराजानें ।
लक्ष्मी नान्दे येथें सन्तत जैशी हरिपेणें ।। २६ ।।
राघवदेवें जिनविम्बासह रचिलीं जिनसदनें ।
वैभवशाली पूजन चाले जिथें अखण्डपणें ।। २७ ।।
पर्वत सरिता ग्रामें नगरें सुन्दरशा स्थानीं ।
गृहें हजारो जिनवर्याचीं रचिलीं पुण्यखनी ।। २८ ।।
रामाचीं जणु यशोगृहें हीं ध्वजा-पताकांनीं ।
शोभत होतीं सदा वाद्यरव येई जनकानीं ।। २९ ।।
देश अयोध्या सगळा वाटे स्वर्गासम सुजना ।
असे अयोध्या इन्द्रपुरीसम गमते साधुमना ।। ३० ।।
अतिशय उन्नत वाडे होते पुरींत वाटत ते ।
क्रीडापर्वत जणु तेजानें हरिती सुजनातें ।। ३१ ।।
अथवा दिसती शारदमेघासमान लोकमना ।
किंवा विद्यासौधमहोन्नत हें स्वमनीं आणा ।। ३२ ।।
या नगरीचा उंच असा तट मणिमय सकलदिशा ।
करी प्रकाशित ज्याचीं शिखरें सदैव तमनाशा ।। ३३ ।।
निजकिरणांनीं व्योमा उजळी सगळा मणिवृन्द ।
ऐसा त्रिभुवनिं दिसत न कोठें देई सुखकन्द ।। ३४ ।।
जणु ही नगरी यक्षपुरी कां वाटे विबुध मना ।
रामें रचिली इतर कुठेंही नसे असेचि गणा ।। ३५ ।।
अतिशय सुन्दर ऐसें म्हणती कोणी सुरलोक ।
राम-लक्ष्मणें जणु आणियला येथें निःशंक ।। ३६ ।।
पुण्यें विरहित असती आणी प्रवेश नच त्यांचा ।
येथें होतो म्हणुनि कदापि स्वर्ग असे साचा ।। ३७ ।।

[ सीतेच्या अशुभकर्माच्या उदयानें तिच्याविषयीं लोकांच्या मनांत असद्भावना उत्पन्न झाली. ]

उज्ज्वल ऐशा या देशामधिं दूषण एक असे ।
लज्जा-निन्दाकारण सुजना दुःख जयांत वसे ।। ३८ ।।
जी विद्याधरनाथें नेली हरुनी लङ्केस ।
रामें सीता परत आणिली उचित नसे त्यास ।। ३९ ।।

ज्ञानी मानी कुलीन आहे क्षत्रिय जरि राम ।
केलें त्यानें सीतास्वीकृति अकीर्तिकर काम ॥ ४० ॥
पूर्वभवीच्या सीताकर्में ऐसा परिवाद[1] ।
क्षुद्रजनांत प्रसरण पावे देइ मना खेद ॥ ४१ ॥

[ भरताचें मन वैराग्याकडे झुकूं लागलें. ]

स्वर्गा लज्जित करिते ऐशा पुरीं अयोध्येंत ।
राहे यद्यपि भरत मनीं हा भरतासम[2] विरत ॥ ४२ ॥
स्त्रिया दीडशे सुराङ्गनासम त्यांचा भरत पति ।
राज्यरमेला अप्रिय मानुनि करि निजरूपिं रति ॥ ४३ ॥
रत्नें जडलें अङ्गण ज्याचें ऐसे प्रासाद ।
सुन्दरनारीमण्डित बघुनि हि गमे न ज्या मोद ॥ ४४ ॥
क्रीडास्थानें जेथें चाले कोमलसंगीत ।
परि भरताचें मन त्या पाहुनि बने न अनुरक्त ॥ ४५ ॥
भवभय[3] वाढे ज्याच्या हृदयीं ऐसा भरत दिसे ।
हरिणासम तो व्याधाचें भय सन्तत ज्यास असे ॥ ४६ ॥
मानवता ही दुर्लभ आहे चञ्चल यौवन हें ।
जणु फेसाचा पुञ्ज विनाशी दोषोत्कर[4] पाहे ॥ ४७ ॥
विरस भोग हे जीवित वाटे स्वप्नासम नाशी ।
बन्धुसमागम दिसे तयाला भयद जशी फाशी ॥ ४८ ॥
चिन्तुनि ऐसें चित्त तयाचें विरक्तिमय झालें ।
प्रतिदिवशीं तें निजात्मचिन्तनिं सन्तत बहु रमलें ॥ ४९ ॥
त्याज्य असे हें शरीर नाना रोगांचें सदन ।
सप्तमलांनीं भरलें वाटे हें अशुचिस्थान[5] ॥ ५० ॥
खण्डोगणती सर्पण सेवुनि तृप्ति न अनलास[6] ।
सहस्रसरिता अर्पिति जल नित तृप्ति न जलधीस ॥ ५१ ॥
कामासक्ता बुद्धि जयाची असतो अविवेकी ।
लुब्ध पतङ्गासमान दुःखी हो नर तो नरकीं ॥ ५२ ॥

---

१ अपवाद, निंदा, २ भरतचक्रवर्तीप्रमाणें. ३ संसारापासून भीति. ४ दोषांचा समूह. ५ विष्टागृह. ६ अग्नीला.

स्तन स्त्रियांचे मांसपिण्ड हे यावरि रति करिती ।
गलगण्डासम[1] भयद गमे मज पापा हेतु अति ॥ ५३ ॥
ताम्बूलाचा रस जणु आहे लाल असे रक्त ।
दन्तपङ्क्ति जणु कीटक ऐशा स्त्रीमुखिं अनुरक्त ॥ ५४ ॥
होउनि मानिति चन्द्रबिम्ब हें आल्हादक शान्त ।
परि तें भासे सर्पविलासम शोभा नच त्यांत ॥ ५५ ॥
जैशी चेष्टा व्रातें होतें तैशी उन्मादें[2] ।
स्त्रीचेष्टा जी विलास तिजला नाम कसें बुध दे ॥ ५६ ॥
स्त्रीवपु भरलें मलें त्वचेचें छादन वरि दिसतें ।
नारीसेवन सुखकर वदती जे जन विबुध न ते ॥ ५७ ॥
विष्ठाकुम्भद्वयास जोडुनि होइल सुख कैसें ।
स्त्रीसम्भोगा सुख जो मानी तो नर विबुध नसे ॥ ५८ ॥
इच्छामात्रें देवसुखांचा अनुभव घेउनि ही ।
तृप्त न झाला मानवसौख्यें तृप्ति न त्या पाही ॥ ५९ ॥
तृणाग्रनीरें[3] तृप्ति न जैशी तैशी मनुजसुखें ।
श्रम तो केवल ऐसें वदती गणधर एकमुखें ॥ ६० ॥
उत्तम राज्यश्रीही भोगुनि तृप्त न सौदास ।
झाला कुत्सित मांसा सेवुनि अकीर्तिचा दास ॥ ६१ ॥
हस्तिशवांमधिं[4] विलुब्ध होउनि मांसा काकगण ।
गङ्गापूरें वाहुनि सागरिं पावति झणि मरण ॥ ६२ ॥
मोहकर्दमीं[5] निमग्न मानव जणु हे बेडूक ।
लोभोरग हा डसुनी नरकीं देतो बहु दुःख ॥ ६३ ॥
यापरि चिन्तन करीत असतां विरक्त भरताचें ।
व्यतीत होती कित्येक दिवस प्रशान्त मन ज्याचें ॥ ६४ ॥
समर्थ असुनिहि सिंह पञ्जरीं मनांत खेद धरी ।
दुःखविनाशी जैनव्रत नच मिळतां दुःख वरी ॥ ६५ ॥

[ केकयेनें भरत विरक्त झाला तूं त्यास थांबव असें रामास म्हटल.
तेव्हां रामचंद्र त्यास पुनः राज्य करण्याचा आग्रह करितात. ]

---

१ गण्डमाला नामक रोगासारखे. २ मदनाच्या उत्कटतेनें. ३ गवताच्या टोकावर असलेल्या जलबिंदूनें. ४ हत्तीच्या मढ्यांत. ५ मोहाच्या चिखलांत.

खिन्न केकया होउनि वदली येउनि रामास ।
भरत जाहला विरक्त वत्सा ! बान्धव तूं त्यास ॥ ६६ ॥
रामलक्ष्मणें स्नेहें म्हटलें दीक्षोत्सुक जनकें ।
भरता तुजला राज्य दिलें हें स्मरतें कां न निकें ॥ ६७ ॥
अभिषेकुनि तुज राज्य धरेचें दिलें नि तूं असुचा ।
राजा असशी करि लोकांचें पालन शुभवाचा ॥ ६८ ॥
चक्रसुदर्शन खेचर सगळे पाळिति आदेशा ।
पृथ्वी सब ही पत्नीसम जणु भोगी भरतेशा ॥ ६९ ॥
तुझ्या वत्सला ! स्वयं राम मी छत्र धरीन शिरीं ।
वारिल चामर रिपुघ्न सुन्दर धरुनी शुभ्र करीं ॥ ७० ॥
मन्त्री लक्ष्मण होइल मोदें विनती माझी ही ।
मानी ना तरि वनांत जाऊन पुनरपि हें पाही ॥ ७१ ॥
राक्षसवंशीं तिलकासम जो अशा दशास्यांस[1] ।
जिंकुनि आलों बघण्या तुजला पुरवी मम आस ॥ ७२ ॥
निष्कण्टक या राज्या भोगी अमुच्यासह भरता ।
नन्तर दीक्षा घेऊ राहिल तपांत तत्परता ॥ ७३ ॥

[ भरताचें रामाला उत्तर. ]

यापरि बोलत असतां वदला भरतहि रामास ।
राज्यरमा ही विरक्तचित्ता न रुचे आम्हास ॥ ७४ ॥
राज्यरमेचा त्याग करावा इच्छी मन माझें ।
त्यागुनि तिजला वीर तपानें मिळविति शिवराज्यें ॥ ७५ ॥
हे राजेन्द्रा ! अर्थकाम हे चञ्चल दुःखयुत ।
मूढचि सेविति यातें शूर न दिसती त्या द्विष्ट ॥ ७६ ॥
हलायुधा[2] श्रीरामा ! सुरजनभोग्यसुभोगांत ।
विपुल जरी ते असोत मम रुचि नसे अनित्यांत ॥ ७७ ॥
घोर भवोदधि मृत्युरसातळ[3] अगाध त्यांत वसे ।
तरङ्ग उठती नानाजन्मचि दुःख सदैव दिसे ॥ ७८ ॥
रागद्वेषग्राह तयामधि सन्तत फिरतात ।
व्रतपोतें मन तरावया त्या इच्छी मम तात ॥ ७९ ॥

---

१ रावणाला. २ हल नांवाचें शस्त्रधारण करणारा. ३ मृत्युरूपी पाताल.

योनिसमूहीं नानादुःखें भोगित मी फिरलों ।
दुःसह तेणें मज भय वाटे श्रान्तहि बहु झालों ॥ ८० ॥

[ अन्य राजांनींही भरताला विरक्ततेपासून विरक्त करण्याचा प्रयत्न केला.]

यापरि ऐकुनि भरतसुभाषण विस्मित नृप झाले ।
सकम्पवचनें वदले नयनहि झाले झणिं ओले ॥ ८१ ॥
करि प्रजेचें पालन भूपा पाळी पितृवचना ।
राज्यरमा ही नच अवमानी सुखवी भ्रातृजना ॥ ८२ ॥

[ भरताचें उत्तर. ]

भरतहि वदला तातवचन मी पाळुनि जनतेला ।
नृपलक्ष्मीचें रक्षण केलें भोगुनि भोगाला ॥ ८३ ॥
दान दिलें मी साधुगणाला केलें सन्तुष्ट ।
ताताचरणा करुं इच्छी मन वारी भवकष्ट ॥ ८४ ॥
सत्कार्यामधिं आपण द्यावी अनुमति कां न मला ।
श्लाघ्यवस्तुमधिं वृत्ति जिनें मम राही नित अमला ॥ ८५ ॥
बहुत नद्यासह गङ्गा भेटे जरी समुद्रास ।
तृप्त कराया समर्थ नच ती तयास हें खास ॥ ८६ ॥
अरिगण जिंकुनि तुमच्याद्वारें लक्ष्मी मेळविली ।
विस्तृतगङ्गेसमान तरिही तृप्ति न मम झाली ॥ ८७ ॥
यास्तव आतां जिननाथाच्या रत्नत्रयमार्गीं ।
प्रवृत्त होउनि निजहित साधिन जें कीं अपवर्गी ॥ ८८ ॥
ऐसें बोलुनि भवभीतीनें आसन सोडून ।
भरतेशासम भरतहि उठुनी त्वरें करी गमन ॥ ८९ ॥

[ भरत त्वरेनें दीक्षा घेण्यासाठीं जात असतां लक्ष्मणानें त्याला प्रतिबंध केला तोंच भरतमाता, भरतस्त्रिया व सीता वगैरेंनीं त्याला घेरलें व त्याला जलक्रीडेकरितां जावें लागलें. ]

इतुक्यामध्यें हरिनें त्याला केला प्रतिबन्ध ।
अश्रू आणुनि नयनीं झाली माता स्नेहान्ध ॥ ९० ॥

---

१ वडील दशरथमहाराजांचें आचरण, अर्थात् मुनिव्रतांचें पालन. २ मोक्षविषयक.

रामाज्ञेनें ललना आल्या लक्ष्मीसम रूपें ।
रोधियलें त्या श्रीभरताला प्रेमाच्या कोपें ॥ ९१ ॥
सती जानकी उर्वीदेवी पद्मा वन्धुमती ।
सती विशल्या आदिक रतिला लज्जित ज्या करिती ॥ ९२ ॥
तयें घेरिलें भरता वदल्या देवर ! कासारीं ।
क्रीडा आपण करूं खिन्नता कदापि नैव बरी ॥ ९३ ॥
धात्री सोडुनि समस्त चिन्ता जी मन खिन्न करी ।
भावजयींचा समूह वोले अमुचें कार्य धरी ॥ ९४ ॥
सुराङ्गनासम रूपवती त्या पाहुनि भावजया ।
मानस झालें विकृत न याचें येई त्यांत दया ॥ ९५ ॥
निजभार्यासह भावजयांना घेउनि तो जाय ।
सरोवरावरि परन्तु हृदयीं उदास वहु होय ॥ ९६ ॥
आग्रह त्यांचा मान्य न करण्या समर्थ नच झाला ।
म्हणून नीरक्रीडा करण्यास्तव तो तैं गेला ॥ ९७ ॥
विनय तयांच्याविषयीं त्यानें धारण मनिं केला ।
करिणीमध्यें करिराजासम जना तदा दिसला ॥ ९८ ॥
स्निग्ध सुगन्धित सुन्दर लेपन त्याच्या अंगास ।
तयें लाविलें करिती त्यासह क्रीडारंगास ॥ ९९ ॥
करुनि स्नाना सरोवरांतुनि आला भरत तटीं ।
केली त्यानें श्रीजिनपूजा धरुनि मनीं प्रीति ॥ १०० ॥

[ त्रिलोकमंडन हत्ती उन्मत्त होऊन सरोवराकडे धावत आला. ]

इतुक्यामध्यें आला तेथें गर्जत करि एक ।
त्रिलोकमंडन नांव जयाचें सकोप वहु देख ॥ १०१ ॥
मोडुनि खांवा महाभयंकर गर्जन करित करी ।
मदधारांनीं जमीन भिजवी वेगें गमन करी ॥ १०२ ॥
मेघासम तें गभीर गर्जन ऐकुनि पुरवासी ।
घावरले वहु जिकडे तिकडे पळती सकल दिशीं ॥ १०३ ॥
शैलासमसें रत्नविनिर्मित गोपुर पाडून ।
सुगज निघाला वेगें जेथें भरताचें स्थान ॥ १०४ ॥

पाहुनि नारी भ्याल्या आल्या श्रीभरता शरण ।
व्योमीं जैसें प्रचण्ड सूर्या अवलम्बिति किरण ॥ १०५ ॥
भरतासंमुख जाणारा गज पाहुनि हळहळले ।
हा हा रव जन करिते झाले अतिशय घावरले ॥ १०६ ॥
माता होउनि भयविह्वल त्या झाल्या अतिखिन्न ।
पुत्रस्नेहें केलें त्यांनीं करुणावह रुदन ॥ १०७ ॥
परिकर बान्धुनि राम नि लक्ष्मण वशकरणज्ञानी ।
पकडायातें प्रयत्न करिती फणधर[१]पाशांनीं ॥ १०८ ॥
रोपानें जो प्रचण्डगर्जन करी करी भरता ।
पाहुनि झाला प्रशान्त झडकरि पूर्वभवां स्मरतां ॥ १०९ ॥
दुःखीं झालें चित्त तयाचें सोंड करी शिथिल ।
भरतापुढती राहि उभा तो शिष्यासम सरल ॥ ११० ॥
प्रेमें वदला भरत तयाला सुमिष्टवचनांनीं ।
गजराजा कां कोप तुला ये ? ताडन करि कोणी ॥ १११ ॥
ऐकुनि भाषण शान्त जहाला प्रेमें भरतास ।
पाहुनि अपुल्या हीनस्थितिच्या करि तो स्मरणास ॥ ११२ ॥
पूर्वीं होतों आम्ही दोघे षष्ठस्वर्गांत ।
अन्योन्याचे मित्र निरन्तर सुरसुखिं अनुरक्त ॥ ११३ ॥
हा च्युत होउनि पुण्यांशानें पुरुषोत्तम[२] झाला ।
प्राप्त जहालों निन्दितकर्में हा ! या पशुतेला[३] ॥ ११४ ॥
कार्याकार्यीं विवेक नाहीं मदान्धयोनींत ।
जन्म जहाला गजता आली मन हो अनुतप्त[४] ॥ ११५ ॥
आतां जेणें हित आत्म्याचें होइल तें कार्य ।
करिन जयाची सदा प्रशंसा करिती जन आर्य ॥ ११६ ॥
यापरि झालें पूर्वभवाचें स्मरण गजेन्द्रास ।
पापापासुनि विमुख जहाला चिन्ती सुकृतास ॥ ११७ ॥
केलीं पूर्वीं अशुभ कुकर्मे देती सन्ताप ।
जाणुनि सुजनें शुभचि करावें जें हरि भवपाप ॥ ११८ ॥

१ नागपाशांनीं. २ श्रेष्ठ मनुष्य. ३ पशुपणाला. ४ पश्चात्तापानें भरलेलें.

विवेकरविच्या उदयें स्खलन न होय कुकर्मांत ।
प्रकाश पडतो मनःप्रदेशीं गति हो सुपथांत ॥ ११९ ॥
अशुभ हराया शुभ लाभाया व्हावें जिनदास ।
श्रीजिनवाणी ऐसें कथिते जी करि भवनाश ॥ १२० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे त्रिभुवनालङ्कारक्षोभाभिधानं नाम त्र्यशीतितमं पर्व ॥ ८३ ॥

# चौऱ्याऐंशीवें पर्व.

( राम-लक्ष्मणांनीं हत्तीला वश केलें व इतरजनांनीं त्याला भूषविलें. )

यापरि चिन्ता करणारा हा विनयी गजराज ।
राम-लक्ष्मणें मधुर वदुनि वच केला वश सहज ॥ १ ॥
इतरजनांनीं आनन्दानें आदर वहु करुन ।
भूषित केलें विविधभूषणें त्यावरि चढवून ॥ २ ॥
प्रशान्त होतां गजश्रेष्ठ तो निर्भय पुर झालें ।
मेघें विरहित व्योमासम तें सुन्दर तें दिसलें ॥ ३ ॥
खेचर आणिक सुरगण ज्याची गति रोधु न शकती ।
राम-लक्ष्मणें रोधियला तो गजवर शीघ्रगति ॥ ४ ॥
विकृतिस पावुनि शान्त जहाला पूर्वीच्या सुकृतें ।
कथा तयाची सांगु लागले पुर-प्रजाजन ते ॥ ५ ॥

( भरत जानकी व विशल्या यांच्यासह हत्तीवर वसून अयोध्येंत आला. )

सती जानकी तेवि विशल्या यांच्यासह भरत ।
वसुनि गजावरि सरोवराहुनि निघे गृहा त्वरित ॥ ६ ॥
भूषणभूषित अन्यहि राण्या होउनि आरूढ ।
नानावाहनिं भरताभोंवति जमल्या निर्मूढ[1] ॥ ७ ॥
अश्वरथामधि वैसुन चाले विभवें शत्रुघ्न ।
तेजें ज्याच्या रवि लज्जित हो येई नच विघ्न ॥ ८ ॥
भेरी शंख नि नाना वाद्यें वाजति समकाल[2] ।
पुढती चाले नृपशत्रुघ्नहि जो दशरथबाल[3] ॥ ९ ॥
कुसुमामोदोद्याना सुन्दर नन्दनसम होते ।
स्वर्गासम जणु लङ्घुनि जाई निजपुर जों येतें ॥ १० ॥

( सत्पात्रांना दान देऊन भरतानें आहार केला. )

करिवरुनी नृप उतरुनि जाई भोजनशालेंत ।
साधुवरांना वन्दुनि देई भोजन हो मुदित ॥ ११ ॥

---

१ शहाण्या. २ एकदम. ३ दशरथराजाचा पुत्र.

मित्र-मन्त्रिगण भावजयासह करि नृप आहार ।
लोकहि देती साधुजनांना करिति न अव्हेर ॥ १२ ॥
रागावुनि हा हत्ती आधीं शान्त पुनः झाला ।
भरतासंनिध राहि उभा तो विचित्र करि लीला[1] ॥ १३ ॥

( महातानें श्रीरामाजवळ येऊन हत्ती चार दिवसापासून आहार घेत नाहीं असें सांगितलें. )

ऐशी नगरीं कथा तयाची जनांत नित चाले ।
वार्ता त्याची महात रामा येउनि ही वदले ॥ १४ ॥
देव ! राजगज निश्चल आहे सदा निजध्यानीं ।
दिवस संपले तीन आजचा चौथा मनिं आणी ॥ १५ ॥
ज्या दिनिं होता क्षुब्ध जहाला तेव्हांपासून ।
दीर्घश्वासा सोडुनि राहे ध्यानीं नित लीन ॥ १६ ॥
मधुनि केधवा सोंड आपटी विचार कांहिं तरी ।
करून करिवर मनांत अमुच्या कारण ये न उरीं ॥ १७ ॥
पुष्कळ आम्ही विनतिहि केली घेइ न आहार ।
निजदन्ताग्रीं शुण्डा ठेवुनि चिन्ता करि फार ॥ १८ ॥
मिटुनी डोळे निश्चल राही वाटे चित्रकरी[2] ।
कृत्रिम किंवा सत्य असे गज संशय येइ उरीं ॥ १९ ॥
पुष्कळ केली विनती असतां घेउनि सोंडेत ।
मधुरग्रासहि वदनिं न घाली टाकुनि दे त्वरित ॥ २० ॥
चरण एक वरि धरून राही त्रिपदें सतत उभा ।
स्तम्भासंनिध सशोक गमते अपूर्वशी आभा[3] ॥ २१ ॥
समस्त शास्त्रज्ञाते येउनि वैद्य परीक्षिति त्या ।
परन्तु त्याचा भाव अलक्षित[4] राही त्या ज्ञात्या ॥ २२ ॥
सुन्दर गायन केलें जरिही लक्ष्य न तो देई ।
समजे आम्हां चित्त न अपुलें कोणिकडे नेई ॥ २३ ॥
मन्त्र नि औषध विद्या यांचा प्रयोग जरि केला ।
अत्यादर मनिं ठेवुनि राजन् ! व्यर्थचि तो झाला ॥ २४ ॥

---

१ हत्तीची लीला. २ चित्रांतील हत्ती. ३ कान्ति, शोभा. ४ न जाणला गेलेला.

विहरण निद्रा अन्न नि पाणी घेण्याविषयिं जरी ।
विनती केली परि तो विफलचि करितो सकल करी ॥ २५ ॥
हृदयीं त्याच्या काय असे हें कोणासहि नुमजे ।
रहस्य अद्भुत हें अज्ञेयहि[1] भूमितलीं गाजे ॥ २६ ॥
जणु चित्रस्थित गजाप्रमाणें न तोष रोष करी ।
न मान माया मनीं धरी हा गमे विचित्र करी ॥ २७ ॥
अद्भुत याचा असे पराक्रम मूलचि राज्याचें ।
त्रिलोकभूषण मानिति यातें करी असा साचे ॥ २८ ॥
उपाय यावरि काय करावा आम्हां नच ठावें ।
फक्त निवेदन केलें आम्ही हृदयीं हें ध्यावें ॥ २९ ॥
दास जिनाचे राम नि लक्ष्मण चिन्तातुर झाले ।
पूर्वाचरणा स्मरुनि गजाच्या ते न मनीं धाले ॥ ३० ॥
बन्धस्तम्भा क्रोधें तोडुनि शान्तहि हा झाला ।
अन्नजलाचा त्यागी याची अपूर्व ही लीला ॥ ३१ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे त्रिभुवनालंकारशमाभिधानं नाम चतुरशीतितमं पर्व ॥ ८४ ॥

---

१ न जाणतां येणारे.

# पंच्याऐंशीव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

अयोध्येच्या महेन्द्रोदय नामक उद्यानांत देशभूषण व कुलभूषण नांवाचे दोन केवलीमुनि आले. त्यांच्या वंदनेसाठीं रामचंद्र, लक्ष्मण आदिक राजे आपल्या परिवारासह गेले. त्रिलोकमंडन हत्तीलाही त्यांनीं बरोबर नेलें होतें. भगवंतांना त्यांनीं वंदन केलें व त्यांचा धर्मोपदेश ते शांतचित्तानें ऐकूं लागले. " धर्म संसाराची कारणें नष्ट करून जीवाला मोक्षस्थानीं विराजमान करितो. मुनींचा धर्म जीवाला मोक्ष देतो व गृहस्थांचा अहिंसाधर्म स्वर्गसुखाला देतो. प्राणी लोभमोहित होऊन पाप करितो व त्यामुळें त्याला कुयोनिमध्यें दुःख प्राप्त होतें. धर्म हा जीवाचा बंधु आहे व तोच हित करितो. या धर्माचें मूळ दया आहे व ती सौख्याचा झरा आहे. ज्यांत दया नाहीं त्याला अधर्म म्हणावें. पातालांत असुरेंद्रांना, पृथ्वीवर चक्रवर्तीना व स्वर्गांत सुरेंद्रांना जे भोग मिळतात त्यांना दयाच कारण आहे." याप्रमाणें मुनीश्वरांचा धर्मोपदेश ऐकून लक्ष्मण उठून उभा राहून व हात जोडून केवलींना म्हणाला– प्रभो, हा त्रिलोकमंडन हत्ती प्रथम अतिशय क्षुब्ध झाला व नंतर अतिशय शांत झाला याचें कारण काय आहे हें आम्हाला समजत नाहीं. कृपा करून आपण सांगा. देशभूषण केवली म्हणाले– पूर्वी शक्तीच्या उद्रेकानें तो क्षुब्ध झाला पण नंतर त्याला पूर्वभवांचें स्मरण झाल्यामुळें तो शांत झाला. याच्या पूर्वभवाचें वर्णन याप्रमाणें आहे:—

आदिभगवंतांनीं दीक्षा घेतली तेव्हां त्यांच्याबरोबर स्वामिभक्तीनें चारहजार राजांनीं दीक्षा घेतली. भगवंताच्या नातूनें– मारीचानेंही दिगम्बर दीक्षा धारण केली. पण मारीचासह बाकीचे राजे तपोभ्रष्ट झाले. त्यांना भूक, तहान आदिक परीषह सहन झाले नाहींत. त्यांनीं कषायवस्त्रें धारण केलीं. जटा वाढविल्या व ते पंचाग्नितप करूं लागले.

अयोध्यानगरांत सुप्रभराजा व राणी प्रल्हादा या उभयतांना चंद्र व सूर्य या नांवाचे दोन पुत्र झाले होते. हेही स्वामिभक्तीनें दीक्षा घेऊन भ्रष्ट झाले व ते दोघे मारीचाचे शिष्य झाले. कुधर्माच्या सेवनानें या उभयतांना दीर्घकाळपर्यंत संसारांत फिरावें लागलें.

चन्द्रराजा कर्मोदयवश होऊन नागपुर नगराचा राजा हरिपति व राणी मनोलता यांचा कुलंकर नामक शूर पुत्र झाला. व सूर्य हा त्याच नगरींत विश्वपुरोहित पिता व अग्निकुण्डिका माता यांचा 'श्रुति' नांवाचा पुत्र झाला. हा वेदज्ञ झाला व राजानें विश्वपुरोहितानंतर त्याच्या मुलाला–श्रुतीला पुरोहित केलें. कुलंकराच्या वंशांत वैदिकधर्म चालत होता.

एकेवेळीं कुलंकर आपल्या गुरूला वंदन करण्यासाठीं निघाला होता. पण वाटेंत अभिनंदन नामक जैनमुनींना पाहिलें. राजानें त्यांना हात जोडून नमस्कार केला. मुनिराज अवधिज्ञानी होते. ते म्हणाले– राजा, तपस्व्यांना वंदन करावयाला चालला आहेस, तुला तेथें घडणारी हकीकत सांगतो ती ऐक. तुझा आजा तेथील एका लाकडामध्यें सर्प होऊन राहिला आहे व एक तापसी लाकूड फोडावयास उद्युक्त होईल तूं त्या सर्पाचें रक्षण कर.

राजानें मुनिवचनाप्रमाणें जाऊन सापाचें रक्षण केलें. राजाच्या मनांवर मुनिराजांचा प्रभाव पडला. त्याला जैनमुनि होण्याची इच्छा उत्पन्न झाली. पण श्रुति-पुरोहितानें त्याला म्हटलें– राजन्, वैदिकधर्म तुझा कुलधर्म आहे तो तूं सोडूं नकोस.

या कुलंकराच्या राणीचें नांव श्रीदामा होते. ती व्यभिचारिणी होती. तिला वाटलें आपलें कुकृत्य राजाला समजलें म्हणून तो विरक्त होऊन दीक्षा घेण्यास उद्युक्त झाला आहे– ती घेण्यापूर्वीच त्याला आपण मारावें असा तिनें विचार केला. तिनें राजाला म्हटलें– राजन्, माझ्या येथें आपण जेवून नंतर दीक्षा घ्यावी. राजानें तें मान्य केलें. राजा श्रुतिविप्रासह राणीच्या महालांत जेवला. भोजनांत घातलेल्या विषामुळें दोघेही मरण पावले. संक्लेशानें मरण पावून निकुञ्जवनांत ते दोघे ससे जाहले. यानंतर ते दोघे क्रमशः बेडूक, उंदीर, मोर, सर्प आदिक अवस्था धारण करून मेले. पुढें श्रुतिपुरोहित हत्ती झाला व कुलंकर बेडूक झाला. हत्तीचा पाय पडून बेडूक मरण पावला. पुनः बेडूक होऊन जन्मला व कावळ्यांनीं त्याला मारलें. कुलंकर तीनवेळां कोंबडा झाला व श्रुतीचा जीव तीनवेळां मांजर झाला. व त्यानें कोंबड्याला मारून टाकलें. यानंतर कुलंकर समुद्रांत मासा झाला व श्रुतिब्राह्मण सुसर झाला. या दोघांनाही कोळ्यांनीं पकडून कुऱ्हाडीच्या घावांनीं मारून टाकिलें.

राजगृहनगरांत राहत असलेल्या उल्का आणि बव्हाश या उभयांच्या पोटीं सुसर झालेला श्रुतिब्राह्मण विनोद नामक पुत्र झाला व मत्स्य झालेला कुलंकर रमण

नामक पुत्र झाला. रमणाचें बाल्पण सरलें तो कुमारावस्थेत आला तेव्हां आपण विद्या शिकावी असें त्याला वाटू लागलें विद्येवाचून मनुष्य बैल, पशु होय. पशूला शेपूट व शिंगें असतात व तीं मनुष्याला नसतात एवढेंच अंतर असतें. या विचारानंतर तो परगांवीं वेदाध्ययनासाठीं गेला. गुरुगृहीं राहून वेदाध्ययन केलें. पूर्ण झाल्यानंतर गुरूंनीं परवानगी दिली व तो रमण परत आपल्या गावास जाण्यासाठीं निघाला. भावाला पाहण्याची फार उत्कंठा त्याच्या मनांत होती. रात्र झाल्यामुळें रमणानें राजगृह नगराच्याबाहेर एका देवालयांत मुक्काम केला. त्यावेळीं पुढील गोष्ट घडली.

इकडे विनोदाचें लग्न झालें होतें. पण त्याची पत्नी समिधा ही व्यभिचारिणी होती. तिनें आपल्या अशोक नामक जाराला नगराच्या बाह्य देवालयांत रात्रीं येण्याला सांगितलें होतें. त्याप्रमाणें तो रात्रीं निघाला असतां कोतवालानें त्याला पकडून ठेविलें होतें. समिधाही त्या देवालयांत जाऊन पोहोंचली होती. हातांत तरवार घेऊन आपल्या बायकोचा पाठलाग करीत निघालेला विनोद तेथें जाऊन पोहोंचला व त्यानें क्रोधानें आपल्या भावावर तरवारीचें वार करून ठार मारिलें. आणि आपल्या बायकोसह तो घरीं आला. इकडे रमण संसारांत भ्रमण करूं लागला. कालांतरानें विनोदही संसारांत फिरू लागला. विनोद वनांत रेडा व रमण अस्वल होऊन जन्मले. दोघेही आंधळे जन्मल्यामुळें जंगलांत पेटलेल्या अग्नींत पडून मरण पावले. यानंतर जंगलांत ते दोघे पारधी झाले. नंतर मरून हरिण झाले.

एकेवेळीं श्रीविमलनाथ जिनेश्वरांना वंदन करण्यासाठीं स्वयंभूति नामक राजा गेला होता. वंदन करून परत येतांना त्यानें जंगलांत या दोन हरिणांना पाहिलें. मनांत यांच्याविषयीं स्नेह उत्पन्न झाला व त्यानें या दोघांना एका जिनमंदिरांत आणून ठेविलें. तेथें त्यांना अन्न आणि गोड फळें खावयाला मिळू लागलीं व ते दोघेजण खूप पुष्ट झाले.

त्या दोघांपैकीं पूर्वी रमण असलेल्या मृगाचें आयुष्य समाप्त झालें व तो समाधिनें मरण पावून स्वर्गांत जन्मला व दुसरा हरिण कालांतरानें मरून कुगतींत—पशुगतींत पुष्कळ फिरला. स्वप्नांत राज्य मिळावें त्याप्रमाणें पशुगतींतून निघून विनोद कांपिल्यनगरांत ‘धनद’ नांवाचा सावकार झाला. याच्याजवळ बावीसकोटि सुवर्णांचें धन होतें. याच्या पत्नीचें नांव वारुणी होतें. स्वर्गांतील रमणसुराचें आयुष्य संपून तो धनद व वरुणा यांना ‘भूषण’ नामक पुत्र झाला. याच्यावर धनदाचें अत्यंत प्रेम होतें. नैमित्तिकानें हा तुझा पुत्र दीक्षा घेऊन, घरांतून निघून जाईल

असें सांगितलें. तेव्हां धनदानें त्याला घरांतून बाहेर पाऊल टाकण्याची आवश्यकताच पडू नये अशी व्यवस्था ठेविली. अन्न, धन, वस्त्रें, अलंकार रत्नें आदिक कोणताही पदार्थ उणा पडू दिला नाहीं. नेहमी घरांतच राहिल्यामुळें सूर्योदय व चन्द्रास्त हेही त्याला ठाऊक झाले नाहींत. सुंदर वस्त्रें, सुंदर स्त्रिया व उत्तम अलंकार यांच्या संगतींत त्याचे दिवस फार सुखांत जात होते.

हा भूषण धनदाचा एकच पुत्र होता. धनद मागील एका जन्मीं त्याचा भाऊ होता. त्यामुळें धनदाचें भूषणावर प्राणाहूनही अधिक प्रेम होतें. हा सगळा मोहाचा खेळ आहे हें धनदाचें ध्यानांत येत नव्हतें.

एकेदिवशीं पहाटेच्यावेळीं देवांच्या वाद्यांचा ध्वनि भूषणाच्या कानीं पडला. त्याचे डोळे उघडले. तो जागा झाला. त्याचें मन अतिशय मृदु व धर्माचारांत हर्ष मानणारें असल्यामुळें हे देव मुनिदर्शनासाठीं जात आहेत, श्रीधरमुनिराजांचा जयजयकार करीत चालले आहेत असें त्याला समजलें. त्यानें तत्काल आपले दोन हात कमळाच्या कळीसारखे करून व ते भालप्रदेशीं ठेवून श्रीधरमुनीश्वरांना भक्तीनें नमस्कार केला. व त्यांच्या दर्शनासाठीं पायऱ्या उतरत असतां त्याला सर्प चावला व तो मरण पावला. शुभपरिणामांनीं मरण पावून तो माहेंद्रस्वर्गीं देव झाला.

तेथें अनेक सागरवर्षें दिव्यसुख भोगून तो भूषणदेव च्युत होऊन पुष्करार्ध द्वीपांतील चंद्रादित्य नगरांत प्रकाश नामक राजा व राणी माधवी याचा पुत्र झाला. त्याचें त्यांनीं 'जगद्द्युति' असें नांव ठेविलें. तरुण झाल्यावर राजपदप्राप्ति याला झाली. पण मनामध्यें नेहमीं संसारभय वाटत असल्यामुळें राज्यपालन करणें त्याला नकोसें वाटत होतें. 'कुलक्रमागत राज्याचें पालन करून प्रजेस सुखी करावें' असा नेहमी वृद्धमंत्र्यांचा उपदेश होत असे. ते मंत्री याजकडून राज्यपालन करवीत असत व त्यांनीं राज्याचा कोश खूप वाढविला.

पण राजाचा ओढा धर्माकडेच विशेष राहिला. नेहमीं सत्पात्रांना राजा दान देत असे. कालांतरानें राजा देवकुरु भोगभूमींत जन्मला. तेथें तीनपल्यकालवर्धीचें कल्पवृक्षापासून प्राप्त झालेल्या दिव्यसुखांचा अनुभव घेऊन नंतर ऐशानस्वर्गांत जन्मला. तेथें सुराङ्गनासह सुखें भोगून च्युत होऊन जम्बूद्वीपस्थ विदेहक्षेत्रांत रत्नपुरामध्यें अचल नामक चक्रवर्ती राज्य करीत होता, त्याच्या पत्नीचें नांव बालहरिणी होतें, त्याच्या पोटीं हा शरीरानें व गुणांनीं सुंदर 'अभिराम' नामक

पुत्र झाला. स्वभावानें दयाळु व संसारभय बाळगणारा होता. मन विरक्त असल्यामुळें हा दीक्षा घेऊन वनांत जाईल म्हणून त्याचें बलात्कारानें तीनहजार राजकन्यांबरोबर चक्रवर्तीनें लग्न लावलें. तीन हजार राण्या याची सेवा करीत असत पण हा रतिसुख विषाप्रमाणें मानून मुनिपदाची मनांत नेहमीं इच्छा करीत असे. चक्रवर्तीनें अनेकवेळा त्याच्या दीक्षेला विरोध केला. अभिरामराजपुत्र आत्महितेच्छु होऊन व्रतपालन तरवारीच्या धारेप्रमाणें करीत असे. स्त्रियांनाही धर्मोपदेशानें त्यानें व्रतामध्यें तत्पर बनविलें होतें.

हा अभिराम चक्रवर्तिपुत्र एक, दोन, तीन, चार, पांच उपवास करून पारणें करीत असे. घरांत राहून अशाप्रकारचें तप त्यानें ६४ हजार वर्षेंपर्यंत केलें. त्यामुळें ग्रीष्मऋतूमध्यें सूर्याच्या किरणांनीं तप्त होऊन जसें पाणी सुकतें तसें अभिरामाचें शरीर सुकलें.

शेवटीं पञ्चनमस्कारांचें चिंतन करीत करीत त्यानें प्राणत्याग केला व तो ब्रह्मोत्तरस्वर्गांत जन्मला. उत्तम ऋद्धिधारक देवपद तेथें प्राप्त झालें. हाच देव तेथील आयु समाप्त झाल्यावर दशरथराजाचा पुत्र भरत होऊन जन्मला.

इकडे भूषणाचा पिता धनदश्रेष्ठी संसारांत अनेक योनींत फिरला. व जम्बूभरतांतील पोदनपुरनगरींत अग्निमुख व शकुना या ब्राह्मणदंपतीचा मृदुमति नांवाचा पुत्र झाला. त्याचें नांव मृदुमति होतें पण कृति कठोर होती. तो अविचारी होता. नानाप्रकारच्या खोड्या करी. त्यामुळें लोक घरीं येऊन त्याच्या आई-बापांना नेहमी तक्रारी सांगत असत. आई-बापांनीं मृदुमतीला हाकालून दिलें.

नंतर तो अनेक गांवें फिरला. पुनः तरुणपणीं पोदनपुरांत आला. आई-बापाच्या घरीं येऊन त्यानें मला तहान लागली आहे पाणी द्या म्हणून मागूं लागला. शकुना आली व तिनें त्याला पाणी दिलें. तें देतांना आपल्या मुलासारखा हा दिसतो आहे असें तिला वाटलें व तिचे डोळे पाण्यानें भरून आले. संतोषानें पाणी प्याल्यावर तो तिला म्हणाला— माते, तूं कां बरें रडत होतीस तें सांग. ती म्हणाली— अरे, तुझ्या सारखाच आमचा मुलगा होता, आम्ही त्याला निर्दयपणानें घरांतून हाकलून दिलें. तुला कोठें तो आमचा मुलगा भेटला असल्यास सांग. कारण तूं देशोदेशीं फिरणारा आहेस असें आम्हाला वाटतें.

हें तिचें भाषण ऐकून तो म्हणाला—मातोश्री, मीच तुमचा मृदुमति नांवाचा मुलगा आहे. अनेक देशांत मी हिंडून आलों आहे असें म्हणून त्यानें आपल्या

मातेच्या पायांना नमस्कार केला. त्यावेळीं अभिमुख व शकुना या दोघांना आनंद वाटला. शकुनेच्या स्तनांतून पुत्रप्रेमानें दूध वाहू लागलें. पुनः आपणास पुत्र मिळाला म्हणून त्यांनीं मोठा उत्सव केला. बरोबरच आहे कीं, आवडता पदार्थ मिळाला म्हणजे कोण आनंदित होत नाही बरें ?

हा मृदुमति नानाशास्त्रांत व कलासमूहांत निपुण होता. महाधूर्त होता. द्यूत खेळतांना नेहमी त्याचा विजयच होत असे. त्यानें खूप संपत्ति मिळविली व ती त्यानें आपल्या माता-पित्यांना व आप्तनातलगांना दिली. आपल्या मातोश्रीला त्यानें अनेक अलंकारांनीं भूषित केलें.

एकेवेळीं 'शशाङ्क' नामक नगराच्या नंदिवर्धन राजाच्या वाड्यांत हा मृदुमति गेला. त्यावेळीं राजा शशाङ्कमुख गुरूनें केलेल्या धर्माचें विवेचन राणीजवळ करीत होता. तो म्हणाला– "मला धर्माचें वर्म समजलें. धर्मच मुक्तिसुख देणारा आहे. पञ्चेन्द्रियांचे विषय हे शेवटीं तीव्र दुःख देणारे आहेत. यास्तव हे देवी, मी जिनदीक्षा घेण्याचा निश्चय केला आहे. तूं शोक करूं नकोस. आपलें मन शांत ठेव." हें भाषण मृदुमतीनें ऐकिलें. त्याच्या मनाला हें भाषण पटलें. त्याच्या हृदयांत निर्मलपरिणति झाली. संसारभय उत्पन्न झालें. तो शशिमुख गुरूजवळ गेला. महाव्रत दीक्षा त्यानें धारण केली. घोर तप करूं लागला. मुनींच्या आचारांचें निर्दोष पालन तो करीत होता. त्याच्याठिकाणीं क्षमादिक गुण वाढले.

एकेवेळीं गुणनिधि नामक चारणमुनींनीं 'दुर्गगिरि' नामक पर्वताच्या शिखरावर चातुर्मास केला. चार महिने निराहार राहून घोर तप त्यांनीं केलें. यानंतर ते मुनि आपला नियम संपवून आकाशमार्गानें अन्यठिकाणीं निघून गेले.

नंतर मृदुमतिमुनि त्या नगरांत आहाराकरितां आले. जमीन चार हात पाहून प्राणिरक्षण करीत ते चालले होते. त्यांना पाहून लोक पर्वतशिखरावर निवास केलेले तेच हे मुनि आहेत असे समजले. अतिशय भक्ति करून त्यांना आहार देऊं लागले. हे मुनिनाथ, आपण शैलावर तप करणारे आहांत म्हणून त्यांना नमस्कार करूं लागले. या मृदुमतिमुनींनीं माया धारण करून स्वतःबद्दल कांहींच खुलासा केला नाहीं. त्यांनीं गुरुपुढेंही आपलें मायाशल्य सांगितलें नाहीं. त्यामुळें त्यांना तिर्यग्गतीचा बन्ध पडला. ज्या स्वर्गांत अभिराममुनि उत्पन्न झाले होते तेथेंच मृदुमतिमुनीचा जीवही उत्पन्न होऊन देव झाला. या दोन देवामध्यें प्रेम उत्पन्न

झाले. पण अभिरामदेव च्युत होऊन दशरथपुत्र भरत झाला आणि हा मृदुमतिदेव आयुष्य समाप्तीनंतर सल्लक नामक वनांत प्रचंड हत्ती होऊन जन्मला. याला रावणानें पकडून लंकेला नेलें. त्याचें 'त्रिलोककण्टक' असें नांव ठेविलें. चन्द्रोदय-राजा अनेक भव फिरून भरत झाला व सूर्योदयराजा अनेक भव फिरून मायेनें हत्ती झाला. असें दोघांचें चरित्र देशभूषणकेवलींनीं सांगितलें.

# पंचाऐंशीवें पर्व.

—∞○∞—

[ महेन्द्रोद्यानांत देशभूषण कुलभूषण केवलींचें आगमन व त्यांचा धर्मोपदेश. ]

महेन्द्रउपवनिं देशविभूषण कुलभूषण आले ।
कुन्थलगिरिवरि असुरें ज्यांना उपद्रवें छळिलें ॥ १ ॥
राम-लक्ष्मणें घोरोपद्रव निवारितां झाला ।
घातिविनाशें[1] नि केवलबोध[2] प्रकाश उद्भवला ॥ २ ॥
विहरण केलें उभयमुनींनीं अनेकदेशांत ।
उपदेशानें केला भव्यप्रमोह बहु शान्त ॥ ३ ॥
राम-लक्ष्मणिं प्रसन्न गरुडामर बहु तैं झाला ।
रत्नें अस्त्रें नि वाहनें ही दिधलीं उभयाला ॥ ४ ॥
नृसुरासुर ज्या स्तविती ऐसे उभय मुनीन्द्र सुखें ।
विहरत आले साकेतापुरिं वर्ण्य न एकमुखें ॥ ५ ॥
नन्दनसुन्दर माहेन्द्रोदयनामक उद्यानीं ।
सञ्जय-नन्दन मुनियुग पूर्वी जसें अनन्तगुणी ॥ ६ ॥
आलें होतें तैसें सम्प्रति हें मुनियुग आलें ।
रविचन्द्रासम महागणानें शोभित बहु झाले ॥ ७ ॥
सर्व-नागरिकजनां कळविलें दुन्दुभिनादानें ।
गेले हृदयीं सुभक्ति ठेवुनि सज्जन मोदानें ॥ ८ ॥
राम नि लक्ष्मण परिवारासह जाउनि मुनिवर्यां ।
पाहुनि हर्षें वन्दिति त्यांना प्रवन्द्य जे आर्यां ॥ ९ ॥
त्रिलोकमण्डन गजही त्यांनीं जातिस्मर[3] नेला ।
मातांचा गण निजस्नुषासह झणि तेथें आला ॥ १० ॥
सुग्रीवादिक विद्याधर जे बहु वैभवशाली ।
आले मुनिवरपदरज वन्दुनि लाविति निजभालीं ॥ ११ ॥

---

१ ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय व अन्तराय या चार घातिकर्मांचा नाश.
२ जगांतील त्रिकाल वस्तूंचें ज्ञान. ३ पूर्वजन्मांचें ज्याला स्मरण झालें आहे.

शक्त्युद्रेकें क्षुब्ध जाहला जरी करी प्रथम ।
पूर्व-भवाच्या स्मरणें पावे हा आर्य प्रशम ॥ २५ ॥
पहिल्यायुगिं या भरतक्षेत्रीं साकेतानगरीं ।
नाभिपासुनी मरुदेव्युदरीं वृषजिन अवतारी ॥ २६ ॥
क्षुब्ध करी जें त्रैलोक्याला तीर्थंकर कर्म ।
उपार्जिलेलें प्रगट जाहलें जनास दे शर्म ॥ २७ ॥
देवेन्द्रांनीं सुमेरुशिखरीं हर्षें नेऊन ।
स्नान घातलें वृषभ जिनेश्वर सुनाम ठेवून ॥ २८ ॥
पुनरपि घेउनि कराञ्जलीमधिं सौधर्मेन्द्र मुदें ।
आणी सौधीं मरुदेव्यङ्कीं[1] बालक जिन तो दे ॥ २९ ॥
विन्ध्य नि हिमगिरि दोन जिचे स्तन सागर कटिसूत्र[2] ।
ऐशी पृथ्वी पत्नीसम जिन वश करिं सुपवित्र ॥ ३० ॥
लोकत्रय ज्या करितें वन्दन भगवान् पुरुषेन्द्र ।
साकेतापुरिं रमला जैसा नभांत निशि चन्द्र ॥ ३१ ॥
वृषभजिनेश्वर मतिश्रुतावधिबोधत्रितय[3] धरी ।
रूप जयांचें सर्वजनांच्या नयनमनास हरी ॥ ३२ ॥
परम विक्रमी धीर गभीर नि गुणसागर होते ।
कोण तयांचे वर्णु शके गुण सुरपति-मति[4] थकते ॥ ३३ ॥
दीर्घकाल या साकेतापुरिं अपार विभवानें ।
प्रथम जिनानें राज्य भोगिलें गाती कवि कवनें ॥ ३४ ॥
सभामण्डपीं नृत्य अप्सरा सुन्दर सुरस करी ।
सहसा पावे विलय जेधवा विरक्त वृषभ उरीं ॥ ३५ ॥
लौकान्तिक सुर आले वदले विरक्ति जाणून ।
नाथा आपण विरक्त झाला घडलें हें छान ॥ ३६ ॥
परोपदेशावांचुनि झालें विरक्त मन अपुलें ।
स्वयम्बुद्ध हें नांव आपुलें यथार्थसें गमलें ॥ ३७ ॥
शम्भर पुत्रा राज्य, धनादिक सगळें देऊन ।
तिलकोद्यानीं प्रजेस गेले जिनवर सोडून ॥ ३८ ॥

१ मरुदेवीच्या मांडीवर. २ कमरपट्टा. ३ तीन ज्ञानें. ४ इंद्राची बुद्धि.

जननी ज्याची अग्निकुण्डिका विश्वपिता ज्यास ।
वेदा जाणी श्रुति नांवाचा सुपुरोहित त्यास ॥ ५१ ॥
कुलङ्कराच्या वंशीं वैदिक धर्म सदा चाले ।
भूप निघे निजगुरु वन्दाया जे उपवनि आले ॥ ५२ ॥
श्री अभिनन्दन नामश्रमणा भूपें पाहियलें ।
करयुग जोडुनि नम्रपणानें तत्पर वंदियलें ॥ ५३ ॥
अवधिज्ञानी मुनि त्या वदले तापस वन्दाया ।
भूपा जाशी कुवृत्त तेथिल घेई कर्णीं या ॥ ५४ ॥
तेथें एका काष्ठामध्यें सर्प असे वसला ।
आजोबाचा जीव असे तव वध ही अघलीला[1] ॥ ५५ ॥
होता भूपा पूर्वीं तापस मरुनी अहि झाला ।
तापस असतां काष्ठा फोडित रक्षी तूं त्याला ॥ ५६ ॥
[ कुलंकर राजानें सर्प झालेल्या आपल्या आजोबाचें रक्षण केलें. ]
जाउनि कुलकर भूपें त्याचें रक्षण झणि केलें ।
श्रद्धा होउनि जिनमुनिवचनीं प्रमुदित मन झालें ॥ ५७ ॥
मिथ्याशास्त्राभ्यासीं तापसवर्गा पाहून ।
भूपकुलङ्कर जिनमुनि व्हाया जेव्हां करि यत्न ॥ ५८ ॥
पुरोहित श्रुति मिथ्यावर्णन वसुपर्वतकाचें ।
करुनी मोहित करी नि बोले भाषण अहिताचें ॥ ५९ ॥
राजन् ! चालत आहे वंशीं वैदिक-धर्म सदा ।
सोडुनि तो परधर्म न घेई आणिल बहु विपदा ॥ ६० ॥
हरिपतिचा तूं पुत्र नृपाला धर्म तयाचाच ।
आचरणें मज योग्यचि वाटे तोच असें साच ॥ ६१ ॥
यज्ञें देवा आधीं सुखवुनि देउनि राज्य सुता ।
स्वहिता करण्या विपिनीं जाई घेउनि निजकान्ता ॥ ६२ ॥
यापरि वदला पुरोहितश्रुति मान्य नृपें केलें ।
तथरिही भवितव्यतानुसारें वृत्त असें घडलें ॥ ६३ ॥
[ कुलंकराची राणी व्यभिचारिणी होती. तिनें त्याला व पुरोहिताला विष घालून मारिलें. नंतर ते बेडूक, उंदीर आदिक जन्म घेऊन संसारांत फिरले. ]

---

१ पापाची क्रीडा.

राणी होती कुलंकराची श्रीदामा नामें ।
अन्याशीं ती संगत होती पीडित जी कामें ॥ ६४ ॥
अकृत्य माझें नृपें जाणिलें असेल म्हणुनिच तो ।
विरक्त होउनि दीक्षा घ्याया इच्छा मनिं धरितो ॥ ६५ ॥
अथवा दीक्षा घेइल किंवा नच मन परक्याचें ।
कठिण जाणणें गरलें मारिन तें मज हित साचें ॥ ६६ ॥
विचार यापरि निश्चित ठरवुनि सपुरोहित भूपा ।
तिनें मारिलें विषान्न चारुनि जी कुलटा पापा ॥ ६७ ॥
सङ्क्लेशानें मरण पावले भूप पुरोहितही ।
निकुञ्जवनिं ते ससे जाहले जीवा अघ दाही ॥ ६८ ॥
वेडुक उंदिर मोर सर्प या पशुपर्यायास ।
करुनी धारण मेले भोगिति नाना आयास ॥ ६९ ॥
पुरोहितश्रुति हत्ती झाला कुलकर वेडूक ।
करिचरणानें मृति तो पावे भववनिं नैव सुख ॥ ७० ॥
पुनरपि वेडुक होउन जन्मे शुष्कतडागांत ।
काकसमूहें त्याचें मिळुनी भक्षियलें गात ॥ ७१ ॥
कुलकर नन्तर कुक्कट झाला श्रुति मांजर झाला ।
तीन भवींही मार्जारानें भक्षियलें त्याला ॥ ७२ ॥
राजा मासा ब्राह्मण झाला सुसर समुद्रांत ।
पकडुनि कोळी करिति कुठारें त्यांचा प्राणान्त ॥ ७३ ॥
उल्का आणिक वह्वाशाला झाली सुसर सुत ।
विनोद त्याचें नांव ठेविलें होउनि हर्षयुत ॥ ७४ ॥
मासा झाला मरुनि राजगृहिं रमण द्विज एक ।
शैशव सरतां कुमार झाला सरला अविवेक ॥ ७५ ॥

[ विनोदानें रमणाला मारलें व दोघेही संसारभ्रमण करूं लागले. ]

दारिद्र्यानें निरक्षरत्वें मानव पशु होतो ।
पुच्छें शृङ्गें रहित एवढा भेद तिथें दिसतो ॥ ७६ ॥
विचार यापरि करून निजमनिं झणि सदना त्यजुन ।
वेदज्ञानासाठीं गुरुगृहिं राही जाऊन ॥ ७७ ॥

योग्य शिष्य त्या जाणुनि सांगे गुरु वेदज्ञानी ।
वेदचतुष्टय सांग जहाला त्याच्या मोद मनीं ॥ ७८ ॥
गुरुचरणांना वन्दुनि घेउनि आशीर्वाद शुभ ।
रमण निघाला सदना जाया मनि जो निर्लोभ ॥ ७९ ॥
निजभावाचें दर्शन घ्याया उत्कण्ठित झाला ।
मागधनगरा सन्निध आला रवि अस्ता गेला ॥ ८० ॥
नगराबाहिर यक्षगृहामधि जीर्णोद्यानांत ।
निवसन केलें असता त्यानें घडला वृत्तान्त ॥ ८१ ॥
समिधा नामक विनोदभार्या जी कुलटा होती ।
अशोक नामक जारावरती होति तिची प्रीति ॥ ८२ ॥
या यक्षालयिं येण्यासाठीं केला संकेत ।
तिनें तयाला कोतवाल परि पकडी मार्गांत ॥ ८३ ॥
ही यक्षालयिं आली तेथें रमण तिला दिसला ।
त्याच्यावरती लुब्ध जहाली ती कुलटा अबला ॥ ८४ ॥
आला तेथें विनोद घेउनि हातीं तरवार ।
क्रोधें रमणा वधिलें त्यानें करुनी बहु वार ॥ ८५ ॥
निजभार्येसह गेला अपुल्या विनोद सदनास ।
पुनरपि उभयहि सुघोर भववनिं करिती भ्रमणास ॥ ८६ ॥
विनोद झाला वनांत रेडा अस्वल रमण वने ।
नेत्रहीनता आली त्याला जळले अग्नीनें ॥ ८७ ॥

[ रेडा, अस्वल, पारधी असे भव धारण करून विनोद व रमण हरिण झाले. स्वयंभूति राजानें त्यांना जिनमंदिरांत ठेवलें. त्यापैकीं एक मृग जो पूर्वी रमण होता तो समाधीनें मरून स्वर्गांत देव झाला व दुसरा पशुगतींत फिरला. ]

गिरिवनिं झाले व्याध उभयही झाले मृग उभय ।
संसारामधिं फिरतां त्यांना न वाटलेंचि भय ॥ ८८ ॥
स्वयंभूतिनृप एकेवेळीं श्रीजिन विमलास ।
वन्दन करण्या गेला नृसुरासह वन्दी त्यास ॥ ८९ ॥
येतां मार्गीं या मृगयुगला त्यानें पाहियलें ।
श्रीजिनसदनीं स्नेहें आणुनि तेणें ठेवियलें ॥ ९० ॥

यथेच्छ तेथें अन्न खाण्या मिळे नि गोडफळें ।
पुष्ट शरीरें त्यांचीं दोघां प्रमुदित ते झाले ॥ ९१ ॥
समाप्त होतां आयु एक मृग समाधिनें मेला ।
सुर तो झाला दुसरा तिर्यग्गतीत बहु फिरला ॥ ९२ ॥
होता पूर्वी विनोद जो मृग तो मानव झाला ।
राज्य स्वर्गी जैसें मिळतें प्रसङ्ग हा घडला ॥ ९३ ॥

[ स्वर्गातून धनदश्रेष्ठींना पुत्र झाला. श्रीधरमुनींच्या दर्शनासाठीं पायऱ्या उतरून येत असतां सर्पदंशानें मरण पावला व माहेन्द्रस्वर्गीत उत्पन्न झाला. ]

जम्बूद्वीपीं भरतक्षेत्रीं कांपिल्यानगरीं ।
शतिन्नकोटी सुवर्णपति जो श्रेष्ठी वास करीं ॥ ९४ ॥
'धनद' नांव हें त्याचें होतें भार्या त्या 'वरुणा' ।
पुत्र जहाला रमणागिरर त्या ज्याच्या मनिं करुणा ॥ ९५ ॥
'भूषण' त्याचें नाम ठेविलें जन्मोत्सव करुनि ।
प्रमोद झाला अपार पुत्रा बघुनि श्रेष्ठिमनीं ॥ ९६ ॥
श्रेष्ठिन् हा सुत तुमचा घेइल दीक्षा नियमानें ।
नैमित्ताचें वचन श्रविलें 'धनदें' खिन्नमनें ॥ ९७ ॥
पुष्कळ होता स्नेह सुतावरि तेणें धनदानें ।
अन्नपानधन भूषण वस्त्रें दिलीं नि मणि-रत्नें ॥ ९८ ॥
जेणें न पुत्रा किमपि असावें दाराबाहेर ।
पडो न पाउल अशी व्यवस्था करी वणिक्प्रवर ॥ ९९ ॥
सुतें उगवतां रवि न पाहिला न चन्द्र मावळतां ।
प्रवेश केला नच सदनाच्या पञ्चमशिखरान्ता ॥ १०० ॥
सुन्दर वस्त्रें सुन्दरललना, मधुराहारांनीं ।
सेवित भूषणवणिक्सुताच्या जाती दिनरजनी ॥ १०१ ॥
मनोरथांच्या शतें लाभला एकचि हा पुत्र ।
प्रिय धनदा जीविताहुनी हा होता अतिमात्र ॥ १०२ ॥
धनदश्रेष्ठी हा गतजन्मीं या निजपुत्राचा ।
होता भाऊ झाला आतां सुपिता प्रिय साचा ॥ १०३ ॥
नटचेष्टित हें या संसारीं दिसतें जीवांत ।
मोहाचें हें वैभव सगळें ये न ध्यानांत ॥ १०४ ॥

रात्र्यवसानीं सुर-वाद्यांचा रव कानीं पडला ।
देवागमना पाहुनि नयनें जागृत सुत झाला ॥ १०५ ॥
मृदुलमनाचा धर्माचारी हर्षित मनिं झाला ।
भालीं करकुड्मलास ठेवुनि करि मुनि नमनाला ॥ १०६ ॥
श्रीधरमुनिवन्दनार्थ उतरे सोपानावरुन ।
अहि चावे त्या मरून झालें माहेन्द्रीं जनन ॥ १०७ ॥

[ माहेन्द्रस्वर्गातून च्युत होऊन चन्द्रादित्यनगरांत तो भूपण प्रकाश नामक राजाचा 'जगद्द्युति' नांवाचा पुत्र झाला.]

आयुष्यान्तीं चवुनी तेथुनि तिसऱ्या द्वीपांत ।
चन्द्रादित्याभिधपुरिं झाला प्रकाशनृपतिसुत ॥ १०८ ॥
माता याची असे माधवी प्रीतिच जणु मूर्त ।
'जगद्द्युति' असें नांव ठेविलें उभयें अन्वर्थ ॥ १०९ ॥
भूपतिलक्ष्मी प्राप्त जहाली त्याला तरुणपणीं ।
वहु भवभय तो तथापि वाही भूपति सतत मनीं ॥ ११० ॥

[ वृद्धमंत्र्यांच्या उपदेशामुळें त्यानें राज्यपालन केलें. मुनींना आहार देऊन तो देवकुरुभोगभूमींत जन्मला. यानंतर ऐशानस्वर्गांत त्याचा जन्म जाहला.]

कुलक्रमागत राज्य आपुलें सुन्दर पाळावें ।
समृद्धराज्यीं प्रजेस सगळ्या प्रेमें सुखवावें ॥ १११ ॥
वृद्धमन्त्रिजन यापरि वोलुनि सुमधुर उपदेशा ।
राज्य करविती नृपाकडोनी वाढविती कोशा ॥ ११२ ॥
तपोधनांना नृपाल सन्तत देउनि आहार ।
सुरकुरुमध्यें जन्मुनि भोगी त्रिपल्यसुख फार ॥ ११३ ॥
नन्तर जन्मे ऐशानामधिं सुराङ्गनासहित ।
भोगी नानाभोगांचें सुख परमद्युतियुक्त ॥ ११४ ॥

[ ऐशानस्वर्गांतून च्युत होऊन तो जगद्द्युति अचलचक्रवर्तीचा 'अभिराम' नामक पुत्र झाला. बापानें दीक्षा घेण्यास प्रतिबन्ध केल्यामुळें घरांतच त्यानें चौसष्ट हजार वर्षें तप केलें. समाधिमरणानें तो ब्रह्मोत्तरस्वर्गांत देव झाला.]

चवुनी जम्बूद्वीपीं पश्चिम विदेहदेशांत ।
अचलचक्रपति रत्नामहिषी होते विख्यात ॥ ११५ ॥

या उभयांना देहें नामें आत्मज अभिराम ।
सकरुण होता गुणरत्नांचा एकचि शुभधाम ॥ ११६ ॥
विरक्त चित्तीं दीक्षोद्यत निजसुतास पाहून ।
विवाह केला बळेंचि त्याचा विभवीं जोडून ॥ ११७ ॥
सेविति सुगुणी युवराजाला नारी त्रिसहस्र ।
मानी परि तो रतिसौख्याला विषसम चतुरस्र ॥ ११८ ॥
शान्तमनाचा चक्रवर्तिसुत इच्छी श्रमणपदा ।
अचलचक्रपति घेउ न देई विघ्न करी शतदा ॥ ११९ ॥
केयूराङ्गद हारकुण्डलें मुकुटें अभिराम ।
असिधाराव्रत पाळी सन्तत निजात्महितकाम ॥ १२० ॥
वरासनावरि बसुनी नारीगणास उपदेश ।
जिनधर्माचा देत असे तो जणु जो पीयूष ॥ १२१ ॥
" भववनिं फिरतां या जीवाला सुकृतें नृभव मिळे ।
जाणुनि विषयीं रमे तयाची मति निजहितिं न वळे ॥ १२२ ॥
कोण असे नर जाणुनि देखिल पडतो कूपांत ।
पिईल वा विष कोण जयानें होय प्राणान्त ॥ १२३ ॥
कोण असे नर अरुन्द गिरितटिं झोप सुखें घेई ।
रत्नेच्छेनें अहि[1]शीर्षाला स्पर्शाया जाई ॥ १२४ ॥
नाशवन्त या भोगा सेवुनि तृप्ति कुणा होय ।
सुकार्य करणें मुक्तिसुखाचा एकचि सदुपाय ॥ १२५ ॥
चञ्चल जीवित जाणुनि व्हावें निःस्पृह मनुजानें ।
देहीं भोगीं भविंही परि न स्वहितीं नियमानें " ॥ १२६ ॥
परमार्थाच्या उपदेशाचीं वचनें ऐकून ।
शान्त जहाल्या स्त्रियाहि सगळ्या नियमा पाळून ॥ १२७ ॥
राजपुत्र हा निजदेहींही विरक्त होऊन ।
एकद्व्[2]यादिक उपवासांनीं करि कर्मा क्षीण ॥ १२८ ॥
नानाविधशा तपें नृपसुतें शरीर कृश केलें ।
ग्रीष्म[3]कालरविकिरणतप्तजलसम तें जणु सुकलें ॥ १२९ ॥

---

१ सर्प. २ एक, दोन, तीन, चार वगैरे. ३ उन्हाळ्याच्या सूर्यकिरणांनीं तापलेल्या पाण्याप्रमाणें.

साठसहस्र नि चारसहस्रार्धाधिकसुवर्षान्त ।
अभिरामानें तप आचरिलें झाला न क्लान्त[1] ॥ १३० ॥
अकम्पचित्तें यापरि वीरें अतिदुःसह केलें ।
सुतप जयाचें वर्णन शास्त्रीं जिनेश्वरें कथिलें ॥ १३१ ॥
प्रणामपञ्चकसहित[2] विसर्जन केलें प्राणाचें ।
समाधि साधुनि सुरपद लाभे त्या ब्रह्मोत्तरिचें[3] ॥ १३२ ॥

[ धनदश्रेष्ठी संसारांत फिरून अग्निमुख व शकुना यांना मृदुमति नामक पुत्र झाला. तो अतिशय उद्धट असल्यामुळें त्याला माता-पित्यांनीं हाकालून दिलें. कांहीं वर्षांनीं तो पुनः परत आला. ]

धनदश्रेष्ठी या संसारीं अनेकयोनींत ।
फिरुनी जम्बूभरतीं जन्मे पोदननगरींत ॥ १३३ ॥
माता शकुना पिता अग्निमुख दोघे द्विज होते ।
पुत्र तयांचा मृदुमति नामें जें सार्थक नव्हतें ॥ १३४ ॥
महाजुगारी उद्धत नानापराध सतत करी ।
लोक द्वेषिति त्याला होता अतिशय अविचारी ॥ १३५ ॥
जन घरिं येउनि माता-पितरा दोष सदा देती ।
जननीजनकें दिले हकालुनि कोपुनि बहु चित्तीं ॥ १३६ ॥
पुष्कळवर्षें नानास्थानीं फिरला धरणिवरी ।
पुनरपि आला तरुणपणीं तो श्रीपोदननगरीं ॥ १३७ ॥
शिरुनी सदनीं पाणी मजला द्या हो प्यायास ।
वदला पाणी देई शकुना आणुनि डोळ्यास ॥ १३८ ॥
पिउनी शीतल-जल सन्तोषें विचारिलें त्यानें ।
कां माते ! तव डोळे भरले सांगे अश्रुकणें ॥ १३९ ॥
वदली शकुना तुझ्यासारखा माझा सुत होता ।
दिला हकालुनि आम्ही उभयें वद्य ही निर्दयता ॥ १४० ॥
देशोदेशीं फिरणारा तूं दिसला कां कोठें ?
नीलकमलसम वर्ण तयाचा कथि मज दुःख सुटे ॥ १४१ ॥

१ थकला. २ णमो अरिहंताणं, णमो सिद्धाणं, णमो आयरियाणं, णमो उवज्झायाणं, णमो लोए सव्वसाहूणं हा पञ्चनमस्कार. ३ साहव्या स्वर्गाचें.

[ मीच आपला पुत्र आहे असें मृदुमति सांगतो. त्यामुळें माता-पिता आनंदित होतात. तो पुष्कळ धन मिळवून आपाला व आप्त-नातलगांनाही देतो.]

वार्ता ऐकुनि नयनीं पाणी आणुनि तो वदला ।
माते ! रडणें सोडुनि दे तूं मुलगा समज मला ॥ १४२ ॥
नानादेशीं हिंडुनि आलों मीच तुझा पुत्र ।
इतर नसे मी तव चरणांना नमितों सुपवित्र ॥ १४३ ॥
तेव्हां अतिशय अग्निमुखाच्या मोद मना झाला ।
शकुनास्तनयुगलांतुनि[1] दुग्धप्रवाह उद्भवला ॥ १४४ ॥
केला मोठा उत्सव उभयें पुत्रप्राप्तीचा ।
होतां इष्टप्राप्ति न कोणा प्रमोद हो साचा ॥ १४५ ॥
तो तेजस्वी मृदुमति होता नानाशास्त्रांत ।
सुकुशल[2] ललनानेत्रमनोहर असे महाधूर्त ॥ १४६ ॥
द्यूतामध्यें सदैव विजयी सकलकलानिपुण ।
रमला नगरीं भोगामध्यें जैसा रतिरमण ॥ १४७ ॥
निजजनकासह आप्तजनांना धनिक तयें केलें ।
नानाभरणें भूषित जननीमानस सतत फुलें ॥ १४८ ॥

[ शशांकमुखगुरूंनीं केलेल्या धर्मोपदेशाचें वर्णन नंदिवर्धनराजानें राणीजवळ केलें तें ऐकून मृदुमति विरक्त होऊन मुनि झाला.]

शशाङ्कनगरीं एकेसमयीं राजगृहीं शिरला ।
नन्दिनृपाचा शब्द तयानें यापरि ऐकियला ॥ १४९ ॥
शशाङ्कमुखगुरु यांच्या चरणाजवळी जिनधर्म ।
आज श्रविला प्रिये तयानें मज समजे वर्म ॥ १५० ॥
धर्म असे हा शिवसुखदायी निश्चय मम झाला ।
विषय असति हे अवसानीं[3] बहु दारुण[4] नैव तुला[5] ॥ १५१ ॥
यास्तव देवी, मी जिनदीक्षा अवश्य घेईन ।
शोक न करि तूं प्रिये ! आपुलें ठेवी शान्त मन ॥ १५२ ॥
नन्दिवर्धनें यापरि कथिलें जें हित राणीस ।
मृदुमतिनें तें सर्व श्रविलें वरिलें बोधास ॥ १५३ ॥

---

१ शकुनेच्या दोन थानांतून. २ चतुर. ३ शेवटीं. ४ भयंकर. ५ उपमा.

निर्मल झालें हृदय तयाचे विरक्ति उद्भवली ।
रत्नत्रयपरिणति मनिं झाली दृढता त्या आली ॥ १५४ ॥
भवभय हृदयीं उद्भवलें शशिमुखसन्निध गेला ।
दीक्षा घेउनि मुनिधर्माची महाव्रतीं रमला ॥ १५५ ॥
घोरतपा तो यथोक्त आचरि भिक्षा निर्दोष ।
घेई हृदयीं क्षमा धरी जी वाढवि गुणकोष ॥ १५६ ॥
एके वेळीं 'गुणनिधि' नामक गुणनिधि मुनि आला ।
दुर्गगिरीच्या शिखरीं चातुर्मास तयें केला ॥ १५७ ॥
राहुनि तेथें निर्भोजन तैं घोर तपा केलें ।
मासचतुष्टय मुनिवर्यानें यापरि संपविले ॥ १५८ ॥
करिति सुर स्तुति ज्याची मुनि तो संपवुनी नियमा ।
निघुनी गेला नभःपथानें दाखविली महिमा ॥ १५९ ॥

[ मृदुमतिमुनीनें मीच गुणनिधिमुनि आहे असें लोकांना भासविलें. गुरूपुढें मायाशल्याची आलोचनाही केली नाहीं. त्यामुळें त्याला तिर्यग्गति बंध झाला.]

नन्तर मृदुमति भिक्षेसाठीं येई नगरास ।
हस्तचतुष्टय पृथ्वी पाहुनि रक्षी जीवास ॥ १६० ॥
शैलाग्रावरि राहत होता तोच नृपालांना ।
प्रजाजनांना गमला मुनिवर भजती त्या नाना ॥ १६१ ॥
नानाभक्ष्यें देउनि करिती त्याला सन्तुष्ट ।
कुकर्मदोषें मायेपासुनि तो नच हो विरत ॥ १६२ ॥
हे यतिनाथा ! जो शैलाग्रीं होता तो तूंच ।
म्हणुनि वन्दिती जन त्या खालीं करि मस्तक साच ॥ १६३ ॥
अज्ञानानें अभिमानानें स्वादीं रत झाला ।
दुःखबीजसें कर्म बांधिलें स्ववञ्चनीं रमला ॥ १६४ ॥
मायाशल्या गुरूपुढें कधिं न तयें उद्धरिलें ।
दुःखपात्र तो झाला तिर्यग्गतिबन्धन पडलें ॥ १६५ ॥
कालें मृदुमति मरुनि ब्रह्मोत्तरांत सुर झाला ।
जेथें गृहिवर 'अभिरामाचा' जन्म असे घडला ॥ १६६ ॥
पूर्वकर्म शुभ होतें उभयीं प्रेमहि बहु जडलें ।
स्वर्गामध्यें ऋद्धिवैभवें सुखांत ते रमले ॥ १६७ ॥

( मृदुमतिमुनि ब्रह्मोत्तरस्वर्गांतील सुख भोगून मरणोत्तर सल्लक-वनांत प्रचण्ड हत्ती होऊन जन्मला. )

नानादेवीवेष्टित ते सुर सौख्यसमुद्रांत ।
पोहत होते पुण्यफलावलि उपभोगिति सतत ॥ १६८ ॥
स्वपुण्यराशिक्षय झाल्यावरि मृदुमति तेथून ।
होऊन च्युत जम्बूद्वीपीं अवश करी गमन ॥ १६९ ॥
मायाशेषें सल्लक नामक जन्मे गहनवनीं ।
जेथें होता निकुञ्ज नामक व्यापी गिरि अवनी ॥ १७० ॥
वर्षामेघासमान झाला काळा करि थोर ।
समुद्र जैसें गर्जन करि तो यमसमसा क्रूर ॥ १७१ ॥
अपुल्या गमनें जिंकी पवना नायक करिराज ।
रागावे त्या कालीं भासे सुतीक्ष्ण तत्तेज ॥ १७२ ॥
दांत तयाचे दीर्घ नि मुशळाकार नि वहु शुभ्र ।
वाहे जेव्हां कपोल-मद तें भासे वर्षाभ्र ॥ १७३ ॥
विजयादिक जे करीन्द्र झाले त्यांच्या वंशांत ।
जन्म जहाला होता याचा भासे वहु कान्त ॥ १७४ ॥
सिंह व्याघ्रा फाडी उपडी महाद्रुमा रागें ।
फोडी पर्वततटा सहज जो चूर्ण करी वेगें ॥ १७५ ॥
ऐरावतही पाहुन ज्याला भय मनिं पावेल ।
स्वच्छन्दानें विपिनीं विहरे गज तो वहुकाल ॥ १७६ ॥
गन्ध मदाचा वनीं पसरतां श्वापद भीति मनीं ।
पल्लवसुन्दरगिरितटिं विहरे कुञ्जर सुखद वनीं ॥ १७७ ॥
प्रफुल्ल झालीं कमलें जेथें सरोवरांत करी ।
करी सहचरीसवें जलीं तो क्रीडा सौख्य वरी ॥ १७८ ॥
केव्हां केव्हां सुरसरितेच्या डोहीं विहरून ।
ग्रीष्मजतापा प्रियकरिणीसह शमवी अन्यून ॥ १७९ ॥
गजवृन्दासह इकडे तिकडे करी विहार करी ।
शोभे जैसा पक्षिसमूहें गरुड नभश्चारी ॥ १८० ॥
निर्झर वाहति वरुनी ज्याच्या शैलासम शोभे ।
मदनिर्झरणें अलिगुञ्जारव करिती मदलोभें ॥ १८१ ॥

[ रावणानें याला पकडून लंकेस नेलें होतें. 'त्रिलोककण्टक' असें त्याचें नांव ठेविलें होतें. लक्ष्मणानें रावणास युद्धांत मारून त्याला अयोध्येंत आणिलें. भरताला पाहून हा शांत झाला. ]

लङ्केन्द्रानें एकेवेळीं गजेन्द्र पाहियला ।
निजविद्यांनीं पराक्रमांनीं कष्टें वश केला ॥ १८२ ॥
सुलक्षणी या गजराजाचें सुनाम ठेवियलें ।
त्रिलोककण्टक त्यानें ज्याचें प्रसन्न मन झालें ॥ १८३ ॥
केली स्वर्गीं क्रीडा ज्यानें सुदीर्घकालांत ।
निजदेवीसह तो सुर झाला गज भूलोकांत ॥ १८४ ॥
क्रीडा आतां येथें करितो करिणीसह तोच ।
कुकर्मशक्तिस दूर कराया समर्थ नच साच ॥ १८५ ॥
दुःखें सगळ्या भरल्या असती संसारीं योनि ।
जीव तियेमधिं तथापि करि रति जाणि न निजहानि ॥ १८६ ॥

[ चक्रवर्तिपुत्र अभिरामहि ब्रह्मोत्तरस्वर्गांतून च्युत होऊन दशरथराजाचा पुत्र भरत झाला. ]

होऊन च्युत सुरलोकाहुनि अभिरामहि भरतीं ।
साकेतापुरिं भरत जहाला करि धर्मांत रति ॥ १८७ ॥
गेला मोहप्रपञ्च सगळा ज्याचा विलयास ।
भोगपराङ्मुख होउनि इच्छी मुनिपदिं विनिवास ॥ १८८ ॥
भवनाशास्तव उपाय एकचि मुनिवर होणें हें ।
कर्मविनाशा अमोघ कारण चिन्ती नित पाहे ॥ १८९ ॥

[ संक्षेपानें भरत व हत्तीच्या भवांचें वर्णन. ]

मरीचिमार्गीं महाव्रतच्युत होउनि रत झाले ।
सूर्यचन्द्र हे तेणें भाऊ कुगतींत भ्रमले ॥ १९० ॥
सुखदुःखद जें कर्म जनांनीं उपार्जिलें असतें ।
तप न करिति जरि अवश्य त्याचें त्यांना फल मिळतें ॥ १९१ ॥
चन्द्र कुलंकर समाधिमरणीं भवांत मृग झाला ।
साधुमनाचा भरतभूमिपतिभवांत तो आला ॥ १९२ ॥

जो रविनागा आधीं नन्तर झाला ' श्रुति ' विप्र ।
होउनि मृग मग मरणा पावुनि फिरला आक्षिप्र ॥ १९३ ॥
मृदुमति होउनि सुरलोकामधिं सुरसुख भोगून ।
गजपति झाला पूर्व कर्मफल मिळतें चुकतें न ॥ १९४ ॥
महाशक्ति गज उद्धत होउनि तोडी स्तम्भास ।
भरता पाहुनि भवस्मृतीनें पावे प्रशमास ॥ १९५ ॥
जन्ममरण हें जाणुनि नाना बहुसुखदुःखास ।
विषमकर्मवन सोडुनि सेवा बुध हो ! धर्मास ॥ १९६ ॥
नृजन्म मिळवुनि जिनवरधर्मा जरि न स्वीकारी ।
संसाराचा मित्र बने तो फिरतो संसारीं ॥ १९७ ॥

( आर्या )

श्रीजिनमुखकमलांतुनि धर्म निघाला अनन्यकान्तीचा ।
धारण करील नर जो मोक्ष मिळे त्या अनन्तशान्तींचा ॥ १९८ ॥
म्हणुनि बुधांनो ! धारण करा तुम्ही श्रीजिनेन्द्रधर्मास ।
जिनदास सांगतो हें मिळवा तेणें अनन्तशर्मास ॥ १९९ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे भरतत्रिभुवनालङ्कारसमाध्यनुभवानुकीर्तनं नाम पञ्चाशीतितमं पर्व ॥ ८५ ॥

## शाऐंशीव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

लक्ष्मणानें त्रिलोकमण्डन हत्तीचे पूर्वभव सांगण्याची विनंति केलेली ऐकून भरत व हत्तीचे सविस्तर भववर्णन देशभूषण केवलींनीं केलें. तें ऐकून संसारविरक्त झालेला भरत नम्रतेनें उभा राहून भगवंतांना म्हणाला– 'प्रभो, मला आपल्या चरणाचा आश्रय द्या. मी संसारदुःखांनीं पीडित होऊन आपल्या चरणाजवळ आलों आहे.' असें बोलून त्यानें बाह्याभ्यंतर परिग्रहांचा त्याग केला व दाढी आणि मस्तकाचे केश आपल्या हातांनीं उपटून सम्यग्दर्शनासह महाव्रतें धारण केलीं. भरत मुनि झाला हें पाहून देवांनीं त्याच्यावर कल्पवृक्षाच्या फुलांची वृष्टि केली.

भरतावरील प्रेमानें त्यावेळीं हजार राजांनींही परिग्रह त्यागून मुनिदीक्षा घेतली. ज्यांना मुनिव्रतें घेण्याचें सामर्थ्य नव्हतें त्यांनीं अहिंसादिक पांच अणुव्रतें घेतलीं.

आपला पुत्र भरत मुनि झालेला पाहून कैकेयी फार दुःखी झाली. ती मूर्च्छित झाली. तिला चन्दनजलानें सावध केलें. वासराच्या वियोगानें गाय जशी हंबरडा फोडते तशी ती हंबरडा फोडून रडूं लागली. तुझ्यावांचून मी कशी राहू? माझ्यावर हा दुःखाचा डोंगर कोसळला. त्याचें ओझें मी कसें साहूं. इत्यादि प्रकारें ती विलाप करुं लागली.

रामचंद्र म्हणाले– मातोश्री आम्हीही तुझेच पुत्र आहोत. आमच्याकडे पाहून तूं दुःख विसर. भरत फार शाहाणा आहे. त्याच्याविषयीं शोक सोड. असें सांत्वनाचे शब्द बोलून रामचंद्रांनीं तिचा शोक नाहींसा केला.

ही स्त्रीदशा नगरांतील गटारीच्या पाण्याप्रमाणें सदोष आहे असें जाणून व संसारभय मनांत धरून ती पृथ्वीमती आर्यिकेजवळ गेली. तिनें परिग्रहांचा त्याग केला. एक शुभ्र वस्त्र धारण करून तिनें उपचरित अहिंसादि महाव्रतें धारण केलीं व जशी चन्द्रकला नक्षत्रसमूहांत शोभते तशी ती आर्यिकासमूहांत शोभली. तिच्याबरोबर तीनशें स्त्रियांनीं आर्यिकाव्रत धारण केलें. देशभूषणकेवलींच्या धर्मोपदेशानें लोक व्रती झाले. जसें सरोवर कमलांनीं शोभतें तसें केवली सर्वज्ञाची सभा मुनि व श्रावकांनीं शोभूं लागली.

# सत्त्याऐंशीव्या पर्वांतील कथेंतील सार.

देशभूषण केवलींनीं त्रिलोकमण्डन हत्तीलाही अणुव्रतें दिलीं. तो सम्यग्दृष्टी, सम्यग्ज्ञानी व सदाचारी होता. तो तीव्र तप करीत असे. पंधरा दिवसांचा उपवास करून सोळाव्या दिवशीं पारणें करण्यासाठीं तो नगरांतून जेव्हां शांत चित्तानें फिरत असे त्यावेळीं लोक आदरानें त्याला लाडू, पुऱ्या, मांडे वगैरे अन्न देत असत. हत्ती हे पदार्थ खातांना त्यांच्या स्वादावर आसक्त होत नसे. उदास भावनेनें तो खात असे. केव्हां केव्हां तो मासोपवास करी व पारण्याच्यादिवशीं आपोआप वाळलेलीं पानें व फळें भक्षण करी. शरीरावरील ममत्व त्यागून असें तीव्र तप त्यानें चार वर्षेपर्यंत केलें. त्याचें शरीर क्षीण झालें. त्यानें स्वच्छंद विहार त्यागला होता. व्रतरूप अङ्कुशाच्या वश होऊन संसारभयरूपी खांबाशी तो बद्ध झाला होता. याप्रमाणें तप करून त्या हत्तीनें अन्न, पान, खाद्य व लेह्य अशा आहारांचा क्रमानें त्याग करून तो निराहार राहूं लागला व समाधिमरणानें त्यानें देह सोडला. अशा उत्तममरणानें त्याचा जीव साहव्या स्वर्गांत महर्द्धिक देव झाला व तेथें दिव्यसुखें तो भोगूं लागला.

इकडे परिग्रहत्यागी, पंचमहाव्रतधारी भरतमुनिराज देहांत विरक्त व आत्मचिंतनांत अनुरक्त होऊन आपल्या चारित्रांत तत्पर राहत असत. ते विहार करीत असतां जेथें सूर्यास्त होई तेथें तें भयंकर वन असलें तरी थांबत असत. तेथें क्रूर प्राण्याकडून होणारा उपद्रव शांतमनानें सहन करीत असत. निर्बंध वाऱ्याप्रमाणें भरतमुनि विशुद्ध परिणामामुळें निर्बंध असत. त्यांच्या हृदयाला प्रचंड उपवद्रांनींही क्षोभ उत्पन्न होत नसे. त्यांनीं क्षमाखड्ग हातांत घेतलें होतें. सत्यभाषणरूपी कवच त्यांच्या अंगांत होतें व ते भूक, तहान, थंडी, ऊन वगैरे परीषहांना जिंकण्यास नेहमीच तयार असत. अरिमित्रांना समान मानून सुखदुःखांत हर्षविषादरहित होते. काव्याकुस्त्यांच्या मार्गांतून चालत असतांही जीवरक्षणाच्या ध्येयापासून तिळभरही ते च्युत होत नसत. अशा सुतपानें त्यांना भूमीवरून अधर चार अंगुल अन्तरालांत चालण्याची ऋद्धि प्राप्त झाली होती.

संसारांत फिरविणाऱ्या मोहकर्माबरोबर ज्ञानावरण, दर्शनावरण व अन्तराय या चार कर्मांचा नाश करून ते सर्वज्ञ झाले. यानंतर कांहींकालपर्यंत त्यांनीं भरताच्या आर्यदेशांत विहार केला. भव्यजीवांना धर्ममार्गांत स्थिर केलें व आयुष्यांतीं अघातिकर्मांचा नाश करून जेथून केव्हांही पतन होत नाहीं अशा अनंतदर्शनसुख व शक्तिसंपन्न मोक्षस्थानीं ते विराजमान झाले. या भरतऋषीचें चरित्र जो वाचेल, सांगेल व ऐकेल त्यास दीर्घायु, कीर्ति, वैभव, आरोग्य व ज्ञान प्राप्त होईल.

# ञ्याऐंशीवें पर्व.

( भरतभवश्रवणानें सभा भयभीत झाली. )

जें अज्ञाना दूरचि सारी पवित्र जें आहे ।
भवदुःखांचें वर्णन करि जें ऐकुनि मुनिवच हें ॥ १ ॥
विस्मय झाला सभासदांना भवभय त्या वाटे ।
भरतभवांच्या श्रवणें आले देहीं वहु कांटे ॥ २ ॥

( केवलिभगवंतांना आश्रय देण्याची विनंती करून भरतानें मुनिदीक्षा घेतली.)

चित्रलिखितसम सभा जहाली ऐकुनि मुनिवचना ।
वन्दुनि मुनिपद भरत वोलला करा वचः[१]श्रवणा ॥ ३ ॥
योनिसहस्रीं दुःखें वहु मी फिरुनी भोगियलीं ।
खिन्न जहालों अतिशय नाथा ! आलों चरणतलीं ॥ ४ ॥
जन्म-मरण या उग्रतरङ्गीं वाहुनि मज नेलें ।
भवसरितेनें, हस्तालम्बन द्यावें झणिं अपुलें ॥ ५ ॥
यापरि वोलुनि सर्वचि सङ्गा त्यागुनि भरतानें ।
[२]श्मश्रुशीर्षकचलोचन केलें स्वकरें सत्त्वगुणें ॥ ६ ॥
सम्यक्त्वासह महाव्रतांचा केला स्वीकार ।
दीक्षा घेउनि भरत जहाला तेव्हां श्रमणवर ॥ ७ ॥
साधु साधु-रव केला व्योमीं हर्षे देवगणें ।
दिव्य सुगन्धित वर्षिलिं भरतीं कल्पद्रुमसुमनें ॥ ८ ॥

( हजार राजांनीं भरताबरोबर दीक्षा घेतली. )

भरतप्रेमें सहस्रभूपति राज्या त्यागून ।
घेउनि दीक्षा श्रमण जहाले स्वात्मीं रममाण ॥ ९ ॥
मुनिव्रतांची शक्ति न ज्यांना त्यांनीं श्रमणास ।
करुनी वन्दन योग्य घेतले गृहस्थधर्मास ॥ १० ॥
झाला दीक्षित यास्तव झाली जी व्याकुल वहुत ।
धावत येउनि पडली धरणीवरि मूर्च्छायुक्त ॥ ११ ॥

---

१ भाषण ऐकणें. २ दाढी व मस्तकाचे केश उपटणें.

पुत्रप्रेमें ऐसी झाली केकयभूपसुता[1] ।
चन्दनसेकें आली पुनरपि तिजला सावधता ॥ १२ ॥
वत्सवियोजित धेनुसमा ती हम्बरडून रडे ।
तुजवांचुनि मी राहू कैशी केवि सुटे कोडें ? ॥ १३ ॥
वत्स वत्सला काय वरें हें आहे केलेंस ।
पडली आतां माझ्यावरती या संकटरास ॥ १४ ॥
यापरि झाली शोकविकल बहु तिज वदले राम ।
आम्ही नाहीं पुत्र तुझें कां घेई विश्रामें[2] ॥ १५ ॥
भरत असे बहु माते पण्डित शोका तूं सोड ।
वचनें केलें शान्त तियेला बोलुनि बहु गोड ॥ १६ ॥
निर्मलचित्तें करी स्वतःची निन्दा ती विपुल ।
स्त्रीपद आहे नगरीनिर्झर[3]सम नि गुणें[4] विकल ॥ १७ ॥
आतां ऐशी करीन कृति मी होइन गतपापा[5] ।
बोलुनि ऐसें त्यजिती झाली शीघ्र मनस्तापा ॥ १८ ॥
संसाराची भीति तियेच्या उपजे हृदयांत ।
धर्मबीज तैं उपजुनि झालें शीघ्रचि अंकुरित ॥ १९ ॥
पृथिवीमति या आर्येजवळी दीक्षा घेऊन ।
आर्या झाली भरतसुमाता वन्दिति जन चरण ॥ २० ॥
गृहिधर्माचें जाळें तोडुनि आर्याधर्मास ।
ग्रहण तियेनें केलें जो दे सुरेशशर्मास[6] ॥ २१ ॥
सितवसना ती नेसुनि झाली आर्या निर्मोहा ।
महाव्रतां उपचरिता घेउनि झाली ती अगृहा[7] ॥ २२ ॥
शोभे तेव्हां आर्यावृन्दीं जैशी गगनांत ।
कलङ्कमुक्ता इन्दुकला जणु होतां घनमुक्त[8] ॥ २३ ॥
झाल्या आर्या स्त्रिया तीनशत विरक्त होऊन ।
धर्मा स्वोचित पाळुनि होती स्वहितीं रममाण ॥ २४ ॥

---

१ केकयदेशाच्या राजाची कन्या अर्थात् कैकेयी. २ विसावा, शांति. ३ शहराचे घाण पाणी वाहून नेणारी अर्थात् गटारी. ४ गुणांनीं रहित. ५ पापरहित. ६ देवेंद्राच्या सुखाला. ७ घराचा त्याग जिनें केला आहे अशी. ८ मेघांनी रहित.

यापरि झाले मानव तेव्हां व्रतक्रियायुक्त।
धर्मरवीचा प्रकाश पसरे तम झाला लुप्त ॥ २५ ॥
जैसें सरवर कमलें शोभे केवलिनाथाची।
संसत् शोभे मुनिश्रावकें जिनदासें साची ॥ २६ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे भरतकेकयानिष्क्रमणाभिधानं नाम षडशीतितमं पर्व ॥ ८६ ॥

# सत्त्याऐंशीवें पर्व.

( देशभूषण केवलींनीं हत्तीला अणुव्रतें दिलीं. )

जो लोकत्रयभूषण हत्ती अणुव्रतें त्यास ।
देशविभूषणमुनिवर्यानें दिलीं सुनम्रास ॥ १ ॥
सम्यग्दृष्टि नि सम्यग्ज्ञानी तेवि सदाचारी ।
गजवर झाला गृहिव्रतांचा पालक अधिकारी ॥ २ ॥
पाक्षिक मासिक उपवासा करि पारणदिनिं भक्षी ।
शुष्क अशीं जीं पानें सुफलें निजात्मसंलक्षी[1] ॥ ३ ॥
भवभय हृदयीं धरी सदा हा करी सदाचारी ।
करिती जनही आदर त्याचा विहरे भूमिवरी ॥ ४ ॥
देती जन त्या पारणसमयीं आदर धरुनि उरीं ।
लाडू मांडे पोळ्या उत्तम उदास भक्षि करी[2] ॥ ५ ॥

( उग्र तप करून तो हत्ती सहाव्या ब्रह्मोत्तरस्वर्गांत महर्द्धिकदेव झाला. )

उग्र असें तप करिराजानें ममत्व सोडून ।
वर्षचतुष्कावधि[3] जें केलें झाला तो क्षीण ॥ ६ ॥
व्रताङ्कुशाच्या वश तो झाला विहरण सोडून ।
भवभय-खांबीं बद्धचि राहे स्मरुनी जिनचरण ॥ ७ ॥
क्रमक्रमें तो उग्रतपस्वी गज भोजन सोडी ।
प्रशस्तमरणें षष्ठस्वर्गीं[4] सुरवर-तनु[5] जोडी ॥ ८ ॥
कण्ठीं मणिगणमाला, कानीं कुण्डल तेजस्वी ।
शीर्षी ज्याच्या मुकुट नि चमके सुर तो ओजस्वी[6] ॥ ९ ॥
स्वरङ्गनांनीं वेष्टित होउनि सुख भोगित राही ।
दुःखाचा नच तनुस जयाच्या स्पर्श वाराही ॥ १० ॥

( भरत महातपस्वीच्या उग्र तपश्चरणाचें वर्णन. )

---

१ आपल्या आत्म्याच्या स्वरूपांत तत्पर राहणारा. २ हत्ती. ३ चार वर्षेपर्यंत. ४ ब्रह्मोत्तरस्वर्गांत. ५ शरीर. ६ उत्साही.

पञ्चमहाव्रतधारी भरतहि परिग्रहत्यागी ।
विरक्त देहीं निजात्मचिन्तनिं सदैव अनुरागी ॥ ११ ॥
विहरत असतां रवि अस्ताला जातां घोरवनीं ।
श्वापदपीडा सोशी निश्चल राही त्या स्थानीं ॥ १२ ॥
भरतमहामुनि अबद्ध ऐशा वाऱ्यासम होते ।
सिंहासम ते निर्भय अतिशय अकम्प गिरिसम ते ॥ १३ ॥
क्षोभ न त्यांच्या हृदयीं होता सागरसम धीर ।
विहरण त्यांचें झालें सौख्यद भव्यजना फार ॥ १४ ॥
नग्नरूपधर भरतमुनीश्वर तपोरणीं धीर ।
क्षमासि[1] धरिती करिं सत्यव्रतकवचा ते थोर ॥ १५ ॥
परीपहांना जिंकायास्तव झाले उद्युक्त ।
जिंकुनि त्यांना निजात्मराज्यीं रत होती सतत ॥ १६ ॥
अरिमित्रांना सम लेखिति ते सम नित सुखदुःखीं ।
तृणीं नि रत्नीं समता धरिती अर्हन्नाम मुखीं ॥ १७ ॥
असङ्ख्य कण्टक मार्गीं जेथें अशा वनांतून ।
जीवा रक्षुनि चालत होते श्रीभरतश्रमण ॥ १८ ॥
चतुरङ्गुलचारिता[2] तयांना ऐशा सुतपानें ।
प्राप्त जहाली ऋद्धि जियेनें होय नभीं जाणें ॥ १९ ॥
मोहकर्म जें जीवा फिरवी भवभविं तन्नाश ।
केला भरतें प्राप्त जहाले केवलबोधास ॥ २० ॥
लोकालोका जाणी ऐशा केवलबोधानें ।
भरत जहाले सर्वज्ञानी ज्यांत न किमपि उणें ॥ २१ ॥

आर्या–

ऐशा माहात्म्यानें विहरुनि मुनि भरत भारतार्यांत[3] ।
कर्माष्टकास नाशुनि विराजले नित्य सिद्धिसौधांत ॥ २२ ॥
येथून न सिद्धांचा पुनरपि होतो प्रपात[4] संसारीं ।
हें स्थान असे अच्युत मुक्त सदा राहतात अविकारी ॥ २३ ॥

---

१ क्षमारूप खड्ग. २ जमिनीवरून चार अंगुल प्रमाणानें अधर चालणें.
३ भरतक्षेत्रांतील आर्यदेशांत. ४ संसारांत येणें.

भरतपचिं सुचरित कीर्तन करि जो तयास लाभेल ।
दीर्घायु-कीर्ति-वैभव आरोग्य नि वोध विपुल देहवल ॥ २४ ॥
हें भरतचरित सुकथासार असे सर्वसद्गुणें युक्त ।
ऐकावें जिनदासें मिळेल रवितुल्य तेज त्या त्वरित ॥ २५ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे भरतनिर्वाणगमनं नाम सप्ताशीतितमं पर्व ॥ ८७ ॥

## अठ्ठयाऐंशीव्या पर्वातील कथासार.

शरीरनिःस्पृह होऊन ज्यांनीं भरताबरोबर दीक्षा घेतली होती त्या राजांचीं कांहीं नांवें:— रतिवर्धन, सिद्धार्थ, शल्य, जाम्बूनद, नन्द, नन्दन, विरस, सुमति, आनन्द, जनवल्लभ, शान्ति वगैरे. या राजांनीं आपलें वैभव त्यागून महाव्रतें धारण करून अपूर्व शांति मिळविली होती. शुभ परिणामांनीं मरण पावून यांनीं स्वर्गप्राप्ति करून घेतली व ते देवसुख भोगू लागले. भरत हा भरतचक्रवर्तीप्रमाणें राज्यपालन करूनही त्यावरची आसक्ति त्यागली असल्यामुळें विरक्त होता. तो राज्य त्यागून दीक्षा घेऊन वनांत तप करूं लागला. इत्यादिक विचार लक्ष्मणाच्या मनांत येऊन त्याचे डोळे अश्रूंनीं भरले. तो विराधिताच्या खांद्यावर हात ठेवून त्याला म्हणाला— ' विराधिता, भरतानें आपल्या प्रतिज्ञेचें रक्षण करून सत्य असा मोक्षमार्ग आचरला. तरुणपणींही त्यानें आपलें शरीर गवतासारखें मानलें व मुमुक्षु होऊन मुनिधर्माचें पालन केलें. असा तो गुणभूषण भरत कोठें आहे सांग बरें ! '

रामचंद्र म्हणाले— तो भरत धन्य झाला. घरांत राहूनही त्याचें आचरण मुनिप्रमाणें होतें. तो विरक्त होता. त्यानें विषान्नाप्रमाणें राज्याचा त्याग केला. तप करून तो मुनींनाही पूज्य झाला आहे. मग आम्हांला कां वंद्य होणार नाहीं. याप्रमाणें भरतगुणांच्या स्मरणानें राम-लक्ष्मण व सभेंतील राजांचें मन थोडावेळ सुखदुःखाच्या मिश्ररसांत मग्न झालें.

एकेवेळीं राजे रामचन्द्राला नमस्कार करून असें म्हणाले— प्रभो, आपण राज्याभिषेक करून घेऊन आमच्या मनाला प्रसन्न करावें. ही आमची विनंति आपण मान्य करावी.

रामचंद्र म्हणाले— नृपहो, राजराज लक्ष्मण प्रेमानें माझ्या पायांना नमस्कार करितो. अभिषेकावांचून हें राज्य सुरळीत चाललें आहे. यास्तव राज्याभिषेक करून

घेण्याची आवश्यकता नाहीं. हें रामभाषण ऐकून व राघवाचा जयजयकार करून राजगण लक्ष्मणाकडे गेला. लक्ष्मण रामाकडे येऊन विनयानें म्हणाला– " दादा, या राजांचें वचन मान्य करा. यांचें भाषण योग्य व युक्तियुक्त आहे."

यानंतर मेघगर्जनेप्रमाणें वाद्यें वाजूं लागली. प्रजाजनांना आनन्द झाला. राजराज-लक्ष्मण रामचंद्रासह स्नानासनावर बसला. हें दृश्य लोकांना फार सुंदर वाटलें. रत्नजडित सुवर्णाच्या व चांदीच्या कलशांनीं सशास्त्र राज्याभिषेक केला गेला. राजगणांच्या आनन्दाश्रूसह दोघा बंधूंचा राज्याभिषेक झाला. मस्तकावर रत्नखचित किरीट, कानांत कुण्डल, बाहूमध्यें अंगद व केयूर, गळयांत रत्नहार आणि अंगाला सुगंधित लेपन व दिव्य वस्त्रांचें परिधान यांनीं तें बंधुयुगल फारच सुंदर दिसू लागलें. याचप्रमाणें सीतासती व लक्ष्मणाची मुख्य राणी यांचाही स्वामिनीपदाचा अभिषेक केला.

हें अभिषेककार्य भूगोचर व नभश्चर विद्याधरांनीं केलें. त्यांच्या मनाला प्रसन्नता वाटली.

सिंहासनावर आरूढ होऊन रामचंद्रांनीं बिभीषणाला लंकाराज्य दिलें. सुग्रीवाला किष्किंधानगर दिलें. मारुतीला श्रीपर्वतनगराचें राज्य देऊन त्याला गौरविलें. विद्याधर राजा विराधिताला श्रीनगराचें वंशपरंपरेनें चालत आलेलें राज्य दिलें. समुद्रकिनाऱ्यावर वसलेल्या कैष्किंधक नगराचें राज्य नल-नीलांना दिलें. विजयार्धपर्वताच्या दक्षिणश्रेणींत असलेलें रथनूपुरनगराचें राज्य भामण्डलाला दिलें. व रत्नजटीला देवगीत नामक नगर दिलें. याप्रमाणें इतर अनेक राजांना देश, कोश आदिक वैभव दिलें. या अनेक राजांना त्यांच्या पुण्यानुसार राज्यादिकाची प्राप्ति झाली. पुण्याचें फल सुख देणारें असतें म्हणून जिनभक्ति करून तें पुण्य मिळवावें. जे धर्मांत प्रेम करतात त्यांना कुबेराला हसणारें वैभव प्राप्त होतें.

# अट्ठयाऐंशीवें पर्व.

---

जे भरतासह दीक्षा घेउनि निःस्पृह निजदेहीं ।
दुर्लभ मार्गा प्राप्त जहाले तन्नामावलि[1] ही ॥ १ ॥
रतिवर्धन सिद्धार्थ शल्यनृप जाम्बूनद नन्द ।
नन्दन विरस नि जम्बुवाह-रथ सुमति नि आनन्द ॥ २ ॥
श्रीजनवल्लभ, रतिद, सदाश्रय, शशाङ्कपात्, शान्ति ।
श्रुतधर, पृथ्वीधर, इन्द्रध्वज ज्यांच्या मुखिं कान्ति ॥ ३ ॥
नघुष, सुनन्दन, सुचन्द्र, कुन्दर, सुमित्र, अलक असे ।
धर्म, मित्र नि प्रभाकराभिध विरक्ति हृदयीं वसे ॥ ४ ॥
विशुद्धकुलज नि तत्पर राहति सदा सदाचारी ।
नृपति हजारो दीक्षित होउनि वारिति अघवारि[2] ॥ ५ ॥
हत्ती घोडे सैनिक आणिक सुवर्णरथ रत्नें ।
अन्तःपुर नि स्वराज्य वैभव मानुनि समचि तृणें ॥ ६ ॥
महाव्रतांना पाळुनि धरिती अपूर्व शान्तीस ।
शुभपरिणामें वरिती मुनि ते सुररमणीरतिस[3] ॥ ७ ॥

( राम-लक्ष्मणांचें भरताविषयीं सखेद स्तुत्युद्गार. )

ज्याची भरतासम नित चेष्टा भ्राता भरत असा ।
राज्या त्यागुनि दीक्षा घेउनि गेला वनवासा ॥ ८ ॥
स्मरण तयाचें येतां झाला लक्ष्मण मनिं खिन्न ।
चिंतुनि त्याचे सद्गुण नेत्रीं आले अश्रुकण ॥ ९ ॥
विराधिताच्या स्कन्धीं ठेवुनि कर वदला त्यास ।
भरतें रक्षुनि निजप्रतिज्ञा वरिलें सत्यास ॥ १० ॥
आतां कोठें तो गुणभूषण भरत असे सांग ।
तरुणपणींही ज्यानें गणिलें तृणसम निजअंग ॥ ११ ॥

---

१ त्यांच्या नांवाची पंक्ति. २ पापरूपी पाणी. ३ देवांगनाच्या संभोग-सुखास.

इष्ट-बन्धुजन सोडुनि राज्यहि विस्तृत वनिं गेला ।
मुमुक्षु पाळी दुर्धर ऐशा श्रीमुनिधर्माला ॥ १२ ॥
राघव वदला सौमित्रीला धन्य असे भरत ।
गेहीं असुनिहि होता मुनिसम नित्य विरक्तिरत ॥ १३ ॥
निर्मल होती मति हे लक्ष्मण केवल त्याचीच ।
गरलान्नासम राज्य त्यागुनि रमला तपिं साच ॥ १४ ॥
पूज्यचि झाला तो श्रमणासहि कां नच आम्हांस ।
इन्द्रहि ज्याच्या वर्णु शके ना सुगुणसमूहास ॥ १५ ॥
भरतगुणांचें वर्णन यापरि ऐकुनि भूपगण ।
क्षणभरि झाला सुखदुःखाच्या मिश्ररसीं मग्न ॥ १६ ॥

आर्या–

उद्विग्न लक्ष्मणासह नन्तर राघव सभेंतुनी उठला ।
नृपगणहि स्वगृहामाधिं विस्मय पावून शीघ्रसा गेला ॥ १७ ॥
( राजे राम-लक्ष्मणांचा अभिषेक करण्याची इच्छा व्यक्त करितात. )
पुनरपि कोणे समयीं कर्तव्याचा विचार मनिं करुन ।
श्रीरामाला नमुनि प्रीतीनें भूप बोलले वचन ॥ १८ ॥
विद्वान् वा मूढ असे असोत आम्ही प्रसन्न मनिं व्हावें ।
राज्याभिषेक घ्यावा करून अस्मन्मन प्रसादावें ॥ १९ ॥

चन्द्रकान्त जाति–

नाथा, अमुच्या नयनमनाला तेणें होईल ।
प्रमोद अमुची विनन्ति आपण अमान्य न कराल ॥ २० ॥
( रामचन्द्र लक्ष्मणाच्या आग्रहानें राज्याभिषेकास सम्मति देतात. )
सप्तगुणांच्या विभवें भरलें ज्याचें राज्य असे ।
राजराज तो लक्ष्मण नमितो मत्पदहि स्ववशें ॥ २१ ॥
अभिषेकाविण चालतसें हें सुराज्य पाहून ।
आवश्यकता गमे न मजला वदतें मत्सुमन ॥ २२ ॥
यास्तव नृप हो विरुद्ध तुमचें भाषण मज भासे ।
कशास ऐसा प्रयास करिता नोचित हें विलसे ॥ २३ ॥
ऐसें ऐकुनि राघववचना जय जय शब्दानें ।
अभिनन्दुनि त्या लक्ष्मणसंनिध वदले विनयानें ॥ २४ ॥

आला लक्ष्मण विनयें वदला दादा भूपांची ।
अमान्य न करा वचनावलि ही युक्त नि जी साची ॥ २५ ॥

( राम-लक्ष्मण यांचा सीता व विशल्या या मुख्य राण्यांबरोबर
राजे व विद्याधर यांनीं राज्याभिषेक करून जयजयकार केला.)

पर्जन्याच्या मेघासम रव ज्यांचे वाद्यगण ।
वाजत होते प्रजाजनांचें झालें मुदित मन ॥ २६ ॥
मङ्गलगीतें विविधनर्तनें ऐकुनि पाहून ।
हर्षित झाली समस्तजनता दुःखित नच कोण ॥ २७ ॥
यापरि उत्सव चालत असतां मण्डपिं उभयांचें ।
आगमनानें प्रजाजनांच्या हर्ष मनीं नाचे ॥ २८ ॥
राजराज जो लक्ष्मण वसला स्नानासनिं मोदें ।
निजाप्रजासह दृश्य असें हें सुजना बहु सुख दे ॥ २९ ॥
रत्नजडितसे कुम्भ मनोहर सुवर्ण-चांदीचे ।
कमलमुखांचे सुन्दर दिसती वर्ण्य न ते वाचें ॥ ३० ॥
सशास्त्र केला त्या कुम्भांनीं अभिषव[1] उभयांचा ।
आनन्दाच्या नयनाश्रूंनीं नृपवर्गें साचा ॥ ३१ ॥
मुकुट मस्तकीं कानीं कुण्डल अङ्गद केयूर ।
यांनीं भूषित बाहु जयांचे देहीं लेप वर ॥ ३२ ॥
दिव्य सुवस्त्रें सुगन्धिमाला भूषित ते उभय ।
राम नि लक्ष्मण यांच्याविषयीं भूपति वदति जय ॥ ३३ ॥
नभश्चरेन्द्रें राजेन्द्राच्या महोत्सवा करुन ।
त्यांनीं स्वामिनिपदिं स्नापिली सीता वन्दून ॥ ३४ ॥
सती जानकी पृथुविभवानें सौभाग्यें शोभे ।
प्रधानदेवीपदेंहि पूर्वीपासुनि अतिसुलभें ॥ ३५ ॥
वैदेहीला स्नापुनि यापरि जयजय शब्दांनीं ।
मोदविली जणु शैलाग्रावनि[2] सलिलें अब्दांनीं[3] ॥ ३६ ॥
सती विशल्या प्रमुख्यदेवी जी सौमित्रीची ।
पृथुविभवानें स्नापुनि तीही मोदविली साची ॥ ३७ ॥

---

१ राज्याभिषेक. २ पर्वताच्या शिखरावरची पृथ्वी. ३ मेघांनीं.

प्राणा देउनि झाली होती सुलक्ष्मणाची ही ।
महास्वामिनीपदें विशल्या मोद मनीं वाही ॥ ३८ ॥
त्रिखण्डपति जो लक्ष्मण त्याची प्रमुख्यदेवी तूं ।
असो तुझा जय खगेश वदले यन्मनिं नच किन्तु ॥ ३९ ॥
अभिषेकाचें कार्य नरेन्द्रें तेवि खगेन्द्रांनीं ।
हर्षभरानें केलें झाले प्रमुदित सर्व मनीं ॥ ४० ॥

( रामचन्द्रांनीं कोणास काय दिलें ? )

त्रिकूटशिखरीं बिभीषणाला राज्य दिलें रामें ।
सुग्रीवाला किष्किन्धेचें सुजनमनोरामें[1] ॥ ४१ ॥
श्रीपर्वतगिरिवरती पत्तन त्याच सुनांवाचें ।
पवनसुताला[2] रामें दिधलें प्रसन्नशा वाचें ॥ ४२ ॥
विद्याधरपति विराधिताला वंशपरम्परित ।
श्रीनगराभिध दिलें रमेचें पुर जणु विभवयुत ॥ ४३ ॥
महार्णवाच्या लहरी ज्याला स्पर्श सदा करिती ।
कैष्किन्धक या नांवें पत्तन जें कौतुकवसति ॥ ४४ ॥
विक्रमशाली नल-नीला या बन्धुयुगास दिलें ।
प्रसन्नहृदयें श्रीरामानें सदैव विगतमलें ॥ ४५ ॥
विजयार्धाच्या दक्षिणदिशिं जें रथनूपुर नगर ।
कान्तिमण्डला[3] दिधलें रामें जणु जें अमरपुर ॥ ४६ ॥
रत्नजटीला देवगीतपुरपति रामें केलें ।
इतर नृपांना देशकोशधनआदिक विभव दिलें ॥ ४७ ॥
यथापुण्य या नरपालांना राज्यादिकलाभ ।
झाला मोदें विहरण करिती नृप ते अमराभ ॥ ४८ ॥
पुण्याचें फल विस्तृत जाणुनि जे जन जिनदास ।
धर्मीं करिती रति ते हसती विभवें धनदास[4] ॥ ४९ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे राज्याभिषेकाभिधानं नाम अष्टाशीतितमं पर्व ॥ ८८ ॥

१ मनाला आवडणारा. २ मारुतीला. ३ भामंडलाला— सीतेच्या भावाला.
४ कुबेराला.

## एकोणनव्वदाव्या पर्वातील संक्षिप्त कथा.

श्रीरामचंद्रानें शत्रुघ्नावर अतिशय प्रेम होतें. ते त्याला म्हणाले— वत्सा, तुला जो देश आवडतो तो मी तुला देतो. अशी अयोध्या, किंवा पोदनपुर अथवा राजगृह किंवा पौण्ड्रनगर जें तुला आवडतें तें सांग तुला मी तें देतो. परंतु शत्रुघ्नाला यापैकीं कोणतेंच आवडत नव्हतें. तो म्हणाला— मला मथुरानगर पाहिजे. तें प्रभो, मला आपण द्यावें.

रामचंद्र म्हणाले— " बाळा, मथुरानगरांत रावणाचा जावई मधु राज्य करीत आहे व तो फार शूर प्रबल राजा आहे. त्याला चमरेंद्रानें अमोघशूल दिला आहे व तो एकेवेळीं हजार वीरांचा नाश करितो. तो शूल रोकून ठेवण्याला देवदेखील समर्थ नाहींत. त्या मधुराजाला कसें जिंकावें ही काळजी आम्हाला लागल्यामुळें रात्रीं झोप येत नाहीं. या मधुराजाला लवणार्णव नांवाचा मुलगा आहे त्यालाही जिंकणें शक्य नाहीं. "

रामचंद्रानें असा खरा प्रकार सांगितला तरीही शत्रुघ्नानें आपला मथुरेविषयींचा हट्ट सोडला नाहीं. तो म्हणाला— मला तुम्ही मथुरा दिली असें फक्त म्हणा मग मी मधुराजाला जिंकल्याशिवाय राहणार नाहीं. मी मधुराजाला मधुक ( मोहड्याचें झाड ) वृक्षाप्रमाणें तोडून टाकलें नाहींतर मला तुम्ही दशरथ राजाचा पुत्र म्हणू नका. आपला भाऊ समजू नका, व सुप्रजामातेपासून जन्मलों नाहीं असें म्हणा. अशी तेजस्वी प्रतिज्ञा केल्यानंतर रामचंद्र त्याला असें म्हणाले— " वत्सा, एक गोष्ट मी तुला सांगतो त्याप्रमाणें वाग. अर्थात् मधुराजाच्या हातांत शूल नाहीं अशावेळीं त्याच्याशीं युद्ध कर म्हणजे तूं त्याला जिंकशील व मथुरा तुला हस्तगत करतां येईल."

शत्रुघ्नानें रामचंद्राची आज्ञा मान्य केली. लक्ष्मणानें समुद्रावर्त धनुष्य व अग्निमुख बाण दिले. कृतान्तवक्र सेनापतीलाही शत्रुघ्नाबरोबर जाण्यास आज्ञा केली. शत्रुघ्नानें जयसिद्धीसाठीं सिद्धपरमेष्ठींची पूजा केली. त्याच्या मातोश्रीनें त्याला

पञ्चपरमेष्ठी तुझें मङ्गल करोत असा आशीर्वाद दिला. तूं आपल्या तीक्ष्णशरांनीं शत्रूचा संहार कर व युद्धामध्यें तूं शत्रूला पाठ दाखवू नकोस. तूं विजयी होऊन आल्यावर मी सुवर्णकमलांनीं जिनेश्वराचें पूजन करीन असें ती त्याला म्हणाली.

यानंतर चतुरंग सैन्य घेऊन शत्रुघ्न अयोध्येंतून बाहेर पडला. रामचंद्र व लक्ष्मण तीन मुक्कामांपर्यंत शत्रुघ्नाबरोबर होतें. नंतर ते अयोध्येला परत आले. यानंतर शत्रुघ्न कांहीं दिवसांनीं मथुरेजवळ पोहोंचला. पुण्यभागा नदीच्या तीरावर तो सैन्यासह आला. तेथें सैन्यासह त्यानें एक-दोन दिवस विश्रांति घेतली. त्या अवधींत त्यानें आपले कांहीं हेर मथुरानगरीला मधुराजासंबंधी माहिती मिळविण्यासाठीं पाठविले. त्यांनीं जाऊन याप्रमाणें माहिती गोळा केली व ती शत्रुघ्नाला येऊन सांगितली.

ते म्हणाले— राजन्, मधुराजा मथुरानगरीच्या पूर्वेला अतिशय सुंदर कुबेरच्छंद नांवाच्या बगीचांत आपल्या अत्यंत प्रिय राणीसह राहत आहे. आजचा हा सहावा दिवस आहे. आपण सैन्यासह मथुरेजवळ आलेले आहांत हें त्याला बिलकुल माहीत नाहीं. अशावेळीं आपण मथुरानगरीवर कांहीं निवडक सैन्य घेऊन गेला तर अवश्य मथुरा हस्तगत कराल. हें चरांचें भाषण ऐकून शत्रुघ्नानें त्याचदिवशीं अर्धी रात्र संपल्यावर मोठें अश्वसैन्य घेऊन मथुरानगरीमध्यें वेशीचीं दारें तोडून प्रवेश केला.

अकस्मात् शत्रूनें प्रवेश केल्यामुळें प्रजाजन घाबरले व धनधान्यादिक सोडून पळत सुटले. गर्भिणी स्त्रियांचा भीतीनें गर्भपात झाला. कांहीं वीरपुरुष लढण्यासाठीं आले. पण त्यांना शत्रुघ्नाच्या सैन्यानें मारून टाकलें व मधुराजाच्या वाड्यांत शत्रुघ्नानें प्रवेश केला.

ही वार्ता मधुराजाला कळल्यावर तो ससैन्य आला. राजवाड्यांत प्रवेश करून शत्रुघ्नाला हुसकून लावावें म्हणून त्यानें प्रयत्न केला पण तो व्यर्थ गेला. अभिमानामुळें त्याचें मन संधि करण्यास तयार नव्हतें.

कृतान्तवक्त्रानें शत्रुसैन्यांत प्रवेश केला. मधुराजाच्या पुत्राची— लवणार्णवाची कृतान्तवक्त्राबरोबर लढाई झाली. दोघांचें घोरयुद्ध झालें. एकमेकांनीं एकमेकाचा रथ मोडला. यानंतर ते हत्तीवर बसून लढू लागले. कृतान्तवक्त्रानें बाणांनीं लवणार्णवाचें कवच फोडलें. यानंतर लवणार्णवानें त्याच्यावर शक्तिआयुध फेकलें त्यामुळें कृतान्तवक्त्राच्या अंगांतून रक्त भळभळ वाहू लागलें. त्यानही शक्ति नामक आयुध फेकलें त्यामुळें लवणार्णवाचें डोकें फुटून तो मरण पावला.

मधुराजानें हें पाहिलें त्याला फार राग आला. तो कृतान्तवक्त्रावर धावला पण मध्येंच शत्रुघ्नानें त्याला अडविलें. मधुराजानें त्याच्यावर खूप बाणांची वृष्टि केली. शत्रुघ्नानें त्याने सर्व बाण तोडले व त्याचें कवच आपल्या बाणांनीं फोडलें. पुत्र-शोकानें मधुराजाला विरक्तता आली व शत्रुही दुर्जेय आहे असें त्याला समजलें. आपला शेवट जवळ आला व पुण्यक्षयही झाला असें त्याला समजलें व आपण आतां आत्महित करून घेतलें पाहिजे असा त्यानें विचार केला. हत्तीवर बसूनच त्यानें परिग्रहांचा त्याग करून केशलोच केला व तो भावमुनि झाला. आत्मचिंतनांत तत्पर झालेल्या मधुराजाला पाहून शत्रुघ्नराजा हत्तीवरून उतरून त्याच्याजवळ गेला व हे साधुवर्या मी दुष्कृत केलें आपण मला क्षमा करा असें म्हणून त्यानें नमस्कार केला. दोघांमध्यें मित्रता झाली. मधुराजानें समाधीनें प्राणत्याग केला व तो सानत्कुमारस्वर्गांत देव झाला. इकडे शत्रुघ्नानें मथुरेंत प्रवेश केला व तो आनंदानें राहिला. दानव्रतपूजादिक जे करितात त्या भक्तांना दिव्यसंपत्ति मिळते.

---

# एकोणनव्वदावें पर्व.

[ रामचन्द्र शत्रुघ्नाला अयोध्येचें अर्धें राज्य, किंवा पोदनपुर अथवा राजगृह घे असें म्हणाले. पण त्यानें मला मथुराच पाहिजे असा हट्ट धरला. ]

उत्कट ज्याची प्रीति असे तो राघव शत्रुघ्ना ।
वदला वत्सा! विषयें प्रिय जो तो घे गतविघ्ना ॥ १ ॥
अर्ध अयोध्या किंवा पोदनपुर वा राजगृह ।
पौण्ड्रनगर वा जें तुज रुचतें घे तूं सुखगेह ॥ २ ॥
यापरि रामें नाना शोभासहित पुरें कथिलीं ।
शत्रुघ्नाच्या परि हृदयाला मुळिं नच तीं रुचलीं ॥ ३ ॥

[ मधुराजाला जिंकणें शक्य नाहीं असें रामचंद्रांनीं सांगितलें. ]

मथुरा द्यावी मजला ऐसें रामा तो वदला ।
स्वामी मधुनृप असे तियेचा रिपु तो ज्ञात तुला ॥ ४ ॥
दशवदनाचा जामाता तो शूर बहु प्रबल ।
चमरेन्द्रानें अमोघ त्याला दिलें असे शूल ॥ ५ ॥
अमरा देखिल जें रोधाया वाटे अति कठिण ।
ग्रीष्मार्कासम असह्य ज्याच्या धारेचे किरण ॥ ६ ॥
सहस्रवीरा मारुनि पुनरपि मधुकरिं जें जातें ।
स्ववश करावें कैसें त्याला मज चिन्ता व्यथिते ॥ ७ ॥
ज्याच्याविषयीं चिन्तन असतां करीत आम्हास ।
रात्रीं ही नच येते खचितचि निद्रा नयनास ॥ ८ ॥
केलें सूर्यासम प्रकाशित हरिवंशा ज्यानें ।
पराक्रमादिकगुणें जिंकणें न शक्य तो जाणें ॥ ९ ॥
लवणार्णव या नामें ज्याला पुत्र असाध्य असे ।
त्या शूराला जिंकशील तूं वद हें शक्य कसें ॥ १० ॥

[ त्यावर शत्रुघ्नाचें बाणेदार उत्तर. ]

---

१ देश. २ पीडा देते.

नन्तर रामा रिपुघ्न वदला बोलेन न अधिक ।
द्यावी मजला मथुरा केवल जिंकिन मी देख ॥ ११ ॥
मधुराजाला मधुकतरूसम जरि तोडिन न रणीं ।
दशरथपुत्र न ऐसा माना कदापि धरिन मनीं ॥ १२ ॥
सिंहसमूहा शरभ जसा वधि सैन्य तसें त्याचें ।
वधिन न जरि मी भाऊ तुमचा वचन न हें साचें ॥ १३ ॥
आशीर्वादें आपुल्या नाथा ! जरि नच मारीन ।
सुप्रजसेच्या उदरीं झाला जन्म न जाणीन ॥ १४ ॥
ऐसा संगर अतितेजस्वी केला शत्रुघ्नें ।
विद्याधरनृप विस्मित झाले समस्त ते स्वमनें ॥ १५ ॥
उद्यत झाला असतां हलधर रामें थांबवुन ।
म्हटलें मजला धीरा दे वा वर मी मागेन ॥ १६ ॥

[ युद्धाशिवाय इतर वर मागा मी तो आपणास देईन असें शत्रुघ्न रामाला म्हणाला.]

अरिघ्न वदला श्रेष्ठ तुझ्यासम असें जगीं कोण ।
प्रशंसनीयचि मागशील तूं मम सांगे स्वमन ॥ १७ ॥
प्राणांचाही माझ्या स्वामी बन्धो ! आहेस ।
तेही देइन जरी मागशिल चुकेन नच खास ॥ १८ ॥
युद्ध नको वा ऐशी याञ्चा मान्य न तव मजला ।
अन्य समस्तहि करिन असंशय मम निश्चय झाला ॥ १९ ॥
चिन्तन चित्तीं करुनी वदला प्रेमें बलराम ।
शूलरत्न मधुकरिं नसतां तुज मिळेल जय ठाम ॥ २० ॥
सन्धि अशी तूं पाहुनि नन्तर त्यासह लढ तुजला ।
मिळेल जय वा अवश्य वत्सा वर दे हाचि मला ॥ २१ ॥
जैशी आज्ञा तैसें नाथा ! अवश्य वागेन ।
यापरि बोलुनि त्यानें केलें सिद्धांना नमन ॥ २२ ॥
पूजन केलें निर्मलभावें विशुद्ध सिद्धांचें ।
कारण मानिति ज्याला सज्जन समस्तसिद्धींचें ॥ २३ ॥

---

१ शत्रुघ्न. २ महुड्याचें झाड. ३ सुप्रजा हें शत्रुघ्नाच्या मातेचें नांव.
४ प्रतिज्ञा. ५ शत्रुघ्न.

[ सुप्रजामातेचा शत्रुघ्नाला उपदेश व आशीर्वाद.]

नन्तर येउनि मातेसंनिध नमुनि तिच्या चरणा ।
वदला मधुला जिंकुनि येतो दे आशीर्वचना ॥ २४ ॥
पाहुनि पुत्रा स्नेहें हुंगुनि मस्तक ती त्याचें ।
वदली वत्सा जिंक शरें तूं समूह शत्रूंचें ॥ २५ ॥
अर्ध्या आसनिं वसवुनि तनया वदली ती त्याला ।
पाठ न दाखव शत्रुगणाला संगरिं तूं बाळा ॥ २६ ॥
विजयी होउनि जेव्हां येशिल तूं समरांतून ।
सुवर्णकमलें जिनपदयुगला हर्षें पूजीन ॥ २७ ॥

[ पंचपरमेष्ठी तुझें मंगल करोत असा आशीर्वाद सुप्रजा शत्रुघ्नाला देते.]

ज्यांना वन्दन करिति सुरासुर मंगल जगतांचें ।
विरक्त जिन ते करोत मङ्गल वत्सा तव साचें ॥ २८ ॥
भवभविं फिरवी ऐशा मोहा ज्यांनीं जिंकून ।
विनष्ट केला अर्हत्प्रभु तव करोत कल्याण ॥ २९ ॥
चतुर्गतीचें चक्र सदा हें चाले जगतांत ।
स्वयम्बुद्ध जे अशी देशना करिती अतिपूत ॥ ३० ॥
वत्सा ! अरिगण जिंकायाला सुबुद्धि देवोत ।
वन्दन त्यांना करि तूं जोडुनि भावें निजहस्त ॥ ३१ ॥
स्फटिक करांतिल जैसा तैसें लोकालोकास ।
केवलबोधें बघती मुनि तव करोत सुहितास ॥ ३२ ॥
जे कर्माष्टकविमुक्त झाले लोकाग्रीं वसती ।
सिद्ध सिद्धिकर वत्सा मङ्गल करोत शीघ्रगति ॥ ३३ ॥
कमल-चन्द्र-रवि-पृथिवी-मन्दर[१]-समुद्र-गगनसम ।
सूरिवर्य तव वत्सा मङ्गल करोत जे अमम ॥ ३४ ॥
स्वपरमता जे जाणुनि कथिती सुशिष्यसुहितास ।
चिरंजीव तव उपाध्याय मुनि हरोत दुरितास ॥ ३५ ॥
द्वादशसुतपें करुनि वपूनें साधी मोक्षास ।
साधुवृन्द तव जाळुनि टाको पातककक्षास[२] ॥ ३६ ॥

१ मेरुपर्वत. २ पापवनाला.

यापरि घेउनि आशीर्वादा वन्दुनि मातेला ।
सौधांतुनि तो रिपुघ्न सेनेसह बाहिर गेला ॥ ३७ ॥
मेघावरती चढून जैसा चन्द्र नभीं शोभे ।
चढुनि गजावरि रिपुघ्न त्यापरि सुजनमना लोभे[1] ॥ ३८ ॥
नृप अनुसरले नानायानीं बैसुन शत्रुघ्ना ।
अमरावृत तो वाटे इन्द्रासदृशचि सकलजना ॥ ३९ ॥
प्रेमळ अतिशय राम नि लक्ष्मण त्याला अनुसरले ।
तीन निवासावधि[2] तैं त्यांना रिपुघ्न तो बोले ॥ ४० ॥
पूज्य बन्धुयुग आतां आपण येथुनि परतावें ।
विनती माझी अवधारावी साकेतीं जावें ॥ ४१ ॥

[ लक्ष्मणानें समुद्रावर्त धनुष्य, अग्निमुख बाण व
कृतान्तवक्त्र सेनापति हे शत्रुघ्नाला दिले. ]

सौमित्रीनें धनुष्य अब्ध्यावर्त[3] तयास दिलें ।
अग्निमुखाचे पवनगतीचे सुतीक्ष्ण शर सगळे ॥ ४२ ॥
स्वतःप्रमाणें विक्रम ज्याचा कृतान्तवक्त्र असा ।
सेनापतिही दिधला प्रेमें उग्र असे रविसा ॥ ४३ ॥
सौमित्रीसह राघव नन्तर सचिन्त होऊन ।
साकेतापुरिं गेला मन परि अनुजीं[4] ठेवून ॥ ४४ ॥
रिपुघ्न वीरहि पृथुसैन्यासह मथुरानगरास ।
गेला पाळी मधुनृप ज्याला जसा स्वपुत्रास ॥ ४५ ॥
सुपुण्यभागा[5]तीरावरती सेना स्थापून ।
रिपुघ्न तेथें घेइ विसावा राहुनि अल्पदिन ॥ ४६ ॥
भोजनपानादिक क्रियांना करून मन्त्रिगण ।
संशय हृदयीं धरून मन्त्रा करी महानिपुण ॥ ४७ ॥
मधुनृपतीचा भङ्ग करिन मी आशा मनिं वाही ।
हा अभिमानें प्रवृत्त झाला कार्यीं या पाहीं ॥ ४८ ॥
मधुराजानें मांधात्याला रणांत लोळविलें ।
खचरासाध्या[6] जिंकिल हा शिशु कैसें हें न कळे ॥ ४९ ॥

---

१ लोभवी. २ मुक्कामापर्यंत. ३ समुद्रावर्त धनुष्य. ४ धाकट्या भावांत शत्रुघ्नामध्यें. ५ या नांवाची नदी. ६ विद्याधरांना अजिंक्य.

चञ्चल सेना लहरी ज्याच्या शस्त्रें मकर जिथें ।
मधुसागर हा तरुनी जाया वांछी हेंचि थिटें[1] ॥ ५० ॥
सैनिक जेथें तुङ्गद्रुमगण गजभीषण आहे ।
शिरुनी मधुवनिं जिवन्त कोणी येइल नच पाहे ॥ ५१ ॥
यापरि भाषण ऐकुनि कोपें कृतान्तकुटिल[2] वदे ।
माना त्यागुनि ऐसें वदता हें नच मोदा दे ॥ ५२ ॥
अमोघशूलें गर्व मनीं धरि मधुभूपाल जरी ।
माराया त्या रिपुघ्नचि क्षम समजा पूर्ण उरीं ॥ ५३ ॥
जो निजसोंडें महातरूंना पाडी भूवरती ।
मत्तगजाला मृगेन्द्र मारी हें समजा चित्तीं ॥ ५४ ॥

आर्या—

लक्ष्मी प्रतापशाली वलवान् शत्रुघ्न मधुस मारील ।
भय न धरावें त्याचें माझे हे सत्य बोल होतील ॥ ५५ ॥
मंत्रिजनाची आज्ञा मिळवुनि मथुरानगरास ।
गेलेले चर[3] परतहि येउनि वदती वार्तेस ॥ ५६ ॥
ऐका राजन् आहे मथुरापुर पूर्वेला जें ।
सुरम्य अतिशय उपवन ज्याला सुरेन्द्रवन लाजे ॥ ५७ ॥
देवकुरूसम कुवेरशब्दें युक्त असें वन तें ।
इच्छापूरण करावयाला सिद्ध सदा असतें ॥ ५८ ॥
असे जयन्ती नामक राणी रूपाची खाणी ।
गेला तेथें तिच्यासवें तो मधुनृप नच जाणी ॥ ५९ ॥
नाथा ! येणें अपुलें त्याला मुळींच न ज्ञात ।
तिच्यासवें तो रमला आहे जाणि न दिनरात ॥ ६० ॥
उपवनिं जाउनि तयास झाले आज सहा दिवस ।
ऐशा समयीं जातां आपण मथुरा होय वश ॥ ६१ ॥
चरवचनाला रिपुघ्न ऐकुनि अर्ध्या रात्रींत ।
हयसैन्या वहु मोठ्या घेउनि आला मथुरेंत ॥ ६२ ॥
कर्म विनाशुनि योगी जैसे सिद्धिपुरीं जाई ।
द्वारें तोडुनि मथुरानगरीं त्याची गति होई ॥ ६३ ॥

---

१ अज्ञानपणाचें. २ कृतान्तवक्र नांवाचा सेनापति. ३ गुप्तहेर.

दशरथनृपसुत रिपुघ्न नामें विजय सदा त्याचा ।
होवो ऐसा भाट महाध्वनि घुमे तिथें साचा ॥ ६४ ॥
लङ्कानगरीं अङ्गद जातां क्षोभ जसा झाला ।
अरिप्रवेशा जाणुनि बहु भय वाटे जनतेला ॥ ६५ ॥
स्त्रीजन अतिशय भ्याला तेणें त्याचा गर्भ गळे ।
धनधान्यादिक सोडुनि जनता तेथुनि शीघ्र पळे ॥ ६६ ॥
जिकडे तिकडे कलकल-रव बहु झाला ऐकून ।
सिंहासम विक्रमी नि निर्भय वीर घरांतून ॥ ६७ ॥
लढावयाला त्वरें निघाले त्यांना मारून ।
रिपुघ्न शिरला मधुनृपसदनीं मनिं आनन्दून ॥ ६८ ॥
मधुर नि सुन्दर वचनें बोलुनि प्रजाजनाश्वास[1] ।
दिधला शत्रुघ्नानें[2] झाला तदा गतत्रास ॥ ६९ ॥

[ मधुराजानें राजवाड्यांत शिरावयाचा प्रयत्न केला परंतु तो सफल झाला नाहीं तेव्हां दोन्हीं सैन्यें लढूं लागलीं. ]

मथुरेमध्यें रिपुघ्न शिरला वार्ता जाणून ।
उद्यानांतुनि भूप निघे मधु अतिशय कोपून ॥ ७० ॥
अपुल्या सौधीं शिरावयाचा बहु प्रयत्न करी ।
परि तो झाला विफलचि सगळा रिपुघ्न सबल अरि ॥ ७१ ॥
अतिशय मानी शूलें विरहित तथापि सन्धीस ।
करावयाला उद्यत झाला नच तो मधुईश ॥ ७२ ॥
अतिगर्वोद्धत अरिसैन्याला सहन न करणारे ।
रिपुघ्नसैनिक हयसेनाही निघे सुखड्गकरें ॥ ७३ ॥
यापरि आले रणांत सगळे सैनिक उभयांचे ।
दोन्ही सैन्यें दोन समुद्रचि दिसले जणु साचे ॥ ७४ ॥
रथ गज अश्व नि पदाति ऐशी चतुरंगी सेना ।
अन्योन्याशीं करती झाली अतिशय घोर रणा ॥ ७५ ॥

[ कृतान्तवक्र व लवणार्णव यांचें युद्ध त्यांत लवणार्णवाचा मृत्यु. ]

---

१ नगरवासी लोकांना घाबरूं नका असें सांगितलें. २ सुप्रभाराणीचा मुलगा शत्रुघ्न.

परसैन्याचा दर्प जयाला सहन न मुळिं झाला ।
कृतान्तवक्राभिधसेनानी अरिसैन्यीं शिरला ॥ ७६ ॥
निवारिली नच जाय जयाची गति तो सेनानी ।
युद्धक्रीडा करता झाला रोधक ज्या न कुणी ॥ ७७ ॥
मधुराजाचा सुत लवणार्णव ज्याला पाहून ।
तीक्ष्ण शरांनीं त्या आच्छादी निर्दय होऊन ॥ ७८ ॥
मेघ जलांनीं जैसें शैला आच्छादुनि टाकी ।
मधुसुत फेकुनि सेनानीला बाणगणें झाकी ॥ ७९ ॥
सेनानीही शर कर्णावधि[1] रोपें ओढून ।
मधुपुत्राच्या बाणा छेदी व्यापुनि भू-गगन ॥ ८० ॥
अन्योन्यांच्या रथास मोडुनि विरथ तयें केलें ।
करिपृष्टावरि चढुनी अन्योन्याशीं ते लढले ॥ ८१ ॥
प्रथम कृतान्ता मधुपुत्रानें बाणें ताडियलें ।
तेव्हां मधुसुतकवचा त्यानें विदीर्ण झणि केलें ॥ ८२ ॥
पुनरपि लवणें[2] तोमर उचलुनि कृतान्तवदनास ।
ताडुनि रक्तस्रावें केलें लाल शरीरास ॥ ८३ ॥
कृतान्तवदनें शक्ति फेकिली मधुतनयावरती ।
मस्तक फुटलें लयास गेली तत्प्राणज्योति ॥ ८४ ॥
मुलगा पडला ऐसें पाहुनि मधु त्या समरांत ।
कृतान्तवक्रावरती धावे कोपानें त्वरित ॥ ८५ ॥
परि मार्गामधिं शत्रुघ्नानें त्याला आडविलें ।
लाल जयाचें शोकें कोपें लोचनयुग झाले ॥ ८६ ॥
महाविषारी सर्पदृष्टिसम मधुलोचन बघुन ।
रिपुघ्न सेना पळे समीरें जैसें पर्णगण ॥ ८७ ॥
परि सम्मुख ते शत्रुघ्नाला जातां पाहून ।
अभिमानानें वीर परतले रण झालें गहन ॥ ८८ ॥

[ मधुराजा व शत्रुघ्न यांचें युद्ध. ]

रिपुघ्न उत्तम रथिं आरोढुनि दिव्य धनुष्य करीं ।
घेउनि धावे अग्रीं अरिच्या भासे उग्र हरि[3] ॥ ८९ ॥

---

१ कानापर्यंत. २ मधुराजाच्या लवणार्णव पुत्रानें. ३ सिंह.

जैसा पावक शुष्कपर्णगण जाळी पसरून ।
नाना वीरा मारुनि टाकी क्रोधें शत्रुघ्न ॥ ९० ॥
जिनमत-विबुधापुढति न टिकतो पण्डित अन्यमती ।
तसा रिपुघ्नापुढति न टिकला अरि रणचतुरमति ॥ ९१ ॥
शत्रुघ्नाशीं समर कराया इच्छी जो वीर ।
तों सिंहाग्रीं गजाप्रमाणें जातां हो ठार ॥ ९२ ॥
तेणें झाली मधुनृपसेना व्याकुल अत्यन्त ।
स्वामिसमीपचि आली धावत तेव्हां ती त्वरित ॥ ९३ ॥
शत्रुघ्नानें कुपित मधूचें धनुष्य तोडियलें ।
अन्य धनुष्यें रथहय मधुचें विद्ध तयें केलें ॥ ९४ ॥
नन्तर मधुनृप मत्तगजावरि झाला आरूढ ।
क्रोधज्वाला त्याच्या हृदयीं धडाडल्या गाढ ॥ ९५ ॥
महामेघ रविबिम्बा झाकी दशरथतनयास ।
अविरल शरगण वर्षुनि मधुनृप तदा अनायास ॥ ९६ ॥
शत्रुघ्नानें तोडुनि शरगण फोडियलें कवच ।
मधुभूपाचें समरातिथ्य नि केलें वहु साच ॥ ९७ ॥
शूलायुध हें संनिध नाहीं ऐसें जाणून ।
सुतशोकेंही विरक्त झाला अरि दुर्जय गणुन ॥ ९८ ॥

[ विरक्त मधुराजा पञ्चपरमेष्ठीचें चिंतन करून स्वस्वरूपांत स्थिर होतो. ]

अपुला शेवट संनिध आला पुण्यक्षय झाला ।
जिनवर्याच्या वचनामध्यें सन्तत मधु रमला ॥ ९९ ॥
जें जें दिसतें अनित्य तें तें दुःखद संसारीं ।
आरम्भज[1] ज्या क्रिया समस्तचि जीवाच्या वैरी ॥ १०० ॥
जें धर्माला कारण आहे उत्तम तेंचि असे ।
अधर्मकारण जें तें जीवा नरकीं लोटितसे ॥ १०१ ॥
नृजन्म ज्याला पुण्यें झाला प्राप्त परन्तु न तो ।
धर्मी बुद्धि न मानव वळवी दुर्भवि हा ! फिरतो ॥ १०२ ॥

---

१ सेवा, शेतकी, व्यापार, युद्ध या क्रियापासून हिंसा होते अशा क्रियांना आरंभजक्रिया म्हणतात.

मोहकर्म हें या जीवाला सदैव फसवून ।
परमार्थामधिं कधिंही तत्पर नच करितें जाण ॥ १०३ ॥
मोहापासुनि संसृति वाढे हें मी जाणुनि ही ।
आत्म्याचें हित केलें नाहीं प्रमाद हा पाही ॥ १०४ ॥
मोहें मोहित मम आत्म्याचा करितो धिक्कार ।
निर्जवश[1] कालहि मी मूर्खानें झुगारिला दूर ॥ १०५ ॥
असूनही मीं निजवश मजला सुबुद्धि नच झाली ।
पुढति यमासम वैरी आला हित नच या कालीं ॥ १०६ ॥
जाळित असतां अनल सदन मम कूप खणायाचा ।
उद्यम माझा सफल न होइल विचार करि याचा ॥ १०७ ॥
डसल्यावरि अहि जो मंत्राची सिद्धि करायास ।
प्रयत्न करितो मानव त्याचा होतो उपहास ॥ १०८ ॥
व्याकुलता मी आतां देतों सोडुन सगळीच ।
योजिन हृदया निजरूपामधिं मार्गचि हा साच ॥ १०९ ॥
अर्हत्सिद्धां आचार्यांना पाठकसाधुगणा ।
त्रिवार वन्दन करितों भावें या पञ्चेष्टांना[2] ॥ ११० ॥
अर्हत्सिद्ध नि साधुजनांनीं सांगितला धर्म ।
मङ्गल[3] उत्तम शरण[4] असे हे देती शुभ शर्म ॥ १११ ॥
अर्धतृतीयद्वीपीं[5] पंधरा सुकर्मभूमींत ।
त्रिजगन्नाथा त्रिधा जिना मी करितो प्रणिपात ॥ ११२ ॥
जगणें माझें राहे जोवरि तोवरि पापांचा ।
त्याग असे मज कायें वाचें तेवि मनें साचा ॥ ११३ ॥
निजस्वरूपामध्यें राहिन मी कृतपापांची ।
निन्दा करितों भावी पापें त्यागिन मी साचीं ॥ ११४ ॥
अनादि या भववनांत जे मी उपार्जिलें आहे ।
दुष्कृत मिथ्या होवो मी निजरूपीं रत राहे ॥ ११५ ॥

---

१ आत्महित करून घेण्याचा काल. २ अतिशय आवडते. ३ पापनाश करून पुण्य प्राप्ति करून देणारे. ४ संसारांतून रक्षण करणारे. ५ पांच भरत, पांच ऐरावत व पांच विदेह या पंधरा कर्मभूमि, जंबूद्वीप, धातकीखंड व पुष्करार्ध या अडीचद्वीपांत आहेत.

त्याज्य असे जें सगळें त्यजितों घेतो ग्राह्यचि जें ।
आत्मा माझा ज्ञाता द्रष्टा रविसम तो साजे ॥ ११६ ॥
संयोगज जे देहादिक ते माझें रूप नसे ।
ज्ञानीं दर्शनिं लीन सदा मी त्यांतचि सतत वसे ॥ ११७ ॥
परमार्थानें संस्तर[1] गवत नि सुन्दर भूहि नसे ।
कलुषित मति नच जीवचि ज्याची संस्तर तोचि वसे ॥ ११८ ॥
यापरि राहुनि सद्ध्यानामधिं उभयहि संगांना ।
त्यागुनि तो गजपृष्ठीं मधुनृप लुंची केशांना ॥ ११९ ॥
द्रव्यें जरि तो गजपृष्ठावरिं वसलेला दिसला ।
भावें स्वात्मस्थितशा तेणें लोच करें केला ॥ १२० ॥

आर्या–

अतिशय झाला जखमी होता मधुनृप तथापि धैर्य धरी ।
कायोत्सर्गीं दृढतर निर्मल परिणाम अन्तरांत वरी ॥ १२१ ॥
येउनि शत्रुघ्नानें केला त्याच्या पदा नमस्कार ।
दुष्कृत[2] केलें मजला क्षमा करा साधुवर्य गुणधीर ॥ १२२ ॥
मैत्री उभयांचीही झालेली पाहण्यास सुर आले ।
विस्मित होउनि भावें मधुवरि सुमवृन्द वर्षिते झाले ॥ १२३ ॥
रत्नत्रय आराधुनि समाधिनें मरुनि देव मधु झाला ।
सुखसागरांत मग्नचि सनत्कुमारांत सर्वदा रमला ॥ १२४ ॥
शत्रुघ्नवीर देखिल कृतार्थ मथुरापुरीं प्रवेश करी ।
गजपुरिं मेघेश्वर[3]सम राही मोदें प्रजामनास हरी ॥ १२५ ॥
दानव्रतपूजादिक करिती शुभकार्य सुजन जे जगतीं ।
त्या श्रीजिनदासांना लाभे स्वर्गांत दिव्यसंपत्ति ॥ १२६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे मधुसुन्दरवधाभिधानं नाम नवाशीतितमं पर्व ॥ ८९ ॥

---

१ शय्या. २ वाईट कार्य केलें, पाप केलें. ३ जयकुमाराप्रमाणें– हा जयकुमार सुलोचनेचा पति व भरतचक्रवर्तीचा सेनापति होता.

# नव्वदाव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

मधुराजाला जिंकल्यामुळें शत्रुघ्नाचा प्रभाव चोहीकडे पसरला. मधुराजाचा अमोघ व दिव्य असा शूल व्यर्थ व सामर्थ्यहीन होऊन चमरेन्द्राकडे गेला. त्यानें मधुराजाची कटुकमरणवार्ता ऐकून चमरेंद्राला सांगितली. ती ऐकून चमरेंद्र कोपानें लाल झाला व तो आपल्या मित्राचा नाश करणाऱ्या शत्रुघ्नाला ठार मारण्यासाठीं त्वरेनें निघाला असतां वाटेंत भेटलेल्या सुपर्णेन्द्रानें त्वरेनें कोठें निघालास असा प्रश्न विचारला. शत्रुघ्नानें माझ्या मित्राचा— मधुराजाचा नाश केला आहे. त्याचा मी आतां नाश करण्यास जातो त्याच्यावर मी तिळमात्रही दया करणार नाहीं. सुपर्णेन्द्रानें म्हटलें— मित्रा चमरेंद्रा, सती विशल्येचा प्रभाव एवढा मोठा पसरला आहे कीं, त्यामुळें तुझ्या उद्देशाला विफलता प्राप्त होईल. तुझें जाणें व्यर्थ होईल.

चमरेंद्र म्हणाला— मित्रा, विशल्येचा प्रभाव ती जेव्हां कौमार ब्रह्मचारिणी होती तेव्हां होता. आतां तो प्रभाव लक्ष्मणाबरोबर विवाह होऊन त्याच्याबरोबर कामानुभव घेत असल्यामुळें राहिला नाहीं. ज्यांनीं व्रतखड्ग आपल्या हातांत धारण केला आहे त्यांना देव, दानव, पिशाच भीतात. जे मद्य, मांस व मध सेवन करीत नाहींत त्यांचा व्रततट ढासळत नाहीं व त्यांना हिंस्रपशुही वश होतात. पूर्वी कालानल नांवाचा रुद्र होऊन गेला त्याला अनेक विद्या वश झाल्या होत्या. पण तो जेव्हां स्त्रीलंपट झाला तेव्हां सर्व विद्यांनीं त्याला सोडलें व तो दुःखानें मरण पावला. असो तूं आपल्या कार्यासाठीं जा व मी मला जें योग्य वाटेल तें कार्य करण्यासाठीं जातो असें म्हणून तो चमरेंद्र मथुरानगरीमध्यें आला.

त्याला सर्व प्रजाजन शत्रुघ्नाला राज्य प्राप्त झालें म्हणून महोत्सवांत गुंग झाले आहेत असें दिसलें. हे सर्व लोक कृतघ्न व दुष्ट आहेत असें तो मनांत मानून

लागला. दुःखाच्या ऐवजीं हे हर्ष मानीत आहेत म्हणून तो रागावला. व त्यानें मथुरा राज्यांत अनेक रोग उत्पन्न केले. लोक आहे त्या अवस्थेंत पटापट मरूं लागले. असा उपद्रव पाहून शत्रुघ्नाच्या वंशदेवतांनीं त्याला सांगितलें कीं– "येथें राहशील तर सर्व सैन्यासह मरण पावशील. आतां येथून तत्काल आपुल्या सर्व सैन्याला घेऊन अयोध्येला निघून जा." वंशदेवताचें म्हणणें मान्य करून शत्रुघ्न ससैन्य अयोध्येला निघून गेला.

राम-लक्ष्मणांनीं व प्रजाजनानें त्याचें उत्तम स्वागत केलें. आपला मुलगा विजयी होऊन परत आला म्हणून सुप्रजामाता अतिशय आनंदली. तिनें श्रीजिनपूजन करून धार्मिकांना दान दिलें. अनाथ, दुर्बल, दुःखित अशा लोकांना इच्छित देऊन त्यांना हर्षित केलें.

पण सुवर्णप्रासादांनीं शोभत असलेली अयोध्या शत्रुघ्नाच्या मनाला आनंदित करूं शकली नाहीं. मथुरेच्या वियोगानें दुःखी होऊन कांहीं दिवस त्याला अयोध्येंत राहणें भाग पडलें.

---

# एक्याण्णवव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

शत्रुघ्नाला मथुरा नगरी कां प्रिय वाटत होती असा प्रश्न श्रेणिकानें गौतमगणधराला विचारला तेव्हां त्यांनीं म्हटलें— श्रेणिका, या शत्रुघ्नाचे अनेक जन्म येथेंच झाले त्यामुळें त्याला तीच प्रिय वाटू लागली. त्याच्या पूर्वजन्मांचें वर्णन मी करितों तें शांतचित्तानें ऐक.

फार पूर्वी या नगरींत 'यमुनदेव' नांवाचा एक क्रूरस्वभावाचा धर्मपराङ्मुख मनुष्य राहत होता. तो कालांतरानें मरून डुक्कर झाला. त्यानंतर गाढव, कावळा, बकरा असे जन्म त्याला प्राप्त झाले. बकरा असतांना घर पेटलें व त्यांत तो जळून मेला व नंतर सहा वेळा तो रेडा झाला. या भवांत पाणी वाहून वाहून मरण पावला. नंतर पांच वेळां हीनकुलामध्यें मनुष्य होऊन दारिद्र्यानें मरण पावला. कांहीं मध्यम कर्मानें तो आर्य मानव झाला.

नंतर कांहीं अशुभकर्मांचा क्षय झाल्यानें मथुरानगरींतच कुलंधर नामक स्वरूपानें सुंदर ब्राह्मण झाला. त्याच्या मनांत जैनमुनिविषयी भक्ति होती. पण शीलव्रती नव्हता. कामलंपट होता.

मथुरानगराचा राजा शत्रूला जिंकण्यासाठीं गेला होता व त्याची राणी 'ललिता' प्रासादाच्या खिडकींत बसून राजमार्ग पाहत होती. इतक्यांत हा कुलंधर त्या मार्गानें जात असलेला तिनें पाहिला. त्याच्या सौंदर्यानें ती मोहित झाली. दासीला तिनें त्याला राजवाड्यांत माडीवर घेऊन येण्यास सांगितलें. तिनें त्याला माडीवर आणिलें. राणी व तो पलंगावर बसले. इतक्यांत अचानक राजा तेथें आला. राजाला पाहून राणी— हा दुष्ट माझ्या शीलावर घाला घालण्यासाठीं आला असे मोठ्यानें ओरडली.

राजानें याला गांवाच्या बाहेर नेऊन याचे आठ तुकडे करून ते फेकून द्या अशी शिपायांना आज्ञा केली. ते त्याला नेत असतां ज्याची तो भक्ति करीत होता असे 'कल्याण' नांवाचे जैनसाधु भेटले. ते त्याला म्हणाले– 'कुलंधरा, तूं जर जैनसाधु होत असशील तर यांच्यापासून मी तुला सोडवितों. त्यानें मुनिव्रत धारण करण्याचें कबूल केलें. शिपायांनीं त्याला सोडून दिलें.

मुनिदीक्षा घेऊन त्यानें पुष्कळ तपश्चरण केलें व मरून तो स्वर्गांतील ऋतु नामक विमानांत देव झाला. बरोबरच आहे कीं, धर्मानें न मिळणारें असें काय आहे. जें जें चांगलें तें धर्मानेंच मिळतें.

या मथुरानगरींत चन्द्रभद्र नामक राजा धरा नामक राणीसह राज्य करीत होता. त्याच्या जवळच धरा राणीचे सूर्यदेव, समुद्रदेव व यमुनादेव नांवाचे तीन भाऊ राहत होते. चन्द्रभद्र व धराराणीला श्रीमुख, सन्मुख, सुमुख, इन्द्रमुख वगैरे नांवाचे आठ पुत्र होते. राजाला 'कनकप्रभा' नांवाची दुसरी राणी होती. ती महाशीलवती होती. ऋतुविमानाचा स्वामी देव मरून हिच्यापोटीं जन्मला. त्याचें 'अचल' असें नांव राजा-राणीनें ठेविलें. तो नानाकलानिपुण व फार सुंदर होता.

श्रावस्तीनगरांत अंक नांवाचा कोणी मनुष्य राहत होता. तो धार्मिक कार्यांना अनुमोदन देत असे. त्याच नगरांत कवाडें तयार करून उदरनिर्वाह करणारा कम्प नांवाचा एक मनुष्य राहत असे. त्याच्या बायकोचें नांव अंगिका. अंक मरून या उभयांना 'आप' नांवाचा मुलगा झाला. थोडा थोर झाल्यानंतर नेहमी समवयस्का-बरोबर भांडण करीत असे त्यांना मारीत असे त्यामुळें कंपानें त्याला घरांतून हाकलून दिलें. तो वनांत राहून लाकडाच्या मोळया आणून विकीत असे. कष्टानें तो उदर-निर्वाह करूं लागला.

इकडे चंद्रभद्र राजाचें जरी अचलावर प्रेम होतें तरी धराराणी, तिचे तीन भाऊ व आठ मुलें हे सर्व त्याचा द्वेष करीत असत. त्यांनीं त्याला ठार मारण्याचा बेत केला. तो कनकप्रभा राणीला समजला. तेव्हां तिनें मुलाला म्हटलें– बाळा, तुझ्या सापत्न-मातेनें व सापत्न भावांनीं तुला ठार मारण्याचा विचार केला आहे म्हणून तूं आतां येथें राहूं नकोस येथून पळून जा. अचल आईच्या म्हणण्याप्रमाणें तेथून पळून गेला व वनांत जाऊन राहिला.

एकेदिवशीं वनांत तो फिरत असतां त्याच्या पायांत मोठा काटा घुसला. अतिशय वेदनांनीं कण्हत तो वाटेंतच पडला. डोक्यावर लाकडांची मोळी घेऊन येणाऱ्या आपानें कण्हत असलेल्या अचलाला पाहिलें व मोळी खालीं उतरून त्यानें सुरीनें त्याच्या पायांतील काटा काढला. अचलाचें दुःख नाहींसें झालें. तो त्याला म्हणाला– मित्रा, तूं माझ्यावर मोठा उपकार केलास. मी मथुरेचा राजा झाल्यावर तूं तेथें अवश्य ये तुझे उपकार मी फेडीन. असें म्हणून अचल तेथून निघून कौशांबीकडे गेला. व आपही मोळी विकण्यासाठीं जवळच्या गांवीं गेला.

कौशांबीनगरचा राजा इन्द्रदत्त नांवाचा होता. त्याच्याजवळ विशिखाचार्य म्हणून धनुर्विद्या जाणणारा एक विद्वान होता. धनुर्विद्येंत अचलानें त्याचा पराजय केला. त्यामुळें इन्द्रदत्ताला मोठा आनंद झाला. त्यानें त्याला आपली वासवदत्ता नामक कन्या दिली. शुभकर्मांच्या उदयानें त्याचा प्रभाव वाढला. इन्द्रदत्तानें त्याला राज्य दिलें. त्यानें अङ्ग, वङ्ग, मगधादिक देश जिंकले व तो ससैन्य मथुरेकडे आला. चन्द्रभद्राच्या सामंतांना त्यानें धन देऊन आपल्या अधीन केलें. चन्द्रभद्राजानें संधि करण्यासाठीं आपल्या मेहुण्यांना अचलाकडे पाठविलें. त्यांनीं त्याला ओळखलें. त्यांना त्याचें भय वाटलें. त्यांचें तोंड सुकून गेलें. त्यांनीं व त्याच्या भावांनीं वैराचा त्याग केला व ते त्याच्याशीं गोडीनें वागूं लागले. आपला पुत्रच आहे असें चन्द्रभद्राला समजलें मोठा आनंद वाटला. कनकप्रभा राणीला तर अत्यानंद झाला. अचलाच्या राज्यांत सज्जनांना अतिशय सुख लाभलें.

एकेवेळीं अचलराजा नाट्यगृहांत नृत्य पाहण्यास गेला होता. आप देखिल नृत्य पाहण्यास आला होता. राजानें त्याला ओळखलें. त्यानें त्याला राजवाड्यांत आणिलें. त्याचा आदर करून श्रावस्तीचें राज्य त्याला दिलें.

सज्जनावर उपकार केला असतां असें उत्कृष्ट फल लाभत असतें. एकेवेळीं आपासह राजा अचल बगीचामध्यें जाऊन तो दिवस आनंदांत त्यानें घालविला. तेथें यशःसमुद्र नामक आचार्य आले होते. दोघांनीं भक्तीनें त्यांच्या चरणांना नमस्कार केला– मुनिवर्यांनीं आत्महिताचा उपदेश केला. तो ऐकून दोघांनीं महाव्रतें धारण केलीं. तप केलें व स्वर्गांत कमलोत्तर नामक विमानांत देव झाले.

तेथून च्युत होऊन अवशिष्टपुण्यानें अचल दशरथराजा व सुप्रजाराणी यांना शत्रुघ्न नामक पुत्र झाला.

आप देखील स्वर्गीय आयुष्य संपल्यावर च्युत होऊन कृतान्तमुख सेनापति झाला.

एका झाडाखालीं आपण कांहींवेळ विसावा घेतला तर त्याच्याविषयी स्नेह उत्पन्न होतो. तर शत्रुघ्नाचे अनेक जन्म मथुरेंत झाले असल्यामुळें तिच्याविषयीं त्याला प्रेम उत्पन्न होणें योग्यच आहे. असो.

धर्मानें परमसंपदा मिळते म्हणून जिनभक्त होऊन भव्यांनीं धर्माचरण करावें.

# नव्वदावें पर्व.

( चमरेंद्र शत्रुघ्नाला दुःख देण्यासाठीं मथुरेकडे निघाला. )

शत्रुघ्नाचा प्रभाव पसरुनि विफल बने शूल ।
अमोघ दिव्यहि असुनी निष्प्रभ झाला तो अचल[1] ॥ १ ॥
शूलरत्न तें खेद नि शोका लज्जा वाहून ।
चमरेन्द्राच्या समीप जाऊनि बोलें मधुमरण ॥ २ ॥
स्मरुनि तयाच्या मित्रपणाला झाला त्या खेद ।
निघे त्वरेनें रसातलाहुनि[2] धरुनि मनिं क्रोध ॥ ३ ॥
मथुरानगरीकडे निघाला असतां मार्गांत ।
सुपर्णपति[3] त्या भेटुनि वदला गमन कुठें त्वरित ॥ ४ ॥
ज्यानें माझा मित्र मारिला मधुनृप दुःख तया ।
द्याया मी हे सुहृदा जातो मुळिंच न करिन दया ॥ ५ ॥
सुपर्णपति त्या वदला मित्रा ! माहित नाहीं कां ? ।
सती विशल्या-प्रभाव अथवा मनांत तव शङ्का ॥ ६ ॥
वदला तेव्हां असुरांचा पति चमर तया सुहृदा ।
प्रभाव उरला तिचा न आम्हां जो दे बहु खेदा ॥ ७ ॥
कौमारव्रत[4] होतें जेव्हां प्रभाव त्यावेळीं ।
होता अद्भुत तिचा न आतां झाली ती दुबळी ॥ ८ ॥

( प्रभाव कोणाचे ठिकाणीं असतो याचें चमरेंद्र वर्णन करितो. )

असतो ज्याचा व्रताचार दृढ अविचारें रहित ।
प्रभाव त्याचा जगांत पसरे जाणी हे सतत ॥ ९ ॥
सती विशल्या तोवरि झाली प्रभावयुक्त खरी ।
मदनोत्पादक ऐशा हरिला जोवरि ती न वरी ॥ १० ॥
देव नि दानव पिशाच आदिक त्यांना भीतात ।
तीक्ष्ण असा व्रतखड्ग जयांच्या करीं वसे सतत ॥ ११ ॥

---

१ असमर्थ. २ पाताळाहुन. ३ सुपर्ण नामक देवांचा इंद्र.
४ कन्यावस्थेंतलें ब्रह्मचर्यव्रत.

मद्य मांस मध सेविति ते न व्रततट दृढ ज्यांचा ।
दुष्ट प्राणी दूरचि राहति त्याहुनि बुधवाचा ॥ १२ ॥
रुद्रामध्यें दारुण ऐसा बहु विद्याशाली ।
कालानल हें नांव जयाचें वदती विबुधाली ॥ १३ ॥
नारीलम्पट होता त्याला गेल्या सोडून ।
विद्या सगळ्या नन्तर पावे तो दुःखें मरण ॥ १४ ॥
राहो अपुल्या कार्या जा तूं मज जें योग्य दिसे ।
कार्य करिन तें अरिमित्रांचें उचित मला भासे ॥ १५ ॥
ऐसें बोलुनि गगना लंघुनि गेला मथुरेस ।
पाही तेथें महोत्सवामधिं निमग्न जनतेस ॥ १६ ॥
जनता सर्वहि कृतघ्न दिसते तेवि महादुष्ट ।
दुःखस्थानीं हर्षा मानी देइन मी कष्ट ॥ १७ ॥
ज्याच्या बाहुच्छायेखालीं विपुल सुखी झाले ।
मधुभूपाला विसरुनि जन हे कृतघ्न कीं बनले ॥ १८ ॥
महासुभट नर सेव्य असे तो कातरशूरेंही ।
पण्डित मूढा अवलम्बे जरि दूषित तें नाहीं ॥ १९ ॥
परि ही दिसते समस्त जनता अकृतज्ञचि[1] मजला ।
नाश करावा वाटेचि हिचा माझ्या हृदयाला ॥ २० ॥
प्रेमळ ऐशा मधुराजाला ज्यानें मारियलें ।
नष्ट करिन मी राष्ट्र तयाचें निश्चित हें ठरलें ॥ २१ ॥

( चमरेन्द्रानें नानाप्रकारचे उपसर्ग व रोग निर्माण केले. तेव्हां वंशदेवतांनीं सर्व सैन्यासह अयोध्येला जा असें शत्रुघ्नाला सांगितलें व तो तिकडे सैन्यासह गेला.)

यापरि चिन्तुनि अतिनिष्ठुर तो क्रोधें भरलेला ।
स्पर्श जयाच्या मना दयेचा तिळभरहि न झाला ॥ २२ ॥
तो लोकांना दुःसह करिता झाला उपसर्ग ।
जे प्राणान्ता करिती केले तयें महारोग ॥ २३ ॥
जो नर बसला उभा राहिला निजला ज्या स्थानीं ।
तेथें पडला मरुनी ऐशी तो खल करि करणी ॥ २४ ॥

१ उपकार न जाणणारी.

कुलदेवीगण उपद्रवा या पाहुनि जनतेंत ।
शत्रुघ्नाला कथिती करि या प्रयाण तूं त्वरित ॥ २५ ॥
तेव्हां अपुली घेउनि सेना समस्त तो गेला ।
साकेतापुरिं तेणें सकळां प्रमोद बहु झाला ॥ २६ ॥
राम-लक्ष्मणें खेचरभूपें तैं स्वागत केलें ।
विजयी होउनि येतां प्रमुदित मन त्यांचें झालें ॥ २७ ॥
सती सुप्रजा माता झाली पुत्र जयें मुदित ।
श्रीजिन पूजुनि धार्मिक लोकां दान दिलें त्वरित ॥ २८ ॥
दीन नि दुर्बल दुःखित जे जन त्या इच्छितदान ।
दिलें तियेनें याचक झाले बहु प्रसन्नमन ॥ २९ ॥
पुरी अयोध्या सुन्दर होती हेमप्रासादें ।
कामगवीसम इच्छितदात्री शत्रुघ्न न मोदे ॥ ३० ॥
सीताविरहें राघव होता खेदें खिन्न जसा ।
मथुराविरहें कुमार झाला शत्रुघ्नहि तैसा ॥ ३१ ॥
जेव्हां असतो अल्पकाळ शुभ इष्टाचा योग ।
स्वप्नासम तो होतो मनुजां वदती गतराग ॥ ३२ ॥
ग्रीष्मरवीच्या[१] किरणाहुनि तो ताप मना देतो ।
ऐसें जाणुनि दास जिनाचा तत्पदिं नित रमतो ॥ ३३ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे मथुरोपसर्गाभिधानं नाम नवतितमं पर्व ॥ ९० ॥

---

१ उन्हाळयांतील सूर्याच्या.

# एक्याण्णवावें पर्व

शत्रुघ्नाला मथुरानगरी कां प्रिय बहु झाली ।
भगवन्ता हें सांगा विस्मय मम मनिं करि केलि ॥ १ ॥
स्वर्लोकासम सुन्दर असतां अन्य अनेकपुरी ।
शत्रुघ्नाच्या कां हो व्हावी प्रिय मथुराचि उरीं ॥ २ ॥
दिव्यज्ञानी गौतम वदले प्रिय ती मथुराच ।
झाली त्याला नानावेळां तिथेंचि जनि साच ॥ ३ ॥

[ शत्रुघ्नाच्या पूर्वजन्मांचें कथन. ]

हा भवसागर-सेवी याचा कर्मप्रकृतीनें ।
जम्बूद्वीपीं भरतीं मथुरापुरींत नियमानें ॥ ४ ॥
जीव जन्मला यमुनदेव या नांवाचा क्रूर ।
धर्मापासुनि सदा पराङ्मुख झाला से डुकर ॥ ५ ॥
नन्तर गर्दभ काक जहाला यानन्तर बकरा ।
गृहदाहानें[१] मृति त्या आली सोशी दुःखभरा ॥ ६ ॥
नन्तर रेडा पाणी वाहुनि वाहुनि तो मेला ।
सहाहि वेळां रेडा झाला दुःखें बहु खचला ॥ ७ ॥
मानव झाला पांचहि वेळा नीचकुली अधन ।
मध्यमकर्मे आर्य जहाला मानव तो जाण ॥ ८ ॥
यापरि धारण करून भव हा फिरला संसारीं ।
झाला यापरि किञ्चित्कर्मक्षय जो अघवारी[२] ॥ ९ ॥

[कुलंधराला दासी राणीच्या महालीं नेते. तेथें तिच्या पलंगावर दोघे बसतात. राजा हें पाहून त्याला मारेकऱ्याच्या स्वाधीन करितो. कल्याणसाधु त्याला सोडवून दीक्षा देतो. ]

नंतर झाला कुलन्धराख्य ब्राह्मण मुनिसेवी ।
स्वरूपसुन्दर, नव्हतें ज्याच्या शीलव्रत गांवीं ॥ १० ॥

---

१ घर जळण्यानें. २ पापाचा नाश करणारा.

त्या नगरीचा राजा जाई अरिगण जिंकाया ।
होती त्याला ललिता नामक रूपवती जाया ॥ ११ ॥
प्रासादामधिं खिडकीजवळी बैसुनि ती पाही ।
दिसला तिजला कुलन्धर द्विज सुशील जो नाहीं ॥ १२ ॥
रूपें सुन्दर पाहुनि त्याला ती ललिताराणी ।
कामें पीडित झाली झालें अंगाचें पाणी ॥ १३ ॥
पाठवुनी ती निजदासीला बोलावुनि आणी ।
उभयहि बसले पर्यंकावरि विप्र नि ती राणी ॥ १४ ॥
इतुक्यामध्यें सहसा आला राजा त्यास्थानीं ।
दिसली त्याला त्यांची चेष्टा झाला कुपित मनीं ॥ १५ ॥
मायानिपुणा राणी पाहुनि नृपास ओरडली ।
कोणी आला खल शीलावरि घाला मम घाली ॥ १६ ॥
पकडुनि नेलें त्याला सुभटें नगराबाहेर ।
अष्टाङ्गांचे[1] करुनी तुकडे माराया ठार ॥ १७ ॥
बहुधा सेवितसाधु तयाला दिसला कल्याण ।
घे वा दीक्षा ऐसें वदतां दिला तया मान ॥ १८ ॥
राजाच्या त्या क्रूर मनुष्यापासुनि सोडविलें ।
दीक्षा घेउनि त्यानें भावें तप दुर्धर केलें ॥ १९ ॥

[ कुलन्धरमुनि ऋतुविमानांत देव झाले व तेथून चऊन
तो देव चन्द्रभद्र राजाचा अचल नामक पुत्र झाला.]

मेला झाला ऋतुविमानपति साधु कुलन्धर तो ।
धर्में दुर्लभ नाहीं कांहीं जो न तयें मिळतो ॥ २० ॥
मथुरेमध्यें चन्द्रभद्र या नामें नृप होता ।
तया धराभिध भार्या होती शीलगुणें युक्ता ॥ २१ ॥
सूर्य[2] समुद्र नि यमुना अन्तीं देवरवें युक्त ।
होते त्याला तीन मेहुणे प्रेमळ गुणवन्त ॥ २२ ॥

१ दोन हात, दोन पाय, पाठ, ढुंगण, छाती, मस्तक. २ सूर्यदेव, समुद्रदेव व यमुनादेव.

श्रीसत्[1]स्विन्द्रप्रभोग्र अर्क नि मुखान्त सुत त्यास ।
होते सुगुणी पराक्रमी नच सोडिति सत्यास ।। २३ ।।
होती दुसरी राणी कनकप्रभा नृपालास ।
तियेंत होता शीलगुणाचा अखण्ड सहवास ।। २४ ।।
ऋतुविमानपति होऊन च्युत झाला तनय तिला ।
लोकमनोहर अचल सुनामा वदती बुध त्याला ।। २५ ।।
कलागुणौघें समृद्ध झाला शुभलीला त्याची ।
देवतनय जणु मानी पाहुनि जनता त्या सुरुचि ।। २६ ।।
दुसरा कोणी अंक सुनामा धर्मा अनुमोदी ।
श्रावस्तीपुरिं राहत होता सदैव आल्हादी ।। २७ ।।
कम्पसुनामा कवाट[2]जीवी होता गुणवन्त ।
तया अङ्गिका भार्या होती स्वपतिप्रेमरत ।। २८ ।।
झाला उभया मरुनि अङ्क तो आपाभिध तनय ।
वाढुनि झाला थोर जनाला वाटे जणु अनय[3] ।। २९ ।।
क्रोधें कम्पें निजगेहांतुनि दिलें हकालोनी ।
होउनि दुःखी राहे जाउनि तिलकाभिध रानीं ।। ३० ।।
वेचुनि इन्धन पोट भरे तो चाले अनवाणी ।
कष्ट असे तो करितचि राहे दिवस न रात्र गणी ।। ३१ ।।

[ सापत्न-माता धराराणी, तिचे भाऊ आणि तिच्या पुत्रांनीं अचलाला मारण्याचा बेत केला हें जाणून तो वनांत पळून गेला.]

चन्द्रभद्रनृप अचलावरती करी जरी प्रेम ।
आठ धरासुत करिति द्वेषा त्याशीं अविराम ।। ३२ ।।
भूपाचे जे तिचे मेहुणे आणि धराराणी ।
सगळे होते मूर्तिमन्त जणु वैराच्या खाणी ।। ३३ ।।
नेउनि विजनीं मारायाचा बेत तयें केला ।
परि जननीनें ओळखुनी हें कथिलें अचलाला ।। ३४ ।।
बाळा येथुनि पळून जा तूं तरीच जगशील ।
पळून गेला तिलकवनीं तो वसे दयाशील ।। ३५ ।।

---

१ श्रीमुख, सन्मुख, सुसुख, इन्द्रमुख, प्रमुख, भासुख, उग्रमुख, अर्कमुख असे आठ पुत्र. २ कवाडें बनवून उपजीविका करणारा. ३ तंटे करणारा.

[ अचलाच्या पायांत काटा मोडला तो आपानें काढला. मी राजा झाल्यावर मला भेट तुझा उपकार मी फेडीन असें म्हणून तो कौशांबीला गेला. ]

एकेसमयीं मोठा कांटा त्याच्या पायांत ।
घुसला तेणें सुतीव्र दुःखें पडला तो कण्हत ॥ ३६ ॥
डोईवरती इन्धनभारा घेउनि तो आप ।
जातां पाही अचला तेणें वने दयाकूप ॥ ३७ ॥
उतरुनि भारा खालीं ठेवी करीं सुरी घेई ।
काढुनि कांटा पायामधला त्याच्या करिं देई ॥ ३८ ॥
वदला अचल नि दुःखविनाशें प्रसन्न होऊन ।
तवोपकारा फेडिन राजा होतां मी जाण ॥ ३९ ॥
अवश्य ये तूं माझ्यापाशीं राजा झालेला ।
उपकृति फेडिन समजु नको तूं मिथ्या मम बोला ॥ ४० ॥
आप यथोचित गेला नन्तर नृपसुतही दुःखी ।
कौशाम्बीवाह्यस्थलिं गेला ज्याच्या सत्य मुखीं ॥ ४१ ॥

[ कौशांबी येथें विशिखाचार्याला जिंकून वासवदत्तेशीं विवाह. ]

इन्द्रदत्तनृप राज्य तिथें करि गेला त्याजवळी ।
विशिखाचार्या जिंकुनि झाला विजयी त्याकाळीं ॥ ४२ ॥
भूपालानें प्रमुदित होउनि दिली सुता त्याला ।
नाम जियेचें वासवदत्ता जी हरि रतिलीला ॥ ४३ ॥
शुभकर्मोदय सुन्दर तेणें प्रभावही पडला ।
सर्वजनावर वीर अचल तो पावे नृपलीला ॥ ४४ ॥

[ अनेक राजांना जिंकून अचल मथुरेला आला त्याचे सापत्नबंधुही त्याची सेवा करूं लागले. ]

अङ्ग वङ्ग मगधादिक देशा जिंकुनि मथुरेला ।
बाह्योद्देशीं निजसैन्यासह वास तयें केला ॥ ४५ ॥
सामन्तांना धन बहु देउनि केलें वश त्यानें ।
विभिन्न केलें राजापासुनि भेदोपायानें ॥ ४६ ॥
चन्द्रभद्रनृप खिन्न जहाला सन्धि करायास ।
पाठविलें तें स्वमेहुण्यांना धरून विनयास ॥ ४७ ॥

पाहुनि त्याला कोण असे हा ओळखिलें त्यांनीं ।
वाटे त्यांना वहु भय हृदयीं ये म्लानि हि वदनीं ॥ ४८ ॥
सर्व धरेचे तनयहि झाले सेवक ते सतत ।
शुभकर्मोदय होतां वैरी सुमित्र होतात ॥ ४९ ॥
चन्द्रभद्रनृप माता कनकप्रभा सुखी झाले ।
अचलाच्या या राज्यीं सज्जन आनन्दें फुलले ॥ ५० ॥

[ अचलनें आपाला ओळखून त्याला श्रावस्तीचें राज्य दिलें.]

एके वेळीं नटरङ्गामधि नृत्य वघायास ।
आला असतां आप नृपानें ओळखिलें त्यास ॥ ५१ ॥
श्रावस्तीचा भूपति त्याला शीघ्र तयें केलें ।
उपकाराची कृति तैं सज्जनिं महाफलास फलें ॥ ५२ ॥
एके वेळीं नृप आपासह उद्यानीं गेला ।
विविध क्रीडा करुनी तेथें आनन्दें फिरला ॥ ५३ ॥

[ यशःसमुद्राचार्याजवळ अचल व आप यांनीं दीक्षा घेतली स्वर्गी उत्पन्न होऊन तेथून अचल शत्रुघ्न व आप कृतांतवक्र सेनापति झाला. ]

यशःसमुद्रा आचार्याला उभयें पाहून ।
केलें त्यांच्या चरणयुगाला भक्तीनें नमन ॥ ५४ ॥
मुनिवर्यांनीं आत्महिताचा केला उपदेश ।
ऐकुनि उभयें धारण केला संयमगुणकोश ॥ ५५ ॥
सम्यक्त्वासह महाव्रतें ते पाळुनि आमरण ।
स्वर्गीं कमलोत्तरिं तैं झाले सुर सत्सुखसदन ॥ ५६ ॥
तेथून च्युत होउनि झाला सुपुण्यशेषानें ।
अचल सुप्रजानयनानन्दन 'अरिघ्न' नांवानें ॥ ५७ ॥
मथुरानगरीं झाले याचे अनेक पूर्वभव ।
प्रीति तिच्यावरि त्याची वदती जिनेश नष्टभव ॥ ५८ ॥
ज्याचा आश्रय आपण घेतो तरु किंवा गेह ।
एके दिनिंही त्यावर जडतो अवश्य सुस्नेह ॥ ५९ ॥
नानाजन्मीं संगति झाली ज्यांची त्यावरती ।
स्नेह जन्मतो संसाऱ्यांची ऐशी जाण गति ॥ ६० ॥

उरल्या पुण्यें आपंहि घेई तेथुनि अवतार ।
कृतान्तमुख या नामें झाला सेनापति शूर ॥ ६१ ॥
धर्में झाली उत्तमसम्पद् या उभया प्राप्त ।
धर्मरहित जे मिळे न सुख त्यां असे वदे आप्त ॥ ६२ ॥
धर्मतीर्थ जें दुःखमलाचा क्षय करितें तेंच ।
निर्मल होते जनता त्यानें तेंचि जगीं साच ॥ ६३ ॥
मानिति कोणी जलतीर्था परि असे निरर्थक तें ।
शुद्धि तयानें कदापि हो नच करिता स्नानशतें ॥ ६४ ॥
शत्रुघ्नाचें परम्परेनें कथिलें सुचरित्र ।
जाणुनि बुधजन धर्मी तत्पर होउत सुपवित्र ॥ ६५ ॥
उत्तम धर्मा ऐकुनि देखिल करिती प्रीति न जे ।
फिरती जन जिनदास तयांना बुध पशुसम समजे ॥ ६६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे शत्रुघ्नभवानुकीर्तनं नाम एकनवतितमं पर्व ॥ ९१ ॥

## ष्याण्णवाव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

कोण्या एकेवेळीं चन्द्राप्रमाणें शांत स्वभावाचे सात ऋद्धिधारी सात मुनि आकाशांतून मथुरानगरीला आले. सुरमन्यु, श्रीमन्यु, श्रीनिचय, सर्वसुन्दर, जयवान्, विनयलालस व जयमित्र अशीं त्या सात मुनींचीं क्रमानें नांवें होतीं. यांच्या मनांत समता नांदत असल्यामुळें हा मित्र व हा शत्रु असा भेद नव्हता.

'प्रभा' नामक नगरांत राजा नन्दन राणी धरणीसुन्दरीसह राज्य करीत होता. त्यांचे हे सात पुत्र होते. एकेवेळीं प्रीतिंकर मुनींचें पूजन करण्यासाठीं देवसमूह आलेला पाहून राजा नन्दन व त्यांच्या सात पुत्रांना वैराग्य झालें. आत्महित मुनि-धर्मानेंच होतें असें ज्ञान त्यांना झालें. त्यांनीं प्रीतिंकर मुनीच्या चरणांना नमस्कार केला व त्यांच्याजवळ दीक्षा घेण्याचा विचार केला. राजा नन्दनानें 'डमरमंगल' नामक एक महिन्याच्या मुलाला राज्य दिलें व सात पुत्रासह प्रीतिंकर मुनीजवळ दीक्षा घेतली.

नन्दनमुनींना तीव्रतपानें घातिकर्मांचा क्षय होऊन केवलज्ञान झालें. व अघातिकर्मांचाही नाश करून ते अनन्तसुखादिक अनन्तगुणांचे धारक बनले अर्थात् मुक्त झाले.

इकडे सुरमन्यु आदिक सात मुनींना तपःप्रभावानें सात ऋद्धि प्राप्त झाल्या व ते विहार करीत मथुरानगरीला आले. एका वडाच्या झाडाखालीं ते योगनिमग्न झाले. त्यांच्या तपःप्रभावानें चमरेंद्रानें उत्पन्न केलेले रोग सगळे नाहींसे झाले. पाऊस पडला व धनधान्यानें नगरी सुंदर दिसूं लागली.

हे सात मुनि दोन, तीन, चार, पांच वगैरे उपवासांची प्रतिज्ञा करून त्याप्रमाणें उपवास समाप्त झाल्यावर पारणें करण्याकरितां आकाशमार्गानें पोदनपुर,

विजयनगर, अयोध्या आदि नगराला जात असत. ते धारणा केल्याप्रमाणें एकदा अयोध्येंत अर्हद्दत्त सावकाराच्या घरीं आहारासाठीं आले. त्यांना पाहून अर्हद्दत्त मनामध्यें विचार करू लागला. वर्षाकालीं एकेठिकाणीं मुनि तपध्यान करीत राहतात व हे तर या कालांतही विहार करीत आहेत यास्तव मुनिजनांचा आचार सोडून वागणारे हे स्वैराचारी मुनि आहेत अशी भ्रान्तकल्पना उत्पन्न होऊन त्यानें त्यांचा आदर केला नाहीं. परंतु अर्हद्दत्ताच्या सुनेनें भक्तीनें त्यांचा नवधा आदर करून आहार दिला व त्यामुळें त्या साध्वीचें मन फार प्रसन्न झालें.

आहारानन्तर ते सात मुनि आकाशमार्गानें मुनिसुव्रतनाथांच्या मंदिरांत गेले. त्यांचें भूमीवरून चार अंगुलें अधर गमन पाहून द्युत्याचार्यांनीं आदरानें उठून त्यांना वंदन केलें. हें पाहून त्यांच्या शिष्यांनीं आमचे गुरु ज्या कोणालाही वंदन करितात म्हणून मनांत निंदा केली. पण जेव्हां ते सात मुनि जिनप्रभूंना वंदन करून आकाशमार्गानें निघून गेले तेव्हां हे चारणमुनि आहेत असें त्यांनीं जाणलें व स्वतःची निंदा करून आपलें मन त्यांनीं निर्मल आणि आदरयुक्त केलें.

थोड्यावेळानें अर्हद्दत्तश्रेष्ठी द्युत्याचार्यांना वंदन करण्यासाठीं आले. त्यावेळीं आचार्यांनीं त्यांना म्हटलें– श्रेष्ठिन्, आपण महातेजस्वी, तपस्वी अशा मुनींना वंदून त्यांचीं पूजा केली असेलच. ते मथुरानगरीहून आकाशमार्गानें येथें आले होते. त्यांनीं माझ्याशीं भाषण केलें. त्या तपोधनांचें सुचरित पाहून मला मोठा आनंद झाला. मी त्यांना वंदन केलें. हें द्युत्याचार्यांचें भाषण ऐकून अर्हद्दत्त खिन्न झाला. मी महातपस्वीची निंदा केली म्हणून तो पश्चात्ताप करूं लागला. मला त्यांचें स्वरूप कळलें नाहीं मी अधम आहे, मिथ्यादृष्टी आहे. साधुस्वरूप पाहून जो आपलें आसन सोडीत नाहीं तो मिथ्यात्वी आहे. महापापी आहे. माझ्या या वागणुकीचा मला पश्चात्ताप वाटत आहे असें बोलून मी त्यांचें आतां ते जेथें असतील तेथें जाऊन दर्शन घेईन असा निश्चय केला.

कार्तिकोत्सवांत त्यांचें दर्शन घेण्यासाठीं आपल्या बंधुगणासह मोठ्या वैभवानें मथुरेकडे जाण्यासाठीं निघाला. व कार्तिक शुद्ध सप्तमीच्या दिवशीं सप्तर्षींच्या चरणाजवळ जाऊन पोहोंचला.

ज्या निवासांत ते सप्तर्षि राहत असत त्यांच्यापुढें मोठा मंडप उभारून तो प्रदेश सुंदर बनविला. मोठ्या भक्तीनें त्यानें मुनीश्वरांना वंदून पूजन केलें.

त्याचवेळीं शत्रुघ्नराजा मोठ्या घोड्यावर बसून आपल्या मातेसह मुनींना वन्दन करण्यासाठीं आला. मातेनें व त्यानें त्यांच्या चरणांची पूजा-वन्दना केली व राजानें विनयानें— प्रभो, आपण माझ्या घरीं पारण्यासाठीं यावें अशी विनन्ति केली.

मुख्यमुनि म्हणाले— शत्रुघ्ना, मुनींना उद्दिष्टाहाराचा त्याग असतो. ते माझ्यासाठीं भिक्षा करा, करवा असे म्हणत नाहींत व त्यांच्यासाठीं भिक्षा करावयाला अनुमोदनही देत नाहींत. उद्दिष्टभिक्षेनें मुनीच्या तपाचा नाश होतो. अनुद्दिष्ट भिक्षा त्यांच्या तपाला वाढविते.

यानंतर शत्रुघ्न मोठ्या विनयानें— प्रभो, आपण येथें आणखी कांहीं दिवस राहावें म्हणजे येथें सुभिक्ष होऊन प्रजेचें आरोग्य वाढेल असें म्हणाला. शत्रुघ्नाच्या मनांत या मुनींना आपण आहार द्यावा अशी फार इच्छा होती. त्याची नम्रता पाहून मुनीश्वर म्हणाले— शत्रुघ्ना, पुढील काल मोठा कठिण येणार आहे. कलिकालीं जिनधर्माचा नाश होऊन अधर्म चोहीकडे फोफावेल. खेडीं-गावें उजाड होतील. प्रत्येक देशांतील लोकांच्या मनांत कुभाव वाढेल. पुत्राचें आई-बापावरील प्रेम कमी होईल. राजे चोरासारखे होतील. करभारानें प्रजा दुःखी होईल. कुकथांची रचना करून लोकांना पाखण्डीविद्वान् कुमार्गीं लावून नरकाला नेतील. व्रत व गुणांत तत्पर असलेल्या नग्नमुनींची लोक निंदा करतील. लोक मुनींना अवज्ञून गृहस्थांना दान देतील. हे शत्रुघ्ना, मुनींना तूं दान देत जा. मथुरेंतील सर्व लोक जिनधर्म तत्पर होवोत. व प्रत्येकानें आपल्या घरीं जिनबिम्बाची स्थापना करून पूजन करावें.

ज्याच्या घरीं जिनबिम्ब नसेल त्याला चमरासुरानें उत्पन्न केलेली मारी भक्षील म्हणून गृहस्थानें अंगुष्ठाएवढी लहान अशीही जिनप्रतिमा स्थापून तिचें प्रतिदिवशीं पूजन करावें. याप्रमाणें मुख्य मुनींचा उपदेश ऐकून शत्रुघ्नानें नगराच्या बाहेर व आंतही चार दिशांना सप्तर्षींच्या प्रतिमा स्थापन केल्या.

यानंतर ते सप्तर्षि आहारासाठीं अयोध्येंत सीतादेवीच्या घरीं गेले. सीतेनें भक्तीनें सात मुनींना आहार दिला. नंतर ते मुनीश्वर तिला आशीर्वाद देऊन आकाशमार्गानें अन्यत्र विहार करण्यासाठीं निघून गेले.

शत्रुघ्नानें दुसरी मथुरानगरी स्वर्गाप्रमाणें सुंदर बनविली. ती तीन योजनें विस्तृत होती. तिचा घेर नऊ योजनापेक्षा कांहीं अधिक होता. मथुरादेशांतले लोक

सर्व सुखी होते. शेतकरीही धनधान्य संपन्न होते. अनेक राजे शत्रुघ्नाची आज्ञा पुष्पमालेप्रमाणें मस्तकावर धारण करीत असत.

सप्तर्षींच्या निवासामुळें मथुरानगरींतील लोकांचीं सर्व दुःखें नाहींशीं झालीं व ते सुखी झाले. हें सप्तर्षींचे चरित्र सांगणाऱ्याला व ऐकणाऱ्याला सुख, धन, जय व यशाची प्राप्ति होईल. जिनभक्ति करणाऱ्या लोकांना साधुसमागमापासून सर्व इच्छितांची प्राप्ति होते व सर्व सुखें मिळून पापांचा नाश होतो.

# ब्याण्णवावें पर्व.

—ooxoo—

कोण्या एकेवेळीं आले विहरत मुनि सात ।<br>
आकाशांतुनि मथुरानगरीं चन्द्रासम शान्त ॥ १ ॥<br>
सुरमन्यु श्रीमन्यु नि तिसरे नामें श्रीनिचय ।<br>
सर्वसुन्दर नि जयवान् मोहीं मिळविति जे विजय ॥ २ ॥<br>
विनयलालस श्रेष्ठ सहावें सप्तम जयमित्र ।<br>
भेद जयांच्या हृदयीं नव्हता हे अरि हे मित्र ॥ ३ ॥

( सप्तर्षींचे माता-पिता व दीक्षा घेण्याचें कारण. )

राजा नन्दन धरणिसुन्दरी राणी गुणखाणी ।<br>
प्रभापुरीमधिं निवास ज्यांच्या हृदयीं जिनवाणी ॥ ४ ॥<br>
त्यांना झाले शुद्धगुणांचे पुत्र असे सात ।<br>
कीर्ति जयांची निर्मल पसरे समस्त देशांत ॥ ५ ॥<br>
प्रीतिंकरमुनिपूजन करण्या आल्या देवगणा ।<br>
पाहुनि झाला निजानुभव त्या नमिती ते श्रमणा ॥ ६ ॥<br>
जनकासह ते उद्यत झाले मुनिदीक्षा घ्याया ।<br>
देह-भोग-भविं विरक्ति धरिती जे मनिं नित्य दया ॥ ७ ॥<br>
जन्मुनि झाला होता एकचि मास जयास सुता ।<br>
डमरमङ्गला नन्दनभूपें दिली नरप्रभुता[1] ॥ ८ ॥<br>
प्रीतिङ्करमुनिवर्यासंनिध पुत्रासह सात ।<br>
दीक्षा घेई नरपतिनन्दन नित्य मनीं शान्त ॥ ९ ॥

( नन्दनमुनिवर्यांना मुक्तिप्राप्ति. )

तीव्रतपोरत मुनिवर नन्दन घातककर्मगणा ।<br>
नाशुनि झाले केवलबोधी सुवन्द्य नृसुरजनां ॥ १० ॥<br>
कर्म अघातिक नाशुनि त्यांनीं वरिली मुक्तिरमा ।<br>
शाश्वतसौख्या प्राप्त जहाले ज्याला नच उपमा ॥ ११ ॥

---

१ राज्य.

( सप्तर्षींच्या आगमनानें मथुरानगरी सर्व रोगादिक उपद्रवांनीं रहित झाली. )

तनय तयांचे मुनिसत्तम[1] हे नाना ऋद्धिधर ।
विहरत आले मथुरानगरीं सप्तर्षिप्रवर ॥ १२ ॥
वटतरुमूलीं राहुनि योगी अवलंबुनि योगा ।
निजात्मचिन्तनिं निमग्न झाले रोधुनि हृद्‍योगा[2] ॥ १३ ॥
जी चमरासुर-निर्मित मारी तपःप्रभावानें ।
विलया गेली मथुरानगरी शोभे धान्यधनें ॥ १४ ॥
मथुरानगरीं सुवृष्टि झाली शोभे आनन्दें ।
जनकदर्शनें प्रमुदित तनयेसम जी मुक्तगदें[3] ॥ १५ ॥
ते उपवासा षष्ठ[4] नि अष्टम[5] दशादिकां[6] करिती ।
त्याग रसाचा आदिक सत्तप उत्कट आचरिती ॥ १६ ॥
एका निमिषिंहि दूर नभाला उल्लंघुनि जाती ।
विजय नि पोदन आदिक नगरीं पारण मुनि करिती ॥ १७ ॥
परगृहिं भिक्षा करपात्रीं[7] जी देहस्थितिसाठीं[8] ।
केवळ घेती ते यति मिळतां यापरि परिपाटी ॥ १८ ॥
आकाशाच्या मध्यावरती दिनमणि जंव आला ।
उपशमधारी आले मुनिवर पुरी अयोध्येला ॥ १९ ॥

( अर्हद्दत्तानें हे स्वैराचारी मुनि आहेत असे भ्रान्तीनें समजून त्यांची निन्दा केली. )

चार हात तैं भूमिस बघुनि प्रवेश नगरींत ।
केला आले अर्हद्दत्तश्रावकगेहांत ॥ २० ॥
खालीं केले बाहु जयांनीं ऐसे मुनि सात ।
श्रेष्ठी पाहुनि चिन्तन करितो तैं निजचित्तांत ॥ २१ ॥
कोठें वर्षाकाल असा हा यत्याचार कुठें ।
दिसतें अन्तर मम हृदयाला येथें बहु मोठें ॥ २२ ॥
ऐशासमयीं राहति यतिगण सरितेच्या काठीं ।
किंवा पर्वतविवरीं, कन्दरिं शून्यगृहीं जेठीं ॥ २३ ॥

---

१ मुनिसमूहांत श्रेष्ठ. २ मनाचे व्यापार. ३ रोगांनीं. ४ दोन उपवास. ५ तीन उपवास. ६ चार आदिक उपवास. ७ हातरूपी पात्रांत. ८ देह टिकण्यासाठीं.

जिनमन्दिरिं वा विपिनीं तरुतलिं राहति नच फिरती।
आचारांचें करून खण्डन हे हिण्डन[1] करिती॥ २४॥
योग्य न यांची दिसते वृत्ति स्वच्छन्दा वरिती।
सूत्रार्थप्रतिकूलाचरणें अज्ञानी दिसती॥ २५॥
निराचार्य[2] हे निराचार[3] हे वर्षाकालांत।
फिरती मज हे श्रमण न गमती स्वेच्छा वरितात॥ २६॥
परन्तु अर्हद्दत्ताची जी सून सुभक्तिमती।
पाहुनि सप्तश्रमणां झाली हर्षित वहु चित्तीं॥ २७॥
दिलें तियेनें महामुनींना विधिपूर्वक अन्न।
तेणें झालें त्या साध्वीचें वहु प्रसन्न मन॥ २८॥
नन्तर गेलें मुनिसप्तक तें श्रीजिनसदनांत।
स्थापन केले होतें जेथें सुव्रतभगवन्त॥ २९॥
भूतल सोडुनि चतुरङ्गुलवरि सुगति जिची दिसली।
श्रमणपंक्ति ती पाउल टाकित जिनमन्दिरिं आली॥ ३०॥

( द्युत्याचार्यांनीं मुनिसप्तकाला वन्दना केली पण त्यांच्या शिष्यांनीं भ्रान्तीनें निन्दा केली. )

द्युत्याचार्यें उठुनी केला प्रवन्दनाचार।
शिष्यगणानें निन्दा केली जींत न सुविचार॥ ३१॥
सूरि आमुचे ज्या कोणासहि वन्दन करितात।
ऐसें जाणुनि शिष्य द्युतिचे निन्दिति जें अहित॥ ३२॥
जिनेन्द्रदेवा वन्दुनि केली स्तुति अतिभक्तीनें।
उडुनी गेले आकाशांतुनि निजाश्रमा गतिनें॥ ३३॥
होते सगळे चारणमुनि हे ऐसें जाणून।
द्युत्याचार्य नि तच्छिष्यांचें प्रमुदित होय मन॥ ३४॥
आम्ही त्यांना विशिष्ट गणिलें नच, निन्दा म्हणुन।
करुनी अपुली निर्मलचित्ताप्रति गेले श्रमण॥ ३५॥
आला अर्हद्दत्त श्रावक नन्तर जिनसदनीं।
द्युतिनें म्हटलें मुनिवर्या का पाहियलें नयनीं॥ ३६॥

---

१ फिरतात. २ आचार्यरहित–गुरुरहित. ३ मुनीच्या आचारांनी रहित.

पृथुसत्त्वाचे अति तेजस्वी वन्दुनि पूजियलें ।
अर्हद्दत्ता ! सांग मला जे निजरूपीं रमले ॥ ३७ ॥
मथुरानगरीं निवसन त्यांचें आपण माझ्याशीं ।
तपोधनांनीं केलें दिसलें सुचरित आम्हाशी ॥ ३८ ॥
वन्दिति त्यांना श्रावक मुनिगण जे निजहितकामी ।
आर्जवधर्मा धरिती वन्द्य श्रमण नभोगामी ॥ ३९ ॥

( अर्हद्दत्तमुनींची निंदा केल्यामुळें पश्चात्ताप करितो. )

द्युत्याचार्यापासुनि ऐकुनि अतिशय साधूंचा ।
खिन्नमना तो झाला श्रावक अनुतापी साचा ॥ ४० ॥
न कळे मजला स्वरूप त्यांचें नच सम्यक्त्वी मी ।
अधमाचारी माझ्यासम नच अन्य जगीं स्वामी ॥ ४१ ॥
मिथ्यादृष्टि न समान माझ्या दुसरा जगतांत ।
उठुनि न नमिले नच यजिले मी न तर्पिले तात ॥ ४२ ॥
मुनिरूपा जो अवलोकुनि नच निजासना सोडी ।
मिथ्यात्वी तो अपमानी त्या मुनिपदिं नच गोडी ॥ ४३ ॥
आहे पापी अघकर्मा मी पापाचें पात्र ।
जिनवचना मी न मानिलें हा ! जें जगिं सुपवित्र ॥ ४४ ॥
निन्द्य असे मी हें माझें मन सतत असे जळत ।
अञ्जलि मस्तकिं ठेवुनि झालों नच मुनिपदिं विनत ॥ ४५ ॥
अभिमानानें पाप जहालें प्रायश्चित्त तया ।
पुनरपि वन्दिन त्याच मुनींना धरून मनिं विनया ॥ ४६ ॥

( सप्तर्षींचें दर्शनासाठीं अर्हद्दत्तश्रेष्ठी मथुरेस वैभवानें गेला व थाटानें पूजा केली. )

वैभव ज्याचें भूपासम कीं ऐसा हा श्रेष्ठी ।
होइल मज मुनिदर्शन केव्हां यास्तव मनिं कष्टी ॥ ४७ ॥
कार्तिकउत्सविं जाउनि घेऊं सप्तश्रमणांचें ।
दर्शन ऐसा श्रेष्ठिमनामधिं विचार शुभ नाचे ॥ ४८ ॥
मुनिमाहात्म्यज्ञाता जो निज निन्दोद्यत राही ।
बन्धुगणासह सप्तश्रमणा पूजाया जाई ॥ ४९ ॥

---

१ अतिशय सरल विचाराचे. २ पश्चात्ताप करणारा.

रथ गज घोडे पदाति ऐशा सेनेसह चाले ।
उत्सवदिन बहु समीप आले शीघ्र चला बोले ॥ ५० ॥
वैभव मोठें घेउनि गेला सुध्यानीं निरत ।
निर्मलकार्तिक-सप्तम-तिथिदिनिं मुनिपदिं तो त्वरित ॥ ५१ ॥
निर्मलसम्यग्दर्शन-धारक तो अर्हद्दत्त ।
सप्तश्रमणा वन्दुनि पूजोद्यत झाला त्वरित ॥ ५२ ॥
श्रमणनिवासस्थान जहालें रम्यस्वर्ग दुजा ।
नाटकशालादिकें शोभलें येइ तिथें राजा ॥ ५३ ॥
महाहयावरि रिपुघ्ननृपही होउनि आरूढ ।
सप्तर्षींच्या सन्निध आला ठेवुनि भक्ति दृढ ॥ ५४ ॥
पुत्रस्नेहें शत्रुघ्नाची जननी भक्तीनें ।
मुनिपदसन्निध आली बसली सर्भी विनीतमनें ॥ ५५ ॥
करुनी नन्तर भावें नमना रिपुमर्दन मोदी ।
समाप्त केला नियम तयांनीं प्रार्थी त्या शुभधी ॥ ५६ ॥

( शत्रुघ्नानें पारणेसाठीं आपण या असें सप्तर्षींना म्हटलें.
तेव्हां मुनि उद्दिष्टाहारत्यागी असतात असें उत्तर त्यांनीं दिलें.)

भिक्षेसाठीं प्रभुवर! यावें असुच्या गेहास ।
विनती ऐशी केली त्यानें धरुनि विमोहास ॥ ५७ ॥
मुनिमुख्यानें म्हटलें राजन्! कल्पितें आहार ।
येउनि घेणें संयमिना नच योग्य गमे चतुर ॥ ५८ ॥
जी कृतकारित अनुमोदितही न मनें ती भिक्षा ।
विधिनें घेणें योग्य यतींना ऐशी जिनशिक्षा ॥ ५९ ॥
ऐशी भिक्षा योगिजनांच्या सुतपा वाढविते ।
हें घे ध्यानीं नृपपुङ्गव तूं वदती गुणधर ते ॥ ६० ॥
नन्तर वदला रिपुघ्न त्यांना प्रसन्न होऊन ।
राहा येथें कांहिं दिनावधि ठेवा मम मान ॥ ६१ ॥
तेणें येथें सुभिक्ष होइल आरोग्य हि जाण ।
परोपकारीं तत्पर असती जगांत साधुगण ॥ ६२ ॥

---

१ कार्तिक शुक्ल सप्तमीचे दिवशीं. २ शत्रुघ्न. ३ मुनिसाठीं केलेला जो आहार तो उद्दिष्ट आहार.

आपण आला तेणें झाली समृद्ध ही नगरी ।
येतां उदया रवि पद्में जीं विकसित होति उरीं ॥ ६३ ॥
यापरि वोलुनि हृदयीं इच्छी केव्हां आहार ।
विधिपूर्वक मी देइन दिन्न तो होइल शुभ फार ॥ ६४ ॥
विनम्र पाहुनि शत्रुघ्नाला यतिसत्तम[1] बोले ।
महत्त्व कथितों तुज कालाचें जेणें चित्त खुलें ॥ ६५ ॥

( शत्रुघ्नाला मुनींनीं पंचमकालीं अधर्माचा कसा प्रसार होईल याचें विवरण केलें.)

धर्मवृद्धिचा समय संपतां अनुक्रमें येथें ।
निर्धर्मांचा प्रचण्ड येइल कुकाल भो नृपते ! ॥ ६६ ॥
परमोन्नत हें श्रीजिनशासन विलया नेतील ।
दुःपाखण्डी जैसें रविला झाकी वहु धूळ ॥ ६७ ॥
खेडींगांवें सगळीं मसणासमान दिसतील ।
यमनगरासम नगरें येथिल नृपते ! होतील ॥ ६८ ॥
प्रतिदेशांतिल जनहृदयामाधिं कुभाव वाढेल ।
लोक कुकर्मी क्रूर निरन्तर हिंसक होतील ॥ ६९ ॥
दुष्टपणा वहु भूतलिं होइल दरिद्र शेतकरी ।
दुःखें नाना हिंसेपासुनि उद्भवतील घरीं ॥ ७० ॥
जननी-जनकावरि पुत्रांचें प्रेम न राहील ।
निष्प्रेमी कां माता-पितरें तैं नच वनतील ॥ ७१ ॥
कलिकालामधिं राजे चोरासमान होतील ।
करभारानें समस्त जनता दुःखी होईल ॥ ७२ ॥
सुखिही कांहीं नर अन्योन्या मोहित करतील ।
नाना कुकथा रचुनी पापी नरका नेतील ॥ ७३ ॥
देवागमनादिक जे अतिशय विनष्ट होतील ।
कलिकालामधिं लोक कषायीं प्रचण्ड दिसतील ॥ ७४ ॥
व्रतगुणतत्पर नग्नमुनींना पाहुनि जन मोही ।
निन्दा लज्जा किळस मनामाधिं तो सन्तत वाही ॥ ७५ ॥
अप्रशस्त ते प्रशस्त मानुनि मानव वागेल ।
तेणें इहपरलोकीं दुःखें नाना भोगील ॥ ७६ ॥

---

१ श्रेष्ठमुनि.

प्रशमिहृदयीं मुनिवर्यांना निष्ठुर बोलून ।
हसतिल आणिक मूढांना कीं देतिल हें अन्न ॥ ७७ ॥
बीज शिलातलिं ठेवुनि सिञ्चित केलें जरि हि जलें ।
व्यर्थचि होतें दानहि तैसें गृहिशीलीं म्हटलें ॥ ७८ ॥
मुनिस अवज्ञुनि गेही देतो जो गेहिस दान ।
सोडुनि चन्दन घेइ बेहडा समजावें कां न ? ॥ ७९ ॥
दुःषम येइल काल भयानक त्यापूर्वीच करा ।
आत्महिताची कृति सज्जनहो परिणति शुभचि वरा ॥ ८० ॥

( हे शत्रुघ्ना, मुनींना दान देत जा व सप्तर्षींच्या प्रतिमा नगरांत चार दिशांत स्थापन कर व जनतेनें आपल्या घरांत जिनबिम्ब स्थापन करून पूजाभिषेक करावा असें म्हणून ते सप्तर्षि आकाशमार्गानें निघून गेले. )

अमुचें घेई नाम मुखानें श्रमणा दे दान ।
वैभवसम्पत् सफल करी तव होइल कल्याण ॥ ८१ ॥
भावीकालीं नग्नमुनींना द्यावा आहार ।
विमर्श[1] तव हा उत्तम आहे गृहिधर्मी सार ॥ ८२ ॥
दान असे हा सागारांच्या शीलव्रतिं नियम ।
देउनि दाना जन्म सफल करि तुजला भिइल यम ॥ ८३ ॥
मथुरेंतिल जन जिनवरधर्मी तत्पर राहोत ।
प्राणिदया वत्सलतादिक गुण सन्तत नान्दोत ॥ ८४ ॥
श्रीजिनशासनिं अनन्यभावें प्रेम करो जनता ।
स्थापुनि गृहिं गृहिं जिनबिम्बा तत्पूजनिं होउ रता ॥ ८५ ॥
प्रतिदिनिं पञ्चामृताभिषेका श्रावक मोदानें ।
करोत पाळी प्रजा समस्ता निजसुतवाञ्छेनें ॥ ८६ ॥
सप्तर्षींच्या प्रतिमा चारी दिग्भागीं यत्नें ।
नगरीं स्थापन करि शत्रुघ्ना प्रशान्ति हो तेणें ॥ ८७ ॥
आजपासुनी नसेल गेहीं ज्याच्या जिनबिम्ब ।
मारी भक्षिल त्याला जैशी व्याघ्री मृगडिम्भें[2] ॥ ८८ ॥
अंगुष्ठाएवढेंहि ज्याच्या श्रीजिनबिम्ब घरीं ।
प्रविष्ट होय न मारी सर्पी[3] विपभय[4] जेवि धरी ॥ ८९ ॥

---

१ विचार. २ हरिणाचें पिल्लू. ३ सर्पीण. ४ गरुडापासून भय.

आपण जैशी आज्ञा करितां तैसें वागेन ।
म्हटलें तेव्हां शत्रुघ्नानें मनीं प्रमोदून ॥ ९० ॥
आकाशामधिं उडून गेले ते सप्तश्रमण ।
जनहितकारक इच्छा ज्यांची स्वहितींही निपुण ॥ ९१ ॥

( सप्तर्षि निर्वाणक्षेत्रांना प्रदक्षिणा करून सीतेच्या घरीं आले. त्यांना सीतेनें विधियुक्त आहार दिला. नंतर ते आशीर्वाद देऊन निघून गेले. )

निर्वाणस्थानांना प्रदक्षिणा घातल्या नि ते श्रमण ।
आले सीतागेहीं ज्यांचे शुभभावनामय प्राण ॥ ९२ ॥
मोठा आनन्द जिला झाला श्रद्धादिसुगुणशोभित जी ।
परमान्नानें सीता तर्पी विधियुक्त सप्तमुनिराजी ॥ ९३ ॥
वैदेहीनें दिधलें भक्तीनें अन्न सर्वगुणयुक्त ।
भक्षुनि करतलिं गेले आशीर्वादें मुनीन्द्र ते सप्त ॥ ९४ ॥
मथुरानगरावाहिर आंत नि विम्बें तदा जिनेन्द्रांचीं ।
शत्रुघ्नें स्थापियलीं करिती मति लुब्ध इन्द्रचन्द्रांची ॥ ९५ ॥
सप्तर्षिप्रतिमाही समस्त विघ्नास दूर ज्या करिती ।
स्थापियल्या चार दिशीं शत्रुघ्नें यन्मनांत भक्तिरति ॥ ९६ ॥

( शत्रुघ्नानें दुसरी मथुरानगरी अतिशय सुंदर रचिली. मथुरादेशाचे राजे शत्रुघ्नाची आज्ञा पुष्पमालेसमान मस्तकावर धारण करीत असत. )

स्वर्गाच्या जणु पृष्टीं सर्वोपद्रव विराम जींत असे ।
सुन्दर नगरी दुसरी रचिलीं भूपें नि हृष्ट लोक वसे ॥ ९७ ॥
विस्तार योजनांचा तीन जिचा घेर थोर नउ राहे ।
रत्नमयी ती रचिली येउनि इन्द्रादि-सुर सदा पाहे ॥ ९८ ॥
पातालावधि आहे पाया ज्यांचा असें महासौध ।
चारी दिशांत रचिले चार जयें होय दूरचा बोध[1] ॥ ९९ ॥
पुष्पफलाकुल सुन्दर उद्यानें शोभते अनेक पुरी ।
वापी कमलें खुललीं असतीं ज्यांच्यांत नित मनोहारी ॥ १०० ॥
कैलासशिखरसुन्दर सौध जिथें विपुल धवल कान्तीचे ।
ज्या पाहुनि पौरांचे लोचन अन्यां न इच्छिती साचे ॥ १०१ ॥

१ ज्ञान– माहिती.

धान्यें सुवर्णरत्नें यांनीं सम्पन्न जेथ शेतकरी ।
राजासमान दिसती अन्याची वर्णवे कुणा थोरी ॥ १०२ ॥
मथुरादेशाचे नृप निजविभवें देवतुल्य दिसतात ।
धर्मार्थकामतत्पर शुभचेष्टा सर्वदैव वरितात ॥ १०३ ॥
शत्रुघ्नाची आज्ञा त्यांच्या शिरिं पुष्पहारसम शोभे ।
शत्रुघ्न नगरिं शोभे वरुणासम चित्त युक्त नच लोभें ॥ १०४ ॥
यापरि मथुरानगरी सप्तर्षिनिवास विस्मयावास ।
जनदुःख सकल वारी सुजनांची पूर्ण तो करी आस ॥ १०५ ॥
जो सप्तर्षिचरित्रा कथितो वा ऐकतो तया चार ।
मिळती सौख्य नि धन जय यश त्याचें पसरतें जगीं फार ॥ १०६ ॥
साधुसमागम करिती त्यांना सर्वाभिलषित सतत मिळे ।
जिनदास सर्व सौख्यद पुण्य फळे अशुभ पाप सर्व गळे ॥ १०७ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे मथुरापुरीनिवेशसप्तर्षिदानगुणोपसर्गसहनाभिधानं नाम द्विनवतितमं पर्व ॥ ९२ ॥

# त्र्याण्णवाव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

विजयार्ध पर्वताच्या दक्षिण दिशेस रत्नपुर नामक राजधानीचें सुन्दर शहर आहे. तेथें रत्नरथ नांवाचा विद्याधर राजा राज्य करीत होता. त्याच्या पत्नीचें नांव पूर्णचन्द्रवदना व कन्येचें नांव मनोरमा. मनोरमा अत्यंत सुंदर होती. ती तरुण झाली तेव्हां तिला योग्य असा वर शोधावा असा विचार त्याच्या मनांत आला. प्रयत्न चालू झाले. पण कोठें योग्य वर त्याला आढळून आला नाहीं. राजा रत्नरथ काळजीनें कृश झाला.

एकेवेळीं सभेंत नारद आले. त्यांचें उत्तम स्वागत करून ते स्थानापन्न झाल्यावर राजानें माझ्या कन्येला अनुरूप कोणता वर आपणास आढळून आला असल्यास मला सांगा असें विचारलें. नारदऋषि म्हणाले— राजा, युगपुरुष रामचंद्राचा धाकटा भाऊ लक्ष्मण हा योग्य वर आहे. हें नारदांचें वचन ऐकल्याबरोबर राजाचे हरिवेग, चित्तवेग, वातवेग वगैरे पुत्र रागावले. राम-रावणाच्या युद्धसमयीं लक्ष्मणानें आमच्या बंधुजनांचा नाश केला म्हणून त्याच्याविषयींचें वैर त्यांच्या मनांत जाग्रत झालें. आक्रमण करून ज्याला मारणें योग्य आहे असें आम्ही समजतो त्याला हे ऋषि, तुझी कन्या त्याला दे असें आमच्या पिताजीला सांगतात. हें यांचें सांगणें आम्हाला पसंत नाहीं. असा विचार करून त्यांनीं नारदाचा अपमान केला व सभेंतून त्यांना आपल्या नोकराच्याद्वारें हाकालून दिलें.

नारद कोपसन्तप्त होऊन तेथून निघून गेले. पटांत मनोरमेचें चित्र त्यांनीं अतिशय सुंदर रेखाटलें. व तो पट लक्ष्मणाला त्यांनीं दाखविला. लक्ष्मण तिच्यावर लुब्ध झाला. तिच्यावाचून जगणें व्यर्थ आहे असें त्याला वाटूं लागलें. नारदांनीं त्या कन्येची पूर्ण माहिती सांगितली व रत्नरथ राजाच्या सभेंत लक्ष्मण हाच मनोरमेला योग्य वर आहे असें गुणवर्णनपूर्वक आपण सांगितल्याचें त्यांनीं त्याला कळविलें. आपला अपमान कसा केला हेंहि त्यांनीं कळविलें. हें सर्व ऐकल्यावर लक्ष्मण नारदांना म्हणाला— पूज्य ऋषे, हा आपला अपमान केला असें मी समजत नाहीं तर हा माझा अपमान केला, माझ्या डोक्यावर त्या खलांनीं पाय दिला असें मी समजतो. आतां

आपण कोप सोडून द्या व शांत व्हा असें लक्ष्मणानें नारदाला सांगितलें व तत्काल विराधिताला बोलावून रत्नरथ राजाबरोबर लढावयाचें आहे यासाठीं विद्याधर राजांना आज्ञापत्रें देऊन सैन्यासह लढण्यासाठीं लेखांच्याद्वारें कळव अशी आज्ञा केली. लौकर सुग्रीव, भामण्डल, मारुति वगैरे विद्याधरराजे आले व रामचंद्र-लक्ष्मणासह ते रत्नरथ राजाशीं लढण्याकरितां निघाले. रत्नपुराला पोहोचले. रत्नरथानेंही सैन्याची तयारी केली. दोन्ही सैन्यांत लढाई सुरू झाली. सुग्रीव, भामण्डल व मारुति आणि लक्ष्मण यांनीं खूप पराक्रम दाखवून शत्रुसैन्याला पळविलें. राजा रत्नरथाचे पुत्र पळत सुटले. त्यांना गाठून तुम्ही नारदमुनींचा विनाकारण अपमान केला. तुम्हाला आम्ही कडक शिक्षा करतो असें म्हणत आहेत त्यावेळीं मनोरमा उत्तम अश्वावर आरूढ होऊन आपल्या कांहीं मैत्रिणीसह रणांगणांत लक्ष्मणाजवळ आली. तिला पाहून लक्ष्मणाला हर्ष झाला. त्याच्या मनांतील राग सर्व नाहींसा होऊन त्याठिकाणीं अनुराग उत्पन्न झाला.

रत्नरथ राजाही आपला अभिमान सोडून आपल्या पुत्रासह लक्ष्मणाजवळ आला. त्यांनीं त्याला मनोरमा दिली. राम व लक्ष्मणास पिता-पुत्रांनीं वंदन केलें.

इतक्यांत नारद तेथें हसत आले व म्हणाले— राजा रत्नरथा, हा लक्ष्मण वज्राप्रमाणें तुझ्यावर आक्रमण करून तुझा गर्वपर्वत त्यानें चूर्ण करून टाकिला आहे. आतां तूं रत्नरथ राहिला नाहींस. असें बोलून ते टाळ्या वाजवूं लागले. व हे रत्नरथाच्या पोरानों, आतां तुम्ही गर्व सोडून द्या. तुमच्या उद्धट वागणुकीचें हें कडू फळ तुम्हाला चाखावें लागलें हें ध्यानांत घ्या.

यानंतर नारदाला ते म्हणाले— मुनिराज, तुमच्या कोपानें आमचा फायदाच झाला. आम्हाला अशा महानरांचा संबंध प्राप्त झाला. आमच्या ठिकाणीं पुण्योदय आहे म्हणून आम्हाला शुभफल मिळालें असें आम्ही समजतों. अशारीतीनें विनोदाचें भाषण करून मोठ्या वैभवानें राम-लक्ष्मण आदिकांना त्यांनीं मिरवत नगरांत नेलें.

तेथें सुदामा नामक सुंदर कन्या विद्याधरांनीं रामाला दिली. मनोरमेशीं लक्ष्मणाचा विवाह झाला. पुण्यप्रभावानें शत्रुदेखील मित्र होतात. तें पुण्य जिनाचे दास झाल्यानें भव्यांना प्राप्त होतें म्हणून भव्यांनीं जिनभक्ति करावी.

---

# त्र्याणवावें पर्व.

[ रत्नरथ राजा कन्या मनोरमेच्या विवाहाच्या काळजीनें कृश झाला.]

विजयार्धपर्वताच्या आहे दक्षिण दिशेस रत्नपुर ।
रत्नरथनृपति तेथें समस्त विद्याधराधिप प्रवर ॥ १ ॥
सौन्दर्यवती त्याला कन्या नामें मनोरमा आहे ।
जी 'पूर्णचन्द्रवदना' राणीपासून जन्मली पाहे ॥ २ ॥
नव तारुण्य तिचें नृप बघुनि व्याकुल मनांत बहु झाला ।
वर योग्य कोण हिजला तो शोधावा असें गमे त्याला ॥ ३ ॥
मन्त्रिगणा बोलावुनि मम तनयायोग्य[1] वर असे कोण ।
करिता विचार झाला परि निर्णय जाहला न परिपूर्ण ॥ ४ ॥

[ नारद योग्य वराची माहिती सांगतात. ]

यापरि अनेक जातां दिन चिन्तावश नृपाल कृश झाला ।
कोणे एकेवेळीं श्रीनारद नृपसभेमधें आला ॥ ५ ॥
आदर करून त्याचा सुखासनावरि तयास वैसविलें ।
लोकव्यवहार जया ज्ञात अशा नारदा नृपें म्हटलें ॥ ६ ॥
कन्या मनोरमा मम योग्य तिला वर असेल जो कोण ।
तो सांगावा मजला जाइन चिन्तासमुद्र मी तरुन ॥ ७ ॥
नारद वदले त्याला राजन् युगपुरुष रामचन्द्राचा ।
भ्राता रावणहन्ता लक्ष्मण तो वर सुतेस तव साचा ॥ ८ ॥
उत्तम लक्ष्मी धारण करितो देहीं सुलक्षणेंहि तशीं ।
चक्रें ज्यानें केलें स्ववश जगांत प्रभूत नृपराशि ॥ ९ ॥
त्यालाच योग्य कन्या देइल त्याच्या मनास आनन्द ।
ज्योत्स्ना तडागकुमुदां[2] जैसा वितरी प्रफुल्लताकन्द ॥ १० ॥
यापरि बोलत असतां नारद अतिकुपित जाहले तनय ।
मणिरथ-खगेश्वराचे हरिवेगप्रभृति धरुनि मनिं अनय ॥ ११ ॥

---

१ कन्येला योग्य. २ तळयांतील चन्द्रविकासी कमलांना.

स्वजनविनाशापासुनि झालेलें वैर आठवून मनीं ।
कालाग्निदीप्त झाले वदले तैं नारदास या वचनीं ॥ १२ ॥

[ रत्नरथ राजाचे पुत्र नारदाचा अपमान करितात. ]

बोलावुनि मारावें करून आक्रमण शीघ्र कोपानें ।
ज्याला त्याला कन्या द्या ऐसें विफल नारदा म्हणणें ॥ १३ ॥
बोलून असें किङ्करवर्गें श्रीनारदास अपमानें ।
दूर सभेंतुनि करविति नारद संक्षुब्ध जाहले स्वमनें ॥ १४ ॥
वेगें नभस्तलांतुनि गेले सुरमुनि विनीतनगरास ।
श्रीलक्ष्मणास वदले अपमानजवृत्त धरुनि कोपास ॥ १५ ॥
कन्येचेंही केलें वर्णन जें सोत्कें[1] लक्ष्मणास करी ।
चित्रपटांतिल कन्या जी त्याच्या चित्तलोचनास हरी ॥ १६ ॥

[ लक्ष्मण म्हणाला— नारदर्षे, हा आपला अपमान नसून माझा अपमान आहे व मी त्या दुष्टांना दण्डित करणार आहे. आपण शांत व्हा. ]

त्रैलोक्यसुन्दरींची शोभा एकत्र करुनि निर्मियली ।
जणु ही ऐशी आपण पूर्वी नच केधवाहि पाहियली ॥ १७ ॥
पाहून तीस झाला निश्चललोचन हरि त्रिखण्डेश ।
चिन्ती जरि न मिळे मज होइल मम जन्म विफल धनकोश ॥ १८ ॥
वदला भगवन्ता जो आदर धारण करून हृदयांत ।
माझें आपण केलें गुणकीर्तन तें करी तया कुपित ॥ १९ ॥
त्यांनीं केला अपुला अविनय अपमान तो असह्य मला ।
वाटे त्याचें देइल हा प्रायश्चित्त त्या समस्त खला ॥ २० ॥
पादाकर्षण[2] केलें केला अपराध हा तयें थोर ।
शासन करीन त्यांचें उतरीन धडावरून शीघ्र शिर ॥ २१ ॥
व्हावें शान्त मुनीशा ठेवियला मस्तकींच मम पाय ।
खरदण्ड[3] करिन त्यांना त्याविण मम शान्त चित्त नच होय ॥ २२ ॥
बोलुनि ऐसें क्रोधें सौमित्रि विराधितास बोलावी ।
वदला रत्नपुराला जायाचा मार्ग शीघ्र मज दावी ॥ २३ ॥
तत्काल खेचरेशें विराधितें सकलखचरनृपतीस ।
तीव्राज्ञा लेखांनीं कळवियली याच शीघ्र मदतीस ॥ २४ ॥

---

१ उत्कंठित. २ पाय ओढेंण. ३ कठोर शिक्षा.

माहेन्द्र-विन्ध्य-किष्किन्धादि-पुराधिप वसून सुविमानीं ।
साकेतानगरीमधिं आले लक्ष्मण जिथें महामानी ॥ २५ ॥
नानाखचराधिपवृत लक्ष्मण घेउनि निघे महासेना ।
दिक्पालावृत शचिपतिसम शोभे ज्या सर्वेचि रघुराणा ॥ २६ ॥
तळपत होतीं ज्यांचीं शस्त्रें सूर्यप्रचण्ड-किरणांनीं ।
शुभ्रच्छत्रें शोभित नृप रत्नपुरास पोचले मानी ॥ २७ ॥
परबल आलें जाणुनि मणिरथभूपति समस्त सामन्ता ।
घेऊन रणीं आला पाहुनि ज्या शत्रु करिति मनिं चिन्ता ॥ २८ ॥
येतां क्षणीं तयानें आवेशानें स्वसैन्य घेऊन ।
आक्रमण तीव्र केलें केलें सन्त्रस्त शत्रुवीरगणा ॥ २९ ॥
तरवार चक्र भाले बाण गदापाश आदिशस्त्रगणें ।
उभयहि सैन्यें लढलीं कोणांतहि भासलें न शौर्य उणें ॥ ३० ॥
नभिं वृन्द अप्सरांचा आला घनघोर रण बघायास ।
अद्भुत जेथें दिसलें सुमवृष्टि करी तिथेंच सविशेष ॥ ३१ ॥
अरिसैन्यसागरामधि लक्ष्मण वडवाग्नितुल्यसा दिसला ।
अरिवीरमत्स्यमगरा नष्ट करायास तत्क्षणीं सजला ॥ ३२ ॥
रथवर-तुरङ्ग हत्ती लक्ष्मणवेगा न साहती पळती ।
तृण जेवि वायुवेगा दशदिशांच्या समाश्रया घेती ॥ ३३ ॥
इन्द्रासम शक्ति जया हलधर राघव करी रणक्रीडा ।
कोठें सुग्रीव कुठें कपिलाञ्छन अरिभटास दे पीडा ॥ ३४ ॥
अन्यठिकाणीं देई भामण्डल रणिं अरीस बहु पीडा ।
लाङ्गूलपाणि[2] वदला करा न करुणा अरीस बहु झोडा ॥ ३५ ॥
यापरि या वीरांनीं विजयार्धबलास भग्न जंव केलें ।
खगपति खगासमानचि[3] निजाश्रयाप्रति उडून तंव गेले ॥ ३६ ॥
रत्नरथाचे हरिचित्तवातवेगादि[4] पुत्र पळतांना ।
पाहुनि नारद कलही वदला आतां करा बरें रुदना ॥ ३७ ॥
आहांत मूर्ख तुम्ही लक्ष्मणगुणवर्णना न सहणारे ।
कां पळतां दुष्टांनो तुमच्या वारें निघे गुदद्वारें ॥ ३८ ॥

---

१ अतिशय अभिमानी. २ मारुति. ३ पक्ष्यांप्रमाणें. ४ हरिवेग, चित्तवेग, वातवेग या नांवाचे पुत्र.

वीरांनो ! या उद्धत रत्नरथाच्या अनेक पुत्रगणा ।
पकडा बांधुनि घाला करा न यांच्यावरी तुम्ही करुणा ॥ ३९ ॥
केला होता माझा तुम्ही पराभव खरे तुम्ही वीर ।
वेगें पळा नसे या जगांत तुमच्यासमान कुणि धीर ॥ ४० ॥
यापरि नारद वदतां जय ज्यांनीं मिळविला असे सुभट ।
पकडावयास गेले त्यांची नच सोडिली तयें पाठ ॥ ४१ ॥
आले अतिशय संनिध तेव्हां तत्पुत्र निर्भयी बनले ।
व्यर्थचि या दुष्टांनीं श्रीमन्नारदमुनीस कीं छळिलें ॥ ४२ ॥

[ मनोरमा अश्वावर बसून रणांगणावर आली व तिनें लक्ष्मणास वरिलें. ]

इतुक्यांत रत्नभूता मनोरमा कन्यका तिथें आली ।
होत्या बरोबर तिच्या प्राणप्रियशा अनेक शत आली ॥ ४३ ॥
अश्वरथारूढा ती होऊन प्रेमविवश तैं गेली ।
सौमित्रीच्या संनिध इन्द्रासंनिध जशी शची घाली ॥ ४४ ॥

चन्द्रकान्त जाति—

देहधारिणी प्रसन्नता जणु अशा बघून तिला ।
प्रशान्त झाला लक्ष्मण गेला क्रोधहि विलयाला ॥ ४५ ॥
रत्नरथानें सर्वसुतासह सोडुनि मानास ।
भेट अर्पिली धरून हृदयीं विमलप्रेमास ॥ ४६ ॥
सिंह नि गरुड ध्वजीं विराजति ज्यांच्या वन्दून ।
राम-लक्ष्मणा हर्ष पावले पुत्र-पिता जाण ॥ ४७ ॥
देश काल विधि जाणुनि निजपरबलास ओळखुनि ।
वागे जो नर त्याचें होतें सुहित सदा भुवनीं ॥ ४८ ॥
इतुक्यामध्यें नारद येउनि महाजनीं हसुनी ।
वदला राजन् ! गर्वमहाचलि पडला तव अशनि ॥ ४९ ॥
आतां नच मज गमसि रत्नरथ न गर्वपर्वतही ।
नारायणपदसेवक ऐसा अन्यचि नृप पाही ॥ ५० ॥

[ नारदाचें मनाला टोचणारें भाषण. ]

१ मैत्रिणी २ वज्र.

बोलुनि ऐसें नारद हसला टाळ्या वाजवुनी ।
रत्नरथाच्या पोरांनो द्या गर्वातें त्यजुनी ॥ ५१ ॥
स्वगृहीं उद्धत चेष्टा तुमची पडे न उपयोगी ।
कटुक तियेचें फल उपभोगा खलजनसंसर्गी[1] ॥ ५२ ॥
यापरि नारद वदतां वदले मणिरथतनय तया ।
कोपें तुमच्या महानरांचा[2] प्रसंग ये उदया ॥ ५३ ॥
जो अतिदुर्लभ इतरां होता आम्हा तो सुलभ ।
झाला पुण्योदयें नराचें हो न कधीं अशुभ ॥ ५४ ॥
नर्मोक्तीतें[3] यापरि बोलुनि सगळे नगरांत ।
अतुल्यविभवें शिरवत गेले रामादि त्वरित ॥ ५५ ॥
श्रीदाम नामा तनया खगेशें । रामा दिली जी रतितुल्य हर्षे ।
संयोग रामास हिचा जहाला । आनन्ददात्री रमवी मनाला ॥ ५६ ॥
सुदर्शनें रावणनाश केला । सुन्याय तेणें रमवी मनाला ।
मनोरमा रत्नरथें हरीला । दिली जियेची सुख देइ लीला ॥ ५७ ॥
पुण्यप्रभावें अरिमित्र होती । अनर्घ्य रत्नें पदरांत येतीं ।
तें पुण्य लाभें जिनदास होतां । क्रमें क्रमें मोक्ष हि येइ हातां ॥ ५८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे मनोरमालम्भाभिधानं नाम त्रिनवतितमं पर्व ॥ ९३ ॥

१ दुष्ट लोकांच्या संगतीनें युक्त. २ राम-लक्ष्मणांचा. ३ थट्टेचीं बोलणीं.

## चौऱ्याण्णवाव्या पर्वातील कथेचा सारांश.

विजयार्ध पर्वतावरील दक्षिणश्रेणीच्या सर्व विद्याधर राजांना लक्ष्मणानें जिंकून आज्ञाधारक केलें. या विद्याधर राजांच्या कांहीं राजधान्यांचीं नांवें अशीं होतीं. रविनिभ, वह्निप्रभ, काञ्चन, शिवमन्दिर, मेघपुर, गन्धर्वगीत, लक्ष्मीधर, जीमूतशेखर, किन्नरगीत, नरगीत, चक्रवाल, रथनूपुर, बहुरव, मलय, रथनूपुर, श्रीगुह, रिपुञ्जय, भास्कर, शशिकान्त, गान्धारमलय, ज्योतिःपुर, भद्र, यक्षपुर, सिंहस्थान, मनोज्ञश्री, विजयस्थन, तिलक वगैरे. हीं नगरें लक्ष्मणानें जिंकून सर्वांना वश केलें. लक्ष्मण त्रिखंडाधीश झाला. त्याला दिव्यचक्र, छत्र, धनुष्य, शक्ति, गदा, खड्ग व चूडामणि अशीं देवरक्षित रत्नें प्राप्त झालीं.

लक्ष्मणाला अत्यंत सुंदर कुलीन अशा सतराहजार राण्या होत्या. त्याला आठ पट्टराण्या होत्या. त्यांचीं नांवें :— विशल्या, रूपवती, वसंतमाला, कल्याणमाला, रतिमाला, जितपद्मा, भगवती व मनोरमा. रामचंद्रांला आठहजार स्त्रिया होत्या. त्यांत सीता, प्रभावती, रतिनिभा व श्रीदामा या चार पट्टराण्या होत्या.

नारायणाला— लक्ष्मणाला अडीचशे पुत्र होते. त्यापैकीं कांहींचीं नांवें :— वृषभ, धरण, मकरध्वज, धारण, हरिनाग, मदन, अच्युत, शरभ, श्रीधर व चंद्र.

लक्ष्मणापासून विशल्येला श्रीधर नामक पुत्र झाला. लक्ष्मण व रूपवती यांना पृथिवीतिलक नांवाचा पुत्र. कल्याणमालेला सुमंगलपुत्र, जितपद्मा व लक्ष्मण यांना विमलप्रभ. वनमालेला अर्जुनवृक्ष, भगवतीला सत्यकीर्ति. मनोरमेला सुपार्श्वकीर्ति हे सर्व पुत्र शस्त्र व शास्त्रविद्येंत निपुण होते. सर्व कुमार साडेचार कोटिसंख्येचे होते.

सोळाहजार मुकुटबद्ध राजे राम व लक्ष्मणांना नमस्कार करीत असत. हे राम-लक्ष्मण त्याकालीं युगपुरुष म्हणून प्रसिद्ध मानले जात असत. जिनभक्ति करून ते सुखानें राज्य चालवीत होते.

# पंचाणवव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

एकेवेळीं सीता स्वर्गविमानाप्रमाणें सुंदर अशा महालांत सुंदर रत्नजडित पलंगावर झोपली असतां पहाटेच्यावेळीं तिला स्वप्नें पडलीं. नंतर ती मञ्जुलवाद्यांच्या शब्दांनीं जागी होऊन प्रातःकालीं स्नान जिनपूजनादि कार्ये करून आपल्या मैत्रिणींना बरोबर घेऊन रामचंद्रांच्या सभागृहांत गेली.

तिनें मला पहाटेच्यावेळीं पडलेल्या स्वप्नांचा खुलासा सांगा म्हणून विनंति केली व स्वप्नें याप्रमाणें सांगितलीं :— नाथ! माझ्या मुखांत मधुरगर्जना करणाऱ्या दोन बलिष्ठशरभांनीं प्रवेश केला. व नंतर पुष्पकविमानाच्या पृष्ठभागावरून मी जमिनीवर पडल्ये. माझें मन दुसऱ्या स्वप्नानें खिन्न झालें.

रामचंद्र म्हणाले— प्रिये, तुला महापराक्रमी दोन पुत्र होतील हे प्रथमस्वप्नाचें फल आहे. व तें चांगलें आहे. पण दुसऱ्या स्वप्नाचें फल अनिष्ट आहे. तरी मनांत तूं शांतता धर. जिनपूजा दान वगैरे कार्ये कर म्हणजे या अनिष्ट स्वप्नाचा परिहार होईल. यानंतर भूतलावर वसंतऋतूचें आगमन झालें. कोकिळ आम्रमञ्जरी भक्षून कुहूकुहू शब्द करूं लागले. आधींच स्वभावतः सुंदर असलेलें महेंद्रोदय उद्यान वसंतागमनानें फारच सुंदर दिसूं लागलें. लोक सरोवरांत जलक्रीडा करूं लागले वृक्ष पुष्पांनीं लकडले. वेलींना कोवळी पानें फुटून त्या सुंदर दिसूं लागल्या. हंस, सारस, कुररपक्षी मधुर शब्द करूं लागले. तें पाहून जणु ते मधुर काव्यें रचीत असल्याप्रमाणें लोकांना वाटलें.

त्यावेळीं गर्भभारानें सीतेचा देह थोडासा शिथिल आणि कृश झाला. सीतेला पाहून हंसून रामचंद्रांनीं म्हटलें— प्रिये, तुला कोणकोणते डोहाळे झाले आहेत मला सांग म्हणजे ते मी पूर्ण करीन. सीता म्हणाली— नाथ, मला पुष्कळ जिनमंदिरांचें दर्शन घ्यावें, वंदन करावें व पूजन करावें अशी इच्छा झाली आहे ती आपण पूर्ण करावी. सुवर्णरत्नें ज्यांना जडविलीं आहेत अशा पुष्पांनीं जिनपूजा करावी असें वाटतें. हे डोहाळे ऐकून राम आनंदित झाले. त्यांनीं सचिवांना कळविलें.

अयोध्येंतील सर्व जिनमंदिरें व महेंद्रोदय उपवनांतील जिनमंदिरें तोरणादिकांनीं भूषित करवा. मी तेथें जाऊन सीतेसह पूजा करणार आहे. रामाशेला अनुसरून सर्व जिनमंदिरें अतिशय सुशोभित केल्यानंतर रामचंद्र व लक्ष्मण, सीता, विशल्या आदिक पत्नीसह महेंद्रोदय उपवनांत गेले.

तेथील सरोवरांत रामचंद्रांनीं स्नान केलें व जिनमंदिरांत जिनबिम्बांची सीता वगैरे आठहजार राण्यासह मोठ्या वैभवानें व भक्तीनें अभिषेक पूजा वगैरे कार्यें केलीं. जिनपूजन करून सीतादेवीला मोठा हर्ष वाटला. कांहीं दिवस तेथेंच राहून रामचंद्र जिनभक्तीनें सीतेसह पूजन करूं लागले. या कार्यांत या दंपतीना फार आनन्द वाटला.

# चौऱ्याण्णवावें पर्व.

( लक्ष्मणाचा दक्षिणविजयार्ध दिग्विजय. )

विजयार्ध-दक्षिणेच्या श्रेणीचे खचर सर्व जिंकून ।
सौमित्रीनें केलें वश तत्पदकमलिं जाहले लीन ॥ १ ॥
होते महाविषारी दुःसह सर्पासमान खचरगण ।
शौर्यविषातें त्यागुनि झाले श्रीरामचरणसंलीन ॥ २ ॥
विद्याधरराजांच्या नगरी ज्या सुरपुरीस लाजविती ।
नांवें त्यांचीं कथितों ऐकावीं आगमांत जीं असतीं ॥ ३ ॥
पुर ' रविनभ ' नांवाचें वह्निप्रभ हें असे दुजें नगर ।
काञ्चन शुभपुर हें द्वय शिवमन्दिर मेघ जें असे थोर ॥ ४ ॥
गन्धर्वगीत सप्तम अमृत नि लक्ष्मीधराख्य पुर पाहे ।
जीमूतशेखराभिध, जें किन्नरगीतनगर मन मोहे ॥ ५ ॥
नरगीत चक्र आणिक रथनूपुर बहुरवाख्य मलय वसे ।
श्रीगुह रिपुञ्जयाभिध भास्कर शशिकान्ति नगर बहु विलसे ॥ ६ ॥
गान्धारमलय नामक, ज्योतिःपुर भद्र यक्षपुर रम्य ।
सिंहस्थान मनोज्ञश्री विजयस्वन नि तिलक जें काम्य ॥ ७ ॥
यापरि पुष्कळ नगरें वश केलीं लक्ष्मणें महावीरें ।
धरणी जिंकुनि हरिपद मेळविलें सर्वमान्य बहु धीरें ॥ ८ ॥

( लक्ष्मणास दिव्य सात रत्नें प्राप्त झालीं. व त्यास सतराहजार
कुलीन राण्या होत्या व आठ पट्टराण्या होत्या. )

चक्र च्छत्र धनुष्य नि शक्ति गदा खड्ग शीर्षरत्न[१] तसें ।
जीं दिव्य सात रत्नें त्यांनीं लक्ष्मण अतीव शोभतसे ॥ ९ ॥
श्रीलक्ष्मणास होत्या सुकुलज नारी सहस्र दश सप्त[२] ।
सुरललनासम ज्यांचें रूप नि ज्या शीलसद्गुणांत रत ॥ १० ॥
कीर्ति-श्रीरति जैशा स्त्रीवृन्दीं शोभती अशा नारी ।
आठ महादेवीपदिं गुणशीलकलावती नि सौख्यसरी ॥ ११ ॥

---

१ चूडामणि. २ सतरा हजार.

श्रीद्रोणमेघकन्या नाम विशल्या नि शल्य जी रतिसं[1] ।
प्रथम महादेवी ती हरिच्या जी योग्य सर्वदा रतिस[2] ॥ १२ ॥
रूपवती ती दुसरी रूप तिच्यासारखें न अन्यांचें ।
प्रतिरूपविवर्जित ती जीवन असतें असेंचि धन्यांचें ॥ १३ ॥
तिसरी वसन्तमाला वसंन्तशोभाचि मूर्तिमन्त दुजी ।
हितकर[3]माला चौथी, कल्याणगुणा हरींत जी राजी ॥ १४ ॥
रतिसम रूपवती जी रतिमाला पांचवी महाराणी ।
पद्मेस जिंकिते जी जितपद्मा साहवी सुसुखखाणी ॥ १५ ॥
ती सातवी भगवती मनोरमा हरिमनास जी रमवी ।
या आठ अग्रपत्नी हरिच्या तेजें चि तुच्छ होय रवि ॥ १६ ॥

( रामचंद्रास आठ हजार राण्या व सीता वगैरे चार महाराण्या होत्या.)

होत्या आठहजार स्त्रिया रमातुल्य रम्य रामास ।
चार महादेवी ज्या भोगी त्यासह विशाल शर्मास ॥ १७ ॥
अत्यन्त प्रिय पहिली नांव जिचें जानकी सती सीता ।
दुसरी प्रभावशाली प्रभावती मलविहीन शीलयुता ॥ १८ ॥
रतितुल्य म्हणुनि सार्थक नाम जिचें 'रतिनिभा' असे साचें ।
ती तिसरी, श्रीदामा रमाचि जणु बोलतात कवि वाचें ॥ १९ ॥
तारागणांत जैशी चन्द्रकला शोभते तशी सीता ।
निरुपम शोभे राज्ञीगणीं करी हर्षयुक्त रघुचित्ता ॥ २० ॥
नारायणास होते अडीचशे पुत्र वीर गुणवन्त ।
नांवें त्यांचीं कांहीं कथिती श्रीश्रेणिकास भगवन्त ॥ २१ ॥
वृषभ, धरण, मकरध्वज, धारण, हरिनाग, मदन, अच्युत हे ।
शरभ, श्रीधर, चन्द्र नि पराक्रमी जनकतुल्य वा पाहे ॥ २२ ॥
श्रीलक्ष्मण नि विशल्या यांचा 'श्रीधर' सुपुत्र हा पहिला ।
साकेतापुरिं शोभे नभिं चन्द्र जसा तसा जना गमला ॥ २३ ॥
लक्ष्मण रूपवती या उभया सुत जाहला गुणी थोर ।
'पृथ्वीतिलक' सुनामा शत्रुजनांना कृतान्तसा क्रूर ॥ २४ ॥

---

१ रतिदेवीला जी शल्याप्रमाणें दुःखदायक. २ संभोगास. ३ कल्याणमाला गौतमगणधर.

कल्याणमालिकेला कल्याणाचें सुपात्र सुत झाला ।
'मङ्गल' नांव जयाचें मङ्गलकार्यांत जो सदा रमला ॥ २५ ॥
पद्मावतीस झाला 'विमलप्रभ' सुत यशःप्रभा ज्याची ।
चन्द्रासमान पसरे प्रजाजनांना प्रमोददा साची ॥ २६ ॥
वनमालेला झाला 'अर्जुनवृक्षाख्य' तनय गुणवन्त ।
अतिवीर्याची कन्या प्रसवे केशीसुतास धीमन्त ॥ २७ ॥
सुत भगवतीस झाला सत्त्वगुणी 'सत्यकीर्ति' नांवाचा ।
झाला मनोरमेला सुपार्श्वकीर्त्याख्य विपुलविभवाचा ॥ २८ ॥
हे पुत्र सर्वशस्त्रीं तथैव शास्त्रांत निपुणमति झाले ।
भ्राते नखमांसासम करुनि प्रीतीस सर्वदा रमले ॥ २९ ॥
स्वर्गांत आठ जैसे वसुनामक देव सर्वदा रमती ।
साकेतानगरींत स्वेच्छेनें क्रीडतात चतुरमति ॥ ३० ॥
श्रीराम आणि लक्ष्मण असती मानव युगप्रधान खरे ।
राज्य तयांचें कण्टकरहित नि सौख्यद असे नसे दुसरें ॥ ३१ ॥
सुखपरें[1] या उभयांचे दिन पक्ष नि मास वर्षयुग जाती ।
जाती प्रजाजनांचे सुखांत लेशहि न दुःखसंप्राप्ति ॥ ३२ ॥
पूर्वी पुण्य जयांनीं मेळविलें मन वसे शुभांत सदा ।
जन्मापासुनि त्यांना सुखचि मिळे भोगिती न ते विपदा ॥ ३३ ॥
यापरि कुमार कोटी चार नि कोट्यर्ध नांदती मोदें ।
जणु कामदेव सगळे रूप जयांचें कुणा न सौख्या दे ? ॥ ३४ ॥
सोळा सहस्र राजे मुकुटविभूषितशिरें जया नमिती ।
युगमुख्य[2] नृपति[3]युग ते जिनदास सुखेंचि राज्य चालविती ॥ ३५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे राम-लक्ष्मणविभूतिदर्शनीयाभिधानं नाम चतुर्णवतितमं पर्व ॥ ९४ ॥

---

१ सुखानें युक्त. २ राम-लक्ष्मण राज्य करीत होते ते त्यावेळीं सर्व राजावर हुकमत चालवीत म्हणून त्यांना युगमुख्य म्हणतात. ३ राम व लक्ष्मण.

# पंचाणणावें पर्व.

धर्मार्थकाम यांशीं सम्बन्धित भोग आणि उपभोगीं ।
सीता रामाचे दिन जाती अन्योन्य सतत अनुरागी ॥ १ ॥

चन्द्रकान्त जाति–

स्वर्गविमानासम अति सुन्दर सीता सौधांत ।
शय्येवरती शरद्घनासम मृदु प्रमोदांत ॥ २ ॥
झाली निद्रित पश्चिमयामीं स्वप्ना पाहून ।
जागृत झाली मङ्गलमञ्जुल वाद्या ऐकून ॥ ३ ॥
पहाट अतिशय निर्मल झाली, स्नानादिक करुन ।
ससंशया[1] ती ससखी[2] रामाकडे करी गमन ॥ ४ ॥

[ सीतेनें स्वतःला पडलेल्या स्वप्नाचें फल रामचंद्रांना विचारलें व त्यांनीं तें तिला सांगितलें. ]

नाथा ! स्वप्नीं जें मज दिसलें त्याचा अर्थ कथा ।
संशय तेणें माझा स्वामिन् धरील गमनपंथा[3] ॥ ५ ॥
शरदुडुपतिसम शुभ्र जयांच्या दाढा वदनांत ।
क्षुब्धसमुद्रासमसा घुमला सुशब्द गगनांत ॥ ६ ॥
मानेवरती शुभ्र सटा जे धारण करितात ।
कैलासाच्या शिखरासम जे सुपुष्ट दिसतात ॥ ७ ॥
भूषणमण्डित शरभ[4]द्वय मी स्वप्नीं स्वमुखांत ।
प्रवेशलेले नाथ बघितले मन झालें मुदित ॥ ८ ॥
परि मी पुष्पकयानसुपृष्ठावरुनि तदा पडलें ।
भूमीवरती तेणें माझें विषण्ण मन झालें ॥ ९ ॥
राघव वदले शरभ बघितले प्रिये ! तुवा दोन ।
सुपुत्र होतिल पराक्रमी तुज दोन असे जाण ॥ १० ॥

१ संशययुक्त. २ मैत्रिणीसहित. ३ नाहींसा होईल. ४ अष्टापद नांवाचे प्राणी हे सिंहालाही मारतात.

पुष्पकयानापासुनि पडणें हें नच शुभ वाटे ।
अथवा प्रशमें दानें होतिल दूर ग्रहकाटे ॥ ११ ॥

[ वसन्तऋतूचें वर्णन. ]

वसन्तराणा तिलककंकटा घालुनि अङ्गांत ।
आला हातीं आम्रधनुष्या घेउनि मोदांत ॥ १२ ॥
केसरभात्यामध्यें घालुनि कमलशरा बहुत ।
भुङ्गे गाती भाट जयाची जयस्तुति त्वरित ॥ १३ ॥
मधुरकदम्बक-पुष्पगन्धयुत-वात श्वास धरी ।
शुभ्रमल्लिकापुष्पें जणु अरिगणोपहास करी ॥ १४ ॥
मधुर कोकिलालापें बोले यापरि नृपलीला ।
धरुनी जगतां करीत आकुल वसन्त अवतरला ॥ १५ ॥
वसन्तागमें स्वभावसुन्दर महेन्द्र उद्यान ।
नन्दनसुन्दर झालें भूपें रमणीचें वदन ॥ १६ ॥
वृक्ष लकडले नानापुष्पें पालवल्या वेली ।
दक्षिणवातें नर्तन करिती वसन्तनवकालीं ॥ १७ ॥
सरोवराच्या कांठीं पुरजन जललीला करिती ।
विकसितपुष्पें जणु नयनांनीं मोदें तीं बघतीं ॥ १८ ॥
हंस नि सारस चक्र कुरर जे पक्षी मधुररवें ।
तीरीं विहरति सुजना वाटे रचितीं नव काव्यें ॥ १९ ॥
निर्मलसलिलीं पक्षाघातें तरङ्ग उठतात ।
आनन्दानें सरोवरें जणु सुनृत्य करितात ॥ २० ॥
जग हें जेव्हां व्याप्त वसन्तें केलें कमलांनीं ।
जल, वृक्षांनीं भूतल झालें गगन परागांनीं ॥ २१ ॥
वनस्पतीच्या गुच्छ, गुल्मतरु लता प्रकारांनीं ।
अनुपमशोभा चोहिंकडे ये जगिं रानोरानीं ॥ २२ ॥
ऐशाकालीं गर्भभरानें वैदेही-देह ।
किञ्चित् शिथिल नि कृशहि जहाला तथापि कान्तिगृह ॥ २३ ॥

[ रामचंद्रांना सीता तिला जाहलेले डोहाळे सांगते. ]

१ तिलक वृक्षरूप चिलखत. २ सरोवरें.

पाहुनि सुन्दर सीतादेहा वदला राम तिला ।
डोहाळे तुज कोणकोणते झाले वद मजला ॥ २४ ॥
हसुनी नन्तर सीता वदली कमलमुखी रामा ।
पुष्कळ जिनमन्दिरें वघावीं इच्छा अभिरामा ॥ २५ ॥
त्रैलोक्याला मङ्गल असतीं ऐशा जिनबिम्बां ।
वन्दावें मनि वाटे मजला हे जगदालम्बा ॥ २६ ॥
सुवर्ण-रत्नें जडविलि ज्यांना ऐशा कुसुमांनीं ।
जिना यजावें ऐशी इच्छा माझ्या सतत मनीं ॥ २७ ॥
मजला याविण इच्छा नाहीं नाथा ! पूर्ण करा ।
अभिलाषा ही मजला वाटे समस्त पापहरा ॥ २८ ॥
यापरि ऐकुनि हलधर चित्तीं आनन्दित झाला ।
बोलावुनिया द्वाररक्षका यापरि त्या वदला ॥ २९ ॥

[ रामचंद्रांनीं आपली आज्ञा द्वारपालाच्याद्वारें सचिवांना कळविली. ]

हे कल्याणा जाउनि सचिवासन्निध वद त्यास ।
सर्वजिनालयिं मोठें पूजन करवा सविशेष ॥ ३० ॥
महेन्द्रोदयाभिध उद्यानीं जाउनि तेथील ।
श्रीजिनसदनें करा सुशोभित जी सुकृता मूल ॥ ३१ ॥
रत्नतोरणें ध्वजघण्टांनीं चन्द्रोपक यांनीं ।
सगळ्या अन्यहि उपकरणांनीं सजवा मोदोनी ॥ ३२ ॥
समस्तभूतलि सर्वश्रावकवर्गें हर्षानें ।
श्रीजिनपूजा शीघ्र करावी जी अघनाशा ने ॥ ३३ ॥
जीं निर्वाणक्षेत्रें आणिक तेथिल जिनसदनीं ।
पूजा करवा विस्तृतविभवें आदर धरुनि मनीं ॥ ३४ ॥
मी सीतेचे दोहद सगळे पूर्ण करायास ।
विहरत येइन जिन पूजाया धारुन हर्षास ॥ ३५ ॥
जिनपूजेचा महिमा मोठा जगतां दाखविन ।
सांग असे हे दौवारिक तूं सचिवा जाऊन ॥ ३६ ॥
द्वारावरती अन्या योजुनि त्यानें सांगितलें ।
सचिवा सगळें वृत्त निश्चयें नच कांहीं चुकलें ॥ ३७ ॥

स्वकिङ्करांना घेउनि गेला सचिव महायत्नें ।
सर्वजिनांच्या मन्दिरिं केली शोभा एकमनें ॥ ३८ ॥

[ जिनमंदिरांच्या शोभेचें वर्णन. ]

जिनसदनांच्या द्वारीं जलभृत कुम्भ स्थापियले ।
मालाचन्दनतन्दुलदधिंनीं भूपित त्या केलें ॥ ३९ ॥
सुवर्णभिंतीवरति चित्रपट नाना पसरियले ।
सुपुरुप-साध्वी यांचे सुचरित ज्यामधिं दाखविलें ॥ ४० ॥
अतिशयविमलद्युतिरत्नांचे दर्पण खाम्बास ।
हार वान्धिले खिडक्यामध्यें निर्झर वा हास ॥ ४१ ॥
जेथें अङ्गणिं पंचमण्यांची रङ्गावलि शोभे ।
वाटे विस्मय इन्द्रशरासन येउनि येथ उभें ॥ ४२ ॥
कोठें कोठें लघुघण्टांचा समूह हातांचा ।
होता स्पर्शेहि वाजे सुमधुर रव जणु भृंगांचा ॥ ४३ ॥
प्रेक्षकशाला नाटकशाला आदिविभागांनीं ।
महेन्द्रवन हें शोभे अतिशय नर्तन-गानांनीं ॥ ४४ ॥
यापरि नानावैभव जेथें असें महेन्द्रवन ।
प्रेक्षकहृदया वाटे नन्दनसुन्दर हें विपिन[१] ॥ ४५ ॥

[ राम-लक्ष्मण मोठ्या वैभवानें उद्यानांत जिनपूजा करण्यासाठीं सीता, विशल्या वगैरे राण्यासह गेले. ]

आर्या.

नन्तर इन्द्रासम तो राघव पुरजन नि सकलदेवींना ।
सर्व अमात्यां सीता घेउनि गेला महेन्द्र उद्यांना ॥ ४६ ॥
आरूढ करिवरावरि सीतान्वित रामचन्द्र फार खुले ।
ऐरावतगजपृष्ठीं इन्द्र शचीसह जसा विशेष तुले ॥ ४७ ॥
नारायणहि निघाला विस्तृत-निजवैभवास घेऊन ।
परिवारहि वहु हर्षित हृदयामध्यें समस्त होऊन ॥ ४८ ॥
कदलीगृह[२] अतिमुक्तकमण्डप आदिक मनोहरस्थानीं ।
देवी स्ववैभवासह वसल्या जन अन्य तेहि उद्यानीं ॥ ४९ ॥

---

१ वगीचा. २ केळांच्या दाट झाडांच्या मध्यभागीं असलेलें घर.

श्रीकामदेव[1] उतरुनि राम गजावरुन कमलकासारीं ।
विमलजलीं क्रीडा करि शक्र जसा दुग्धसागरीं विहरी ॥ ५० ॥
क्रीडा करून तेथुनि निघून पुष्पें प्रभूत घेऊन ।
सीतेसह जिनपूजन केलें हृदयांत भक्ति ठेवून ॥ ५१ ॥
अभिराम-राम शोभे कानन लक्ष्मीसमान-ललनांनीं ।
जणु हा वसन्त दुसरा कृतजिनपूजन महेन्द्रउद्यानीं ॥ ५२ ॥
निरुपम-अष्टसहस्र-प्रमाण अनुरक्त-सकल-देवींनीं ।
सुन्दर राघव शोभे चन्द्र जसा नभिं समस्त तारांनीं ॥ ५३ ॥
अमृतान्न-गन्धलेपन-शयनासन-वस्त्र-पुष्प-हारादि ।
रसगन्धरूपशब्दस्पर्शसुखें होय राम आल्हादी ॥ ५४ ॥
प्रतिदिवशीं जिनभवनीं जिनपूजा-वन्दनादिकार्यांत ।
जिनदास राम याची झाली रति तीव्र उचित आर्यांत ॥ ५५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे जिनेन्द्रपूजादोहदाभिधानं नाम पञ्चनवतितमं पर्व ॥ ९५ ॥

---

१ रामचंद्र कामाप्रमाणें सुंदर होते म्हणून त्यांना कामदेव म्हटलें आहे.

# शहाण्णव व सत्याण्णवव्या पर्वांतील कथा.

श्रीरामचंद्र हे सीता वगैरे आपल्या राण्यासह बगीच्यांत राहिले असतां, त्यांचें दर्शन घेण्यासाठीं प्रजाजन आले. द्वारपालानें ही वार्ता रामचंद्रांना सांगितली व सीतेलाही ही वार्ता समजली. त्याचवेळीं तिचा उजवा डोळा लवूं लागला. सीता घाबरली व तिच्या मनांत याप्रमाणें विचार आले. "माझ्या पापोदयानें रावणानें मला हरण करून नेलें व पतिविरहाचें तीव्र दुःख भोगावे लागलें. आतां पुनः माझ्यावर कोणतें संकट ओढवणार हें कळत नाहीं." तिनें आपल्या सपत्नींना माझा उजवा डोळा लवत आहे आणखी कोणतें संकट माझ्यावर येईल हें मला सांगा असें म्हणाल्यावर अनुमतिदेवी म्हणाली– 'बाईसाहेब, पूर्वजन्मीं जें शुभाशुभ कर्म केलेलें असतें तें उदयाला येऊन जीवाला सुखदुःख देतें. तें भोगल्याशिवाय गत्यंतर नसतें.'

गुणमाला नांवाची सवत म्हणाली–'बाई, आपण कांहीं चिंता करूं नये कारण आपणावर श्रीरामचंद्रांचें अतिशय प्रेम आहे यास्तव आपणावर कांहीं संकट येणार नाहीं. व तुमच्यामुळेंच आम्हीही सुखी आहोत– आतां अनिष्टपरिहारार्थ शांतिकर्म, महाजिनपूजा, पात्रदान, याचकांना इच्छित वस्तु देणें अशीं कार्यें करा म्हणजे संकट टळेल.'

सीतेला हें त्याचें म्हणणें पसंत पडलें. तिनें भद्रकलश नामक कोषाध्यक्षास बोलावून म्हटलें– 'सर्व दीन लोकांना ते मागतील त्या वस्तु द्या.' त्यानें त्याप्रमाणें दीन लोकांना इच्छित वस्तु देण्याची घोषणा करून सर्व दीनजनांना संतुष्ट केलें. सर्व जिनमंदिरांत जिनेंद्रांचा महाभिषेक व महापूजा सुरूं झाल्या. प्रजाजनासही जिनपूजा करण्याची आज्ञा केली. व त्याप्रमाणें दान, पूजादिकार्यें चालू झालीं. स्वतः सीतादेवीही पूजनादिकार्यांत गढून गेली. जणू ती जिनशासनदेवता आहे असें लोकांना वाटूं लागलें.

इकडे रामचंद्र सभेंत सिंहासनावर बसले. व प्रजांच्या पुढाऱ्यांचें स्वागत करून त्यांना म्हणाले– बोला, आपण कोणत्या उद्देशानें माझ्याकडे आलेले आहात. रामचंद्रांना पाहून प्रजाग्रणी थोडेसे भ्याले व आम्हाला आपण अभयदान द्यावें म्हणजे आम्ही येण्याचें कारण सांगतो असें म्हणाले. रामचंद्रांनीं त्यांना अभय दिलें. नंतर विजय नांवाच्या पुढाऱ्यानें याप्रमाणें भाषण केलें.

"प्रभो, सर्व प्रजा स्वच्छंदी झाली आहे. दुष्टबलवान् लोक तरुण सुंदर स्त्रियांचें हरण करूं लागले आहेत. कित्येक लोक जनसाहाय्य मिळवून आपल्या साध्वीस्त्रियांना परत आणीत आहेत. लोकांत अनीति वाढत चालली आहे. यास्तव प्रभो, ती नाहीशीं करण्यासाठीं कांहीं आपण उपाय केला पाहिजे म्हणजे प्रजेचें कल्याण होईल."

"हे प्रभो, रावणानें हरण केलेल्या आपल्या पत्नीला– सीतामातेला आपण परत आणिलें आहे तसेंच दुष्टांनीं हरण केलेल्या आमच्या पत्नीला आम्ही आणू असें करण्यांत काय दोष आहे असें म्हणून प्रजा आपणास दोष लावीत आहे याचा आपण विचार करावा. जसा राजा वागतो तशी प्रजाही वागते. प्रभो, प्रजा सर्व निरङ्कुश झाली आहे. यास्तव अशा प्रजेला शासन आपण करावें. हे प्रभो, सीतामातेला परत आणण्याचा दोष आपल्याकडून घडला नसता तर आपलें हें राज्य इन्द्राच्या राज्यासारखें अत्युत्तम झालें असतें."

हें प्रजानायकांचें भाषण ऐकून श्रीरामचंद्रांना जणु आपल्या मस्तकावर शेकडो वज्राघात होत आहेत असें वाटलें. "दुष्ट रावणाच्या घरीं राहिलेल्या सीतेला मी परत आणिलें हें गैर झालें. यामुळें माझें कुल कलङ्कित झालें. सीता ही लोकनिंद्य झाली. मी तिला घरीं आणिलें हें योग्य झालें नाहीं. पण सीता ही सर्वगुणांची राजधानी आहे. तिचा त्याग मी केला तर मला फार दुःख होईल."

"जननिंदा ही मला एकीकडे खेचीत आहे व एकीकडे सीता मला ओढीत आहे. तिचा स्नेह मला सोडणें शक्य वाटत नाहीं" असा विचार करून रामचंद्र सचिन्त व खिन्न झाले.

अयोध्येतील प्रजेच्या पुढाऱ्यांचें भाषण ऐकून रामचंद्रानें आपल्या मनांत सीतेचा त्याग करण्याचा निश्चय केला व द्वारपालाला लक्ष्मणास बोलावून आण अशी आज्ञा केली.

द्वारपालानें आपलें स्मरण रामचंद्रमहाराज करीत आहेत आपण शीघ्र यावें असें लक्ष्मणास म्हटलें. तत्काल वेगवान् घोड्यावर बसून लक्ष्मण सभेंत आल्यावर त्यास रामचंद्रांनीं आपल्या अर्धासनावर बसवून याप्रमाणें बोलावयास प्रारंभ केला.

"प्रजाजनांनीं सीतेवर अपवादाचा आरोप केला आहे. अर्थात् रावणाच्या घरीं राहिलेल्या सीतेला रामचंद्रांनीं आणिलें हें योग्य झालें नाहीं व प्रजाही स्वच्छंदी झाली आहे. कांहीं दुष्ट लोक परस्त्रियांचें हरण करून आपल्या घरीं आणून ठेवीत आहेत. कांहीं बलवान् लोक आपल्या हरण केलेल्या साध्वी स्त्रियांना परत आणतात. पण कांहीं दुर्बल पुरुष आपल्या स्त्रिया परत आणण्यास समर्थ नाहींत असा अन्याय प्रजाजनांत वाढत आहे. याचा आपण विचार करावा असें कांहीं प्रजाग्रणी मला सांगत आहेत. यास्तव सीतेचा मी त्याग करावा असें त्यांचें म्हणणें आहे."

हें रामचंद्राचें भाषण ऐकून लक्ष्मण कोपानें लालबुंद होऊन म्हणाला– "पवित्र सीतादेवीवर असा अपवाद घेणाऱ्या लोकांना कडक शासन केलें पाहिजे. सीतासती शीलानें भूषित व सद्गुणी आहे. अशा सतीचा जे द्वेष करितात त्यांना ठार मारलें पाहिजे. त्यांच्यावर दया करणें बिलकुल उपयोगाचें नाहीं." हें लक्ष्मणभाषण ऐकून रामचंद्र याप्रमाणें बोलले– "वत्सा लक्ष्मणा, आपला वंश अत्यंत पवित्र आहे. या वंशांत ऋषभादि तीर्थंकर, भरतादिक चक्रवर्ती व अर्ककीर्ति आदिक राजे होऊन गेले. त्यांच्या यशानें ही सर्व धरा धवलित झाली आहे. अशा यशःशुभ्रवंशाला मलिनपणा येऊं नये म्हणून मी सीतेचा त्याग करणार आहे. सीता पवित्र आहे हें माझें मन मला सांगत आहे. पण तिच्या स्वीकारानें आपल्या निर्मल वंशरूपी उद्यानाला अकीर्तिरूपी अग्नि जाळून भस्म करील म्हणून तिचा मी त्याग करावा असा निश्चय केला आहे. मला सीतेपेक्षा वंशाचा निर्मलपणा अधिक प्रिय आहे. व तो टिकविण्यासाठीं मी सीतेचा त्याग करावयाचा विचार केला आहे."

लक्ष्मण म्हणाला– "प्रभो, सती सीतादेवीचा त्याग करून तिला दुःखी करणें हें बिलकुल योग्य नाहीं. लोक दुष्ट असतात. त्यांनीं कोण्या सद्गुणी पुरुषाला व स्त्रीला नांवें ठेविली नाहींत? विषानें दूषितनेत्र झालेल्या लोकांना चन्द्र शुभ्र असला तरी काळा दिसतो. सद्गुण सहन न झाल्यामुळें दुर्जन सद्गुणी लोकांना नांवें ठेवतात. हत्तीला पाहून कुत्रे भुंकतात म्हणून हत्तीच्या मनांत कांहीं क्षोभ उत्पन्न होतो काय?"

यानंतर रामचंद्र म्हणाले— "वत्सा लक्ष्मणा, ज्याच्या जीवनाला अपवादाचा डाग लागला आहे त्याला त्या जीवनापासून कसें सुख प्राप्त होणार? रावणाच्या घरीं पुष्कळ दिवस राहिलेल्या सीतेला मी पुनः घरीं आणिलें. हें माझें कृत्य अयोग्य झालें असें मला वाटतें. रावणानें दुष्टदृष्टीनें तिला वारंवार पाहिलेलें आहे अशा सीतेला मी घरीं आणिलें ही मी चूक केली. व मी आतां तिचा त्याग करीन." यावर लक्ष्मणानें म्हटलें— "प्रभो, रावणानें सदोष दृष्टीनें पाहिलें म्हणून सीतामाता कांहीं त्याज्य होत नाहीं. जिनदेवाला पुष्पादिक अर्पण केलेले सर्व लोक पाहतात म्हणून जिनप्रभु सदोष होतात काय? हे प्रभो, आपण सीतामातेचा त्याग करूं नये. पुनः दुसरें असें कीं त्या गर्भवती आहेत. आपण त्यांचा त्याग केल्यावर त्या एकट्याच घोर वनांत कशा जिवंत राहतील याचा विचार करा. त्या निर्दोष आहेत. आपल्यावर त्यांचें अनन्य प्रेम आहे. शील हेंच त्यांचें धन आहे. आपण त्यांचा त्याग करूं नये."

हें लक्ष्मणाचें भाषण ऐकून रामचंद्र अतिशय अप्रसन्न झाले व हें माझें सीतात्यागाचें कार्य चांगलें असो वा वाईट असो तें मी करणारच असें म्हणून त्यांनीं कृतांतवक्राला म्हटलें— "कृतांतवक्रा, रथ सज्ज करून आण व सम्मेदादितीर्थ दर्शनाच्या डोहाळयाच्या निमित्तानें सीतादेवीला 'सिंहरवा' नामक जंगलांत सोडून ये. या माझ्या आज्ञेचें उल्लंघन होता कामा नये." कृतांतवक्रानें प्रभूची आज्ञा कष्टानें मान्य केली. व रथ सीतादेवीच्या महालाकडे नेला. त्यानें सीतादेवीला म्हटलें— देवी, आपणास तीर्थक्षेत्रांचें दर्शन करविण्यासाठीं मला प्रभूंनीं आज्ञा केली आहे व मी रथ सज्ज करून आपल्या दारीं आणिला आहे. आपण चलावें. सीतादेवीला आनंद झाला. ती सर्वांचें व पति रामचंद्राचें शुभ इच्छून रथांत बसली. बाणाच्या वेगाप्रमाणें रथ वेगानें जाऊं लागला. वाटेंत तिला कांहीं अपशकुनें झाली पण तिनें तिकडे लक्ष दिलें नाहीं. अनेक गांवें व नगरें उल्लंघून रथ सिंहरवा अटवींत जाऊन पोहोंचला. तिथें रथ थांबविला. कृतांतवक्राचें अंतःकरण दयाळू होतें. त्याच्या डोळयांतून अश्रु वाहूं लागले. कृतांतवक्र रडत आहे हें पाहून सीतेला आश्चर्य वाटलें. ती म्हणाली— आपण तीर्थयात्रेसाठीं आलों आहोत या हर्षसमयीं तूं रडत आहेस हें मला आश्चर्यकारक वाटत आहे.

कृतांतवक्रानें आपले अश्रु आवरून म्हटलें— "मातोश्री, आपणाविषयीं प्रजाजनांनीं अपवाद घेतल्यामुळें आपणास या घोरवनांत सोडून ये अशी महाराजांनीं मला आज्ञा केली. या कार्यापासून परावृत्त करण्यासाठीं लक्ष्मणप्रभूंनीं पुष्कळ विरोध

केला पण महाराजांनीं त्यांचा विरोध जुमानला नाहीं व आपणास या वनांत सोडून येण्याविषयीं मला सांगितलें." हें त्याचें भाषण ऐकल्याबरोबर वज्राघात झाल्याप्रमाणें सीतादेवीला वाटलें व ती जमिनीवर मूर्च्छित होऊन पडली. कांहीं वेळानें सावध झाली. तिनें आपलें मन दृढ केलें व पतिदेवाला माझा याप्रमाणें निरोप सांग असें म्हणाली—

"प्रभो, आपण माझा त्याग लोकांनीं केलेल्या अपवादामुळें केला तसा सम्यग्दर्शनाचा करूं नका. सम्यग्दर्शन हें साम्राज्यापेक्षा श्रेष्ठ आहे. साम्राज्यानें अधोगति प्राप्त होईल पण सम्यग्दर्शनानें ती कदापि होणार नाहीं. त्यानें स्वर्ग व मोक्ष प्राप्त होतात. स्वजनांना प्रीतीनें संतुष्ट करा. अतिथींना आहारादिक दानें द्या. क्षमा धारण करून कोप कमी करा. साधुजनांना वंदून त्यांचें पूजन करा. आपण चतुर व धीमान् आहा. आपल्याविषयींच्या प्रेमानें मी हा निरोप पाठवीत आहे. मी केव्हां आपला परिहास किंवा अविनय केला असेन आपण तो ध्यानांत न घेतां प्रसन्न व्हावें" याप्रमाणें बोलून ती पुनः मूर्च्छित झाली. इकडे कृतांतवक्र रथ घेऊन अयोध्येस निघून गेला.

सावध होऊन सीता शोक करूं लागली. पूर्वजन्मीं मी पतिविरह होण्यासारखें अकार्य केलें असेन त्यामुळें मला हें विरहदुःख भोगावें लागत आहे. जें अशुभकर्म केलेलें असतें त्याचें फल भोगलें पाहिजे.

याप्रमाणें शोक करीत असता त्या वनांत वज्रजंघ— पुण्डरीक नगराचा राजा सैनिकासह आला होता. सैनिकांनीं तिचें रडणें ऐकिलें व ते तिच्याजवळ आले. राजा वज्रजंघही तेथें आला व त्यानें तिला आपली वडील बहीण मानून आपल्या नगरास नेलें. अशी कथा पुढीलपर्वांत पाहावी.

# शहाण्णवावें पर्व.

उद्यानीं कांहीं दिनिं राघव शुभचित्त राहिला असतां ।
आली प्रजा बघाया मनांत झाली तियेस बहु तृषिता ॥ १ ॥
येउनि कथिलें तेव्हां श्रीरामा द्वाररक्षकें नाथ ।
आली प्रजा बघाया अपुली आज्ञा मला कथा उचित ॥ २ ॥
( सीतेचा उजवा डोळा लवूं लागला तेव्हां ती घाबरली व
आपल्या इतर सवतींना याचें काय फल मिळेल असें विचारलें.)
येणें प्रजाजनाचें परम्परें जानकीसही कळलें ।
दक्षिणनेत्रस्पन्दन अनिष्टसूचक तदा तिला घडलें ॥ ३ ॥
वैदेही मनिं चिन्ती नेत्राधःस्पन्द दुःख हा सुचवी ।
हें पापकर्म देतें फल जें त्या देवही न कीं चुकवी ॥ ४ ॥
मज या अघकर्मानें सागरिं नेऊन दुःख बहुत दिलें ।
सन्तुष्ट तेवढ्यानें नच हें आतां असें मला कळलें ॥ ५ ॥
प्राण्यांनीं जीं कर्में केलीं फल उचित लाभतें त्यांना ।
निष्फल न निघुनि जातीं शक्य निवारण न वाटतें कवणा ॥ ६ ॥
पसरून शुभ्रकिरणें जणु चन्द्र नभांत शुभ्रवस्त्र करी ।
निजकर्तव्या पाळी तथापि आघात कर्म दे तद्धुरीं ॥ ७ ॥
देवीनो मज सांगा आपण आहात आगमज्ञानी ।
मम नेत्राधःस्पन्दनफल पूर्वापर विचार करुनि मनीं ॥ ८ ॥
( अनुमतिदेवी असें बोलली. )
अनुमति नामक देवी जी या विषयांत कोविदा होती ।
विधि वेगळा न कोणी वदली कर्मास सुज्ञ विधि म्हणती ॥ ९ ॥
जें कर्म पूर्वनिर्मित मलकट वा शुभ्र त्यास हीं नांवें ।
दैव कृतान्त नि ईश्वर विधि दिष्ट नि भागधेय बोलावें ॥ १० ॥
दैवेंचि मला ऐशी दिली अवस्था नि येथ आणियलें ।
याहुनि दुसरें कारण वदणें अज्ञान बोलतात भले ॥ ११ ॥

---

१ उत्कण्ठित. २ उजव्या डोळयाचा खालचा भाग लवणें. ३ जाणणारी. ४ पाप. ५ पुण्य. ६ यम. ७ ब्रह्मदेव. ८–९ नशीब हीं नांवें देवाचीचं आहेत.

( गुणमाला व इतर देवी याप्रमाणें तिला म्हणाल्या. )

गुणदोषज्ञा वदली गुणमाला शोकयुक्तसीतेस ।
सान्त्वन करावयास्तव देवी तूं व्यर्थ करिशि शोकास ॥ १२ ॥
प्रेम तुझ्यावरि आहे प्राणाहुनि अधिक देवि देवाचें ।
करुणा तुझीच मिळवुनि झालें जीवित सुखी सदा अमुचें ॥ १३ ॥
यास्तव मजला वाटे नेत्रस्पन्दन न दुःख देईल ।
हे देवि ! तुला कथिलें माझे सुविचारपूर्व मी बोल ॥ १४ ॥

( जिनाभिषेक व महापूजा ही पापनाशास कारण आहेत
असें इतर राण्या म्हणाल्या. )

देवी इतर म्हणाल्या देवी करणें विचार तूं सोड ।
करि शान्तिकर्म म्हणजे इष्टाची गे मिळेल तुज जोड ॥ १५ ॥
अभिषेक जिनेन्द्रांचे तेवि महापूजनें जिनेशांची ।
इच्छापूरण-दानें कार्यें हीं सर्व अशुभनाशाचीं ॥ १६ ॥
यापरि वचनें ऐकुनि देवींचीं जानकी तया वदली ।
देवीनो जें कथिलें तेणें माझी प्रसन्न मति झाली ॥ १७ ॥
पूजा व्रत तप दान नि अभिषेकादिक सुकार्य हें सगळें ।
अशुभा नाशुनि देतें शुभास वदतात सकल सुज्ञ भले ॥ १८ ॥
दानें विघ्न विनाशें शत्रूंचें वैर नष्ट तें करितें ।
मिळतें पुण्य तयानें चोहिकडे शुभ्रकीर्ति विस्तरते ॥ १९ ॥
यापरि बोलुनि सीता कोषाध्यक्षास भद्रकलशास ।
वदली किमिच्छदाना[1] प्रतिदिवशीं द्या समस्त दीनास ॥ २० ॥
स्वामिनि ! आज्ञा जैशी देइन धन सर्व दीनदुबळ्यांना ।
बोलुनि ऐसें गेला धनाधिकारी स्वकीयशा सदना ॥ २१ ॥
सीता सतीहि जाउनि जिनगृहिं जिनपूजनादिकार्य करी ।
दुःख मनाचें जेणें नाशुनि अशुभास सकल संहारी ॥ २२ ॥
जिनगेहांतुनि सगळ्या वाद्यांचे शब्द जाहले प्रगट ।
शंखध्वनिमिश्रित ते मेघारव तुल्य बोलती सन्त ॥ २३ ॥

---

१ तूं काय इच्छितोस असें विचारून याचकाला त्याच्या इच्छेप्रमाणें ती वस्तु देणें तें किमिच्छादान.

ज्यावरि जिनदेवांचें लिहिलें सुचरित्र चित्रपट ऐसे ।
भिंतीवरी पसरले होती भव्यप्रमोदहेतु दिसे ॥ २४ ॥
दूध दही घृत यांचे आकण्ठ अनेक पूर्ण घट भरले ।
ज्यांनीं स्नान जिनाचें प्रतिदिवशीं आदरें जनें केलें ॥ २५ ॥
सानन्द अङ्ग ज्याचें झाला आरूढ जो गजावरती ।
सितवस्त्र नेसलेला वदला तो कञ्चुकी जनास सती ॥ २६ ॥
दान किमिच्छक देतें सीता सांगा कुणास काय हवें ।
आघोषणा अयोध्येमध्यें ऐशी करीतसे भावें ॥ २७ ॥
यापरि आदरभावें उत्साहें दान तें दिलें गेलें ।
पाळी नाना नियमां वैदेही सन्त वर्णितात खुले ॥ २८ ॥
करवी प्रजाजनांहीं पूजा अभिषेक विमल भावानें ।
पापापासुन झाला गण प्रजेचा निवृत्त समधीनें ॥ २९ ॥
यापरि शुभक्रियारत सीता झाली अतीव शान्तिमती ।
वाटे ही सुजनांना जिनशासनदेवताच काय सती ॥ ३० ॥
इकडे प्रजाजनांना दर्शन देण्या सभेमधें बसला ।
श्रीरामचन्द्र राजा नृपांत इन्द्रासमान तैं दिसला ॥ ३१ ॥

( प्रजेचे पुढारी सभेंत येतात. )

तैं द्वारपालमुक्त प्रजाजनांचा सभाप्रवेश घडे ।
जणु सिंहाच्या स्थानीं आलों वाढुनि तदीय ऊर उडे ॥ ३२ ॥
पूर्वीं न पाहिलीं जीं जीं रत्नें काञ्चनादिकें रचिलीं ।
गंभीर सभा बघुनि प्रजा मनीं फार चञ्चला झाली ॥ ३३ ॥
परि हृदयलोचनांना आल्हादक राघवास पाहून ।
हृष्ट प्रजाजनांनीं नमिला तो दोन हात जोडून ॥ ३४ ॥
पाहून राघवाला देह नि मन कम्प पावलीं त्यांचीं ।
श्रीरामचन्द्र वदले मज आगमहेतुता वदा साची ॥ ३५ ॥
विजय सुराजि नि मधुमान् वसुल नि धर काल काश्यप क्षेम ।
पाहुनि नृपप्रभावा झाले ते गलितधैर्य गतधाम ॥ ३६ ॥

---

१ भव्याच्या आनन्दाला कारण. २ शान्तबुद्धीनें. ३ येण्याचें कारण. ४ निस्तेज, म्लान.

डोळे नि पाय त्यांचे झाले निश्चल नि ताठ चित्र उभे ।
वचन न निघे मुखांतुनि नृपवदनीं हास्य तेधवा शोभे ॥ ३७ ॥
बोलावयास इच्छी यद्यपि मति आमुची न वचन परि ।
वदनगृहांतुनि बाहिर पडतें मति सफलतेस केवि वरी ॥ ३८ ॥
राघव वदले नन्तर सान्त्वनवचनें प्रजाग्रेणी[1] सुजना ।
स्वागत तुमचें जनहो ! कां येणें आपुलें वदा वचना ॥ ३९ ॥
वचन तथापि न कथिती समस्त चेष्टाविहीन जणु चित्रें ।
निष्णातशिल्पिनिर्मित दिसतीं यांचीं न चलितशीं गात्रें ॥ ४० ॥
लज्जापाशें झाला निबद्ध जणु कण्ठ बालकासम ते ।
आकुलचित्त जहाले मृगसम फिरवीत लोचना[2] होते ॥ ४१ ॥

( स्वागतानन्तर प्रजाग्रणीचें भाषण. )

आगतजनांत होता नायक जो चञ्चलाक्षरें वदला ।
बोलेन स्वामिन् मी द्या अभयाचा प्रसाद आम्हाला ॥ ४२ ॥
नृपतिशिरोमणि वदला भय भद्रांनो न बाळगा कांहीं ।
प्रगट करा चित्तांतिल निजार्थ[3] सगळा स्वकीयवचनाहीं ॥ ४३ ॥
त्यागून दोष सगळे जें साधु[4] असेल तेंच घेईन ।
मिश्रजलाला त्यागुनि हंस जसा फक्त करि पयःपान[5] ॥ ४४ ॥
जरि अभय लाभलें त्या तथापि तो विजय हात जोडून ।
स्खलनें[6] मन्दरवानें[7] वदला जणु संकटास समजून ॥ ४५ ॥
हे पद्मनाभराजन् अमुची विज्ञप्ति एक ऐकावी ।
स्वैर प्रजा जहाली लज्जा नच राहिली तिच्या गांवीं ॥ ४६ ॥
स्वाभाविक जन सगळे असती हे नाथ कुटिलवृत्तीचे ।
मिळतां दृष्टान्त तया होउनि ते नग्न नाचती साचे ॥ ४७ ॥
माकड निसर्गतेनें[8] देहीं अतिचपलता सदा धरितें ।
चढलें चञ्चलयन्त्रीं त्याचें चापल्य वर्णवे ना तें ॥ ४८ ॥
रूपवती तरुणींना पुरुषांना अल्पशक्ति जाणून ।
हरिती प्रसङ्ग पाहुनि पापी बलवन्त लाज जन ज्या न ॥ ४९ ॥

---

१ प्रजेचे पुढारी. २ डोळे. ३ आपला अभिप्राय. ४ चांगलें. ५ दूध पिणें. ६ अडखळणें. ७ मन्द आवाजानें. ८ स्वभावतःच.

कोणी अपुल्या साध्वी दुःखी पत्नीस परत घरिं आणी ।
मिळवुनि जनसाहाय्या विरही विरळाचि नाथ मनिं जाणी ॥ ५० ॥
जोवरि मर्यादात्मक धर्म जगाचा प्रणष्ट नच झाला ।
व्हावें हितप्रजेचें जेणें सदुपाय पाहिजे केला ॥ ५१ ॥
हे पद्मनाभ असशी मनुष्यलोकांत तूं महाराज ।
जरि न प्रजेस रक्षिसि नासे राहील केंवि तव लाज ॥ ५२ ॥
उद्यानीं नगरामधिं सभेंत मार्गांत तेंवि गेहांत ।
तव अपवादा गाती जन दुसरी बोलती न ते वात ॥ ५३ ॥
दाशरथी रामानें आहे जो चतुर सर्वशास्त्रांत ।
दशकण्ठानें हरिल्या सीतेला आणिलें स्वगेहांत ॥ ५४ ॥
यापरि कोणी केलें असतां त्याच्यांत दोष लवही न ।
व्यवहारामध्येंही प्रमाण पण्डित न मूर्ख जन कोण ॥ ५५ ॥
राजा जैसें वागे तो जें करि कार्य त्यास अनुसरते ।
त्याची प्रजाहि सगळी जैसा राजा प्रजा तशी असते ॥ ५६ ॥
राजन् ! यापरि दुष्ट प्रजा तुझ्या विपयिं बोलते सतत ।
लोक निरङ्कुश झाले निग्रह त्यांचा नृपा करी त्वरित ॥ ५७ ॥
हा दोष एक झाला नसतां तरि राज्य सकलभूमीचें ।
इन्द्राच्या राज्यासम झालें असतें सदैव सौख्याचें ॥ ५८ ॥
( प्रजाग्रणींचें भाषण ऐकून रामचंद्र सचिंत होऊन विचार करितात.)
ऐकुनि भाषण ऐसें प्रजाग्रणींचें विषण्ण मन झालें ।
श्रीरामाचें शीर्षीं वज्राचें जणु असङ्ख्य घण पडले ॥ ५९ ॥
जें चिन्तिलें मनामधिं त्याहुनि विपरीत लाभलें मजला ।
अपकीर्त्यग्नि यशोऽम्बुज[3] माझें जाळावयास हा सजला ॥ ६० ॥
विरहाचें मी संकट अतिदुःसह सोसिलें प्रियेसाठीं ।
मलिन करी कुलचन्द्रा चन्द्रा मृग जेवि त्याचिया पोटीं ॥ ६१ ॥
गेलों तरून सागर मारियला शत्रुही जिच्यास्तव मी ।
ती कुलदर्पण माझा मलिन करी जानकी नि सुकुल कमी ॥ ६२ ॥
दुष्ट दशग्रीवाच्या सदनीं जी राहिली अशी सीता ।
ती लोकनिन्द्य झाली जनवार्ता ही गमे मला युक्ता ॥ ६३ ॥

---

१ हे रामचंद्रा. २ उद्धत. ३ यशरूपी कमल.

मी आणिलें कशाला तिजला हें कार्य युक्त नच झालें ।
परि तिजविण मी दुःखी मम चित्त तिच्यांत सर्वदा रुतलें ॥ ६४ ॥
दृष्टि पडे जरि नच ती क्षणमात्रहि विरह सह्य नच मज तो ।
अनुरक्त जानकीला त्यागाया मी समर्थ नच होतो ॥ ६५ ॥
मी आणिले जिच्यास्तव साकेतापुरिं अनेक कपिभूप ।
ती गोत्रकमलिनीला[१] माझ्या करि कलुप जेवि घनपाप ॥ ६६ ॥
जी माझ्या नयनीं मनिं निवसन करि सर्वदा न हो दूर ।
जी सुगुणराजधानी तत्त्यागें दुःख होय भरपूर ॥ ६७ ॥
अथवा स्त्रीहृदयाचा थांग जगीं लागला असे कोणा ।
ज्यांच्या ठायीं वसतो काम[२] सदा सर्वदोषगणराणा ॥ ६८ ॥
जी दोपांची खाणी नरहृदया तापदायिनी आहे ।
निर्मल कुलीन पुरुषा जी अघपङ्कांत[३] टाकिते पाहे ॥ ६९ ॥
अवला असुनिहि नारी सर्वबलांचा विनाश करि पाहे ।
आधार रागभावा सत्यविनाशास खोंतिका[४] आहे ॥ ७० ॥
निर्वाणसुख निवारी ज्ञानोत्पत्तीस नाशिते नित्य ।
भस्माच्छादित भासे अग्नि जसा स्त्रीस्वरूप हें सत्य ॥ ७१ ॥
नेत्रास रम्य वाटे नारीचें रूप जेवि जगिं साप ।
भ्रमवी दुर्भविं[५] नारीरूपानें मानवा महापाप ॥ ७२ ॥
त्यागीन जानकीला अपकीर्तित्याग तरिच होईल ।
वदतो मुखेंचि केवल परि माझें मन नसेचि अनुकूल ॥ ७३ ॥
माझें मन वैदेहीस्नेहानें पूर्ण वान्धलें गेलें ।
त्याग तिचा मी करणें हें कार्य असे अशक्यकोटितलें ॥ ७४ ॥
आहे यद्यपि माझें स्थिर मन सीतासमीपता त्यास ।
पघळावयास कारण अग्निज्वाला जशी घनघृतास[६] ॥ ७५ ॥
जरि दूर चन्द्रलेखा कुमुद्वतीला[७] जशी सरीं खुलवी ।
सीता माझ्या निश्चल धैर्यमनोवृत्तिला तशी चळवी ॥ ७६ ॥
जननिन्दा मज ओढी एकेबाजुस जशी तसा ओढी ।
दुस्त्यज सीतास्नेहहि संशयगर्तेंत[८] निश्चयें पाडी ॥ ७७ ॥

---

१ वंशरूपी कमलवेलीला. २ मदन. ३ पातकरूप चिखलांत. ४ खंदक. ५ दुःख देणाऱ्या संसारांत. ६ घट्ट तुपाला. ७ कमलाची वेली. ८ संशयाच्या खड्ड्यांत.

जनपरिवादाचें भय घाबरवी मम मना तसा स्नेह ।
या भय नि स्नेहानें पडला माझ्या मना महामोह ॥ ७८ ॥
स्वर्गांगसुन्दरी ज्या त्याहुनिही श्रेष्ठ सर्वथा सीता ।
त्यागू त्या साध्वीला कैसें माझ्यांत एकलपयुता ॥ ७९ ॥
साक्षात् अपकीर्तिच ही हिजला त्यागू शकेन मी न जरी ।
अत्यन्त दीन माझ्यासमान जगतीं न अन्य कोण तरी ॥ ८० ॥
स्नेहापवाद भय हे मनिं उद्भवून । नानारसात्मक विचाररयांत[1] लीन ।
अत्यंततीव्रपरितापसमाकुळाचा । गेला असे दिवस कष्टद राघवाचा ॥
विचार हे राघवमानसांत विरुद्ध एका दुसरे नितान्त[3] ।
शरीर याचा मन तप्त झालें तेणें तया दीन बघून भ्याले ॥ ८२ ॥
सीताविषयक वार्ता प्रजाग्रणीकथित सकल ऐकून ।
राघव जिनदास मनीं सचिन्त होऊन जाहला खिन्न ॥ ८३ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे पद्मपुराणे जनपरिवादचिन्ताभिधानं नाम षण्णवतितमं पर्व ॥ ९६ ॥

---

१ वेगांत— प्रवाहांत. २ सन्ताप. ३ अत्यन्त.

# सत्याणवावें पर्व.

[ लक्ष्मणाचें सभेंत आगमन. ]

निश्चित केला कांहीं विचार चित्तांत राघवेन्द्रानें ।
श्रीलक्ष्मणास आणी म्हटलें तैं द्वाररक्षका तेणें ॥ १ ॥
वेगें जाउनि कळवी राजेन्द्रा ! स्मरण आपुलें केलें ।
प्रभुवर्यें झणि यावें वरें असें लक्ष्मणें तदा म्हटलें ॥ २ ॥
चञ्चल-अश्वावरती आरोहण करुनि सुत सुमित्रेचा[1] ।
रामासन्निध आला नमून चरणास बोलला वाचा ॥ ३ ॥
वसला सुन्दर भूतलिं राघवचरणांत लक्ष्य ठेवून ।
ज्येष्ठ स्नेहें उठवुनि घेई अर्धासनांत वसवून ॥ ४ ॥
शत्रुघ्नप्रमुख असे नृप चन्द्रोदयसुतादि[2] येऊन ।
वसले सभेंत उचितस्थानीं हलधरपदास वन्दून ॥ ५ ॥
श्रेष्ठि-पुरोहित-मन्त्री योग्यासनिं अन्य सुजनही वसले ।
सर्वांच्या हृदयामधिं कौतुक पाहुनि सभेस उद्भवलें ॥ ६ ॥
क्षणमात्र मौन धारुनि अपवादकथा सुलक्ष्मणा कथिली ।
वलदेवानें[3] तेणें तयांत अतितीव्र कोपिता[4] आली ॥ ७ ॥
वहु लाल नेत्र झाले करा तयारी तुम्ही लढायाची ।
आज्ञा सुभटगणाला देउनि वाक्पङ्क्ति तो वदे साची ॥ ८ ॥

[ लक्ष्मणाचें भाषण. ]

" मी आज खचित दुर्जनसेनासागर तरून जाईन ।
मिथ्यावाक्य वदे जी दुर्जनजिह्वा समस्त तोडीन ॥ ९ ॥
अनुपमशीलालङ्कृत गुणगम्भीरा अशी असे सीता ।
करिती द्वेष तिचा जे त्यांच्या करितो अवश्य मी अन्ता ॥ १० ॥
यापरि बोलुनि लक्ष्मण कोपानें लालबुन्द वहु झाला ।
पाहुनि तया सभेंतिल नृपतींचा गण समस्त मनिं भ्याला ॥ ११ ॥
नारायणवचनांनीं क्षुब्ध नि भययुत सभेस पाहून ।
श्रीरामचन्द्र वदले लक्ष्मणकोपास शमविण्या वचन ॥ १२ ॥

---

१ लक्ष्मण. २ विराध वगैरे राजे. ३ रामचंद्रानें. ४ रागीटपणा.

[ रामचंद्राचें भाषण. ]

ऋषभजिनेन्द्रासम जे भरतेशासम अशा नृपालांनीं ।
पृथ्वी ससागरा ही सुरक्षिली सतत नीतिमन्तांनीं ॥ १३ ॥
आदित्य[1]कीर्ति आदिक झाले इक्ष्वाकुवंशतिलकनृप ।
ज्यांनीं दाखविली न च शत्रुगणा पाठ सकलगुणकूप ॥ १४ ॥
त्या पूर्वज भूपांच्या यशःपटें शुभ्र सकल ही अवनि[2] ।
झाली भूषित राका[3]शशिकिरणांनीं खुले जशी रजनी ॥ १५ ॥
जो नाशवंत आहे ऐशा सीतेवरील रागानें[4] ।
मळवू न इच्छितो मी यशःपटा[5] जेवि कृष्ण डागानें ॥ १६ ॥
अत्यन्त अल्पदेखिल अकीर्ति जरि ती उपेक्षितां वाढे ।
अल्पहि सुकीर्ति मिळवी इन्द्राच्या मानसांत पद गाढें ॥ १७ ॥
उत्तमभोगांचेंही नाशाशीं प्रेम सर्वदा असतें ।
मन त्यांत न लावावें अकीर्तिशी ठेवितात ते नातें ॥ १८ ॥
सुन्दर कीर्त्युद्याना[6] अकीर्तिचा अनल[7] जाळितो जाण ।
स्पर्श तयाचा यास्तव टाळावा वदति सर्व विबुधगण ॥ १९ ॥
शस्त्रें-शास्त्रें यांनीं अपकीर्तीचा विनाश नच होतो ।
युद्ध न उपयोगि असे भटशूरपणाहि विफलता वरितो ॥ २० ॥
सीतादेवी आहे महासती अतिपवित्र चित्ताची ।
अमुच्या गृहांत असुनिहि अकीर्ति आम्हास सर्वदा जाची ॥ २१ ॥
कमलवना जो फुलवी ऐसा अस्तास सूर्य जरि गेला ।
रात्रौ कोण तयाला समर्थ आणावयास नर बोला ॥ २२ ॥
विस्तार जिचा मोठा ऐशी अपवाद[8]-धूळ पसरून ।
छायाविनाश करिते तेव्हां छत्रोपयोग नच जाण ॥ २३ ॥
चन्द्रासमान निर्मलगोत्रा अपकीर्तिमेघपङ्क्तीनें ।
मलिनपणा नच यावा बन्धो ! यास्तव तया सदा जपणें ॥ २४ ॥
शुष्केन्धन[9]वृन्दावरि जलप्रवाहहि नसे अशासमयीं ।
अग्नि पडे जरि कैसा भस्म न होईल जाण हें हृदयीं ॥ २५ ॥

---

१ भरतपुत्र अर्ककीर्ति. २ पृथ्वी. ३ पौर्णिमेचा चन्द्र. ४ प्रेमानें.
५ कीर्तिरूपी वस्त्राला. ६ कीर्तिरूपी बगीचा. ७ अग्नि. ८ निंदा अपकीर्ति.
९ वाळलेल्या लाकडांचा समूह.

तसें अयश जगामधिं पसरुनि वाढे न यत्न तो करणें ।
पावे प्रसार जरि तें मनुजाचें व्यर्थ जाणणें जगणें ।। २६ ।।
श्रेष्ठ असे कुल अपुलें निर्मल उज्ज्वल तया न लागावा ।
दोप न कवणहि ऐसा उपाय वन्धो ! अवश्य साधावा ।। २७ ।।
वैदेही मम आहे निर्दोप नि शीलशालिनी जरिही ।
त्यागीन तिला परि नच करीन कीर्तीस मलिन मी पाही ।। २८ ।।
लोकास सौख्य व्हावें कुल अकलङ्कित सदैव राहावें ।
यास्तव निश्चित केलें अदोपशीलासतीस सोडावें ।। २९ ।।

[ लक्ष्मणाचें रामास प्रत्युत्तर. ]

भ्रातृस्नेहपरायण[१] लक्ष्मण ऐकून वचन रामाचें ।
वदला वैदेहीला सशोक करणें न हें असे साचें ।। ३० ।।
सर्व सतींत शिरोमणि सम्पूर्णपणें अनिन्द्य जी आहे ।
लोकापवादमात्रें त्यजणें न कदापि योग्य हें पाहे ।। ३१ ।।
जे शीलधर महाजन त्यांनाही दुष्ट ठेविती नांवें ।
तेणें त्यांचे होति न शीलादिक गुण विनष्ट मनिं घ्यावें ।। ३२ ।।
विषदूषित नेत्रांना दिसला जरि चन्द्र कृष्ण तो न तसा ।
सोडि न शुभ्रस्वगुणा सीताशीलांत येइ दोष कसा ? ।। ३३ ।।
शीलसमृद्ध जनाचा आत्माचि असे प्रमाण साक्षीच ।
सत्यपणा वास्तवता तीच असे वाह्यहेतु नच साच ।। ३४ ।।
दुष्टाच्या वचनानें क्षोभ न विद्वन्मनांत होत असे ।
भुंके श्वान म्हणोनी गजहृदयीं खिन्नता कधीहि नसे ।। ३५ ।।
लोक विचित्रचि असती चेष्टा[२] ज्यांची जशी तरङ्गाची ।
परदोषकथासक्तचि शिक्षा त्यांना करीन मी साची ।। ३६ ।।
घेऊन शिला स्वकरीं चन्द्रावर मारण्यास जो फेकी ।
स्वयमेव मूर्ख नर तो निःसंशय नाश पावतो लोकीं ।। ३७ ।।
परगुण सहन न होती दोषांच्या कीर्तनांत रत राही ।
तो दुष्कर्मा[३] मानव निश्चित दुर्गति तया प्रिया पाही ।। ३८ ।।

[ रामचंद्राचें भाषण. ]

---

१ बंधुप्रेमांत तत्पर. २ वागणूक. ३ वाईट काम करणारा.

नन्तर बलदेव वदे लक्ष्मण वदलास सत्य तें आहे ।
बुद्धि तुझी बहु सुन्दर मध्यस्था जाहली असे पाहे ॥ ३९ ॥
जो मर्त्य[1] शुद्धिशाली कार्ये जनांचें विरुद्ध तो त्यागी ।
दोष न त्या त्यागामधिं नच तो एकान्तरूपगुणयोगी[2] ॥ ४० ॥
ज्याच्या अयशोग्नीच्या ज्वालांनीं व्याप्त दशदिशा झाल्या ।
कसलें सौख्य तयाला न जीविताशाहि मृतचि तो झाला ॥ ४१ ॥
करि जो अनर्थ ऐशा अर्थाचा मानवा न उपयोग ।
तें सगरल[3] औषध जें सेवेनें वाढवी जनीं रोग ॥ ४२ ॥
ती शक्ति निरुपयोगी जी भीतप्राणिरक्षणा न करी ।
चारित्र तेंहि विफलचि जें जीवाच्या हितास संहारीं ॥ ४३ ॥
तें ज्ञान निरुपयोगी आत्मा जेणें न जाणिला गेला ।
जन्म तयाचा व्यर्थचि अपवादें जो समस्त डागळला ॥ ४४ ॥
त्याचा प्रशस्त जन्म न दुर्वादें[4] कीर्तिसुन्दरी ज्याची ।
हरिली महाबलीनें मरणांतहि मधुरता नसे साची ॥ ४५ ॥
जनपरिवाद असो तो माझाही दोष यामधें घडला ।
परपुरुषहृता[5] सीता हा राम पुनःहि आणिता झाला ॥ ४६ ॥
राक्षसभवनोद्यानामध्यें[6] चिरकाल राहिली होती ।
बहुधा दशकण्ठास्तव दूतींनीं प्रार्थिली असे सुदती ॥ ४७ ॥
दुष्ट अशा दृष्टीनें राक्षसपतिनें समीप येऊन ।
जीस असे पाहियलें कामवशें निजमनांत चिन्तून ॥ ४८ ॥
ऐशा या सीतेला मी मूर्खानें गृहांत आणून ।
ठेवियलें परि माझें लज्जित झालें न लेशभरहि मन ॥ ४९ ॥
आतां कृतान्तवक्त्रा सेनानीला[7] सुशीघ्र बोलावी ।
गर्भवती ही सीता गृहांतुनी त्वरित काननीं[8] न्यावी ॥ ५० ॥

[ लक्ष्मणाचें भाषण. ]

लक्ष्मण करयुग जोडुनि विनम्र होऊन राघवा वदला ।
हे देवा ! वैदेही त्यागाया योग्य वाटतें न मला ॥ ५१ ॥

---

१ मनुष्य. २ सर्वथा-पूर्णपणें. ३ विषमिश्रित. ४ अपवादानें. ५ परपुरुषानें हरण केलेली. ६ राक्षसाच्या रावणाच्या घराच्या बगीचात. ७ सेनापति. ८ वनांत.

कोमलपदकमला ही मनोहरा वाढली सुखांत असे।
गर्भवती राजसुता वनांत राहील एकटीच कसें ॥ ५२ ॥
जें अर्पिलें जिनाला पुष्पादिक सर्व लोक त्या वघती।
सीतेस रावणानें पाहियलें दोष नैव बुध वदती ॥ ५३ ॥
सीता निर्दोष असे तुझ्याच ठायीं वसें तिचें चित्त।
त्यागू नकोस तिजला बन्धो ! असे तिचें शीलचि वित्त[1] ॥ ५४ ॥
लक्ष्मण-भाषण ऐकुनि कोपानें राम लाल होऊन।
अति अप्रसन्नवदनें वदला अनुजा कठोरसें वचन ॥ ५५ ॥

[ रामचंद्राचें कठोर भाषण. ]

जें मी निश्चित केलें वाइट वा चांगलें असो कार्य।
तें मी करीन खचितचि राहिल तें सर्वथैव अनिवार्य[2] ॥ ५६ ॥
जें निर्मनुष्य आहे अशा वनीं जानकीस त्यागीन।
साहाय्यरहित तेथें मरो जगो मम मनांत चिन्ता न ॥ ५७ ॥
क्षणपर्यन्तहि माझ्या देशीं नगरींहि तीं न राहील।
राहील केवि मम गृहिं सीता अपकीर्तिचेंचि जी मूल ॥ ५८ ॥

[ कृतांतवक्राचें सभेंत आगमन. ]

इतक्यांत त्या ठिकाणीं सेनापति जो कृतान्तमुख नामें।
येण्या रामाज्ञेनें निघे जयाचें रणांत चित्त रमे ॥ ५९ ॥
वसला रथांत शोभे ज्याच्या शीर्षावरी सितच्छत्र[3]।
देहीं चिलखत कानीं कुण्डल तेजें जसा नभीं मित्र[4] ॥ ६० ॥
येतांना त्या पाहुनि पुरस्त्रियांच्या विकल्प येति मनीं।
हा वेगें जात असे कोणाचें अशुभ करिल शीघ्र रणीं ॥ ६१ ॥
शस्त्रें रथांत दिसतीं निजतेजें जीं रवीस लाजवितीं।
भीषण यमाप्रमाणें कृतान्तमुख वैसला दिसे सुदति[5] ! ॥ ६२ ॥
यापरि नारीभाषण ऐकत रामासमीप तो आला।
प्रणिपात करुनि त्यातें द्यावी आज्ञा प्रभो असें वदला ॥ ६३ ॥
श्रीराम त्यास वदले सीतेला डोहळे असें झालें।
श्रीजिनगृहें नि तीर्थक्षेत्राचें दर्शनांत मन रमलें ॥ ६४ ॥

---

१ धन. २ डावलतां न येणारें, अवश्य करणें भाग असलेलें. ३ पांढरें छत्र. ४ सूर्य. ५ सुंदर दांत जिचें आहेत अशी स्त्री.

तिजला डोहाळ्यांच्या छंद्में[1] नेऊन गमनमार्गात ।
सम्मेदादिक-तीर्थक्षेत्रांच्या करुनि दर्शनांत रत ॥ ६५ ॥
सोडी सिंहरवाभिध वनांत जें मानवें सदा रहित ।
ये परत तूंच सौम्या आज्ञा पाळी अशी तुला खचित ॥ ६६ ॥
आज्ञा अपुली जैशी ऐसें बोलुनि कृतान्तमुख आला ।
श्रीजानकीसतीच्या संनिध आणिक तिला असें वदला ॥ ६७ ॥
देवी उठा नि बैसा रथांत जाऊ जिनेन्द्रसदनांत ।
जिनपूजनादि अपुल्या इच्छा होतील पूर्ण हो त्वरित ॥ ६८ ॥
यापरि मधुवचनांनीं त्याच्या सीता प्रसन्नशी झाली ।
अत्यानन्दित होउनि सती रथाच्या समीप ती आली ॥ ६९ ॥

[ सीतासतीच्या शुभेच्छा. ]

वदली श्रमण[2]-श्रावक आर्या[3] नि श्राविका असा सङ्घ ।
जयवन्त सदा होवो जो पुण्यप्राप्तिचें असे अङ्ग[4] ॥ ७० ॥
श्रीपद्मराम होवो विजयी जो परम-जैनधर्मरत ।
साधुगणांची सेवा करण्यामधिं लावि आपुलें चित्त ॥ ७१ ॥
घडला असे प्रमादें कांहीं तरि दोष मजकडून जरी ।
जिनगृहनिवासि सगळे देव तयाची क्षमा करोत तरी ॥ ७२ ॥
अत्यन्तोत्सुक चित्ता वैदेही ती सखीजना वदली ।
राहा सखीजनांनो मोदें चिन्ता करूं नका कसली ॥ ७३ ॥
मी सर्व जिनगृहांना करुनि नमस्कार परत येईन ।
उत्सुकता[5] न वरावी तुमचें होवो सदैव कल्याण ॥ ७४ ॥
यापरि बोलुनि सिद्धा करुनि नमस्कार हृष्ट ती सीता ।
चढली रथांत सत्वर उज्ज्वलजिनदर्शनांत धरि चित्ता ॥ ७५ ॥
मणिकाञ्चनरचितरथीं सीता शोभे सुराङ्गना जैशी ।
जाई रथ त्वरेनें भरतें निर्मुक्त जेवि शरराशि ॥ ७६ ॥

[ सीतेला मार्गात अपशकुन. ]

वठलेल्या झाडावरि बसून वायस[6] करी कठोर रव[7] ।
व्याकुल होउनि मस्तक पक्षांना हालवी करून जव[8] ॥ ७७ ॥

---

१ निमित्तानें. २ मुनि. ३ अर्जिकासाध्वी. ४ कारण—साधन.
५ उत्कण्ठा. ६ कावळा. ७ शब्द. ८ वेग.

जी शोकतप्त झाली डोकीचे मोकळे जिचे केश ।
रडणारी स्त्री आली अभिमुख[1] झाले जिला बहु क्लेश ॥ ७८ ॥
यापरि पाही सीता अशुभनिमित्तें अनेक मार्गांत ।
चाले तशीच होतें हृदय जियेचें जिनांत अनुरक्त ॥ ७९ ॥
एका निमिषामध्यें पर्वतसरितादिकास लङ्घून ।
जाई योजनपरिमितमार्गा रथ ज्या असेचि उपमा न ॥ ८० ॥
गरुडाचा वेग जया अश्व असे ज्यास जुंपिलें होते ।
शुभ्रध्वजें विराजित रथ तो गेला अतीव दूर पथें ॥ ८१ ॥
कोठें गांवीं नगरीं कमलें ज्यांच्यांत विपुलशीं फुललीं ।
पाहुनि सरोवरें तीं हृदयीं सीता प्रसन्न बहु झाली ॥ ८२ ॥
कोठें मेघावृत[2] नभ रात्रीच्या दाट अन्धकारास ।
झालें अनुसरतें तें वनलें नभ भूमि एकतावास ॥ ८३ ॥

[ वनवर्णन. ]

कोठें पुष्पें पडलीं कृशता कोठें विपर्ण[3] वृक्षाली[4] ।
कोठें छायाविरहित अटवी[5] विधवेसमान कीं दिसली ॥ ८४ ॥
कोठें दावाग्नीनें प्रचण्डसे वृक्ष जळुनि गेलेले ।
शोभे तेणें वन नच कुवाक्यहत साधुहृदयसम झालें ॥ ८५ ॥
कोठें मन्दसुगन्धित वातें वेली सपल्लवा[6] हलती ।
जणु या वसन्तपत्नी येथें येऊन नृत्य कीं करिती ॥ ८६ ॥
कोठें भिल्ल जनांचा ध्वनि मोठा श्रवण करुनि कानांनीं ।
पळती हरिण नि पक्षी भय ज्यांच्या उद्भवून दाट मनीं ॥ ८७ ॥
कोठें सीता पाही पर्वतशिखरें नभांत गेलेलीं ।
कोठें निर्झरशब्दें अटवी जणु हास्य करित असलेली ॥ ८८ ॥
पाणी अल्प जयांचें शोभे अटवी अशा नद्यांनीं ती ।
नेत्राश्रुपूर्ण ऐशी जणु ही स्त्री विरहिणी दिसे वदती ॥ ८९ ॥
नानापक्षिरवांनीं जणु ही भाषण करी मला भासे ।
विस्तीर्ण निर्झरांच्या मिषें महाहास्य हें तिचें विलसे ॥ ९० ॥

---

१ समोर. २ ढगांनीं आच्छादित. ३ पानांनीं रहित. ४ झाडांची पंक्ति. ५ जंगल. ६ कोवळया पालवीनेंयुक्त.

मकरन्दलुब्ध ऐशा भृङ्गी स्तुति करिति मधुर अटवीची ।
मधुर सुपक्क फलांनीं सुनम्रता शोभते सदैव तिची ॥ ९१ ॥
ज्यांना सुन्दरपल्लव ऐशा शाखा अनेक हात जया ।
वृक्ष समीरविकम्पित[1] करिती सुमवृष्टि आदरार्थे तया ॥ ९२ ॥
इत्यादिकार्यतत्पर अटवी सिंहादियुक्त पाहून ।
सीता पुढें निघाली रामपदीं गुन्तलें जिचें सुमन ॥ ९३ ॥
यापरि जात पुढें ती असतां अतिमधुर शब्द ऐकून ।
समजे मनांत सीता रामाचा दीर्घ दुन्दुभिध्वान[2] ॥ ९४ ॥

[ गंगानदीवर्णन. ]

पाहून पुढें सुन्दर नदी जिचें नांव 'सुरनदी[3]' आहे ।
खळ खळ आवाज जिचा पैंजणशब्दासमान मन मोहें ॥ ९५ ॥
मासे मकरादि जिचे क्रीडा असतां करीत जललहरी ।
उठती सन्तत तेणें पङ्कज[4] होती सकम्प तन्नीरीं[5] ॥ ९६ ॥
कोठें कोठें अतिशय जलवेगें तरु समूल उपडी जी ।
कोठें कोठें पर्वतशिलांस वीरास जेवि रणगाजी ॥ ९७ ॥
सगरसुतांनीं रचिली गेली लवणाकरास भेटाया ।
जी पाताळगभीरा शुभ्रतटें शोभते जिची काया ॥ ९८ ॥
फेसांनीं तट शोभे आवर्तें शोभतो जिचा मध्य ।
उभयतटीं रव करिती वसून पक्षी स्वभक्ष्य ज्या साध्य ॥ ९९ ॥
पवनासमान वेगें गेले घोडे तरून तटिनीस ।
योगी योगें जैसें तरून जातात संसृतिक्लेश ॥ १०० ॥
यानन्तर सेनापति सुमेरुगिरितुल्य धैर्यवन्त जरी ।
चित्त दयाळु जयाचें विषाद धारण करी अतीव उरीं ॥ १०१ ॥
बोलावया समर्थ न अतिशय दुःखें विचारशून्य बने ।
राहु शके न उभाही भरले तन्नेत्र विपुल अश्रुगणें ॥ १०२ ॥
केला तयें उभा रथ सशब्द रडणें निघे मुखांतून ।
मस्तकिं करयुग ठेवी शरीर सगळे बने कलाहीन[6] ॥ १०३ ॥

१ वाऱ्यांनीं हललेले. २ नगाऱ्याचा शब्द. ३ गंगानदी. ४ कमळें. ५ तिच्या पाण्यांत. ६ पांढरें फटफटीत.

हृदय जियेचें खचलें वदली सीतासती असे त्यास ।
दुःखिजनासम रडशी सेनाने ! सांग सकल सत्यास ॥ १०४ ॥
या हर्षाच्या समयीं मजलाहि विषादयुक्त कां करिशी ।
निर्जन घोर वनीं या सांग मला वा किमर्थ तूं रडशी ॥ १०५ ॥
देवि ! स्वाम्याज्ञा जी पालन करणें अवश्यकार्य असे ।
प्रभुचा नियोग जो तो सगळा मी आपणास सांगतसे ॥ १०६ ॥
माते ! दुर्जन भाषण विषाग्निशस्त्रासमान नाश करी ।
अपकीर्ति निजा ऐकुनि हृदयीं भूपेन्द्र भय विशाल धरी ॥ १०७ ॥
स्नेहा दुस्त्यज सोडुनि डोहाळ्याच्या मिषें तुला देवें ।
त्यजिलें श्रमणें जैशी विषयांची रति विरक्तशा भावें ॥ १०८ ॥
बन्धो ! सीतात्यागा करूं नका म्हणुनि लक्ष्मणें शतधा ।
केली विनन्ति परि न श्रीरामें हट्ट सोडिलाचि कदा ॥ १०९ ॥
अतिशय विरक्त झाले प्रभुराघव देवि ! आपणाविषयीं ।
यास्तव रक्षक अपुला नाहीं कोणीहि सुजन या समयीं ॥ ११० ॥
नच माता न भ्राता परिवारहि देवि तुज न आधार ।
हे देवि घोर वन हें प्राणी फिरतात या स्थलीं क्रूर ॥ १११ ॥
हें सेनापतिभाषण जणु वज्राघाततुल्य ऐकून ।
अतिशय दुःखी झाली सीता त्यासमयिं पूर्ण बेभान ॥ ११२ ॥
सावध पुनरपि होउनि वदली अडखळत नाथ मज दावा ।
मी त्या विचारितें कीं, त्यागाचा हेतु तो मला कळवा ॥ ११३ ॥
सेनापति तिज वदला येथुनि हे देवि पुर असे दूर ।
श्रीराम चण्डशासन झाले आतां न ते दयाधार ॥ ११४ ॥

[ सीतेचा रामचंद्रास संदेश. ]

स्नेहरसाची सरिता सीता वदली कृतान्तवक्रास ।
नाथास सांग जाउनि मत्त्यागाच्या धरा न दुःखास ॥ ११५ ॥
उत्तम धैर्या धारुनि महानरा सर्वदा प्रजा रक्षी ।
पुत्रा पित्याप्रमाणें न्यायाला सतत तूं मनीं लक्षी ॥ ११६ ॥
सर्वकलांनीं शोभे प्रमोद देई जसा शरच्चन्द्र ।
मोद प्रजेस वितरी इच्छो तुज मानसांत ती सान्द्र[१] ॥ ११७ ॥

१ अतिशय.

हृदय जियेचें खचलें वदली सीतासती असे त्यास ।
दु:खिजनासम रडशी सेनानि ! सांग सकल सत्यास ॥ १०४ ॥
या हर्षाच्या समयीं मजलाहि विषादयुक्त कां करिशी ।
निर्जन घोर वनीं या सांग मला या किमर्थ तूं रडशी ॥ १०५ ॥
देवि ! स्वाम्याज्ञा जी पालन करणें अवश्यकार्य असे ।
प्रभुचा नियोग जो तो सगळा मी आपणास सांगतसे ॥ १०६ ॥
माते ! दुर्जन भाषण विषाग्निशस्त्रासमान नाश करी ।
अपकीर्ति निजा ऐकुनि हृदयीं भूपेन्द्र भय विशाल धरी ॥ १०७ ॥
स्नेहा दुस्त्यज सोडुनि डोहाळ्याच्या मिषें तुला देवें ।
त्यजिलें श्रमणें जैशी विषयांची रति विरक्तशा भावें ॥ १०८ ॥
बन्धो ! सीतात्यागा करूं नका म्हणुनि लक्ष्मणें शतधा ।
केली विनन्ति परि न श्रीरामें हट्ट सोडिलाचि कदा ॥ १०९ ॥
अतिशय विरक्त झाले प्रभुराघव देवि ! आपणाविषयीं ।
यास्तव रक्षक अपुला नाहीं कोणीहि सुजन या समयीं ॥ ११० ॥
नच माता न भ्राता परिवारहि देवि तुज न आधार ।
हे देवि घोर वन हें प्राणी फिरतात या स्थलीं क्रूर ॥ १११ ॥
हें सेनापतिभाषण जणु वज्राघाततुल्य ऐकून ।
अतिशय दु:खी झाली सीता त्यासमयिं पूर्ण बेभान ॥ ११२ ॥
सावध पुनरपि होउनि वदली अडखळत नाथ मज दावा ।
मी त्या विचारिते कीं, त्यागाचा हेतु तो मला कळवा ॥ ११३ ॥
सेनापति तिज वदला येथुनि हे देवि पुर असे दूर ।
श्रीराम चण्डशासन झाले आतां न ते दयाधार ॥ ११४ ॥

[ सीतेचा रामचंद्रास संदेश. ]

स्नेहरसाची सरिता सीता वदली कृतान्तवक्रास ।
नाथास सांग जाउनि मत्त्यागाच्या धरा न दु:खास ॥ ११५ ॥
उत्तम धैर्या धारुनि महानरा सर्वदा प्रजा रक्षी ।
पुत्रा पित्याप्रमाणें न्यायाला सतत तूं मनीं लक्षी ॥ ११६ ॥
सर्वकलांनीं शोभे प्रमोद देई जसा शरच्चन्द्र ।
मोद प्रजेस वितरी इच्छो तुज मानसांत ती सान्द्र[१] ॥ ११७ ॥

---

१ अतिशय.

घोरभवाच्या दुःखापासुनि जीवास जें करी मुक्त ।
आराधि तें सुदर्शन[1] महानरा सन्त वदति तेंचि हित ॥ ११८ ॥
साम्राज्याहुनि उत्तम असे सुदर्शन सुमान्य तेंचि जना ।
साम्राज्य नष्ट होतें देइ सुदर्शन सदात्मसौख्यगणा ॥ ११९ ॥
करितिल अभव्य निन्दा म्हणून पुरुषोत्तमा न तें सोड ।
दुर्लभ अत्यन्त असे जीवाचें सतत पुरवितें कोड[2] ॥ १२० ॥
पडलें महासमुद्रीं रत्न करांतून तें पुनः न मिळे ।
केला उपाय जरि ही पश्चात्तापाशिवाय काय फळे ॥ १२१ ॥
बालक सुधाफलाला फेकुनि आडांत तो जसा रडतो ।
दुःखचि तयास लाभे पश्चात्तापचि तया सदा घडतो ॥ १२२ ॥
ज्याला जैसें वाटे अनिवारित बोलतो तसे नर तो ।
जगताच्या वदनाला बन्धन चक्रीहि घालु नच शकतो ॥ १२३ ॥
जरि ऐकिलें कुणाचें स्वार्थविनाशी न वचन मानावें ।
बधिरासम गुणभूषण हृदयामध्यें न त्यास ठेवावें ॥ १२४ ॥
तीव्रकरें रवि करितो प्रगट जगाच्या पदार्थसार्थासे[3] ।
प्रिय तो तथापि सकला धारण करि निर्विकार-भावास ॥ १२५ ॥
हे गुणभूषण नाथा ! तीव्राज्ञा जरि जगीं तुझी चाले ।
तूं प्रिय हो सर्वांना[4] तव गुणकीर्तन करोत सतत भले ॥ १२६ ॥
प्रीतीनें स्वजनांना दानें सन्तुष्ट नित्य ठेवावें ।
शत्रुगणांना शीलें मित्रा सद्भावनेंचि सेवावें ॥ १२७ ॥
आला अतिथि स्वगृहीं त्याची पाहून योग्यता दान ।
द्यावें साधुजनांना वन्दन पूजन करून सन्मान ॥ १२८ ॥
धरुनि क्षमा कृश करी कोपा मानास विनयभावानें ।
सरळपणानें कपटा जिंकी लोभास तुष्टहृदयानें ॥ १२९ ॥
नाथा ! आपण आहा समस्तशास्त्रांत चतुर धीमन्त ।
उपदेशावें मी न प्रेम मला बोलवी तसें कान्त ॥ १३० ॥
मद्वश आपण आहा म्हणून केला असेन अविनय मी ।
केव्हां परिहासानें क्षमा करावी प्रसन्न व्हा स्वामी ॥ १३१ ॥

---

१ दोषरहित जिनेश्वर, गुरु व शास्त्रावर श्रद्धा ठेवणें तें सुदर्शन सम्यग्दर्शन होय.
२ इच्छा. ३ समूहास. ४ थट्टेनें.

सम्बन्ध नाथ आपुला माझ्याशीं जेवढा असे घडला ।
अपराधादिक घडले क्षमा तयांची करा उदार मला ॥ १३२ ॥
जरि उतरली रंथांतुनि पूर्वीं सीता वदून निजभाव[1] ।
पडली धरणीवरती घाली कृतकर्म[2] हा असा घाव ॥ १३३ ॥
मूर्च्छित होउनि पडली शोभे ती जानकी सती कैशी ।
जणु टाकली नभांतुनि देवांनीं कान्तियुक्त मणिराशी ॥ १३४ ॥

[ कृतांतवक्राचा नोकरपणाविषयीं तिरस्कार. ]

वेशुद्ध जाहलेल्या वैदेहीला बघून सेनानी ।
अतिदुःखित मनिं चिन्ती प्राणा त्यागील खचित रघुराणी ॥ १३५ ॥
क्रूर जिथें सिंहादिक पशु फिरती घोर या अरण्यांत ।
धीर नरा ही येथें जीवितसन्देह वाटतो खचित ॥ १३६ ॥
या स्वामिनीस येथें भीमवनीं त्यजुनि मी जरी गेलों ।
वाटेल दुःख मजला शान्तीला पूर्ण खचित मी मुकलों ॥ १३७ ॥
या स्वामिनीस त्यजणें निर्दयता घोर ही मला वाटे ।
स्वाम्याज्ञाहि भयङ्कर हे मम चित्तास टोचिती काटे ॥ १३८ ॥
नोकर होणें हें नच सुन्दर त्या निन्दितें समस्त जग ।
स्वाधीनता नसे त्या क्षुद्रपणाचाचि तो असे भोग ॥ १३९ ॥
यन्त्रासमान नोकर सदा पराधीन कार्य तो करितो ।
जीवन हीन तयाचें श्रेष्ठ श्वानचि तयाहुनी गमतो ॥ १४० ॥
जैसें पिशाच मान्त्रिकवश होउनि निन्द्य कार्यही करितो ।
स्वाम्याज्ञावश नोकर अवाच्य वदतो नि निन्द्य आचरितो ॥ १४१ ॥
उन्नति कान्ति नि लज्जा[3] स्वेच्छा स्वप्नींहि त्यास नच लाभे ।
तो चित्रासम गमतो जन्म तयाचा निरर्थ नच शोभे ॥ १४२ ॥
ज्यानें नोकर केलें त्या कर्मानें मला स्ववश केलें ।
या दारुणप्रसङ्गीं प्राप्त मला सोडणें हिला झालें ॥ १४३ ॥
यापरि चिन्तुनि सोडी सेनानी सुमतितुल्य सीतेस ।
होउनि सलज्ज झाला अभिमुख तो तेधवा अयोध्येस ॥ १४४ ॥

[ सीताशोक. ]

---

१ आपला विचार. २ पूर्वजन्मीं केलेलें अशुभकार्य. ३ लाज.

इकडे सावध झाली यूथभ्रष्टा[1] जशी मृगी दीन ।
सीता शोकास करी श्रवणें येई कुणास करुणा न ? ॥ १४५ ॥
ती करुण रडत असतां वृक्षापासून पुष्पवृन्द गळे ।
जणु तत्पतनमिषानें त्यांनीं रुदनास काय आचरिलें ॥ १४६ ॥
अतिशय दुःखवशा ती निसर्गरमणीयशा स्वरें रडली ।
हा पद्म हा नरोत्तम बोला प्रतिवचन आज या कालीं ॥ १४७ ॥
सत्कार्य सतत करिता गुणशाली श्रेष्ठपुरुष आहात ।
ठायीं अपुल्या न वसे दूषणगन्धहि[2] असेचि हें विदित ॥ १४८ ॥
केलें पूर्वभवीं जें अनिष्ट मी कर्म आज फल त्याचें ।
मिळतें मजला दुःखद चुकेल भोगाविणेंचि तें कैचें ॥ १४९ ॥
[ मला प्राप्त झालेलें दुःख पूर्वजन्माच्या अशुभकर्माचें फल आहे
असा सीता विचार करिते. ]
उदया स्वकर्म येतां जनक नि जननी नि बन्धु परिवार ।
विफल न करु शकती तें भोगावें लागतेंचि अनिवार ॥ १५० ॥
मी पूर्वीच्या जन्मीं प्रशस्त पुण्य न उपार्जिलें होतें ।
यास्तव या जन्मामधिं दुर्भव्या[3] भोगितेंचि दुःखशतें ॥ १५१ ॥
नसते दोष कुणाचे पूर्वभवीं मी सभेंत सांगितले ।
तें पापकर्म येतां उदया मज आज दुःख हें आलें ॥ १५२ ॥
घेउनि मी गुरुसंनिध पूर्वभवीं व्रत अनादरें त्यजिलें ।
ज्याचें फल या जन्मीं दुःसहसें प्राप्त आज मज झालें ॥ १५३ ॥
अतिशय कठोर वाक्यें जीं विषसम भर्त्सिला[4] असे कोणी ।
अन्यभवीं मी तेणें त्याचें फल कर्म या भवीं आणी ॥ १५४ ॥
कमलवनीं स्थित ऐशा चक्रयुगा[5] भिन्न मी असें केलें ।
त्याचें फल या भवि मी पतिविरहें दुःखिनी अशी झाल्ये ॥ १५५ ॥
कमलविभूषित ऐशा सरोवरामधिं उदारपुरुषाची ।
जी गतिलीला दावी केलें हंसा वियुक्त मी साची ॥ १५६ ॥
सुन्दर-नारीजल्पित[6] अपुल्या शब्दें जनास जो दावी ।
हंसा वियुक्त केलें झालें मज कुफल तीव्र याच भवीं ॥ १५७ ॥

---

१ कळपाची चुकामूक जिला झाली अशी हरिणी. २ लेशही. ३ दुर्दैवी.
४ दुखविला. ५ चक्रवाक पक्ष्यांची जोडी. ७ भाषण.

गुञ्जाफलार्द्धवर्णी[1] डोळे ज्याचे नि देह धूम्र असे ।
करिती क्रीडा सौख्यें अन्योन्यीं प्रेम तें अपार वसे ।। १५८ ।।
त्या पारावतयुगला[2] पापेनें पापबुद्धि ठेवून ।
केलें असेल विरहित आलें हें आज दुःख वाढून ।। १५९ ।।
अथवा वसन्तसमयीं फुलले सर्वत्र वृक्ष पुष्पांनीं ।
विपुलफलें ज्या आलीं सुन्दर दिसतात तेवि पानांनीं ।। १६० ।।
कोकिल मधुरव करिती त्यांच्या जोडीस पूर्वजन्मीं मी ।
फोडुनि वियुक्त केलें फळ त्याचें दुःख लाभलें स्वामी ।। १६१ ।।
अथवा सुचरित विद्वद्वन्द्य जितेन्द्रिय अशा तपस्विगणा ।
अवमानिलेंचि निन्दुनि फल त्याचें तें चुकेल नच कोणा ।। १६२ ।।
आज्ञा केली असतां मोद जयांच्या मनांत होत असे ।
त्या परिवारासह गृहिं वाटे स्वर्गांत वास मम विलसे ।। १६३ ।।
परि पुण्यरहित आतां निर्बान्धवशा वनीं कशी राहू ।
येथिल नानादुःखें अभागिनी मी कशी वरें साहू ।। १६४ ।।
शयनगृहामधिं जेथें नानारत्नप्रकाश बहु विलसे ।
निद्रासुख अनुभविलें तें स्मरणांतून हाय जाय कसें ।। १६५ ।।
ज्या मज रामप्रभुची प्रधानराणी म्हणून जन म्हणती ।
घोरवनीं मी आतां साहू राहून केवि दुःखतति ।। १६६ ।।
दुःखदर्शेत ऐशा देहीं जरि राहतील मत्प्राण ।
वज्रें ते जणु रचिले ऐसें बुध बोलतील नच कोण ।। १६७ ।।
ऐशा दुरवस्थेंतहि हृदयाचे जाहले न शत तुकडे ।
जरि त्यासम नच दुसरे वज्राचे तीक्ष्ण ज्या सहस्र कडे ।। १६८ ।।
सुगुणसमुद्रा रामा, हे लक्ष्मण भक्त तात हे जननी ।
हे भामण्डल बन्धो रक्षणचिन्ता दिसे नच स्वमनीं ।। १६९ ।।
आहे अलक्षणा[3] मी दुःखांच्या भोवऱ्यांत मी फिरते ।
करुं काय कुठें जाऊं या संकटिं मज गमेचि कीं मरते ।। १७० ।।
आहे निष्पुण्या मी पतिसह विभवें समृद्ध होऊन ।
प्रतिजिनमन्दिरिं जाउनि केलें नच मी जिनेन्द्रपदयजन[4] ।। १७१ ।।

---

१ गुंजेप्रमाणें लाल. २ पारवापक्ष्यांची जोडी. ३ अशुभलक्षणाची.
४ पूजन.

यापरि करुनि स्वजनस्मृति सीता करुणरुदन दीर्घ करी ।
तैं वज्रजङ्घराजा आला वनिं बहुत घेउनि स्वकरीं ॥ १७२ ॥
तो पौण्डरीकनगरस्वामी गजबन्धनार्थ येइ तिथें ।
निजसैनिकगण घेउनि होति सती रडत बैसली जेथें ॥ १७३ ॥
ऐकुनि रडण्याचा ध्वनि अतिशय सुन्दर मनांत येऊन ।
जणु संशयें न येती पदाति त्याचे महाभया धरुन ॥ १७४ ॥
घोडेहि रुद्ध झाले स्वारें साशङ्क होउनी धरिले ।
ज्यांनीं मधुरध्वनि तो श्रविला गमन न पुढें तयें केलें ॥ १७५ ॥
हिंस्रपशूंनीं भरल्या या वनिं रुदनध्वनि कैसा ।
गमे मनोहर परि तो स्त्रीचा श्रविला नच ऐसा ॥ १७६ ॥
हरिण तरस रेडे सिंह शार्दूल वाघ ।
विहरति नित येथें जीव तैसेचि नाग ।
विमल हिमकरांची जी कला रम्य भासे ।
हृदयहरणदक्षा स्त्री कशी ही निवासे ॥ १७७ ॥
सौधर्मकल्पाहुनि वासवानें । सुराङ्गना पाठविली त्वरेनें ।
भासे अशी अद्भुतरूपयुक्ता । परन्तु कारुण्य मनोऽन्तरीं नें ॥१७८॥
अशी अद्भुतरूपाची नारी पाहून सैन्य तें ।
दिङ्मूढ झालें पाऊल पुढती नच टाकितें ॥ १७९ ॥
घोडे जयांत मकरासम भासतात ।
जें सैन्य पायदळ मत्स्यचि शोभतात ।
हत्ती जयांत सुसरी दिसती भयाण ।
जे खड्गवृन्द दिसती लहरीसमान ॥ १८० ॥
सैन्य हें वज्रजंघाचें जिनाचा दास जो असे ।
सीतारुदन ऐकून चित्तीं दुःखित तें दिसे ॥ १८१ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यविरचिते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत
पद्यानुवादे पद्मपुराणे सीतानिर्वासनविलापवज्रजङ्घाभिधानं नाम
सप्तनवतितमं पर्व ॥ ९७ ॥

---

१. आपले हत्ती. २ पायदळ. ३ थंडकिरण ज्याचे आहेत अशा चंद्राची. ४ इन्द्रानें. ५ मनांत. ६ मगरासमान.

# अठ्याण्णवव्या पर्वांतील कथा.

आपलें सैन्य थांबलेलें पाहून वज्रजङ्घराजानें आपल्याजवळ असलेल्या लोकांना थांबण्याचें कारण विचारिलें. इतक्यांत एका सुलक्षणसंपन्न स्त्रीचा रडण्याचा शब्द त्याच्या कानीं पडला. लक्षणशास्त्राच्या जाणकार राजानें हा सुलक्षणी व गर्भिणी स्त्रीचा रुदनशब्द आहे हें जाणलें व तो हत्तीवरून उतरून तिच्याजवळ गेला. तो तेथें जाण्यापूर्वी कांहीं सज्जनांनीं वज्रजंघराजाची तो सात्विक, सम्यग्दृष्टि, दयाळू व जिनशासनाचा ज्ञाता आहे अशी माहिती सीतेला दिली होती. राजानें निर्मलदृष्टीनें पाहून तिला म्हटलें– " भगिनी, तुझा त्याग करणारा पुरुष वज्रहृदयाचा किंवा मन्दमतीचा तरी असेल असें मला वाटतें. भगिनी, तूं गर्भिणी आहेस म्हणून तूं शोक करू नकोस. या शोकाचा परिणाम गर्भावर होईल. तूं माझ्यावर विश्वास ठेव. तुझ्याविषयीं माझ्या मनांत सहानुभूति आहे. तूं स्वतःची सर्व हकीकत सांग." हें राजाचें भाषण ऐकून सीता याप्रमाणें सांगू लागली.

"मी जनकराजाची कन्या, माझ्या भावाचें नांव भामण्डल. मी दशरथराजाची सून. माझ्या पतीचें नांव रामचंद्र. केकईला वर दिल्यामुळें माझ्या सासऱ्यानें भरताला राज्य दिलें व स्वतः दीक्षा घेऊन तो वनांत जाऊन तप करूं लागला. मी राम-लक्ष्मणाबरोबर वनांत गेले. तेथें अनेक वर्षें आम्ही राहिलों. पुढें दण्डकारण्यांत मला रावणानें हरण करून लंकेला नेलें. मी पतिवार्ता समजेपर्यंत उपवास केले. अकराव्या दिवशीं मला ती समजली. यानंतर मी पारणें केलें. पुढें राम-लक्ष्मणांचें रावणाबरोबर युद्ध झालें. रावणाचा वध करून त्यांनीं मला नंतर अयोध्येस नेलें. तेथें माझे दिवस सुखांत जात होते. मला गर्भ राहिला. तीर्थक्षेत्रांचें दर्शन घेण्याचे डोहाळे झाले. सर्व तीर्थक्षेत्रांचें दर्शन वंदन पूजन आपण करूं असें पतीनें मला

सांगितलें. परंतु मध्येच प्रजाजनांच्या पुढाऱ्यांनीं— "प्रभो, आपण रावणानें हरण केलेल्या सीतामातेला आणून घरांत ठेवलें हें पाहून प्रजा स्वच्छंदी स्वैराचारी झाली आहे, दुर्जन लोक परस्त्रियांनें हरण करूं लागले आहेत. कांहीं बलवान् लोक आपल्या हरण केलेल्या साध्वी स्त्रियांना परत आणतात पण अशी उदाहरणें फार थोडी आहेत. 'जसा राजा तशी प्रजा' या म्हणीप्रमाणें प्रजेंत अन्याय वाढत आहे. याला आपण आळा घातला पाहिजे नाहींतर अन्याय वाढतच जाईल." हें भाषण ऐकून माझ्या पतीला जननिन्देनें भय वाटलें व माझा मी निर्दोष असतांही त्याग केला. कृतांतवक्राला माझ्या पतीनें तीर्थयात्रेच्या निमित्तानें सीतेला रथांत बसवून ने व भयंकर सिंहरवा नामक वनांत तिला सोडून ये. असें सांगितलें त्याप्रमाणें कृतांतवक्रानें मला या वनांत आणून सोडलें आहे."

ही सर्व हकीकत ऐकून वज्रजंघानें म्हटलें— बाई, तूं शोक सोडून दे. हा शोक आर्तध्यानाला कारण होतो व दुर्गतींत फिरवितो. कांहीं अशुभकर्माच्या उदयानें तुला हें दुःख भोगावें लागत आहे. जीवाला शुभाशुभ कर्मांच्या उदयानें सुखदुःख प्राप्त होतें. तुझा पति रामचंद्र मोठा विवेकी आहे. तो पुनः कांहीं दिवसांनीं तुला हुडकून अवश्य घेऊन जाईल. तूं कांहीं चिंता करूं नकोस. तूं माझी मोठी बहिण आहेस असें मी समजतो— तूं माझ्या नगराला— पुण्डरीकपुराला चल.

माझें नांव वज्रजङ्घ आहे. माझा जन्म इन्द्र नामक राजाच्या वंशांत झाला आहे. माझ्या पित्याचें नांव गजवाह व मातेचें नांव 'सुबन्धु' असें आहे.

हे त्याचें भाषण ऐकून सीतेला आनंद झाला. ती त्याला म्हणाली— तूं माझा पूर्वजन्मीचा भाऊ मला आज भेटला आहेस. तूं सम्यग्दृष्टि व व्रतसंपन्न असा भाऊ आज मला भेटलास असें म्हणून सीता त्याच्याबरोबर पुण्डरीकपुराला जाण्यासाठीं निघाली.

---

# अट्ठ्याणणवावें पर्व.

(कांहीं सज्जन सीतेला दुःखाचें कारण विचारतात.)

जणु जाह्नवीनदी ही विघ्नें रुद्ध जाहली काय ।
निजसैन्य थांवलेलें बघुनि गजारूढ वज्रजङ्घार्य ॥ १ ॥
तो संनिधपुरुषांना वदला तुम्ही उभे कशासाठीं ।
व्याकुल कांहो दिसता विघ्न असे कोणतें तुम्हा पाठीं ॥ २ ॥
पारम्पर्यें त्यांनीं थांवायाचा विचारिला हेतु ।
तोवरि रडणें कानीं राजानें ऐकिलेंचि भव्यहितु ॥ ३ ॥
लक्षणशास्त्रज्ञाता नृप सुन्दर रुदनशब्द ऐकून ।
वदला श्रेष्ठनरस्त्री विद्युद्रुचि[1] गर्भिणी नि गुणखाण ॥ ४ ॥
हें वचन भूपतीचें ऐकुनि सुजनीं सुमान्य तें केलें ।
वदले राजन् अद्भुत नानाविध कार्य सत्य तव झालें ॥ ५ ॥
इतुक्यांत सुजन कांहीं सात्त्विक जाऊन वोलले तिजला ।
रडसी निर्जनवनिं या वद देवि ! किमर्थं सकल आम्हाला ॥ ६ ॥
हे देवि ! दिव्य आकृति दिसते तव शोक योग्य हा न गमे ।
अतिसुन्दर तूं दिसशी इतरीं सौन्दर्य नच कदापि रमे ॥ ७ ॥
हें सांगण्यास वाटे योग्य जरी सांग ऐकतो सकल ।
तेणें दुःख विनाशें होइल सुखलाभ देवि तुज अमल ॥ ८ ॥
नाना शस्त्रें ज्यांच्या उज्ज्वल होती करांत त्या सुजना ।
वदली सीता भ्याली घ्यावी हीं भूषणें न मत्प्राणा ॥ ९ ॥
तिजला ते नर वदले माते ! भय शोक देइ सोडून ।
धैर्य मनीं करि धारण आम्ही घेऊ न भूषणें जाण ॥ १० ॥

(हे माते, वज्रजङ्घराजा आपलें दुःख दूर करील.)

दुःख तुला कां झालें हें आम्ही तुज विचारतो बाई ।
या स्थलिं अमुचा राजा आला श्रीवज्रजङ्घ गे आई ॥ ११ ॥

---

१ विजेप्रमाणें कान्ति असलेली.

तो सर्वराजधर्में युक्तचि आहे असे नरश्रेष्ठ ।
त्याच्याठायीं आहे निर्मलसम्यक्त्वरत्न उत्कृष्ट ॥ १२ ॥
सम्यग्दर्शन त्याचें अनुपम उत्कृष्ट सौख्य देणारें ।
अविनाशी नि सुनिश्चल सुमेरुसम अप्रकम्प असणारें ॥ १३ ॥
शंकादिक मलें[1] नसती भूषणहृदयास जें असे साचें ।
ऐसें सम्यग्दर्शन इतरहि गुण वज्रजङ्घभूपाचे ॥ १४ ॥
जिनशासनतत्त्वांना जाणी शरणागतावरि प्रेम ।
करितो परोपकारा करुणेचें जो असे महाधाम[2] ॥ १५ ॥
विद्वन्मान्य असे जो निर्मल ज्याचें सदैव मन राही ।
रक्षी पित्याप्रमाणें प्रजेस जो सकलजन्तुहित पाही ॥ १६ ॥
दीन अनाथ अपङ्गा पाळी शुचिकार्य सर्वदैव करी ।
जो शत्रुपर्वतावरि वज्र असे शान्तिकार्य हृदयिं धरी ॥ १७ ॥
अन्यनराची पत्नी अजगर ज्यामधिं असा असे कूप ।
मानी भवपातभयें धर्मीं आसक्त आमुचा भूप ॥ १८ ॥
सत्य नि मधुर वदे तो इन्द्रिय आणिक मनास वश ठेवी ।
जिनगुरुसच्छास्त्रांच्या खऱ्या स्वरूपास सर्वदा भावी ॥ १९ ॥
याच्या देवि गुणांचें वर्णन करण्यास मनुज अभिलाषी ।
तो निजभुजेंचि केवल इच्छी तरण्या अपार जलराशि ॥ २० ॥
यापरि याचें वर्णन चालत आहे अशाचि वेळेस ।
भूपाल तेथ आला अद्भुत वाटे तदा समस्तास ॥ २१ ॥
हत्तीवरून उतरुनि योग्य असा विनय जो करी धीर ।
निर्मलशा दृष्टीनें पाहुनि तो भाषणा करी चतुर ॥ २२ ॥
तो वज्रमय असावा पुरुष गमे वा अतीव मतिमन्द ।
तुजला त्यजिता त्याचे वनांत तुकडे हजार का न वद ॥ २३ ॥
ऐशी तुझी अवस्था झाली कैशी शुभे मला वद गे ।
विश्वास ठेव मजवरि गर्भायासा करि न तूं रागें ॥ २४ ॥
यापरि भाषण ऐकुनि सीतेनें जें सहानुभूतीचें ।
उद्युक्त सांगण्याला होतांही ये पुनः रडें साचें ॥ २५ ॥

---

१ दोष. २ मोठें घर.

( सीता आपली दुःख कथा सांगते. )

पुनरपि बोलुनि राजा मधुभाषण तीस जेधवा शान्त ।
करि ती कथावयाला प्रारम्भ महासती ही साद्यन्त ।। २६ ।।
जाणून ध्यावयाची इच्छा राजन् तुला असेल जरी ।
या मन्दभागिनीची ऐक कथा चित्त सावधान करी ।। २७ ।।
जनकनृपाची कन्या भामण्डल हा मला असे भ्राता ।
मी सून दशरथाची सीता मम रामचन्द्र हे भर्ता ।। २८ ।।
केकइला वर देउनि भरताला दशरथें दिलें राज्य ।
अनरण्यपुत्र[1] तो मग वनांत जाउनि करी तपःप्राज्य ।। २९ ।।
मी राम-लक्ष्मणासह वनांत गेले तिथें प्रभूतदिन ।
मास नि अनेकवर्षं प्रवास केला न खिन्न होय मन ।। ३० ।।
हरिलें राक्षसपतिनें लङ्कानगरींत ठेविलें त्यानें ।
अकराव्या दिनिं मजला पतिवार्ता कळविली नि पावनिनें[2] ।। ३१ ।।
उपवासांचें तेव्हां मोदें मी पारणें असे केलें ।
जिंकून रावणाला रणि रामें स्वगृहिं मजशि आणियलें ।। ३२ ।।
भरत असे भरतासम राज्याचा त्याग करुनि जिनदीक्षा ।
घेऊन कर्मकक्षा[3] जाळुनि गेला अनन्तगुणमोक्षा ।। ३३ ।।
सुतशोकपीडिता ती दीक्षा घेऊन केकयादेवी ।
सुतपा करून गेली स्वर्गा जो विपुल देवसौख्या वी ।। ३४ ।।
दुष्ट असे जन सोडुनि मर्यादा भयविहीन होऊन ।
माझ्याविषयीं वदले परिवादा खिन्न होय राममन ।। ३५ ।।
रावणपण्डित मोठा असुनिहि हरिलें तयें परस्त्रीस ।
धर्मज्ञाता राघव पुनरपि आणून सेवितो तीस ।। ३६ ।।
राजा जैसा वागे वागू आम्हीहि दोष त्यांत नसे ।
तें क्षेमंकर[4] होतें जैसा राजा प्रजा तशी विलसे ।। ३७ ।।
गर्भवती मी झाले झाले मी तेधवा कृशाङ्गवती[5] ।
करिन जिनाचें पूजन विचार ऐसेचि सतत मनिं येती ।। ३८ ।।

---

१ अनरण्यराजाचा मुलगा– दशरथ. २ मारुतीनें. ३ कर्मरूपी जंगल. ४ हित करणारें. ५ रोडशरीराची.

( रामचन्द्रांनीं तीर्थक्षेत्रवन्दनेस जाऊ असें सांगितलें. )

सांगितलें मी माझे विचार राघव तदा मला बोले ।
जाऊ प्रिये ! जिनेन्द्रस्थानीं वन्दावयास होय भलें ॥ ३९ ॥
सीते आपण जाऊ अष्टापद[1]पर्वतावरि प्रथम ।
जिनवृषभा सानन्दा पूजुनि नमु जो असेचि अप्रतिम[2] ॥ ४० ॥
वृषभजिनाची आहे साकेता जन्मभूमि ही नगरी ।
वृषभादिजिनप्रतिमा पूजुनि नमु जन्ममृत्युभयवैरी ॥ ४१ ॥
काम्पिल्यामधिं विमला भक्तीनें वन्दना करायास ।
जाऊ रत्नपुरामधिं धर्मजिना मिटवि जो भवायास[3] ॥ ४२ ॥
श्रावस्तीपुरिं शंभवनाथा भवरोगहरणिं वैद्यास ।
जाऊ शरण नि पूजू वन्दुनि भावें स्वरूपशुद्धास ॥ ४३ ॥
चम्पापुरीस जाउनि वसुपूज्यसुतास वासुपूज्यास ।
आपण ध्याऊ पूजू वन्दू मिळण्यास मुक्तिराज्यास ॥ ४४ ॥
काकन्दीपुरिं वन्दू मुक्तिश्रीकान्त-पुष्पदन्तास ।
कौशाम्बीपुरिं पद्मप्रभास सम्प्राप्तमुक्तिसद्मास[4] ॥ ४५ ॥
चन्द्रपुरीं चन्द्राभा भद्रिलनगरांत शीतलेशास ।
मिथिलेंत मल्लिनाथा वन्दन करुं मनिं धरून उल्हास ॥ ४६ ॥
वाराणसींत वन्दू सुपार्श्वनाथास भक्तिभावानें ।
सिंहपुरीं श्रेयांसा जो मोहारीस पूर्ण नाशा ने ॥ ४७ ॥
श्रीशान्ति कुन्थु अर या जिनत्रिका[5] हस्तिनापुरीं जाऊ ।
वन्दू गाऊ ध्याऊ पूजू सुकृता विशालशा पाऊ ॥ ४८ ॥
सुव्रतजिनास वन्दू कुशाग्र[6]नगरांत देवि सर्वज्ञा ।
उज्ज्वल ज्याची चाले सम्प्रति आर्यांत धर्मचक्राज्ञा ॥ ४९ ॥
जानकि पापविनाशक अत्यन्तपवित्र नि प्रसिद्ध अशी ।
स्थानें अन्यहि वन्दू जिनातिशययोग ज्या करी स्ववशी ॥ ५० ॥
नृसुरासुरगन्धर्व स्तविती करिती प्रणाम ज्या सतत ।
आपण दोघे वन्दू स्थानें तीं श्रीजिनेशपदपूत[7] ॥ ५१ ॥

---

१ कैलासपर्वतावर. २ उपमारहित. ३ संसारदुःख. ४ ज्यानें मोक्षरूपी घर मिळविलें आहे. ५ तीन जिनेश्वरांना. ६ राजगृह-नगरांत. ७ जिनेश्वरांच्या पायांनीं पवित्र.

( सीता आपली दुःख कथा सांगते. )

पुनरपि बोलुनि राजा मधुभाषण तीस जेधवा शान्त ।
करि ती कथावयाला प्रारम्भ महासती ही साद्यन्त ॥ २६ ॥
जाणून घ्यावयाची इच्छा राजन् तुला असेल जरी ।
या मन्दभागिनीची ऐक कथा चित्त सावधान करी ॥ २७ ॥
जनकनृपाची कन्या भामण्डल हा मला असे भ्राता ।
मी सून दशरथाची सीता मम रामचन्द्र हे भर्ता ॥ २८ ॥
केकइला वर देउनि भरताला दशरथें दिलें राज्य ।
अनरण्यपुत्र[1] तो मग वनांत जाउनि करी तपःप्राज्य ॥ २९ ॥
मी राम-लक्ष्मणासह वनांत गेले तिथें प्रभूतदिन ।
मास नि अनेकवर्षें प्रवास केला न खिन्न होय मन ॥ ३० ॥
हरिलें राक्षसपतिनें लङ्कानगरींत ठेविलें त्यानें ।
अकराव्या दिनिं मजला पतिवार्ता कळविली नि पावनिनें[2] ॥ ३१ ॥
उपवासांचें तेव्हां मोडें मी पारणें असे केलें ।
जिंकून रावणाला रणि रामें स्वगृहिं मजशि आणियलें ॥ ३२ ॥
भरत असे भरतासम राज्याचा त्याग करुनि जिनदीक्षा ।
घेऊन कर्मकक्षा[3] जाळुनि गेला अनन्तगुणमोक्षा ॥ ३३ ॥
सुतशोकपीडिता ती दीक्षा घेऊन केकयादेवी ।
सुतपा करून गेली स्वर्गा जो विपुल देवसौख्या वी ॥ ३४ ॥
दुष्ट असे जन सोडुनि मर्यादा भयविहीन होऊन ।
माझ्याविषयीं वदले परिवादा खिन्न होय राममन ॥ ३५ ॥
रावणपण्डित मोठा असुनिहि हरिलें तयें परस्त्रीस ।
धर्मज्ञाता राघव पुनरपि आणून सेवितो तीस ॥ ३६ ॥
राजा जैसा वागे वागू आम्हीहि दोष त्यांत नसे ।
तें क्षेमंकर[4] होतें जैसा राजा प्रजा तशी विलसे ॥ ३७ ॥
गर्भवती मी झाले झाले मी तेधवा कृशाङ्गवती[5] ।
करिन जिनाचें पूजन विचार ऐसेचि सतत मनिं येती ॥ ३८ ॥

---

१ अनरण्यराजाचा मुलगा— दशरथ. २ मारुतीनें. ३ कर्मरूपी जंगल.
४ हित करणारें. ५ रोडशरीराची.

( रामचन्द्रांनीं तीर्थक्षेत्रवन्दनेस जाऊ असें सांगितलें. )

सांगितले मी माझे विचार राघव तदा मला बोले ।
जाऊ प्रिये ! जिनेन्द्रस्थानीं वन्दावयास होय भलें ॥ ३९ ॥
सीते आपण जाऊ अष्टापद[1]पर्वतावरि प्रथम ।
जिनवृषभा सानन्दा पूजुनि नमु जो असेचि अप्रेतिम[2] ॥ ४० ॥
वृषभजिनाची आहे साकेता जन्मभूमि ही नगरी ।
वृषभादिजिनप्रतिमा पूजुनि नमु जन्ममृत्युभयवैरी ॥ ४१ ॥
काम्पिल्यामधिं विमला भक्तीनें वन्दना करायास ।
जाऊ रत्नपुरामधिं धर्मजिना मिटवि जो भवायांस[3] ॥ ४२ ॥
श्रावस्तीपुरिं शंभवनाथा भवरोगहरणिं वैद्यास ।
जाऊ शरण नि पूजू वन्दुनि भावें स्वरूपशुद्धास ॥ ४३ ॥
चम्पापुरीस जाउनि वसुपूज्यसुतास वासुपूज्यास ।
आपण ध्याऊ पूजू वन्दू मिळण्यास मुक्तिराज्यास ॥ ४४ ॥
काकन्दीपुरिं वन्दू मुक्तिश्रीकान्त-पुष्पदन्तास ।
कौशाम्बीपुरिं पद्मप्रभास सम्प्राप्तमुक्तिसद्मास[4] ॥ ४५ ॥
चन्द्रपुरीं चन्द्राभा भद्रिलनगरांत शीतलेशास ।
मिथिलेंत मल्लिनाथा वन्दन करुं मनिं धरून उल्हास ॥ ४६ ॥
वाराणसींत वन्दू सुपार्श्वनाथास भक्तिभावानें ।
सिंहपुरीं श्रेयांसा जो मोहारीस पूर्ण नाशा ने ॥ ४७ ॥
श्रीशान्ति कुन्थु अर या जिनत्रिका[5] हस्तिनापुरीं जाऊ ।
वन्दू गाऊ ध्याऊ पूजू सुकृता विशालशा पाऊ ॥ ४८ ॥
सुव्रतजिनास वन्दू कुशाग्रनगरांत[6] देवि सर्वज्ञा ।
उज्ज्वल ज्याची चाले सम्प्रति आर्यांत धर्मचक्राज्ञा ॥ ४९ ॥
जानकि पापविनाशक अत्यन्तपवित्र नि प्रसिद्ध अशी ।
स्थानें अन्यहि वन्दू जिनातिशययोग ज्या करी स्ववशी ॥ ५० ॥
नृसुरासुरगन्धर्व स्तविती करिती प्रणाम ज्या सतत ।
आपण दोघे वन्दू स्थानें तीं श्रीजिनेशपदपूत[7] ॥ ५१ ॥

---

१ कैलासपर्वतावर. २ उपमारहित. ३ संसारदुःख. ४ ज्यानें मोक्षरूपी घर मिळविलें आहे. ५ तीन जिनेश्वरांना. ६ राजगृह-नगरांत. ७ जिनेश्वराच्या पायांनीं पवित्र.

पुष्पकयानीं बैसुनि गगना अत्यन्त शीघ्र लङ्घून ।
माझ्यासह चल सीते सुमेरुजिनपूजना करूं निपुण ॥ ५२ ॥
श्रीभद्रशालनन्दनसौमनसांचीं फुलें अनेकविध ।
अतिशय सुगन्धि घेउनि जिनगण पूजू करून मन शुद्ध ॥ ५३ ॥
कृत्रिम अकृत्रिम अशीं चैत्यें पूजून विष्टपांतील[1] ।
वन्दुनि साकेतापुरिं जाऊं दोघे प्रिये दयाशील ॥ ५४ ॥
एकहि भावें केला अरिहन्तांना प्रिये नमस्कार ।
सोडवि पापापासुनि जन्मान्तरिच्याहि जाण गे चतुर ॥ ५५ ॥
माझ्याहि मनीं कान्ते तुझ्यासवें जैनमन्दिरें सगळीं ।
पाहावी ही इच्छा आहे खोटें न यांत कांहिं मुळीं ॥ ५६ ॥
अज्ञानानें पूर्वी होता भरला समस्तजनसंघ ।
निष्काञ्चन[2] तो होता तयास समजे न पुण्य तेंवि अघ[3] ॥ ५७ ॥
चन्द्रें जैसें शोभे नभ तैसें जग जयामुळें शोभे ।
त्या प्रथम जिनापुढती सुर विनयें राहती सदैव उभे ॥ ५८ ॥
सकलप्रजाजनांचे पति होते तेच एकटे ज्येष्ठ ।
संसारभीरुभव्या कथिती जे मुक्तिमार्ग कीं श्रेष्ठ ॥ ५९ ॥
नानातिशयें[4] शोभे अष्टगुणैश्वर्य[5] सर्वदा ज्याचें ।
आश्चर्य सतत दावी सर्व सुरासुर मना हरी साचें ॥ ६० ॥
जीवादि सप्ततत्त्व-स्वरूप भव्यां विशुद्ध सांगून ।
कृतकृत्य आदिजिनपति बनले श्रीमुक्तिवल्लभारमण ॥ ६१ ॥
चक्री प्रथम अशा श्रीभरतें कैलासपर्वतावरती ।
रचिलें मणिमयमन्दिर करिते जेथें रमा सदैव रति ॥ ६२ ॥
आदिजिनेन्द्र-प्रतिमा रवितेजस्वी तयांत भरतेशें ।
स्थापियली जी उन्नत पञ्चधनुःशत सुवन्द्य अमरेशें ॥ ६३ ॥
गन्धर्वामर-किन्नर-सुराङ्गनानागदैत्य आदिजन ।
अद्यापि महापूजा करिति जियेची करून सद्यत्न ॥ ६४ ॥

---

१ जगांतील. २ दरिद्री. ३ पाप. ४ देवागमन, आकाशांतून विहार, चौसष्ट चामरें, दिव्यध्वनि आदिक इतरांत आढळून न येणारे विशेष. ५ सम्यक्त्वादिक अनन्त आठ गुणांचें वैभव.

तो श्रीवृषभजिनेश्वर अनन्त शिव सिद्ध अमल सर्वगत[1] ।
त्रैलोक्यपूज्य अर्हन् पूजिति त्या गणधरादि जन सन्त ॥ ६५ ॥
केव्हां कैलासावरि तुझ्यासवें देवि ! ऋषभदेवास ।
जाउनि पूजिन आणि स्तवीन जो सकलसद्गुणावास ॥ ६६ ॥

( श्रीरामचंद्रांनीं माझा कां त्याग केला त्याचें कारण सांगते.)

ऐसा विचार हृदयीं करुनि प्रभु राम वन्दनार्थ निघे ।
समयीं ऐशा जनता परिवाद कथावया सभेंत रिघे ॥ ६७ ॥
दावाग्नि[2]दुःसहा ती ऐकून कथा तदीयवदनांनीं ।
सन्तप्त नाथ झाले मत्त्यागाचा विचार करिति मनीं ॥ ६८ ॥
आहेत लोक सगळे प्रकृतीनें[3] कुटिल वश न होतील ।
अविचारें जरि वागू प्रजा नि राजांत वैर वाढेल ॥ ६९ ॥
करणें प्रियजनवर्जन उपाय हा स्ववश लोक करण्याचा ।
कल्पान्तावधि राहिल यश येणें नाश होय नच त्याचा ॥ ७० ॥
मरणें त्याचें उत्तम ज्याचें न कदापि मलिन यश झालें ।
अपकीर्तिमलिनजीवन जरि दीर्घ कदापि तें नसेचि भलें ॥ ७१ ॥
जननिन्दाभय मानुनि निर्दोष असूनही मला त्यजिलें ।
घोर अरण्यामधिं या स्वकुलाचें यश अखण्ड राखियलें ॥ ७२ ॥
निर्मलकुलज असे जो क्षत्रिय अतिशय उदार चित्ताचा ।
जो शास्त्रांचा ज्ञाता स्वभाव त्याचा असाच हो साचा ॥ ७३ ॥
यापरि निजनिर्वासन[4]सम्बन्धी वृत्त सर्व सांगून ।
ती दीना रडु लागे शोकानें तप्त हो यदीय मन ॥ ७४ ॥

( शोक न करण्याविषयीं सीतेला वज्रजंघाचा उपदेश.)

अश्रुजलें मुख भरलें भूरेणूंनीं भरे जिचा देह ।
पाहून वज्रजङ्घें म्हटलें सोडून देइ गे मोह ॥ ७५ ॥
जाऊन जवळ वदला सीतेला शोक देइ सोडून ।
तूं जिनशासनसंस्कृत[5] कां करिशी आर्त[6] जें असें ध्यान ॥ ७६ ॥

---

१ ज्ञानानें सर्व जगत् जाणणारा. २ जंगलांतील विस्तव. ३ स्वभावानें. ४ स्वतःचा त्याग करण्याचा प्रकार. ५ जिनमताच्या संस्कारानें युक्त. ६ दुःखयुक्त.

हे देवि दुःखवर्धक सोडुन दे शोक लोक हा असला।
चिन्ती अनित्य अशरण एकत्वान्यत्वभावना अतुला[१] ॥ ७७ ॥
मिथ्यादृष्टिस्त्रीसम कां करिशी तूं पुनः पुनः शोक।
साधुगणापासुनि तूं श्रुतार्थ[२] गे ऐकिलास निःशङ्क ॥ ७८ ॥
मनिं तूं सन्तत भावी मैत्र्यादिकभावना शुभा देवी।
भववैराग्यासाठीं लोकशरीरस्वभाव गे भावी[३] ॥ ७९ ॥
जो अज्ञ मुक्तिमार्गा न जाणतो सतत करि भवभ्रमण।
त्याला या जगिं देवी नाना सम्प्राप्त होति दुःखगण ॥ ८० ॥
भवसागरांत फिरतां संयोग वियोग जाहले प्राप्त।
बहुदुःखभोवऱ्यामधिं जीव बुडाला असे कथी आप्तें[४] ॥ ८१ ॥
आकाशीं पाण्यामधिं भूवरती पशुगतींत दुःसहशीं।
वर्षाशीतोष्णादिक-दुःखें तूं साहिलीस अन्यवशी ॥ ८२ ॥
अपमान विरह निन्दा आक्रोश नि ताडनादि नृगतींत।
मनुजें न दुःख कसलें केलें सम्प्राप्त देवि वा अहित ॥ ८३ ॥
जे अधमदेव पाहुनि महर्द्धि झुरती मनांत तळमळती।
च्युतिसमयीं[५] ही होतीं दुःखें तीं केवि आणि वर्णु किती ॥ ८४ ॥
शीतोष्णक्षारांनीं शस्त्रौघांनीं परस्परा लढुनी।
नरकांत दुःख होतें तें मी वर्णू शके न वचनांनीं ॥ ८५ ॥
विरह नि बहु उत्कण्ठा रोग असंख्यात दुःखमरणांनीं।
झाले अनन्तवेळां जीवाला शोक घेइ हें स्वमनीं ॥ ८६ ॥
खालीं वरती तिरपें चोहिकडे स्थान या जगांत नसे।
जन्मजरामृति आदिक दुःखें जीवा न लाभती ऐसें ॥ ८७ ॥
भवसागरांत फिरतो जीव सदा कर्मवायुवेगानें।
नृभविं स्त्रीतनु असली मेळविली गे त्वदीयजीवानें ॥ ८८ ॥
शुभ-अशुभकर्मयुक्ता असशी तूं प्राप्त जाहला तुजला।
अभिराम राम सुगुणें पति मैथिलि[६]! जो शुभोदयी नि भला ॥ ८९ ॥
पुण्योदय तव होता जोवरि सुख भोगिलेस त्यासह तूं।
पापें आतां आलें दुःसह तुज दुःख यांत नच किन्तु ॥ ९० ॥

---

१ उत्तम. २ शास्त्राचा अर्थ. ३ चिन्तन कर. ४ जिनेश्वर.
५ मरणसमयीं. ६ मिथिलदेशाचा राजा जनक त्याची कन्या सीता ती मैथिली.

राक्षसपतिनें तुजला लङ्काद्वीपांत हरुनि जें नेलें ।
अकराव्या दिनिं कळतां पतिवार्ता भोजनास तूं केलें ॥ ९१ ॥
प्रतिपक्ष मारिल्यावरि सतीशिरोमणि पुनः गृहा रामें ।
तूं आणिलीस रामीं चित्त तुझें जल दुधांत जेवि रमे ॥ ९२ ॥
गर्भवती तूं झालिस अशुभोदय दुःख द्यावया आला ।
दोषावाचुनि तुजला जननिन्दासर्प हाय गे डसला ॥ ९३ ॥
सज्जनपुष्पगृहा जो दुर्वाणीनें प्रदीप्त खल करितो ।
अत्यन्त तीव्र पापी अग्नीनें शीघ्र भस्म होवो तो ॥ ९४ ॥
तूं परमधन्य असती देवि ! तुझें श्लाघ्यवृत्त गे आहे ।
जिनमन्दिरनमनाचे डोहाळे जाहले तुला पाहे ॥ ९५ ॥

(वज्रजंघराजा स्वतःची माहिती सांगत आहे.)

सच्छीलशालिनी तूं अद्यापि तुझें सुपुण्य आहे गे ।
वनिं गज धरण्यास्तव मी आलों दिसलीस देवि शुभयोगें ॥ ९६ ॥
इन्द्राच्या वंशामधिं जन्म जयाचा प्रसिद्धशा झाला ।
आचरण शुभ जयाचें गजवाह सुनाम हें असे ज्याला ॥ ९७ ॥
राणी सुबन्धु नामें शीलमण्यांची असेचि जी खाणी ।
मी उभया सुत झालों नाम असे वज्रजङ्घ मम जाणी ॥ ९८ ॥
मी पुण्डरीकपत्तन-नृपति असे मजशि मान तूं भाऊ ।
तूं वडिल-धर्मभगिनी आतां माझ्या पुरास गे जाऊ ॥ ९९ ॥
हे भगिनि शोक काढुनि टाक मनांतील आणि चल मोदें ।
केला जरि तो कितिही कार्याची सिद्धि मानवास न दे ॥ १०० ॥
तूं माझ्या पुरिं राहा पश्चात्तापें अवश्य येईल ।
अन्वेषण करुनि तुझें राघव आहे खरा दयाशील ॥ १०१ ॥
होतां प्रमाद पडलें सुरत्न उज्ज्वल अमूल्य कोण धनी ।
हुडकित नाहीं त्याला हुडकित येईल राम समज मनीं ॥ १०२ ॥
यापरि सान्त्वन केलें असतां सीतामनास सन्तोष ।
वाटे परम असे हा बन्धु मला लाभला सुगुणकोष ॥ १०३ ॥
तूं सुमति शूर सज्जन-वत्सल शुभ सत्त्ववन्त आहेस ।
भ्राता सम्यग्दर्शन माझा हृदयांत धरिशि सविशेष ॥ १०४ ॥

गुण साधुतुल्य असती व्रतगुणशीलादिपालनीं चतुर ।
भ्राता असा मिळाला मजला जो सकल सद्गुणाधार ॥ १०५ ॥

[ जाति– चन्द्रकांत ]

सत्पुरुषाचें चरित्र सन्तत निर्दोषचि असतें ।
परोपकारीं नियुक्त लोकां सत्पथ दाखवितें ॥ १०६ ॥
जिनमति तत्पर चित्त जयाचें त्याचा हरि शोक ।
यास्तव त्याचें चिन्तन सन्तत करिती बुधलोक ॥ १०७ ॥
सीता वदली वज्रजङ्घ नृप पूर्व-भव-भ्राता ।
सत्य जयाचें प्रेम मजवरी हरिली मम चिन्ता ॥ १०८ ॥
जो सूर्यासम विशुद्ध निर्मल अज्ञानास हरी ।
दास जिनाचा तोचि वन्धु मम शोका झणि वारी ॥ १०९ ॥

इत्यार्षे पद्मपुराणे रविषेणाचार्यप्रोक्ते पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सीतासमाश्वासनं नाम अष्टानवतितमं पर्व ॥ ९८ ॥

# नव्याण्णवव्या पर्वांतील कथा.

एका सुंदर पालखींत वज्रजङ्घानें सीतामातेला बसविलें. व आपल्या सेनेसह तो निघाला. पुण्डरीक नगराला येण्यासाठीं तीन दिवस लागले. वाटेंत वज्रजंघाच्या अनेक सामंतांनीं व पाटील वगैरे ग्रामाधिकाऱ्यांनीं सीतामातेचें दर्शन घेतलें. त्यांना मोठा आनंद वाटला. पुष्कळ धनिक शेतकऱ्यांनीं अनेक नजराणे सीतामातेला अर्पून नमस्कार केला. अनेक राजांनींही तिला वंदन करून आनंद व्यक्त केला. वज्रजंघराजा सीतासतीसह येत आहे ही वार्ता समजल्यावर सर्व नागरिकांनीं पुण्डरीकशहर तोरणें ध्वजादिकांनीं शृङ्गारलें. सर्व रस्त्यावर सुगंधिपाण्याचा सडा टाकून त्यावर सुगंधित पुष्पें अंथरलीं. याप्रमाणें सीतामातेचें सर्व नागरिकांनीं चांगलें स्वागत केलें.

राजा वज्रजंघानें सीतामातेसह नगरांत प्रवेश केला. एक उत्तम प्रासाद त्यानें तिला राहावयास दिला. सर्व नोकर तिची आज्ञा मस्तकावर हात जोडून मानीत असत. जे जे नजराणे सामंताकडून येत असत राजावज्रजंघ ते ते सीतामातेकडे पाठवीत असे. या नजराण्याचा उपयोग सीतामाता जिनपूजन, सत्पात्रदान आदि पुण्यप्रद कार्यांत करीत असे.

इकडे कृतान्तमुख सेनापति रथ घेऊन अयोध्येंत रामचंद्राजवळ खालीं तोंड करून उभा राहिला व म्हणाला– " प्रभो, आपल्या आज्ञेप्रमाणें जेथें सिंह, वाघ, लाण्डगे आदि क्रूर प्राणी फिरतात अशा वनांत मी सीतामातेला सोडून आलों आहे. तेथें सिंह, वाघ यांची गर्जना ऐकून हरिण बालकांचें भीतीनें हृदय फाटून जातें.

हे प्रभो, सीतामातेनें आपणास याप्रमाणें संदेश सांगितला आहे– " नाथ, आपण आत्महितासाठीं श्रीजिनेश्वरांची भक्ति करा. ती सोडू नका. माझें आपल्यावर अतिशय प्रेम असतांही आपण माझा त्याग केला तसा श्रीजिनभक्तीचा मात्र त्याग

करूं नका. दुष्ट लोक ज्या कोणाचीही निंदा करितात पण सुबुद्धि मनुष्यांनीं विचार करून त्याज्य व अत्याज्य ठरवावें. मी निर्दोष असतांही माझे दोष दुष्टांनीं सांगितले व आपण माझा त्याग केला पण मिथ्यात्वी लोक निंदा करितात म्हणून उत्तम धर्मरत्नाचा त्याग करूं नका. अशी आपणास माझी नम्र विनंति आहे.

मी शुद्ध असतांही मला वनांत आपण सोडलें हरकत नाहीं पण सम्यग्दर्शनाची विशुद्धि केव्हांही त्यागू नका. कारण माझ्या त्यागानें आपणास याच एका भवांत दुःख होईल पण सम्यग्दर्शनत्यागानें अनेक भवीं दुःखें भोगावी लागतील. पुरुषाला साम्राज्य, निधि, स्त्री, वाहन आदिकांची प्राप्ति होणें सुलभ आहे पण सम्यग्दर्शनमणि त्यापेक्षाही दुर्लभ आहे. राज्य मिळालें असतां पापानें राजा नरकांत जातो पण सम्यग्दर्शन प्राप्त झालेल्या व्यक्तीला ऊर्ध्वगति– अर्थात् उच्चदेवपद प्राप्त होतें. यास्तव जिनधर्माचा त्याग आपण करूं नये" असा संदेश प्रभो, आपणास सांगितला आहे.

प्रभो, त्या भयंकर वनांत वीरपुरुषांचीही भीतीनें गाळण उडते अशा वनांत मी सीतामातेला सोडून आलों आहे.

हें सेनापतीचें भाषण ऐकून दुष्टलोकांचें भाषण ऐकून सीतेला त्यागलें हें अकार्य माझ्या हातून घडलें अशा विचारांनीं रामचंद्राला फार दुःख झालें व ते मूर्च्छित होऊन पडले.

पुष्कळवेळानें ते सावध झाले. अपराधावाचून मी निर्दोष सीतेचा त्याग केला. आतां त्या घोर वनांत सीता जिवन्त राहणें शक्य नाहीं. पूर्वी वनवासांत तूं जें दुःख भोगलेस त्याहूनही अतिशय भयंकर दुःखांत दुष्टलोकांचें वचन ऐकून मी तुला टाकलें हें मी अत्यंत अयोग्य कार्य केलें. तेथें दुष्ट सिंहादि प्राण्यांनीं तुझी काय अवस्था केली असेल कोण जाणें. मी दुष्टपणानें तुला वनांत टाकलें पण तूं मला प्रेमानें हितकारक संदेश पाठविलास. माझ्यावरचें तुझें प्रेम तिळमात्रही कमी झालें नाहीं. रत्नजटी किंवा हनुमन्तासारखे कोण सत्पुरुष तुझें कुशल मला कळवतील बरें? या व अशा तऱ्हेच्या विचारांनीं रामचंद्र दुःखित होऊन पुनः मूर्च्छित झाले.

पुनः जेव्हां रामचंद्र सावध झाले तेव्हां लक्ष्मणानें तेथें येऊन रामचंद्राला समाधान उत्पन्न करण्यासाठीं याप्रमाणें भाषण केलें. "प्रभो, आपण शोक करूं नका. धैर्य धारण करा. या जगांत सगळ्या लोकांना आपल्या पूर्वार्जित कर्मापासून सुख व दुःख मिळतेंच. फक्त सीताच पूर्वार्जितानें दुःखी झाली असें समजूं नका. आकाश,

पर्वत, हिंस्रपशूंनीं व्यापलेलें वन कोठेंही प्राणी गेला तरीही त्याचें पूर्वार्जित शुभ असेल तर— त्याला अनिष्टापासूनही सुख मिळेल व अशुभानें सुखकारक वस्तुही दुःखदायकच होतील." इत्यादिक भाषणानें आपल्या बंधूचें समाधान करण्याचा त्यानें प्रयत्न केला पण त्यांचें दुःख कमी झालें नाहीं. पुष्कळ दिवसपर्यंत रामचंद्र दुःखी राहिले. त्यांनीं सीता मरण पावली असें मानून तिचें मरणोत्तर कार्यासाठीं नऊ महिनेपर्यंत कोषाध्यक्षाला बोलावून दीनदुबळे याचक लोकांना दान दिलें.

सीतामातेच्या त्यागानें देशांतील सर्व लोक दुःखी झाले. तिनें ज्यांचें रक्षण केलें होतें अशा पशुपक्ष्यांनींही अन्न त्यागलें. त्यांच्या डोळयांतून घळघळ अश्रु वाहू लागले व त्यांच्या शरीराला कंप सुटला.

रामचंद्रांना धुळीनें जिचें अंग मलिन झालें आहे, जिच्या डोळयांतून अश्रुधारा वाहत आहेत, जी पर्वताच्या गुहेंत राहिली आहे अशी सीता स्वप्नांत दिसत असे. नेहमी राममुखांतून सीता सीता सीता असे शब्द निघू लागले.

असे बरेच दिवस गेल्यावर हळूहळू त्यांचा शोक कमी झाला. व आपल्या आठ हजार राण्यामध्यें ते रममाण होऊं लागले. याप्रमाणें त्यांचा शोक कमी झाला व ते दोघे बंधु समुद्रवलयांकित पृथ्वीचें पालन करूं लागले.

त्यांच्या राज्यांत नेहमी सुभिक्ष राहत असे. इतिभीतिपासून त्यांची प्रजा नेहमी दूर असे. शुभकर्मोदयानें युक्त अशा या राम-लक्ष्मणांनीं प्रजेला नेहमी आनंदित केलें. व नानासुखांचा ते उपभोग घेऊं लागले.

---

# नव्याण्णवावें पर्व.

[ वज्रजंघाबरोबर सीतेचें पुण्डरीकनगरास प्रयाण ]

सुन्दर रचना असे जियेची रम्य विमान जणु ।
दर्पण-चामर-तोरणमाला-शोभित किति वर्णू ॥ १ ॥
सुन्दरवस्त्रें सजविलि जी बहु ऐशा शिविकेंत[1] ।
बसली अपुल्या विचित्रकर्मा चिन्ती स्वान्तांत[2] ॥ २ ॥
मागें पुढती सेना चाले विपिना लङ्घाया ।
त्रिदिन लागले पुण्डरीकशुभदेशामधिं याया ॥ ३ ॥
शेतें सगळीं नानाधान्यें आच्छादुनि गेलीं ।
गांवें जेथिल संनिधें[3] संनिध बहु वैभवशाली ॥ ४ ॥
नगरें पाहुनि त्या देशांतिल तृप्त न मन होतें ।
स्वर्गपुरासहि उद्यानादिक लज्जित करिती ते ॥ ५ ॥
वाटेमध्यें पाटिल आदिक अधिकारी येती ।
सीतादर्शन घेउनि मोदें स्तोत्र तिचे गाती ॥ ६ ॥
भगवति ! आम्हां सुमान्य अससी तव दर्शन पूतें[4] ।
घेतां जातें पाप लयाला वाढे पुण्य सितें[5] ॥ ७ ॥
शेतकरी ही बहुधन येती घेउनि नजराणे ।
वन्दुनि जाती अर्पुनि चरणीं प्रमुदित होति मनें ॥ ८ ॥
राजे येती जे देवोत्तम करिती अर्घ्य तिला ।
पदोपदीं स्तुति करिती भावें वन्दुनि भूमितला ॥ ९ ॥
पुण्डरीकपुरसंनिध आली अनुक्रमें सीता ।
जें पुर सुन्दर अतिशय होतें जेथें धनिजनता[6] ॥ १० ॥
साध्वीसीता आली आज्ञा ऐकुनि भूपाची ।
अधिकृतलोकें[7] केली विविधा शोभा नगराची ॥ ११ ॥

---

१ पालखींत. २ मनांत. ३ जवळ जवळ. ४ पवित्र. ५ शुभ्र.
६ श्रीमंत लोकाचा समूह. ७ अधिकारी लोक.

राजपथावरि सिंचन करिती सुरभितनीराचे[1] ।
पुष्पें पसरुनि शोभविती पथ विविधाकाराचे ॥ १२ ॥
इन्द्रधनुष्यासम बहु रंगित तोरणपङ्क्तीनें ।
द्वारें शोभित केलीं कलश स्थापुनि मुखिं पानें ॥ १३ ॥
जागोजागीं शोभविले ध्वज माला बान्धून ।
मन्दानिल त्या कम्पित करितो जणु बहु मोदून ॥ १४ ॥
ध्वजहस्तांनीं नर्तन करि तें आनन्दें नगर ।
स्वागत करण्या नगरद्वारीं जमले बहु पौरें[2] ॥ १५ ॥
सदन नि तोरण वेशी कुम्भध्वज पथ हे सारे ।
स्वागत करिती चैतन्याचें भरलें जणु वारें ॥ १६ ॥
बधिर दिशा जीं करितीं वाद्यें वाजत बहु होतीं ।
भाट नि बंदी सीतासुगुणा मोदें किर्ति गाती ॥ १७ ॥

[ वज्रजंघानें दिलेल्या प्रासादांत सीतेचा निवास. ]

आश्चर्यानें विस्मित झालें मन ज्यांचे पौर ।
प्रवेशणाऱ्या नगरीं बघती सीतेला स्वैर ॥ १८ ॥
वज्रजङ्घनृपसौधासंनिध होता प्रासाद ।
राहे त्यामधिं साध्वीसीता त्यजुनि मनःखेद ॥ १९ ॥
वज्रजङ्घ जणु भामण्डल[3] हा आदर सतत करी ।
अञ्जलि जोडुनि आज्ञा मानिति नोकर शीघ्र शिरीं ॥ २० ॥
जे नजराणे विनम्र होउनि देती सामन्त ।
वज्रजङ्घ ते सतीस देई होउनि मनिं मुदित ॥ २१ ॥
तेणें सीता जिनपतिपूजन सत्पात्रीं दान ।
कार्यें ऐशीं करिती झाली पुण्यांची खाण ॥ २२ ॥

[ कृतान्तवदन सीतेला वनांत मी आपल्या आज्ञेप्रमाणें सोडलें
हें सांगून तिचा संदेशही रामाला सांगतो. ]

कृतान्तवदनहि इकडे अतिशय दुःखी होऊन ।
रामापुढती राहि उभा तो करुनि अधोवदन ॥ २३ ॥
वदला दुःखें स्वामिन् आपुल्या वचनें घोरवनीं ।
पतिव्रतामणि सीता त्यजिली ऐकावें श्रवणीं ॥ २४ ॥

---

१ सुगंधीपाण्याचे. २ नगरवासी. ३ भामण्डल हा सीतेचा भाऊ.

जेथें नाना श्वापदं[1] भयकर गर्जन करितात ।
वेतालासम तरुवल्लीचा पसरे तमदाट ।। २५ ।।
निसर्ग वैरें व्याघ्र नि रेडे सन्तत लढतात ।
क्रूर सिंहगण धरुनी हरिणा जेथें खातात ।। २६ ।।
शैलगुहामधिं केशरिगर्जनं होतें वहुघोर ।
हरिणशिशूंचें तेणें फाटें कोमल शीघ्र उर ।। २७ ।।
वाटे जेथें यमहृदया भय ऐशा घोर वनीं ।
त्यजिली नाथा पूज्यसती मी ऐकावी कानीं ।। २८ ।।
शोकाश्रूंनीं डोळे भरले अशी सती सीता ।
कथिती झाली सन्देशातें तो ऐका आतां ।। २९ ।।
हे श्रीरामा नाथा आपण आत्महितासाठीं ।
श्रीजिनभक्ति न सोडा मजसम आलम्बन कांठी ।। ३० ।।
स्नेहप्रेमासक्त असून हि मजला त्यागियलें ।
ज्यानें तो नृप जिनभक्तीसहि सोडिल हें कळलें ।। ३१ ।।
ज्या कोणाची खलजन निन्दा वचनवली करिती ।
अविचारें, परि करिति विचारा सन्मति निजचित्तीं ।। ३२ ।।
निर्दूपण मी असतां ही मम दोष खलें कथिले ।
मिथ्याज्ञानी सुधर्मरत्नीं दोष जरी वदले ।। ३३ ।।
आपण नाथा मजला त्यजिले तसा सुधर्ममणि ।
त्यागु नका ही विनती माझी जो सद्गुणखाणी ।। ३४ ।।
मजला भीषण विपिनीं त्यजिलें तरिही दोष नसे ।
सम्यग्दर्शनशुद्धि न सोडा सुगुणचि जींत वसे ।। ३५ ।।
वियोग माझा झाला देइल एकभवीं दुःख ।
सम्यग्दर्शनविनाश परि तो भवभविं वहु असुख ।। ३६ ।।
पुरुषा लोकीं सुलभ निधि स्त्री वाहन आदि जरी ।
साम्राज्याहुनि दुर्लभ सम्यग्दर्शनमणिहि तरी ।। ३७ ।।
मिळवुनि राज्या पापें जातो राजा नरकांत ।
सम्यग्दर्शनतेजें ऊर्ध्वचि गति सुरलोकांत ।। ३८ ।।

---

१ हिंस्रपशु.

सम्यग्दर्शनरत्नें ज्यानें आत्मा भूषविला ।
इहपरलोकीं कृतार्थ तेणें त्याला नित केला ॥ ३९ ॥
स्नेहें भरला निरोप ऐसा सीतेनें कथिला ।
ऐकुनि निर्मल मति कवणाची होइल नच बोला ॥ ४० ॥

[ सिंहरवा अटवीचें वर्णन. ]

नाथा ! सीता असे स्वभावें अतिशय भीरु गमे ।
वीरनराचें जेथें मनही भय पावे न रमे ॥ ४१ ॥
जेथें भासुर उग्र नि यमसम सिंहादिक असती ।
क्रोधें दिसतां मानव धावत गज त्यावर येती ॥ ४२ ॥
बोराटीच्या कण्टकजाळीं चमरीशेपूट[१] ।
अडके जेणें त्या बहु दुःखी होती चित्तांत ॥ ४३ ॥
पाणी आहे मृग भ्रमानें धावति बहु दूर ।
कपिकच्छूंच्या[२] रजसंगानें चञ्चल कपि फार ॥ ४४ ॥
तृष्णेनें जे जीभ भयंकर काढुनि बाहेर ।
क्रूर असे वृक दिसती जेथें पदोपदीं फार ॥ ४५ ॥
वारे जेथें मोठे वाहुनि धूळ नभीं नेती ।
धुन्द होति दशदिशा नि पसरे तिमिर वनप्रान्तीं ॥ ४६ ॥
अजगर मोठे वृक्षा वेढुनि टाकिती पाडून ।
गजचीत्कारा ऐकुनि पळती मृगगण जेथून ॥ ४७ ॥
साळै[३] भयंकर कोपुनि सोडिति अङ्गांतुनि काटे ।
घुसतां पळती व्याघ्र मृगेन्द्रहि तैसें शत चित्ते ॥ ४८ ॥
मधमाशा बहु सोडुनि पोळे हत्तीवरि वसती ।
डसतां त्यातें सर्ववनामधिं धावत ते सुटती ॥ ४९ ॥
ऐशा विपिनी देवा आलों सीता सोडून ।
तेथें करिल क्षणभरिही ती धारण न प्राण ॥ ५० ॥
सेनानीचें भाषण ऐसें ऐकुनि भयद मनीं ।
चिन्ती केलें खलवाक्यें मी अकार्य अघखाणी ॥ ५१ ॥

---

१ वनगायी. २ खाजकुयरीची वेल व तिच्या शेंगा. ३ तायाळ नामक प्राणी याच्या अंगाला काटे असतात.

अतिशयभीरू सीता कोठें दुःसह दुःख कुठें ।
निःसीमा मम निष्ठुरता ही पाप असे मोठें ॥ ५२ ॥

[ सीतात्यागामुळें राम शोक करितो. ]

चिन्तेनें या मूर्च्छा येउनि पडला भूमिवरी ।
बहुवेळानें सावध होउनि राघव शोक करी ॥ ५३ ॥
हे वैदेही बोल बोल मज शीघ्र सखे बोल ।
तव विरहें मम जीवित झालें दुःखाचें मूल ॥ ५४ ॥
शील[1] तुझें गे अनुपम आहे मनही निष्पाप ।
हितकर आणि प्रिय तव भाषण हरितें सन्ताप ॥ ५५ ॥
अपराधाविण निर्दय होउनि तुजला मी त्यजिलें ।
क्रूर श्वापद जेथें विहरति विपिनीं हाय खलें ॥ ५६ ॥
माझ्यावरती प्रेमा अति तव असे चकोराक्षी ।
भोगविवर्जित जातिल कैसे दिन मी नच लक्षी ॥ ५७ ॥
लज्जाविनयें पूर्ण अशी तूं कोठें गेलीस ।
एकाकी तूं वससिल कैशी सोसुनि विरहास ॥ ५८ ॥
तव सुरभितश्वासें भुङ्गे करितचि झङ्कार ।
येतां त्यांना शा वाराया तुज भीति गमे फार ॥ ५९ ॥
जाशिल कोठें भीत्याकुल तूं जैशी वनि हरिणी ।
दुःसह दुःखा प्राप्त जहालिस घोर अशा विपिनीं[2] ॥ ६० ॥
सुलक्षणी अन् कमलगर्भ मृदु केवि तुझे पाय ।
सहतिल कण्टककर्कश भूमिस्पर्शा अनुपाय ॥ ६१ ॥
कार्याकार्यी विवेक ज्यांना नाहीं म्लेच्छ खल ।
असेल त्यांनीं पकडुनि नेलें जे असती प्रबल ॥ ६२ ॥
पूर्वी दुःखें वनि बहु तुजला जीं दारुण झालीं ।
त्याहुनि अतिशय दुःखस्थिति गे आतां तव आली ॥ ६३ ॥
घनतिमिरामधिं रात्रीं दुःखें असतां झोपेंत ।
झाली असशिल दुष्टगजाच्या चरणें आक्रान्त[3] ॥ ६४ ॥
गृद्ध नि श्वास्खल कोल्हे घुबडें आदि प्राण्यांनीं ।
गजबजलेल्या विपिनीं बसणें शक्य न धैर्यानीं ॥ ६५ ॥

१ पातिव्रत्य. २ वनांत. ३ दाबली गेलेली, चिरडलेली.

दाढा ज्याच्या भयंकर[1] असती क्षुधित व्याघ्रानें ।
केली सीते! काय अवस्था कोण तुझी जाणें ॥ ६६ ॥
किंवा ज्याची चञ्चल जिह्वा ऐशा सिंहानें ।
असेल केली दशा विचारहि असह्[2] तिचा स्वमनें ॥ ६७ ॥
ज्याच्या ज्वाला उंच तरूसहि सुभस्म करितात ।
असेल झाली वनानलें[3] तव अशुभदशा त्वरित ॥ ६८ ॥
अथवा ज्योतिश्चक्रपतीच्या[4] दुःसह किरणांनीं ।
छायास्थानीं जाया निघतां पीडित होवोनी ॥ ६९ ॥
मध्यें मरण प्राप्त जहालें असेल हाय तुला ।
दुष्टपणाला माझ्या लोकीं सांपडते न तुला[5] ॥ ७० ॥
दुष्ट अशाही माझ्याविषयीं प्रीति न तव घटली ।
परि तव होउनि विदीर्ण मानस मृति दुःखद झाली ॥ ७१ ॥
रत्नजटीसम हनुमन्तासम आतां मज कोण ।
वार्ता कळविल तव कुशलाची प्रश्न असे गहन ॥ ७२ ॥
प्रिये मनस्विनि[6], महाशीलवति कोठें असशील ।
गेलिस कोठें शुभे वदे तूं मला दयाशील ॥ ७३ ॥
कृतान्तवक्त्रा, सत्यचि कां तूं प्रिय मम सीतेला ।
विपिनीं दारुण सोडियलें वद हें नच योग्य तुला ॥ ७४ ॥
नाथा! अपुली कान्ता सीता त्यजिली मी न वनीं ।
वाणी वद तूं गोड सुधेसम होइल मोद मनीं ॥ ७५ ॥
यापरि वदला रामप्रभु जंव सेनापति खिन्न ।
खालीं पाही लज्जित होउनि धरुन मुखीं मौन ॥ ७६ ॥
वचन मुखांतुनि एकहि न निघे ऐसें पाहून ।
सीतादुःखस्मरणें मूर्च्छित पडला होऊन ॥ ७७ ॥
अतिशय कष्टें कृतान्तवक्त्रें मूर्च्छा स्वामीची ।
करुनी शीतल बहूपचारा हरिली ती साची ॥ ७८ ॥

[ लक्ष्मणाचें रामास समजावणें. ]

---

१ भयंकर. २ असह्य. ३ वनांत पेटलेल्या अग्नीनें. ४ सूर्याच्या. ५ माप, उपमा. ६ शहाणी.

आला लक्ष्मण तेथें तेव्हां वदला भावास ।
शोका अन्तरिं विभो धरा नच व्हा धैर्यावास[1] ।। ७९ ।।
विश्वीं सगळ्या मनुजा पूर्वार्जित फल मिळतेंच ।
वैदेहीला फक्त मिळे तें ऐसें नच साच ।। ८० ।।
या जगिं ज्याला सौख्य नि दुःख नि अहित नि कल्याण ।
मिळण्याचें असे निमित्तें मिळतें तें जाण ।। ८१ ।।
आकाशामधिं किंवा श्वापदगणवृंतगहनवनीं[2] ।
पर्वतशिखरीं नेलें कोणा रक्षी पुण्य गणी ।। ८२ ।।
सीतात्यागश्रवणें भरतावनिमधिं[3] सकल जन ।
झाले दुःखी चतुर दरिद्री धनी नि मूर्ख गण ।। ८३ ।।
प्रजा जहाली शोकतप्त बहु अश्रुगणें ओलें ।
हृदय तियेचें होउनि जणु तें गळुनी कीं गेलें ।। ८४ ।।
शोक व्याकुल होउनि अतिशय रुदन करी जनता ।
हिमहतकमलासम[4] ती निष्प्रभ वदनानें क्लान्ता[5] ।। ८५ ।।
दुष्टजनांच्या वचनाग्नीनें होरपळे सीता ।
गुणधान्याच्या उत्पत्तीची जणु ही भूमाता ।। ८६ ।।
कोमलपदपल्लवा[6] कुठें ही गेली जनकसुता ।
उत्तमशीलाधार भूमि जणु जी गमली सीता ।। ८७ ।।
दुष्टजनांच्या वचनतुषारें राघवहंसानें ।
सेवित झाली सीताबिसिनी[7] दग्धचि नियमानें ।। ८८ ।।
जेवि सुभद्रा भरतेशाची सर्वाचारांत ।
निपुण नि सरला तेविच सीता प्रजा म्हणे तात ।। ८९ ।।
सौख्याची ही मूर्तिमन्त निधि जणु ही लोकांचा ।
गेली कोठें सीतामाता प्राणचि सकलांचा ।। ९० ।।
सूर्याविंचुनि शोभे नभ नच चन्द्राविण रजनी[8] ।
स्त्रीरत्नाविण साकेताही शोभे नैव जनीं ।। ९१ ।।

---

१ धैर्याचें घर. २ हिंस्रपशुसमूहानें भरलेलें. ३ भरतक्षेत्रांत. ४ थंडीनें करपून गेलेल्या कमलासमान. ५ कोमेजलेली. ६ कोमल पाल्वीप्रमाणें जिचे पाय आहेत. ७ कमलांची वेल. ८ रात्र.

झाली नगरी मृदंग-वीणामधुररवें रहित ।
करुणाक्रन्दन[1] जेथें तेथें दिसलें जनतेंत ॥ ९२ ॥
मार्गीं उपवनिं वनीं नद्यांच्या तटावरी सदनीं ।
बाजारामधिं पसेर जनताशोकाचें पाणी ॥ ९३ ॥
पडत्या झाल्या सन्तत जनतानेत्रांतुनि धारा ।
चिखलें भरली वर्षाकालीं जैशी सकलधरा ॥ ९४ ॥
गद्गदकण्ठें परोक्षही त्या शंसुनि सीतेस ।
गुणपुष्पांची वृष्टि तियेवरि करिती सोल्हास ॥ ९५ ॥
करुनि तिच्यामधिं चित्ता तत्पर पूजिति सकल तिला ।
सर्वसतीशिरिं ठेवियलें पद जिनें गुणें अतुला[2] ॥ ९६ ॥
स्वयं जियेनें प्रेमें पालन केलें खग चतुर ।
जलान्न सोडुनि कम्पिततनु[3] ते रडले बहु वार ॥ ९७ ॥
सर्वजनांच्या चित्तीं होउनि सुगुणस्मृति खेदें ।
शोक अनावर करिती नच कवि त्याला उपमा दे ॥ ९८ ॥
हे मतिमन्ता पश्चात्ताप न उपाय एक असे ।
चिन्ता त्यागुनि धैर्या सेवी विपुलचि सौख्य वसे ॥ ९९ ॥
यापरि बोलुनि हरिनें रामा प्रसन्न मनिं केलें ।
शोका किञ्चित् त्यागुनि निजमन कर्तव्यीं नेलें ॥ १०० ॥
सीतेविषयीं मृतिकार्यास्तव कांहिंजना कथिलें ।
'भद्रकलश' या मनुजा रामें बोलावुनि म्हटलें ॥ १०१ ॥
सीतादेशें पूर्वी जैसें केलें बहुदान ।
तैसें सम्प्रति सीतोद्देशें सावध करुनि मन ॥ १०२ ॥
जैशी अपुली आज्ञा ऐसें बोलुनि शुभहृदयीं ।
कोषाध्यक्षें याचक लोकां दान दिलें सदयी ॥ १०३ ॥
नवमासावधि जें जें इच्छिति याचक तें त्यांना ।
अक्षय दिधलें निषेधिलें नच तयें कदापि कुणा ॥ १०४ ॥
अष्टसहस्रहि नारी रामा सेविति जरि सतत ।
सीतेला तो स्वमनें निमिषहि त्यागि न अनुरक्त ॥ १०५ ॥

---

१ दया उत्पन्न होईल असें रडणें. २ अनुपमगुणाची. ३ ज्यांचें शरीर थरथरत आहे.

वचन तयाचें सीताध्वनिमय रात्रन्दिन झालें ।
चोहिकडे त्या पदार्थ सगळे सीतामय दिसले ॥ १०६ ॥
भूधूलीनें मलिन जहाली शैलगुहावासी ।
ऐशी सीता राम स्वप्नीं सदा वघे विवशी[1] ॥ १०७ ॥
अश्रुजलाच्या धारा वाहति नेत्रयुगांतून ।
सतत जियेच्या स्वप्नीं सीता पाही राम-मन ॥ १०८ ॥
विरहीहृदयें दृढतर[2] शोकी चिन्ती राम मनीं ।
वाष्पाच्छादित लोचन यापरि सतत दिनीं रजनीं ॥ १०९ ॥
सुशीलहृदया सुन्दर सीता गेली परलोकीं ।
तरिही सोडि न मजला ऐसें राघव अवलोकी ॥ ११० ॥
विरलचि झाला अतिशय हळु हळु शोक मनांतून ।
अष्टसहस्रस्त्रीगणि रमला राघव हर्षून ॥ १११ ॥
दिव्यसुदर्शनचक्र नि हल हीं अस्त्रें दोन करीं ।
ज्यांच्या करिती प्रेम परस्परिं राघव तेवि हरी ॥ ११२ ॥
सोधर्मैशानेन्द्र[3]युगासम सुराज्य ते करिती ।
सद्गुणसागर अन्यायातें कदापि नाचरति ॥ ११३ ॥
सागररशना[4] अखण्ड पृथ्वीपालन ते करिती ।
सुभिक्ष नान्दे सन्तत राज्यीं न ईति[5] नच भीति ॥ ११४ ॥
सुरलोकासम मानव जेथें सुकोशलानगरीं ।
सुप्रभ-पुरुषोत्तमासमानचि नान्दति रामहरि ॥ ११५ ॥
शुभकर्मोदययुत हे दोघे प्रजाजनां देती ।
सदैव मोद नि विविधसुखांचा अनुभवही घेती ॥ ११६ ॥
प्रतिदिनिं राघव जिनेन्द्रपूजनिं होउनि जिनदास ।
सुभक्ति करितो रविसम तेजा धरी न मनिं आस ॥ ११७ ॥

इति रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे रामशोकाभिधानं नाम नवनवतितमं पर्व ॥ ९९ ॥

---

१ विरहदुःखी. २ अतिशय शोक करणारा. ३ पहिला व दुसरा या स्वर्गाच्या इन्द्राप्रमाणें. ४ समुद्र हाच कमरपट्टा धारण करणारी. ५ अतिवृष्टि, अनावृष्टि, टोळ, उंदीर, पोपट, स्वसैन्य व शत्रुसैन्य या सातांनीं धान्याचा नाश होऊन दुष्काळ पडतो.

# शंभराव्या पर्वांतील कथासारांश.

राजा वज्रजङ्घानें सीतेला आपल्या वडील बहिणीप्रमाणें मानिले होतें. एका मोठ्या सुंदर प्रासादांत ती राहत होती. तिचा गर्भ जसा जसा वाढूं लागला तसे तसे तिच्या स्तनाचे अग्रभाग अधिक काळे दिसू लागले. तिच्या सर्व शरीरावर पांढरेपणा पसरला. गर्भभारानें तिची गति मन्द झाली. रत्नांच्या जमिनीवरून चालत असतां तींत पडलेल्या प्रतिबिंबाच्या मिषानें जणु भूदेवी तिची सेवा करूं लागली असे वाटत असे. रात्रीं झोपेंत स्वप्नांत कमलपत्राचे द्रोण आपल्या सोंडेंत धरून हत्ती तिला स्नान घालीत आहेत असें ती पाहत असे. ती नेहमी रत्नदर्पणांत आपलें मुख न पाहतां तेजस्वी तरवारींत पाहत असे. थट्टेनें जरी कोणी सेवकानें तिचा आज्ञाभङ्ग केला तरी तो तिला सहन होत नसे. वीणादिक मधुर वाद्यांचे स्वर तिच्या मनाला आवडत नसत. पण धनुष्याचे टंकार तिच्या मनाला फार सुखवित असत. पिंजऱ्यांतील सिंहांना पाहून ती आनंदित होत असे व अभिमानानें तिची मान कोणापुढेंही नम्र होत नसे.

याप्रमाणें नऊ महिने झाल्यावर श्रावण पूर्णिमेदिवशीं श्रवणनक्षत्रावर चन्द्र आला असतां ती आनंदानें प्रसूत झाली. तिला सर्व सुलक्षणयुक्त पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें सुंदरमुखाचे दोन पुत्र झाले. त्यांच्या जन्मसमयीं नगारे वगैरे अनेक वाद्यें वाजविलीं. राजा वज्रजंघानें बहिणीच्या प्रेमानें मोठा उत्सव केला. जन्मोत्सवांत राजानें पुष्कळ याचकांना दान दिलें व मदनापेक्षा अतिशय सुंदर अशा त्या बालकांचें त्यानें क्रमानें अनङ्गलवण व मदनाङ्कुश अशीं नावें ठेविलीं. क्रमें क्रमें ते वाढूं लागले. मातेला त्यांना पाहून फार आनंद होत असे. शरीरांची कांति अतिशय तेजस्वी असल्यामुळें ते आपला प्रभाव लोकावर पाडीत असत. त्यांच्या बालक्रीडा पाहून सीता आनंदित होत असे. स्वतःच्या बालक्रीडांनीं ते मातेला व वज्रजंघादिकांना आनंदवित असत.

याप्रमाणें वाढत जाऊन ते विद्याग्रहणाला योग्य वयाचे झाले. त्यावेळीं पुंडरीक नगरांत 'सिद्धार्थ' नामक एक क्षुल्लकव्रती आले होते. ते विहार करीत सीतेच्या प्रासादांत आहारासाठीं आले. आहार झाल्यानंतर त्यांनीं सीतेच्या दोन पुत्रांना पाहिले. त्यांची हकीकत त्यांनीं तिला विचारिली. सीतेनें दुःखव्याकुल होऊन सर्व हकीकत कळविल्यावर त्यांचेंही मन दुःखित झालें. व त्यांनीं तिच्या दोन पुत्रांना सर्वकलांचीं व शस्त्र, शास्त्र आणि अस्त्रांची माहिती– शिक्षण दिलें. त्यांची बुद्धि तीव्र असल्यामुळें ते थोड्याच दिवसांत शस्त्र-शास्त्रनिपुण झाले. त्यांच्या ज्ञानांची विद्वान् लोक प्रशंसा करूं लागले.

ते दोन पुत्र तरुण झाले. त्यांचें शरीर पुष्ट झालें. ते सर्वांना हिमाचल व विंध्यपर्वताप्रमाणें वाटत असत. त्यांच्याठिकाणीं पराक्रमादिगुण अतिशय वाढले होते. अतिशय वेगवान् असाही बाण ते लीलेनें पकडीत असत. अनेक दिव्यास्त्रें सोडणें व तीं आवरून घेणें यांचें ज्ञान त्यांना चांगलें झालें होतें. समुद्रवलयांकित पृथ्वीला वश करण्याचें सामर्थ्य त्यांना प्राप्त झालें होतें. त्यांचे हात शस्त्रें धारण केल्यामुळें काळे झाले नव्हते पण शत्रूंचा पराक्रमरूपी अग्नि शांत केल्यामुळें झाले होते. त्यांनीं तेजानें सूर्याला, कांतीनें चन्द्राला, गंभीरतेनें समुद्राला, ओजस्वीपणानें इंद्राला जिंकिले होते. पाण्यामध्यें क्रीडा करीत असतां मगरादिक जलचरांना त्यांतून ओढून काढीत असत. प्रचंड हत्तींनाही ते लीलेनें वश करीत असत. स्वतःच्या शरीरकांतीनें त्यांनीं सूर्याचे किरणही मंद केले होते. त्यांच्याठिकाणीं सत्त्व, पराक्रम व दान आदिक गुण प्रगट झाले होते. साहस, मान, रणकौशल्य यांत त्यांची बरोबरी करणारा वीर त्याकाळीं दुसरा कोणीही नव्हता. त्यांच्याठिकाणीं गुरूचा आदर करणें, जिनभक्ति करणें इत्यादिक गुण प्रगट झाले होते. त्यांचें नांव कानीं पडलें तरी शत्रूंच्या मनांत भीति उत्पन्न होत असे. ते लोकांना नारायण व बलिभद्राप्रमाणें वाटत होते. त्यांची कीर्ति त्यावेळीं अनेक देशांत पसरली होती. असे ते दोन सीतापुत्र पुण्डरीकनगरांत आनंदानें राहूं लागले.

# शंभरावें पर्व.

—०○:○:○०—

( सीतापुत्र– लवण व अंकुश यांचें वृत्त. )

श्रीवज्रजङ्घनृपगृहिं सीता सानन्द राहिली असतां ।
लवणाङ्कुशसम्बन्धी ऐकावें वृत्त सज्जनें आतां ॥ १ ॥

( गरोदरपणीं सीतेच्या शरीरांत झालेल्या अवस्था. )

सर्वप्रजाजनांच्या सितपुण्यें[1] ग्रहण जी असे केली ।
त्या सीतासाध्वीची देहाची यष्टि शुभ्रशी झाली ॥ २ ॥
सीताकुचाग्र झाले श्याम स्तनघटमुखाग्रमुद्रितसे ।
जणु पुत्रपान करण्यासाठीं हे शोभतात सुन्दरसे ॥ ३ ॥
सुस्निग्ध धवल डोळे सीतेचे दोन दुग्धसिन्धुच[2] कीं ।
माधुर्य ज्यांत भरले सुधारसाचें निधान जणु नाकीं[3] ॥ ४ ॥
सम्पूर्णमङ्गलांच्या वृन्दें जणु गात्रयष्टि[4] ही भरली ।
अत्यन्त मन्द झाले हितगुरुता जींत वाटतें आली ॥ ५ ॥
रत्नांच्या भूवरती हळू हळू टाकि पाउलें सीता ।
प्रतिबिम्बितकमलांनीं भू सेवा लागली करूं आतां ॥ ६ ॥
प्रसवाची समयेच्छा प्रतिबिम्बित जाहली कपोलांत[5] ।
ती लक्ष्मीसम भासे पुतळी शयनासमीप कीं शान्त ॥ ७ ॥
रात्रीं सौधतलावरि सीतास्तनिं चन्द्रबिम्ब जणु शोभे ।
श्वेतच्छत्र असे हें पुत्रयुगाचें अखण्ड नित्य उभें ॥ ८ ॥
सौधीं शयनावरती असतां ती झोपली सतीसीता ।
दाखविती चित्रें ही चामरसञ्चालनांत[6] तत्परतां ॥ ९ ॥
स्वप्नीं कमलदलाचीं पुटें जलें भरुनि घेउनि स्वकरें ।
अभिषेक तिचा करिती गजेन्द्र सीता सदैव पाहि खरें ॥ १० ॥
जेव्हां जेव्हां जागृत झोपेंतुनि जानकी सती होई ।
पाषाणाच्या पुतळ्यादेखिल जयशब्द बोलती पाही ॥ ११ ॥

---

१ उज्ज्वलपुण्यानें. २ दुधाचे समुद्र– क्षीरसागर. ३ स्वर्गांतील. ४ शरीराची काठी. ५ गालांत. ६ चामरें वारण्यांत.

परिवारांतुनि कोणा आपण बोलावुनी जना घ्यावें ।
येतां विचार कोमलवाणी अशरीर[1] ती निघे भावें ॥ १२ ॥
आज्ञाभङ्ग न साहे थट्टेनें तो जरी कुणी केला ।
जरि शीघ्रकार्य केलें चढवी रागेंचि ती सदा भ्रूलां[2] ॥ १३ ॥
मणिदर्पण असतां ही खड्गीं[3] मुख पाहणें रुचे तिजला ।
वीणारवादि न रुचे धनुष्यरव आवडे तिच्या श्रुतिला[4] ॥ १४ ॥
पञ्जरसिंहा पाहुनि सीतानेत्रास मोद बहु वाटे ।
मान न नम्र जहाली अभिमानानेंच फार ती दाटे ॥ १५ ॥
नवमास पूर्ण होतां श्रवणावरि[5] रोहिणीशही[6] येतां ।
श्रावणपूर्णादिवशीं आनन्दें प्रसव पावली सीता ॥ १६ ॥

( सीतेला दोन पुत्र होतात. )

सर्वसुलक्षणयुक्ता पूर्णेन्दुसमान वदन सुतयुग्मा ।
सुखकर सर्वजनांना दुःखद शत्रूस ज्यास नच सीमा ॥ १७ ॥
जन्में त्यांच्या झाली नृत्यमयी जणु समस्त ही जनता ।
भेरीपटहध्वनिसह शंखादिसहस्रवाद्यरवँ[7]युक्ता ॥ १८ ॥
श्रीवज्रजङ्घभूपें उत्सव केला अतीव हर्षानें ।
भगिनीप्रेमें केला विपुलधनव्यय कुबेरसा मानें ॥ १९ ॥
नामें अनङ्गलवण नि मदनाङ्कुश ठेविलीं क्रमें त्यांचीं ।
मदनाहून हि अधिकचि होती सौन्दर्यसम्पदा साची ॥ २० ॥
वीरनराङ्कुर दोघे क्रमें क्रमें वाढु लागले तनय ।
जननीहृदयानन्दद होते ते मूर्तिमन्त जणु विनय ॥ २१ ॥
रक्षण होण्याकरितां सर्षपकर्ण[8] शीर्षिं ठेविले त्यांचे ।
जणु ते प्रतापवह्निस्फुलिङ्गसे[9] वाटले जना साचे ॥ २२ ॥
गोरोचनपङ्कानें[10] पिवळे त्यांचे सुदेह जरि होते ।
स्वाभाविकतेजानें तळपत होते प्रभाव पाडित ते ॥ २३ ॥

---

१ अदृश्य. २ भुवयांना. ३ तरवारींत. ४ कानाला. ५ श्रवणनक्षत्रावर. ६ रोहिणीचा पति चंद्र. ७ आवाज. ८ मोहऱ्याचे कण. ९ पराक्रमरूपी अग्नीच्या ठिणग्या. १० गोरोचनाची उटी.

अनंगलवण व मदनांकुश यांचे शस्त्रास्त्रशिक्षण
क्षुल्लक सिद्धार्थ यांच्या नेतृत्वाखालीं–

व्याघ्रनखपङ्क्ति[1] शोभे सोन्याची त्यांचिया उरःस्थलिं ती ।
हृदयांतिल दर्पाङ्कुरतति[2] जणु सुव्यक्त जाहली होती ॥ २४ ॥
अस्पष्ट शब्द पहिले सर्वजनांच्या मनास आवडते ।
बालमुखांतुनि निघती अमृताहुनि ज्यांत मधुरता गमते ॥ २५ ॥
मधुरस्मितें तयांचीं सुन्दरपुष्पासमान सकलमना ।
आकर्षिति भृङ्गगणा मोहवि त्यांचा सुगन्ध दिग्ललना ॥ २६ ॥
जननीदुग्धाचे जणु सिञ्चन होउनि विलासहास गमे ।
दन्ताङ्कुररूपानें अवतरले बालवदनिं चित्त रमे ॥ २७ ॥
दायीच्या हाताचे धरूनिया बोट चार-पांच पदें ।
भूवरि टाकित असतां कोणातें बालयुग्म सौख्य न दे ॥ २८ ॥
यापरि बालक्रीडा पाहुनि नानाविधा मनीं मोद ।
सीतेस होइ तेणें गेली विसरुनि समस्तसा खेद ॥ २९ ॥
सुन्दरदेहीं दोघे सामान्यजनांत जे न आढळती ।
ऐसे बलादिसद्गुण बालक अपुल्या तनूंत ते धरती ॥ ३० ॥
विद्यासङ्ग्रह करण्या योग्य अवस्थेस जाहले प्राप्त ।
शिकवायाची चिन्ता झाली उत्पन्न मातृ-हृदयांत ॥ ३१ ॥
परि पुत्रपुण्ययोगें प्रसिद्ध सिद्धार्थ ज्या असे नाम ।
आचारशुद्ध आला क्षुल्लक शोभित करी नि नृपधाम ॥ ३२ ॥

( सिद्धार्थक्षुल्लकाचें सीतेच्या प्रासादांत आगमन व ते
सीतापुत्रांना शस्त्र व शास्त्रांचें शिक्षण देतात. )

तीन्ही सन्ध्याकालीं अवन्ध्यविद्यासमर्थ सिद्धार्थ ।
मन्दरशैलीं वन्दुनि येइ जिना परत म्हणुनि अन्वर्थ ॥ ३३ ॥
वदनीं शान्ति विराजे लोचानें शीर्ष शोभतें ज्याचें ।
वस्त्रचि ज्यास परिग्रह चिन्तन करि सतत साधु होण्याचें ॥ ३४ ॥
उत्तम अणुव्रतासह भूषित करिती अनेक गुण ज्यास ।
जिनशासनास जाणी मनांत ज्याच्या न वास करि आस ॥ ३५ ॥
सर्वकलांचा सागर तरून गेला असा असे चतुर ।
यज्ञोपवीत वस्त्र नि धारण करितो असा बुधप्रवर[3] ॥ ३६ ॥

---

१ वाघनख नांवाचा अलंकार. २ अभिमानाचा अंकुर. ३ विद्वानांत श्रेष्ठ.

प्रिय जणु सखीप्रमाणें चटई काखेंत ज्याचिया शोभे ।
तव धर्मवृद्धि होवो वचन वदे धार्मिकास नच लोभें ॥ ३७ ॥
प्रतिगृहिं भिक्षा मागें ईर्यासमितीस सतत पाळून ।
केला प्रवेश त्यानें जाणुन घेऊन जानकीसदन ॥ ३८ ॥
जणु जिनशासनदेवी मनीं धरी भावना मनोहर जी ।
दिसतां क्षुल्लक उठली आली तत्काल तत्पदाब्जरजीं ॥ ३९ ॥
मस्तक ठेवुनि करयुग जोडुनि पूजून आदरें सीता ।
योग्यविधीनें देती झाली आहार त्यास बलकान्ता[1] ॥ ४० ॥
जिनशासनांत दृढ जे त्यांना ती धर्मबन्धु मानून ।
आदर करीत होती ठेवुनि त्यामधिं सदा प्रसन्न मन ॥ ४१ ॥
आहार जाहल्यावरि शान्तपणें बैसल्या तया वदली ।
हे पूज्य मला सांगा आपण अपुली कथा असे घडली ॥ ४२ ॥
त्यानें स्वभ्रमणादिक सांगितले मोद जाहला तिजला ।
आदरहृत[2]मानस तो लवणाङ्कुशपुत्र पाहता झाला ॥ ४३ ॥
अष्टाङ्गनिमित्तांनीं सुलक्षणा श्राविका असे सीता ।
जाणुनि विचारिली तिज तनयांची सांग गे मला वार्ता ॥ ४४ ॥
वार्ता सांगत असतां अश्रूंनीं नेत्र जाहले ओले ।
सीतेची ती श्रवुनि क्षुल्लकमानसहि फार गहिवरलें ॥ ४५ ॥
तो वदला सीतेला देवकुमारासमान पुत्र तुला ।
शोक नकोस करूं गे तव हरितिल सकलदुःखसन्ततिला ॥ ४६ ॥
अत्यन्तस्नेहानें शस्त्रास्त्रीं आणि सकल शास्त्रांचें ।
लवणाङ्कुशास देउनि निपुण करी ज्ञान सुगुरु त्या साचे ॥ ४७ ॥
ते सीतात्मज झाले ज्ञान नि विज्ञान यांत सम्पन्न ।
सर्वकलागुणनिपुणहि देती त्या मान सर्व विबुधगुण ॥ ४८ ॥
दिव्यास्त्र सोडणें अणि घेणें तें आखडून या विषयीं ।
चातुर्य यास जितुकें नव्हतें अन्यास खचित त्यासमयीं ॥ ४९ ॥
पूर्वार्जितपुण्यानें उत्तम लक्ष्मी मिळे तया उभया ।
शोभा निधानकलशासमान आली असे सदैव जया ॥ ५० ॥

---

१ आठवे बलभद्र-रामचन्द्राची पत्नी सीता. २ आदरानें ज्याचें मनास हर्ष झाला आहे.

मतिमन्त शिष्य मिळतां खेद गुरूला न होय तिळभरही ।
डोळस मनुजा दाखवि रवि सहजचि सकल वस्तु सर्व मही ॥ ५१ ॥
परिचय जरि पूर्वीचा असेल गुण त्याकडे सर्वे येती ।
खेद न होतां मानससरास जाती अनेक हंसततति[1] ॥ ५२ ॥
पात्रीं उपदेशाला देणारा गुरु कृतार्थता पावे ।
सूर्यप्रकाश घुबडा मिळुनिहि तो व्यर्थतेकडे धावे ॥ ५३ ॥

( लव व अंकुश यांच्या पराक्रमादि गुणांचें वर्णन. )

सुयशें नि विक्रमानें ज्यांनीं व्यापून टाकिलें जगतां ।
शीतोष्णकरासम[2] जे सुखतापद सर्वदा नेता[3] अनेतां[4] ॥ ५४ ॥
झाले प्रगट जयांचें तेज नि वल ते कुमार रामाचे ।
अनिलासम अनलासम[5] दिसती जनता असे वदे साचें ॥ ५५ ॥
होतें शरीर ज्यांचें दृढ पाषाणासमान नि स्कन्ध ।
तेणें सकलजनातें दिसति हिमाचल नि कठिण जणु विन्ध्य ॥ ५६ ॥
जोडी सुपुष्ट असते बैलाची जू धरावया उचित ।
तैसें राज्यधुरेला धारण करण्यास योग्य रामसुत ॥ ५७ ॥
अतिशय सुन्दर ते सुत दोघे धर्माश्रमासमान गणा ।
सुखकर सेविति त्या जे वा कल्पद्रुमसमान त्यास म्हणा ॥ ५८ ॥
पूर्व नि पश्चिम ऐसे दिशाविभागासमान ते दिसती ।
जे तेजस्वी त्यांचे क्षयोदयास्ता करावया असती ॥ ५९ ॥
सागर जियेस घेरी अशी मही झोपडीसमान गमे ।
तेजापासुनि विमुख च्छायेंतहि मन तदीय नैव रमे ॥ ६० ॥
पादनखप्रतिबिम्बित निजरूपा बघुनि होति लज्जित ते ।
केशांच्या भङ्गें ही मनिं ज्यांच्या तीव्र दुःख कीं होतें ॥ ६१ ॥
चूडामणिच्या वरती छत्रा पाहून लाजती स्वमनीं ।
स्वप्रतिबिम्बा बघुनिहि उद्भवतो कोप शत्रु जणु गणुनि ॥ ६२ ॥
मेघीं धनुष्य बघुनिहि ज्यांच्या हृदयांत कोप घे पेट ।
नमन न करिती भूपति चित्रस्थ म्हणून होति जे कुपित ॥ ६३ ॥
सूर्यासहि ते बघती अनादरें स्वल्पमण्डली[6] तुष्ट ।
तेजस्वी ही नच तो होतो कीं राहुनें पुरा ग्रस्त ॥ ६४ ॥

---

१ समूह. २ चंद्र व सूर्यासारखे. ३ नम्र. ४ उद्धत. ५ अग्नि व वाऱ्यासारखे. ६ बिंब व देश.

देह जयाचा न दिसे वली तरी ही म्हणून पवनाही ।
जे भेदिति स्ववेगें तेणें जो मन्द होतसे पाही ॥ ६५ ॥
हिमवान् शैलहि चमरीवालांनीं नित्य वारिला जातो ।
म्हणुनि क्रोध तयांतहि ज्याच्या हृदयांत सर्वदा येतो ॥६६ ॥
पाहून सागरांच्या शंखांना खेदखिन्न जे होती ।
जलनिधिपति वरुणाच्या प्रचेतनामेंहि कोप वहु करिति ॥ ६७ ॥
जे छत्रपति अशाही भूपा छायाविहीन करणारे ।
मधुर मुखें वदणारे प्रसन्नभावा सदैव धरणारे ॥ ६८ ॥
जे दुष्टभूपवंशा[1] असती जरि दूर त्या स्वतेजानें ।
स्वाभाविकशा नेती ग्लानिस अत्युष्ण जेवि दहनानें ॥ ६९ ॥
ज्यांचें करयुग शस्त्रें धारण केल्यामुळें नच श्याम ।
परि अरिविक्रमवह्निप्रशमन[2] हा हेतु त्या असे ठाम ॥ ७० ॥
अभ्यास करित असतां होते जे निघत चापटङ्कार ।
ते जणु दिशावधूशीं बोलत होतेचि काय मधुरतर ॥ ७१ ॥
जैसा होता विक्रम लवणीं तैसाच अंकुशीं होता ।
होता उदय शुभाचा नव्हती धैर्यादिसुगुणिं कमतरता ॥ ७२ ॥
दोघे नवतारुण्यें सम्पन्न नि सुभगचेष्टितें[3] युक्त ।
लवणाङ्कुश या धरणीवरती झाले प्रसिद्धिसंयुक्त ॥ ७३ ॥
सगळे लोक जयांची करिति स्तुति सकल इच्छिती ज्यांना ।
पुण्येंचि घडविले जणु वर्णू त्यांच्या कितीक मी सुगुणा ॥ ७४ ॥
सीताहृदया देती अमन्द आनन्द मेरुसम धीर ।
श्रीवत्सलक्षणानें सुन्दर ज्यांचे विशाल तेवि उर ॥ ७५ ॥
होतें प्रेम जयांचें अन्योन्यीं सुरकुमारसम गमती ।
विक्रम ज्यांचा अनुपम चन्द्रासम देइ मोद मुखकान्ति ॥ ७६ ॥
तेजानें ते सूर्या कान्तीनें जिंकिती निशेशाला[4] ।
ओजस्वी इन्द्रासम गाम्भीर्यें जिंकितात उदधीला[5] ॥ ७७ ॥

---

१ वंश– वेळू व गोत्र. २ शत्रूच्या पराक्रमरूपी अग्नीस शमविणारे. ३ मनाला आवडणाऱ्या प्रवृत्ति. ४ चन्द्राला. ५ समुद्राला.

मन चोरिती जनांचे राहुनिही ते सुधर्ममार्गांत ।
कोटिस्थितगुण[1] असुनिहि वक्रपणा ज्यांचिया न हृदयांत ॥ ७८ ॥
स्थैर्यें मेरुस भूला क्षमागुणें जिंकिती जयेशासें[2] ।
शौर्यगुणें नि गतीनें जिंकिति ते खचित पवनपुत्रांस[3] ॥ ७९ ॥
कोणी वेगें सोडी शर धरिती ते तया अनायास ।
मकरादिजलचरासह करितां क्रीडा न होय आयास ॥ ८० ॥
मत्तगजासह लढती त्यांना श्रम होतसे न तिळभरहि ।
निजदेहाच्या द्युतिनें करिती ते मन्द सूर्यकिरणाही ॥ ८१ ॥
सद्धर्मसेवनानें दिसती ते साधुतुल्य सत्त्वगुणें ।
श्रीरविकीर्तिनृपासम दानें श्रीविजयतुल्य[4] नैव उणें ॥ ८२ ॥
मानें नि साहसानें अयोध्य मधु-कैटभासमान[5] खरे ।
रणकौशल्यें दिसती ते वासवजित[6] नि मेघवाह[7] पुरे ॥ ८३ ॥
गुरुशुश्रूषातत्पर जिनेश्वरांच्या कथेंत रत असती ।
नामश्रवणें देखिल अरिमनिं भीतीस शीघ्र ते रचिती ॥ ८४ ॥

शार्दूलविक्रीडित–

होते ते गुणरत्नपर्वत जणू विज्ञानशाली सदा ।
लक्ष्मीकीर्ति-सुकान्तिगेह असती निस्तारिती आपदा ॥ ८५ ॥
राज्याचा भर घ्यावयास जणु ते आहेत खांवासम ।
ऐसे ते नरवीर दोन दिसती लोकास कीं निःसमं[9] ॥ ८६ ॥
धीर प्रपौण्ड्रनगरीं रमती नरवीर ते महानन्दें ।
हलधर नारायण जणु यश ज्यांचें दशदिशांत सित कोन्दे ॥ ८७ ॥
सीतापुत्र सुलक्षण लवणाङ्कुश पुण्यवन्त जगतांत ।
जिनदास भक्ति करिती जिनवर्यांची म्हणून होय हित ॥ ८८ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे लवणाङ्कुशोद्भवाभिधानं नाम शतसङ्ख्यं पर्व ॥ १०० ॥

---

१ कोट्यवधिगुण व धनुष्याच्या दोन टोकांशीं संबंध ठेवणारी दोरी. २ भरतचक्रवर्तीचा सेनापति जयकुमार. ३ मारुतीला. ४ भरतपुत्र अर्ककीर्ति. ५ पहिला बलभद्र. ६ सातवा नारायण. ७ इंद्रजित. ८ मेघवाहन रावणाचा पुत्र. ९ ज्यांची बरोबरी कोणी करूं शकत नाहीं असे असाधारण पराक्रमादिगुण धारण करणारे.

# एकशेंएक्काव्या पर्वांतील कथा.

अत्यंत सुंदर असे लवण व अङ्कुश हे विवाहाला योग्य झाले आहेत असे वज्रजंघ राजाला दिसून आलें. यांचा विवाह करावा हा विचार त्याच्या मनांत आला. या राजाला लक्ष्मीमति नामक राणी होती. तिला शशिचूला वगैरे बत्तीस कन्या ज्या रतीपेक्षा सुंदर होत्या त्या लवणाला द्याव्या असें त्यानें निश्चित केलें. पण अंकुशाला कोणत्या राजाची कन्या द्यावी हा विचार मनांत करीत असतां त्याला पृथ्वीपुरनगराचा राजा पृथु व त्याची राणी अमृतवती याच्या मुलीची– सुवर्णमालेची आठवण झाली. व त्यानें तत्काल एक दूत त्याच्याकडे पाठविला. सुवर्णमाला साक्षात् लक्ष्मीच आहे असें वाटत असे. व ती अङ्कुशाला योग्य आहे असें समजून तो आनंदित झाला.

पृथुराजानें दूताचा आदर केला व आगमन कारण विचारलें. त्यानें कारण सांगितलें तेव्हां तो त्याला म्हणाला– दूता, वरांत रूप, शील, कुल, बल, विद्या आदिक गुण असावे लागतात व त्यामध्यें कुल आणि शील हें मुख्य मानले जातात– या गुणांची माहिती आम्हाला नाहीं. यास्तव त्याला– अङ्कुशाला मी आपली कुमारी देणार नाहीं. पण युद्धामध्यें त्याला मी कुमारि– कुमरण देईन. असें उत्तर ऐकून दूत निरुपायानें परत वज्रजंघाकडे आला व अङ्कुशवराचें कुल व शील अज्ञात असल्यामुळें त्याला मी देत नाहीं असें त्यानें कळविलें आहे असें वज्रजंघास सांगितलें.

वज्रजंघानें पुनः दुसरा दूत पाठविला व कन्यायाचना केली. पण ती विफल झाली. त्यामुळें राजा रागानें लालबुंद झाला. व त्यानें पृथुराजाच्या आज्ञांकित सरदाराला पकडून कैदेंत टाकिलें. पृथुराजा युद्धासाठीं उद्युक्त झाला. त्यानें पोदनपुराच्या राजाला युद्धांत मदत करण्यासाठीं ससैन्य बोलाविलें. तो राजा त्याला मदत करण्यास

गेला. वज्रजंघानें ससैन्य त्याच्यावर चढाई केली. युद्धास सुरवात झाली. परिस्थिति बिकट होईल असें दिसू लागल्यामुळें वज्रजंघानें आपल्या पुत्राकडे दूत पाठविला. तेही युद्धास जाण्याची तयारी करूं लागले. ही वार्ता लवण व अङ्कुशाला समजली. तेव्हां तेही युद्धास जाण्यास सज्ज झाले. "अज्ञात कुलशीलाला– अंकुशाला मी माझी कुमारी देणार नाहीं पण त्याला कुमारि देईन" या पृथुराजाच्या वचनानें या दोघा बंधूना अतिशय राग आलेला होता म्हणून ते त्वेषानें निघाले.

अद्यापि तुम्ही बालक आहांत, तुम्ही युद्धासाठीं जाऊ नका असें सीतेनें व त्यांच्या मामेभावांनीं सांगितलें पण अग्निपासून जन्मलेला स्फुलिंग प्रचंड वनाला जाळण्याला समर्थ असतो हें लक्ष्यांत ठेवा असें उत्तर त्यांनीं मातेला व मामेभावांना दिलें. उभय बंधूनीं स्नान-भोजन केलें. विनयानें जिनेश्वर व मातेला वंदन केलें व ते मोठ्या हर्षानें युद्धार्थ रथांत बसून निघाले. तेव्हां साक्षात् उद्यम व पराक्रमानें लवण व अंकुशाचें रूप घेतलें आहे असें लोकांना वाटलें.

युद्धस्थळीं पोंचल्यावर युद्ध सुरूं झालें. मोठ्या डोहांत प्रचंड हत्तीप्रमाणें पृथुराजाच्या मोठ्या सैन्यांत हे घुसले. विजेप्रमाणें चंचल अशा या उभय बन्धूंनीं भयंकर युद्ध केलें. पृथुराजाचें सैन्य घाबरून पळून गेलें. पृथुराजाही घाबरला. तोही पळून जाण्याच्या विचारांत असतां त्याला यांनीं पकडलें. "ज्यांचें कुलशील माहीत नाहीं अशा आम्हाला पाहून तूं पळून जात आहेस ह्यांत तुला लज्जा कां वाटत नाहीं? अधमा पृथुराजा, आतां आम्ही तुला बाणांनीं आमचें कुल व शील दाखवितो थांब. कुलशीलवंत योद्धे तोंडानें आपलें कुल-शील दाखवित नसतात ते युद्ध करून पराक्रम गाजवून दाखवितात हें लक्षांत घे" असें त्यांनीं म्हटलें. तेव्हां पृथुराजा शरण गेला. आपण धीर व महावीर आहांत. आपण आमचे प्रभु आहांत अशी स्तुति करून त्यानें त्यांना प्रसन्न केलें. युद्ध बंद झालें. मोठ्या थाटानें नगरांत सर्वांनीं प्रवेश केला व मोठ्या उत्सवानें पृथुराजानें अंकुशाचा आपल्या कन्येशीं– सुवर्णमालेशीं विवाह केला.

यानंतर हे दोघे कुमार आनंदानें पुण्डरीकपुराला आपल्या मामा व त्याच्या पुत्रासह आले. तेथें कांहीं दिवस राहून त्यांनीं दिग्विजय करण्याचा मनांत निश्चय केला. सुम्ह, अंग, मगधादिक देशांच्या राजांना त्यांनीं वश केलें. पोदनपुर, लोकाक्ष वगैरे नगरांचे राजे त्यांना शरण आले. अनेक राजे ससैन्य यांना येऊन मिळाले. मोठें सैन्य घेऊन ते लम्पाकदेशाला गेले. तेथें 'एककर्ण' राजाला त्यांनीं जिंकिलें. विजयस्थल नगराच्या राजाला शंभर भाऊ होते त्यांनाही त्यांनीं जिंकिलें.

नंतर कैलासाच्या उत्तरदिशेकडील देशांत प्रवेश करून तो सगळा प्रदेश त्यांनीं हस्तगत केला. अनेक राजे नजराणे घेऊन यांना शरण आले व त्यांची आज्ञा त्यांनीं मानिली.

अनेक आर्यांचे व म्लेन्छांचे देश जिंकून नंतर ते पुण्डरीकपुराला आले. मोठ्या थाटानें नगरांत प्रवेश झाला. सीतामातेला अत्यानंद झाला. त्यांनीं तिच्या चरणांना नमस्कार केला व ते आनंदानें राहू लागले. जे जिनभक्ति करितात त्यांचें ऐश्वर्य वाढतें व त्यांची कीर्ति सर्वत्र पसरते.

—००:०:००—

# एकशेएकावें पर्व.

( पृथुराजाबरोबर लव व अङ्कुश यांची लढाई. )

अतिशय सुन्दर लवण नि अङ्कुश योग्य विवाहास ।
झाले जाणुनि वज्रजङ्घनृप करी तयारीस ॥ १ ॥
लक्ष्मीदेवी राणी होती सुन्दरभूपा या ।
शशिचूलादिक बत्तिस कन्या त्या लवणा द्याया ॥ २ ॥
परि उभयांचा परिणय मंगल एके वेळींच ।
करावयाचें चिन्तन केलें भूपें जें साच ॥ ३ ॥
योग्या अंकुश कुणिभूपाची कन्या मनिं चिन्ती ।
हृदयीं झालें स्मरण नि मोदे तेणें नृप अन्तीं ॥ ४ ॥
पृथिवीपुरपतिनृपा अमृतवति सुन्दर राणीस ।
सुवर्णमाला कन्या रूपें जिंकी लक्ष्मीस ॥ ५ ॥
चन्द्राची जशि रेखा सुन्दर हरिते लोकमना ।
पद्मविवर्जित जणु लक्ष्मी ही वाटे सुजनगणा ॥ ६ ॥
शशिचूलेच्या करि रूपाशीं समता कन्या ही ।
म्हणुनी अङ्कुश योग्य असे ही चिन्तन नृप वाही ॥ ७ ॥
पृथुराजाच्या संनिध भूप प्रेषी दूतास ।
केला आदर त्याचा भूपें वदला वृत्तास ॥ ८ ॥
जोवरि कन्यासम्बन्धाचें भाषण दूतानें ।
केलें नाहीं हर्ष दाविला वदनीं भूपानें ॥ ९ ॥
ऐकुनि सगळा दूताशय मग वदला पृथुराणा ।
नयनयुगामधि ज्याच्या दिसला सुतीव्रकलुषपणा ॥ १० ॥
दूषण यामधिं कांहीं दिसतें परि हे दूता तूं ।
परानुवादा वदसी आम्हां वाटे नच किन्तु ॥ ११ ॥
सुगुण वरामधिं रूप शील धन कुल बल वय समता ।
देश नि विद्या ऐसे वदती दूता बुधजनता ॥ १२ ॥
वरिल गुणावलिमध्यें ‘ कुल ’ हा गुण उत्तम आहे ।
ज्ञात न ज्याचा कन्या देणें उचित न त्या पाहे ॥ १३ ॥

परि जो लज्जा सोडुनि बोले त्यास कुमारी न ।
देइन दूता परन्तु देइन कुमारि रणिं कां न ॥ १४ ॥
यापरि बोलुनि नृप वच खण्डी तेव्हां निरुपायें ।
येउनि दूतें श्रीवज्राला कथिलें सर्व तयें ॥ १५ ॥
वज्रजङ्घनृप अन्या दूता पाठविता झाला ।
पृथुराजाला तनयायाच्ञा करि परि हो विफला ॥ १६ ॥
कन्यालाभ न होतां कोपें झाला बहु लाल ।
पृथुराजाच्या देशविनाशा उद्यत तत्काल ॥ १७ ॥

(पृथुराजाबरोबर युद्ध करून लव व अंकुश त्यांस जिंकतात.)

व्याघ्ररथाभिध[1] पृथुराजाचा होता सामन्त ।
वज्रजङ्घनृप रणिं त्या जिंकुनि टाकी बन्धांत[2] ॥ १८ ॥
पोदनपुरपति मित्रा सत्वर ससैन्य यायास ।
बोलावी पृथुराजा व्याया समरीं मदतीस ॥ १९ ॥
वज्रजङ्घनृप इकडे अपुल्या दूता लेखयुता ।
पुण्डरीकपुरिं पाठवि याया समस्त शूर सुता ॥ २० ॥
निजजनकाची आज्ञा ऐकुनि सत्वर राजसुत ।
भेरी शंखादिकध्वनींनीं पुर करुनि क्षुभित ॥ २१ ॥
कळविति आज्ञा निजसेनेला व्हाया सन्नद्ध ।
वीरगणांनो झडकरि चाला करण्याला युद्ध ॥ २२ ॥
अश्रुतपूर्व ध्वनि तो ऐकुनि लवणाङ्कुश दोघे ।
संनिधपुरुषा विचारिती ते कां ध्वनि नगरिं रिघे ॥ २३ ॥
निमित्त तुमचें या शब्दांना आहे जाणून ।
सीतेचे सुत समरेच्छेनें प्रेरित होऊन ॥ २४ ॥
अतित्वरेनें निघती झाला अपमान न सहन ।
जे तेजस्वी रक्त तयांचें होतें झणि उष्ण ॥ २५ ॥
पुत्र नृपाचे त्यांना वदले अन्तःपुर सगळे ।
जावें आपण रण न कराया विफलचि ते झाले ॥ २६ ॥
वदली सीता पुत्रस्नेहें समय न युद्धाचा ।
बालक आहां मम उपदेशा ऐका बहु साचा ॥ २७ ॥

१ ‘व्याघ्ररथ’ या नांवाचा. २ कैदेंत.

महारथाच्या युगिं नच जोडिति वत्सा[1] वत्सांनो ।
ऐकुनि राहा स्वस्थ घरामधिं माझ्या बाळांनो ॥ २८ ॥
ते मातेला वदले आई काम न वृद्धांचें ।
वीरचि उपभोगिति पृथ्वीला कां नच हें साचें ॥ २९ ॥
अग्नि वनाला जाळुनि टाकी नैसर्गिक कार्य ।
त्यांत तयाला श्रम नच वाटे वदती जन आर्य ॥ ३० ॥
पुत्रांचें हें भाषण ऐकुनि मिश्ररसें नयनीं ।
वैदेहीच्या आलें खेदानन्दाचें पाणी ॥ ३१ ॥
स्नान नि भोजन करुनी भूषें[2] भूषित होऊन ।
कायें वाचें हृदयें सिद्धां भावें वन्दून ॥ ३२ ॥
मातृपदांना करुनी वन्दन मङ्गल पाहून ।
सुगमन करिती युद्धासाठीं निजमनिं मोदून ॥ ३३ ॥
सवेग घोडे जोडियले ज्या ऐशा रथिं वसुन ।
नानाशस्त्रें निज करिं घेउनि निघती रणनिपुण ॥ ३४ ॥
उद्यम आणिक विक्रम जणु हे सशरीरचि बनले ।
प्रविपुलसेना वीरयुगासह शत्रुवरी चाले ॥ ३५ ॥
[3]महोदयी ते पांच दिनांनीं नृप वज्रा मिळले ।
युद्धाचें अतिकौतुक वाटे वीररसीं भिजले ॥ ३६ ॥
पृथुभूपति ही निघे लढाया सेना घेऊन ।
क्रोधें ज्याचें तप्त जहाले गात्र नि बुद्धि मन ॥ ३७ ॥
भाऊ मित्र नि पुत्र नि मामा मामांचे पुत्र ।
एकापात्रीं जेविति अन्यहि जे स्नेहा पात्र ॥ ३८ ॥
अङ्ग वङ्ग मगधादिक राजे जे अति बलवन्त ।
रथ हय हत्ती पायदळांच्या सैन्यानें सहित ॥ ३९ ॥
अतितेजस्वी वज्रजङ्घनृप याशीं लढण्यास ।
क्रुद्ध होउनी आले धरुनी मनांत वैरास ॥ ४० ॥
वज्रजङ्घनृप सामन्ताच्या वृन्दानें प्रबल ।
लढण्याला बहु उद्यत झालें उभयांचें हि बल ॥ ४१ ॥

---

१ वासरें. २ अलंकारांनीं. ३ ज्याचा महान् उत्कर्ष होत आहे असे.

यापरि सेना दोन्ही आल्या लढण्याला जवळ ।
लवण नि अंकुश अरिसेनेमधिं घुसले जे प्रबल ।। ४२ ।।
स्वच्छन्दानें विहरति दोघे महाह्रदांत गज ।
जैसें तैसें अरिसैन्यामधिं विहरति बहु तेज ।। ४३ ।।
इकडे तिकडे चञ्चल चपलेसम[1] अति चमकति ते ।
अनुपम विक्रम ज्यांचा अरिगण तुळती नच ज्यातें ।। ४४ ।।
जोडुनि बाणा सोडिति केव्हां कोणा नच उमजे ।
परि अरिगण रणिं पटपट पडती हेंचि जना समजे ।। ४५ ।।
छाती ज्यांची बाणें झाली विद्ध असे वीर ।
निजसैन्यासह[2] पडले वाहे रक्ताचा पूर ।। ४६ ।।
भूतलिं सगळा प्रेतांचा खच दिसतो बीभत्स ।
अरिसेना निमिषांत पराजित करिती रघुवत्स ।। ४७ ।।
अरिगज पडले कांहीं कांहीं सिंहें ग्रस्त जसे ।
पळले तत्पदिं चिरडुनि मेले जैसे वीर ससे ।। ४८ ।।
लवणाङ्कुश रविशर[3]किरणांनीं पृथुसेनासरिता ।
वाळुनि गेली क्षणमात्रामधिं पृथुला ये लघुता ।। ४९ ।।
उरले होते कांहीं सैनिक तेहि भयत्रस्त ।
पळुनी गेले दशदिशिं आले पृथुला पृथुकष्ट ।। ५० ।।

(लव व अंकुश युद्धांत पृथुराजाचा पराजय करितात.)

साहायक नच म्हणुनि पराभवमार्गी पृथु पडला ।
धावुनि गेले रघुसुत सन्निध वदले मग त्याला ।। ५१ ।।
अधमा मनुजा व्यर्थ पृथो ! कां कोठें पळशील ।
आलों आम्ही संनिध ज्यांचें ज्ञात न कुलशील ।। ५२ ।।
ज्यांचें ज्ञात न कुल नच शीलही आम्हापासून ।
पळणाऱ्या तव हृदया वाटे वद लज्जा कां न ।। ५३ ।।
शील नि कुल रे अमुचें आतां बाणें दाखवितों ।
राहि उभा रे ना तरि तुजला बळें उभा करितों ।। ५४ ।।

---

१ विजेप्रमाणें. २ घोडे, रथ, हत्ती यासह. ३ लव व अंकुश हेच सूर्य व त्यांचे बाण हेच किरण.

रघुसुतवचना यापरि ऐकुनि जोडुनि कर दोन ।
अज्ञानानें वदलों मजवरि करा क्षमा निपुण ॥ ५५ ॥
विक्रम तुमचा मला तुमजला जैसें रवितेज ।
कुमुदगणांना[1] तुमजे मजला क्षमा करा आज ॥ ५६ ॥
धैर्यवन्त कुलशील निवेदन यापरि करितात ।
वदनें वदणें शस्त नसे तें सन्देहें युक्त ॥ ५७ ॥
वन जाळाया प्रभु जो असतो ऐसा पावकही ।
अनलापासुनि जन्मे जाणी मूढ असा जन ही ॥ ५८ ॥
उच्चकुलामधिं जन्म जहाला धीर महावीर ।
आपण अमुचे आहा स्वामी सुखदानीं चतुर ॥ ५९ ॥
यापरि केली स्तुति पृथुभूपें जेव्हां गतकोप ।
रघुसुत झाले शान्तमनाचे प्रसन्नताकूप ॥ ६० ॥
नाना राजे आले तेथें त्यांच्या साक्षीनें ।
पृथुराजासह वीरयुगाचें प्रेम तदैव बने ॥ ६१ ॥
प्रणमनमात्रें प्रमुदित होती मानी जगिं वीर ।
उपडिति वेता नम्र न होतां जसे नदीपूर ॥ ६२ ॥
विस्तृतविभवें थोरवीर ते पृथिवीपुरिं नेले ।
पृथुराजानें समस्तजनता मन हर्षित झालें ॥ ६३ ॥
तेथें रात्रीं निवास केला दुसरे दिनिं त्यांनीं ।
दिग्जयनिश्चय अपुल्या केला स्वपुरा येवोनि ॥ ६४ ॥

(पृथुराजानें सुवर्णमाला कन्येबरोबर अंकुशाचा विवाह केला.)

सुवर्णमाला अङ्कुशवीरा कन्या पृथुराजें ।
दिधली विभवें परिणय[2] उत्सव तो अतिशय गाजे ॥ ६५ ॥
सुम्ह अङ्ग मगधादिकराजे त्यांनीं वश केले ।
पोदनपुरपति आदिक भूप हि शरण तया आले ॥ ६६ ॥

(लव व कुश यांनीं अनेक देश जिंकिले.)

'लोकाक्षाभिध' नगरा जाण्या झाले उद्युक्त ।
नाना देशां जिंकुनि आले तत्संनिध विदित ॥ ६७ ॥

---

१ चन्द्रविकासी कमलसमूहांत. २ विवाह

' कुबेरकान्ता ' भिधनृप होता स्वामी नगराचा ।
महाभिमानी करि फूत्कारा मद ज्याचा साचा ।। ६८ ।।
लवण नि अङ्कुश हे गरुडासम नागासम भूपा ।
क्षुब्ध तयांनीं केलें त्याला धरि अङ्गीं कम्पा ।। ६९ ।।
भीमरणामधिं जिंकुनि त्याला त्यांनीं वश केलें ।
मोठी सेना घेउनि नन्तर लम्पाका गेले ।। ७० ।।
एकश्रवणा[1] भूपा त्यांनीं तेथें जिंकून ।
' विजयस्थल ' या नगरा केलें प्रयाण तैं तूर्ण ।। ७१ ।।
तेथें त्यांनीं शम्भर भावा नयनें पाहून ।
जिंकुनि केलें त्या सगळ्यांना अपुल्या आधीन ।। ७२ ।।
पार न ऐशा सैन्यनदीसह गङ्गा उतरून ।
कैलासोत्तरदिशि ते गेले शस्त्रार्थी निपुण ।। ७३ ।।
तेथें नन्दनतुल्य नि सुन्दर ऐसे वहु देश ।
बघती तेथें होते जेथें रत्नांचे कोश ।। ७४ ।।
निजकरिं घेउनि वहु नजराणे आले श्रेष्ठनर ।
चरण तयांचें त्यांनीं यजिले मानुनि हर्षभर ।। ७५ ।।
भाष नि कुन्तल नन्दि नि नन्दन सिंहल शलभ असे ।
अनल नि चौल नि भीमभूतरव देशविशेष दिसे ।। ७६ ।।
यांचे अधिपति त्यांना जिंकुनि करिति निजाधीन ।
नन्तर सागर अपरतटावरि करिती ते गमन ।। ७७ ।।
होते तेथें राजे जे जे वश त्यांना करून ।
लवणाङ्कुश हे दोघे नन्तर करिति पुढें गमन ।। ७८ ।।
मटम्ब, खेट नि पुरेश आदिक देशाधिप त्यांना ।
करुनी वश पुनरपि स्थापिलें तेव्हां सकलांना ।। ७९ ।।
द्विविध देश जे कांहीं त्यामधिं आर्यांचे देश ।
म्लेच्छांचे ही कांहीं मिश्रित रत्नादिक कोश ।। ८० ।।
जेथें त्यांचीं नांवें ऐशीं भीरव कक्ष नट ।
त्रिजट नि चारव यवन नि केरल वश झाले प्रगट ।। ८१ ।।

---

१ एककर्ण या नांवाचा राजा.

शक नेपाल नि माल नि वारुल शर्वर काश्मीर।
वृषाण वैद्य नि हिडिम्ब वर्वर अवट नि सौवीर ॥ ८२ ॥
त्रिशिर उशीनर पारशैल गोशील नि खश विन्ध्य ।
सनर्त मेखल उलूक कोशल सूर्यारक अन्ध ॥ ८३ ॥
कलिङ्ग तेवी शूरसेनपुरि कोहर कौवेर ।
देश शिखापद दरी नि सुन्दर भासे गान्धार ॥ ८४ ॥
या देशांतिल नानाभाषा नाना वेषगण ।
विचित्ररत्नें वस्त्रादिक बहु विस्तृतसे सदन ॥ ८५ ॥
वृक्षांच्या बहु जाति हि जेथें हेमांच्या[1] खाणी ।
ऐसें कथिलें स्वरूपसुन्दर देशांचें कोणी ॥ ८६ ॥
स्वामी जिंकुनि रघुसुतयुगलें वश केले जाणी ।
आज्ञाधारक बनले अर्पण हेमादिक करुनी ॥ ८७ ॥
विक्रम पाहुनि केवळ झाले वश कांहीं भूप ।
पुण्योदय हा जयादिकांना कारण सुखरूप ॥ ८८ ॥
यापरि पृथ्वी जिंकुनि झाले सकल नृपश्रेष्ठ ।
नानासुन्दर सुकथा कथिती ज्यांचे विम्वोष्ठ[2] ॥ ८९ ॥
केले त्यांनीं आनन्दानें मातुलनगरास[3] ।
सुमुहूर्तावरि गमन जयांच्या हृदयीं उल्हास ॥ ९० ॥
राष्ट्राद्यधिकृत-लोकापासुनि मिळविति सम्मान ।
आले नगरासमीप ज्यांच्यासवें नृपालगण ॥ ९१ ॥

( लव-अङ्कुशांचें पुण्डरीकपुरीला आगमन. )

इकडे सीता प्रासादाच्या सप्तम भूमितलीं ।
सुन्दरनारी वेष्टितसौख्यें सिंहासनिं वसली ॥ ९२ ॥
गगनीं चञ्चल धूसर[4] दिसला धूळीचा लोट ।
कथा सखीनो काय दिशांचें जें व्यापी पोट ॥ ९३ ॥
सैन्याची ही धूळचि वाटे गगनीं गेलेली ।
त्यांत दिसे ही हयसेना[5] बहु सुन्दरशा चालीं ॥ ९४ ॥
आम्हा गमतें तव सुत आले विजयी होऊन ।
भुवनीं दिसती हेचि नरोत्तम सुगुणांची खाण ॥ ९५ ॥

---

१ सोन्यांच्या. २ तोंडल्याप्रमाणें ज्यांचे ओठ आहेत असे. ३ मामाच्या नगराला. ४ पांढुरका. ५ घोड्यांचें सैन्य.

सीतादेवीहृदया करि जी प्रमुदित तनयकथा ।
चालत असतां इष्टनिवेदक हर्षित करि चित्ता ॥ ९६ ॥
अत्यानन्दें भूषित केलें प्रजाजनें नगर ।
तटशिखरावरि लावियले ध्वज जे निर्मल फार ॥ ९७ ॥
प्रतिगृहिं तोरणपङ्क्ति लाविली द्वारावरि सुजनें ।
राजपथावरि पुष्पें पसरिलिं सुरभित हृष्टमनें ॥ ९८ ॥
उत्तम पल्लव वदनीं ज्यांच्या ऐसे जलकलश ।
द्वारीं द्वारीं स्थापन केले सुजनें हर्षवश ॥ ९९ ॥
बाजाराच्या मार्गी वस्त्रें अन्थरलीं विविध ।
शोभा आली तेणें त्याला वर्णिति कवि विबुध ॥ १०० ॥
खचरांनीं वा सुरें रमेनें जणु रचिलें नगर ।
पुण्डरीक हें दिसे अयोध्येसम अतिशय रुचिर ॥ १०१ ॥
अनुपमविभवें प्रवेशलेल्या बघुनि कुमारांना ।
हर्ष जहाला अतिशय तेव्हां नरनारीनयना ॥ १०२ ॥
झाले जे कृतकृत्य तनययुग त्यांना पाहून ।
अमृतजलामधिं सीता बुडली प्रमुदित होय मन ॥ १०३ ॥
कर जोडुनि निज जननीसंनिध जाउनि विनयानें ।
नमन तियेला केलें सादर विक्रमियुगलानें ॥ १०४ ॥
तनयस्नेहीं तत्पर सीता निजसुतयुगलास ।
आलिङ्गुनि ती फिरवी पाठीवरि निजहस्तास ॥ १०५ ॥
हुंगुनि मस्तक अत्यानन्दें अश्रुगणा ढाळी ।
वैदेहीच्या हृदया तेव्हां प्रसन्नता आली ॥ १०६ ॥
आत्मजयुग हे रविचन्द्रासम लोकव्यवहारा ।
वर्तविती हे पाहुनि झाली प्रमुदित रघुदारा ॥ १०७ ॥
दास जिनाचे असती त्याचें वाढे ऐश्वर्य ।
कीर्ति तयांची विश्वीं नाचे वदती कविवर्य ॥ १०८ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्त पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे लवणांकुशदिग्विजयकीर्तनं नाम एकाधिकशतं पर्व ॥ १०१ ॥

---

१ आवडती वार्ता सांगणारा दूत.

# एकशेदोनाव्या पर्वांतील कथा.

ते लवण व अङ्कुशकुमार अनेक राजांना जिंकून विशाल ऐश्वर्यशाली झाले. अनेक राजे त्यांची आज्ञा पुष्पमालेप्रमाणें स्वमस्तकीं धारण करीत असत.

एकेवेळीं कृतान्तवक्र-सेनापतिकडे येऊन नारदानें तूं सीतेला कोठें नेऊन सोडलेस सांग असा प्रश्न विचारला. तिच्या त्यागामुळें माझें मन दुःखी झालें आहे. त्यानें ' सिंहरवा ' नामक वनांत मी तिला रामप्रभूच्या आज्ञेनें सोडून आलों असें सांगितलें. यानंतर नारद हुडकित हुडकित वज्रजङ्घाच्या पुण्डरीकपुरांत आला. ज्या प्रासादांत ती राहत होती तेथें तो आला. तेथें सीतेच्या दोनपुत्रांना त्यानें पाहिलें. ते दोघे उठून उभे राहिले. व आदरानें त्यांनीं त्याला आसनावर बसविलें. नारदानें त्या दोघांना ' राम व लक्ष्मणांचें ऐश्वर्य तुम्हाला प्राप्त होवो ' असा आशीर्वाद दिला. तो ऐकून ते कोणत्या वंशांत जन्मले, त्यांचे ऐश्वर्य, गुण व आचार कसे आहेत हें सांगा असा प्रश्न विचारला.

तो प्रश्न ऐकून नारद म्हणाला— ' कुमारांनो, तुम्हाला राम-लक्ष्मण कोण आहेत हें माहीत नाहीं म्हणता तर तुम्ही आकाशांतील चन्द्र सूर्यांनाही जाणत नसाल? ' याप्रमाणें आश्चर्य व्यक्त करून याप्रमाणें त्यानें त्यांची कथा सांगितली:—

अयोध्येंत पूर्वी दशरथराजा राज्य करीत होता. त्याला राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न असे चार पुत्र आहेत. त्यानें केकयीनें मागितलेल्या वराप्रमाणें भरताला राज्य दिलें व बापाचें सत्यवचन पाळण्यासाठीं रामचन्द्र, सीता व लक्ष्मणाबरोबर वनांत निघून गेले. फिरत फिरत ते तिघेजण दण्डकवनांत आले. त्याठिकाणीं चन्द्रनखेच्या प्रसंगानें युद्धप्रसंग उत्पन्न झाला. लक्ष्मण खरदूषणाबरोबर लढत असतां त्याला मदत करण्यास रामचंद्र गेल्यावर रावणानें सीतेला हरून लंकेंत नेलें. रामचंद्र व लक्ष्मणांना

मारुति, सुग्रीव आदिक विद्याधरराजांनीं साहाय्य केलें. त्यामुळें रावणाबरोबर युद्ध होऊन लक्ष्मणानें रावणाला युद्धांत मारलें व सीतेला घेऊन रामचन्द्र लक्ष्मणासह अयोध्येंत येऊन राज्य करूं लागले. यानंतर लोकापवादानें क्षुब्ध होऊन रामचन्द्रानें सीतेच्या पूर्वभवाचें पाप उदयाला आल्यामुळें तिचा त्याग केला.

हें ऐकून लवण व अंकुश यांना अतिशय कोप उत्पन्न झाला. त्यांनीं रामचन्द्राबरोबर लढाई करण्याचा विचार निश्चित केला. येथून अयोध्या किती दूर आहे हें सांगा असें नारदास त्यांनीं विचारलें. त्यानें येथून ती एकशेसाटयोजनें दूर आहे असें सांगितलें.

यानंतर त्या कुमारांनीं आपल्या वज्रजंघमामांना म्हटलें– ' मामा, आम्ही सैन्य जमवून राम-लक्ष्मणाबरोबर युद्ध करण्यास जातो. वज्रजंघराजानें त्यांचें म्हणणें मान्य केलें. त्यानें सर्व सैन्यांना सज्ज होण्याची आज्ञा केली. हें ऐकून सीतेला फार दुःख झालें. ती कुमारांना म्हणाली– बाळांनो, राम व लक्ष्मण तुमचे पिता व चुलते आहेत. त्यांच्याशीं युद्ध करून तुम्ही फार मोठें संकट आपणावर ओढून घ्याल. या युद्धांत तुमचा, किंवा राम-लक्ष्मणांचा नाश झाला तर मला फार दुःख होईल. तुम्ही त्यांच्याकडे विनयानें जा. वडिलाबरोबर युद्ध करणें योग्य नाहीं. कुमार म्हणाले– माते, आम्ही तुमचे पुत्र आहो अशी दीनवाणी त्यांच्यापुढें काढणार नाहीं. आज पिताजींना आम्ही शत्रु समजतो. त्यांना नमस्कार करून आम्ही तुमचे पुत्र आहोत असें दीनवचन बोलणार नाहीं. हें पुत्रांचें वचन ऐकून सीता फार कष्टी झाली.

यानंतर लवण व अंकुश यांनीं स्नान करून जिनपूजन केलें व जेवण करून व मातेला नमस्कार करून हत्तीवर बसून युद्धार्थ सेनेसह अयोध्येकडे निघाले.

अनेक आज्ञांकित राजेही आपले सैन्य घेऊन कुमाराकडे आले. नदीच्या प्रवाहांनीं विस्तीर्ण बनलेल्या सागराप्रमाणें तें सैन्य फार विस्तीर्ण झाले. अशा विस्तीर्ण सैन्यासह प्रयाण करून कांहीं दिवसांनीं दोघे कुमार अयोध्येजवळ आले.

इकडे नारद व क्षुल्लकव्रती सिद्धार्थ अतिशय व्याकुल होऊन भामण्डलाकडे गेले. त्याला वरील सर्व हकीकत सांगितली. तेव्हां तो सीतात्यागामुळें रामचंद्रावर रुष्ट झाला. जनकराजा व राणी विदेहा या माता-पित्यासह तो विमानांत बसून व सैन्यासह पुण्डरीकपुराकडे आला. सीतेला आपल्या माता-पित्यांना व बन्धूंना पाहून दुःख झालें नंतर ती आपल्या सुनासह विमानांत बसून अयोध्येकडे आपल्या बंधूसह निघाली.

राम व लक्ष्मणांनीं युद्धासाठीं अनेक विद्याधरराजे व सिंहोदरादि भूगोचर राजांना बोलाविलें. त्यांच्या आज्ञेला अनुसरून सर्व राजे आले. हनुमान व सुग्रीवादिकांना रामानें सीतात्याग केला ही गोष्ट पसंत न पडल्यानें रामाचा पक्ष त्यांनीं घेतला नाहीं व ते लवण आणि अंकुशाच्या बाजूचे झाले.

दोन्ही सैन्यें लढूं लागली. लवण व अंकुश क्रमानें राम व लक्ष्मण यांच्या-बरोबर लढूं लागले. तेव्हां युद्धांत काय घडून आलें याचें वर्णन पुढील पर्वांत येईल.

# एकशेदोनावें पर्व.

[ नारद लवण व अंकुशाला राम-लक्ष्मणांची कथा सांगतात. ]

झाले परमैश्वर्यप्राप्त नरोत्तम कुमार ते दोघे ।
उन्नतनृपवर्गाही करिती आज्ञा विशाल पुण्यौघें ॥ १ ॥
तेव्हां कृतान्तवदना नारद येउनि विचारिता झाला ।
कोठें त्यजिली सीता सांग मला दुःख होय हृदयाला ॥ २ ॥
हुडकित हुडकित आला बघुनि तया वीर आसना त्यजुन ।
राहून उभे पूजिति देती आसन समादरा[1] करुन ॥ ३ ॥
बसुनि सुखानें आसनिं सन्तोष मनास ज्याचिया झाला ।
स्नेहें पाहुनि नारद कुमारयुगला असें तदा वदला ॥ ४ ॥
नरनाथ राम-लक्ष्मण यांची लक्ष्मी जशी तुम्हास तशी ।
होवो प्राप्त असें मी आशीर्वच देतसे सुशीघ्र वशी ॥ ५ ॥
नन्तर कुमार वदले भगवन्ता कोण राम-लक्ष्मण ते ।
गुण आचार तयांचे कोण्या वंशांत जन्मले वद ते ॥ ६ ॥
आश्चर्यचकित होउनि मौन क्षणभरि धरून मग वदला ।
फिरवून हस्तपल्लव ऐका सावध करून हृदयाला ॥ ७ ॥
कोणी निजबाहूंनीं सुमेरु उचलिल तरेल जलधीसें[2] ।
परि राम-लक्ष्मणांच्या गुणवर्णनिं नच ठरेल तो ईशें[3] ॥ ८ ॥
सम्पूर्ण लोक देखिल गुण वर्णाया अनन्तवदनांनीं ।
न समर्थ निश्चयानें होतिल हें तत्त्व घ्या तुम्ही ध्यानीं ॥ ९ ॥
तुमच्या या प्रश्नाचें उत्तर द्यायास कांपतें हृदय ।
परि मी स्थूलमनानें वदतो जें पुण्यवर्धनीं सदय ॥ १० ॥
इक्ष्वाकुकुलाकाशीं राकाचन्द्रा[4]समान जो भासे ।
जो दुष्टइन्धनांना[5] जाळाया अग्निसा सदैव दिसे ॥ ११ ॥

---

१ चांगला आदर. २ समुद्रास. ३ समर्थ. ४ पौर्णिमेचा चन्द्र.
४ दुष्ट लोकरूपी लांकडांना.

सूर्यासम तेजस्वी नृप उत्तरकोसलाख्यदेशाचा ।
स्वामी दशरथ धरि जो प्रकाश सर्वत्र सकलसुगुणांचा ॥ १२ ॥
जैसे शैलापासुनि निघुनि नद्या सागरास जातात ।
या पुरुषपर्वतांतुनि कीर्ति नद्या करिति सुजन सन्तुष्ट ॥ १३ ॥
या दशरथराजाला सुनयासम[1] तनय चार आहेत ।
जे राज्यभारवहनीं समर्थ गुणपूर्ण जगतिं विख्यात ॥ १४ ॥
पहिला राम खरोखर देहें वचनें मनेंहि अभिराम[2] ।
सर्वश्रुतज्ञ[3] असुनि हि विश्वीं विश्रुत तथैव गुणधाम ॥ १५ ॥
तो लक्ष्मण अनुजासह भार्या सीतेस जनकतनया जी ।
घेउनि पितृसत्याचें पालन करण्यांत सर्वदा राजी ॥ १६ ॥
त्यागून अयोध्येला वेषान्तर करुनि फिरत भूमिवरी ।
दण्डकवनांत आला जें विद्याधरजना हि भयकारी ॥ १७ ॥
तेथें चन्द्रनखेचा प्रसङ्ग येऊन घोर रण झालें ।
अनुजा मदत कराया जातां सीतेस रावणें हरिलें ॥ १८ ॥
नन्तर महेन्द्र किष्किन्ध नि हनुमान् नृपविराध खेचर हे ।
कपिकेतुमुख्य सैन्यासह आले रामपक्ष त्या पाहे ॥ १९ ॥
रामगुणप्रेमानें पुण्यें आकृष्ट सर्व ते झाले ।
लङ्केश्वरास जिंकुनि सीतेसह राम निजपुरां आले ॥ २० ॥
स्वर्गपुरासम नगरीं साकेता वनविलीं अनेक खगें ।
दोघे पुरुषोत्तम ते विशाल ऐश्वर्ययुक्त अनुरागें ॥ २१ ॥
नागेन्द्रासम भोगिति सुख साकेतीं निमग्न होऊन ।
करिती निजप्रजेचें पालन दुष्टास योग्य दण्डून ॥ २२ ॥
चक्र सुदर्शन ज्याचें अमोघकार्यास सर्वदा करिते ।
तो लक्ष्मीधर ज्याचा अनुज सदा वीरपङ्क्ति ज्या यजिते ॥ २३ ॥
ऐशा प्रसिद्ध रामा आपण नच जाणता मला नवल ।
वाटे सूर्यादेखिल नसाल जाणत अशी कशी भूल ॥ २४ ॥
एकेक रत्न ज्याचें देवसहस्रें सुरक्षिलें जातें ।
देव त्रिखण्डगत जे वन्दिति चरणां वरून आज्ञेतें ॥ २५ ॥

---

१. साम, दाम, दण्ड व भेद हे चार जप. २ सुंदर. ३ सर्वशास्त्रांचा जाणणारा.

ज्यानें प्रजाहितास्तव त्यजिली सीता अशा तया रामा ।
या जगतीं नच जाणी प्राणी नच आढळेल अभिरामा ॥ २६ ॥
इहलोककथा राहो त्याचे स्वर्गीं हि अमर गुण गाती ।
नर खेचर सुर दानव त्याच्या गुणगायनांत नित रमती ॥ २७ ॥
यापरि नारदभाषण ऐकुनि अंकुशकुमार त्या वदला ।
कां जानकी तयानें त्यजिली तद्धेतु तो वदा मजला ॥ २८ ॥
रामगुणस्मरणानें ज्याच्या डोळ्यांत आसवें आलीं ।
तो नारद देवर्षी यापरि बोले तदीयचरिताली ॥ २९ ॥
निर्मलगोत्रामध्यें जन्म जिचा उच्च तेवि चारित्र ।
जी हृदयानें सरला जिच्यांत गुण राहतात सुपवित्र ॥ ३० ॥
आठहजारस्त्रीगणिं जी मुख्या अतिविचक्षणा राणी ।
श्रीकीर्त्यादिकदेवीगणास जिंकी असेचि गुणखाणी ॥ ३१ ॥
पावित्र्य जिचें बघतां जैनश्रुतितुल्यता जिचें ठायीं ।
वर्णन सतीजनांचें यथार्थ होईल कोणत्या समयीं ॥ ३२ ॥
जें पूर्वभवीं केलें तें आलें पापकर्म उदयास ।
केवल जनापवादें विजनवनीं सोडिली महायास ॥ ३३ ॥

[ सीतात्यागाची वार्ता नारदमुखें ऐकून कुमारांची युद्धतयारी. ]

खलजनरविवचनकरें[1] होउनि सन्तप्त पावली नाश ।
जी सौख्यानें वर्द्धित[2] दिसेल आतां न लोकनयनास ॥ ३४ ॥
अल्पहि कारण मिळतां सुकुमारा दुःख होतसे प्राप्त ।
दीपप्रकाश दिसतां मालतिमाला सुकून जातात ॥ ३५ ॥
सिंहादिहिंस्र विचरति ऐशा भीषणवनांत वैदेही ।
करिल प्राणा धारण वाटेल तयास जो असे मोही ॥ ३६ ॥
पापिजनांची जिह्वा दुष्टभुजङ्गीसमान समजावी ।
निर्दूषणास चावे तेणें ते दुःख भोगतात भवीं ॥ ३७ ॥
जी आर्जवादिसुगुणश्लाघ्या[3] अतिनिर्मला सती सीता ।
त्यागुनि तिजला इहपरलोकीं मिळवील सौख्य कां जनता ॥ ३८ ॥

---

१ दुष्ट लोकरूपी सूर्याच्या भाषणरूपी किरणांनीं. २ वाढविलेली. ३ सरळपणा आदिक सद्गुणामुळें लोकाकडून प्रशंसिलेली.

जगिं योग्य कर्म असतें प्राण्यांचें शुभ नि अशुभ तें जागें ।
तेणें पीडित झाले आहेत भवांत जीव भवरोगें ॥ ३९ ॥
यापरि बोलुनि नारद शोकानें विकल जेधवा झाले ।
शब्द निघे न मुखांतुनि त्यांनीं मौनव्रतास तैं धरिलें ॥ ४० ॥
अङ्कुश हसून वदला कुलशोभनकार्य हें न रामाचें ।
भीषणवनांत त्यजिली वैदेही जाहलें न हें साचें ॥ ४१ ॥
लोकापवादहरणीं असती नाना उपाय जगतांत ।
त्याग तियेचा परि वनिं करणें योग्यचि न विबुध गातात ॥ ४२ ॥
म्हटलें अनङ्गलवणें असे अयोध्या इथून किति दूर ।
साठ नि शंभरयोजन दूर असें बोलला अवद्वार[1] ॥ ४३ ॥
आम्ही त्या जिंकाया निघतो या अल्पभूमिभागांत ।
प्राधान्य[2] वाटतें नच आम्हा हें जाण नारदा तात ॥ ४४ ॥
श्रीवज्रजङ्घभूपा वदले मामा अनेक भूपगणा ।
कळवा सैन्यासह या साकेतीं जावयास घोररणा ॥ ४५ ॥
गज निर्मदीं मदी[3] वा पाहावें अश्व वेगवन्त ह्वे ।
युद्धोपयोगि शिक्षण दिलें असे गज नि अश्व बहु बरवे ॥ ४६ ॥
विख्यात नि समरांतुनि नच पळणारे बघून सुभटांना ।
घ्यावें युद्धासाठीं बनवावी अतितेजदार शस्त्रगणा ॥ ४७ ॥
चिलखत टोपादिक हे तुटले असल्यास शीघ्र सांधावें ।
जेणें सुसज्ज होउनि सेना अरिवरि विशालशी धावें ॥ ४८ ॥
शंखमहाध्वनिमिश्रित वाद्यांचे ध्वनि करून कळवावी ।
वार्ता सर्वभटांना युद्धाची कार्यदक्षता घ्यावी ॥ ४९ ॥
यापरि आज्ञापुनि ते कुमारयुग मोद धरुनि समराचा ।
धैर्यें विशालविभवा सेविति ऐसा नसेचि अमराचा ॥ ५० ॥
सुत दोन आपुले श्रीरामावरि आक्रमा[4] करायास ।
उद्यत झाले पाहुनि सीता करि घावरून रुदनास ॥ ५१ ॥
सीतासमीप नारदमुनीस पाहून त्यास सिद्धार्थ ।
वदला मुने अशोभनकार्यें होईल हो महानर्थ ॥ ५२ ॥

---

१ नारद. २ महत्वाचे. ३ मदरहित व मदसहित. ४ चढाई, युद्ध.

रणकौतुकी नि कलहा लावुनि मनिं नित्य मानिता मोद ।
आपण करीत आह्मा कुटुम्बभेद न गमे तयें खेद ॥ ५३ ॥
नारद सिद्धार्थाला वदला हें वृत्त नच मला ज्ञात ।
श्रीराम-लक्ष्मणाची म्हणुनि कथा बोललों असे तात ॥ ५४ ॥
घडलें असें असे जरि होइल सुन्दर न भीति यांत असे ।
मन शान्त ठेव होइल हितचि न अहितास यांत वाव वसे ॥ ५५ ॥
वदले कुमार माते कां करिशी रुदन मोडिलें वचन ।
कोणी त्याचें करितो आम्ही तत्काल बोल असुहरण[1] ॥ ५६ ॥
प्रतिकूल कार्य केलें असेल कोणी खलें तसें बोल ।
आम्ही त्याचें घेऊ प्राण सुनिश्चित न वेळ लागेल ॥ ५७ ॥
औषध करीं न घेतां सर्पाशीं खेळ खेळतो कोण ।
मानव किंवा देवहि न तुला शोकी करूं शके जाण ॥ ५८ ॥
राग तुझा कोणावरि असेल आयुष्य संपलें त्याचें ।
करुनि कृपा हे माते कारण आम्हांस सांग शोकाचें ॥ ५९ ॥
यापरि कुमारयुगलें विचारिलें तेधवा सती वदली ।
कमलाक्ष[2]सुपुत्रांनो, कोणावरि कोपविकृति नच कसली ॥ ६० ॥

[ लवणांकुशांना सीता त्यांच्या पितृकुलाची कथा सांगते. ]

तुमच्या स्मरण पित्याचें झालें मज दुःख वाटलें तेणें ।
रडले ओले झाले माझे हे गाल अश्रुसन्ततिनें ॥ ६१ ॥
मातृश्री वद आम्हा कोण पिता आमुचा कुठें राहे ।
तेव्हां सीता वदली वत्सांनो वृत्त हें असें आहे ॥ ६२ ॥
कथिली सतीमणीनें स्वोत्पत्ति नि रामजन्म तनयांना ।
लग्न वनामधिं गमन नि हरण नि युद्धप्रसङ्गसे नाना ॥ ६३ ॥
पुनरागमन अयोध्यानगरीं राज्याभिषेक गर्भांत ।
तुमचें येणें नन्तर जनवादें त्याग मम अरण्यांत ॥ ६४ ॥
केला तुमच्या जनकें बसले मी शोक तेधवा करित ।
श्रीपुण्डरीकपुरपति रुदनध्वनि ऐकुनी तिथें त्वरित ॥ ६५ ॥
श्रीवज्रजङ्घ आला विशुद्ध शीलव्रतें सदा पूत[3] ।
पाहून मला वदला दयार्द्र होऊन सुजनहृदयांत ॥ ६६ ॥

१ प्राण घेणें. २ कमलाप्रमाणें डोळे असलेले. ३ पवित्र.

माझी बहीण समजुनि रक्षिन मी शोक करि न तूं आर्यें ।
बोलून आणिलें मज रक्षियलें आदरेंचि नृपवर्यें ॥ ६७ ॥
जणु माझ्या जनकाच्या गृहिं तुमचा जन्म जाहला विमल ।
ऐशी कथा असे ही ध्यानीं घ्यावी समस्त ही सरल ॥ ६८ ॥
तुमचा राम पिता तो त्यानें ही लक्ष्मणानुजासहित[1] ।
हिमवत्सागरसीमित[2] पृथ्वी संरक्षिली असे खचित ॥ ६९ ॥
आतां युद्ध भयानक होइल त्याच्यांत अशुभ येईल ।
ऐकाया काय मला याचें भय वाटतें मना विपुल ॥ ७० ॥
तुमच्या जनकाविषयीं तुम्हाविषयीं नि देवराविषयीं ।
होईल अशुभ वाटुनि पीडा अत्यन्त होतसे हृदयीं ॥ ७१ ॥
वत्सांनो हें कारण रडण्याचें मम असे म्हणून रणा ।
तुम्ही उद्यंत व्हा नच मातेची येउ द्या तुम्हा करुणा ॥ ७२ ॥
हें मातृवचन ऐकुनि झाला लवणा नि अङ्कुशा मोद ।
हासत हासत वदले माते लवहि न मनीं करी खेद ॥ ७३ ॥
अमुचा पिता सुधन्वी[3] लोकप्रख्यात विपुलकीर्तीचा ।
केलीं अद्भुतकार्यें त्याच्यासम नच दुजा असे साचा ॥ ७४ ॥
हें आम्ही पाहावें ऐशी इच्छा असें मनीं प्रबल ।
तुजला वनांत त्यजिलें आम्हा तत्कृत्य वाटतें गरल[4] ॥ ७५ ॥
परि माते तूं मानू नकोस हृदयीं विषाद तिळभरही ।
त्या राम-लक्ष्मणांचा हरु मान उरेल तो न गे लवही ॥ ७६ ॥
सीता वदली तेव्हां बाळांनो गुरुजनासवें करणें ।
योग्य न विरोध त्यांच्या पदिं परि सद्भक्ति योग्य जी धरणें ॥ ७७ ॥
व्हा सौम्यचित्त तुम्ही विनयें जाउनि करा नमस्कार ।
पाहा पितृचरणांना नीतीचा मार्ग हाचि सुखसार ॥ ७८ ॥
लवणाङ्कुश तैं वदले शत्रुस्थानीं पिता असे आतां ।
वन्दू तयास कैसें उचित गमे आमुच्या न हें चित्ता ॥ ७९ ॥
आम्ही तुमचे मुलगे ऐसें हें दीनवचन नच बोलू ।
उन्नत आम्ही राहू कदापि तत्पदरजांत नच लोळू ॥ ८० ॥

---

१ धाकटा भाऊ लक्ष्मणासहित. २ हिमवान् पर्वत व समुद्र यांच्या मर्यादेनें युक्त. ३ उत्तम धनुर्विद्या जाणणारा. ४ विषाप्रमाणें.

तुमुल अशा सङ्ग्रामीं मरणें त्याहून सर्वथैव बरें ।
वीरजनाचाराला त्यजणें न स्तुत्य आणि नैव खरें ॥ ८१ ॥
ऐकून पुत्रभाषण सीता चिन्तार्तचित्त[1] बहु झाली ।
स्नानादिकार्य केलें लवणानें अङ्कुशें नि त्या कालीं ॥ ८२ ॥
केलें वन्दन त्यांनीं लोकोत्तम शरण मङ्गला सिद्धां ।
मातेस करुनि नमन प्रशान्त केलें तिला वचें शतदा ॥ ८३ ॥

[ पिता व चुलत्याबरोबर युद्ध करण्यासाठीं लवणाङ्कुशांचें
प्रचण्डसैन्यासह अयोध्येकडे प्रयाण. ]

रविचन्द्र शैलशिखरीं झाले आरूढ ते गजावरतीं ।
सिंह नि गरुडावरती पद्म नि लक्ष्मणसमान ते दिसती ॥ ८४ ॥
राम नि लक्ष्मण जैसें लङ्केप्रति पद्मसुत[2] हि साकेतीं[3] ।
आक्रमण्यास्तव जाती विशालसेना निघे तयापुढती ॥ ८५ ॥
आले अनेक राजे सैन्यासह पद्मसुतयुगाज्ञेनें ।
तेणें वाढे सेनासागर सरिता जलप्रवाहानें ॥ ८६ ॥
सेनाप्रमाण होतें योजनमात्र नि विशाल पाहत ते ।
नानाधान्यें शोभित पृथ्वी करिती प्रयाण नृपतिशतें ॥ ८७ ॥
त्यांचा प्रताप होता मोठा पसरत पुढें पुढें तेणें ।
येउनि अनेक राजे पूजिति त्यांच्या पदां प्रसन्नमनें ॥ ८८ ॥
हातीं महाकुठारी[4] घेउनि जाती दहासहस्रजन ।
तोडुनि वृक्षा करिती सपाट दर्पणसमान भूमिवन ॥ ८९ ॥
रेडे उण्ट नि मोठे बैल जया जुम्पिले असे शकटें[5] ।
जे कोशांनीं[6] भरले संरक्षकयुक्त जाति ते नीट ॥ ९० ॥
नन्तर पायदळांचें प्रचण्डसें सैन्य तरुण हरिण जसे ।
वेगानें बहु जातें शौर्य जयाचें अगाधसें विलसे ॥ ९१ ॥
यानन्तर घोड्यांचें खिंकाळत सैन्य चाललें होतें ।
बघतां अरितति[7] ज्यांना कम्पित होऊन नम्रता वरिते ॥ ९२ ॥
कण्ठांत महाघण्टा शङ्ख नि चामर समीप कानांचें ।
ज्यांच्या शोभत होते सहस्रगजसैन्य जातसे साचें ॥ ९३ ॥

---

१ चिंतेनें पीडित मनाची. २ रामचंद्राचे पुत्र. ३ अयोध्येंत. ४ मोठ्या कुऱ्हाडी ५ गाड्या. ६ खजिन्यांनीं. ७ शत्रुसमूह.

अङ्गीं चिलखत ज्यांच्या पाठीवरि ढाल बान्धिली ज्यांनीं ।
हातीं भाला घेउनि जाति हयारोह[1] शोभते अवनि ॥ ९४ ॥
घोड्यांच्या पायांच्या आघातें रेणु शुभ्र गगनांत ।
पसरुनि शारद-मेघभ्रान्ति जनांच्या करी मनीं सतत ॥ ९५ ॥
शयनासन ताम्बूल नि गन्ध मनोहर सुवस्त्र आहार ।
देण्याच्या या कार्यी नियुक्त होती अनेक चतुर नर ॥ ९६ ॥
जल मधुर अन्न साखर तूप नि तैलादि वस्तु सर्वास ।
आदरभावें देती वाटे तेणें जनास सन्तोष ॥ ९७ ॥
दीन बुभुक्षित[2] तृषित[3] नि मलिनकुवस्त्री दिसे न जन कोणी ।
चिन्ताक्रान्त मनाचा नव्हता सैन्यांत दुःखित प्राणी ॥ ९८ ॥
नानालङ्कारांनीं सुन्दर जे भासती नि चित्तहर[4] ।
ऐसे पुरुष नि नारी होती सेनार्णवांत[5] भरपूर ॥ ९९ ॥

[ अयोध्येच्या प्रदेशाचें वर्णन. ]

पुष्कळ वैभव ज्यांचें ऐसे ते दोन पुत्र सीतेचे ।
साकेता देशामधिं आले जणु दोन इन्द्र अमरांचे ॥ १०० ॥
यव गहु तिल शाल्यादिक धान्यें सम्पन्न भूमि जेथील ।
शोभे अन्तरविरहित पुण्ड्रेक्षूंचे[6] मळे सदा विपुल ॥ १०१ ॥
हंससमूहं सरिता सुन्दरकमलें सरोवरें दिसती ।
नानाविधपुष्पांनीं पर्वत पृथ्वीस पाहुनी हसती ॥ १०२ ॥
गायी म्हशी नि पुष्कळ पुष्ट असे बैल वासरें यांनीं ।
शेतें वनें बगीचे सुन्दर दिसतीं फळें नि पुष्पांनीं ॥ १०३ ॥
गांवें जेथें दिसतीं खेडीं रचना निबद्धपुरतुल्य ।
नगरें जेथिल दिसतीं स्वर्गपुरीसम सदैव अनुपम्य ॥ १०४ ॥
साकेताविषयामधिं शिरून विषयोपभोग घेती ते ।
अतिशय तेज तयांचें सूर्यासम सज्जनास जणु गमतें ॥ १०५ ॥
वाहे गण्डांतुनि जो मद जातां धूलि शान्त हो तेणें ।
परि चिखल विपुल झाला जाणें येणें गमे सुकष्टपणें ॥ १०६ ॥

---

१ घोडेस्वार. २ भुकेलेले. ३ तहानलेला. ४ मनोहर. ५ सैन्यसमुद्रांना.
६ पट्टेवाला ऊस, पुंड्या ऊस.

कोसलविषयाची जी भूमि जहाली समस्त जर्जर ती ।
चञ्चलहयखुरघातें वदती सुदती सुकष्ट दिवस किती ॥ १०७ ॥
सन्ध्यामेघ-समूहें जणु झाले व्याप्त सर्व आकाश ।
पाहून लवणअङ्कुश वदती श्रीवज्रजङ्घमामास ॥ १०८ ॥
हें काय नभीं दिसतें उत्तुङ्ग नि ताम्बडी महाकान्ति ।
जें धरितें बोला तें करून सुविचार तेधवा चित्तीं ॥ १०९ ॥
वत्सांनो ही आहे नगरी पसरे सभोवती उंच ।
हा तट सुवर्णरत्नें रचलेला वाटतो मला साच ॥ ११० ॥
या नगरीमधिं राहे हलधर तुमचा पिता जया भ्राता ।
लक्ष्मण नारायण जो शत्रुघ्नहि जो सदा प्रजात्राता ॥ १११ ॥
शौर्यकथासांगत ते चालत असतां नदी मधें आली ।
लङ्घुनि आक्रमणानें पुरी निजाधीन पाहिजे केली ॥ ११२ ॥
यापरि करुनि विचारा नदीतटीं स्थापिली तयें सेना ।
नन्दनसरितेच्या तटिं सुरसेना जणु विराजली माना ॥ ११३ ॥
अरिसैन्य जवळ येउनि केला त्यानें नदीतटीं वास ।
ऐकून राम-लक्ष्मण वदले अरि कोण इच्छि मरणास ॥ ११४ ॥
बोलावून विराधितनृपास नारायणें त्वरें म्हटलें ।
युद्धार्थ शीघ्र राजन् सज्ज करा सैन्य सर्व जें अपुलें ॥ ११५ ॥
जे विद्याधरराजे असती युद्धार्थ सज्ज व्हायास ।
कळवावें त्यांनाही लढून टाकू करुन अरिनाश ॥ ११६ ॥
जैशी अपुली आज्ञा म्हणुनि विराधितखगेश्वरें दूत ।
पाठविले सुग्रीवादिकांकडे कथियलें तयें वृत्त ॥ ११७ ॥
घेउनि विशालसैन्यें सुग्रीवादिक खगेश झणिं आले ।
साकेतापुरिं युद्धासाठीं तत्काल सज्ज ते झाले ॥ ११८ ॥

[ नारद व सिद्धार्थ यांचें भामंडलाकडे प्रयाण. ]

अत्यन्ताकुल होउनि गेले भामण्डलाकडे दोघे ।
नारदसिद्धार्थ तया भामण्डल हर्षयुक्त नमुनि बघे ॥ ११९ ॥

[ भामंडल सीतेसह व तिच्या सुनासह विमानांत बसून अयोध्येस येतो.]

रामें सीता त्यजिली ऐसा वृत्तान्त नारदें कथिला ।
तो ऐकुनि भामण्डल हृदयीं अत्यन्त खिन्नसा झाला ॥ १२० ॥

लवणाङ्कुश रागानें पित्यावरोबर करावया युद्ध ।
गेले वार्ता ऐकुनि भावलेयाचें सहर्ष होय मन ॥ १२१ ॥
विस्मय विषाद हर्ष नि भामण्डलमनिं विकार उद्भवले ।
जननीजनका घेउनि तयें विमानें प्रयाण झणि केलें ॥ १२२ ॥
घेऊन सर्व सैन्या आला श्रीपुण्डरीकनगरास ।
भगिनीदर्शन होतां मन त्याचें पावलें विषादास ॥ १२३ ॥
माता पित्या नि भावा पाहुनि सीतामनीं नवा शोक ।
उद्भवला अश्रूंची धारा वाहे अखण्ड नच रोक ॥ १२४ ॥
सान्त्वन करून कष्टें वदला सीतेस भगिनि ! सुतयुगलें ।
अविचार असे केला त्यांचें हें कार्य योग्य नच झालें ॥ १२५ ॥
श्रीराम नि लक्ष्मण हे हली नि चक्री महाबली वीर ।
देवहि समर्थ नसती या उभयासह करावया समर ॥ १२६ ॥
दुर्घटना होउ नये रक्षण व्हावें कुमारयुगलाचें ।
यास्तव आपण जाऊ ऐसें माझ्या मना गमे साचें ॥ १२७ ॥
सीता निघे सुतासह भावाच्या ती वसून सुविमानीं ।
प्राप्त जाहली तेथें युद्धा प्रारम्भ होय जेथ रणीं ॥ १२८ ॥

[ राम-लक्ष्मणाच्या आज्ञांकित राजांचें रणीं आगमन.]

घोडे हत्ती आणिक रथ तेवि पदातिवीर हे वहुत ।
घेउनि विशालसेना श्रीराम निघे रणांगणीं विदित ॥ १२९ ॥
यापरि लक्ष्मण चक्री होउनि आरूढ अश्वयुक्तरथीं ।
शत्रुघ्न हि प्रतापी सदैव ज्या मानितात अग्ररथी ॥ १३० ॥
सर्वांपुढती शोभे कृतान्तमुख हरिणकेशि देवगणीं ।
जैसा शोभे त्यापरि ज्याच्यासम शूर नैव रणिं कोणी ॥ १३१ ॥
ज्याच्या भुजांत वल अति शौर्य असे अप्रमाण देहांत ।
घेउनि धनुष्य हातीं प्रताप ज्याला सदैव दे हांत ॥ १३२ ॥
देवप्रासादासम यमध्वजावरि सदैव शोभतसे ।
पाहूं न शत्रु शकती रथ ऐसा जो रणाङ्गणीं विलसे ॥ १३३ ॥
यमसुख चाले पुढती त्रिमूर्धराजा नि वह्निशिखभूप ।
नन्तर मृगेन्द्रविक्रम त्यानन्तर दीर्घ बाहु निष्पाप ॥ १३४ ॥

---

१ भामंडलाचें. २ बलदेवपदधारक. ३ त्रिखंडस्वामी. ४ पायदळ.

सिंहोदर नि सुमेरू शरभस्पन्दन नि वालखिल्य असे ।
तो वज्रकर्ण दुर्जय पृथुसमरप्रिय नि रौद्रभूति तसे ॥ १३५ ॥
सामन्त सिंहवाहन चण्ड असा मारिदत्त मत्तमना ।
नानाशस्त्रें घेउनि पञ्चसहस्रप्रमाण येति रणा ॥ १३६ ॥
आले कुमारकोटी कुटिल जयांचें अनीक[1] वहु होतें ।
युद्धोत्साह जयांना आगमनें भूमि करिति कम्पित ते ॥ १३७ ॥
कोणी घोड्यावरती कोणी हत्तीवरी रथांत कुणी ।
कुणि पालखींत आले सैन्याचा कलकलाट होय झणीं ॥ १३८ ॥
यापरि परसैन्याचा कलकल ऐकून शब्द कानांनीं ।
सैन्या आज्ञा देई व्हाया सन्नद्ध वज्रजंघ रणीं ॥ १३९ ॥
होऊन सज्ज आले कालानल अङ्ग वङ्ग नेपाल ।
वर्वर मागध पौण्ड्र प्रचूड सिंहल नि शूर पारशिल ॥ १४० ॥
कालिङ्गकादिराजे रत्नाङ्कादिक महावली शूर ।
अकरा हजार आले होते जे रणिं सदा महाधीर ॥ १४१ ॥
यापरि दोन्हीं सैन्यें भिडलीं युद्धास होय सुरवात ।
क्षुब्ध जणु दोन झाले सागर करितात गर्जना त्वरित ॥ १४२ ॥
क्षुद्रा करी मजवरी प्रहार तूं प्रथम सोड वा वाण ।
कां तूं उपेक्षिसी रे फेकिशि न तरी तुला असे आण[2] ॥ १४३ ॥
तूं क्षुद्र नि मी मोठा विकल्प चित्तांत सर्वदा दाटे ।
वार प्रथम तुझ्यावरि शस्त्राचा करूं नये मला वाटे ॥ १४४ ॥
क्षुद्रें प्रहार केला तेव्हां माझा प्रफुल्ल भुज झाला ।
आतां प्रहार करितों सहन करी वा प्रसन्न हृदयाला ॥ १४५ ॥
कम्प तुला कां सुटला तुजला मी मारणार नाहींच ।
नच अडवूं मम मार्गा अन्यावरि वार करिन मी साच ॥ १४६ ॥
नच गर्जना करूं वा वीर्य भुजामधिं न जाण वाणींत ।
वोलाविशील जरि तूं लढेन मी समज तूं स्वहृदयांत ॥ १४७ ॥
जे धैर्यवन्त होते सुभट तयांचें मुखांतुनी असलें ।
भाषण मधुर निघालें जें अतिगंभीरतागुणें भरलें ॥ १४८ ॥

---

[1] सैन्य. [2] शपथ.

भूगोचरराजांचें झालें आगमन उभयवाजूस।
खेचरभूपांचें ही युद्धांच्या धरिति उभय ही जूस ॥ १४९ ॥

[ भामंडल व मारुति यांनीं लवणाङ्कुशाचा पक्ष स्वीकारला.]

भामंडल लवणाङ्कुशपक्षीं येऊन राहिला वीर।
हरिणाङ्क विद्युदुज्ज्वल सुरछन्दादिकहि आहवीं चतुर ॥ १५० ॥
मोठें सैन्य जयांचें ऐसे विद्याधरेश सुविवेकी।
लवणाङ्कुशपक्षाला भजले यन्मन यथार्थतालोकी ॥ १५१ ॥
लवणाङ्कुश सीतेचे सुत जाणुनि वायुपुत्र मारुतिही।
कर्तव्य योग्य जाणुनि तत्पक्षालाच आपणा वाही ॥ १५२ ॥
त्यानें लढून शौर्यें रामाचें सैन्य दूर सारून।
भामण्डल लवणाङ्कुश-पक्षाचें तो करी प्रसन्न मन ॥ १५३ ॥
बसुनि विमानीं आली सीता पाहून सकल खगभूप।
रामीं उदास झाले तत्पक्षा मनिं गणून जणु पाप ॥ १५४ ॥
जोडून हात दोन्ही तिच्या पदा वन्दिलें तयें भावें।
घेरुनि तिच्या विमाना तन्मन लवणाङ्कुशाकडे धावे ॥ १५५ ॥
सीतात्यागीं धजले रामाचें चित्त उचित नच झालें।
विस्मय मनास वाटुनि तत्सुतपक्षास[2] सर्व ते वळले ॥ १५६ ॥
भयचकितहरिणनेत्रा सीता पाहून उभयसेनांना।
थरथर कांपे उभयाविषयीं चिन्ता मनांत ये नाना ॥ १५७ ॥

[ लवण व अंकुश यांचें क्रमानें राम व लक्ष्मण यांच्याबरोबर युद्ध.]

लवणाङ्कुशें रणाङ्गणिं राघवसैन्यास घावरें केलें।
पळवीत बन्धुयुग ते श्रीरामहरीपुढें उभे ठेले ॥ १५८ ॥
दोरी रामकरांतिल चापाची तीव्र बाण फेकून।
तोडुनि रथध्वजासह टाकी श्रीलवण संगरीं निपुण ॥ १५९ ॥
दुसऱ्या रथांत बसले राघव विक्रान्त तेधवा कोपें।
भुवया चढवुनि गेले समीप लढणें गमे जयें सोपें ॥ १६० ॥
ग्रीष्मार्क[3]सम दुःसह राघव दुसरें धनुष्य घेऊन।
चमरेन्द्रावरि जैसे सुरेन्द्र गेले स्वयेंचि धावून ॥ १६१ ॥

१ युद्धांत. २ रामचंद्राच्या पुत्रांच्या बाजूकडे. ३ ग्रीष्मऋतूच्या सूर्याप्रमाणें.

लवणकुमारहि कोपें उचलून सबाणचाप वेगानें ।
पाहुणचार कराया रथास रामासमीप समरीं ने ॥ १६२ ॥
नन्तर या उभयांचें झालें अत्यन्त घोरसें समर ।
जें पाहाया जमले आकाशीं कौतुकें अनेक सुर ॥ १६३ ॥
नानाशस्त्रें लढले अन्योन्य अनङ्गलवण रणिं राम ।
तैसेंच घोर झाले कुश-हरिचें समर जें अविश्राम[1] ॥ १६४ ॥

[ राजे व अन्य योद्धे एकमेकाशीं लढले. ]

प्रेम जयांच्या हृदयीं निजप्रभूचें अनेक सामन्त ।
लढले त्वेषें अतिशय न येइ ज्यांच्या पराक्रमा अन्त ॥ १६५ ॥
जणु युद्धसमुद्राचे घोडे हे वाटती तरङ्ग जसे ।
परचक्रें आडविलें असतां लढले अतीव वीररसें ॥ १६६ ॥
ज्याचें चिलखत तुटलें पाहून पुढें उभा असा वीर ।
कोणीं सुभट तयासह नच लढतां विमुख जातसे प्रवर[2] ॥ १६७ ॥
कोणी शूर शिपायी अरिसेनेमधिं घुसून निजनाथा ।
सांगुनि लढती कोपें अरीस ते दावितात मृत्युपथा ॥ १६८ ॥
ज्यांना शूरपणाचा गर्व असे सुभट ते महासमरीं ।
वीरनरांना सोडुनि लढले हत्तीसवें गणून अरि ॥ १६९ ॥
उन्मत्त-गजवराच्या रदशय्येवरि[3] कुणी महावीर ।
रणनिद्रासुख घेई यन्मुखिं विलसे सुहास्य बहु मधुर ॥ १७० ॥
तुटलें शस्त्र जयाचें ऐशा कोण्या महाभटावरती ।
आला धावत घोडा करि करताडन करून उलटगति ॥ १७१ ॥
पहिला प्रहार चुकला करि दुसरा मजवरी प्रहार असे ।
म्हटलें तरिहि न करिती प्रहार अन्याय यन्मनीं न वसे ॥ १७२ ॥
ज्याचें गळून पडलें शस्त्र भटासह दुजा लढे वीर ।
शस्त्रा त्यागुनि बाहुद्वयेंचि अन्याय म्हणति नच थोर ॥ १७३ ॥
वीररणाङ्गणिं कांहीं दाते प्रख्यात जाहले त्यांनीं ।
स्वप्राणदान केलें केलें नच पृष्ठदान[4] हें जाणी ॥ १७४ ॥

१ अखंड न थकतां. २ श्रेष्ठ. ३ दांतरूपी अंथरुणावर. ४ पाठ देणें अर्थात् रणांतून पळून जाणें.

रक्ताच्या चिखलामधिं चाकें रुतलीं म्हणून मन्दरथ ।
चाबुक मारुनि अश्वा सारथि नच धाववी वसे स्वस्थ ॥ १७५ ॥
कोठें रणाङ्गणीं भट सशब्द ओकून रक्त मृत झाले ।
वीरें शस्त्राघातें केले अग्निस्फुलिङ्गयुत घाले ॥ १७६ ॥
हत्तींच्या सूत्कारें जलबिन्दूचा समूह समरिं दिसे ।
उन्मत्तगजविदारित-वक्षःस्थल-सुभटमृतकवृन्द वसे ॥ १७७ ॥
कोठें मरून पडले हत्ती रणमार्ग रुद्ध तैं झाला ।
गजमेघांतुनि मौक्तिकगारांचा वृन्द पतितसा दिसला ॥ १७८ ॥
हत्तीनीं सोंडांनीं कांहीं भट उंच फेकिले गगनीं ।
झेलुनि विद्याधरगण घेती त्या आपुल्या विमानगणीं ॥ १७९ ॥
मस्तक विकून अपुलें सुभटें रणिं कीर्तिरत्न मेळविलें ।
मूर्च्छित होतां कांहीं सुभटांचें दुःख अल्पसें गळलें ॥ १८० ॥
कांहीं मरून पडले इकडे तिकडे भयाण शान्ति वसे ।
राक्षस पिशाच कोठें भटोष्णरक्तास पीति दृश्य दिसे ॥ १८१ ॥
कांहीं योद्धे जीवितनिःस्पृह होऊन घोररणिं लढले ।
कीर्त्यभिलाषें कांहीं लढून भट शीघ्र सुरपुरीं गेले ॥ १८२ ॥
मोठे छोटे ऐसे भट कांहीं स्वामिभक्त जे होते ।
जिनदास वनुनि लढले सुर त्यांची कीर्ति जाहले गाते ॥ १८३ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे लवणांकुशसमेतयुद्धाभिधानं द्वयुत्तरशतं पर्व ॥ १०२ ॥

---

# एकशेतीनाव्या पर्वांतील कथा.

रामचंद्र व लवणांकुश यांचीं सैन्यें समरभूमीवर आलीं. लढण्याला सुरुवात झाली. लवणाच्या रथावर खुद्द वज्रजंघ सारथि होता. व अंकुशाचा सारथि पृथुराजा होता. राम-लक्ष्मणाच्या रथावर क्रमशः कृतान्तवक्र व विराधित हे सारथि होते.

लवणाचें रामाबरोबर युद्ध चालू झालें व लक्ष्मणाबरोबर अंकुश लढूं लागला.

लवण व अंकुश हे पिता व चुलत्याबरोबर जाणीव ठेवून लढत होते. पण राम-लक्ष्मणांना लवण व अंकुश हे, आपले पुत्र व पुतणे आहेत हें माहीत नव्हतें. पण यांच्या लढण्यानें राम व लक्ष्मण जर्जर झाले.

लवणानें रामचंद्राच्या सारथ्याला व रथाश्वांनाही बाणांनीं जर्जर केलें. रामचंद्राचें वज्रावर्तधनुष्य आज ढिलें झालें होतें. त्यांचीं हल व मुशल हीं दिव्य आयुधें प्रभावहीन झालीं होतीं. लक्ष्मण महावीर होता, पण त्याचा महावीरपणा व्यर्थ झाला होता. लक्ष्मण अंकुशाला शत्रु समजून निकरानें लढत होता. पण त्याचा विशेष उपयोग झाला नाहीं. उलट अंकुशाच्या एका बाणानें विद्ध होऊन रथांत मूर्च्छित होऊन पडला तेव्हां विराधितानें रथ अयोध्यानगराकडे चालविला.

वाटेंत लक्ष्मण सावध झाला व त्यानें रथ नगराकडे कां नेत आहेस हें विचारलें व रथ पुनः समरक्षेत्रीं नेण्याची आज्ञा केली. खरे शूरवीर युद्धांत मरण पावतील पण शत्रूला पाठ दाखवून रणांतून पळून जाणार नाहींत. असें असतां तूं नगराकडे रथ वळविलास हें योग्य झालें नाहीं असें म्हणून विराधिताला रथ समर-भूमीकडे वळवावयास लक्ष्मणानें सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें केलें. व पुनः अंकुशा-बरोबर त्याची लढाई सुरू झाली.

युद्धाला सुरुवात होण्यापूर्वीं नारद व क्षुल्लक हे रथनूपुरास गेले. भामंडलाला त्यांनीं रामचंद्राची सीतात्यागाची हकीकत सांगून ती वज्रजंघराजाच्या घरीं आहे. तिला लवण व अंकुश हे दोन वीरपुत्र झाले आहेत. आणि आतां ते राम व लक्ष्मणाबरोबर लढण्यास फार मोठें सैन्य घेऊन अयोध्येस गेले आहेत. यास्तव यावेळीं आपल्या भाच्यांच्या बाजूनें लढण्याकरिता अवश्य तूं निघणें योग्य आहे असें

सांगितल्यावर भामण्डल आपलें सैन्य घेऊन आपल्या माता-पित्यासह– जनकराजा व राणी विदेहा यांच्याबरोबर पुण्डरीकिणी नगराला गेला. सीतेनें आपल्या माता-पित्यांना व भावाला पाहून पतित्यागजन्य शोक केला. 'तदनंतर ती आपल्या सर्व सुनासह भामण्डलाबरोबर विमानांत बसून समरक्षेत्रीं आली.

भामण्डलानें आपल्या भाच्याचा पक्ष घेतला. त्याचवेळीं हनुमान्, बिभीषण, सुग्रीवादिकांनीं रामाचा पक्ष त्यागून लवणांकुशाच्या बाजूनें लढूं लागले.

लक्ष्मणानें दीर्घकालपर्यंत अंकुशाबरोबर लढाई केली पण तो त्याला जिंकण्यास असमर्थ झाला. शेवटीं त्यानें चक्ररत्न त्याच्यावर फेकलें पण तेंहीं व्यर्थ गेलें. तें अंकुशाकडे येऊन निष्प्रभ होऊन पुनः परत लक्ष्मणाकडे गेलें. पुनः पुनः फेकूनही त्याच्यानें अंकुशाला तो जिंकू शकला नाहीं.

याचप्रमाणें रामचंद्राच्या हल-मुशल यांचा व वज्रावर्त धनुष्याचा कांहीं उपयोग झाला नाही. त्यामुळें हे दोघेजण खिन्न झाले. शेवटीं राम-लक्ष्मणाजवळ नारद व सिद्धार्थ-क्षुल्लक गेले व त्यांनीं उभयांना सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्यांनीं युद्ध बंद केलें. रथावरून खालीं उतरले. आपणास भेटण्यासाठीं पिता रामचंद्र व चुलता लक्ष्मण येत आहेत हें पाहून लवणांकुशांनीं रथावरून उतरून विनयानें पिता व चुलत्याच्या चरणावर मस्तक ठेविलें. दोघांनीं उचलून घट्टमिठी मारली. त्यांना लवणांकुशांच्या भेटीनें अत्यंत हर्ष झाला.

सीतेनें हें दृश्य विमानांतून पाहिलें तिला मोटा आनंद झाला व ती पुनः विमानांत बसून पुण्डरीकनगराला निघून गेली.

युद्धाची अशी गोड समाप्ति झालेली पाहून सर्व हनुमान् आदिकांना आनंद वाटला.

रामचंद्रांनीं वज्रजंघाला भामण्डलाप्रमाणें मानून त्याचा चांगला आदर केला. अयोध्यानगर आधीच सुंदर होतें. पण या आनंदप्रसंगीं तें गुढ्या, तोरणें ध्वजांनीं फार सुंदर केलें गेलें. व अशा त्या सुंदर नगरांत राम-लक्ष्मणांनीं मोठ्या थाटानें लवण व अंकुशासह प्रवेश केला. पौरस्त्रियांनीं यांच्या अंगावर सुगंधित असंख्य फुलें उधळिलीं. त्याच्या परागांनीं सर्व दिशा लाल व सुगंधित झाल्या. नगरांत लवण व अंकुश आनंदानें राहिले.

---

# एकशेतीनावें पर्व.

( लवण व अंकुश यांची राम-लक्ष्मणाबरोबर लढाई. )

सारथि झाला वज्रजङ्घ नृप अनङ्गलवणाचा ।
प्रसिद्धविक्रम पृथुनृप झाला अङ्कुशनाथाचा ॥ १ ॥
सौमित्रीचा सारथि होता चन्द्रोदरपुत्र ।
कृतान्तमुख हा पद्मरथाचें हालवि सत्सूत्र ॥ २ ॥
वज्रावर्त प्रचण्ड ज्याचा ध्वनि करि घेऊन ।
राघव वदले ने अरिजवळी, कृतान्त रथ तूर्ण ॥ ३ ॥

( रामचंद्र व कृतांतवक्र एकमेकांच्या अवस्थांचें वर्णन करितात. )

आज मला तूं कां इतुका रे आळशी दिसतोस ।
कां तूं अरिवरि शीघ्र न नेशी रथ वद वचनास ॥ ४ ॥
नाथा हय हे या नरवीरें जर्जर बहु केले ।
तीक्ष्णशरांनीं तेणें जणु हे निद्रितसे झाले ॥ ५ ॥
थोपटिलें मी जरी करानें वदलों मधुवचनें ।
उत्साह न या येई वाढे परि यांचें कण्हणें ॥ ६ ॥
भूमि तयांच्या रक्तें झाली नाथ बघा लाल ।
अपुल्यावरचें जणु प्रेम हे दाविति भूपालें [२] ॥ ७ ॥
बाहु बघा मम अरिशर घुसले ज्यामधि हे तीक्ष्ण ।
विकसित झाल्या कदम्बपुष्पें जणु शाखा [३] दोन ॥ ८ ॥
राम हि वदले धनु हें माझें आज ढिलें झालें ।
चित्रशरासनतुल्य [४] न कृति करि विफल मला गमलें ॥ ९ ॥
मुशलरत्न हें विफलचि झालें न करी अरिनाश ।
हलरत्नहि हें व्यर्थचि झालें न शत्रु होय वश ॥ १० ॥
परपक्षाच्या नाशा करिति दिव्यास्त्रें सारीं ।
कुदशा त्यांची ऐशी झाली वारिति नैव अरि ॥ ११ ॥

---

१ विराधित. २ हे राजन्. ३ कदम्बवृक्षाच्या दोन फांद्या. ४ चित्रांत लिहिलेल्या धनुष्याप्रमाणें.

अस्त्रें माझीं बोथट झालीं कार्य न हीं करितीं ।
सौमित्रीचीं तैशिच दिसतीं साफल्य न वरितीं ॥ १२ ॥
निजजन्माचा सगळा कळला ज्यांना सम्बन्ध ।
ते लवणाङ्कुश रक्षुनि लढती होउनि मोहान्ध ॥ १३ ॥
राम नि लक्ष्मण शत्रुचि समजुनि होउनि निरपेक्ष ।
लढती दोघे तनयासह ते कोपें रक्ताक्ष[1] ॥ १४ ॥
दिव्यास्त्रांचा साठा ज्यांचा आहे भरपूर ।
सोडुनि खेदा लक्ष्मण अङ्कुशिं सोडी तीव्र शर ॥ १५ ॥
शरवृष्टीला वज्रशरांनीं अङ्कुश दूर करी ।
राघवमुक्तास्त्रांना जैसें अनङ्गलवण हरी ॥ १६ ॥
श्रीरामाच्या लवणें वक्षःस्थलावरी बाण ।
खरशर सोडी अंकुश तैसें हरिवरि ही निपुण ॥ १७ ॥
तीव्रशरानें सुविद्ध लक्ष्मण मूर्च्छित रथिं झाला ।
साकेतेला मग सूतानें स्यन्दन[2] चालविला ॥ १८ ॥
मार्गीं सावध होउनि लक्ष्मण विराधिता वदला ।
कोठें आलों युद्धस्थल कां नैव दिसे मजला ॥ १९ ॥
हे सद्बुद्धे विराधिता हें काय तुवा केलें ।
रथ रणभूमीकडे शीघ्रतर चालव कां न कळे ॥ २० ॥
विद्ध शरांनीं वपु जरि झालें सगळे नरवीर ।
रणिं शत्रूला पाठ न दाविति निर्भय भरपूर ॥ २१ ॥
रणिं शूराचें मरणें स्तुत्यचि पळणें निन्द्य असे ।
पुरुषश्रेष्ठीं गणना अमुची पळणें योग्य नसे ॥ २२ ॥
पाठ अरीला दावुनि पळणें शूरा नच शोभे ।
संतत राहू लढतचि समरीं आम्ही बन्धु उभे ॥ २३ ॥
मी दशरथसुत रामभ्राता नारायण आहे ।
प्रसिद्ध भूतलिं कृत्य तयाचें निन्द्य कसें पाहे ॥ २४ ॥
यापरि वदतां विराधितानें रणभूमींत रथ ।
नेला लक्ष्मण लढता झाला वीररसें मत्त ॥ २५ ॥

---

१ ज्याचे डोळे लाल झाले आहेत असे. २ रथ.

पुनरपि झालें अङ्कुश-लक्ष्मण याचें रण घोर।
हर्षित होउनि ज्यांची करिती स्तुति गगनीं अमर ॥ २६ ॥
सङ्ग्रामाचा[1] अन्त कराया इच्छुनि मनिं हरिनें।
चक्र भयङ्कर हातीं धरिलें अविफल रुष्टपणें ॥ २७ ॥
जें ज्वालांनीं व्याप्त जाहलें रविसम दुष्प्रेक्ष्य।
त्वरें फेकिलें अंकुशिं हरिनें करुनी त्या लक्ष्य ॥ २८ ॥
परि मदनाङ्कुशसन्निध जाउनि निष्प्रभ[2] होऊन।
हरिकरिं वैसे येउनि परतहि अगतिक[3] तें वनुन ॥ २९ ॥
पुनः पुनः तें कोपें फेकी लक्ष्मण त्यावरती।
पुनः पुनः तें परतुनि येई निष्फल होय गति ॥ ३० ॥
प्रचण्ड अङ्कुशकुमार फिरवी वीर धनुर्दण्ड।
चक्ररत्न हा करील खचितचि ताडुनि षट्खण्ड ॥ ३१ ॥
ऐसें वदती वीर रणाङ्गणिं विस्मित होऊन।
चक्रेश्वर हा विपुलशक्तिधर निपजे अन्यून ॥ ३२ ॥

( लवण व अंकुश हे सीतापुत्र आहेत म्हणून चक्राचें वैफल्य )

तिकडुनि इकडे येतें जातें स्थिर नच चिरें[4] राही।
दुसरा चक्री झाला प्रगटचि संशय नच कांहीं ॥ ३३ ॥
कोटिशिलादिक सर्वचि कार्यें जणु झालीं विफल।
चक्रसुदर्शन अन्यकरामधिं वघती जन सकल ॥ ३४ ॥
मुनिवचनें ही मिथ्या झालीं घडलें हें कैसें।
जिनशासनिं ही वचनविफलता वाटे केवि वसे ॥ ३५ ॥
धनुर्दण्ड हा फिरवि वीर हा आलें हें चक्र।
जनवदनांतुनि निघति असे ध्वनि काल वने वक्र ॥ ३६ ॥
लक्ष्मणवीरहि तेव्हां वदला विक्रम वलशाली।
वीरयुगा या वलहरिपदवी[5] दिसते जणु आली ॥ ३७ ॥
यापरि वोलुनि लज्जित होउनि निष्क्रिय तो झाला।
नारदसंमत[6], लक्ष्मणसन्निध सिद्धार्थ हि आला ॥ ३८ ॥

---

१ युद्धाचा. २ कान्तिरहित. ३ उपायरहित—आपलें कार्य करण्यास असमर्थ. ४ दीर्घकाल. ५ वलभद्रपद व नारायणपद. ६ नारदाच्या संमतीनें.

वदला लक्ष्मण आपण येथें देवा ! कां आला ।
बोले क्षुल्लक यापरि हरिला सुरुचिर वचनाला ॥ ३९ ॥
लवणकुमार नि अङ्कुश असती सीतेचे तनय ।
गर्भी असतां रामें त्यजिलें विपिनिं जिला अदय ॥ ४० ॥
चक्र जहालें विफलचि तेणें हे हरि मनिं जाण ।
बलहरि झाले कुमार ऐसें हृदयिं न वच आण ॥ ४१ ॥
लवाङ्कुशांच्या या माहात्म्या जाणुनि पूर्णपणें ।
कवच नि शस्त्र हि त्यजिलें हरिनें दाटुनि शोकानें ॥ ४२ ॥
श्रीरघुचन्द्रहि ऐकुनि वार्ता अतिशय खिन्नमनें ।
चाप नि चिलखत टाकुनि देई रथावतरणानें[1] ॥ ४३ ॥
सीतास्मरणें दुःखित होउनि भूमीवर पडला ।
मूर्च्छायोगें मिटले ज्याचे नेत्राम्बुज झाला ॥ ४४ ॥
शिम्पडल्यानें चन्दन-जल तो सावध होऊन ।
स्नेहव्याकुल पुत्रासन्निध शीघ्र करी गमन ॥ ४५ ॥
सुतही दोघे निजयानांतुनि खालीं उतरून ।
करयुग जोडुनि आदरभावें वन्दिति पितृचरण ॥ ४६ ॥
स्नेहें सुतयुग दृढ आलिङ्गुनि राघव करि शोक ।
मुख अश्रूंनीं चिम्ब जहालें क्षणभरि हो मूक ॥ ४७ ॥
नन्तर वदला सीतागर्भी तुम्ही अवतरला ।
जनापवादें मी दुष्टानें त्यजिलें वनि तिजला ॥ ४८ ॥

( लवण व अंकुश रामचंद्र व लक्ष्मणास भेटतात
भामंडल हनुमान्, सुग्रीवादिकांना आनंद होतो. )

वज्रजङ्घ जरि तिथें न येतां तुमचा मुखचन्द्र ।
दिसला नसतां आल्हादक तो मम नयना सान्द्र ॥ ४९ ॥
अमोघशस्त्रें अमुच्या दारुण तुम्हां नच मरण ।
आलें सुकृतें[2] सुरगणरक्षित म्हणुनि दिसे वदन ॥ ५० ॥
बाणें होउनि विद्ध पतन जरि रणि तुमचें घडतें ।
सीतेनें तत्समयीं प्राणा त्यजिलें असतें ॥ ५१ ॥

---

१ रथांतून उतरून. २ पुण्यानें.

तेव्हां लक्ष्मण विनयी उभया दृढ मिठि मारून ।
अश्रू ढाळी गद्गदकण्ठें हर्षित होऊन ॥ ५२ ॥
शत्रुघ्नादिक राजे आले ऐकुनि वार्ता ही ।
मिलनस्थानीं त्यांची झाली हर्षित हृदयमही ॥ ५३ ॥
दोन्ही सैन्यें भेटुनि झालीं सुखविस्मयपूर्ण ।
झाला उभयस्वामिसमागम तत्समयीं तूर्ण ॥ ५४ ॥
वैदेही ही सुतमाहात्म्य नि सङ्गम पाहून ।
पुण्डरीकपुरि जाय विमानें हर्षित होऊन ॥ ५५ ॥
ऐशासमयीं आकाशांतुनि भामण्डल आला ।
निर्व्रण पाहुनि भगिनीपुत्रा आनन्दित झाला ॥ ५६ ॥
दृढ आलिङ्गुनि हर्षाश्रूंनीं न्हाणी उभयांना ।
आनन्दाचा अपूर्व अनुभव त्याच्या येइ मना ॥ ५७ ॥
पवनञ्जयसुत हनुमान् आला प्रीति मनीं धरून ।
उत्तम झालें ऐसें बोलुनि त्या मिठि मारि घनें ॥ ५८ ॥
भूप विराध नि नृप सुग्रीव हि बिभीषणादिक ही ।
पाहति सङ्गम हर्ष न मावे त्यांच्या तैं देहीं ॥ ५९ ॥
जे भूगोचर खेचर सुरगण संगम सर्वांचा ।
सौख्या कारण करि नच वर्णन यथार्थ कविवाचा ॥ ६० ॥
रामा झाला पुत्रसमागम मोद मनीं दाटे ।
तेणें त्यांच्या आले अङ्गीं हर्षाचे कांटे ॥ ६१ ॥
भरुनी गेलें आनन्दानें त्यांचें मन फार ।
सुतनयलाभें होय न कोणा संमद साचार ॥ ६२ ॥
नर्तन करिती खेचरनारी नभिं बहु सानन्द ।
भूवरि नारी भूगोचर ही कवणा नच खेद ॥ ६३ ॥
आनन्दानें झाले डोळे प्रफुल्ल बहु हरिचे ।
कृतार्थ झालें हृदय तयाचें हर्षें तें नाचे ॥ ६४ ॥
सगर असे मी भीमभगीरथ जणु हे वीरयुग ।
चिन्तन ऐसें ये हरिहृदयीं वाढे अनुरागें ॥ ६५ ॥

---

१ दृढ. २ कृतकृत्य. ३ उत्तम पुत्रप्राप्तीनें. ४ प्रेम.

वज्रजङ्घनृपवर्या मानी भामण्डलचि दुजा ।
प्रीति तयावरि करि राघव अति समजे हितु माझा ॥ ६६ ॥
वदला राघव भामण्डलसम तूं प्रियकर असशी ।
आदर केला तेणें त्याचा गमला त्यास शशी ॥ ६७ ॥
पुरी अयोध्या सुन्दर होती प्रथमचि पुनरपि ती ।
सुरवासासम केली सुरही करिती जींत रति ॥ ६८ ॥
स्वभावतः स्त्री कोणी सुन्दर तथापि आचारें ।
भूषविती निज भूषणनिवहें पुरी हि तेवि सुरें ॥ ६९ ॥

( पुष्पकविमानांत लवणांकुश बसून नगरांत प्रवेश करितात.)

गजपङ्क्तीच्या पाठीवरती विमान पुष्पक जें ।
शोभे बसला सुप्रभ राघव सूर्यासम साजे ॥ ७० ॥
नारायण ही बसला त्यामधिं भूषणगणयोगें ।
सुरगिरिशिखरीं मेघ विजेसह शोभे जणु भोगें[1] ॥ ७१ ॥
वाद्योद्यानें ध्वजगण तोरणसह पुरतट बुरुज ।
नानायानीं बैसुनि जाती पाहत नृपराज ॥ ७२ ॥
ज्यांच्या वाहति गण्डतलांतुनि मदधारा विपुल ।
हत्ती जाती बहुपङ्क्तीनें भिजवित भूमितल ॥ ७३ ॥
सुन्दरगतिनें हयगण जाती रथ वीरें प्रचुर ।
सेना चाले पायदळाची घेउनि तरवार ॥ ७४ ॥
सेना नानावेशीमधुनी चाले नगरांत ।
चापच्छत्रें ध्वजवृन्दांनीं झाला तम दाट ॥ ७५ ॥

( मिरवणूक पाहण्यास जमलेल्या स्त्रियांचे कुमारयुगलाविषयीं उद्गार.)

प्रासादांच्या खिडक्या सुन्दर नारीवृन्दांनीं ।
भूषित झाल्या जणु त्या दिसती विकसित प्रफुल्ल कमलांनीं ॥ ७६ ॥
झाल्या आतुर[2] रघुसुतदर्शन नारी घ्यायास ।
नयनाञ्जलिनीं रूप जयांचें पीति सुधा सरस ॥ ७७ ॥
चित्त तयांचें रूपालोकनिं निमग्न जैं झालें ।
गर्दीमध्यें गळल्या भूषा नच त्यांना कळलें ॥ ७८ ॥

---

१ विस्तारानें. २ उत्कण्ठा.

वाई अपुलें मुख बाजूला व्या मज दिसतें न ।
ही जनयात्रा उचित न ऐसा स्वार्थपणा जाण ॥ ७९ ॥
मस्तक अपुलें उंच न करि गे सकरुण हृदय करी ।
सर बाजूला मजला बघु दे उद्धतता न धरी ॥ ८० ॥
धक्का मजला देउ नको गे पडेन मी खालीं ।
फार वेन्धळी असशी तूं गे समजे तुज न मुळीं ॥ ८१ ॥
अर्धचन्द्रसम भाल[1] ज्यांचे रामाजवळी हे ।
कुमार दिसती लवण नि अङ्कुश त्यांना तूं पाहें ॥ ८२ ॥
लवण कोणता कोण नि अङ्कुश या दोघांतून ।
नुमजे मजला सांग सखे ग दिसती भिन्नचि न ॥ ८३ ॥
ज्याच्या हातीं बाण असे गे सुन्दर सोन्याचा ।
लवण असे तो शेला दिसतो हिरवा इतराचा ॥ ८४ ॥
विक्रमशाली पुत्र जियेला दोन अशी सीता ।
धन्य खरोखर विश्रुतपुण्या[2] जी यांची माता ॥ ८५ ॥
जी स्त्री यांची होइल पत्नी भाग्यवती थोर ।
ऐशा वार्ता नारी वदती आनन्दुनि फार ॥ ८६ ॥

[ आर्यावृत्त- ]

अतिशय गर्दीमध्यें कानांतिल कुण्डलाग्र घासून ।
गाला न जखम झाली जाणी स्त्री दृश्यदर्शनीं[3] मग्न ॥ ८७ ॥
कोण्या एका स्त्रीचा हार गळ्यांतील तुटुन जो पडला ।
जणु तो प्रवेशसमयीं पुष्पांजलितुल्य भासला सकला ॥ ८८ ॥
कोण्या स्त्रीची रशना[4] सशब्द गळली परन्तु ती नुमजे ।
सदनागमनीं[5] जाणी अडखळतां चरण जेधवा वाजे ॥ ८९ ॥
नगरप्रवेशयात्रा गेली जरि दूर निश्चला दृष्टि ।
सचला[6] न जाहली ती कालें समजून जाहल्या कष्टी ॥ ९० ॥

---

१ कपाळ. २ असामान्य पुण्ययुक्त असलेली. ३ देखावा पाहण्यास गढून गेलेली. ४ कमरपट्टा. ५ घरीं आल्यावर. ६ चञ्चल.

उत्तम सौधावरुनि स्त्रीवृन्दें पुष्पवृष्टि वहु केली ।
त्यांतिल परागरागें[1] दिग्वदनें लाल तेधवा झाली ॥ ९१ ॥

पुण्योदय ज्या असतो आकस्मिक इष्टयोग त्या घडतो ।
जिनदास पुण्य करि जो अनिष्टयोग न कधींहि त्या होतो ॥ ९२ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे रामलवणाङ्कुशसमागमाभिधानं नाम त्र्युत्तरशतं पर्व ॥ १०३ ॥

---

१ फुलांतील सुगंधित धुळीच्या लालपणानें.

## एकशेचाराव्या पर्वांतील कथेचा सारांश.

एके दिवशीं रामचंद्र सिंहासनावर बसले होते व सुग्रीवादिकही योग्य आसनावर बसले होते. त्यावेळीं बिभीषणादिकांनीं सीतादेवीनें विरहदुःख किती दिवस सहन करावें, ती परदेशांत विरहदुःखानें दिवस व्यतीत करीत आहे. आम्हाला आपण तिला आणण्यास आज्ञा द्यावी अशी रामचंद्रांना विनंति केली. तेव्हां रामचंद्र दीर्घ निश्वास सोडून व थोडावेळ सचिन्त होऊन म्हणाले– सुजनहो, सीता सरळमनाची व निष्कलंकशीलाची आहे पण अपवादयुक्त असल्यामुळें तिला पाहण्याची मला इच्छा होत नाहीं. तिनें जर सर्व जगाला आपला निर्दोषपणा पटवून दिला तर मी तिचा पुनः स्वीकार करावयास तयार आहे.

आपण सर्व विद्याधरराजे, भूगोचरीराजे व सर्व प्रजाजनांना बोलवा. व त्यांच्यासमक्ष ती निष्पाप निरपवाद सिद्ध झाली म्हणजे मी तिचा स्वीकार करीन. हें रामचंद्रभाषण ऐकून सर्व राजांना, व अनेक देशांतील प्रजाजनांना बोलाविलें. तरुण, बालक, वृद्ध, स्त्रिया हे सर्व कौतुकानें अयोध्येंत आले. सर्वांची राहण्याची, जेवण्याची, झोपण्याची उत्तम व्यवस्था ठेविलेली होती. सर्वजणांना आपण स्वर्गांत राहत आहोत असें वाटत होतें. सर्वांच्या मनोवृत्ति अतिशय प्रसन्न होत्या.

इकडे भामण्डल, रत्नजटी, सुग्रीव व हनुमान् पुण्डरीक नगरास गेले. द्वारपालाकडून सीता-प्रासादांत प्रवेश करण्याची संमति मिळाल्यावर प्रासादांत जाऊन त्यांनीं सीतेचा जयजयकार केला. सीता त्यांना म्हणाली– सज्जनहो, दुर्जनांनीं लावलेल्या अपवादाग्नीनें माझे सर्व अंग होरपळलें आहे. तें आता क्षीरसागराच्या पाण्यांनींही शांत होऊन मला सुख वाटेल असें वाटत नाहीं.

सुग्रीवादिक म्हणाले– देवि, जसें उष्ण पाणीही थंड होतें तसा आपल्यावरील अपवाद नाहींसा होऊन आपण सुखी व्हाल.

हे देवी, आपण प्रसन्न होउनि अयोध्येकडे पुष्पकविमानांत बसून चलावें. रामप्रभूची आज्ञा मिळवून आम्ही आपणास नेण्यासाठीं आलों आहोत. आजच आपण अयोध्येस जाऊं. आज रामप्रभूचा मुखचन्द्र आपण पाहाल.

यानंतर उत्तम शंभर स्त्रियासह पुष्पकविमानांत बसून सीतादेवी अयोध्येकडे निघाली. सूर्यास्ताचेवेळीं अयोध्येजवळ महेंद्रोदयउद्यानीं येऊन पोहोचली. मी रामचंद्रासह या वनांत पूर्वी येत होतें तेव्हां हें वन मला फार सुंदर वाटत होतें पण तेंच आज एकटीला भेसूर वाटत आहे.

रात्र महेंद्रोदयउद्यानांतच व्यतीत झाली. सकाळ झाली. सूर्योदय झाला. अपवादासारखा अंधार नाहींसा होऊन चोहीकडे उज्ज्वल प्रकाश पडला. रामाजवळ जाण्यासाठीं सीतेनें आपल्या हृदयाची तयारी केली. अनेक स्त्रियासह सीता हत्तिणीवर चढून महासभेंत रामचंद्राजवळ आली. लोकांनीं तिचा जयजयकार केला. सीतेचें रूप, गंभीरपणा, प्रभाव वगैरे पाहून तिच्या निष्कलंकत्वाची लोकांना खात्री वाटली.

रामचंद्राजवळ तिचे पुत्र लवण व अंकुश हेही बसले होते. रामचंद्राला वाटलें– हिला मी निर्वासित केलें असतांही ही माझ्याकडे आली. माझ्याविषयींचें प्रेम हिच्या मनांत पूर्वीप्रमाणेंच आहे.

रामचंद्र म्हणाले– सीते, माझ्यापुढें कां उभी राहिली आहेस? तूं येथून निघून जा, तुझें तोंड मी पाहू इच्छित नाहीं. तूं रावणाचे घरीं पुष्कळ दिवस राहिली असतांही तुला मी अयोध्येस घेऊन आलों हें माझें योग्य कार्य झालें नाहीं. हें रामाचें भाषण ऐकून सीता म्हणाली– नाथ, आपण फार निष्ठुर आहात. मूर्ख जसा विद्येचा अव्हेर करितो तसा आपण माझा अव्हेर करीत आहात. डोहाळ्याच्या निमित्तानें मला भयंकर जंगलांत त्यागिलें हें आपणास योग्य वाटतें काय? तेथें हिंस्रप्राण्यांनीं माझ्यावर आक्रमण केलें असतें तर असमाधिमरणानें मला दुर्गतींत फिरावें लागलें असतें. मला त्यापेक्षा आर्यिकांच्या संघांत सोडलें असतें तर बरें झालें असतें. दीन अनाथ, अबान्धवांना जिनशासन हें जिनेश्वराप्रमाणेंच शरण आहे.

माझी याप्रमाणें आपण दुरवस्था केली असतांही मी तें सर्व विसरून आपल्याकडे आलें, आपण प्रसन्न व्हावें. आपल्या मनांत काय आहे तें मला स्पष्ट सांगा. असें म्हणून ती रडूं लागली. तेव्हां रामचंद्र म्हणाले– हे देवि, तुझें माझ्यावर अनन्य प्रेम आहे, तूं निष्कलंक आहेस हेंही मी जाणतो परंतु लोकापवाद नाहींसा

करून आपली निर्मलता तूं लोकांना पटवून दिलीस म्हणजे मी तुझा स्वीकार करीन. सीता म्हणाली— नाथ, आपण विष खाण्याचें दिव्य, तुलारोहणदिव्य किंवा अग्निदिव्य यांतून कोणतेंही दिव्य करावयाला मला सांगा मी ते करावयाला तयार होईन. असें म्हटल्यावर रामचंद्रांनीं थोडावेळ स्तब्ध राहून म्हटलें कीं— देवि, तूं अग्निदिव्य करून सर्व जनतेला आपली निर्मलता पटवून दे. त्यावेळीं सर्व जनतेनें सांगितलें कीं— सीतादेवी सती आहे सती आहे. अग्निदिव्यही करण्याची आवश्यकता नाहीं. त्यावेळीं रामचंद्र रागावून म्हणाले— तुम्हाला जर सीता सती आहे असें वाटतें तर तुम्हीं तिच्यावर मिथ्या अपवाद कां स्थापन केला. आतां मी तुमचें मुळीच ऐकणार नाहीं. सीतेनें अग्निदिव्य केलेंच पाहिजे. असें बोलून रामचंद्रांनीं दोन पुरुषप्रमाण खोल व तीनशे हात लांब रुंदीचा खड्डा नोकरांना खणावयास लाविला.

राम व सीता यांचा संवाद झाला त्याचदिवशाच्या पूर्वरात्रीस सकलभूषण मुनींना महेंद्रोदय उद्यानामध्यें घोरोपसर्ग सहन करून केवलज्ञान उत्पन्न जाहलें. या मुनीश्वरांचें चरित्र याप्रमाणें:— विजयार्ध पर्वतावरील गुंजापुरनगरांत सकलभूषण राजा राज्य करीत होता. त्याला आठशे राण्या होत्या. त्यांत करमण्डला ही पट्टराणी होती. एके दिवशीं तिच्या सवतीनीं हेमशिख नामक राजाचें चित्र काढावयाला सांगितलें. त्यांच्या आग्रहानें तिनें तें चित्र रेखाटलें इतक्यांत सकलभूषण राजा तेथें आला. त्याला तें चित्र पाहून फार राग आला. त्यानें तिचा त्याग केला. सर्व स्त्रियांनीं अतिशय विनंति करून त्याला प्रसन्न केलें तेव्हां राजा पूर्वीप्रमाणें करमण्डलेवर प्रेम करूं लागला. याप्रमाणें पुष्कळदिवस तिचे सुखांत गेले. पुनः एकेदिवशीं स्वप्नांत हेमशिखाचें नांव करमण्डलेच्या मुखांतून बाहेर पडलें. तेव्हां तो तिच्यावर अतिशय रागावला. त्याला स्त्रीवैराग्य झालें. त्यानें राज्य त्यागून मुनिदीक्षा घेतली. व तपांत तो लीन झाला. इकडे करमण्डला राणी कोपानें मरण पावली व 'विद्युद्वदना' नामक राक्षसी होऊन तिनें अनेक दिवस सकलभूषणमुनीला भयंकर उपसर्ग केला. तो सर्व सहन करून ते आत्मचिन्तनानें केवली झाले. त्यावेळीं इन्द्रादिक देव केवलीचें पूजन करण्यासाठीं तेथें आले. मेघध्वज नामक देवानें सीतेचें रक्षण करण्याचा विचार केला. व तो सीता जेथें उडी टाकणार तेथें आकाश विमानांत बसला. यापुढची हकीकत पुढील पर्वांत वाचा.

# एकशेचारावें पर्व.

[ सीतादेवीला आणण्याबद्दल बिभीषणादिकांची रामचंद्राला विनंति. ]

सुग्रीव वायुपुत्र नि विभीषणादिक समीप येऊन ।
केली विज्ञप्ति तयें एकेदिनिं करयुगाब्ज[1] जोडून ॥ १ ॥
पूज्या देवी सीता वियोगकष्टा सहून परदेशीं ।
राहे तिज आणाया आम्हा श्रीराम शीघ्र आदेशी[2] ॥ २ ॥

[ सीतेनें आपला निर्दोषपणा सिद्ध करून द्यावा म्हणजे
मी तिला स्वीकारीन असें रामानें म्हटलें. ]

निःश्वास दीर्घ सोडुनि राम क्षणभरि सचिन्त होऊन ।
वदले दिसले ज्यांना अश्रूंनीं मलिनसें दिशावदन ॥ ३ ॥
सरलमनाची सीता निर्मल आहे सदा तिचें शील ।
अपवादयुक्त असतां मुखचन्द्र तिचा कसा वघू अमल ॥ ४ ॥
सम्पूर्ण भूतलाला पटवुनि निर्दोषता तिनें द्यावी ।
स्वीकारिन मी तिजला मत्सङ्गतिसुख मिळेल तें भावी[3] ॥ ५ ॥
आपण सर्वनृपांना प्रजागणां तेवि सकलखगभूपां ।
पाचारावें सीता होवो त्यांच्यासमक्ष निष्पापा ॥ ६ ॥
घेऊन शपथ त्यांच्यासमक्ष विधिपूर्व निरपवाद जरी ।
होईल इन्द्रसम मी स्वीकारिन शचिसमेस[4] गणुनि खरी ॥ ७ ॥
हें वचन राघवाचें सुग्रीवादिक खगेश्वरें मान्य ।
केलें पाचारियलें सर्व नृपा तेवि सुजन जे गण्य ॥ ८ ॥
नाना देशांतिल जन तरुण नि शिशु वृद्ध नि स्त्रिया आले ।
साकेतानगरीला कौतुक ज्यांच्या मनांत उद्भवलें ॥ ९ ॥
रवि पाहिला न ज्यांनीं नृपतिस्त्रीगण असा हि बहु आला ।
नच शक्य जो गणाया प्राकृतजन तो असङ्ख्यसा जमला ॥ १० ॥
अत्यन्तवृद्ध जन ते ज्यांना नानाप्रसङ्ग माहीत ।
साकेतापुरिं आले कौतुक ज्यांच्या अमाप हृदयांत ॥ ११ ॥

---

१ दोन हातरूपी कमल. २ आज्ञा द्या. ३ भविष्यकाळीं. ४ इंद्राणीसारखी.

राष्ट्राग्रणी असे ही आले कित्येक लोक साकेतीं ।
सीतेविषयीं आदरभाव जयांच्या मनांत करि वसति ॥ १२ ॥
आली पृथ्वीवरची समस्तजनता दहा दिशांतून ।
जिकडे तिकडे दिसली नगरी नृमयीच[1] अन्यरूपा न ॥ १३ ॥
रथ पालखी नि मेणे हत्ती घोडे नि विविधयानांनीं ।
आली जणु अवनीची साकेतीं सम्पदा गमे नृमनीं ॥ १४ ॥
येती वरून खेचर खालीं भूचर म्हणून ही अवनि[2] ।
जंगम[3]मयीच दिसली तेव्हां वदले बघून कवि कोणी ॥ १५ ॥
वसण्या विस्तृतमञ्चें[4] क्रीडा करण्या विहारगिरि रचिले ।
सुन्दर घरें रहाया डेरे तम्बू हि विविधसे दिसले ॥ १६ ॥
जागोजागीं रचिले प्रासादहि विपुल तेवि नगरें ही ।
अतिशय मोठे मण्डप जणु साकेता गमे विशाल मही ॥ १७ ॥
कोठें अनेक दिसती पुरुष नि कोठें स्त्रियाच बहु दिसती ।
कोठें स्त्रीपुरुषांचा समूह वदती नि खेळती हसती ॥ १८ ॥
शयनासन ताम्बूल नि सुममाला[5] अन्न वस्त्र जनतेस ।
नृपकिङ्कर चोहिकडे फिरून देती कुणा नसे त्रास ॥ १९ ॥
यापरि आगन्तुक[6] जन जिकडे तिकडे प्रसन्नसे दिसले ।
जणु ते भूवरि नसती सगळे स्वर्गांत आदरें वसले ॥ २० ॥

[ सुग्रीवादिक सीतेला आणण्यासाठीं पुण्डरीकनगराला गेले. ]

रामाज्ञेनें नन्तर सुग्रीव नि पवनतनय लङ्केश[7] ।
भामण्डल रत्नजटी गेले हे पुण्डरीकनगरास ॥ २१ ॥
सैन्या स्थापुनि बाहिर परिचययुत सज्जनास घेऊन ।
सीतानिवाससदनीं गेले द्वारस्थां[8] स्वहेतु कळवून ॥ २२ ॥
मिळतां प्रवेश-सम्मति जाउनि सीतापदास वन्दून ।
जय जय शब्दा बोलुनि सुमवृन्दें पूजिले तिचे चरण ॥ २३ ॥
मणिजडित भूमिपृष्ठीं बसले ते विनयनम्र होऊन ।
पूर्वीच्या सर्व कथा अनुक्रमें बोलले प्रमोदून ॥ २४ ॥

---

१ मनुष्यमय. २ पृथ्वी. ३ चलनवलन करणारी. ४ खुर्ची पलङ्ग.
५ पुष्पमाला. ६ आलेले. ७ बिभीषण. ८ द्वारपालास.

[ सीता व बिभीषणादिकांचें भाषण-प्रतिभाषण.]

स्तुतिपर भाषण त्यांचें ऐकुनि गम्भीरता मनीं धरुन ।
पाणी नयनीं आणुनि सीतादेवी वदे असें वचन ॥ २५ ॥
दुर्जनवचनाग्नीनें ममाङ्ग हें दग्ध जाहलें आहे ।
क्षीरसमुद्रजलें ही सौख्य न होईल त्यास हें पाहे ॥ २६ ॥
भगवतिदेवी शोका सोडुनि आतां मना करी शान्त ।
सुग्रीवादिक वदले उष्ण हि जल होतसे जसें शीत ॥ २७ ॥
देवि ! तुझी करि निन्दा जो आहे कोण जीव जगतांत ।
करि कोण भूसें कम्पित माईचा जो खरा असे पूत ॥ २८ ॥
कोण समर्थ असे जो अग्निज्वाला पिऊन टाकील ।
साहस कोणांत असे सुमेरु उचलून दूर फेकील ॥ २९ ॥
कोण असे तो मानव जो रविचन्द्रा गिळून टाकील ।
सामर्थ्य कुणा आहे उचलुनि शेषास शीघ्र आणील ॥ ३० ॥
तव सद्गुणमणिशैला चञ्चल करण्या समर्थ कोण असे ।
देवि ! तुझ्या निन्देनें जीभ कुणाची विदीर्ण होत नसे ॥ ३१ ॥
या भारतांत आम्ही नियुक्त सर्वत्र भृत्यगण केला ।
करि जो तुमची निन्दा मारिल तत्काल देवि ! तो त्याला ॥ ३२ ॥
अतिशय नीच असून हि जो सीतागुण कथेंत रत राहे ।
त्या नम्र मानवाच्या गेहीं मणिवृष्टि करितसे पाहे ॥ ३३ ॥
हे देवि ! तव गुणावरि करितात प्रेम फार शेतकरी ।
तेणें त्यांचा वाढे धान्यांचा राशि सत्य अवधारी ॥ ३४ ॥
राघवरविनें स्वामिनि तुजसाठीं पुष्पयान पाठविलें ।
देवि ! प्रसन्न होउनि व्हावें आरूढ शीघ्रगति चाले ॥ ३५ ॥
राघव नगरी, देश हि दिसति न सुन्दर तुझ्याविणें देवी ।
वल्लीदीपेन्दुविना तरु घर नभ शोभतील वद केवी ॥ ३६ ॥
स्वामिनि दिसेल आजचि विभुमुख पूर्णेन्दुकान्तिधारि तुला ।
पतिवचना हे चतुरे अवश्य करि मान्य असशि तूं अमला ॥ ३७ ॥

[ सीतेचें महेंद्रवनांत आगमन. ]

---

१ पृथ्वीला. २ नोकरांचा समूह. ३ निर्दोष.

ऐकून नम्रवचना उत्तमनारीशतासवें चढली ।
पुष्पकयानीं विभवें शीघ्र नभें उपवनांत ती आली ॥ ३८ ॥
सीता साकेतापुरिं आली सूर्यास्त जाहला होता ।
माहेन्द्रवनीं घालवि रजनी उत्पन्न होय मनिं चिन्ता ॥ ३९ ॥
वाटत होतें हें वन रामासह शोभिवन्त मज फार ।
परि आज एकटीला मजला हें वाटतेंचि भेसूर ॥ ४० ॥
प्रातःकाल जहाला रवि नभिं कर[1]किङ्करासवें आला ।
पडला प्रकाश उज्ज्वल जनताचित्तीं प्रमोद बहु झाला ॥ ४१ ॥
सीताशुद्ध्य[2]र्थनुरागा घेउनि जणु सूर्य येइ उदयाला ।
प्रेषुनि करकिङ्करगण उज्ज्वल करितो समस्त भूमितला ॥ ४२ ॥

[ प्रातःकालीं सीता महासभेंत आली. ]

अपवादासम तम जो भासे सम्पूर्ण जाय विलयास ।
रामासमीप जाया सीता उद्यत करी स्वहृदयास ॥ ४३ ॥
झाली जरि चिन्तेनें कान्ति मुखावरिल अल्पशी मन्द ।
तरि ती चन्द्रकलेसम निशिच्या देई जनास आनन्द ॥ ४४ ॥
चढली हत्तिणिवरि ती नारी परिजन समस्त घेऊन ।
चन्द्रकला नभिं चढते तारांचा घेउनि स्वकीयगण ॥ ४५ ॥
सीता महासभेमधिं विनयें वसले जिच्यांत सभ्यजन ।
आली धैर्यवती ती तैं करितो जन समस्त बहुमान ॥ ४६ ॥
खिन्न नि विस्मित हर्षित जनसागर जाहला महाक्षुभित ।
जयजयकार तियेचा केला गम्भीरशा स्वरें त्वरित ॥ ४७ ॥
रूप नि धैर्य नि सत्त्व द्युति गाम्भीर्य प्रभाव सद्गुण हे ।
निष्पापपणा सुचविति संशय याच्यांत लवहि नच राहे ॥ ४८ ॥
बघतांच मना पटतो निर्मल आचार जानकीचा हा ।
स्त्री-पुरुषांचें यापरि निघे मुखांतून वचन हरि मोहा ॥ ४९ ॥
गगनीं खे[3]चर भूतलिं भू[4]चर आश्चर्यचकित होऊन ।
सीतेस पाहती ते त्यांचे अनिमे[5]ष जाहले नयन ॥ ५० ॥

१ किरणरूपी नोकरासह. २ सीतेच्या पावित्र्यावर प्रेम करणें. ३ विद्याधर. ४ भूतलवासी लोक. ५ पापण्या न लवणारे डोळे.

ज्यांना प्रमोद झाला ऐसे स्त्री-पुरुष बघुनि रामास ।
देव जसे इन्द्राला आदरिती तेवि आदरिति त्यास ॥ ५१ ॥
श्रीरामपार्श्वभागीं पाहुनि लवणा नि अङ्कुशा वदले ।
रामासम हे दिसती नान्तर यांच्यांत भासतें कसलें ॥ ५२ ॥
शत्रुक्षय करण्याला समर्थ नारायणास पाहून ।
करिति स्तुति कांहीं नर शंसिति सुन्दर असेचि शत्रुघ्न ॥ ५३ ॥
कोणी हनुमन्ताला विभीषणाला कुणी विराधास ।
कोणी सुग्रीवाला कोणी भामण्डलास सविशेष ॥ ५४ ॥
विस्मित मनांत होउनि परि सर्वचि जनकराजतनयेस ।
शंसिति आदरभावें बघती अनिमेष करुनि नयनास ॥ ५५ ॥
व्याकुल चित्त जियेचें सीता रामासमीप येऊन ।
राहे विनम्र होउनि उभी स्वकरकमलयुगल जोडून ॥ ५६ ॥
मानी वियोगसागर तरुनि तदन्तास पोंचला आहे ।
सौख्यमनोरथ सागर वेगें उसळुन जणू मनीं वाहे ॥ ५७ ॥
लक्ष्मण उठुनी हर्षे अर्पण करि अर्घ्य रामभार्येस ।
अन्य अनेक नृपाल हि वन्दन करिती तदीयचरणास ॥ ५८ ॥
सम्मुख आलेल्या तिज पाहुनि अक्षोभ्य हृदयही राम ।
झाला सकम्पमानस चिन्ती चित्तांत तेधवा वाम[1] ॥ ५९ ॥
क्रूरप्राणिगणांनीं भरलेल्या सोडिलें हिला विपिनीं ।
मम लोचनचौरी[2] ही पुनरपि आलीच माझिया सदनीं ॥ ६० ॥
निर्वासिलें हिला मी तथापि लज्जाविहीन होऊन ।
आली माझ्याविषयीं हिच्यांत अप्रेम लवहि दिसतें न ॥ ६१ ॥

[ सीतेच्या मनांतले विचार. ]

परि रामाभिप्राया सीता हृदयांत सकल जाणून ।
चिन्ती समाप्त झालें माझें अद्यापि दुःख लवही न ॥ ६२ ॥
या विरहसागराच्या तटास येऊनही मनःपात्र[3] ।
वाटे फुटेल ऐशा चिन्तेनें कम्प पावलें गात्र[4] ॥ ६३ ॥
आतां काय करावें समजेना मन्मनास या समयीं ।
पादाङ्गुष्ठें भूवरि लिहून खालींच दृष्टि ती देई ॥ ६४ ॥

---

१ उलटें. २ डोळ्यांना आकर्षिणारी. ३ मनरूपी नाव. ४ शरीर.

रामापुढें उभी ती जनकसुता जणु दुजी रमा शोभे ।
इन्द्रापुढें शची वा सीतारूपें सुराज्य होय उभें ॥ ६५ ॥

[ रामाचें व सीतेचें उत्तर प्रत्युत्तर.]

राम तियेला वदला सीते माझ्यापुढें किमर्थ उभी ।
येथून चालती हो नच मी इच्छी तुझा न मी लोभी ॥ ६६ ॥
मध्याह्नीं रवितेजा बघण्या माझे समर्थ हे डोळे ।
परि तुज पाहु न शकती जा येथुनि शीघ्र तोण्ड करिं काळें ॥ ६७ ॥
तूं रावणसदनामधिं अनेकमहिने निवास केलास ।
परि आणिलें तुला मी झालें हें उचित मज न रामास ॥ ६८ ॥
हें रामवचन ऐकुनि तुजसम निष्ठुर दुजा न जगतांत ।
विद्येस मूर्ख जैसा अवमानिशि मजशि हें न तुज उचित[1] ॥ ६९ ॥
डोहाळ्याचें सांगुनि निमित्त मजला वनांत पाठविलें ।
गर्भवती मी असतां सांग तुझें कार्य होय केवि भलें ॥ ७० ॥
असमाधिमरण[2] मजला आलें असतें जरी महाविपिनीं[3] ।
दुर्गतिदात्या झालें असतें तव कार्य काय सिद्ध जनीं ॥ ७१ ॥
माझ्यावरि जरि असतां अपुला सद्भाव[4] वा दया तरिही ।
मज आर्यिकानिवासीं त्यजिली असती न काय हें पाही ॥ ७२ ॥
असति अनाथ अबान्धव निर्धन दुःखी जगांत जे जीव ।
शरण तयां जिनशासन एकचि मी मानि त्यास जिनदेव ॥ ७३ ॥
हें सगळें जरि घडले तथापि विसरून सर्व मी गेल्ये ।
हो तूं प्रसन्न आज्ञा देइ कळू दे मनांतलें सगळें ॥ ७४ ॥
ऐसें बोलुनि होउनि सीता दुःखी यदा रडू लागे ।
श्रीराम तदा बोले निर्मल तव शील जाणतो मी गे ॥ ७५ ॥
माझ्यावरीच आहे दृढ तव पतिभाव मज अमान्य नसे ।
देहें मनें नि वचनें विशुद्धता सर्वदा तुझी विलसे ॥ ७६ ॥
परि अपवाद तुझ्यावरि लोकांचा प्रगट जाहला आहे ।
निर्मलता तव पटवी स्वीकारिन तेधवा तुला पाहे ॥ ७७ ॥
हें रामवचन ऐकुनि वैदेही पावली प्रमोद मनीं ।
पटविन विशुद्धता मम लोकांना सर्व ऐक तें कानीं ॥ ७८ ॥

---

१ योग्य. २ क्रोधादिसंक्लेशांनीं मरण. ३ मोठ्या जंगलांत. ४ स्नेह.

सर्व विषामधिं भयकर विष आहे कालकूट नांवाचें ।
तें पिउनि दाखविन मी लोकां मम शील सर्वदा साचें ॥ ७९ ॥
सर्प हि जयास हुंगुनि होतो तत्काल भस्ममय जाण ।
तें कालकूट भक्षुनि माझा शीलप्रभाव दावीन ॥ ८० ॥
अथवा तुळेवरी मी आरोहण करिन देइ आदेश ।
किंवा शिरेन अग्निज्वालामधिं तीव्र सांग हृदयेश[1] ॥ ८१ ॥
अथवा पसन्त जें तुज ते मजला नाथ ! सांग निःशङ्क ।
तें करुनि दिव्य लोकां दाविन शीलांत मी नसे रङ्क[2] ॥ ८२ ॥

[ सीतेनें अग्निप्रवेश करणें कबूल केलें. त्यामुळें हनुमान आदिक खिन्न झाले. ]

क्षणभरि चिन्तुनि वदला अग्निज्वालामधिं प्रवेश करी ।
वदली शिरेन सीता रामा अत्यन्त हर्ष धरुनि उरिं ॥ ८३ ॥
नारद खेदें वदले सीतेनें अंगिकारिलें मरण ।
श्रीशैलादिकभूपति शोकानें फार जाहले खिन्न ॥ ८४ ॥
माता अपुली अनलीं[3] इच्छी करण्या प्रवेश जाणून ।
लवण नि अङ्कुश यांचें मन झालें तेधवा महाखिन्न ॥ ८५ ॥

[ क्षुल्लकव्रती सिद्धार्थाचें प्रतिज्ञापूर्वक भाषण. ]

आहे प्रभाव मोठा क्षुल्लकसिद्धार्थ आपुला हात ।
उंच उभारुनि वदला ऐकावी सकलसज्जनें मात[4] ॥ ८६ ॥
सीतेचें शीलव्रत देव हि सारे न वर्णु शकतील ।
जीव क्षुद्र कसें मग उल्लङ्घुनि पार शीघ्र जातील ॥ ८७ ॥
प्रविशेल रसातलिं गिरिसुमेरु सागर हि शुष्क होतील ।
सीताशीलव्रत हें चञ्चल राम न कधीं हि होईल ॥ ८८ ॥
सूर्यस्वरूप येइल चन्द्रा रवि थण्डगार होईल ।
सीतापवाद राघव असत्य तो सत्यता न पावेल ॥ ८९ ॥
मी पञ्चमेरुवन्दन शाश्वत[5]जिनमन्दिरें जिथें असतां ।
केलें वृथाचि होइल सीताशीलांत हानि जरि हो ती ॥ ९० ॥
पुष्कळहजार वर्षं केलें जें तप सवख मी जगतां ।
तें सर्व विफल होइल रामाचे पुत्र हे जरी नसती ॥ ९१ ॥

---

१ हृदयाचा स्वामी– पति. २ दीन. दरिद्री. ३ अग्नींत. ४ म्हणणें.
५ अकृत्रिम.

मिथ्या असेल जरि हे करो न अग्निप्रवेश वैदेही ।
केला असतां सीता मरेल होईल भस्ममय पाही ॥ ९२ ॥
विद्याधर नभि वदले भूचर भूवरि समस्त हर्षून ।
सत्य त्रिवार आहे सिद्धार्थाचें असत्य नच वचन ॥ ९३ ॥

[ सीतादेवी सती आहे अग्निदिव्य नको असें म्हणणाऱ्या लोकावर श्रीरामाचें रागावणें. ]

देवा प्रसन्न व्हावें श्रीरामा सौम्यता मनीं आणा ।
हें अग्निदिव्य करणें सीतेनें नच पसन्त हो कोणा ॥ ९४ ॥
सीता सतीच आहे सतीच आहे न अन्यथा[1] पाहे ।
श्रेष्ठनरांच्या पत्नी अविकारी विकृति लवहि नच राहे ॥ ९५ ॥
ऐसा जनवदनांतुनि अश्रूसह वचनवृन्द बाहेर ।
पडला सर्व दिशामधिं गेला व्यापून जेवि जलपूर ॥ ९६ ॥
कोलाहल बहु झाला केला अत्यन्त शोक जनतेनें ।
झाली जमीन ओली गळणाऱ्या स्थूल अश्रुधारेनें ॥ ९७ ॥
श्रीरामचन्द्र वदले तुमच्याठायीं दया जरी फार ।
अपवाद घेतला कां जनहो सीतेवरी तुम्ही चतुर ॥ ९८ ॥
यास्तव तुमच्या वचनीं प्रामाणिकता नसेचि तिळभरही ।
केली जी मी आज्ञा होइल तैसेंचि सर्वथा पाही ॥ ९९ ॥
ऐसें बोलुनि रामें सीताशुद्धींत लक्ष्य ठेवून ।
किङ्करवर्गा[2] आज्ञा केली अतितीव्र धैर्य धारून ॥ १०० ॥
तुम्ही खोल खणावी पुरुषद्वय[3]मात्र मेदिनी[4] खालीं ।
गर्ता[5] तींत करावी चौकोनी सुप्रमाण भयवाली ॥ १०१ ॥
लांब नि रुन्द समान प्रमाणयुत तीनशे करांची ती ।
ज्वाला प्रचण्ड ज्यांच्या जाती अति उंच जेवि गगनान्तीं ॥ १०२ ॥
प्रलयानल[6] जणु ऐसा प्रखराग्नि तियेंत पेटवा शीघ्र ।
जणु तो मृत्यु दिसावा सर्वा अग्निस्वरूप अत्युग्र ॥ १०३ ॥
जैशी स्वामिन् आज्ञा अपुली ऐसें म्हणून भृत्यगणें ।
कुदळी हातीं घेउनि केली गर्ता अतीव चतुरपणें ॥ १०४ ॥

---

१ असती—व्यभिचारिणी. २ नोकरांच्या समूहाला. ३ दोनपुरुषप्रमाण खोल. ४ जमीन. ५ खड्डा. ६ प्रलयकालचा अग्नि.

[ सकलभूषण मुनिराजाची कथा. ]

राम नि सीता यांचा झाला संवाद ज्या दिनीं त्याच ।
रात्रीं महेन्द्र उपवनिं झाला उपसर्ग मुनिवरा साच ॥ १०५ ॥
ध्यानस्थ सकलभूषण मुनिवर असतां तया स्थलीं आली ।
रूपें फार भयङ्कर निशाचरी[1] एक उग्र अतिकाली ॥ १०६ ॥
'विद्युद्वक्त्रा' होतें नांव तिचें पूर्ववैरिणी साची ।
उपसर्ग करुनि भयकर मुनिवर्या तीव्रसा तया जाची ॥ १०७ ॥
गौतमगणेश्वरानें कथिला श्रीश्रेणिकास सम्बन्ध ।
यापरि तो श्रोत्यांनीं श्रविला केलें तयें मना सान्द्र[2] ॥ १०८ ॥
विजयार्धपर्वतावरि गुञ्जानामक सुरेख पुर होतें ।
राजा मृगेन्द्रविक्रम करी प्रजापालना सुखें तेथें ॥ १०९ ॥
त्या श्री नामक भार्या सुत झाला सकलभूषणाख्य तया ।
नामें तेवि कृतीनें भूषण होता समस्त जनहृदया ॥ ११० ॥
भार्या गुणखनि होत्या रतिसुन्दर आठशे तया आर्या ।
करमण्डला तयामधिं पट्टस्त्री होति रूपगुणवर्या ॥ १११ ॥
एकेदिनिं सवतींनीं लिहावया चित्र तीस सांगितलें ।
हेमशिख मेहुण्याचें सुमानसें तें तदा तिनें लिहिलें ॥ ११२ ॥
अन्तःपुरिं नृप आला सहसा तें पाहिलें तयें चित्र ।
रागावला तिच्यावरि कोपें नर पाहती न अरि मित्र ॥ ११३ ॥
बहु विनविलें तयाला सवतींनीं तैं प्रसन्न तो झाला ।
करमण्डलासमागमसुखांत चिरकाल भूपमणि रमला ॥ ११४ ॥
एके दिनिं राजासह साध्वी ती झोपली सुखें शयनीं ।
'हेमशिख' शब्द आला झोपेंतचि चुकुनि हा! तिच्या वदनीं ॥ ११५ ॥
ऐकून सकलभूषणराजा अत्यन्त कुपित मनिं झाला ।
स्त्रीवैराग्यें होउनि मुनिवर सुतपांत सर्वदा रमला ॥ ११६ ॥
कोपें मरून झाली निशाचरी रश्मिमण्डला राणी ।
'विद्युद्वदना' नामें क्रौर्याची[3] जी असे महाखाणी ॥ ११७ ॥

[ विद्युद्वदना राक्षसी सकलभूषण यतिराजांना नानाप्रकारचे उपसर्ग करिते. ते सहन करून ते केवली होतात. ]

---

१ राक्षसी. २ एकाग्र. ३ दुष्टपणाची.

मिथ्या असेल जरि हे करो न अग्निप्रवेश वैदेही ।
केला असतां सीता मरेल होईल भस्ममय पाही ।। ९२ ।।
विद्याधर नभिं वदले भूचर भूवरि समस्त हर्षून ।
सत्य त्रिवार आहे सिद्धार्थाचें असत्य नच वचन ।। ९३ ।।

[ सीतादेवी सती आहे अग्निदिव्य नको असें म्हणणाऱ्या लोकावर श्रीरामाचें रागावणें. ]

देवा प्रसन्न व्हावें श्रीरामा सौम्यता मनीं आणा ।
हें अग्निदिव्य करणें सीतेनें नच पसन्त हो कोणा ।। ९४ ।।
सीता सतीच आहे सतीच आहे न अन्यथा पाहे ।
श्रेष्ठनरांच्या पत्नी अविकारी विकृति लवहि नच राहे ।। ९५ ।।
ऐसा जनवदनांतुनि अश्रूसह वचनवृन्द बाहेर ।
पडला सर्व दिशामधिं गेला व्यापून जेवि जलपूर ।। ९६ ।।
कोलाहल बहु झाला केला अत्यन्त शोक जनतेनें ।
झाली जमीन ओली गळणाऱ्या स्थूल अश्रुधारेनें ।। ९७ ।।
श्रीरामचन्द्र वदले तुमच्याठायीं दया जरी फार ।
अपवाद घेतला कां जनहो सीतेवरी तुम्ही चतुर ।। ९८ ।।
यास्तव तुमच्या वचनीं प्रामाणिकता नसेचि तिळभरही ।
केली जी मी आज्ञा होइल तैसेंचि सर्वथा पाही ।। ९९ ।।
ऐसें बोलुनि रामें सीताशुद्धींत लक्ष्य ठेवून ।
किङ्करवर्गा[२] आज्ञा केली अतितीव्र धैर्य धारून ।। १०० ।।
तुम्ही खोल खणावी पुरुषद्वय[३]मात्र मेदिनी[४] खालीं ।
गर्ता[५] तींत करावी चौकोनी सुप्रमाण भयवाली ।। १०१ ।।
लांब नि रुन्द समान प्रमाणयुत तीनशे करांची ती ।
ज्वाला प्रचण्ड ज्यांच्या जाती अति उंच जेवि गगनान्तीं ।। १०२ ।।
प्रलयानल[६] जणु ऐसा प्रखराग्नि तियेंत पेटवा शीघ्र ।
जणु तो मृत्यु दिसावा सर्वां अग्निस्वरूप अत्युग्र ।। १०३ ।।
जैशी स्वामिन् आज्ञा अपुली ऐसें म्हणून भृत्यगणें ।
कुदळी हातीं घेउनि केली गर्ता अतीव चतुरपणें ।। १०४ ।।

---

१ असती—व्यभिचारिणी. २ नोकरांच्या समूहाला. ३ दोनपुरुषप्रमाण खोल. ४ जमीन. ५ खड्डा. ६ प्रलयकालचा अग्नि.

[ सकलभूषण मुनिराजाची कथा. ]

राम नि सीता यांचा झाला संवाद ज्या दिनीं त्याच ।
रात्रीं महेन्द्र उपवनिं झाला उपसर्ग मुनिवरा साच ॥ १०५ ॥
ध्यानस्थ सकलभूषण मुनिवर असतां तया स्थलीं आली ।
रूपें फार भयङ्कर निशाचरी[1] एक उग्र अतिकाली ॥ १०६ ॥
'विद्युद्वक्त्रा' होतें नांव तिचें पूर्ववैरिणी साची ।
उपसर्ग करुनि भयकर मुनिवर्या तीव्रसा तया जाची ॥ १०७ ॥
गौतमगणेश्वरानें कथिला श्रीश्रेणिकास सम्बन्ध ।
यापरि तो श्रोत्यांनीं श्रविला केलें तयें मना सान्द्र[2] ॥ १०८ ॥
विजयार्धपर्वतावरि गुञ्जानामक सुरेख पुर होतें ।
राजा मृगेन्द्रविक्रम करी प्रजापालना सुखें तेथें ॥ १०९ ॥
त्या श्री नामक भार्या सुत झाला सकलभूषणाख्य तया ।
नामें तेवि कृतीनें भूषण होता समस्त जनहृदया ॥ ११० ॥
भार्या गुणखनि होत्या रतिसुन्दर आठशे तया आर्या ।
करमण्डला तयामधिं पट्टस्त्री होति रूपगुणवर्या ॥ १११ ॥
एकेदिनिं सवतींनीं लिहावया चित्र तीस सांगितलें ।
हेमशिख मेहुण्याचें सुमानसें तें तदा तिनें लिहिलें ॥ ११२ ॥
अन्तःपुरिं नृप आला सहसा तें पाहिलें तयें चित्र ।
रागावला तिच्यावरि कोपें नर पाहती न अरि मित्र ॥ ११३ ॥
वहु विनविलें तयाला सवतींनीं तैं प्रसन्न तो झाला ।
करमण्डलासमागमसुखांत चिरकाल भूपमणि रमला ॥ ११४ ॥
एके दिनिं राजासह साध्वी ती झोपली सुखें शयनीं ।
'हेमशिख' शब्द आला झोपेंतचि चुकुनि हा! तिच्या वदनीं ॥ ११५ ॥
ऐकून सकलभूषणराजा अत्यन्त कुपित मनिं झाला ।
स्त्रीवैराग्यें होउनि मुनिवर सुतपांत सर्वदा रमला ॥ ११६ ॥
कोपें मरून झाली निशाचरी रश्मिमण्डला राणी ।
'विद्युद्वदना' नामें क्रौर्याची[3] जी असे महाखाणी ॥ ११७ ॥

[ विद्युद्वदना राक्षसी सकलभूषण यतिराजांना नानाप्रकारचे उपसर्ग करिते. ते सहन करून ते केवली होतात. ]

---

१ राक्षसी. २ एकाग्र. ३ दुष्टपणाची.

आहारास्तव निघतां मुनिवर ती सतत विघ्न करित असे ।
परि खिन्न न ते होती त्यांचें मन आत्मचिन्तनांत वसे ॥ ११८ ॥
भिक्षेस्तव फिरतांना प्रमत्तगज[1] मुक्त बन्धनें केला ।
त्या दुष्टेनें तेव्हां मुनिवर परतुनि निजाश्रमीं गेला ॥ ११९ ॥
केव्हां घरास लावी अग्नि नि वारा प्रचण्ड वाहवि ती ।
जेणें दशदिग्वदनें धूळीनें मलिन धुन्द बहु होतीं ॥ १२० ॥
आहारास्तव निघतां घोडे बैल नि मुनीस आडविती ।
जेणें परतुनि जाउनि निजाश्रमीं आत्मचिन्तना करिती ॥ १२१ ॥
कांटे पेरुनि मार्गीं आहारीं विघ्न राक्षसी करि ती ।
करुनि कुकार्यें ऐशीं नानाविध हर्ष मानि ती चित्तीं ॥ १२२ ॥
केव्हां कोणाच्या घरिं पाडुनि भिंतीस छिद्र उचलून ।
आणी मुनिराजा ती ठोका चोरास बोलते वचन ॥ १२३ ॥
समजून चोर धरिती मुनिवर्या नीच वचन नर वदती ।
अपमान करुनि बान्धुनि ठोकुनि वा दूर सोडुनी देती ॥ १२४ ॥
भोजन समाप्त होउनि जातांना दातृजनगळ्यांतील ।
हार मुनींच्या कण्ठीं बान्धुनि यति हा असे चुराशील[2] ॥ १२५ ॥
ऐसें दाखवि तेणें मुनि चोर असे प्रसिद्ध होऊन ।
दात्यापासुनिही वधबन्धादिक दुःख होय अघखाण ॥ १२६ ॥
त्या अत्यन्तक्रूरें निशाचरीनें अनेकशा बाधा ।
केल्या मुनिवर्याला सन्तत ती प्राप्त हो न निर्वेदा[3] ॥ १२७ ॥
प्रतिमायोगें असतां महेन्द्र उपवनिं निमग्नसे ध्यानीं ।
पूर्वभवस्मरणानें केला घोरोपसर्ग येवोनी ॥ १२८ ॥
वेताल-सिंह-हत्ती-वाघ-महासर्प-आदिरूपांनीं ।
छळिलें निशाचरीनें अनुकम्पा[4] प्रगटली तिच्या न मनीं ॥ १२९ ॥
ऐशा उपद्रवें ही मुनिमानस पावलें नच स्खलन[5] ।
तेव्हां तयास झालें लोकालोकज्ञ केवलज्ञान ॥ १३० ॥
केवलिपद पूजाया आले इन्द्रादिदेव त्या स्थानीं ।
स्तुतिनमनादिक केले त्यांनीं निजकाय[6]चित्तवचनांनीं ॥ १३१ ॥

१ माजलेला हत्ती. २ चोरी करण्याच्या स्वभावाचा. ३ कंटाळा. ४ दया.
५ आत्मध्यानापासून च्युत. ६ शरीरानें.

हत्ती सिंह नि घोडे उंट नि हरिणादि-वाहनावरती ।
आले वसून बहु सुर ज्यांची करवे बुधा हि नच गणती ॥ १३२ ॥
मणिजडितमुकुटकुण्डलहारांनीं कान्तियुक्त नभ केलें ।
ज्यांनीं सर्वसुरासुर शीघ्र महेन्द्रोदयोपवनिं आले ॥ १३३ ॥

[ इन्द्र मेघध्वजदेवाला सीतोपसर्ग दूर कर असें सांगून
सकलभूषणकेवलीच्या सभेंत गेला. ]

आले सुर देवीसह साकेतापत्तनाभिमुख झाले ।
पाहुनि धरणीतल तें अतिशय आनन्दयुक्त अवतरले ॥ १३४ ॥
मेषध्वज नांवाचा सुर सीतावृत्त सकल जाणून ।
वदला तो देवेन्द्रा कार्य दिसे हें प्रभो महाकठिण ॥ १३५ ॥
देवांना ही दुःखद सीतेला हा महोपसर्ग इथें ।
होतो कां हें तुमचे न पाहवें सदय मृदुलशा चित्तें ॥ १३६ ॥
सीता निर्मलचित्ता असे सुशीला महासती लोकीं ।
सुश्राविका तिला हा घडे उपद्रव न उचित अवलोकीं ॥ १३७ ॥
देवेन्द्र त्यास वदला वन्दाया सकलभूषणा जातो ।
सीतोपसर्ग हरि बा सुयश जिचें सर्व देवगण गातो ॥ १३८ ॥
यापरि बोलुनि गेला सुरेन्द्र तो झणिं महेन्द्र उद्यानीं ।
मेषाङ्क हाहि गेला सीता होती जिथें अशा स्थानीं ॥ १३९ ॥
आकाशीं सुविमानीं तो सुर उपसर्गहरण करण्यास ।
बैसे सुसज्ज होउनि सुपुण्यवन्तास होति नायास ॥ १४० ॥
सूर्यविमानीं शोभे जैसा जिनदास सुर विमानांत ।
रामा नि जानकीला पाहे तेथून चन्द्रसम शान्त ॥ १४१ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सकलभूषणदेवागमनाभिधानं नाम चतुरुत्तरशतं पर्व ॥ १०४ ॥

## एकशेपांचाव्या पर्वांतील कथासारांश.

गवत व लांकडांनीं भरलेला फार मोठा खड्डा पाहून रामचंद्रांना व्याकुलता उत्पन्न झाली. या खड्ड्याच्या विशाल अग्निज्वालामध्यें सीतेनें उडी घेतल्याबरोबर ती जळून जाईल. कोठें हा प्रचंड अग्नि व कोठें सीतेचें मालती पुष्पाप्रमाणें कोमल शरीर? सीता जर जनकवंशांत उत्पन्न झाली नसती तर तिच्यावर लोकापवादच आला नसतां पण आतां तिच्या वियोगानें मला अतिशय दुःख होईल.

परंतु शीलवती सीता अगदीं निश्चिन्त दिसते. ती अग्नींत प्रवेशून आपलें पावित्र्य सर्वांना दाखविण्यास उद्युक्त झाली आहे— आतां कोणता उपाय करावा जेणेंकरून ही अग्निप्रवेशापासून परावृत्त होईल. मला कांहींच सुचेनासें झालें आहे.

लङ्केश रावणानें हिला हरण करून नेलें होतें. ही त्याला इच्छित नाहीं म्हणून त्यानें हिला त्यावेळीं मारून टाकिलें असतें तर बरें झालें असतें. किंवा हिचा मी वनांत त्याग केला तेव्हांच जर मरण पावली असती तर बरें झालें असतें. सीता ही पहिली पतिव्रता म्हणून जगांत तिची प्रख्याति झाली असती.

खड्डा पेटविल्यावर त्याच्या अग्निज्वाला आकाशांत अतिशय उंच गेलेल्या पाहून त्यास्थलीं जमलेल्या सर्व स्त्रियांच्या मनांत दया उत्पन्न होऊन त्या रडूं लागल्या. आकाशांत चोहोकडे धूर पसरून सूर्य दिसेनासा झाला. जणू हा उपसर्ग मला पाहवणार नाहीं म्हणून तो कोणीकडे तरी निघून गेला असावा असें लोकांना वाटलें. अग्नीच्या लाल ज्वाला आकाशांत पसरलेल्या पाहून जणू पाताळांतून लाल फुलांचीं पळसांची असंख्यात झाडें वर आलीं आहेत असें वाटलें.

इकडे स्थिरचित्ताची जानकी कायोत्सर्ग करून उठली. तिनें धर्मतीर्थाचे कर्ते अशा वृषभादि चोवीस तीर्थंकरांना वंदन केलें. सिद्धादिपंचपरमेष्ठींचें मनांत चिंतन

केलें. "मी कायावाचामनानें श्रीरामाशिवाय अन्य पुरुषास हृदयीं धारण केलें नाहीं. हें मी खरें बोलत आहे. जर माझें हें भाषण असत्य असेल तर मला हा अग्नि भस्म करून टाको. मी पापी व्यभिचारी क्षुद्र स्त्री असेन तर हा अग्नि मला भस्म करो. अन्यथा याचें पाणी होवो." असें बोलून सीतेनें त्या प्रचंड अग्नींत उडी टाकली.

पण त्यावेळीं तत्काल त्या अग्नीचें पाणी झालें. अग्निकुंडांतून हजारो झऱ्याचें प्रवाह कारंज्याप्रमाणें आकाशांत पसरले व त्यांत लोक बुडून जाण्याचा प्रसंग उद्भवला. सीतादेवी महासती, महापतिव्रता असे ध्वनि कोट्यवधि लोकांच्या गळ्यांतून बाहेर पडूं लागले. ते पाणी रामचंद्राच्या सिंहासनापर्यंत आलें. त्यानें त्याचे पाय धुतले. खड्ड्यांत पाणी मावेनासें झालें. त्यांत सुंदर कमळें उत्पन्न झालीं. मध्यभागीं एका महाकमलावरील सिंहासनावर सीतासती बसली होती. व देवाङ्गना तिच्या पातिव्रत्याचें गुणगान करीत होत्या. सर्व विद्याधर, भूचर स्त्री-पुरुष सीतेच्या पातिव्रत्याची प्रशंसा कोट्यवधिकण्ठांनीं करूं लागले.

हें दृश्य पाहून लवण व अंकुश दोन सीतापुत्र पाणी पोहून तिच्याजवळ गेले. सीतासती सिंहासनावर लक्ष्मीप्रमाणें शोभूं लागली. तिच्या दोन्हीं बाजूला तिचे पुत्र सिंहासनावर बसले. तिनें प्रेमानें त्यांच्या मस्तकावरून हात फिरविले. सर्व देवता तिच्यावरून चामरें वारूं लागल्या. 'जनकराजाची कन्या, रामचंद्राची सती-स्त्री सीतादेवीचा विजय असो' असे घोष देवतांच्या मुखांतून बाहेर पडूं लागले. अग्नींत घातलेल्या सोन्याच्या सळयीचें जसें तेज चोहीकडे पसरतें तशी सीतासतीची शरीरकांति दहा दिशांत पसरली.

रामचंद्र सीतासतीच्या जवळ गेले व हे सती सीते, प्रसन्न हो. आतां प्रजाजनांच्या मनांतील संशय पार नाहींसा झाला आहे. मी मोठा अपराधी आहे मला क्षमा कर. अज्ञानवश होऊन मी तुझा त्याग केला. आतां असें करणार नाहीं. आटहजार स्त्रियांची व माझीही स्वामिनी होऊन मला आज्ञा कर. मी ती पुष्पमालेप्रमाणें मस्तकावर आदरानें धारण करीन.

आपण पुष्पकविमानांत बसून मेरुपर्वतावरील अनेक जिनमंदिरांचें दर्शन घेत जाऊं. अकृत्रिम जिनमूर्तींचें पूजन करीत जाऊं. माझ्याबरोबर या त्रिखंडपृथ्वीचा उपभोग घे. याप्रमाणें रामचंद्रांनीं तिला विनविलें तेव्हां सीतासती याप्रमाणें प्रसन्नतेनें बोलली:—

राजन्, माझा त्याग करण्यांत आपला तिळमात्रही दोष नाहीं. माझ्या कर्मानें मला हें निर्वासनाचें फळ दिलें आहे. आपल्या कृपेनें मी देवोपमसुखें भोगिलीं आहेत. आतां मी संयम धारण करून स्त्रीपर्याय नाहींसा करीन. पुनः स्त्रीपर्याय मला प्राप्त होणार नाहीं असें संयमव्रत धारण करून परंपरेनें मुक्तिसुखाची प्राप्ति करून घेईन. आतां मला भोगसुखांची इच्छा राहिली नाहीं. असें म्हणून केशलोच केला व ते केश रामाचे हातांत दिले. ते केश व सीतासतीची विरक्ति पाहून रामचंद्र मूर्च्छित झाले. त्यावेळीं पृथ्वीमति नामक आर्यिकेजवळ तिनें दीक्षा घेतली. तिनें महाव्रतें धारण केलीं, एकवस्त्र तिनें धारण केलें. तिच्या मनांत संसारभीति उत्पन्न झाली व तत्काल केवलीजवळ गेली.

इकडे नोकरांनीं चन्दनजलसेचनानें रामचंद्रांना सावध केलें. त्यांनीं इकडे तिकडे पाहिलें. सीता न दिसल्यामुळें देवांनीं सीतेचा महिमा दाखवून तिचें हरण करून नेलें, आतां त्यांच्याशीं युद्ध करून मी तिला सोडवून आणितो असें बोलून ते हत्तीवर बसून अनेक राजासह जेथें देव बसले होते अशा केवलींच्या सभेंत गेले. तेथें त्यांनीं लक्ष्मणासह विनयानें प्रवेश केला. त्यांनीं हात जोडून केवलींना नमस्कार केला. मेरुपर्वताजवळ कल्पतरु शोभावा तसे रामचंद्र केवलीजवळ शोभू लागले.

एकच वस्त्र जिनें धारण केलें अशी सीतासती आर्यिकासमूहांत शोभत होती. रामचंद्रासह सर्वांच्या अंतःकरणांत धर्मश्रवणाची अभिलाषा उत्पन्न झाली. अभय-निनाद नामक मुनिमुख्यानें सर्वांचे संशय नाहीसें व्हावेंत म्हणून केवलींना धर्माचें स्वरूप सांगा म्हणून विनंति केली.

केवलिप्रभु धर्माचें स्वरूप सांगूं लागले:—

सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र हें आत्म्याचें स्वरूप आहे या स्वरूपाची प्राप्ति न झाल्यामुळें जीव नरक, पशु, मनुष्य व देवगतींतून भ्रमण करीत असतो. पापानें जीवाचा जन्म रत्नप्रभादि नरकांत होतो व तेथें त्याला दीर्घकालपर्यंत छेदनभेदनादि दुःखें भोगावी लागतात. प्राणिहिंसा, असत्यभाषण, चोरी, परस्त्रीसेवन व तीव्र धनलोभ अशा पापांनीं जीवाचा जन्म नरकांत होऊन तो अतिशय दुःखी होतो मद्य, मांस, मधाचें सेवन, जुगारादिक व्यसनें हीं नरकप्राप्तिची कारणें आहेत. मद्यादिक सेवन अधर्म आहे असें जाणून त्यांचा त्याग करावां व जिनधर्माचें सेवन करावें.

जग तीन प्रकारचें आहे. अधोलोकांत दहा प्रकारचे भवनवासी देव राहतात. सात नरकांत नारकी राहतात. मध्यलोकांत पृथ्वी, हवा आदिक पांच प्रकारचे स्थावर जीव व द्वीन्द्रियापासून पंचेन्द्रियापर्यंत त्रस जीव राहतात. संसारीजीवांचे बादर, सूक्ष्म, पर्याप्त अपर्याप्त आदिक चौदा भेद आहेत. पुनः संसारी जीवांचें भव्य व अभव्य असे दोन भेद आहेत. गर्भजजीवांचे पोत, अण्डज व जरायुज असे तीन भेद आहेत. सिंहादिक पोत, पक्षी आदिक अण्डज, व मनुष्य व गाय-म्हैस आदिक जरायुज होत. हे पंचेन्द्रिय असतात. औदारिकादि पांच शरीरें आहेत. मनुष्यादिकांना औदारिकशरीर, देव व नारक्यांना वैक्रियिकशरीर, संशय-निर्णयासाठीं प्रमत्त संयतमुनींना आहारकशरीर, कोपवश झालेल्या मुनीला अशुभ तैजस व दयाळु मुनीला शुभ तैजस अशी शरीरें उत्पन्न होतात.

मध्यलोकांत जंबूद्वीपादिक द्वीप व लवणादिक समुद्र आहेत व द्वीपांत हिमवान्, महाहिमवान् आदिक पर्वत, व भरतादिक क्षेत्रें आहेत. भरत, ऐरावत, विदेह अशा पंधरा कर्मभूमि व हैमवतादिक तीस भोगभूमि आहेत. सूर्य, चन्द्र, ग्रह, नक्षत्र व तारका असें पांचप्रकारचें ज्योतिर्मंडल असून त्यावर ऊर्ध्वलोकांत सौधर्मादिक सोळा स्वर्ग, नव ग्रैवेयक, नव अनुदिश व पांच अनुत्तर यांत देव राहतात.

लोकाच्या अग्रभागीं ज्ञानावरणादिक अष्टकर्मांनीं रहित व सम्यक्त्वादिक आठ गुणांनीं सहित असे सिद्धपरमेष्ठी विराजमान झाले आहेत. सिद्धाचें सुख स्वाभाविक आहे व तें त्याना निर्मल आत्मस्वरूपापासून प्राप्त झालें आहे. संसारी जीवांचें सुख तरवारीच्या धारेवरच्या मधाला चाटण्यासारखें दुःखमिश्रित आहे. चक्रवर्तीचें सुख देखील खरें सुख नाहीं. तें मधुर अशा सविषान्नासारखें आहे-- सिद्धसुखाची बरोबरी करणारें सुख संसारीजीवांना प्राप्त होत नसतें. चक्रवर्तीच्या सुखापेक्षा मोठें सुख व्यन्तरदेवांचें, त्याहून मोठें ज्योतिष्कदेवांचें, त्याच्यापेक्षा अधिक सुखी भवनवासीदेव आहेत. व यांच्याहून सरस सुख कल्पवासीदेवांचें, त्याहून चांगलें ग्रैवेयकनिवासी अहमिन्द्रांचें व त्याहून मोठें सुख अनुत्तर देवांचें आहे. याच्या सुखाहून अनन्त-गुणित सिद्धसुख आहे. सिद्धपरमेष्ठींना अनन्तज्ञान, दर्शन, अनन्तसुख व अनन्त-शक्ति असते. संसारी जीवांचें सुख बाह्य अनुकूल वस्तुप्राप्तीनें होते. तसें सिद्धसुख बाह्यवस्तूवर अवलंबून नसतें म्हणून तें निरुपम आहे. संसारी जीवाचें सुख मोह-हेतुक आहे.

भव्यजीव मुनि होऊन कर्मक्षय करून सिद्ध होतात व अनन्तसुखी होतात. अभव्य नेहमी कर्मावृतच असतात. भव्यजीवांना रत्नत्रय प्राप्तीनें मोक्षप्राप्ति होते. ती अभव्यास कधीच होत नाहीं.

जीवादिक पदार्थावर श्रद्धान करणें तें सम्यग्दर्शन होय. जिनधर्म व धार्मिकावर प्रेम केल्यानें तें प्राप्त होतें. जीवादिक पदार्थांच्या ज्ञानाला सम्यग्ज्ञान म्हणतात व पापापासून विरक्त होणें तें सम्यक्चारित्र होय. त्रस व स्थावर जीवावर दया ठेवावी. शुभकार्यांत– सत्पात्रदानादिकार्यांत प्रवृत्ति असावी, पापाचें भय मनांत राहावें असें आचरण तें सम्यक्चारित्र होय. परिग्रहावरील लोभ नाहींसा करावा. जितेंद्रिय व्हावें, सम्यक्चारित्रानें जीवाच्याठिकाणीं नवीन कर्मांचें आगमन होत नाहीं अर्थात् संवर होतो. सम्यग्दृष्टि, सम्यग्ज्ञानी व सम्यक्चारित्रवंत मनुष्य जिनदीक्षा घेऊन मनुष्य व देवांचे सात आठ भव धारण करून मुक्त होतो. इत्यादि धर्मस्वरूप ऐकून रामचंद्रादिकांना आनंद वाटला.

यानंतर रामचंद्रानें मी भव्य आहे कां अभव्य आहे असा प्रश्न विचारला. व मी सगळया पृथ्वीचाही त्याग करूं शकेन पण लक्ष्मणाचा त्याग करूं शकत नाहीं असा प्रबलस्नेह माझ्याठिकाणीं आहे. त्यापासून प्रभो, आपण माझें रक्षण करावें. प्रभु म्हणाले– रामचंद्रा, याविषयीं दुःख मानू नकोस. तूं दीर्घकालपर्यंत बलदेवपदाचा उपभोग घेऊन नंतर दीक्षा घेशील व कर्मक्षय करून मुक्त होशील. रामचंद्र याच भवांत कर्मक्षय करून मुक्त होणार हें ऐकून सर्वांना आनंद झाला व सर्वांनीं केवलिभगवंताची हर्षानें प्रशंसा केली. सर्व सुरासुरांना आनंद वाटला.

# एकशेपाचावें पर्व.

—∘∘✕∘∘—

( रामचंद्र सीतावियोगाच्या संभावनेनें व्याकुल होऊन विचार करितात. )

गवतें नि लाकडांनीं गर्ता[1] भरली विशाल पाहून ।
व्याकुल अतिशय होउनि करि रामाचें तदा विचार मन ॥ १ ॥
मुखिं शीलतेज झळके जिच्या नि जी सकलसद्गुणाधार ।
पुनरपि दिसेल कैशी जी या लोकत्रयांतलें सार ॥ २ ॥
ही मालतीफुलासम नाजुकशी जानकी विनाशास ।
अग्निस्पर्शें देखिल पावेल न यांत संशयावास ॥ ३ ॥
जर जन्म जनकवंशीं नच असतां जाहला हिचा केवी ।
लोकापवाद येतां मृति अनलीं पावती न ही देवी ॥ ४ ॥
सीतेवांचुनि मजला क्षणमात्र हि सौख्य नैव लाभेल ।
वसणें वनीं हिच्यासह वरें परि स्वर्गि तद्विना फोल ॥ ५ ॥
निश्चिन्तचित्त सीता झाली मरणास हाय उद्युक्त ।
अग्नींत शिरुनि अपुली शुचिता[2] ही दाखवील हें उचित ॥ ६ ॥
काय उपाय करावा जेणें होईल ही परावृत्त ।
न सुचे चिन्तुनि मजला क्षुल्लक सिद्धार्थ ही वसे स्वस्थ ॥ ७ ॥
अथवा ज्याच्या दैवीं सुमरण वा अशुभ मरण जें असतें ।
तें नियमें त्या मिळतें विरोध केला जरी हि यत्नशतें ॥ ८ ॥
लङ्केश रावणानें नेलें हिजला हरून लङ्केंत ।
परि ही मजला इच्छित नाहीं चिन्तून कोपसन्तप्त ॥ ९ ॥
होऊन तोडिलें कां नाहीं खड्गें हिचें शिरास खलें ।
झालें असतें सुन्दर संशय जीवितिं हिच्या न होय भलें ॥ १० ॥
मरण वरें मज वाटे वियोग दुःसह कदापि नच होवो ।
श्रवण स्मरण हि हरितो प्रसङ्ग हा नाश शीघ्र मम पावो ॥ ११ ॥
होतां वियोग होइल माझ्या आजन्म दुःख चित्तास ।
मेली असतां पूर्वीं असतां मी सोडिला सुखें श्वास ॥ १२ ॥

---

१ गार, खड्डा. २ पवित्रता.

इच्छा माझ्या हृदयीं विषयिं तिच्या प्रगट जाहली नसती ।
यश पसरलें हि असतें हीच सती आद्य जाहली असती ।। १३ ।।
यापरि विचार असतां करीत गर्तेत पेटला अनल ।
नारीगण करुणेनें रुदन करूं लागलां तदा सकल ।। १४ ।।
भूमीवरि आकाशीं पसरे अतिदाट धूर चोहिकडे ।
जणु वर्षाकालाचे उद्भवले कालमेघ दृष्टि नडे ।। १५ ।।
जणु भृङ्गमय जहालें कोकिलमय विश्व जाहलें सगळें ।
किंवा पारावतमय[1] नयनांतुनि अश्रुपूर सतत गळे ।। १६ ।।
उपसर्ग पाहवेना गेला रवि जणु म्हणून कोणिकडे ।
हृदयीं दया तयाच्या प्रगटे जन मोकलून धाय रडे ।। १७ ।।
प्रखराग्नीच्या ज्वाला वेगें आक्रमिति दिक्प्रदेशास ।
क्रोशप्रमाण[2] जाती नभांत भय दाविती न कोणास ।। १८ ।।
अन्तररहित हजारो जणु झाले व्याप्त उग्र सूर्यांनीं ।
आकाश भास झाला आलें जणु जाळण्यास ही अवनि ।। १९ ।।
किंवा पातालांतुनि लाल फुलांचीं असङ्ख्यशीं झाडें ।
सहसा हीं वर आलीं पळसांचीं केवि वाटलें कोडें ।। २० ।।
उत्पातसमयसन्ध्या आकाशीं प्रगटली असे काय ।
किंवा वाटे सगळें जग हें जणु जाहलें सुवर्णमय ।। २१ ।।
अथवा विद्युन्मयता[3] आली जगतास आज भास गमे ।
किंवा सुमेरुचल हा स्थिर मेरुगिरीस जिंकण्यास रमे ।। २२ ।।

( पंचपरमेष्ठींची स्तुति करून व रामाशिवाय अन्यनराला मी मनांत स्थान दिलें नाहीं असें म्हणून सीतेनें अग्नींत उडी टाकिली. )

अत्यन्त स्थिर आहे चित्त जिचें जानकी अशी उठली ।
कायोत्सर्गानन्तर भावें हृदयें जिनेशनुति[4] केली ।। २३ ।।
जे धर्मतीर्थ कथिती ऐशा वृषभादिका जिना नमुन ।
सिद्धां आचार्यांना पाठकयतिवरपदास वन्दून ।। २४ ।।
देवासुर-नर-खेचर आनन्दें ज्याचिया पदां नमिती ।
त्या सुव्रतनाथा ती नमी जिच्या भक्तिवैभवा[5] न मिति ।। २५ ।।

---

१ पारव्यांनीं व्यापलेलें. २ एककोसप्रमाणाच्या. ३ नाना विजांनीं पूर्ण असे. ४ स्तुति. ५ भक्तीच्या ऐश्वर्याला.

सर्व प्राण्यांचें हित करिती आचार्यचरण जगतांत ।
वन्दन करून त्यातें वदली रामप्रियां[1] महाशान्त ॥ २६ ॥
" कायें वाचें नि मनें रामा सोडून अन्य मनुजास । "
" स्वप्नींहि धारिलें नच मी हें मद्वच असत्य नच खास ॥ २७ ॥ "
" जर मी असत्य वदते भस्म करो अग्नि हा मला प्रबल । "
" सत्य असे वच माझें जर हा रक्षो मला सदा अमल ॥ २८ ॥ "
" श्रीरामाहुनि दुसरा नर जरि मी ठेविला नसेल मनीं । "
" पावक विशुद्ध मजला नच जाळो मी खरी सतीच जनीं ॥ २९ ॥ "
" पापी क्षुद्र स्त्री मी व्यभिचारी जरि असेन हा अनल । "
" जाळो मजला सत्वर सतीव्रत स्थिर चि होउ अनल जल ॥ ३० ॥ "
यापरि बोलुनि सीता प्रवेशली तीव्रतम अशा अनलीं ।
परि निर्मल सुखशीतल झालें जल जें सदा खुलें कमलीं ॥ ३१ ॥
फोडुनि धरेस आलें पातालांतूनि गार ती भरली ।
उठती तरङ्ग नाना जल तें पसरुनि करी सदा केली ॥ ३२ ॥

( प्रचंड अग्नीचें वापींत रूपांतर झालें. तिच्यांत मध्यभागीं सिंहासनावर सीतासती विराजमान झाली आहे असें दृश्य.)

गारींत न जल मावे तेथें काष्ठें न अग्नि नच तृण ही ।
नच कोळसे हि दिसती झाली जलमय तदा समस्त मही ॥ ३३ ॥
फेस तिच्या बहु कांठीं जमला बहु भोवरेहि फिरतात ।
गम्भीर तिला पाहुनि जन सारे जाहले भयव्याप्त ॥ ३४ ॥
कोठें वापीजल तें मृदुल मृदङ्गासमान रव करितें ।
कोठें भुंभुद् पटपट हुङ्कारांनीं जनास भय देतें ॥ ३५ ॥
क्षुब्ध समुद्रासम ती वापी गम्भीर गर्जना करिते ।
वाहू लागे वेगें नीर तिचें जनमनास भय देतें ॥ ३६ ॥
घेरून सर्व लोकां गुडघ्यापर्यन्त वाढलें पाणी ।
नन्तर कमरे इतकें झालें छातीही घेरिली त्यांनीं ॥ ३७ ॥
पुनरपि वाढुनि पाणी कण्ठापर्यन्त घेरिलें त्यानें ।
यत्नें विहीन झालें भूचर अतिभीतिविकल होति मनें ॥ ३८ ॥

---

१ रामाची आवडती पत्नी.

विद्याधर जन तेव्हां आकाशीं राहिले उभे सगळे ।
परि भूचरनर[1]-नारीवृन्दाची धीरता समस्त गळे ॥ ३९ ॥
जे मञ्च होति तेथें तरङ्ग तें लागले जलावरती ।
भूचरखेचर-मानव सीतेच्या सद्गुणा तदा स्तविती ॥ ४० ॥
हे देवि ! तारि आम्हां तारी कल्याणकारिणी अससी ।
सर्वप्राणिहिताची हृदयीं तूं भावना सदा धरिशी ॥ ४१ ॥
करि आम्हावरि करुणा मुनिमानसनिर्मले[2] महासाध्वी ।
तूं निष्कलङ्क अससी गुणगानीं तव अशक्त सर्व कवि ॥ ४२ ॥
जे रक्तकमलकोमलनखसुन्दर रामचरणयुगलास ।
वापीवधू स्वहस्तें तरङ्गरूपें करि यदा स्पर्श ॥ ४३ ॥
जेव्हां प्रशान्त झाले पाण्याचे भोवरे समस्त तिचे ।
अब्धिसम गर्जना ही तेव्हां जन जाहले सुखी साचे ॥ ४४ ॥
उत्पल[3] कुमुद[4] नि पद्में[5] ती वापी जनमनोहरा दिसली ।
पसरे सुगन्ध करिती गुञ्जारव मधुरसा जयांत अलि[6] ॥ ४५ ॥
हंस क्रौञ्च नि सारस कादम्बक आदि सलिलपक्षिगण[7] ।
करिती मधुररवातें आकर्षिति ते समस्तजन-नयन ॥ ४६ ॥
मणिजडितकाञ्चनाच्या सोपानें[8] शोभती महावापी ।
पाचूसमान हिरवें गवत तटीं लोकवृन्द नयनें पी ॥ ४७ ॥
मध्यें तिच्या सुविस्तृत सहस्रदलकमळ मृदुल बहु शोभे ।
सिंहासन त्याच्यावरि चन्द्रासम शुभ्र रत्नजडित उभें ॥ ४८ ॥
त्या सिंहासनिं सीता लक्ष्मी जणु विस्मयास उदय जिचा ।
दिसली जनास बसली अमरस्त्रीगण जिला स्तवी साचा ॥ ४९ ॥
विजय असो साध्वीचा ऐसा उच्चार करुनि देवगण ।
आकाशांतुनि करिती पुष्पांची वृष्टि हृदयिं हर्षून ॥ ५० ॥
कांहीं सुर सनईनें मधुर अशी कीर्ति गाति सीतेची ।
मधु बासरीहि वाजे टाळ-मृदुंगादि वाजती साची ॥ ५१ ॥

---

१ जमिनीवर असणारे. २ मुनींच्या मनाप्रमाणें निर्मल विचार धारण करणारी. ३ निळीं कमळें. ४ रात्रीं विकसणारीं कमळें. ५ दिवसां विकसणारीं कमळें. ६ भुंगे. ७ जलपक्ष्यांचा समूह. ८ पायऱ्यांनीं.

विद्याधरजन हर्षे करून जयकार नाचतात नभीं ।
विजय असो शीलाचा वदती वदनें जया कदापि न भी[१] ॥ ५२ ॥
जनकनृपाची दुहिता भार्या श्रीमन्तरामरायाची ।
विजयी सदैव राहो शीलवती ही महासती साची ॥ ५३ ॥
अद्भुतशील सुनिर्मल हिचेंच जगतांत घोषणा करिती ।
वदनें समस्तजनता जिची यशोवर्णनांत अमितं[२] रति ॥ ५४ ॥

( लवण व अंकुश मातेजवळ गेले. )

मातृस्नेह जयांच्या सागरसम मनिं अपार उद्भवला ।
लवणाङ्कुश-सुत सन्निध गेले तत्पार्श्वभाग शोभविला ॥ ५५ ॥
पुत्रप्रीति तियेच्या मनांत वाढून नम्र सुतयुग्मा ।
शीर्षी हुंगी असतो मातेचा स्नेह सतत निश्छद्मा[३] ॥ ५६ ॥
जैशी हेमशलाका[४] होउनि अग्नींत शुद्धशी झळके ।
शीलवती सीतेची देहद्युति दशदिशांत बहु फाके ॥ ५७ ॥
कमलीं शोभे ऐशा पाहुनि सीतेस राम मनिं धाला ।
अनुरागरक्त[५] होउनि तरून जल तो तिच्याकडे गेला ॥ ५८ ॥

( रामचंद्र तिची स्तुति करून माझ्याबरोबर आनंदानें राहा म्हणून विनवणी करितात. )

शारदचन्द्रासममुखि[६] हे सीतेदेवि हो प्रसन्ना तूं ।
तव शीलाविषयीं न प्रजामनीं साध्वि लेश ही किन्तु ॥ ५९ ॥
अपराध देवि घडला माझ्या हातुन पुनः करीन न मी ।
दुःख न देईन असें क्षमा करी शील सतत तव नामी ॥ ६० ॥
आठसहस्र-स्त्रीगणिं होऊन स्वामिनी मला ही दे ।
आदेश जानकी तूं प्रभुता मानीन मी तुझी मोदें ॥ ६१ ॥
अज्ञानवशमनानें ऐकुनि जनवाद[७] कष्ट तुजला गे ।
जे मी दिले खरोखर मैथिलि घनकाननांत तव त्यागें ॥ ६२ ॥
स्मरण तयाचें होतां होतें बहु दुःख वाटते लाज ।
करि तूं प्रिये क्षमा मज कधीहि मी करिन निंद्य नच कांज[८] ॥ ६३ ॥

---

१ भीति. २ अप्रमाण प्रेम. ३ अनिमित्त– स्वाभाविक. ४ सोन्याची सळई. ५ प्रेमयुक्त. ६ शरत्कालांतील चन्द्रासारखे सुंदरमुख असलेल्या सीते. ७ लोकापवाद. ८ काम.

पुष्पकयानीं बैसुनि माझ्यासह तूं विहार अवनिवरी ।
आनन्दानें करि गे स्वर्गासम भोग भोग हर्ष धरी ॥ ६४ ॥
जाऊ सुमेरुशैलीं पाहू तेथें अनादि जिनगेहें ।
पूजू जिनेश्वरांना जे झाले रहित सर्वदा मोहें ॥ ६५ ॥
विद्याधरस्त्रियांनीं वेष्टित तूं या त्रिखण्डविभवाचा ।
उपभोग घे यथेप्सित[1] माझ्यासह जनकनन्दिनी[2] साचा ॥ ६६ ॥
आहे दोषी जरि मी त्यजिलें तुजला बनून अविवेकी ।
हो सुप्रसन्न मजवरि मैथिलि कोपास शीघ्र तूं टाकी ॥ ६७ ॥

( सीतेचें रामास वैराग्यपर उत्तर. )

यापरि राघवभाषण ऐकुनि सीता वदे प्रसन्नमुखी ।
राजन् ! कोप न माझा कोणावरिही सदैव राहि सुखी ॥ ६८ ॥
मनिं कां विषाद धरिशी हर्ष मुखावरि सदैव झळकू दे ।
कमलप्रफुल्ल हें मुख शोकानें मलिन करुं नयेचि बुधें ॥ ६९ ॥
लव हि न दोष नृपा तव अथवा दोषी प्रजाहि ही नाहीं ।
माझ्याकर्में मजला निर्वासनफल[3] दिलें बुधा ! पाही ॥ ७० ॥
होता प्रसाद माझ्यावरि बलदेवा सदा तुझा तेणें ।
मी भोगिले सुरोपम भोग मला वाटलें न किमपि उणें ॥ ७१ ॥
तें कार्य करिन आतां जेणें स्त्री मी पुनः न होईन ।
अवलम्बीन सुधर्मा परम्परें मुक्तिसौख्य साधीन ॥ ७२ ॥
भोग विनाशी असती जे मूढमनुष्य तेचि सेविति या ।
दारुणफलास देती इच्छि न ते व्यर्थ आयु दवडाया ॥ ७३ ॥
लक्षावधियोनींचा पथ[4] मी आक्रमुनि खिन्न बहु झाल्ये ।
दुखक्षय करण्याचें शुद्ध मनोरथ मनांत उद्भवले ॥ ७४ ॥
निश्चय जिनदीक्षेचा बलदेवा मी मनीं असे केला ।
उपडूनि केशभारा रामकरीं निश्चयें नयेंचि दिला ॥ ७५ ॥
जे इन्द्रनीलमणिसम सुकान्त सुन्दर नि फार सुकुमार ।
पाहुनि केशा पडला मूर्च्छित होऊन राम भूमिवर ॥ ७६ ॥

---

१ जसे तूं इच्छिलें असशील. २ जनकराजाची कन्या. ३ पतीनें त्यागण्याचें फल. ४ मार्ग.

चन्दनकर्पूरादि नि शीतजलें सावधान रामास ।
करिती तोंवरि पृथ्वीमत्यार्या पाहि जनकतनयेस ॥ ७७ ॥
निर्विघ्न जाहली ती सीता तत्काल आर्यिका साध्वी ।
वस्त्रचि फक्त परिग्रह मन संवेगा[1] सदा जियेचें वी ॥ ७८ ॥
धारुनि महाव्रतांना पवित्र झालें शरीर चित्त जिचें ।
केवलिसमीप गेली सुर जेथें वर्णितात गुण ज्यांचे ॥ ७९ ॥
चन्दनजलास सिंचुनि पंख्याचा वायु आदि-सदुपायें ।
सावध परिवारानें केलें रामास जेधवा विनयें ॥ ८० ॥
पाही दहादिशांना दिसली सीता न जेधवा त्यास ।
शोकें कोपें झाले त्याच्या हृदया अतीव सङ्क्लेशे[2] ॥ ८१ ॥
तत्काल तो गजावरि होउनि आरूढ राजविभवानें ।
नृपशतपरिवारासह निघे मुखें क्रूर बोलुनी वचनें ॥ ८२ ॥
प्रियजनमरण हि होइल सह्य मला परि वियोग नच सहन ।
ऐसें बोलुनि झालें रामाचें बहु सुरांत कुपित मन ॥ ८३ ॥
या शठदेवें[3] केलें सीतेचें प्रातिहार्य[4] फसवून ।
केलें हरण तयांनीं तिजला मी आणितोचि परतून ॥ ८४ ॥
केला लोच जियेनें ऐशा सीतेसही न जरि द्याल ।
मी देवरहित मारुनि करीन हें विश्व निश्चयें सकल ॥ ८५ ॥
न्यायांत असुनि तत्पर माझी पत्नी तुम्ही कशी हरिली ।
हातांत शस्त्र घेउनि या लढण्या भ्याडवृत्ति ही कसली ॥ ८६ ॥
यापरि बोलत असतां राघव त्याचें अतीव विनयानें ।
सान्त्वन लक्ष्मण करिता झाला बहुविध अशा उपायानें ॥ ८७ ॥
श्रीराम नि लक्ष्मीधर आले नन्तर महेन्द्र उद्यानीं ।
पाहून केवलीला विनयी श्रीराम जाहला मानी[5] ॥ ८८ ॥
उतरुनि हत्तीवरुनि श्रमणश्रेष्ठासमीप तो गेला ।
करयुग जोडुनि विनयें प्रणाम तत्पदयुगा तयें केला ॥ ८९ ॥
राजे अनेक विनयें कर कलिकाकृति[6] करून मुनिचरणां ।
सुरवृन्दासह नमिती जे हरिती भव्यजीवजनिमरणा[7] ॥ ९० ॥

१ संसारापासून भय. २ दुःख. ३ कपटी देवांनीं. ४ महिमा. ५ अभिमानी. ६ कळीच्या आकृतीचे. ७ जन्म.

जैसा सुमेरुशिखरासन्निध अत्यन्त कल्पतरु शोभे ।
श्रीराम राज-राजा केवलिसन्निध न विवश जो लोभें ॥ ९१ ॥
मणिमुकुटकुण्डलांनीं लक्ष्मण ही मुनिसमीप शोभे तो ।
जैसा शैलासन्निध तडिल्लतेसह सुकालघन गमतो ॥ ९२ ॥
ज्या भीति वधुनि अरिगण शोभे शत्रुघ्न जणु कुबेरसम ।
लवणाङ्कुश जणु दिसती सुलक्षणी चन्द्रसूर्य अभिराम[1] ॥ ९३ ॥
एकचि वस्त्र परिग्रह जिचा नि निर्भूषणा अशी सीता ।
रविमूर्तितुल्य शोभे आर्या जी संयमद्वयें[2] सहिता ॥ ९४ ॥
यापरि विनयी नरसुर धर्मश्रवणाभिलाष ठेवून ।
धरणीवरि ते वसले असतां करकमलयुग्म जोडून ॥ ९५ ॥
नामें 'अभयनिनाद' श्रमणगणीं मुख्यशिष्य मुनिवर्या ।
सन्देहशान्ति व्हावी म्हणुनि पुसे धर्मरूप त्या समया ॥ ९६ ॥

( सकलभूषणकेवलीचा सविस्तर धर्मोपदेश. )

योगीश्वर त्या वदले सर्वप्राणिप्रबोध[3] होण्यास ।
तत्त्वस्वरूप सगळें जें मिटवी भव्यजन्ममरणास ॥ ९७ ॥
सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान नि सुचरित्र वस्तुतत्त्व असे ।
आत्मस्वरूप यासचि वदती हितकर सदैव वें विलसे ॥ ९८ ॥

( नरकदुःखवर्णन. )

आहे अनन्त ऐसें नभ चोहिकडे अलोक नांवाचें ।
लोक तयाच्यामध्यें मृदङ्गयुगतुल्य[4] वदति बुध साचें ॥ ९९ ॥
खाली मध्यें वरती त्रिभेद याचे म्हणून विबुधगण ।
देती त्रिभुवनसंज्ञा[5] या त्रैलोक्यास उचित हेंचि गण ॥ १०० ॥
मन्दरशैलाखालीं[6] असती ज्या सातभूमि पहिलीस ।
रत्नप्रभा वदावें जेथें भावन नि नारकावास ॥ १०१ ॥
त्याच्याखालीं असती सहा मही सुख तिथें न तिळभरही ।
अतिशय ज्या भयकारी दुःखांची खाण वदति बुध पाही ॥ १०२ ॥

---

१ सुंदर. २ प्राणिसंयम व इंद्रियसंयमांनीं. ३ प्राण्यांना ज्ञान होण्यास. ४ दोन मृदङ्गांच्या आकाराचें. ५ तीन लोक. ६ मेरुपर्वताचे खालीं.

नामें त्यांचीं असतीं सुशर्करा, वालुका नि पङ्काभा[1] ।
धूमप्रभा, तमोभा[2], महातमोभा[3] अतीव गतशोभा ॥ १०३ ॥
या अतिदुःखा देती सन्तत गाढान्धकारयुत असती ।
शीतोष्णवेदना बहु येथें प्रतिसमयिं नारक्यां होती ॥ १०४ ॥
रक्तवसामांसाचा चिखल नि दुर्गन्ध सतत करि वास ।
या साही नरकामधि भूमितलांचा हि तीव्र दुःस्पर्श ॥ १०५ ॥
श्वानाहिमनुज[4] यांच्या सडल्या तनुचा मिळून दुर्गन्ध ।
जो अतिदुःसह होतो तैसा नरकांत राहि बहु सान्द्र[5] ॥ १०६ ॥
नानादुःखसमूहा ज्या असती वस्तु हेतु त्या आणी ।
वाहे प्रचण्ड वारा दुःखित होतात नारकी प्राणी ॥ १०७ ॥
रसनास्पर्शनलम्पट-मानव दुष्कर्म जें इथें करिती ।
पापें होउनि भारी नरकीं लोहासमान[6] ते पडती ॥ १०८ ॥
हिंसा असत्य चोरी परललनासङ्ग[7] तीव्रलोभ अशीं ।
पापें अनेक करिती ते होती मनुज नरकरहिवाशी ॥ १०९ ॥
जे पापें आचरती करवुनि अनुमोदना हि जे देती ।
जे रौद्रार्त ध्याती ते नरकीं घोर दुःख अनुभवती ॥ ११० ॥
मजबुत भिंती फोडुनि हरुनि प्राणास वित्त लुटतात ।
नरकानल त्या जाळी पापी ते तीव्र रुदन करितात ॥ १११ ॥
ते अग्निदग्ध जाती वैतरणीला स्वदाह शमवाया ।
शीतजलेच्छेनें परि त्यांचा होतो प्रयत्न तैं वाया ॥ ११२ ॥
तीव्रक्षारजलानें तद्देहीं होति वेदना घोर ।
भीतमृगासम जाती तेथुनि असिपत्रकाननीं[8] दूर ॥ ११३ ॥
छायेच्या आशेनें तेथें जातात नारकीं क्रूर ।
पानें पडती त्यांच्या देहीं खड्गासमान तीव्रतर ॥ ११४ ॥
तीक्ष्ण अशा अस्त्रांनीं विदारिती अन्य नारकी त्यांना ।
यापरि दुःखें भोगिति चतुरासहि वर्ण्य तें न दुःख गणा ॥ ११५ ॥

---

१ पङ्कप्रभा. २ तमःप्रभा. ३ महातमःप्रभा. ४ कुत्रा, सर्प व मनुष्य. ५ अतिशय तीव्र. ६ लोखंड. ७ परस्त्री. ८ तरवारीसारखीं पानें ज्यांचीं आहेत अशा झाडांचें वन.

टांगून पाय त्यांना कुम्भीपाकांत शिजविती कोणी ।
यन्त्रीं घालुनि पिळिती असती ते सर्व निर्दयप्राणी ॥ ११६ ॥
कित्येक पाय बाहु नि खान्दे मुख नेत्रकर्ण नाकास ।
तोडून दुःख देती पापांची धरूं नका तुम्ही कास ॥ ११७ ॥
कित्येक शत्रु नरकीं निर्दय होऊन फोडिती डोकें ।
अत्यन्तवेदनेनें भूमिवरी लोळतात दीन निके ॥ ११८ ॥
अतिशय तृष्णापीडित होउनि ते दीन मागती पाणी ।
तेंव्हां निर्दय अरि ते ताम्ररसा तप्त पाजिती कोणी ॥ ११९ ॥
पाहुनि ताम्ररसाला तहान नाहीं मला तुम्ही सोडा ।
अतिशय दीनरवानें म्हणती परि पाजिती न त्या थोडा ॥ १२० ॥
फाकून तोंड त्यांचें विष रक्त नि कलिलें[1] घालतात मुखीं ।
तें कण्ठ हृदय जाळुनि येतें बाहेर होति अति असुखी ॥ १२१ ॥
पश्चात्तापें पीडित त्यांना वदतात असुर त्या समयीं ।
गुरुवचना उल्लंघुनि भक्षियलें मांस होउनी अदयी ॥ १२२ ॥
बहुविध मांसें नि मधें केलेलें श्राद्ध पुण्य बहु देतें ।
वदलास असें दुष्टा त्याचें फल आज भोग दुःखद तें ॥ १२३ ॥
यापरि बोलुनि लचके अङ्गाचे तोडवून अन्यांनीं ।
खाऊ त्यासचि घालिति कोणाच्या येतसे दया न मनीं ॥ १२४ ॥
पूर्वभवीं नृप होउनि दिलेस आम्हास कष्ट तूं बहुत ।
आतां कुफलें त्याची भोग नृपा म्हणुनि देति त्या कष्ट ॥ १२५ ॥
यापरि पापी जीवा मिळती नरकीं अनेक दुःखशतें ।
विश्रान्ति त्या निमेषहि न मिळे त्यागा म्हणून पापातें ॥ १२६ ॥
जाणुनि अधर्मफल हें अतिदुःसह शान्तचित्त होऊन ।
भव्यांनो सेवावें जिनशासन देइ सौख्य अन्यून ॥ १२७ ॥
दशविधभवननिवासी असुरादिक राहती अधोलोकीं ।
मध्यमलोकीं असती द्वीप नि सागर असङ्ख्य अवलोकी ॥ १२८ ॥

( त्रस व स्थावर जीवांचें वर्णन. )

पृथ्वी पाणी अग्नि नि वात वनस्पति तयास वदतात ।
स्थावर जीव स्पर्शन एकचि इन्द्रिय असे सदा त्यांत ॥ १२९ ॥

---

१ रक्त व वीर्य याच्या मिश्रणासारखा द्रवपदार्थ.

जे द्वीन्द्रियादि असती जीव तया त्रस असे सुधी वदती ।
पञ्चस्थावर आणि त्रस हे षट्काय जैन बुध गाती ॥ १३० ॥
धर्म[1] अधर्म[2] नि पुद्गल[3] काल[4] नि आकाश[5] जीव ही असतीं ।
द्रव्यें सहा जिनांनीं कथिलीं यांचें स्वरूप घ्या चित्तीं ॥ १३१ ॥
एक नि दोन नि तीन नि चार नि ज्या पांच इन्द्रियां धारी ।
ऐसे जीव जगीं या असती हृदयांत सतत अवधारी ॥ १३२ ॥

( संसारी जीवाचे भेद-प्रभेद. )

सूक्ष्म नि बादर ऐसें शरीर हें द्विविध बोलती सन्त ।
जीव हि सूक्ष्म नि बादर तेणें आहेत या त्रिलोकांत ॥ १३३ ॥
पुनरपि असती कांहीं जीव अपर्याप्त[6] आणि पर्याप्त[7] ।
चौदाभेद जयांचे संक्षेपें आगमीं वदे आप्त ॥ १३४ ॥
भव्य नि अभव्य ऐसे जीवद्रव्य द्विभेदरूपाचें ।
संसाररहित असती ऐसे जे सिद्धजीव ते साचे ॥ १३५ ॥
ज्ञान नि दर्शन ऐसे उपयोगाचे द्विभेद आहेत ।
ज्ञेय नि दृश्य पदार्थीं प्रवृत्त उपयोग होति हे साच ॥ १३६ ॥
ज्ञानोपयोग अष्टप्रकारचा चार दर्शनीं भेद ।
संसारी सिद्ध असे द्विभेद वदतात जीव गतखेद ॥ १३७ ॥
समनस्क नि अमनस्क हि संसारी दोनभेद जीवांचे ।
पञ्चेन्द्रियांत असती ऐसे वदतात विबुध तें साचें ॥ १३८ ॥
पृथिवी आदिक वदती स्थावरजीवांत पांच भेद जिन ।
जे द्वीन्द्रियादि पञ्चेन्द्रियान्त ते त्रसचि जाणती निपुण ॥ १३९ ॥
स्पर्शन रसना नाक नि डोळे तैसेच कान हीं पांच ।
असती ज्याला त्याला पञ्चेन्दिय जीव वदति जिन साच ॥ १४० ॥
पोत नि अण्डज आणिक जरायुजा गर्भजन्म वदतात ।
देवां नि नारक्यांना उपपादज जीव बोलती सन्त ॥ १४१ ॥

---

१ गतिसहायक द्रव्य. २ स्थितिसहायक द्रव्य. ३ स्पर्श, रस, गंध, वर्ण व शब्द ज्यांत असतात तें द्रव्य. ४ नवे-जुनेपणा उत्पन्न करणारें. ५ पदार्थांना अवकाश देणारें द्रव्य. ६ आहारपर्याप्ति पूर्ण होऊन शरीरपर्याप्ति ज्याची नियमानें अपूर्ण राहून मरतो तो. ७ व ज्याला जेवढ्या पर्याप्ति प्राप्त व्हावयाच्या तितक्या प्राप्त होणें तो पर्याप्त जीव होय.

याहून इतर जीवा सम्मूर्च्छन जीव ह्मणे वदती ।
संसारीजीवांचे भेद असे आगमांत वदति यति ॥ १४२ ॥
चौऱ्यांशीलक्ष असे योनींचे भेद सर्व गतखेद ।
म्हणति महादुःखांचें स्थान असे सिद्धजीव निर्बाध ॥ १४३ ॥

( औदारिकादि देहांचें वर्णन. )

औदारिक वैक्रीयिक आहारक तैजसाख्य कार्मण हीं ।
पांचशरीरें असतीं परम्परें सूक्ष्म-सूक्ष्मशीं पाही ॥ १४४ ॥
औदारिकदेहाची प्रदेशसङ्ख्या गुणा असङ्ख्येनें ।
वैक्रीयिकदेहाच्या प्रदेशसङ्ख्येस तेधवा गणणें ॥ १४५ ॥
जी वैक्रियदेहाची प्रदेशसङ्ख्या तिला असङ्ख्येनें ।
गुणतां आहारकवपुसङ्ख्यापरिमाण तैं तुम्ही गणणें ॥ १४६ ॥
आहारकदेहाचे प्रदेशपरिमाण जें असे त्यास ।
गुणतांचि अनन्तानें घ्यावें तैजसवपुःप्रदेशास ॥ १४७ ॥
तैजसवपुःप्रदेशां गुणतां पुनरपि अनन्तसङ्ख्येनें ।
कार्मणवपुःप्रदेशप्रमाण येतें असें तुम्ही गणणें ॥ १४८ ॥
तैजसकार्मण यांचा अनादिसम्बन्ध होय जीवाशीं ।
जातो तुटून जेव्हां होतो तो जीव मुक्तिपुरवासी[1] ॥ १४९ ॥

( मध्यलोकांतील जम्बूद्वीपादिकांचें वर्णन. )

जम्बूद्वीपादिक जे द्वीप नि लवणादि असति सागर जे ।
असती असंख्य वदती जिन झाले मुक्त घातिकर्मरजें[2] ॥ १५० ॥
जम्बूद्वीपा लवणें त्याला ही वेढि धातकीद्वीप ।
यासहि कालोदार्णव ऐसा क्रम बोलतात निष्पाप ॥ १५१ ॥
या द्वीपसागरांचें प्रमाण कथिलें असे असङ्ख्यात ।
पूर्वा वेढी उत्तर वलयाकृति वदति जिन वशीभूत ॥ १५२ ॥
सर्वद्वीपसमुद्रीं हा जम्बूद्वीप सांगती पहिला ।
हा मेरुनाभि आहे वृत्त नि हा लक्षयोजनें कथिला ॥ १५३ ॥
परिधि तयाचा त्रिगुणित परि कांहीं अधिकसा असा जाणा ।
पूर्वापरलांबीचे सहा कुलाचल तयांत सुज्ञ गणा ॥ १५४ ॥

---

१ अष्टकर्मरहित– सिद्धपरमेष्ठी. २ ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय व अन्तराय या घातिकर्मरूपी धूळीनें.

हिमवान् नि महाहिमवान् निषध तथा नील रुक्मिशैल असे।
शिखरीसह हे पर्वत कुलशैल, असें सुनाम या विलसे ॥ १५५ ॥
जम्बूद्वीपांतिल जीं क्षेत्रें भरतादि वर्ष[1] त्या नाम।
वर्षधर[2] पर्वतांना नाम असे वदति सुजन हितकाम ॥ १५६ ॥
भरतक्षेत्र असे हें पहिलें वदती दुज्यास हैमवत।
हरि नि विदेह नि रम्यक् हैरण्यवताख्य साहवें ख्यात ॥ १५७ ॥
ऐरावत हें सप्तम गङ्गादिक वाहती नद्या चौदा।
धातकिखण्डीं क्षेत्रें दुप्पट तैसेंच पुष्करार्द्धि वदा ॥ १५८ ॥
मानुषशैलापूर्वी नर आर्यम्लेच्छ वास करितात।
भेद तयांचें बहुविध असती ठेवा मनांत ते सतत ॥ १५९ ॥
जी कर्मभूमि वदती ऐरावतिं भारतीं विदेहांत।
देवोत्तरकुरुसह जीं क्षेत्रें तीं भोगभूमि वदतात ॥ १६० ॥
किंनरकिंपुरुषादि व्यन्तर जे अष्टभेद त्यांत गणा।
क्रीडानिवास सदनें आगमिं त्यांचीं अनेकविध जाणा ॥ १६१ ॥

( ज्योतिर्लोक वर्णन. )

यांच्यानन्तर आहे ज्योतिर्मण्डल नभांत पञ्चविध।
रविचन्द्रग्रहतारानक्षत्रें आगमांत वदति बुध ॥ १६२ ॥

( स्वर्ग, ग्रैवेयक, अनुदिशपंचानुत्तर वर्णन. )

सङ्ख्येयसहस्रावधि नन्तर लङ्घून योजनें गगनीं।
ऊर्ध्वमहालोक असे कल्पसुरांची असेचि तो अवनि ॥ १६३ ॥
सौधर्मकल्प तेथें तेथें ऐशानकल्प सांगितला।
सानत्कुमार तिसरा चौथ्या माहेन्द्रनाम हें बोला ॥ १६४ ॥
ब्रह्म ब्रह्मोत्तर हे लान्तवकापिष्ठ शुक्र हा नववा।
दशम महाशुक्राभिध शतार हा कल्प जाण अकरावा ॥ १६५ ॥
जाणावा बारावा नाम जयाचें असे सहस्रार।
आनत नि प्राणत हे आरणअच्युत महासुखाधार
ग्रैवेयक नव असती यांच्यानन्तर तयांत अहमिन्द्र
उत्कृष्टदेव असती सगळे ते मानिती स्वतः इन्द्र ॥

१ वर्ष– क्षेत्रें त्यांची विभाग २ पर्वत ते वर्षधर

यांच्यानन्तर असती नवानुदिशदेव सर्वसद्दृष्टि[1] ।
मिथ्यादृष्टि न येथें म्हणुनि न होती कदापि ते कष्टी ॥ १६८ ॥
पञ्चानुत्तर पहिला विजय दुजा वैजयन्त आणि तिजा ।
नाम जयन्त तयाचें होति न हे हेतु जाण भवकाजा ॥ १६९ ॥
चौथा अपराजित हा पञ्चमसर्वार्थसिद्धि बुध वदती ।
विजयादि द्विचरम[2] हे असतात तुम्ही धरा सदा चित्तीं ॥ १७० ॥

( मुक्तीचें वर्णनानंतर मुक्ताच्या सुखाचें वर्णन. )

यानन्तर लोकाग्रीं उत्तमसे कान्तियुक्त जें स्थान ।
तें कर्मबन्धनांनीं मुक्तांचें[3] बोलतात साधुगण ॥ १७१ ॥
ईषत्प्राग्भारा हें पृथ्वीला नांव त्या असे धवला ।
उत्तानच्छत्राचा[4] आकार असे तिला गणी वदला ॥ १७२ ॥
सुन्दर ती बहु आहे अनन्तसुखयुक्त सिद्धजीव तिथें ।
निजशक्तीनें राहती संसारविमुक्त शोभती बहु ते ॥ १७३ ॥
केवलिवदनांतुनि या सिद्धांच्या वर्णनास ऐकून ।
त्यांना राघव वदले सिद्धसुखाचें करा विभो कथन ॥ १७४ ॥
कर्में गळलीं ज्यांचीं झाले संसारभावनिर्मुक्त ।
निःदुःख सुख तयांचें कैसें जें सकलविषयपरिमुक्त ॥ १७५ ॥
या लोकत्रितयांतिल सुख बाधाभङ्गदुर्विपाकाचें ।
तें सुख कैचें वास्तव दुःखप्रतिकार[5], तें नसे साचें ॥ १७६ ॥
परतन्त्र जीव झाला ज्ञानावरणादि आठ कर्मांनीं ।
म्हणुनि तयाला लव हि न सौख्याचा प्राप्त तूं असे मानी ॥ १७७ ॥
अतिशय लोखंडाच्या-पत्र्यानें वेष्टिलें जसें सोनें ।
कान्ति तयाची पावे विनाश हा हीनसङ्ग झाल्यानें ॥ १७८ ॥
त्यापरि कर्में वेष्टित झालेला जीव आपले सुगुण ।
जे ज्ञानदर्शनादिक ते सारे बैसला गमावून ॥ १७९ ॥
जन्मजरामरणाच्या रोगसहस्रें समस्त हे प्राणी ।
पीडित मानस दुःखें सुखलव हि न त्या असे सदा जाणी ॥ १८० ॥

---

१ जीवादिसप्ततत्वावर श्रद्धान करणारे. २ दोन मनुष्यभव धारण करून मुक्त होणारे. ३ कर्मबंधानें रहित अशा सिद्धपरमेष्ठीचें. ४ उताणी छत्रीच्या आकाराचे. ५ दुःख नाहींसें करण्याचा इलाज.

असिधारामधु चाटित असतां सुख मानवा यदा होतें ।
दुःखहि रसना चिरतां विषयजसुख राम जाण कैसें तें ॥ १८१ ॥
सन्तप्तचन्दनासम किंवा सविषान्नतुल्य चक्रीचें ।
रामा सुख तूं समजे विषयजसुख तें म्हणून नच साचें ॥ १८२ ॥
आत्मस्वाभाविक सुख सिद्धांचें नित्य त्यांत बाध नसे ।
उपमाविरहित आहे न दुःखलवही कदापि त्यांत वसे ॥ १८३ ॥
सिद्धास झोप नाहीं गमे प्रयोजन तया तिचें काय ।
नीरोग्यांना त्यांना औषधसेवन न कां वृथा होय ॥ १८४ ॥
सर्वज्ञपणा येतां कृतकृत्यपणा[1] तयासवें येतो ।
रविचन्द्रदीप यांचा उजेड रामा वृथाचि त्या होतो ॥ १८५ ॥
ते शत्रुरहित असती भयलेश हि यन्मनांत नैव वसे ।
तरवार त्या कशाला घेतां वैयर्थ्य[2] सज्जनास दिसे ॥ १८६ ॥
सर्वजगा ते बघती करतलरेखेसमान सिद्धगण ।
इच्छा नसे कशाची निःस्पृहता शाश्वती[3] तया जाण ॥ १८७ ॥
तृप्त अनन्त सुखानें अन्नादींचें तया प्रयोजन न ।
देवेन्द्र हि सिद्धांचें इच्छिति सुख एकचित्त होऊन ॥ १८८ ॥
सिद्धसुखाला उपमा नाहीं जरि तत्प्रबोध व्हायास ।
वर्णन करितों त्याचें ऐका तुम्हां न होय आयास ॥ १८९ ॥
चक्री अमर नि सुरपति अनन्तकालांत भोगितीं सुख जें ।
सिद्धसुखानन्तांशासम तें होतें न म्हणुनि नच साजें ॥ १९० ॥
लोकाहुनि राजांचें सुख मोठें चक्रिसौख्य त्याहून ।
चक्रिसुखाहुनि मोठें व्यन्तरसुख राम तूं मनीं आण ॥ १९१ ॥
त्याहुनि मोठें ज्योतिर्वासिसुराचें असे तयाहून ।
सुख भवनांचें[4] आहे त्याहुनि तें कल्पवासिचें छान ॥ १९२ ॥
जें कल्पवासिसुरसुख[5] मोठें ग्रैवेयसौख्य[6] त्याहून ।
त्याहुनि अनुत्तराचें[7] सुख मोठें रामचन्द्र तूं जाण ॥ १९३ ॥

---

१ कर्मक्षय करावयाचा न राहणें. २ व्यर्थपणा. ३ नित्यसदाची.
४ भवनवासिदेवांचें. ५ सौधर्मादिक सोळा स्वर्गांत राहणाऱ्या देवांचें.
६ नऊ ग्रैवेयकांतील अहमिन्द्रांचें. ७ विजयादिक अनुत्तर अहमिन्द्रदेवांचें.

यास अनन्तानन्तें गुणितां तें होय सौख्य सिद्धाचें ।
सिद्धसुखाहुनि मोठें सुख न जगीं अनुपमान तें साचें ॥ १९४ ॥
दृग्वीर्य-बोध-सौख्य[1] नि अनन्त हे चार आत्मरूप असे ।
तें सिद्धामधिं आहे विगतोपम नाशरहितसे विलसे ॥ १९५ ॥
संसारीजीवांचे असती कर्मोपशम अनेकविध ।
त्या बाह्य वस्तु मिळतां निमित्त सौख्यादि होति बहुभेद ॥ १९६ ॥
ज्ञान नि दर्शन वीर्य नि सुख यांत विचित्रता सदा प्रगटे ।
कारण विचित्र असतां कार्यी वैचित्र्य सर्वदा दिसतें ॥ १९७ ॥
स्पर्श रस गन्ध वर्ण नि शब्दापासून सौख्य जें होतें ।
नानारोगांनीं तें सशल्य[2] होतें नि दुःख बहु देतें ॥ १९८ ॥
फोड नि खरूज होतां ती खाजवितां तयांत सुख वाटे ।
या मोह हेतु आहे नन्तर बहुदुःख सर्वदा दाटे ॥ १९९ ॥
जन्मजरामरणांनीं संसारीं भ्रमण सर्वदा चाले ।
हें ज्यांना नच ऐसे आत्मे त्या सिद्ध बोलतात भले ॥ २०० ॥
क्लेश तयांचे झाले विनष्ट गुणसम्पदा अनन्त मिळे ।
ते लोकमुकुट बनले सुख अनुपम सर्वदा तयांत रुळे ॥ २०१ ॥
दर्शन बोध जयांचे लोकालोका[3] प्रकाशिती सतत ।
अल्पप्रकाशकारी सूर्यासम ते कदापि नाहींत ॥ २०२ ॥
हस्तामलकज्ञान[4] च्छद्मस्थाचें[5] समस्त भागांत ।
पूर्ण नसे यास्तव तें सिद्धज्ञानासमान नच तात ॥ २०३ ॥
कालत्रयस्थ सगळ्या भावां बघती नि जाणती युगपत्[6] ।
सर्वज्ञसिद्ध, इतरच्छद्मस्थाची अशी नसे मात ॥ २०४ ॥
ज्ञानीं नि दर्शनीं हा जैसा सिद्धेतरांत भेद असे ।
सौख्य नि शक्तींत हि हा तैसा तो भेद सर्वदा विलसे ॥ २०५ ॥
दर्शन-बोध-सुखांना सिद्धाच्या पूर्ण केवली जाणी ।
इतर हि जाणति म्हणणें केवल उपचारमात्र मनिं आणी ॥ २०६ ॥

---

१ दर्शन, शक्ति, सुख व ज्ञान. २ बाण टोचल्यासारखें. ३ लोकालोका—जीव, धर्म, अधर्म, काल व पुद्गल ही द्रव्यें जेथें असतात त्या आकाशाला लोक व फक्त आकाशाला अलोक म्हणतात. ४ हातांतील स्फटिक मण्याप्रमाणें. ५ ज्यांचें ज्ञान व दर्शन ज्ञानावरण व दर्शनावरणानें आच्छादित आहे. ६ एकेवेळीं.

हें श्रीजिनेन्द्रशासन मिळे अभव्यां न यत्नशतकें ही ।
कायक्लेशा करुनि हि संसारभ्रमण सर्वदा राही ॥ २०७ ॥
आलिङ्गून अविद्याभार्येला झोपतात ते सतत ।
विरह तियेचा होय न कदापि ते राहती तिच्यांत रत ॥ २०८ ॥
मुक्तिरमेला द्याया आलिङ्गन दृढ अतीव उत्सुक जे ।
ऐसे भव्य निजात्मध्यानें होतात रहित कर्मरजें ॥ २०९ ॥

( भव्य व अभव्य कोण ? )

नच सिद्धिशक्ति ज्यांच्या ठायीं त्यांना अभव्य बोलावें ।
भावी सिद्धि जयांना ते भव्य मनांत राम समजावें ॥ २१० ॥

( अन्यमतीं मोक्षप्राप्ति नाहीं. )

श्रीमज्जिनेन्द्रशासन सोडुनि हे रामचन्द्र अन्यमतीं ।
कर्मांचा क्षय करणें न दिसे नच त्यांत अन्तरात्ममति ॥ २११ ॥
पुष्कळ भवकोटींनीं अज्ञानी कर्म जे करी नष्ट ।
ज्ञानी त्रिगुप्त त्याचा विनाश करि देइ जें महाकष्ट ॥ २१२ ॥
परमात्मतत्त्व मानी असे निरञ्जन म्हणून जग सगळे ।
परि परमार्थें बघती योगी प्रक्षीणकर्म नच वगळे ॥ २१३ ॥
निःसार लोकमार्गचि सगळ्यांनीं राम मानिला आहे ।
परमार्थप्राप्तिस्तव घे तूं जिनशासना असंमोहें ॥ २१४ ॥
यापरि सकलविभूषणवचनावलि रामचन्द्र ऐकून ।
वन्दन करून वदला रक्षण माझें करा भवांतून ॥ २१५ ॥
उत्तम मध्यम अधम नि जगांत जे भव्यजीव आहेत ।
ते कोणत्या उपायें नाथ भवांतून मुक्त होतात ॥ २१६ ॥
वदले भगवान् रामा जिनशासनि मोक्षमार्ग सांगितला ।
सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान नि सुचरित्र हाचि मानि भला ॥ २१७ ॥
तत्त्वश्रद्धानाला सम्यग्दर्शन मुनीश म्हणतात ।
चेतनतत्त्व अचेतन अनन्तगुणपर्ययात्म तें तात ॥ २१८ ॥
जो तत्त्वास निसर्गें वा गुरुबोधें मनें करी ग्रहण ।
तो जीव जिनमतीं रत सम्यग्दर्शन धरी असे जाण ॥ २१९ ॥

शङ्का काङ्क्षा कुत्सा[1] परदोषा झांकणें न परनिन्दा ।
परशासनप्रशंसा सम्यक्त्वीं दोष होति मतिमन्दा ॥ २२० ॥
स्थैर्य जिनायतनीं रति सुभावना धर्मधारकाविषयीं ।
शङ्कादिरहित असणें सम्यक्त्वा ये विशुद्धता ठायीं ॥ २२१ ॥
सर्वज्ञशासनीं जो कथिला आचार बोधपूर्वक तो ।
जे पाळिती तयांचें सम्यक्चारित्र विबुधगण गातो ॥ २२२ ॥
इन्द्रियवर्गा करणें वश वचना तेवि मानसास वश ।
पापापासुनि असणें दूर सुचारित्र तेंचि निर्दोष ॥ २२३ ॥
त्रस नि स्थावर भूतीं[2] दया अहिंसाप्रवृत्ति शुभकामीं ।
भय पापाचें असणें सुचरित हें विबुध बोलती नामी ॥ २२४ ॥
काना मनास सुखवी प्रीतीनें मधुर लोकहितकारी ।
वच सत्य असे वदणें सुचरित रामा मनांत अवधारी ॥ २२५ ॥
न दिलें तें नच घेणें कायें वाचें मनें दिलें घेणें ।
जें न्याय्य तेंच याला सुचरित म्हटलें असें जिनेन्द्रानें ॥ २२६ ॥
देव हि ज्याला पूजिति दुर्धर जें सज्जनासही वाटे ।
तें ब्रह्मचर्य निर्मळ धरणें सुचरित असेंच हें मोठें ॥ २२७ ॥
ध्यायी धनपुत्रस्त्रीममता ही विघ्न मुक्तिमार्गांत ।
म्हणुनि परिग्रहवर्जन सुचरित त्या आर्यपुरुष वदतात ॥ २२८ ॥
नच ज्यांत जीवपीडा श्रद्धाभक्त्यादिसद्गुणें दान ।
जें त्यागिजना देणें सुचरित त्यानेंच धर्मवृद्धि गण ॥ २२९ ॥
शील ज्ञान दया दम विनयासह दान नियम नि ध्यान ।
मोक्षार्थ ज्यांत असती सुचरित त्याचेंच सकलगुणसदन ॥ २३० ॥
या सुगुणांनीं भरलें ऐसें श्रीमज्जिनेश्वरें कथिलें ।
मोक्षप्राप्त्यर्थ असें सेवावें चरित कां न होय भलें ॥ २३१ ॥
शक्य असें तें करितो श्रद्धाळू जो अशक्य आचारीं ।
सम्यक्त्वसहित तो नर मुक्तिचरित्रास होय अधिकारी ॥ २३२ ॥
यापरि ज्यांच्या ठायीं हे उत्तम गुण निवास नच करिती ।
सुचरित न तया लाभे संसारा तरुनि ते न नर जाती ॥ २३३ ॥

१ किळस करणें. २ प्राण्यांत.

न दया दम[1] क्षमा गुण जेथें तेथें न संवरा वाव ।
न ज्ञान त्याग हि नच धर्माचें त्या स्थलीं नसे नांव ॥ २३४ ॥
हिंसा असत्य चोरी स्त्रीसेवा जेथ मानिले धर्म ।
धर्म तिथें नच राहे कैसें लाभेल त्या स्थलीं शर्म[2] ॥ २३५ ॥
( मुनिदीक्षा घेऊन पापाचरण करणाऱ्यांना मुक्तिप्राप्ति होत नाहीं. )
दीक्षा घेउनि नर जो प्रवृत्त पापांत होय अज्ञानें ।
आरंभें[3] त्या चरित न मोक्षाची प्राप्ति हो न नियमानें ॥ २३६ ॥
षट्कायजीववृन्दा धर्मनिमित्तें वधून सुख मिळतें ।
ऐशा कुविचारानें जीवा वधिती न मुक्ति त्या होते ॥ २३७ ॥
ताडन, बन्धन, दोहन[4] आदिक करिती नि गांव शेतादि ।
रक्षिति त्यांची दीक्षा वाढविते तीव्रसा भवव्याधि[5] ॥ २३८ ॥
जे क्रयविक्रय[6] करिती भिक्षेची याचना सदा वरिती ।
जे धनसञ्चय करिती दीक्षा त्यांची न मुक्तिसुखदा ती ॥ २३९ ॥
दीक्षा घेउनि नर जे स्नानसुगन्धानुलेप[7] आचरती ।
ते मूर्ख केधवा ही मुक्त न होती परन्तु भविं फिरती ॥ २४० ॥
हिंसेंत दोष नाहीं वदणारे स्वमतिनें कुधी शास्त्रा ।
वेषा नि निजचारित्रा बिघडविती धिक् असो अशा पात्रां[8] ॥ २४१ ॥
गावांत एकरात्रीं नगरीं जे पञ्चरात्र वसतात ।
राहून उभे घेती आहारा पारणें हि मासान्त ॥ २४२ ॥
हरिणासमान फिरती निजती गिरिवरुनि पात मोक्षास ।
कारण मुनि जे वदती त्यांच्या पदरांत मूढतावास[9] ॥ २४३ ॥
मिथ्यादर्शनयोगें पायांनीं गिरिशिरावरी जाती ।
तेथुनि पडती त्यांना मोक्षाची हो कदापि न प्राप्ति ॥ २४४ ॥
पाण्यांत अग्निमध्यें पतनीं जे मानिती महाधर्म ।
ते मूढ कुगतिमध्यें फिरती त्यांना मिळे कसें शर्म[10] ॥ २४५ ॥
रौद्रार्तध्यानी जो अभिलाषी सर्वदा कुकर्मरत ।
मोक्षोपायविरोधें वागे दुर्गति धरी तया सतत ॥ २४६ ॥

---

१ जितेंद्रियता. २ सुख. ३ सेवा, शेती आदिककार्य. ४ धार काढणें. ५ संसाररोग. ६ विकत घेणें व विकणें. ७ सुगंध उटी अंगाला लावणें. ८ कुपात्रा. ९ पाखंडीमूढता, लोकमूढता राहते. १० सुख.

( सम्यग्दृष्टि व मिथ्यादृष्टि यांच्यातलें अंतर. )

मिथ्यादृष्टि असून हि साधु असाधूस दान जो देतो ।
तो धर्मबुद्धिमानव अविपुलफलदायि[1] पुण्य करि घेतो ॥ २४७ ॥
त्या धर्माचें फल जरि भोगी स्वर्गांत परि सुदृष्टीशीं ।
त्याचीं लक्षांशेंही तुलना होई न वाटते मजशी ॥ २४८ ॥
उत्तम सम्यग्दर्शन धारण करिती प्रशस्त मानव जे ।
श्रेष्ठामर ते होती ज्यांचें सुतपांत निरत मन साजे ॥ २४९ ॥
कुतपा तीव्र करून हि कुलिङ्ग मिथ्यात्वयुक्त मानव तो ।
होऊन अमर-किंङ्कर हीनफलांनाच सतत तो वरितो ॥ २५० ॥
सम्यग्दृष्टि असे जो नर सुरभव सात आठ भोगून ।
श्रीजिनदीक्षा घेउनि कर्मक्षय करुनि मिळवि निर्वाण ॥ २५१ ॥
सर्वज्ञवीतरागें दाखविला मार्ग विषयमूढास ।
न रुचे न स्वीकारी मिथ्यात्वाचा बनून तो दास ॥ २५२ ॥

( मोहानें प्राप्त होणाऱ्या आपत्ति. )

आशापाशें बान्धुनि तृष्णाकारागृहांत[2] मोह तया ।
पातकवेड्या ठोकुनि नेतो तन्मनिं वसे न लवहि दया ॥ २५३ ॥
रसनस्पर्शनविषयीं दुःखसुखांचा धरून अभिमान ।
नानादीनप्राणी करिती ते क्लेशराशि नित सहन ॥ २५४ ॥
प्राणी मरणा भीतो सुटका त्याची न होय त्यांतून ।
इच्छी सन्तत सौख्या लाभ तयाचा कदापि हो त्या न ॥ २५५ ॥
विफल अशा भयकामा वश होउनि जीव विफलसन्तापा ।
पावे उपाय त्याला न सुचे परि तो करी महापापा ॥ २५६ ॥
होउनि आशावश बहु भोगाया भोग इच्छितो स्वमनीं ।
परि नच धर्मी तत्पर होतो तो होय मात्र पापधनी ॥ २५७ ॥
होउनि सङ्क्लेशानलसन्तप्त करी अनेक आरम्भ[3] ।
प्राप्त द्रव्य न झालें केले जरि ही तदर्थ बहु दम्भ[4] ॥ २५८ ॥
होतें समीप परि जें धन तेंही लुटुनि नेति चोरगण ।
प्राप्त न नवधन होतें होतो तो जीव तेधवा अधन ॥ २५९ ॥

---

१ विशालफल देणारें पुण्य. २ आशारूपी कैदखान्यांत. ३ सेवा, शेतकीं, व्यापार आदिक. ४ कपट.

पूर्वीच्या पापाच्या उदयें इच्छित मिळे न धन जीवा ।
होतो अनर्थ मोठा सङ्क्लेशाच्या मनांत धरि भावा ॥ २६० ॥
हें मी केलें हें मी करीत आहे करीन मी पुढती ।
ऐसा विचार असतां करित यमग्रास मर्त्य हे होती ॥ २६१ ॥
केलें मनुजें किंवा नाहीं निजकार्य मृत्यु नच पाही ।
सिंह जसा हरिणावरि घाला घाली नरावरी तोही ॥ २६२ ॥
अहितीं हित दुःखीं सुख अनित्य कार्यांत नित्य मति होते ।
जे भयकर ते रक्षक मानिति विपरीतबुद्धि मानव ते ॥ २६३ ॥
विस्तीर्णमोहसागरिं कुटुम्बचिखलांत बुडुनि मानव हा ।
भोगी दुःखा जैसा अतिदुर्बल वैल सडुनि मरण पहा ॥ २६४ ॥
भार्यास्तम्भीं झाला नरगज हा बद्ध दुःख बहु भोगी ।
नरमत्स्य बन्ध भोगी होउनि विषयामिषांत[1] अनुरागी ॥ २६५ ॥
बेड्यांचें यदि बन्धन तुटून होणें विमुक्त नच कठिण ।
अन्ध अशा कूपांतुनि पडणें बाहेर कठिण नच जाण ॥ २६६ ॥
जो स्नेहाच्या पाशें झालासे बद्ध तो तयांतून ।
सुटणें अतिशय कठिनचि ऐसें रामा मनांत तूं जाण ॥ २६७ ॥
या नरलोकीं होणें रत्नत्रयलाभ हें असे कठिन ।
परि तो भव्यां होतो न हो अभव्यास हें मनीं आण ॥ २६८ ॥
कर्मकलङ्कें लिप्तचि अभव्य असतात सर्वदा मान ।
भवचक्रावरि होउनि फिरती आरूढ त्या विसावा न ॥ २६९ ॥

( केवलींना रामचंद्र मी भव्य आहे कां हें सांगा असा प्रश्न विचारतात.)

ऐकुनि केवलिवचना करयुग जोडून राम त्या वदले ।
भगवन् भव्य असे कां मी हें वा नच कथा मला सगळें ॥ २७० ॥
मी कोणत्या उपायें कर्मक्षय करुनि मुक्त होईन ।
सांगा मजला नाथा ! तव भक्तिवशें तरून जाईन ॥ २७१ ॥
या सगळ्या पृथ्वीला तैसें अन्तःपुराहि त्यागीन ।
परि मी सौमित्रीला समर्थ सोडावया न होईन ॥ २७२ ॥
स्नेहाच्या मनिं माझ्या लहरी अत्यन्त सर्वदा उठती ।
मम रक्षण त्यापासुनि नाथ करा आपुल्या पदीं विनति ॥ २७३ ॥

---

१ पञ्चेन्द्रियांच्या विषयरूपी मांसांत.

भगवन्त श्रीरामा वदले शोका करूं नकोस मनीं ।
बलदेववैभवाला भोग नराधीश पाळ ही अवनि ।। २७४ ।।
स्वर्गांत इन्द्र ज्यापरि राज्यरमा सुचिरकाल पाळून ।
घेशिल जिनदीक्षा तूं तुजला उपजेल केवलज्ञान ।। २७५ ।।
ऐकुनि केवलिभाषित राममनाला प्रमोद बहु झाला ।
नेत्र प्रफुल्ल झाले प्रसन्नता येइ वदनकमलाला ।। २७६ ।।
तद्भविं मुक्तिरमापति होइल हें वचन राम ऐकून ।
'जिनदास' सर्व झाले देवासुरमनुज विस्मयें पूर्ण ।। २७७ ।।
केवलिरविप्रकाशित[1] वार्ताकमल[2] प्रफुल्ल पाहून ।
सर्वसुरासुर झाले हर्षित मुनिभाषणा प्रशंसून ।। २७८ ।।

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे रामधर्मश्रमणाभिधानं नाम पञ्चोत्तरशतं पर्व ।। १०५ ।।

१ केवलज्ञानीरूपी सूर्यानें खुललेले. २ कथारूपी कमल हें विकसित झालेलें.

# एकशेसहाव्या पर्वांतील कथासारांश.

बिभीषणानें हात जोडून सकलभूषण केवलींना वंदन करून म्हटलें— प्रभो ! श्रीरामचंद्रांनीं पूर्वजन्मीं कोणतें पुण्य केलें होतें ज्यामुळें त्यांची जगभर महापुरुष म्हणून प्रसिद्धि झाली आहे. तसेंच रावण मोठा विद्वान्, धर्माधर्माचा विचार करणारा असूनही दण्डकारण्यांत राम-लक्ष्मण सीतेसह आले असतां सीतेचें हरण करून त्यानें तिला लंकेला नेलें, तो असा मोही कसा बनला ? याचें कारण मला सांगा. लक्ष्मणानें प्रबल अशा रावणाला ज्यानें त्रिखण्ड वश केलें होतें कसें बरें मारिलें ? या सर्व प्रश्नांचा खुलासा आपण करावा अशी विनंति आहे.

यानन्तर सकलभूषण केवलींनीं रामादिकांच्या पूर्वभवांचें वर्णन याप्रमाणें केलें :—

या जम्बूद्वीपांत भरतक्षेत्रीं 'क्षेत्रक' नावाच्या गांवीं नयदत्त व सुनन्दा हे श्रेष्ठी व श्रेष्ठिनी– अर्थात् पतिपत्नी राहत होते. त्यांना धनदत्त व वसुदत्त असे दोन पुत्र झाले. वसुदत्ताच्या ब्राह्मणमित्राचें नांव यज्ञबलि असें होतें.

याच गांवांत सागरदत्त नांवाचा व्यापारी आपल्या मणिप्रभा पत्नीसह आनन्दानें राहत होता. त्याला गुणवती व गुणवन्त अशीं दोन अपत्यें झालीं. गुणवन्त हा बुद्धिमान व व्यवहारचतुर होता. गुणवन्तानें बापाच्या विचाराला अनुसरून आपली बहीण धनदत्ताला द्यावयाचें ठरविलें.

याच गांवांत श्रीकान्त नांवाचा व्यापारी होता. तो श्रीमन्त होता. धनदत्त तसा श्रीमन्त नव्हता त्यामुळें गुणवन्तानें आपल्या बहिणीचा विवाह श्रीकान्ताबरोबर करण्याची खटपट चालविली. ही वार्ता वसुदत्ताला समजली. श्रीकान्त एकेवेळीं रात्रीं बगीचांत बसला होता, यज्ञबलीच्या सल्ल्यानें वसुदत्त निळें वस्त्र आपल्या सभोंवती

गुंडाळून तेथें गेला व श्रीकान्त असावध आहे असें पाहून त्याच्यावर त्यानें तरवारीचा वार केला. तोही तत्काल सावध झाला. त्यानेंही वसुदत्तावर वार केला व ते दोघेही मरण पावले. व विन्ध्य पर्वतांत ते दोघे हरिण होऊन जन्मले. तेथेंही एकमेकांशीं लढून मरण पावले.

इकडे कांहीं दुष्ट लोकांनीं विरोध केल्यामुळें गुणवतीचा विवाह त्याच्याशीं झाला नाहीं. दुर्मरणानें भाऊ मेला व गुणवतीचीही प्राप्ति झाली नाहीं म्हणून धनदत्तानें तें गांव सोडलें.

धनदत्ताची प्राप्ति न झाल्यामुळें त्या कन्येनेंही कोणाला वरलें नाहीं. गुणवतीच्या ठिकाणीं मिथ्यात्वाचा तीव्र उदय असल्यामुळें ती जैनसाधूंचा द्वेष करीत होती. आयुष्यांतीं मरण पावून ती वनांत हरिणी झाली. त्याच वनांत वसुदत्त व श्रीकांत हे हरिण झाले होते. त्या हरिणीला पाहून ते दोघे हरिण तिच्या अभिलाषानें लढून मरण पावले व डुक्कर होऊन जन्मले. तदनंतर ते हत्ती, रेडे, बैल, लांडगे, वानर, वाघ व रुरू होऊन आपसांत वैरामुळें लढून मरण पावले. याप्रमाणें त्यांचे संसारांत जन्म-मरण होऊ लागले.

इकडे वियोगदुःखानें धनदत्तानें तें गांव सोडलें व प्रवासानें थकून रात्रीं जैनमुनींच्या आश्रमांत येऊन त्यानें एका जैनसाधूला पाणी मागितलें. साधु म्हणाला— " हे पथिका, रात्रीं पाणीच काय तर अमृत मिळालें तरीही पिऊ नये. रोग्यानेंही अशा रात्रीच्यावेळीं अन्नपाणी घेणें योग्य नाहीं. यास्तव यावेळीं पाणी पिऊ नये." साधूचा उपदेश ऐकून तो शांत झाला व त्यानें अहिंसादिक पांच अणुव्रतें धारण केलीं. प्राण्याविषयीं मनांत दयाभाव उत्पन्न झाला. आयुष्यांतीं अणुव्रतपालनामुळें सौधर्मस्वर्गांत तो जन्मला. तेथें दिव्यसुखानुभव घेऊन मरण पावला.

तो महापुर नामक नगरांत मेरु व धारिणी यांना पुत्र झाला. त्याचें नांव पद्मरुचि होतें. या नगराचा छत्रच्छाय नामक राजा होता. त्याच्या राणीचें नांव श्रीदत्ता असें होतें.

एके दिवशीं पद्मरुचि घोड्यावर बसून गोठ्याकडे गेला. तेथें त्यानें वृद्ध व अशक्त बैल मरणाच्या पंथाला लागलेला पाहिला. त्यानें घोड्यावरून उतरून त्याच्या कानीं पञ्चनमस्कार सांगितला. त्या बैलानें तो ऐकत ऐकत प्राण सोडले, व तो

श्रीदत्ताराणीच्या गर्भांत आला. जन्मल्यावर त्याचें राजा-राणीनें वृषभकेतु असें नांव ठेविलें. त्याला थोर झाल्यावर पूर्वजन्मस्मरण झालें. तो नेहमी पञ्चनमस्कारमंत्रांचें स्मरण करीत असे.

एके दिवशीं तो राजपुत्र फिरत फिरत बैल मेलेल्या प्रदेशांत आला. तो पाहून त्याला आपल्या मागील अवस्थेचें स्मरण झालें. ज्यानें माझ्यावर उपकार केले त्याचें दर्शन केव्हां होईल अशी त्याला चिंता उत्पन्न झाली. त्याचें दर्शन होण्याचा उपाय त्याला सुचला. त्यानें एक भव्य जिनमंदिर बांधविलें. त्यांत भिंतीवर अनेक प्रसंगाचीं चित्रें काढलीं होतीं. व दरवाज्याजवळ एक मनुष्य बैलाच्या कानीं पञ्चनमस्कार देत आहे असें चित्र रेखाटलें व त्या चित्राजवळ आपले नोकर त्यानें बसविले. व जो एथें येऊन हें चित्र पाहून विस्मित होईल त्याची वार्ता मला येऊन कळवावी असें.त्यानें त्यांना सांगून ठेवलें होतें. नवीन जिनमंदिराचें दर्शन घेण्यासाठीं 'पद्मरुचि' श्रेष्ठी आले. तें चित्र पाहून ते विस्मित झाले. टक लावून तें पाहत असतां नोकरांनीं राजपुत्राला ही वार्ता सांगितली. तत्काल राजपुत्र हत्तीवर बसून तेथें आला. हाच माझा समाधिदाता आहे असें राजपुत्राला वाटलें. विनयानें त्यानें श्रेष्ठीला नमस्कार केला. व "ज्याच्या कानीं आपण पञ्चनमस्कार सांगितला तोच बैल आतां राजपुत्र झाला आहे. आपण माझ्यावर महोपकार केला म्हणून त्यानें त्याच्या चरणांची पूजा केली. व मला मनुष्यजन्म प्राप्त करून दिला हा माझ्यावर फार मोठा उपकार आहे. या उपकाराची फेड होणें शक्य नाहीं. मला आपण आज्ञा देऊन चरणकिङ्कर करावें. हें माझें राज्य आपलेंच आहे." असें म्हणून त्यानें राजसिंहासनावर श्रेष्ठीला बसविलें व दोघांनीं दीर्घकाल राज्य केलें. दोघांनीं गृहस्थधर्माचें पालन केलें. आयुष्यांतीं मरून ऐशानस्वर्गांत महर्द्धिक देव झाले.

स्वर्गांतील आयु संपल्यावर पद्मरुचीचा जीव विजयार्ध पर्वतावरील नन्द्यावर्तनगरीं नन्दीश्वरराजा व कनकाभाराणी यांना 'नयनानन्द' नामक पुत्र झाला. दीर्घकालपर्यंत विद्याधरवैभवाचा अनुभव घेऊन त्यानें दीक्षा घेतली. बारा प्रकाराचें तप करून चौथ्या स्वर्गांत जन्मला. तेथील सुखानुभव घेऊन आयुष्यांतीं मरण पावून क्षेमानगरींत राजा विपुलवाह व पद्माराणी या उभयतांना 'श्रीचन्द्र' नामक पुत्र झाला. त्यानें अनेक राजांना जिंकून अनेक देशाधिपतित्व प्राप्त करून घेतलें. एकेवेळीं समाधिगुप्तमुनि उद्यानांत आले होते. त्यांचा उपदेश ऐकून श्रीचन्द्र विषयविरक्त झाला. त्यानें 'धृतिकान्त' नामक पुत्राला राज्य दिलें व मुनीश्वराजवळ दीक्षा घेऊन

घोर तप केलें व समाधिमरणानें तो ब्रह्मस्वर्गांत ब्रह्मेन्द्र झाला. तेथील आयुष्य संपल्यावर ब्रह्मेन्द्र दशरथपुत्र रामचन्द्र झाला. याप्रमाणें सकलभूषण केवलींनीं रामचन्द्राचे पूर्वभव सांगून नंतर लक्ष्मण व रावण यांच्या भवाचें याप्रमाणें वर्णन केलें.

मृणालकुण्ड नामक नगरांत विजयसेन राजा व राणी मणिचूला या उभयांना वज्रकम्बु नामक पुत्र झाला. तरुण झाल्यावर याचा विवाह हेमवती राजकन्येबरोबर झाला. या दंपतीला शम्भु नामक पुत्र झाला. हा मोठा पराक्रमी होता.

श्रीभूति नामक सम्यग्दृष्टि व तत्त्वज्ञ पुरोहिताला गुणवती नावाची अतिशय सुंदर कन्या होती. ही मागील जन्मीं हत्तीण होती. एकदा गंगेच्या तटावरील गाळांत ती फसली. त्यांतून तिला बाहेर येणें शक्य झालें नाहीं. तिला आसन्नमरणावस्था प्राप्त झाली. त्यावेळीं 'तरङ्गवेग' नामक विद्याधरानें पञ्चनमस्कार मंत्र तिच्या कानीं सांगितला. तो ऐकत तिनें प्राण सोडला. व ती श्रीभूतीची कन्या 'गुणवती' होऊन जन्मली.

एके वेळीं श्रीभूतिपुरोहिताच्या घरीं आहारार्थ जैनसाधु आले होते. त्यांचा तिनें उपहास केला. पुरोहितानें, साधूंचा उपहास करणें पापाला कारण होतें असें सांगून त्यापासून तिला परावृत्त केलें.

या कन्येबरोबर विवाह करण्यास अनेक राजे इच्छित होते. त्यांत शंभू राजपुत्र तिच्याशीं विवाह करण्याला अतिशय उत्सुक होता. परंतु श्रीभूतिपुरोहित कुबेरासारखें वैभव असलेल्या मिथ्यादृष्टीला आपली कन्या देण्यास इच्छित नव्हता— नव्हे त्यानें तशी प्रतिज्ञाच केली होती. ही प्रतिज्ञा ऐकून शम्भुकुमार राजपुत्र फार चिडला. व त्यानें पुरोहिताचा रात्रीं वध केला. जिनधर्माच्या सेवनानें तो स्वर्गांत देव झाला.

पुरोहितकन्या शम्भूबरोबर विवाह करण्यास इच्छित नव्हती. शेवटी शम्भुकुमारानें तिच्यावर बलात्कार केला. तेव्हां ती अतिशय रागावून—"नराधमा, माझ्या पित्याला मारून माझें शील नष्ट केलेस. मी तुझा नाश केल्याशिवाय राहणार नाहीं." असें बोलून ती हरिकान्ता नामक आर्यिकेजवळ गेली व दीक्षा घेऊन आर्यिका झाली. तपश्चरण करून ती ब्रह्मस्वर्गांत देवी झाली.

इकडे शम्भुकुमारही अनेक भव फिरून प्रभासकुन्द नामक ब्राह्मणपुत्र झाला. विचित्रसेनमुनिजवळ दीक्षा घेऊन त्याने 'कनकप्रभ' नामक विद्याधराचें वैभव

पाहिलें व मला असें वैभव मिळावें असें निदान केलें. व मरण पावून तिसऱ्या स्वर्गांत तो देव झाला. तेथील सुखें भोगून तो रत्नश्रवा आणि केकसी यांचा पुत्र रावण झाला. तो त्रिखण्डाधिपति झाला.

पूर्वी जो धनदत्ताचा भाऊ वसुदत्त होता तोच मरून कांही भवांनीं श्रीभूतिपुरोहित झाला. शम्भुकुमारानें त्याला ठार मारल्यावर तो स्वर्गांत जन्मला व नंतर दशरथमहाराजाचा पुत्र लक्ष्मण होऊन जन्मला. हा आठवा नारायण होय.

जो प्रथम श्रीकांत, नंतर शम्भुकुमार व प्रभासकुन्द झाला तोच आठवा प्रतिनारायण रावण झाला.

जी प्रथमतः श्रीभूतिपुरोहिताची कन्या होती ती नंतर स्वर्गसुख भोगून जनकराजाची कन्या सीता झाली, जो गुणवतीचा भाऊ होता तोच जनकराजाचा पुत्र भामण्डल अर्थात् सीतेचा भाऊ झाला.

जो पूर्वी यज्ञबलि नामक ब्राह्मणपुत्र होता तोच पुढें बिभीषण– रावणाचा बंधु झाला. वृषभकेतुराजा सुग्रीव झाला.

याप्रमाणें सर्वांचीं चरित्रें सांगितल्यानंतर बिभीषणानें वालीचें पूर्वभवचरित्र विचारिलें. केवलींनीं याप्रमाणें तें सांगितलें:—

पूर्वी वृन्दावनांत एक कृष्णमृग– काळवीट राहत होता. मरणसमयीं त्याला मुनींनीं पञ्चनमस्कार मंत्र दिला व तो हरिण मरून ऐरावतक्षेत्रांत दितिस्थान नामक नगरांत विहित पिता व शिवमति माता यांच्या उदरीं मेघदत्त नामक पुत्र झाला. यानें सम्यग्दर्शनासह अणुव्रतें धारण केलीं व समाधिमरणानें मरून ऐशानस्वर्गांत तो देव झाला. स्वर्गीय आयुष्य संपल्यावर सुमत्तकोकिल नगरांत कान्ताशोक व रत्नाकिनी या जोडप्यांना सुप्रभ नामक पुत्र झाला.

हा सुप्रभ जिनपूजादानादिकांत तत्पर राही. धर्मबंधुविषयीं तो वत्सल होता. पुढें वैराग्यानें दीक्षा घेऊन हजारो वर्षें तप केलें. तपःप्रभावानें अनेक ऋद्धि त्याला प्राप्त झाल्या होत्या. समाधिमरणानें मरून तो सर्वार्थसिद्धांत अहमिन्द्र झाला. यानंतर हा वालिविद्याधर झाला. यानें रावणाला नमस्कार केला नाहीं. रावणाशीं विरोध झाल्यावर त्यानें आपल्या सुग्रीव भावाला राज्य दिलें व मुनि होऊन तप केलें. सर्व कर्मांचा नाश करून मुक्तिसुख प्राप्त करून घेतलें. श्रीकान्त, वसुदत्त यांनीं वैरानें

अनेक भवांत एकमेकांचा वध केला. गुणवतीच्या भवांत शम्भुकुमाराच्या मनांत तिच्याविषयीं प्रेम होतें. त्या प्रेमप्रकर्षानें रावणानें सीतेचें हरण केलें.

श्रीभूतिपुरोहित जो किं शम्भुराजपुत्राकडून मारला गेला होता. तो स्वर्गांत देव झाला होता. तेथून प्रतिष्ठानगरांत वसु नामक राजा झाला. त्या भवांत मुनि होऊन निदानपूर्वक तप त्यानें केलें. सानत्कुमार स्वर्गांत महर्द्धिक देवपद त्याला मिळालें. व तेथून तो दशरथराजाचा दुसरा पुत्र लक्ष्मण झाला. वसुदत्ताच्या भवापासून श्रीकांताबरोबर वैर होतें. तो श्रीकांत रावण झाला. वसुदत्त लक्ष्मण होऊन जन्मला. सीतेला हरून नेल्यानंतर रावणाबरोबर लक्ष्मणाचें युद्ध होऊन त्यांत रावण लक्ष्मणाकडून मारला गेला.

गुणवतीच्या भवांत सीतेनें मुनिवर आळ घेतला होता. त्यामुळें रामचन्द्रांनीं लोकापवादाला भिऊन तिचा त्याग केला.

मांडलिक नामक गावीं बगीचांत सुदर्शन नांवाचे मुनि आले होते. त्यांची बहिण सुदर्शना तिच्याबरोबर ते भाषण करीत असतांना गुणवतीनें पाहिलें व हा साधु एकांतस्थानीं सुंदरशा स्त्रीला घेऊन बसला होता असा आळ घेतला. त्यामुळें लोकांनीं अनादर केला. तेव्हां माझ्यावरचा आळ जेव्हां दूर होईल तेव्हांच मी आहार घेईन अशी प्रतिज्ञा केली व ते कायोत्सर्गतत्पर झाले. देवीच्या कोपानें तिचें तोंड सुजलें. तेव्हां मी आळ घेतला असें वेदवतीनें म्हटलें हे दोघे भाऊ–बहिण आहेत. जनहो, या मुनिवर्याचा आपण पूर्वीप्रमाणें आदर करा असें लोकांना तिनें सांगितलें. असा आळ घेतल्यामुळें सीतेच्या भवांत तिला निर्वासन दुःख भोगावें लागलें. याप्रमाणें हें सर्वांचें चरितवर्णन ऐकून श्रीरामचन्द्रादिकांनीं केवलींना वंदन करून गुणस्तुति केली.

# एकशेसहावें पर्व.

[ श्रीराम, लक्ष्मण, रावण आदिकांचें चरित्र सांगा अशी
बिभीषणानें सकलभूषण केवलीना विनंती केली. ]

श्रेष्ठ बिभीषण खगवृन्दामधिं करयुग जोडून ।
सकलभूषणा वन्दुनि वदला विनम्र होऊन ॥ १ ॥
भगवन् रामें पुण्य पूर्वभवि केलें वद काय ।
जेणें ऐसें महत्त्व त्याचें प्रथित जगीं होय ॥ २ ॥
याची पत्नी साध्वी सीता दण्डक घोरवनीं ।
कवण्यादोषें हरुनी रावण नेई निजसदनीं ॥ ३ ॥
धर्म नि अर्थ नि कामसुमोक्ष नि चारी पुरुषार्थी ।
शास्त्रज्ञाता कार्याकार्यी विवेक ज्या साथी ॥ ४ ॥
धर्माधर्मी करुनि विचारा निर्णय जो देई ।
सद्गुणभूषणरावण झाला कैसा तो मोही ॥ ५ ॥
परललनेच्या लोभाग्नीमधिं[1] शलभासम[2] झाला ।
कैसा याचें कारण नाथा बोला आम्हाला ॥ ६ ॥
भावावरती प्रेम जयाचें अतिशय दृढ होतें ।
लक्ष्मण ऐसा श्रीरामासह येई विपिनातें ॥ ७ ॥
युद्धीं त्यानें प्रबल रावणा कैसें मारियलें ।
जो विद्याधर-महेश ज्यानें त्रिखण्ड वश केलें ॥ ८ ॥
बिभीषणाच्या या प्रश्नाचें उत्तर भगवन्तें ।
दिधलें कथिलें पूर्वभवांच्या तीव्रद्वेषातें ॥ ९ ॥

[ सकलभूषणकेवलींनीं श्रीरामादिकांच्या पूर्वभवांचें वर्णन याप्रमाणें केलें. ]

जम्बूद्वीपीं भरतक्षेत्रीं 'क्षेत्रक' नगरांत ।
श्रेष्ठी राहत होता नामें जो श्रीनयदत्त ॥ १० ॥
त्याला नन्दा भार्या होती सुपुत्र 'धनदत्त' ।
दुसरा झाला तनय तयांना नामें 'वसुदत्त' ॥ ११ ॥

---

१ लोभरूप अग्नींत. २ दिव्यावर झडप घालणारा किडा.

वसुदत्ताचा मित्र ब्राह्मण होता यज्ञवली ।
या सकलांना शैशव[1] सम्पुनि तरुणदशा आली ।। १२ ।।
त्याच पुरामधिं राहत होता दुसरा व्यापारी ।
नाम तयाचें सागरदत्त नि होता सुविचारी ।। १३ ।।
'मणिप्रभा' हें नाम जियेचें ऐशी त्या भार्या ।
कन्या झाली गुणी 'गुणवती' रूपवती उभयां ।। १४ ।।
नन्तर झाला तनय तयांना नामें 'गुणवन्त'।
आज्ञाधारक जो व्यवहारीं होता धीमन्त[2] ।। १५ ।।

[ धनदत्ताला गुणवंत गुणवती बहिण देण्याचें ठरवून नंतर श्रीकांताला द्यावयाचा विचार करितो. ]

एके समयीं जनकमनोगत जाणुनि गुणवन्तें ।
धनदत्ताला भगिनी अपुली दिली तयें मुदितें ।। १६ ।।
दुसरा होता त्याचपुरामधिं नामें 'श्रीकान्त'।
धनिक तियेच्या रूपा पाहुनि इच्छी तिज सतत ।। १७ ।।
परि धनदत्तापाशीं होतें अतिशय अल्पधन ।
श्रीकान्ताला द्याया झाला उद्यत गुणवान ।। १८ ।।
भावावरती वसुदत्ताचें प्रेम असे अमित ।
गुणवन्ताचें कळलें त्याला हृदयस्थाकूत[3] ।। १९ ।।
यज्ञवलीचा सल्ला घेउनि उद्यत माराया ।
श्रीकान्ता वसुदत्त जहाला गुप्त तया ठाया ।। २० ।।

[ वसुदत्त व श्रीकांत अन्योन्याला मारून संसारांत फिरतात.]

अन्धारामधिं वस्त्र निळें तो गुंडाळुनि घेई ।
होउ न देतां पादध्वनि[4] ही उद्यानीं जाई ।। २१ ।।
असावधान श्रीकान्ताला तेथें पाहून ।
वार तयाच्यावरती केला निर्दय होऊन ।। २२ ।।
श्रीकान्तेंही तरवारीनें वार तदा केला ।
अन्योन्याच्या आघातानें प्राण तदा गेला ।। २३ ।।
विन्ध्यवनामधिं दोघेही ते हरिण तदा झाले ।
अन्योन्यातें पाहुनि करिती रुधिरारुण डोळे ।। २४ ।।

---

१ बालपणा. २ बुद्धिमान्. ३ मनांतला अभिप्राय. ४ पायाचा आवाज.

दुष्टजनांनीं धनदत्ताला कन्या द्यायास ।
विरोध केला निमित्त न लगे दुर्जनकार्यास ॥ २५ ॥
[ गुणवती धनदत्तालाही वरीत नाहीं व ती मरून हरिणी होते.]
दुर्मरणानें भाऊ मेला कन्यालाभ हि न ।
धनदत्तानें केलें दुःखें अन्यत्र भ्रमण ॥ २६ ॥
धनदत्ताची प्राप्ति न झाली म्हणून बाला ही ।
खिन्न जहाली तिनें न वरिलें अन्या कोणाही ॥ २७ ॥
ती मिथ्यात्वी सुतीव्र होतीं निरम्बरीं[१] रोष ।
करी सदोदित तया शिव्यांचा चाले जयघोष ॥ २८ ॥
श्रद्धा नव्हती श्रीजिनशासनिं लेशहि गुणवतिची ।
मिथ्याधर्मीं तत्पर राही महिमा कर्माची ॥ २९ ॥
आयुष्यान्तीं तत्पर राहुनि आर्तध्यानांत ।
मेली झाली हरिणी मृगयुग[२] राहे वनिं जेथ ॥ ३० ॥
हरिणीसाठीं मृगयुगलामधिं वैर प्रगटून ।
लढुनी मेले सूकर झाले करिति भवीं भ्रमण ॥ ३१ ॥
हत्ती रेडे बैल नि वानर वृक आणि व्याघ्र ।
रुरू असे युग जन्मे लढुनी ते मरती शीघ्र ॥ ३२ ॥
अनुसरुनी ते वैरा उत्कट जलीं स्थलीं भ्रमती ।
पापें यापरि संतत चाले त्यांची जन्ममृति ॥ ३३ ॥
[ धनदत्तानें रात्रीं भोजन त्याग करून अणुव्रतें घेतलीं.
व प्रथमस्वर्गीं देव झाला. ]
विरहें दुःखी मार्गीं चालुनि थकला धनदत्त ।
सूर्यास्तावरि गेला श्रमणाश्रमिं[३] तो वहु तृषित ॥ ३४ ॥
झालों तृष्णातुर मी अतिशय द्या मज जल प्याया ।
सुकृती आपण परोपकारी आहा मुनिवर्या ॥ ३५ ॥
ऐसें वदतां एक मुनीश्वर मधुर असे वदले ।
अमृत पिणें ही योग्य न रात्रीं वद मग जल कसलें ॥ ३६ ॥
सूक्ष्मस्थूलहि जन्तु न दिसती रात्रौ नयनास ।
पापा कारण हो जलपानहि ऐशा समयास ॥ ३७ ॥

---

१ दिगंबर जैनसाधूवर. २ दोन हरिण. ३ दिगंबर मुनींच्या निवासस्थानीं.

रोग्यानें ही भद्र विकालीं भोजन जलपान ।
करणें योग्य न हा तूं हृदयीं भाव असा आण ॥ ३८ ॥
पूत अशा या उपदेशातें ऐकुनि तो शान्त ।
अल्पशक्तिधर धारण करि मग अणुव्रतव्रातं ॥ ३९ ॥
हृदयीं उपजे त्याच्या प्राण्याविषयिं दयाभाव ।
आयुष्यान्तीं प्रथमस्वर्गीं झाला शुभ देव ॥ ४० ॥
मुकुट नि कुण्डल मौक्तिकमाला अङ्गद केयूर ।
भूषणवृन्दें या तो शोभे सुरलोकांत सुर ॥ ४१ ॥
कृतसुकृताच्या उदयें देवस्त्रीसुखसेवेंत ।
हर्ष जहाला इन्द्रासम त्या स्वर्गीं अपरिमित ॥ ४२ ॥
[ पद्मरुचिश्रेष्ठीनें बैलाला पंचनमस्कार दिला. तो बैल मरून राजपुत्र झाला.]
तेथून च्युत होउनि सुर तो महापुराख्यपुरीं ।
मेरुधारिणी यांना झाला सुत उपकृतिकारी ॥ ४३ ॥
नाम ' पद्मरुचि ' जिनगुरुशास्त्रीं विशेषरुचि ज्याची ।
वाढुनि झाला युवा क्रमें तो जैनागम वाची ॥ ४४ ॥
त्या नगरीचा भूपति छत्रच्छाय सुनामाचा ।
श्रीदत्ता त्या सुन्दरराणी मधुर जिचीं वाचा ॥ ४५ ॥
एके दिवशीं बसुनि हयावरि जाई गोठ्यांत ।
पाही भूवरि वृद्ध नि दुर्बल बैला तो तेथ ॥ ४६ ॥
आसन्ना मृति त्याची पाहुनि खालीं उतरून ।
कानीं त्याच्या पञ्चनमस्कृति देई तो सुजन ॥ ४७ ॥
ऐकत ऐकत त्या बैलानें निजदेह त्यजिला ।
श्रीदत्तेला वृषभध्वज या नामें सुत झाला ॥ ४८ ॥
राजा झाला प्रमुदित अतिशय पाहुनि पुत्रमुखा ।
उत्सववाद्यें नगरीं वाजति पार न पौरसुखा ॥ ४९ ॥
शुभकर्माच्या उदयें झालें पूर्वभवस्मरण ।
त्याचें झालें गोवहुदुःखा जाणुनि सदय मन ॥ ५० ॥

---

१ सूर्योदयानंतर व सूर्यास्तापूर्वी आहार घेणें पाणीं पिणें हा काल होय याला सोडून अन्यकालाला विकाल म्हणतात. २ अहिंसादि अणुव्रतांचा समूह. ३ घोड्यावर. ४ जवळ आलेलें मरण. ५ बैलाचें मोठें दुःख.

पञ्चनमस्कृति मन्त्रा सन्तत बालक तो वाही ।
ज्याच्या सुन्दर देहा जनता नयनें नित पाही ॥ ५१ ॥
नरपतिसुत तो विहरत आला बैल जिथें मेला ।
परिचित झाली भूमि नि दिसल्या समस्तगतलीला[1] ॥ ५२ ॥
हत्तीवरुनी नृपसुत उतरुनि दुःखित होऊन ।
जणु बैलाची कुदशा भोगी तन्मय तो बनुन ॥ ५३ ॥
दिधला ज्यानें समाधिमणि[2] मज ऐशा दात्याचें ।
दर्शन होइल केवि उपायें उमजे नच साचें ॥ ५४ ॥

[ वृषभकेतूनें जिनमंदिर बांधवून दरवाजाजवळ
पूर्वजन्म लिहिलेला पट स्थापन केला. ]

यापरि चिन्तित सन्तत असतां उपाय त्या सुचला ।
तेथें बनवी गेह जिनाचें लाजवि जें शैला ॥ ५५ ॥
भिन्तीवरती चरित पुराणें चित्रित बहु केलीं ।
बघतां ज्यांना भक्तिभव्यजन हृदयिं करी केलि ॥ ५६ ॥
स्वभवचित्रपट लिहवुनि त्यानें द्वारीं स्थापियला ।
किङ्कर बघती वाट जयाची मन्त्र जयें दिधला ॥ ५७ ॥
नवजिनगेहीं वैश्यपद्मरुचि श्रीजिन वन्दाया ।
आला हर्षें चित्र बघे तें विस्मित होउनिया ॥ ५८ ॥
अनिमिषलोचन[3] होउनि पाहत असतां पद्मरुचि ।
चित्रा कुतुकें बघत असे कुणि अतिशय ज्यास रुचि ॥ ५९ ॥
वार्ता कथिली भृत्यें जेव्हां ऐशी नृपतनया ।
आला तेथें बसुनि गजावरि धरुनि मनीं विनया ॥ ६० ॥
उतरुनि हत्तीवरुनी शिरला श्रीजिनसदनांत ।
विस्मितनयनें दर्शनिं दिसला तत्पर मेरुसुत[4] ॥ ६१ ॥
हाच असे मम शुभमृति दाता ऐसें जाणून ।
पदयुग नमिले नृपतनयानें विनम्र होऊन ॥ ६२ ॥
सुत मेरूचा बदला मेला बहु दुःखें बैल ।
बदला नृपसुत मीच असे तो तव कौतुकमूल ॥ ६३ ॥

१ पूर्वजन्माच्या दशा. २ उत्तम सुख देणारें रत्न. ३ पापण्या न लवणाऱ्या डोळ्याचा. ४ पद्मरुचि.

मेरुसुताचे पद यजिलें तैं शिष्य जसें गुरुचे ।
नृपतनयानें म्हटलें यापरि कृतज्ञवच साचें ॥ ६४ ॥
मम मृतिसमयीं प्रियभावासम आपण येऊन ।
शुभमृति मजला दिधली यापरि उपकृति करि कोण ॥ ६५ ॥
अमृत शिदोरी समाधि आहे जाया परलोकीं ।
दिली मला ती महोपकृति ही अवर्ण्य[1] अवलोकी ॥ ६६ ॥
तिनें मला हा नरभव लाभे सुतृप्त झालों मी ।
उपकारासम ऐसा दुसरीं नैव वसे नामी ॥ ६७ ॥
जनक नि माता देव सहोदर बान्धव वा कोणी ।
करिति न असलें कार्य प्रियकर अपूर्व तव करणी ॥ ६८ ॥
पञ्चनमस्कृति कानीं देणें याला बदला न ।
चरणभक्त मी उपकृतिभारा अवश्य उतरीन ॥ ६९ ॥
नाथा मजला आज्ञा द्यावी काय करू कार्य ।
देउनि आज्ञा पदरीं भक्ता घेई मज आर्य[2] ॥ ७० ॥
राज्य हि माझें घेई सगळें मी तव पददास ।
इच्छितकार्यी वपु लावी मम हीच मनीं आस ॥ ७१ ॥

[ पद्मरुचि व वृषभकेतु यांत दृढस्नेह उत्पन्न झाला.]

यापरि त्याचें भाषण होउनि निपजे स्नेह दृढ ।
झाली श्रद्धा त्या उभयांची जिनशासनिं गाढ ॥ ७२ ॥
चिरकालावधि उभयें केलें पालन राज्याचें ।
केलें पालन गृहिधर्माचें स्वर्गप्रद साचें ॥ ७३ ॥
श्रीजिनबिम्बें जिनसदनामधिं करुनि स्थापन ते ।
दानें देती त्रिविध सुपात्रां मिळविति पुण्यशतें ॥ ७४ ॥

[ हे दोघे स्नेही गृहिधर्म पाळून ऐशानस्वर्गी जन्मले. ]

आयुष्यान्तीं वृषभध्वजनृप शुभमृतिमरणानें ।
झाला दुसऱ्या स्वर्गी सुन्दर विस्तृतपुण्यानें ॥ ७५ ॥
सुरललनांच्या नयनाम्भोजा[3] प्रफुल्ल करि ज्याची ।
सुन्दर अङ्गद्युति अमरांच्या रमवि मना साची ॥ ७६ ॥

---

१ वर्णन न करता येणारी. २ हे सज्जना. ३ नेत्रकमलांना.

मेरुधारिणीतनय पद्मरुचि मरुनि यथाकालीं ।
शुभमृति साधुनि हो ऐशानीं सुर ज्या विबुधाली[1] ॥ ७७ ॥
भालावरती करयुग जोडुनि नमिती गुणशाली ।
तो सुरललनासह सुखभोगी अनुपम गुणमाली[2] ॥ ७८ ॥
जीवित सरतां च्युत तो होउनि अपरविदेहांत ।
विजयाचलशिरिं नन्द्यावर्ता नामक नगरींत ॥ ७९ ॥
नन्दीश्वर या नामें भूपति कनकाभाराणी ।
पुत्र तयांना झाला 'नयनानन्दक[3]' गुणखाणी ॥ ८० ॥
तेथें खेचरवैभव भोगुनि विस्तृत चिरकाल ।
घेउनि आचरि दीक्षा सुतपा द्वादशविध विमल ॥ ८१ ॥

['नयनानंद' मुनि माहेंद्रस्वर्गांत महर्द्धिकदेव झाले.]

साधुनि शुभमृति आयुष्यान्तीं चतुर्थ सुरलोकीं ।
महर्द्धिकामर तो मुनि झाला चतुर नि सुविवेकी ॥ ८२ ॥
पुण्यलतेचें विपुल सुफल जणु सुन्दर देवसुख ।
भोगी तो सुर सुररमणीसह सन्तत चन्द्रमुख ॥ ८३ ॥
तेथून च्युत नन्तर होउनि मन्दर पूर्वदिशीं ।
क्षेमानगरी असे मनोरम जैसा पूर्णशशी[4] ॥ ८४ ॥
विपुलवाहनृप नयप्रतापें सुराज्य तेथ सुखें ।
पद्माराणीसह करि लज्जित चन्द्रा जी सुमुखें ॥ ८५ ॥
या उभयांना आत्मज झाला नामें श्रीचन्द्र ।
कीर्ति जयाची पसरे भूतलिं दशदिशिं अतिसान्द्र[5] ॥ ८६ ॥
विस्तृतपुण्यें कोश प्रतिदिनिं साधक सौख्याचा ।
वाढे इन्द्रासम की ज्याचा अनुपमसा साचा ॥ ८७ ॥
एका नगरासम शासन मधु पृथ्वीवरि त्याचें ।
चाले होते अनेक आकर[6] सुवर्णरत्नांचे ॥ ८८ ॥
सुरपति जैसा सुराङ्गनासह नाकीं सुख भोगी ।
रतिसमसुन्दर विलासिनीसह भूपति अनुरागी ॥ ८९ ॥

---

१ देवसमूह. २ गुणमाला धारण करणारा. ३ 'नयनानंद' या नांवाचा. ४ चन्द्र. ५ दाट. ६ खाणी.

पुष्कळवर्षें ऐश्वर्याच्या गेलीं भोगांत ।
मोठा कालप्रवाह परि हा सरला वेगांत ॥ ९० ॥
[ श्रीचन्द्रराजाला समाधिगुप्तमुनि धर्मोपदेश करितात. ]
एकेवेळीं नगरीं आले समाधिगुप्तमुनि ।
हर्षित झाले सत्तप पाहुनि ज्यांचें भक्त मनीं ॥ ९१ ॥
उद्यानामधिं आगम जाणुनि आले वन्दाया ।
सकल पौरगण हर्षा स्वमनीं अतिशय धारुनिया ॥ ९२ ॥
जनता असतां करित गुणस्तुति कानीं शब्द पडे ।
कोणाचा हा शब्द घनासम[1] आहे कोणिकडे ॥ ९३ ॥
श्रीचन्द्राच्या प्रश्ना ऐकुनि सचिवें पाठविलें ।
कोण्या मनुजा शोधुनि आम्हा वृत्त कथी सगळें ॥ ९४ ॥
परतुनि येउनि वदला मानव आले मुनिवर्य ।
गाति स्तुति जन शब्द तयांचा आहे भूपार्य ॥ ९५ ॥
वार्ता ऐकुनि नीरजनयना[2] श्रीचन्द्रा मोद ।
झाला अतिशय तो वर्णाया समर्थ नच शब्द ॥ ९६ ॥
स्त्रीपुत्रासह जाउनि पाही श्रीमुनिचन्द्राला ।
वन्दुनि शीर्षें विनयें त्यांच्या सन्निध तो बसला ॥ ९७ ॥
मुनिसूर्याचें दर्शन होतां नृपमुखकमल खुले ।
स्ववेद्य[3] झाला प्रमोद त्याला जो अन्या न कळे ॥ ९८ ॥
आगमचतुरा अतिगम्भीरा वाणी मुनि वदले ।
नृपा सपौरा[4] जीमधिं तात्त्विक चर्चा बहुत खुले ॥ ९९ ॥
गृहिमुनिधर्मा जे संसारोत्तारक[5] ते कथिले ।
करण[6] चरण नि द्रव्य प्रथमहि सगळे श्रुत वदले ॥ १०० ॥
कथा चतुर्विध[7] मुनिवर्यांनीं नृपवर्या कथिली ।
ऐकुनि भूपति हृदया तेव्हां प्रसन्नता आली ॥ १०१ ॥

---

१ मेघाप्रमाणें. २ कमलाप्रमाणें डोळे ज्याचे आहेत असा. ३ स्वानुभवगम्य. इतरांना न जाणतां येणारा. ४ नागरिकासह. ५ संसारांतून काढून मुक्तिसुखीं स्थापन करणारे. ६ करणानुयोग, चरणानुयोग, द्रव्यानुयोग व प्रथमानुयोग असे चार प्रकारचें सम्यग्ज्ञान. ७ संवेजनीकथा— पुण्याचा महिमा दाखविणारी, निर्वेजनी— वैराग्य उत्पन्न करणारी आक्षेपणी जिनमत प्रतिपादन करणारी कथा. विक्षेपणी— कुमताचें खण्डन करणारी कथा.

परमत निरसन करुनी जिनमततत्त्वांचें कथन ।
मुनिवर्यांनीं केलें झालें नृपसंशयहरण ॥ १०२ ॥
भवभ्रमणभय नरपतिमानसिं नन्तर उद्भवलें ।
देहीं भोगीं वैराग्यानें स्थान मनांत दिलें ॥ १०३ ॥
रागी द्वेषी मोही होउनि जीव भवीं धावे ।
मोठ्या कष्टें निर्वाणाच्या मार्गा तो पावे ॥ १०४ ॥
सन्ध्या, फेस नि तरङ्ग, बुद्बुद, वीज नि इन्द्र धनु ।
नश्वर यासम लोक असे ही नश्वर जीवतनु[1] ॥ १०५ ॥
सार शरीरीं एक हि नाहीं सर्व असार दिसे ।
दुःखांनीं हे खालीं वरती भरलें विश्व वसे ॥ १०६ ॥
सात हि नरकीं दुःखचि भरलें पशुगति दुःखमयी ।
तृष्णापीडित होती नरसुर छळि[2] ती प्रतिसमयीं ॥ १०७ ॥
इन्द्रपदाच्या भोगें विभवें तृप्त न जो झाला ।
तुच्छ नृभवभवभोगें[3] होइल तृप्ति कशी त्याला ॥ १०८ ॥
दुर्लभ मिळतां निधि अधनाला होतो मोहित तो ।
विषयास्वादीं लुब्ध प्राणी नरता[4] घालवितो ॥ १०९ ॥
शुष्केन्धन जरि कितिहि मिळालें अग्नि न तृप्त बने ।
नद्युदकांनीं सागर झालों तृप्त असें न म्हणे ॥ ११० ॥
विषयास्वादज सौख्यानुभवें तैशी मनुजा या ।
तृप्ति न होइल कधिंही भूपा अतृप्तता ये या ॥ १११ ॥
उदकीं बुडतां नृमना खेद व्याकुलता येते ।
इन्द्रियलम्पट चतुर नराही मोहितता वरिते ॥ ११२ ॥
तापवि रवि दिनिं मनुजा मन्मथ दिवा नि रजनीं ही ।
छत्र निवारण करी रवीचें मदना नच कांहीं ॥ ११३ ॥
जन्मजरामृति दुःख स्मरतां हृदया भय वाटे ।
घटमालेच्या[5] यन्त्रासम तें फिरतें कर्मशतें ॥ ११४ ॥
यन्त्र अचेतन चालक मिळतां जैसें तें फिरतें ।
वपु ही नाशी पूत[6] न जीवें चालवितां चळतें ॥ ११५ ॥

---

१ शरीर. २ तृष्णा. ३ मनुष्यजन्म उत्पन्न होणाऱ्या भोगांनीं. ४ मनुष्यपणा. ५ रहाटगाडगे. ६ अपवित्र.

ऐसें बघुनि हि या देहावरि करि मनुज स्नेह ।
दुर्गुण बघुनि हि जीव भवीं हे करिती अतिमोह ॥ ११६ ॥
पाण्यावरचा जैसा नाशी बुद्बुद जीवास ।
वपु हि असे ही अवश्य नाशी परि मोहावास ॥ ११७ ॥
विरक्त होउनि मानव सुकुली जिनमार्गा वरिती ।
तपव्रतांना धैर्यें पाळुनि सुगतिस ते भजती ॥ ११८ ॥
उत्साहाचें चिलखत मानव अङ्गीं चढविति जे ।
निश्चय अश्वावरि वसती ते दिसती जणु राजे ॥ ११९ ॥
ध्यानकृपाणा[1] हातीं घेउनि मोहारिस वधिती ।
कर्मां नाशुनि मुक्तिरमाकर निज करिं ते घेती ॥ १२० ॥
पृथक् शरीर नि मीही त्याहुनि भिन्नचि चिन्तून ।
भव्यनरांनो द्या धर्माला हृदयिं नित स्थान ॥ १२१ ॥
सुखदुःखादिक निजपर यांना मानिति नित सम जे ।
रागद्वेषें विरहित नर ते समजा मुनिराजे ॥ १२२ ॥
त्यांनीं केलें विस्तृत अतिशय सुदग्ध कर्म वन ।
शुक्लध्यानानलें सुदुःखश्वापद[2]परिपूर्ण ॥ १२३ ॥
यापरि ऐकुनि मुन्युपदेशा जागृत नृप झाला ।
प्राप्त जाहला विषयापासुनि विरक्तभावाला ॥ १२४ ॥

[ श्रीचंद्रराजानें जिनदीक्षा घेऊन घोर तप केलें.]

श्रीचन्द्रानें धृतिकान्ताभिधपुत्रा राज्य दिलें ।
समाधिगुप्ता सन्निध जाउनि मुनिव्रता वरिलें ॥ १२५ ॥
महाव्रताच्या सदा भावना धरिल्या मनिं तेणें ।
हृदयीं वचनीं कायीं राही विशुद्धि पूर्णपणें ॥ १२६ ॥
रागद्वेषा काढुनि टाकी पाळी समितीस ।
रत्नत्रय धरि भूषण हृदयीं क्षमादिसुगुणास ॥ १२७ ॥
आत्मध्यानीं सावध राही जिनशासन मानी ।
मानकषाया टाकुनि मुनिवर बनला गुणखाणी ॥ १२८ ॥

---

१ धर्मध्यानरूपी तरवार. २ हिंसकप्राणी.

महाव्रताचे पञ्चक मञ्चक[1] त्यानें भूषविलें ।
प्राणिरक्षणीं तत्पर राहुनि संयमें[2] पाळियलें ॥ १२९ ॥
लोभ तयाच्या हृदयीं नुरला धरिला सन्तोष ।
परीषहांना सोसुनि विहरे बनला गुणकोष ॥ १३० ॥
दोन नि तीन नि पाक्षिक मासिक आदिक उपवासा ।
पाळुनि मुनिवर पारणकारी नेई अघ नाशा ॥ १३१ ॥
ध्यानाध्ययनीं निमग्न राही होउनि निर्मोही ।
करी निदानें[3] न जितेन्द्रियत्वें जिनशासन पाही ॥ १३२ ॥
शान्त असे तो शासनवत्सल शल्यां[4] सोडून ।
कुशल[5] प्रासुकें[6] आचारामधिं हृदया जोडून ॥ १३३ ॥
सङ्घानुग्रह तत्पर राही स्पृहा परिग्रहिं न ।
देहीं चढलीं पुटें मळाचीं कदापि न स्नान ॥ १३४ ॥
एकरात्र जो गांवीं राही दिनपञ्चक नगरीं ।
उरीं उपेक्षाभावाविण जो अन्य न भाव धरी ॥ १३५ ॥
नदीवालुकातटीं कन्दरीं किंवा उद्यानीं ।
कायोत्सर्गें स्थिर जो राहे महातपीं मौनीं ॥ १३६ ॥
इत्यादिकगुणयुक्त मुनीश्वर जर्जर कर्म करी ।
समाधिमरणीं तत्पर राहुनि इन्द्रपदास वरी ॥ १३७ ॥

[ श्रीचंद्रमुनिराजांना ब्रह्मस्वर्गांत ब्रह्मेंद्रपद प्राप्त झालें.]

महातपानें ब्रह्मस्वर्गा यापरि साधून ।
इन्द्रपदाला मिळवुनि तेथें सुरसुखिं हो मग्न ॥ १३८ ॥
अहमिन्द्रासम वा भरतासम भासे ब्रह्मेन्द्र ।
यापरि लाभे श्रीचन्द्राला विभव महासान्द्र ॥ १३९ ॥
सौधर्मादिक सुरपति नन्दन आदिस्थानांत ।
पाहत होते वाट जयाची उत्कण्ठितचित्त ॥ १४० ॥

---

१ पलंग- आसन. २ प्राण्याचें रक्षण करणें व इन्द्रियांना ताब्यांत ठेवणें. ३ मला पुढील जन्मीं, इंद्रपद, चक्रिपद आदिक मिळावें अशी इच्छा करणें तें निदान होय. ४ माया, कपट, मिथ्यात्व- खोटी श्रद्धा, निदान भावी इंद्रादिपदाची अभिलाषा. ५ कल्याण करणारे- पुण्यप्रद. ६ जीवहिंसा ज्यांत नाहीं असे आचार,

सुराङ्गनांच्या सुलोचनांना प्रमोद देणारा ।
रमे विमानीं सुवर्णमणिमय सुमना हरणारा ॥ १४१ ॥
ब्रह्मेन्द्राचें यापरि सद्गुणवर्णन करण्यास ।
सुरकवि[1] हि क्षम कधिही होय न होउनि आयास ॥ १४२ ॥

[ जिनशासनाची सर्वोत्कृष्टता जाणून सुजनांनीं तेंच अंगीकारावें. ]

जिनशासन हें अनर्घ्य उत्तम रत्न असे याचें ।
महत्त्व मूढ न उमजति वदती असें न हें साचें ॥ १४३ ॥
श्रीजिनधर्म नि जिनवर्याचें महत्त्व जाणुनि ही ।
मिथ्यामाना त्यजिति न कोणी होती वहु मोही ॥ १४४ ॥
इहलोकाच्या सुखलाभास्तव रत जो कुमतांत ।
राही होतो स्वशत्रु तो नर फिरे भवीं सतत ॥ १४५ ॥
कर्मवन्ध हे विचित्र असती यास्तव जन सगळे ।
वोधि[2] न मिळविति मिळतो कवणा परन्तु तोहि गळे ॥ १४६ ॥
वहुदोषांची खाण असे जो अशा कुधर्मांत ।
रमू नका हो सज्जन आपण करा कुकर्मान्त ॥ १४७ ॥
दुःख-विनाश न जिनधर्माविण जाणुनि रत त्यांत ।
व्हा सज्जन हो यजा जिनाला आपण दिनरात ॥ १४८ ॥
सुरनरभव हे सुन्दर लाभुनि झाला धनदत्त ।
दशरथतनय श्रीरामाभिध सीतेचा कान्त[3] ॥ १४९ ॥

[ वसुदत्त व श्रीकांत जे कांहीं जन्मांनीं लक्ष्मण व रावण झाले त्यांचें चरित्रकथन. ]

वसुदत्तादिक यांचें आतां भववर्णन ऐका ।
भववैचित्र्या जाणुनि जन हो सोडुनि द्या हेका ॥ १५० ॥
भववैचित्र्या कारण आहे नानाविध कर्म ।
फिरवी जीवा भवि हें सन्तत विदीर्ण करि मर्म ॥ १५१ ॥
मृणालकुण्डापुरीं प्रतापी निर्मळ यश ज्याचें ।
प्रजासुवत्सल विजयसेननृप राज्य करी साचें ॥ १५२ ॥

---

१ बृहस्पति. २. सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र या अप्राप्त रत्नत्रयाला प्राप्त करून घेणें. ३ पति.

राणी त्याची श्रीमणिचूला शीलवती होती ।
या उभयांना वज्रकम्बुसुत झाला विमलमति ॥ १५३ ॥
हेमवती या नृपकन्येसह परिणय विभवानें ।
होतां हे पतिपत्नी रतिसुख भोगिति मोदानें ॥ १५४ ॥
कालें झाला या उभयांना शम्भु सुनामाचा ।
प्रसिद्धि पावें सुविक्रमें जो धरणीतलिं साचा ॥ १५५ ॥

[ विद्याधरानें पंचनमस्कार हत्तीणीच्या कानीं दिला तो ऐकून मरून ती श्रीभूतिपुरोहिताची वेदवती नामक सुंदर कन्या झाली. ]

सम्यग्दृष्टिं नि जो सुविचारी जिनतत्त्वीं निपुण ।
पुरोहित श्रीभूति नृपाचा निजकार्यीं प्रवण ॥ १५६ ॥
त्याला होती सुगुणें नांवें सरस्वतीभार्या ।
झाली उभया सुगुणवती अतिरूपवती तनया ॥ १५७ ॥
पूर्वभवीं जी पशुयोनीमधिं फिरली बहुकाल ।
जिनधर्मानें विरहित होउनि भोगी पापमल ॥ १५८ ॥
अतिशयनिन्दामोहनिदानें पुनः पुनः पावे ।
स्त्रीपर्याया दोषें ज्यांतिल गुणगण लोपावें ॥ १५९ ॥
साधुजनांवरि दोषारोपण करुनी दुरवस्था ।
भोगुनि झाली करिणी[1] आली गङ्गातटिं मत्ता ॥ १६० ॥
तेथिल चिखलामध्यें रुतली करुनि हि बहु यत्न ।
अवयव झाले अत्यन्त स्थिर झाली बहु खिन्न ॥ १६१ ॥
मन्द मन्द ती सूत्कारा[2] करि डोळे मिटवून ।
मरणसमय अतिसन्निध आला झाली निस्त्राण[3] ॥ १६२ ॥
खेचर[4] आला नाम जयाचें तरङ्गवेग असे ।
दिला नमस्कृतिमन्त्र कृपेचा सागर ज्यांत वसे ॥ १६३ ॥
कषाय झाले मन्द तियेचे जलान्न ती त्यागी ।
मरुनी झाली श्रीभूतीची कन्या गुणरागी ॥ १६४ ॥
एके वेळीं भिक्षेसाठीं गेहीं मुनि आले ।
उपहासा ती करी तियेला जनकें रोकियलें ॥ १६५ ॥

---

१ हत्तीण. २ सूं सूं असा आवाज. ३ असमर्थ. ४ विद्याधर.

शान्त जाहली वृत्ति तियेची उपासिका[1] झाली ।
आली यौवनदशा तियेला कान्ति मुखीं आली ॥ १६६ ॥

[ श्रीभूति पुरोहिताचा शम्भूनें वध केला. ]

त्या सुन्दरशा कन्येसाठीं उत्कण्ठित झाले ।
नाना नरपति शम्भूचें मन विशेषसें खुललें ॥ १६७ ॥
वैभव असलें जरि धनदासम मिथ्यादृष्टीस ।
कन्या देइन नैव पुरोहित करी प्रतिज्ञेस ॥ १६८ ॥
तेणें अतिशय शम्भुकुमारा आला कोप मनीं ।
रात्रीं त्यानें श्रीभूतीला वधिलें मृदुशयनीं ॥ १६९ ॥
जिनधर्माच्या करुणाभावें झाला तो देव ।
स्वर्गीं ज्याला प्राप्त जहालें अनुपमसें विभव ॥ १७० ॥
वेदवती ती श्रीभूतीची कन्या जणु देवी ।
हृदयिं न इच्छी शम्भुकुमारा वरावया साध्वी ॥ १७१ ॥

[ शंभूनें वेदवतीवर बलात्कार केला. तिनें आर्यिकेची दीक्षा घेतली
तीव्र तप करून ती ब्रह्मस्वर्गांत देवी झाली. ]

प्रभुत्वयोगें परिणय तिजशी झाला उद्युक्त ।
करावयाला बलात्कार करि तिजवरि तो दुष्ट ॥ १७२ ॥
कामें झालें चित्त जयाचें अतिशय सन्तप्त ।
आलिङ्गुनि तिज चुम्बी वदना करी बलें सुरत ॥ १७३ ॥
अग्निज्वालेसमशी झाली चण्ड नि ती कुपित ।
विरत जहालें चित्त जियेचें कम्पित देहांत ॥ १७४ ॥
शीलविनाशें जनकवधानें दुःखी होऊन ।
करुनी रुधिरारुण नयना ती बोले कटुवचन ॥ १७५ ॥
'अधमनरा' तूं माझ्या जनका पाप्या मारून ।
बळेंचि केलें सम्भोगाला मजला इच्छून ॥ १७६ ॥
वधीन तुजला त्याविण मजला शान्ति न लाभेल ।
स्वर्गीं गेल्या पित्यास माझ्या प्रमोद होईल ॥ १७७ ॥
मम जनकाच्या मनोरथाला करीन मी सफल ।
मिथ्यादृष्टिस वरण्यापेक्षा प्रिय मृति वाटेल ॥ १७८ ॥

---

१ श्राविका.

ऐसें बोलुनि हरिकान्तार्या सन्निध ती गेली ।
दीक्षा घेउनि तिनें तपस्या[1] कठोरशी केली ॥ १७९ ॥
लोचें मस्तक रुक्ष तपानें शरीर अतिरोड ।
तिचें जहालें जना दिसे ती जणु वठलें झाड ॥ १८० ॥
देहीं मांस न उरलें झाला अस्थि नि चर्ममय ।
शुष्क जहाला सुजना बघतां वाटे हृदयिं भय ॥ १८१ ॥
मरुनी झाली ब्रह्मस्वर्गीं वेदवती देवी ।
पुण्यें भोगी सुरसुख तेथें नानाविध साध्वी ॥ १८२ ॥

[ शंभुकुमार नरक व पशुजन्मामध्यें फिरून प्रभासकुंड नामक ब्राह्मणपुत्र झाला. व विचित्रसेनाजवळ मुनिदीक्षा घेऊन घोर तप केलें. ]

तद्विरहानें शम्भुकुमारा लघुता बहु आली ।
बन्धु नि किङ्कर संपद् आणिक सोडुनि त्या गेली ॥ १८३ ॥
तो मिथ्यात्वें मूढ जाहला त्यागी जिनवचना ।
शिव्या देउनी करि उपहासा जैनश्रमणगणा ॥ १८४ ॥
मद्य मांस मधु सेवुनि पापा अनुमोदन देई ।
मरुनी नारक-पशुपर्यायीं दुःखें बहु साही ॥ १८५ ॥
दीर्घकाल या गतिद्वयामधिं सन्तत तो फिरला ।
दुःखावांचुनि एकहि त्याचा क्षण न तिथें गेला ॥ १८६ ॥
उपशम पावें दुःखप्रद जें किञ्चित् कर्म यदा ।
कुशध्वजद्विज पुत्र जाहला प्रभासकुण्ड तदा ॥ १८७ ॥
दुर्लभ मिळवुनि तो रत्नत्रय विचित्रसेनाचें ।
सन्निध घेई मुनिदीक्षेतें सुतप करी साचें ॥ १८८ ॥
गर्व नि मत्सर रतिकन्दर्पा त्यागुनि कुविकार ।
जितेन्द्रियत्वें दयालु होउनि सुतप करि प्रचुर ॥ १८९ ॥
दोन नि तीन नि पन्धरा मासिक ऐसे उपवास ।
निःस्पृह होउनि करी श्रमण तो चिन्ती आत्म्यास ॥ १९० ॥
जेथें जाई रवि अस्ताला तेथें शून्यवनीं ।
गिरिकन्दरिं वा तो मुनि राहे प्राणिदयार्द्र मनीं ॥ १९१ ॥

---

१ तप.

गुणशीलांची मिळवुनि सम्पत् परीषहा साही ।
ग्रीष्मामध्यें आतापनरत मलपुटंयुत देहीं ॥ १९२ ॥
वर्षाकालीं वृक्षाखालीं भिजवी मेघाली ।
नदीतटीं तो श्रमण हिमावृत होई हिमकालीं ॥ १९३ ॥
[ प्रभासकुंडमुनीनें विद्याधरवैभव पाहून तें मला मिळावें असें निदान केलें.]
स्मरण हि ज्याचें पापविनाशी मन्दिर सिद्धाचें ।
श्रीसम्मेदा वन्दायातें गेला शुद्धाचें ॥ १९४ ॥
कनकप्रभ या खेचरपतिचें वैभव पाहून ।
प्रशान्त ऐसें कोणेसमयीं झालें चपल मन ॥ १९५ ॥
नसे सम्पदा जेथें ऐशी न लगे मुक्ति मला ।
असेल विभुता जरी तपाची देवो तें कमला ॥ १९६ ॥
खेचरपतिचें जैसें आहे तैसें विभव मला ।
प्रथम मिळावें ऐसें इच्छी मुनि तो सुतपफला ॥ १९७ ॥
पापकर्म हें ज्ञान्याच्याही मूढ मना बनवी ।
तेणें नश्वर विभवासाठीं तो ज्ञाना मळवी ॥ १९८ ॥
विकुनी टाकी त्रिलोकमूल्या रत्ना मूढ नर ।
भाजीसाठीं मुष्टिप्रम जी अतिशय निःसार ॥ १९९ ॥
अतिशय आहे प्रभाव जाणा जगांत कर्माचा ।
करितो उन्नत निकृष्ट अथवा मति कथि जिनवाचा ॥ २०० ॥
येथें कोणी काय करावें वळकट कर्म असे ।
विस्तृतमतिही कुण्ठित होतो मूर्खा कोण पुसे ॥ २०१ ॥
निदानदूषित केलें श्रमणें अतिशय घोर तपा ।
मरुनी तिसऱ्या स्वर्गीं जन्मे बुध हो अघ कापा ॥ २०२ ॥
[ प्रभासकुंडमुनि तिसऱ्या स्वर्गांतून चवून मणिश्रवाकेकसी यांचा पुत्र रावण झाला. ]
भोगुनि तेथें बहुसुरसौख्यें तो सुर चिरकाल ।
भोगस्मरणीं हृदया ठेवुनि विमर्श करि समल ॥ २०३ ॥
भोगुनि उरल्या पुण्यांशानें भूवरि अवतरला ।
मणिश्रवाकेकसीयुगाचा सुत रावण झाला ॥ २०४ ॥

१ मळांचीं पुटें त्याच्या अंगावर चढलीं. २ सामर्थ्य. ३ लक्ष्मी.

लङ्केमध्यें वैभव त्याला लाभे सुविशाल ।
निजप्रतापें कम्पित केलें भूतल हें सकल ॥ २०५ ॥

[ ब्रह्मेंद्र दशरथपुत्र रामचंद्र झाला. ]

ब्रह्मलोकपति आयु जयाचें दशसागर होतें ।
समाप्त होतां जन्मुनि पावे राम सुनामातें ॥ २०६ ॥
दशरथसुत तो पहिला झाला कौसल्यातनय ।
रूप पराक्रम ज्याचा न मिळे अन्यत्र न सुनय ॥ २०७ ॥
पूर्वभवीं हा होता श्रेष्ठी नामें धनदत्त ।
आतां झाला पद्मसुनामा चन्द्रासम कान्त ॥ २०८ ॥

[ लक्ष्मणभववर्णन. ]

पूर्वी होता धनदत्ताचा भाऊ वसुदत्त ।
क्रमें जाहला श्रीभूतिद्विज जो नच मदमत्त ॥ २०९ ॥
तोच जहाला मरुनी लक्ष्मण दशरथसुत दुसरा ।
नारायण हा अष्टम ऐसें मनांत अवधारा ॥ २१० ॥
जो होता श्रीकान्त प्रथम नि अनुक्रमें झाला ।
शम्भुकुमार प्रभासकुन्द नि रावणभवि आला ॥ २११ ॥
ज्यानें येथें भरतक्षेत्रीं अखण्डवश केलें ।
त्रिखण्ड जणु अङ्गुलित्रयासम असाध्य नच दिसलें ॥ २१२ ॥
जी होती गुणवती नि झाली जी श्रीभूतिसुता ।
जनकनृपाची नन्तर झाली जी दुहिता सीता ॥ २१३ ॥
विनयशालिनी झाली नन्तर भार्या रामाची ।
अखण्डशीला इन्द्राची-शचि रूपें जणु साची ॥ २१४ ॥
भाऊ होता गुणवन्तीचा नामें गुणवन्त ।
झाला येथें भामण्डल तो भामण्डलयुक्त ॥ २१५ ॥
तोचि मेहुणा श्रीरामाचा झाला परमसखा ।
विद्या अवगत ज्यास झाल्या भोगी विविध सुखा ॥ २१६ ॥

[ अमृतवती, कुण्डलमण्डित, यज्ञबलि व वृषभकेतु यांना
कोणती अवस्था प्राप्त झाली. ]

ब्रह्मस्वर्गी निवासिनी जी अमृतवती देवी ।
चउनि विदेहा गर्भी आली श्रीसीता साध्वी ॥ २१७ ॥

गर्भि तियेच्या कुण्डलमण्डित आला कुपितसुरें ।
हरिला जन्मक्षणीं कुण्डलें कानीं घालि करें ॥ २१८ ॥
यज्ञवलिद्विज पूर्वी होता होय विभीषण तो ।
वृषभकेतुनृप सुग्रीवाभिध तारामन हरितो ॥ २१९ ॥
रामावरती तुम्ही सगळे करिता सत्प्रेम ।
पूर्वभवाच्या स्नेहानें हे झाले गुणधाम[1] ॥ २२० ॥

[ समयभूषणकेवली वालीचे पूर्वभव सांगतात. ]

समयभूषणा विभीषणानें वालीचें चरित ।
विचारिलें तें कथिलें त्यांनीं जें अतिशय पूत ॥ २२१ ॥
रागद्वेषादिक दुःखांनीं भरल्या संसारीं ।
प्राणी वृन्दावनीं कृष्णमृगभवास एक धरी ॥ २२२ ॥
आयुष्यान्तीं श्रमणमुखांतुनि पञ्चनमस्कार ।
ऐकुनि सोडी शरीर मृग तो करि जो भवपार ॥ २२३ ॥
ऐरावत या नामें क्षेत्रीं पुरीं दितिस्थानीं ।
अनित्य नरता लाभे त्याला सुजन जिला वानी ॥ २२४ ॥
पिता तयाचा ' विहित ' सुनामें सम्यग्दृष्टि असे ।
सदाचाररत माता ' शिवमति ' नामें बहु विलसे ॥ २२५ ॥
या उभयांना आत्मज झाला मृग तो घनदत्त[2] ।
अणुव्रतांना पाळुनि राही जिनयजनांत रत ॥ २२६ ॥
देवगुरूंना वन्दी शास्त्रीं सन्तत भक्ति करी ।
समाधिमरणें ऐशानामधि सुरवरतेस वरी ॥ २२७ ॥
जम्बूद्वीपीं पूर्वविदेहीं विजयावति नगरी ।
सन्निध आहे ग्राम तियेच्या सुपत्तनाकारी ॥ २२८ ॥
नांव तयाचें सुमत्तकोकिळ तेथें श्रेष्ठि वसे ।
' कान्ताशोका ' भिध तो सुधनिक रैदा[3] खचित हसे ॥ २२९ ॥
भार्या त्याची ' रत्नाकिनि ' या झाला उभयास ।
सुर तो ' सुप्रभ ' नामें सुन्दर सुत सुगुणावास ॥ २३० ॥
पूजादानादिक शुभकार्यीं तो तत्पर राही ।
धर्मबन्धुगणिं वात्सल्याचा प्रवाह नित वाही ॥ २३१ ॥

१ गुणांचें घर. २ मेघदत्त. ३ कुबेरास.

बोधि दुर्लभा जी जिनशासनिं झाली त्या प्राप्त ।
श्रमणासन्निध दीक्षित झाला महाव्रतांत रत ॥ २३२ ॥
सुतप हजारों वर्षें केलें परिषह साहून ।
निःस्पृह होउनि निजस्वरूपीं तो होई लीन ॥ २३३ ॥
ऋद्धि तयाला प्राप्त जहाल्या अनेक परि गर्व ।
तिळमात्रहि नच हृदयीं त्याच्या जो हरि गुण सर्व ॥ २३४ ॥
संयोगज या जाणुनि भावा ममता मनिं न धरी ।
समाधिमरणें सर्वार्थाच्या सिद्धिस शीघ्र वरी ॥ २३५ ॥
तेहतिससागर आयु तयाचें महासुखीं गेलें ।
चवतां तेथुनि त्याला खेचरपतिचें पद आलें ॥ २३६ ॥
महाप्रतापी वाली नामक विद्याधर झाला ।
नमस्कार दशकण्ठा ज्यानें कधिंही नच केला ॥ २३७ ॥
राज्य जयाचें किष्किन्धाभिध शैलावरि होतें ।
जयें प्रजेला निजपुत्रासम दिलें प्रमोदातें ॥ २३८ ॥
लङ्केशासह विरोध जेव्हां झाला उत्पन्न ।
दीक्षा घेउनि निजहित साधी होय न तदधीन ॥ २३९ ॥
राज्य दिलें निज सुग्रीवा जो भाऊ लघु त्याला ।
जीवदयेस्तव दीक्षा घेउनि तप करिता झाला ॥ २४० ॥
शक्तिमदानें रावण उचली गिरिपतिकैलास ।
पादाङ्गुष्ठें खालीं वसवुनि हरि दशकण्ठास ॥ २४१ ॥
ध्यानाग्नीनें भववन जाळुनि लोकाग्रीं गेला ।
शिवसुख शाश्वत अनुपम भोगी तो प्रतिसमयाला ॥ २४२ ॥

[ रावण व लक्ष्मण यामध्यें पूर्वभवाचें वैर होतें
म्हणून लक्ष्मणानें रावणाचा वध केला. ]

सुतीव्रवैरें अन्योन्यांचा प्रतिभविं वध केला ।
श्रीकान्त नि वसुदत्तें यांनीं दुःखद बहु झाला ॥ २४३ ॥
वेदवतीभविं सम्बन्धानें प्रीत्युत्कर्ष मनीं ।
प्रगटुनि रावण हरि सीतेला कुकर्म हेतु गणी ॥ २४४ ॥
सम्यग्दृष्टि नि वेदज्ञा श्रीभूतिस विप्राला ।
मारी शम्भू वेदवतीस्तव धिक् धिक् कामाला ॥ २४५ ॥

श्रीभूतिद्विज मरुनि स्वर्गी शुभपरिणामांनीं ।
देव जाहला तेथुनि जन्में पुरिं प्रतिष्ठानीं ॥ २४६ ॥
होउनि वसुनृप शोकें केलें निदान तप त्यानें ।
सनत्कुमारस्वर्गीं राही जन्मुनि सौख्यानें ॥ २४७ ॥
तेथून च्युत होउनि झाला दशरथनृपति सुत ।
श्रीरामानुज लक्ष्मणचक्री तीव्रस्नेहयुत ॥ २४८ ॥
पूर्वी शम्भु नि नन्तर रावण झाला जो त्याला ।
पूर्वविरोधें लक्ष्मण मारी लङ्काधिपतीला ॥ २४९ ॥
अतिविरहानें सीतेच्या बहु दुःखी राम वने ।
दशमुखनाशीं लक्ष्मण कारण ऐसें मनिं गणणें ॥ २५० ॥
सागर लङ्घुनि भूगोचरि या लक्ष्मणवीरानें ।
पूर्वभवीं जो हिंसक रावण वधिला चक्रानें ॥ २५१ ॥
राक्षस लक्ष्मीचन्द्रा मारुनि दशवदना केली ।
सौमित्रीनें त्रिखण्ड भूवश करून रण केलि ॥ २५२ ॥
अपूर्व विक्रमधारी कोठें रावण मृति कोठें ।
घडे असम्भव कर्ममहत्त्वें जाणावें येथें ॥ २५३ ॥
वध्य[1] नि घातक[2] यांच्यामध्यें वदल असा होतो ।
चारगतीमधिं परिवर्तित हा जीव असा फिरतो ॥ २५४ ॥
कोठें स्वर्गीं उत्तमभोग नि नरकीं दुःख कुठें ।
कर्मांची ही विपरीतचि कृति म्हणती जन मोठें ॥ २५५ ॥

[ निदान करणें दुःखदायक आहे. ]

विषदूषितशा परमान्नाच्या राशिसमान तप ।
उग्रनिदानें केलें जें दे अन्तीं सन्ताप ॥ २५६ ॥
कल्पतरूला तोडुनि त्याचें कुम्पण बनवियलें ।
कोद्रवधान्यासाठीं मूढें कार्य असें केलें ॥ २५७ ॥
किंवा विषतरु वाढायास्तव अमृतें सिंचियला ।
गोशीर्षद्रुम[3] अङ्गारास्तव किंवा जाळियला ॥ २५८ ॥
मणिमाला जी फोडुनि सगळी दोरा घ्यायास ।
यत्न मूढ करि निदानदूषित तेवि तपःक्लेश ॥ २५९ ॥

१ मारलें जाणारा. २ मारणारा. ३ उत्तम जातीचा चन्दनवृक्ष.

स्त्री जाणावी विश्वीं सगळ्या दोषांची खाण ।
कुत्सित कर्म न कवण करी तें तदर्थ नर कोण ।। २६० ।।
कर्म पूर्वभवि केलें जें तें येई परतून ।
जीवा देतें सुनिश्चयानें फल अपुलें जाण ।। २६१ ।।
लोकत्रयिं तें उलट कराया निष्फळ वा कोण ।
समर्थ आहे जिनेन्द्र ही नच हें हृदयीं आण ।। २६२ ।।
धर्मी संगति करुनि हि मानव अशी दशा भोगी ।
अधर्मसंगत नर दुःखाचा सदैव संयोगी ।। २६३ ।।
मुनिपदिं राहुनि मत्सर-वैर-क्रोधा जो वाही ।
उग्रतपा जरि करी तयाचें हित हो नच पाही ।। २६४ ।।
मुनिपद धारुनि जो मिथ्यात्वा हृदयामधिं ठेवी ।
शमतपसंयम विफल तयाचें स्वतः भवीं भ्रमवी ।। २६५ ।।
संसारांतुनि तरुनी जाया उपाय त्यास नसे ।
निदान-माया-मिथ्यात्व्याचा सदैव भव विलसे ।। २६६ ।।
ज्या वायूनें मदगज देखिल उडुनी जातात ।
शशक विचारे कैसें भूवरि निवसन करितात ।। २६७ ।।
निजहित इच्छिति वैर नि माया निदान सोडावें ।
सुतीव्र असुरत्वा हेतु होति ते स्वमनिं सदा घ्यावें ।। २६८ ।।
भाषा देखिल जीं हृदयामधिं आणिल पापास ।
न वदावी ती हेतु होतसे जी अपवादास ।। २६९ ।।
शब्दचि केवल अपवादाचे सीता पूर्वभवीं ।
वदली तेणें निर्वासाच्या दुःखा वहु सेवी ।। २७० ।।

[ सीतेनें पूर्वभवीं मुनिवर आळ घेतला होता त्याचें फल.]

गांव माण्डलिक या नांवाचें होतें डुमदार ।
उपवनिं त्याच्या सुदर्शनाभिध आले मुनि थोर ।। २७१ ।।
वन्दन करण्या गेले सज्जन त्या मुनिवर्यास ।
वन्दुनि पूजुनि भावें आले ते निजनिलयास ।। २७२ ।।
' सुदर्शना ' ही वहिण तयांची तिजला शुभवचन ।
वदले कांहीं ज्यामधिं होतें दोषां न स्थान ।। २७३ ।।

वेदवती जी श्रमणा सम्यग्दर्शनयुत होती ।
वदली ती त्या ग्रामजनांना यापरि वचनतति ।। २७४ ।।
मुनि हा जन हो एकान्तामधिं सुन्दरशा स्त्रीला ।
घेउनि होता वसला हें कां योग्य दिसे बोला ।। २७५ ।।
वचन तिचें हें सत्यचि गणिलें कांहीं लोकांनीं ।
कांहींनीं तें अनृतचि म्हटलें ऐकुनिया कानीं ।। २७६ ।।
लोकांनीं त्या मुनिवर्याला अनुचित समजून ।
भक्ति न केली परी अनादर दर्शविला पूर्ण ।। २७७ ।।
मुनिवर्यांनीं अपुल्यावरचें दूषण जाईल ।
जेव्हां तेव्हां भुक्तिग्रहणीं प्रवृत्ति होईल ।। २७८ ।।
ऐसा संगर[1] करुनी कायोत्सर्गीं ते रमले ।
वेदवतीचें मुख देवीच्या कोपें बहु सुजलें ।। २७९ ।।
आहे अतिशय मी पापिष्ठा असत्य मी वदलें ।
वहिण नि भाऊ निर्मल असुनिहि मी त्या निंदियलें ।। २८० ।।
दोषारोपण नसतां केलें जन हो जाणून ।
करा समादर मुनिवर्याचा रोषा सोडून ।। २८१ ।।
यापरि आळें सीतेवरि ही आला अपवाद ।
म्हणुनी मिथ्यावादा निन्दा त्यजिती जन विबुध ।। २८२ ।।

[ जैनजनांनीं उपगूहन अङ्गाचें पालन करावें. ]

पाहियलें जरि सत्यचि दूषण तें हि न बोलावें ।
जैनजनानें बोले कोणी त्यानें वारावें ।। २८३ ।।
वर्णिल कोणी त्यास असज्जन जरि बहु यत्नानें ।
हरणें तो गुण सम्यक्त्वाचा उपगूहन वदणें ।। २८४ ।।
कथि कोणी जरि होइल तेणें जिनमतिं विद्वेष ।
जरी असे यामध्यें अमितचि सद्गुण परिपोष ।। २८५ ।।
जिनधर्मोच्या हानिस कारण ऐसें जो वदतो ।
दुःखदशा या चतुर्गतीमाधिं मानव तो भ्रमतो ।। २८६ ।।
अज्ञानें वा मत्सरभावें नसत्या दोषास ।
प्रगट करी जो जिनमार्गांतुनि बाह्य वदा त्यास ।। २८७ ।।

---

१ प्रतिज्ञा.

यापरि ऐकुनि मुनीश्वराचा अद्भुत उपदेश ।
समस्त झाले प्रमुदित ज्यामधिं होतां गुणकोष ॥ २८८ ॥
लक्ष्मण आणिक दशवदनाच्या तीव्रद्वेषास ।
त्यजिलें जाणुनि भव्यसभेनें मत्सरभावास ॥ २८९ ॥
त्या उभयाच्या रूप श्रवुनी भयकर वैराचें ।
भव्यसभेच्या विपुल दुःखभय हृदयिं गमे साचें ॥ २९० ॥
मुनिहृदयासहि शंका झाली चिन्ता देवगणा ।
आली उद्विग्नता[1] नृपांना विरक्तता कोणा ॥ २९१ ॥
वादिजनांनीं गर्वा त्यागुनि शान्ति मनीं धरिली ।
निष्ठुरकर्मी जनता देखिल सम्यक्त्वी झाली ॥ २९२ ॥
कुकर्मभर जणु हलका होउनि निज अनुभव आला ।
सुजनवर्ग तत्समयीं हा धिक् शब्द असे वदला ॥ २९३ ॥
करपुटें[2] भालीं स्थापुनि वन्दुनि त्या मुनिवर्यास ।
मनुजसुरासुर तेव्हां शंसी विभीषणार्यास ॥ २९४ ॥
हे भद्रा तव निमित्तयोगें श्रविलें सुचरित्र ।
मुनिवर्याच्या अनुकम्पेनें सुबोध सुपवित्र ॥ २९५ ॥
नन्तर सुरनरमुनिवर हृदयीं प्रमुदित होऊन ।
मुनिवर्यांना स्तविती त्यांचे गुणगण गाऊन ॥ २९६ ॥
हे भगवन्ता सकलभूषणा भूषित जगतास ।
नामें अर्थे केलें असशी वन्दन सुगतास[3] ॥ २९७ ॥
बाह्यविभूतिस त्यागुनि तुजला केवलबोध रमा[4] ।
प्रगट जहाली अनन्तरूपा जीस नसे उपमा ॥ २९८ ॥
जन्ममृत्युवश दीन अनाथ नि अनित्य हें जगत ।
तव उपदेशें जिनस्वरूपा झालें तें प्राप्त ॥ २९९ ॥
नानाव्याधि नि जरावियोगें मरणें पीडित हें ।
जगत् व्याधपरिपीडित हरिणासमान जणु आहे ॥ ३०० ॥
प्रचण्ड दुःखें देई ऐशा कर्मे आम्हांस ।
वेढियलें तें नाशी त्याच्या नमितो चरणास ॥ ३०१ ॥

---

१ भय. २ दोन हात जोडुन ते कपाळावर ठेवणें. ३ उत्तम ज्ञान्यात— केवलज्ञान्यास. ४ लक्ष्मी.

संसृतिगेहीं विषयतिमिर हा पसरे बहु दाट ।
केवलिनाथा दीपासम तूं दाखविशी वाट ।। ३०२ ।।
मुक्तिसुखाची तृष्णा लागुनि झाले जन खिन्न ।
सरसीसम तूं असशी त्यांना क्षुधिता वा अन्न ।। ३०३ ।।
कर्मवृन्दवन दग्ध कराया अग्निच तूं असशी ।
या जिनदासा काढुनि त्यांतुनि घे अपुल्या पाशीं ।। ३०४ ।।
नानादुःखें वर्फें पीडित थर थर मी कांपें ।
रविसम होउनि नाशीं देवा बाक्करसन्तापें ।। ३०५ ।।

इति श्रीरविषेणाचार्यप्रणीतपद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे सपरिवारवर्गरामदेवपूर्वभवाभिधानं नाम षडुत्तरशतं पर्व ।। १०६ ।।

# एकशेसाताव्या पर्वातील कथेचें सार.

सकलभूषणकेवलींच्या मुखांतून संसारदुःखांचें वर्णन ऐकून कृतांतवक्राला वैराग्य झालें. तो श्रीरामचंद्राकडे येऊन म्हणाला– प्रभो, संसारांतील चतुर्गतीच्या मार्गांत फिरून मी दुःखी झालों आहे. मला आतां श्रमण व्हावयाचें आहे आपण मला परवानगी द्यावी. रामचंद्र म्हणाले– कृतांतवक्रा, मुनिव्रत फार कठिण असतें तें धारण करणें तुला शक्य होणार नाहीं. यांत शीत-उष्ण, भूक-तहान आदि दुःखें भोगावी लागतात. याचप्रमाणें जैनसाधूंना दुष्ट लोक हृदयाला पीडित करणारीं वचनें बोलतात. तुला कोणतेंही दुःख ठाऊक नाहीं. यास्तव तूं हा मुनि होण्याचा विचार सोडून दे. मुनिव्रतांत उपवास करावे लागतात. परक्याच्या गृहांत आहारासाठीं जावें लागतें. हें सर्व कठिणव्रत तुला सांभाळतां येणार नाहीं." कृतांतवक्र म्हणाला– प्रभो, मी सगळे स्नेहपाश तोडून टाकीन, कोणत्यावेळीं मृत्युरूपी वज्रपात होईल हें सांगता येत नाहीं. यास्तव तो पडण्यापूर्वी मी आत्महित करून घेण्याचें ठरविलें आहे. अग्नीनें पेटलेल्या घरांतून बाहेर पडणाऱ्याला दयाळू माणसें विरोध करीत नसतात. तसें दुःखांनीं भरलेल्या या संसारांतून बाहेर पडण्याची इच्छा करणाऱ्या मला आपण विरोध करणार नाहीं अशी मला खात्री आहे.

कृतांतवक्राचा निश्चय पाहून रामचंद्रांनीं त्याला म्हटलें कीं– कृतांतवक्रा, मी जर एखाद्या संकटांत सांपडलों तर तूं तेव्हां मला धावून येऊन साहाय्य देण्याचें कबूल करशील तर मी तुला दीक्षा घेण्यास अनुमति देईन. त्यानें तें मान्य केलें. यानंतर कृतांतवक्रानें केवलींना वंदून मुनिदीक्षा घेतली. अनेक राजांनींही संसारभय मानून जिनदीक्षा घेतली. कित्येकांनीं अणुव्रतें व सम्यग्दर्शन धारण केलें.

नंतर सकलभूषणकेवलींना व अन्य मुनिगणाला वंदून राम-लक्ष्मण सीता आर्यिकेकडे आले. आदरानें तिला रामचंद्रांनीं वंदन केलें. क्षणपर्यंत अतिशय कोमलांगी सीतेकडून हें आर्यिकाव्रत कसें पाळलें जाईल याची चिंता उत्पन्न झाली.

कठोर अशा दर्भाङ्कुराच्या जमीनीवर हिला कशी झोप लागेल ? वनांतील भयंकर व्याघ्रादिगर्जना ऐकून तेथें ही कशी राहील ? अशा विचारांनीं त्यांच्या मनाला दुःख झालें.

लक्ष्मणानें सीतार्यिकेच्या चरणांना वंदून म्हटलें– जननि तूं स्वतःला पितृकुलाला, पतिकुलाला व सर्व जगाला शीलव्रतानें पावन केलें आहेस. माते, माझ्या हातून जें बरें वाईट कांहीं घडलें असेल त्याची क्षमा कर. संसारी जीवाची पदोपदीं चूक घडत असते.

याप्रमाणें राम-लक्ष्मणांनीं सीतेचें अभिनंदन करून आपल्या सर्व स्त्रिया, लवण व अंकुश यांच्यासह अयोध्यानगरांत प्रवेश केला व तेथें ते आनंदानें राहूं लागले.

# एकशेसातवें पर्व.

---

( कृतांतवक्र सेनापतीनें दीक्षा घेण्याची रामचंद्राजवळ आज्ञा मागितली.)

दुःखें नाना ऐकुनि संसाराचीं कृतान्तवक्र[1] वदे ।
रामासमीप येउनि दीक्षाज्ञा हे प्रभो मला म्हणि दे ॥ १ ॥
मिथ्यामार्गभ्रमणें या संसारीं अनादिकालीन ।
झालों खिन्न विभो मी आतां व्हायास इच्छितों श्रमण ॥ २ ॥
श्रीरामचन्द्र वदले अतिशय दुर्धर असें मुनिव्रत हें ।
स्नेहा त्यागुनि कैसें धारण करिशील कठिण हें आहे ॥ ३ ॥
शीतोष्णादि-परीषह अतिशय जे तीव्र केवि सहशील ।
कण्टकतुल्य खलांचीं वचनें बाधा अतीव देतील ॥ ४ ॥
दुःख नसे ज्या ठावें देह तुझा कमलमध्य[2]कोमल रे ।
वनिं झोपशील कैसा निशिं जेथें तीव्र वाहतें वारे ॥ ५ ॥
दोन नि तीन नि पंधरा तैसें मासोपवास सेवून ।
दिसतील फक्त देहीं चर्मास्थिच अन्यरक्त आदिक न ॥ ६ ॥
परगृहिं जाउनि भिक्षा तूं करपात्रांत केवि घेशील ।
हें सर्व कठिण कैसें व्रत आचरशील तूं दयाशील ॥ ७ ॥
शत्रूंच्या सैन्याला कदापि रे तूं न सहन केलेस ।
नीचापासुनि परिभव कैसें तूं सोसशील नि क्लेश ॥ ८ ॥
वदला यमास्य तेव्हां जो तुमचे स्नेहपाश तोडील ।
त्या मज सहन कराया कठिण दुजें नाथ काय राहील ॥ ९ ॥
मरणाशनि[3] देहावरि जों न पडे तोंवरीच साधीन ।
निजहित नाथा साधुनि संसृतिसागर तरून जाईन ॥ १० ॥
जैसे दयालु मानव अग्नीनें पेटल्या घरांतून ।
बाहेर कुणी जाई विरोध त्याला कदापि करिती न ॥ ११ ॥
दुःखें तप्तभवांतुनि मी जाया इच्छितों न रोधावें ।
संयोग होय जेथें वियोग तेथेंच हें मनीं घ्यावें ॥ १२ ॥

---

१ सेनापतिचें नांव. २ कमलाचा आंतील भाग. ३ मरणरूपी वीज.

नाथा वियोग तुमचा दुःसह दुःखास हेतु होईल ।
परि तें पुनः न होवो म्हणून हा जैनसुतप आचरिल ॥ १३ ॥
नयनांत अश्रु रोधुनि दुःखाकुल रामचन्द्र त्या वदले ।
झालास तूं व्रतोन्मुख धन्य तुझें व्यक्त आत्मबल झालें ॥ १४ ॥
( रामचंद्र सेनापतीला संकटप्रसंगीं मला साहाय्य कर असें म्हणाले
व तें त्यानें कबूल केलें. )
निर्वाण लाभला न स्वर्गीं सुरता[1] जरी मिळेल तुला ।
सङ्कट कांहीं येतां धावुनि साहाय्य तूं करी मजला ॥ १५ ॥
एकहि उपकाराचें स्मरण तुझ्या जरि मनांत राहील ।
मी मुक्त सङ्कटांतुनि करीन संगर[2] करी दयाशील ॥ १६ ॥
जैशी अपुली आज्ञा म्हणुनि असे त्या प्रणाम तो करुन ।
होउनि विरक्त केवलि-नाथाचें वंदिले तयें चरण ॥ १७ ॥
सकलपरिग्रह वर्जुनि झाला तो श्रमणमुनि सदाचारी ।
दुर्धर सुतपा साधुनि झाला तो सकलपापसंहारी ॥ १८ ॥
यापरि अनेकराजे भवभय मानून हृदयिं मुनि झाले ।
श्रावक किति सम्यक्त्वी रत्नत्रयभूषणांत जन रमले ॥ १९ ॥
यापरि समस्तभूपणमुनिनाथें[3] दिव्यदेशना[4] केली ।
तेथून जात असतां वंदुनि जनताहि निजगृहा गेली ॥ २० ॥
त्या कमलनेत्र रामें केलें श्रीसकलभूषणा नमन ।
नन्तर अन्यमुनींना हृदयीं अत्यन्त भक्ति ठेवून ॥ २१ ॥
निर्मल तेज जियेचें अनलज्वालेसमान[5] जी भासे ।
आर्यागणांत चमके तारावृन्दीं ध्रुवासमा विलसे ॥ २२ ॥
मृदु शुभ्रवस्त्र धारण केलें अङ्गावरी अशी सीता ।
चञ्चल फेन जियेचा भासे मन्दाकिनी जणु सरिता ॥ २३ ॥
अतिशय विरक्तभावें श्रीनें जणु घेतली असे दीक्षा ।
जिनशासन देवी वा आली घेण्यास जैनजनपक्षा[6] ॥ २४ ॥
ऐशी पाहुनि सीता कम्पित झालें क्षणैक राममन ।
कल्पतरूसम राही पुढें उभा अल्पसें जया चलन[7] ॥ २५ ॥

---

१ देवपणा. २ प्रतिज्ञा. ३ सकलभूषणकेवलीनीं ४ उपदेश.
५ अग्निच्या ज्वालेप्रमाणें. ६ बाजू. ७ कम्प.

( आर्यिकासीतेस पाहून राममनांत आलेले विचार. )

सन्निध[1] असुनिहि मी जी घनरव[2] ऐकूनि भीत वहु होती ।
राहिल वनांत कैसी ऐसें श्रीराम मानसीं चिन्ती ॥ २६ ॥
गमन जिचें वहु सुन्दर रूपवती तीव्र करुनि तप सीता ।
कोमलकमलाङ्गी ही वाटे पावेल विलय वनिं चिन्ता ॥ २७ ॥
नाजुक शरीर अतिशय हिचें असे कठिन तप जिनेशाचें ।
जें वृक्षासहि जाळी अशा हिमें कमल केवि तें वाचें ॥ २८ ॥
कोठें अतिशय कोमलदेह हिचा तप कुठें महाकठिण ।
वृक्षा जाळि असें हिम कमळाचें घेतसे जसें प्राण ॥ २९ ॥
मधुरान्नपान भक्षित होती प्रतिदिनिं तिला मिळेल कसें ।
परगृहिं वाटे माझ्या मनास हें कार्य फार कठिण दिसे ॥ ३० ॥
वीणावेणुमृदंगध्वनि ऐकत मधुर जी सदा झोपे ।
आतां कठोर भूवरि थरथर कांपेल हें नसें सोपें ॥ ३१ ॥
भूमि जिथें दर्भांच्या शल्यांनीं[3] व्याप्त जाहली आहे ।
मृगरव होय निरन्तर वाटे भय सर्वदा जिथें पाहे ॥ ३२ ॥
ऐशा सभय वनामधिं राहिल ही भीरु जानकी कैशी ।
कैशा व्यतीत होतिल रात्री निबिडान्धकारयुक्त दिशीं ॥ ३३ ॥
केला त्याग हिचा मी खलापवादा प्रमाण मानून ।
संशय मनांत घेउनि मुकलों मी आज हा तिला पूर्ण ॥ ३४ ॥
अनुकूल प्रिय साध्वी होती त्रैलोक्यसुन्दरी तिजला ।
मधुर सदा जी बोले ऐशा सीतेस राम हा मुकला ॥ ३५ ॥
यापरि चिन्ताचक्रें झालें रामास परमदुःख मनीं ।
कम्पित राम दिसे तो चलकमलौवलिसरासमान[4] जनीं ॥ ३६ ॥
नन्तर केवलिवाक्या स्मरून नयनांत अश्रु रोधून ।
त्यागुनि उत्सुकभावा केलें त्यानें प्रसन्नसें स्वमन ॥ ३७ ॥
स्वाभाविकदृष्टीनें आदरभावा मनांत ठेवून ।
भक्तिस्नेहें रामें सीतेचे वन्दिले तदा चरण ॥ ३८ ॥

---

१ जवळ. २ मेघगर्जना. ३ टोंचणाऱ्या अग्रांनीं. ४ चञ्चल कमलसमूहानें युक्त अशा सरोवराप्रमाणें.

( लक्ष्मणाचें सीतेविषयीं आदरयुक्त वचन. )

तो सौम्यवदन लक्ष्मण सीतार्याचरणयुग्म वन्दून ।
अभिनन्दुनि तिजला बहु वदला तेव्हां यथार्थसें वचन ॥ ३९ ॥
भगवति ! धन्या असती आम्हाला वन्द्य तूं शुभाचारीं ।
धरिलेस शीलशैला माते पृथ्वीसमान सतत उरीं ॥ ४० ॥
जिनवचनामृत आर्ये प्रथमत: गे तुवाचि मेळविलें ।
वाटे मजला तव मन तरून भवसागरास या गेलें ॥ ४१ ॥
सुन्दर चित्त जयांचें सतीस्त्रिया अन्य ज्या जगीं असती ।
इहपरलोकीं त्यांची सर्व जनें स्तुत्य होउ दे सुगति ॥ ४२ ॥
या लोकवन्द्य सुपदा धरिलें तूं साधुचित्त होऊन ।
आत्मा कुलयुग लोकहि पावन[1] केलेस बोलतें स्वमन ॥ ४३ ॥
केलें असेन जें मी भलें बुरें तूं क्षमा करी माते ! ।
संसारीजीवाची चूक अशी ही पदोपदीं घडते ॥ ४४ ॥
तव शान्तबुद्धि राही सन्तत जिनशासनांत हे जननि ।
खिन्न प्राण्याच्याही होतो आनन्द त्यामुळेंच मनीं ॥ ४५ ॥
यापरि वैदेहीचें अभिनन्दन करुनि उभय वन्धुयुग ।
गेले साकेतेला लवणाङ्कुश जाहले जया अनुग[2] ॥ ४६ ॥
विस्मय ज्यांना वाटे ऐसे खेचर नृपाल मुदितमनें ।
उत्तम वैभव दावित शिरले नगरींत पुण्य ज्या न उणें ॥ ४७ ॥
राजसहस्रामध्यें लोकमनोहरण करित वन्धुयुग ।
देवावृतेन्द्रयुग्मा[3] सम शिरले पुरिं जया सहाय खग ॥ ४८ ॥
सर्वांपुढतीं देवी नानायानांत चालल्या वसुनी ।
परिवारें ज्या सीतावियोग अर्पण करी सुदु:ख मनीं ॥ ४९ ॥
नगरप्रवेशसमयीं पाहून श्रीवला स्त्रिया वदती ।
अन्योन्यांना नाना रसमिश्रित सर्व येइ कर्णपथीं ॥ ५० ॥
श्रीवलदेव असे हा मानी[4] शुद्धीस सर्वदा मानी ।
अनुकूल प्रियपत्नी हारवुनी खिन्न जाहला स्वमनीं ॥ ५१ ॥
जन्म जयाचा निर्मलकुलांत सुचरित अशा सुवीरांचें ।
असतें लोकोत्तर तें केलें यानें असेचि तें साचें ॥ ५२ ॥

---

१ पवित्र. २ अनुसरणारे. ३ देववेष्टित दोन इंद्रासारखे. ४ अभिमानयुक्त.

निर्मलशील जियेचें दीक्षा घेऊन आर्यिका झाली ।
त्या सीतासाध्वीनें सुजनमनांना प्रसन्नताचि दिली ॥ ५३ ॥
कोणी स्त्री स्वसखीला वदली सीतावियुक्त बलदेव ।
ज्योत्स्नाविरहित शशिसम दिसतो तद्वदनिं खिन्नताभाव ॥ ५४ ॥
दुसरी वदली तिजला निसर्गसुन्दरचि हा असे राम ।
शोभा स्वतन्त्र याची पावेल न केधवा हि सुविराम ॥ ५५ ॥
कोणी नारी वदली पुरुषोत्तमशा पतीस सोडून ।
सीते काय मिळालें वज्रासम तव असें चि कठिन मन ॥ ५६ ॥
दुसरी वदली आतां सीता ही धन्य जाहली आर्या ।
सर्वानर्था[1] त्यागुनि झाली नारीगणांत ती वर्या[2] ॥ ५७ ॥
कोणी नारी बोले सीते सुकुमार मातृभक्त तुझे ।
हे पुत्र लवण-अङ्कुश यांना त्यजणें तुला न गे साजे ॥ ५८ ॥
पतिवरचें नारीचें चल होतें प्रेम हें मना पटतें ।
स्वस्तनदुग्धें पोषित पुत्रा त्यजणें विचित्रसें गमतें ॥ ५९ ॥
दुसरी तियेस वदली लवणाङ्कुश पुण्यपुरुष आहेत ।
पुण्यचि रक्षी त्यांना माता करि कां विशिष्टता त्यांत ॥ ६० ॥
यापरि अन्योन्यांना बोलुनि बलदेवरूप त्या बघती ।
तृप्ति न त्यांना झाली भृङ्गीसम चित्तवृत्ति त्या धरिती ॥ ६१ ॥
श्रीलक्ष्मणास कोणी पाहुनि नर हरिपदास हा पावे ।
ऐसें वदले ज्याचे सुर गाती सुयश मधुरशा पावें[3] ॥ ६२ ॥
हा चक्रपाणिराजा ईश जहाला त्रिखण्डलक्ष्मीचा ।
शत्रुस्त्रियासि देई वैधव्य महापराक्रमी साचा ॥ ६३ ॥
यापरि नगरनिवासी लोकसमूहें प्रशंसिले गेले ।
सुरपतियुग्मासम ते निजराजगृहीं शुभासनीं बसले ॥ ६४ ॥
हें रामचरित यापरि जाणुनि जो सांगतो जना भावें ।
जिनदास होतसे तो तळपे रविहून आपल्या विभवें ॥ ६५ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे प्रव्रजितसीताभिधानं नाम सप्तोत्तरशतं पर्व ॥ १०७ ॥

---

१ विनाश. २ श्रेष्ठ. ३ पावा नामक वाद्यानें.

## एकशेआठव्या पर्वांतील कथासंक्षेप.

पापनाशक रामाचें चरित्र ऐकल्यावर श्रेणिकराजानें लवण व अङ्कुश या रामपुत्रांचें चरित्र मला सांगा असें गौतमगणधरास म्हटलें तेव्हां त्यांनीं याप्रमाणें तें सांगितलें:—

काकन्दीनगरांत रतिवर्धन नांवाचा राजा होता. राणीचें नांव सुदर्शना होतें. या उभयतांना प्रियङ्कर व हितङ्कर या नावांचे दोन पुत्र होते. राजाच्या प्रधानाचें नांव सर्वगुप्त होतें. राजाचा नाश करून त्याचें राज्य आपण बळकावून बसावें असा विचार त्यानें केला. हा विचार प्रधानपत्नी विजयावलीला कळला. तिनें तो राजाजवळ येऊन सांगितला. राजा रतिवर्धनानें तिच्या विचारावर वरून अविश्वास दाखविला पण मनांत तिचें सांगणें खरें आहे असें त्यानें मानिलें.

त्यानें तिला म्हटलें कीं— प्रधानाचे विचार माझा नाश करण्याचे आहेत हें कशावरून मी खरें मानावें? ती म्हणाली— राजन्, उद्या आपणाबरोबर कांहीं निमित्त उकरून तो भांडेल मग माझें म्हणणें खरें आहे असें आपणास वाटेल.

आपल्या नवऱ्याचे हे विचार राजाला सांगण्याचा तिचा दुसरा हेतु असा होता कीं, त्यानें आपणावर प्रेम करावें. ती त्याला इच्छित होती पण राजा परस्त्रीत्यागी असल्यामुळें तिचा अभिलाष तिच्या मनांतच राहिला तो सफल झाला नाहीं.

दुसरें दिवशीं प्रधानाचें राजाबरोबर भांडण झालें. राजाला विजयावलीचें सांगणें पटलें व तो सावध राहिला. रात्रीं प्रधानानें राजवाड्याला आग लावली. त्यावेळीं राजानें राणी व आपल्या दोन पुत्रांना जागें केलें व राजवाड्याच्या तटाखालीं जो सुरुंग होता त्याच्याद्वारें राजा, राणी व दोन पुत्र असे चौघे बाहेर पडले.

सुरक्षित बाहेर पडल्यामुळें सर्वांना आनंद वाटला. नंतर हे चौघेजण काशीनगराच्या बगीचांत रात्रीं जाऊन पोहोंचले. राजानें एक दूत काशीनगराच्या कशिपुराजाकडे पाठविला. त्यानें सर्व हकीकत कळविली. कशिपुराजाला आनंद वाटला. त्यानें आनंदानें राजाचें स्वागत केलें. व आपल्या राजवाड्यांत अतिशय सन्मानानें त्या चौघांना त्यानें ठेविलें.

इकडे सर्वगुप्त प्रधान काकन्दीचा राजा झाला. त्यानें कशिपुराजाचा अभिप्राय जाणून घेण्यासाठीं एक दूत पाठविला. दूतानें म्हटलें– राजन्, " आपण काकंदीच्या सर्वगुप्त राजाच्या चरणांना नमस्कार करण्यास यावें " हें भाषण ऐकून कशिपुराजा रागानें लाल झाला. तो म्हणाला– ज्यानें आपल्या राजाला त्याच्या पत्नी व दोन पुत्रासह जाळून मारलें त्याच्या चरणाला नमस्कार करून मी माझें मस्तक अपवित्र करणार नाहीं. मी युद्धांत तुझें मस्तक तोडून तुझा कृतघ्नपणा जगजाहीर करीन. असें बोलून त्यानें दूताला हकालून दिलें.

दूतानें सांगितलेलें वृत्त ऐकून सर्वगुप्त चिडला व मोठें सैन्य बरोबर घेऊन तो कशिपुराजाबरोबर लढण्यास आला. दोघांचें मोठें युद्ध झालें. त्यांत सर्वगुप्ताचा पराजय झाला. त्यानें सर्वगुप्ताला कैदेंत टाकलें. अन्यायानें मिळविलेल्या राज्याला तो मुकला.

रतिवर्धनराजा पुन: राणी व पुत्रयुगासह काकन्दीनगराला आला. प्रजांनीं त्याचा पुनर्जन्मोत्सव करून अत्यानंद व्यक्त केला. कशिपुराजा व रतिवर्धन यांच्यांतलें प्रेम उत्तरोत्तर वृद्धिंगत झालें. रतिवर्धनराजानें सर्वगुप्ताला आपल्या देशांतून निर्वासित केलें. त्याची चोहीकडे निंदा झाली व तो मरण पावला.

रतिवर्धनराजा प्रतिदिनिं देवशास्त्र-गुरूंची पूजा करीत असे व यतींना दान देत असे. अशाप्रकारें नावेप्रमाणें असलेल्या धर्माचें तो पालन करीत असे.

एकेवेळीं रतिवर्धनाला वैराग्य झालें. त्यानें सुभानुगुरुचरणांना वंदन करून दीक्षा घेतली. व तो तप करूं लागला.

विजयावलीनें आपला अभिप्राय राजाला कळविला म्हणून सर्वगुप्तानें तिचा त्याग केला होता. व रतिवर्धनराजा परस्त्रीविरत होता म्हणून त्यानें तिचा स्वीकार केला नाहीं. यामुळें उभयभ्रष्ट ती झाल्यामुळें रतिवर्धनावर फार चिडली. तिनें अकाम तप केलें व मरून ती दुष्ट राक्षसी झाली.

रतिवर्धनमुनि तप करीत असतां त्यांना तिनें घोरोपसर्ग केला तो त्यांनीं शांतपणें सहन केला. मोहादिकर्मांच्या नाशानें ते केवलज्ञानी झाले व नंतर ते सर्व कर्मनाशानें मुक्त झाले. अनंतसुखादिगुणांनीं पूर्ण झाले. कांहीं वर्षांनीं प्रियङ्कर व हितङ्कर या बंधुयुगानेंही दीक्षा घेतली व घोर तप करून ते ग्रैवेयकांत अहमिंद्र झाले. तेथील आयुष्य संपल्यावर तेथून चवून ते रामपुत्र लवण व अङ्कुश झाले.

यांचें पूर्वभवचरित्र याप्रमाणें:—

काकन्दीनगरांत फार पूर्वकालीं सुदामदेव नांवाचा ब्राह्मण राहत असे. त्याच्या पत्नीचें नांव श्यामा. या उभयतांना वसुदेव व सुदेव नामक दोन पुत्र झाले. या दोघांचा विवाह विश्वा व प्रियंगू या ब्राह्मणकन्यांबरोबर झाला होता. यांचा गृहस्थधर्म अनुकरणयोग्य होता. ह्यांनीं 'तिलक' नामक साधुवर्याला दान दिलें. कालांतरानें मरून हे उत्तरकुरु भोगभूमींत तीनपल्य आयुष्याचे धारक मनुष्य झाले. त्यानंतर ते ऐशानस्वर्गांत देव झाले. तेथील आयु संपल्यावर ते रतिवर्धनराजाचे प्रियङ्कर व हितङ्कर असे दोन पुत्र झाले. याची माता सुदर्शना पुष्कळ सागरवर्षें संसारांत फिरून सिद्धार्थ क्षुल्लक झाली. लवणाङ्कुशांना पाहून त्याच्या मनांत स्नेह उत्पन्न झाला व त्यानें या उभयांना सर्व विद्याप्रवीण केलें. याप्रमाणें यांचें भवचरित्र आहे.

---

# एकशेआठवें पर्व.

पापविनाशक ऐसें रामाचें चरित मधुर ऐकून ।
संशयविनाश होतां चिन्ती नरपाल चेलनारमण[1] ॥ १ ॥
सीता रामस्नेहा दृढ तोडुनि आर्यिकाव्रतीं रमली ।
परि कोमला कशी ती सज्ज परीषह सहावया झाली ॥ २ ॥
मृगनयन[2] लवण-अङ्कुश दैवें जननीविहीन हा ! केले ।
मातृवियोगा कैसें सहतिल ते खिन्न हृदय मम झालें ॥ ३ ॥
जे तेजस्वी मोठे त्यांची ही विपमशी दशा होते ।
अन्यांची मग केवी मनांत ही घोरवेदना सलते ॥ ४ ॥
यापरि करुनि विचारा श्रीगौतमगणधरास तो वदला ।
मज लवणाङ्कुशसुचरित सांगावें जें हरी अघालीला[3] ॥ ५ ॥

[ कुमार लवण व अङ्कुश याचें चरित. ]

सर्वज्ञ वीरनाथें सांगितलें सर्वहृदयिं ठेवून ।
श्रीलवणाङ्कुशसुचरित गौतम सांगे यथार्थ अन्यून ॥ ६ ॥
काकन्दीनगरामधिं रतिवर्धनभूपति प्रजा पाळी ।
पत्नी सुदर्शना त्या जिच्यापुढें रति हि वाटतें काळी ॥ ७ ॥
झाले पुत्र तयांना प्रिय नि हितङ्कर सुनामयुत दोन ।
होता अमात्य याचा ज्याचें श्रीसर्वगुप्त अभिधान ॥ ८ ॥
तो राजनीति जाणी परि राजाचा विनाश मनिं आणी ।
दुष्टपणा शिकवाया दुष्टांना लागतो न गुरु कोणी ॥ ९ ॥
विजयावलि नांवाची पत्नी श्रीसर्वगुप्तसचिवाची ।
होती राजावरि जी अनुरक्ता त्यास बोलली साची ॥ १० ॥
राजन् ! माझ्या पतिचा विचार अपुला विनाश करण्याचा ।
आले मी तुज कथितें सावध आपण सदा रहायाचा ॥ ११ ॥
वाहेरुनि राजानें दाखविला पूर्णसा अविश्वास ।
आंतुनि धरि विश्वासा वदला वद सत्य हेतु जो यास ॥ १२ ॥

---

१ चेलनाराणीचा पति श्रेणिक. २ हरिणाच्या डोळ्याप्रमाणें डोळे ज्याना आहेत. ३ पापसमूहाला.

विजयावली म्हणाली कलह तुझ्यासह उद्या करील नृपा ।
तेणें तूं समजावें माझ्या वचनास सत्य हे बापा ॥ १३ ॥
होता परस्त्रियेमधिं विरक्त राजा परन्तु अनुरक्त ।
झालों ऐसें दावी वदला तिजला न हें असे युक्त ॥ १४ ॥
माझ्यावरि सचिवाचें प्रेम असे तो करील कलह कसा ।
विजयावलि हें आहे कार्य असम्भव न योग्य विश्वासा ॥ १५ ॥
अन्यदिनीं नृपतीनें सचिवाचें चिह्नभाव जाणून ।
केलें क्षमा[1]निवारण होय अघाचें जयेंचि आगमन ॥ १६ ॥
ऐसें निमित्त मिळतां सामन्तांना विरुद्ध सचिवानें ।
पापमनानें केलें वार्ता ही ऐकिली नृपें कानें ॥ १७ ॥
एके दिनि सचिवानें पेटविलें नृपनिवास-सौधास ।
राजा सावध होता केले पत्नीसुतप्रबोधा[2]स ॥ १८ ॥

[ राजा रतिवर्धन पत्नी व दोन पुत्र यांच्यासह सुरुंगमार्गानें काशीला जातो.]

सौधतटाच्या खालीं गुप्तसुरङ्गापथें करी गमन ।
पत्नीपुत्रयुगासह करि नरपति आपुलें असें अव[3]न ॥ १९ ॥
काशीपुरींत होता नरपतिसाम[4]न्त उग्रवंशाचा ।
कशिपु सुनामें होता न्यायी ज्याचा स्वभाव बहु साचा ॥ २० ॥
केलें प्रयाण तिकडे काशीनगरासमीप जाऊन ।
तेथील उपवनामधिं सकुशल तो पोचला न ये विघ्न ॥ २१ ॥
निशिसमयीं पाठविलें नृपतीनें दण्[5]डपाणिदूताला ।
कशिपुकडे तैं त्यानें जाउनि विनयें प्रणाम त्या केला ॥ २२ ॥
आनन्दाची वार्ता कथितों मी आपणास ती ऐका ।
रतिवर्धनभूपागम कोठें रे त्यजुनि सांग तूं शङ्का ॥ २३ ॥

[ कशिपुराजा रतिवर्धनाचें स्वागत करून आपल्या राजवाड्यांत दान-मानानें ठेवतो. ]

उद्यानीं ते आले ऐकुनि अत्यन्त मुदित होऊन ।
नृप कशिपु तेथ गेला निजपरिवारा समस्त घेऊन ॥ २४ ॥

---

१ सहन केलें नाहीं. २ पत्नी व पुत्र यांना जागें केलें. ३ रक्षण. ४ आपल्या देशाला ज्याचें राज्य आहे असा राजा. ५ ज्याच्या हातांत दंड-काठी आहे असा.

रतिवर्धनभूपाचा विजय असो वदुनि हर्षभारानें ।
स्वागत केलें त्याचें कशिपुनृपें तेथ अर्घ्यपाद्यानें ॥ २५ ॥
आला घेउनि नगरीं देउनि या मानदान निजसौधीं ।
भार्यापुत्रयुगासह ठेवी ज्याची असे प्रसन्ना [1]धी ॥ २६ ॥
इकडे राज्यपदावरि बसला श्रीसर्वगुप्त खलसचिव ।
दूतास पाठवी तो कशिपूचा जाणण्यास मनिं भाव ॥ २७ ॥
कशिपो राजन्, येउनि माझ्या चरणा करी नमस्कार ।
हें दूतवचन ऐकुनि कशिपूला क्रोध येइ अनिवार ॥ २८ ॥
वदला खल तूं अससी स्वामीचा घात हाय केलास ।
जाशील मरुनि नरकीं दुःखांची भोगशील तूं रास ॥ २९ ॥
पत्नीपुत्रयुगासह रतिवर्धनहाय दग्ध केलास ।
तव नामस्मरणें ही आम्ही होऊं अपूत[2]तावास ॥ ३० ॥
हे पाप्या तव मस्तक सर्वजनांच्या समक्ष तोडीन ।
रतिवर्धननृप घातक तुजला नरकांत शीघ्र फेकीन ॥ ३१ ॥
ऐसें बोलुनि दूता कशिपूनें त्या दिलें हकालून ।
विद्वान् त्यागुनि दुर्मत होतो सुमतांत जेवि संलीन ॥ ३२ ॥

[ सर्वगुप्ताचा पराजय व त्याला कैदेंत टाकणें. ]

सामन्त कशिपु होता बलशाली स्वामिभक्तिसम्पन्न ।
उद्युक्त जाहला तो शीघ्र तयाशीं कराव[3]या कदनं ॥ ३३ ॥
तो सर्वगुप्त घेउनि प्रचण्डसें सैन्य तीव्रकोपानें ।
काशीदेशीं आला उभयीं झाला न सन्धि अभिमानें ॥ ३४ ॥
लढले उभय हि राजे कशिपूला विजय लाभला समरीं ।
शौर्यें मेलें बहु भट पतिलाभें तोषल्या नभीं अमरी ॥ ३५ ॥
युद्धांत सर्वगुप्ता कशिपूनें पकडिलें जिवन्त खला ।
अन्यायें मिळवियल्या राज्या कैदेंत पडुनि तो मुकला ॥ ३६ ॥
रतिवर्धननृप आहे जिवन्त जाणून सर्वसामन्त ।
पुनरपि त्यास मिळाले मंत्र्याचा पक्ष सोडुनि त्वरित ॥ ३७ ॥

[ रतिवर्धनानें सर्वगुप्ताला स्वदेशांतून हकालून दिलें. ]

---

१ बुद्धि. २ अपवित्रतेचें घर. ३ युद्ध. ४ तह.

काकन्दीनगरीला रतिवर्धननृपति येइ परतून ।
केला प्रजाजनानें जननोत्सव[1] पुनरपि प्रमोदून ॥ ३८ ॥
सचिवा निजदेशांतुनि रतिवर्धन देइ त्या हकालून ।
झाली त्या पाप्याची निन्दा सर्वत्र पावला मरण ॥ ३९ ॥
कशिपु हि काशीभूपति नगरी वाराणसींत राज्य करी ।
जणु लोकपाल दुसरा शोभे परमारमा[2] तयास वरी ॥ ४० ॥
प्रतिदिनिं रतिवर्धन करि जिनगुरुसच्छास्त्रपूजना भावें ।
देई दान यतींना सुधर्म पाळी समान जो नावें[3] ॥ ४१ ॥
कोणे एके समयीं भोगापासुनि विरक्त होऊन ।
रतिवर्धन मुनि झाला सुभानुगुरुपदयुगास वन्दून ॥ ४२ ॥

[ विजयावली अकामतपानें राक्षसी झाली. तिनें रतिवर्धनमुनीस उपसर्ग केला. त्यांना केवलज्ञानप्राप्ति व मोक्ष. ]

इकडे विजयावलिनें भूपा निजभाव कळविला म्हणुन ।
क्रोधें सचिवें त्यजिलें तिजला झाली मनांत ती खिन्न ॥ ४३ ॥
स्वीकारिलें नृपें हि न कारण परदारविरत[4] तो होता ।
झाली उभयभ्रष्टा द्वेष नृपाविषयिं जाहला पुरता ॥ ४४ ॥
झाले न मी नृपाची नच पतिची म्हणुनि शोकयुत झाली ।
केलें अकाम तप बहु मरून ती दुष्ट राक्षसी बनली ॥ ४५ ॥
वैरें अतिशय केला मुनिवर रतिवर्धनास उपसर्ग ।
केवलबोध तयाला होउनि लाभे अनन्त अपवर्ग[5] ॥ ४६ ॥

[ लवण व अङ्कुशाचें पूर्वभववर्णन. ]

प्रियकर हितकर ऐशा बन्धुयुगानें हि घेतली दीक्षा ।
निर्मल तप बहु केलें मोहापासून जें करी रक्षा[6] ॥ ४७ ॥
साधुनि समाधिमरणा झाले ग्रैवेयकांत अहमिन्द्र ।
तेथुनि चवून झाले लव-कुश जणु भासतात रविचन्द्र ॥ ४८ ॥
काकन्दीपुरिं होता द्विज एक सुदामदेव नांवाचा ।
श्यामा नामें भार्या वाटे अमृतासमा जिची वाचा ॥ ४९ ॥

---

१ जन्मोत्सव. २ उत्तम राज्यलक्ष्मी. ३ नावेसारखा. ४ परस्त्रीत्यागी. ५ मोक्ष. ६ रक्षण.

चौथ्या पूर्वभवामधिं प्रियकर हितकर सुवन्धुयुग होते ।
वसुदेव सुदेव असे या पतिपत्नीस तनय झाले ते ॥ ५० ॥
या उभयांना झाल्या विश्वा आणि प्रियङ्गु या भार्या ।
यांचा गृहस्थधर्म हि होता प्रिय सकल सर्वदा आर्या ॥ ५१ ॥
निजपत्नीसह यांनीं दान दिलें तिलकसाधुवर्यास ।
उत्तरकुरुभूमीमधिं त्रिपल्यमनुजत्व[1] येइ सर्वास ॥ ५२ ॥
मुनिदानवृक्षसुफला भोगुनि ते दोन दम्पती नाकीं ।
ऐशानामधिं झाले देवपदा प्राप्त सुखद अवलोकी ॥ ५३ ॥
स्वर्गीयभोग भोगुनि सरतां तेथील आयु होऊन ।
च्युत ते येथें झाले प्रिय हितकर बन्धुयुगल गुणवान ॥ ५४ ॥
शुक्लध्यानाग्नीनें जाळुनि भवकाननास भूपास ।
रतिवर्धनास झाली मुक्तिरमा सकल सद्गुणावास ॥ ५५ ॥
ज्यांचें चरित्र कथिलें संक्षेपें भ्रातृयुगल हें च्वुनि ।
ग्रैवेयाहुनि झाले लवणाङ्कुश रामपुत्र या अवनिं[2] ॥ ५६ ॥
प्रियकर हितकर बन्धुद्वय माता जी सुदर्शना नामा ।
ती पतिपुत्रवियोगें भवि फिरली ज्या असेचि नच सीमा[3] ॥ ५७ ॥
आहे निदान वेडी चरणीं ती भ्रमुनि विपुल संसारीं ।
नानायोनीमध्यें मिळवून स्त्रीपणास अघकारी ॥ ५८ ॥
जिंकुनि कसें तरी ती झाली सिद्धार्थ पुरुषपर्यायीं ।
जिनधर्मी वहु तत्पर नानाविद्येंत चतुरतेस वरी ॥ ५९ ॥
लवणाङ्कुशास पाहुनि पूर्वभवप्रेम त्यास उद्भवलें ।
त्यानें नानाविद्याकलागुणीं चतुर शीघ्रतर केलें ॥ ६० ॥
यापरि लोकीं जाणुनि माता-पितरास सुलभ सुनरानें ।
कर्तव्य तें करावें जेणें होईल मुक्त दुःखगणें ॥ ६१ ॥
संसारवृद्धिकारण कर्म असे दुःख देइ तें सतत ।
जिनदास करुनि सुतपा कर्मा नाशून होति झणि मुक्त ॥ ६२ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे लवणाङ्कुशपूर्वभवाभिधानं नामाष्टोत्तरशतं पर्व ॥ १०८ ॥

---

१ तीनपल्य आयुष्याचा मनुष्यपणा अर्थात् देवकुरु व उत्तरकुरु या भोगभूमींत जन्मलेल्या मनुष्याचें आयुष्य तीनपल्यांचें असतें. २ पृथ्वीवर. ३ मर्यादा.

## एकशेनव्व्या पर्वांतील कथेचा सारांश.

पति रामचंद्र व पुत्र लवण आणि अंकुश यांचा सीतेनें वैराग्ययुक्त होऊन त्याग केला. पृथिवीमति आर्यिकेच्या समीप दीक्षा तिनें घेतली व बाह्याभ्यन्तर तपांत ती तत्पर राहिली. मनांत स्त्रीत्व हें निंद्य आहे असा विचार ती करीत असे. वनांत तप करण्यानें व वाऱ्यानें उडणाऱ्या धुळीनें तिचें अङ्ग मळकट झालें होतें. अस्नान-व्रतामुळें तिच्या अंगावर मळ सांचला होता. ती एक, दोन, तीन, चार आदिक उपवास करून आहार घेत असे. शीलगुणांत तत्पर व दोषांत विरक्त राहून मनांत पञ्चेन्द्रियांच्या विषयांचा उपेक्षाभाव उत्तरोत्तर वाढवीत असे.

महान् तपामुळें तिच्या देहांतलें मांस सुकून गेलें व फक्त तो हाडांचा पिंजरा राहिला. तिच्या देहांत स्नायु व चर्माशिवाय कांहीं शिल्लक राहिलें नव्हतें. तीव्र-तपश्चरणामुळें तिच्या स्वरूपांत विलक्षण फरक झाला होता ज्यामुळें तिला स्वकीय-माणसेंही ओळखू शकत नसत. याप्रमाणें तिनें बासष्ट वर्षे तपश्चरण करून अन्तसमयीं तेहतीस दिवसपर्यंत अन्न-पाण्याचा पूर्ण त्याग केला. पंचपरमेष्ठिचिंतनांत प्राणत्याग करून ती अच्युतस्वर्गांत प्रतीन्द्र झाली.

लक्षावधि देवींनीं त्याच्या मनाला आनंद होत असे. याप्रमाणें सीताचरित ऐकून गौतमगणधराला श्रेणिकानें विचारिलें— प्रभो, सीतेला प्रतीन्द्र पद प्राप्त झालें त्यावेळीं अच्युतस्वर्गांत इंद्र कोण होता हें मला सांगा.

गौतमगणधर म्हणाले— त्यावेळीं कैटभाचा बंधु मधुराजा अच्युतस्वर्गाचा इंद्र होता. सीता प्रतीन्द्र झाल्यावर चौसष्ट हजार वर्षेपर्यंत तो इंद्रपदानुभव घेत होता. यानंतर तो तेथून चवून कृष्णाचा पुत्र प्रद्युम्न होऊन जन्मला. व त्याचा धाकटा भाऊ कैटभ हाही शाम्ब नामक पुत्र झाला,

हा मधुराजा पूर्वी कोण होता असें विचारल्यानंतर गौतमगणधरांनीं त्याचें चरित्र याप्रमाणें सांगितलें:—

मगधदेशांत शालिग्राम नगरांत नित्योदित राजा राज्य करीत होता. त्याच नगरांत सोम पुरोहित अग्निला भार्येसह राहत होता. यांना अग्निभूति व वायुभूति नामक दोन पुत्र झाले. ते वेदज्ञ होते.

पण त्यांना आपल्या ज्ञानाचा मोठा गर्व होता. एके वेळीं त्या गांवच्या बाहेर बगीचांत सात्यकी नांवाचें एक विद्वान् जैनसाधु आपल्या संघासह येऊन उतरले. ते महातपस्वी होते. त्यांना अवधिज्ञान असल्यामुळें स्वतःचे व इतरांचे पूर्व व उत्तरभव जाणून सांगत असत. गावांतील श्रावक श्राविका त्यांच्या दर्शनाला चालले होते. हे दोघे विप्रपुत्र आपण त्यांना वादांत जिंकू अशा भावनेनें गेले.

हे वादेच्छेनें आले आहेत असें ओळखून त्यांनीं त्यांना तुमच्या मनांत काय आहे तें बोला संकोच धरूं नका असें म्हटले. तेव्हां ते दोघे म्हणाले— हे साधो, तुला काय कळतें तें बोल. मौन धारण करून कां बसला आहेस? सात्यकी मुनि म्हणाले— विद्वानांनो, तुम्ही कोठून आला? मला सांगा. आम्ही या गावाहून आलों आहोत एवढेंही तुला समजत नाहीं काय? मुनि म्हणाले— तें तर मला माहीतच आहे. पण आपण कोणत्या भवांतून आला आहांत हें आपणास मी विचारीत आहे. ते ब्राह्मणपुत्र म्हणाले— हें ज्ञान कोणालाच नसतें. मुनि म्हणाले— मी तुम्हाला कोणत्या भवांतून आलेले आहात हें पटवून देतों असें म्हणून त्यांनीं याप्रमाणें सांगितलें. 'तुम्ही मागील भवांत दोन कोल्हे होता. पामारक नांवाच्या शेतकऱ्याच्या शेतांत तुम्ही राहत होता. एके वेळीं तो पामारक नांगर, कुळव वगैरे शेतीचीं साधनें घेऊन तेथें गेला. दिवसभर शेतकाम करून संध्याकाळीं जेवण्यासाठीं घरीं आला. पण रात्रीं पावसाला सुरुवात झाली तो सात दिवसपर्यंत सारखा पडत राहिला. या दोन कोल्ह्यांना कांहीं खायाला न मिळाल्यामुळें त्यांनीं नांगराचे दोर व चामड्याची कातड्याची वादी कुरतडून खाल्ली. त्यामुळें ते पोट दुखून मरण पावले. व ते सोम ब्राह्मण व अग्निला ब्राह्मणी यांचे पुत्र होऊन जन्मले. आठव्या दिवशीं तो पामारक शेतांत गेला तेव्हां त्याला ते कोल्हे मरून पडलेले दिसले. त्यानें त्यांचीं कातडीं सोलून त्यांचे भाते केले व ते त्यानें घरांत अडकवून ठेविले आहेत. कालांतरानें तो शेतकरीही मरून आपल्या मुलाचा मुलगा झाला. थोर झाल्यावर त्याला पूर्वजन्म स्मरण झाल्यावर आपल्या मुलाला व सुनेला बाबा व आई कसें म्हणू याची त्याला

लाज वाटू लागली व तो लाजून मुका बनला. तो आज या जनसमूहांत आला आहे पाहा. असें म्हटल्याबरोबर तो मुका उठला. मुनींना त्यानें तीन प्रदक्षिणा घालून वंदन केलें व मला दीक्षा द्या असें म्हणाला. मुनींनीं दीक्षा दिली. ही पामारकाची कथा ऐकून कांहींजण मुनि झाले व कांहींनीं श्रावकांचीं व्रतें घेतलीं. कांहीं लोकांनीं पामारकाच्या घरीं जाऊन ते दोन भाते पाहिले. त्यांनीं मुनीच्या दिव्यज्ञानाची प्रशंसा केली व त्या द्विजपुत्रांचा त्यांनीं उपहास केला. सर्व लोक मुनींना वंदून आपल्या घरीं गेले.

इकडे ते दोघे ब्राह्मणपुत्र घरीं आले. त्यांना आपला मुनींनीं अपमान केला असें वाटू लागलें. त्यांनीं त्या मुनींना मारून टाकण्याचा विचार ठरविला. रात्रीं ते तरवारी घेऊन सात्यकी मुनीला मारण्यासाठीं निघाले. मुनि श्मशानाचेजवळ एका शिलेवर उभे राहून आत्मध्यानांत गढून गेले. या दोघा ब्राह्मणपुत्रांनीं त्यांना पाहिलें व म्यानांतून तरवारी काढून त्यांच्यावर वार करणार तोंच एका यक्षानें तेथें प्रगटून त्यांचे हात खिळून टाकिले.

प्रातःकालीं हें दृश्य लोकांनीं पाहिले व त्यांचीं त्यांनीं निंदा केली. द्विजपुत्रांचे माता-पिता तेथें धावत आले. त्यांनीं मुनींची प्रार्थना करून क्षमा मागितली. मुनि क्षमाशीलच होते. त्यांनीं क्षमा केलीच व यक्षाला मुनि म्हणाले– बा यक्षा, यांना सोडून दे. मुनिवचन मान्य करून त्यांना सोडलें. ते दोघे पुत्र व त्यांचे माता-पिता जैनधर्मी झाले. कांहीं दिवसांनीं माता-पितरांनीं जैनधर्म सोडला व वैदिकधर्माप्रमाणें ते वागू लागले. कालांतरानें मरण पावून ते भवांत फिरू लागले. पण पुत्रांनीं तो त्यागला नाहीं. आयुष्य समाप्तिसमयीं समाधिमरणानें ते दोघे सौधर्मस्वर्गांत देव झाले.

तेथील आयुष्य संपल्यावर समुद्रदत्त व धारिणी याचे ते पुत्र झाले. त्यांचीं पूर्णभद्र व काञ्चनभद्र अशीं नांवें होतीं. या भवांत त्यांनीं गृहस्थधर्माचें उत्तम पालन करून व दीर्घकालपर्यंत मनुष्यसुखाचा अनुभव घेऊन प्राणत्याग केला व सौधर्मस्वर्गांत देव झाले.

तेथून दिव्यसुख भोगून आयुष्यांतीं च्युत होऊन अयोध्यानगरींत हेमाभ राजा व अमरावती राणी यांच्या पोटीं ते मधु व कैटभ नांवाचे पुत्र झाले.

हे मोठे शूर होतें. अनेक राजे त्यांचे आज्ञाधारक होते. एकदा वीरसेन राजाचें जो मधुराजाचा मित्र होता त्याचें पत्र एक दूत घेऊन मधुराजाकडे आला. माझ्या

राज्यांत घुसून भीम नामक राजा माझ्या प्रजेला छळतो व लुटालूट करितो. यास्तव मला साहाय्य करण्याकरितां तूं ये असा पत्राशय होता. तो वाचून दूताला त्यानें पाठवून दिलें व थोड्या दिवसांत सैन्यासह वीरसेनाकडे तो गेला. वीरसेनानें त्याचें चांगलें स्वागत केलें. वीरसेनाच्या पत्नीचें 'चन्द्राभा' नांव होतें. ती अत्यंत सुंदर होती. तिला पाहून मधुराजा मोहित झाला. पण तो आपला कामविकार दाबून ठेवून भीमराजाला जिंकण्यासाठीं गेला. त्यानें त्याला जिंकिलें व आपल्या राजधानीकडे तो सैन्यासह निघून गेला. पण चन्द्राभेचा विषय त्याच्या मनांतून निघून गेला नाहीं. तिची प्राप्ति कशी करून घ्यावी याचा विचार करीत असतां त्याला एक उपाय सुचला. त्यानें 'वसंतोत्सव' करण्याचें ठरविलें. त्यानें आपल्या मित्राला– वीरसेनाला वसंतोत्सवासाठीं सपत्नीक येण्याचें आमंत्रण दिलें. तो चन्द्राभेसह आला.

कांहीं दिवस वीरसेनाला ठेवून नंतर मधुराजा त्याला म्हणाला– मित्रा, तूं राज्याची व्यवस्था पाहण्यासाठीं पुढें जा. कांहीं दिवसांनीं तुझ्या पत्नीला मी पाठवून देतो. वीरसेनराजा पुढें निघून गेल्यावर मधुराजानें चन्द्राभेला वश करण्यासाठीं कांहीं दिवस कोंडून ठेविलें. नाइलाजानें ती वश झाली. नंतर त्यानें तिला मुख्य राणीचें पद दिलें. व तिच्यासह तो कामसेवन करूं लागला.

वीरसेनराजा आपली पत्नी मधुराजानें हरिली हें पाहून वेडा झाला. राज्य त्यागून भटकूं लागला. कांहीं दिवसांनीं त्यानें मण्डव नामक जटाधारी साधूजवळ दीक्षा घेतली व पंचाग्नितप तो करूं लागला.

इकडे एकदा मधुराजा न्यायासनावर बसून एका परस्त्रीलंपटी मनुष्याचा न्याय करूं लागला. त्यांत त्याचा पुष्कळ वेळ गेला. त्यामुळें तो राजवाड्यांत उशीरानें आला उशीरानें येण्याचें कारण चन्द्राभेनें विचारिलें. सर्व ऐकून तिनें म्हटलें– प्रभो, त्या परस्त्रीलंपटाचा आपण चांगला आदर केला पाहिजे. त्याला आपण शिक्षा दिली हें योग्य झालें नाहीं. राजा रागावून म्हणाला– "अशा दोषी मनुष्याचा आदर न करतां क्रूर शिक्षा करणें हेंच योग्य आहे. जे परस्त्रीलंपट असतात त्यांना नरकप्राप्ति होते. त्यांचें पूजन करावें असें तूं कसें बोलतेस?" राणी म्हणाली– "महाराज, आपण धर्मपरायण केव्हांपासून झाला याची आठवण करा. अहो, राजा जो अपराध करतो तोच प्रजेनें केला असतां ती प्रजा शिक्षार्ह होते व राजा होत नाहीं -हें मला समजत नाहीं." या टोमण्यानें मधुराजा खजील झाला. पण तो कांहीं बोलला नाहीं अशींच कांहीं वर्षें तिच्यासह सुखोपभोग घेण्यांत निघून गेलीं.

एके वेळीं अयोध्येंत सहस्राम्रवनांत 'सिंहपाद' नामक मुनीश्वर आले. त्यांचा धर्मोपदेश ऐकून राजा मधूला वैराग्य झालें. त्यानें आपल्या कुलवर्धन नामक पुत्राला राज्य दिलें व तो आपल्या कैटभ भावाबरोबर सिंहपाद मुनीश्वराजवळ दीक्षा घेऊन घोर तप करूं लागला. अंतीं समाधिमरण साधून तो अच्युतस्वर्गांत इंद्र झाला. पूर्वी मधुराजा सुवृत्त नव्हता तथापि जिनशासनमाहात्म्यानें त्याला स्वर्गांत इंद्रपद प्राप्त झालें. तद्भवमोक्षगामी मानव पूर्वकालीं सदाचारी नसतांही प्रयत्नानें कर्मक्षय करून निर्वाण प्राप्त करून घेतात. याप्रमाणें गौतमगणधरांनीं श्रेणिकाला मधुराजाचें चरित्र सांगितलें. तें ऐकून भव्यांनीं तप करून स्वर्ग व मोक्षाची प्राप्ति करून घ्यावी. यानंतर पुढील- पर्वांत वीराष्टकचरित आचार्य सांगतील.

---

# एकशेनववें पर्व.

पतिपुत्रांना त्यागुनि सीता दीक्षा घेऊन ।
झाली सुतपश्चरणीं तत्पर विरक्त होऊन ॥ १ ॥
विहरत होते दिव्यज्ञानें बोधुनि सकलांना ।
समस्तभूषण महामुनीश्वर भूतलिं भव्यगणा ॥ २ ॥
ज्यांनीं केली सर्व अयोध्या गृहधर्मी निरत ।
धर्म अहिंसा मजबुत झाला स्थिर भूलोकांत ॥ ३ ॥
जैशी नरपत्याज्ञा पाळी प्रजा तशी त्यांची ।
प्रमाण मानुनि हितकर वागे सदैव जी साची ॥ ४ ॥
प्रतिदिनिं वाहे सद्धर्माचा प्रतिगृहिं जलपूर ।
स्वच्छमनाचा झाला गृहिगण मुनिपूजनिं चूर ॥ ५ ॥
कर्तव्याचा बोध जहाला श्रावकवर्गास ।
आली उन्नत सुदशा तेव्हां सुचरितमार्गास ॥ ६ ॥
अरमल्लींच्या तीर्थीं झाला सुधर्मजलपूर ।
वाढे सुव्रततीर्थीं त्याहुनि अतिशय भरपूर ॥ ७ ॥

( सीतार्यिकेचें तपश्चरण. )

निजसौन्दर्यें सुरललनांना मागें जी टाकी ।
शुष्क जहाली तपोऽनलानें[1] पसरे तेज मुखीं ॥ ८ ॥
होती सीताहृदयीं सन्तत भीति भवाचीच ।
पापविचारा कधिंहि न थारा त्याग तयाचाच ॥ ९ ॥
हृदयीं चिन्ती आर्या सीता स्त्रीत्व असे निन्द्य ।
परमेष्ठींचें पञ्चक लोकीं असे सदा वन्द्य ॥ १० ॥
जेथें केलें ध्यान भूतलीं तन्मल अङ्गास ।
लागे होई मलिन वस्त्रही इच्छि न सङ्गास ॥ ११ ॥
वस्त्रें आवृत[2] सदा उरःस्थल[3] केशहि डोयीचे ।
अस्नानव्रत पाळी तेणें अङ्गीं मल सांचे ॥ १२ ॥

---

१ तपरूपी अग्नीनें. २ आच्छादित. ३ वक्षःस्थल.

एक नि दोन नि तीन नि चार नि अनेक उपवास ।
करुनी पारण यथोक्त वनली सकलगुणावास ॥ १३ ॥
शीलगुणामधिं सुरक्त अतिशय विरक्त दोषांत ।
रुचिर[1] नि अरुचिर[2]विषयिं उपेक्षाभावचि हृदयांत ॥ १४ ॥
निजस्वरूपा सदा वघे ती ध्यासहि त्याचाच ।
मनन नि चिन्तन सदैव चाले विषय सदा तोच ॥ १५ ॥
करुनी वश मन तप जें ती करि तें साध्य न इतरां ।
शान्तिगुणांची झाली पुतळी भासे हीच धरा[3] ॥ १६ ॥
सुकुनी गेले मांस नि राही हाडांचा पिंजरा ।
स्नायु नि चर्माहुनि तद्देहीं अर्थ[4] नुरे दुसरा ॥ १७ ॥
भुवयांचा नच विलास झाली शुष्क नदी जैशी ।
पाहुनि चाले चार हात भू[5] चित्त सदैव वशी ॥ १८ ॥
सुतपा कारण देह असे तो टिकतो अन्नानें ।
दोषां त्यागुनि घेई तें ती न स्वच्छन्दानें ॥ १९ ॥
तीव्रतपानें स्वपरजनानें ओळखिलें न तिला ।
सीता आर्या नसे दुजी ही ऐसें जन वदला ॥ २० ॥
पाहुनि तिजला सुकथा चाले जनीं तिचीच सदा ।
ओळखती नच अन्योन्यातें वदती कोण वदा ॥ २१ ॥
यापरि केलें घोर तिनें तप वर्षं वासष्ट ।
दिवस तेहतिस निरन्नपाना[6] सोशी वहु कष्ट ॥ २२ ॥

( अच्युतस्वर्गांत सीतार्यिकेला प्रतीन्द्रपद प्राप्त झालें. )

परमाराधन विधिमधिं राहुनि देह तिनें त्यजिला ।
आरणाच्युतस्वर्गीं लाभे प्रतीन्द्रपद तिजला ॥ २३ ॥
जिनधर्माचा महिमा ऐसा जे त्या आचरती ।
नियमें स्त्रीत्वा प्राणी नाशुनि नृपदा मेळविती ॥ २४ ॥
सीता झाली सर्वसुरामधिं पुरुष नि देवेन्द्र ।
जिनधर्माचा महिमा गाती ऋषिगणरविचन्द्र ॥ २५ ॥

---

१ आवडते. २ नावडते. ३ पृथ्वी. ४ पदार्थ. ५ जमीन.
६ अन्नपाण्याचा त्याग केलेली.

अच्युतकल्पीं रत्नद्युतिगण पसरे आकाशीं ।
विमान शोभें त्यामधिं सुन्दर जैसा पूर्ण शशी ॥ २६ ॥
वैभवशाली परिवारासह ऐशा यानांत ।
सीता भोगी प्रतीन्द्रसत्पद अतिशय मोदांत ॥ २७ ॥
तो लक्षावधिदेवीनयनां आनन्दा वितरी ।
जसा चकोरीगणा पूर्णविधु तारापरिवारी ॥ २८ ॥
यापरि भूपें पापविनाशक सीताचरितास ।
ऐकुनि म्हटलें मोद जहाला माझ्या चित्तास ॥ २९ ॥
अच्युतकल्पीं प्रतीन्द्र झाली सीता ज्या समयीं ।
सुरपति होता कोण तिथें ही शङ्का मम हृदयीं ॥ ३० ॥
उद्भवली हे प्रभो ! कथावें आतां तत्कथन ।
पुण्यकथांच्या श्रवणें माझें प्रमुदित होय मन ॥ ३१ ॥
गौतम वदले श्रेणिकभूपा सुरपति त्या कालीं ॥
होता मधुनृप वन्धु जयाचा कैटभ गुणशाली ॥ ३२ ॥
तेथें त्यानें वाविस सागर वर्षें ऐश्वर्य ।
इन्द्रपदाचें अनुभविलें हे श्रेणिकनृपवर्य ॥ ३३ ॥
प्रतीन्द्र झाल्यावर ती सीता अच्युतकल्पांत ।
साठ हजार नि चार सहस्र हि वर्षापर्यन्त ॥ ३४ ॥
अणखी कांहिं अवधि लोटल्यावरती तो झाला ।
प्रद्युम्नाभिध कृष्णाचा सुत शंसिति वुध ज्याला ॥ ३५ ॥
जे मधुकैटभ पूर्वी होते ते या भरतांत ।
द्वारावतिमधिं कृष्णाचे सुत झाले वलवन्त ॥ ३६ ॥
श्रीप्रद्युम्न नि शाम्व तयांचीं सुन्दरशीं नांवें ।
रूप जयांचें अनुपम होतें अमरें जें गावें ॥ ३७ ॥
श्रीरामायण भारत याचें अन्तर जाणावें ।
सहस्र चौसठवर्षाचें तें असे मनिं ध्यावें ॥ ३८ ॥

( मधु व कैटभ कथा. )

नेमिजिनाच्या तीर्थीं झाला स्वर्गांतुनि चवुन ।
मधु कृष्णाचा पुत्र रुक्मिणी उदरीं जन्मून ॥ ३९ ॥

धनलाभानें अतृप्त राहे जैसें धनिकमन ।
वचनसुधा तव पिउनी नाथा मम मन तृप्तचि न ॥ ४० ॥
यास्तव मजला मधुइन्द्राची सुकथा सांगावी ।
ऐकायाची इच्छा आहे प्रसन्न मति व्हावी ॥ ४१ ॥
बन्धु तयाचा नामें कैटभ सुकथा त्याची हीं ।
सांगा मजला जी ऐकोनि प्रमुदित मन होई ॥ ४२ ॥
पूर्वभवामधिं या उभयांनीं केलें शुभ काय ।
लाभे रत्नत्रय या कैसें सांगा मज सदय ॥ ४३ ॥
वाणी तुमची चरित कथाया अतिशय पटु[1] आहे ।
चित्त नि मति मम तें ऐकाया सज्ज असे पाहे ॥ ४४ ॥
पिकती जेथें सर्वसुधान्यें ऐशा शुभमगधीं ।
धर्मार्थासह कामा सेविति जन नच अपराधी ॥ ४५ ॥
श्रीजिनमन्दिर सुन्दर शोभे विहरे साधुगण ।
जेथें शालिग्रामीं ' नित्योदित ' नृप नीतिचण[2] ॥ ४६ ॥
राहत होता सोमपुरोहित निजभार्येसहित ।
नाम अग्निला इच्छितसे जी निजपतिचें सुहित ॥ ४७ ॥
या उभयांना पुत्रांचें युग झाले गुणशाली ।
अग्निसमीर[3] नि भूतियुक्तशा नामें कलहवली ॥ ४८ ॥
वेदाध्यापन करिती विद्यामद निजमनिं धरिती ।
भोगामध्यें निमग्न राहुनि निर्दयता वरिती ॥ ४९ ॥
श्रमणगणाला घेउनि आले विहरत आचार्य ।
नाम जयाचें सुनन्दिवर्धन सद्गुणगणनिलयें[4] ॥ ५० ॥
शालिग्रामासन्निध उपवनिं योग्य निवासास ।
आले वसले नव्हता ज्यांना आशेचा पाश ॥ ५१ ॥
येणें ऐकुनि गांवांतिल जन साधुमहात्म्यांना ।
गेले वन्दन करावयाला प्रमोदभर ज्यांना ॥ ५२ ॥
वह्नि वायु[5] या बन्धुयुगानें पाहुनि लोकास ।
जाता कोठें ऐसें पुसिलें एक वदे त्यास ॥ ५३ ॥

---

१ चतुर. २ नीतिचतुर. ३ अग्निभूति व वायुभूति. ४ चांगल्या गुणांचें घर. ५ अग्निभूति व वायुभूति या दोन भावांनीं.

असे दिगम्बर आला मुनिजन त्यांना वन्दाया ।
जात असें ही वार्ता कथिली येई रोष तया ॥ ५४ ॥
अग्निभूतिला अपुल्या भावा घेउनि अतिकुपित ।
वदला वादीं दिगम्बरा त्या जिंकिन मी खचित ॥ ५५ ॥
ग्रहतारांच्या मध्यें जैसा सुन्दर चन्द्र दिसे ।
साधूंच्या श्रीमुनीन्द्र मध्ये तो अतिशय विलसे ॥ ५६ ॥
या या ऐसे सात्यकिमुनिवर विप्रयुगा वदले ।
बैसुनि बोला तुम्ही तुमच्या हृदयीं जें असलें ॥ ५७ ॥
ब्राह्मण वदला एक तयांना वाद करायाचा ।
हेतु असे कां न धरा हृदयीं आपण सङ्कोचा ॥ ५८ ॥
तत्पर आहो वाद कराया ऐसें बोलून ।
सन्निध आले द्विजयुग वसले मनिं रागावून ॥ ५९ ॥
वदले उद्धत होउनि साधो तुज कळतें काय ।
अमुच्या पुढती वद मौन न धरि वाटें काय भय ॥ ६० ॥
अवधिज्ञानी मुनिवर वदले आला कोठून ।
शालिग्रामाहून द्विज ते वदले तैं हसुन ॥ ६१ ॥
आला तुम्ही या गांवाहुनि हें मजला कळलें ।
पूर्वभवांतुनि येणें तुमचें सांगा कां घडलें ॥ ६२ ॥
या प्रश्नाचें श्रमणा उत्तर तुजही ठावे न ।
चातुर्याचें गमतें तुजला काय असें वचन ॥ ६३ ॥

( अग्निभूति व वायुभूतीच्या पूर्वभवांचें कथन. )

मुनिवर वदले आतां तुमच्या कथितों पूर्वभवा ।
जेणें तुमच्या शीर्षीं होइल अति उद्द्योत नवा ॥ ६४ ॥
या गांवाच्या सन्निधशा वनिं तुम्ही दोघेही ।
कोल्हे झाला होता द्विज हो अन्योन्यस्नेही ॥ ६५ ॥
गांवीं होता याच पामरक नामें शेतकरी ।
गेला होता शेतीं घेउनि उपकरणें सारीं ॥ ६६ ॥
सूर्यास्ताचे वेळीं आला जेवायास घरीं ।
उपकरणें तीं नन्तर आणिन हृदयीं वेत करी ॥ ६७ ॥

आले अञ्जनशैलासम नभिं काळे विपुल ढग ।
जल रात्रन्दिनि सन्तत वर्षिति जणु येउनि राग ॥ ६८ ॥
सन्तत झाली सप्तदिनावधि भीषण जलवृष्टि ।
थांबे जेव्हां आले कोल्हे शेतीं अतिकष्टी ॥ ६९ ॥
उपकरणें तीं ओलीं त्यानीं चिखलें भरलेलीं ।
भक्षियलीं बहु दुःसह बाधा होतां मृति आली ॥ ७० ॥
शान्तमनानें मरुनि अग्निलागर्भी येऊन ।
द्विजसोमाला अग्नि वायु हे झाले सुत दोन ॥ ७१ ॥
इकडे गेला शेतकरी तो पुनरपि शेतांत ।
मृतकोल्ह्यांना आणवुनी तो अपुल्या सदनांत ॥ ७२ ॥
समस्त चर्मा सोलुनि त्यांचें बनवी तो भातें ।
मरुनी झाला तो स्वसुताचा सुत निश्चित जें तें ॥ ७३ ॥
झालें त्याला पूर्वभवाचें स्मरण तदा मौन ।
धरिलें त्यानें पुत्रपुत्र[1] मी झालों अति दीन ॥ ७४ ॥
निजपुत्राला बाप कसें वदु सुनेस मी आई ।
मौन तयानें या सङ्कल्पें धरिलें निजहृदयीं ॥ ७५ ॥
पटलें माझें न विवेचन तरि हा येथें स्वजनीं ।
बसला आहे पाहा जन हो अपुल्या नयनांनीं ॥ ७६ ॥
बोलावुनि त्या गुरुवर्यानें म्हटलें पूर्वभवीं ।
'पामर' नामक शेतकरी तूं हें हृदयीं ध्यावी ॥ ७७ ॥
संसाराची स्थिति ही ऐशी जैसा नट रङ्गीं ।
राजा होउनि किङ्कर होतो तैसा हा अङ्गी[2] ॥ ७८ ॥
जनक असुनिही मरुनी होतो सुत निजतनयाचा ।
मरूनी माता पत्नी लाभे निज भवजननीचा ॥ ७९ ॥
खालुनि वरती वरुनिहि खालीं घटमाला फिरते ।
कर्मवशें या जीवदशामधिं परिवर्तन[3] होतें ॥ ८० ॥
संसाराची जाणुनि ऐशी निन्द्यदशा सोड ।
मूकपणा हा वत्सा वदनांतुनि शुभ वच काढ ॥ ८१ ॥

१ मुलाचा मुलगा. २ प्राणी. ३ बदल.

ध्यान[1] होम जे करिती सन्तत शान्ति मनीं धरिती ।
मुक्तिसाधनीं तत्पर राहुनि निजरूपीं रमती ॥ ९५ ॥
जैन असे मुनि तेचि ब्राह्मण हृदयीं समजावें ।
चरित तयाचें उज्ज्वल निजपरहितकर नित गावें ॥ ९६ ॥
परि आरम्भीं परग्रहीं जे असती आसक्त ।
ब्रह्मचर्य नच ज्यांना रमती जे नित नारींत ॥ ९७ ॥
नामें ब्राह्मण नसे तयांची क्रिया तशी म्हणुन ।
न वन्द्य लोकां कैचें त्यांना ब्रह्मात्मज्ञान ॥ ९८ ॥
जसें नराचें सिंह अग्नि वा देव सुनाम वसे ।
परि तो सिंह न अग्नि न देवहि परमार्थं विलसे ॥ ९९ ॥
त्यापरि विरतिभ्रष्ट असे हे ब्राह्मण नांवानें ।
कथली वाळा चरणीं तिजला सोनीं कोण म्हणें ॥ १०० ॥
श्रमणचि समजा ब्राह्मण अर्थें ऋषि क्षमी धीर ।
दान्त जितेन्द्रिय महातपस्वी तेचि खरे वीर ॥ १०१ ॥
लोकोत्तरगुण सन्तत त्यांचें हृदयीं चिन्तून ।
ध्याती गाती नर जे जाती[2] भवसागर तरुन ॥ १०२ ॥

( परिव्रजक व्याख्या )

संसाराचा हेतु परिग्रह ज्यांनीं वर्जियला ।
पारिव्राजक तेचि तयांची बहु सुन्दर लीला ॥ १०३ ॥

( श्रमण व्याख्या )

धनधान्यादि-क्रोधादिक हे वाह्यान्तरसङ्ग ।
नसती ज्यांना तेचि श्रमण ब्राह्मण निःसङ्ग ॥ १०४ ॥

( क्षपक व्याख्या )

तीव्रतपानें क्षपिती पापा न राग न द्वेष ।
क्षपक तयांना वदणें युक्तचि ते सद्गुणकोष ॥ १०५ ॥
वीतराग ते यमी दिगम्बर योगी निर्ग्रन्थ ।
ध्यानी ज्ञानी ते दाखविती सन्ता मुक्तिपथ ॥ १०६ ॥

---

१ आत्मध्यानरूपी होम. २ नाशाप्रत नेतात.

म्हटलें त्यांना श्रमणा नग्ना तुजला रक्षोत ।
आम्हा ज्यांनीं निन्दियलें मनिं होउनि अतिरुष्ट ।। ११९ ।।
श्रेष्ठचि आम्ही ब्राह्मण भूतलिं आहोतचि देव ।
या नगराचा रक्षक नमितो आम्हां नृपराव ।। १२० ।।
निर्लज्जा तूं आम्हां बोलुनि केल्हे उपहास ।
केलेला मनिं खेदा देतो कापी हृदयास ।। १२१ ।।

( ब्राह्मणपुत्रद्वयाचे हात यक्षानें खिळिले. )

क्रोधानें जे लाल जहाले उद्यत माराया ।
आला गुह्यक[1] तेथें तेव्हां हृदयीं धरुन दया ।। १२२ ।।
ध्यानीं तत्पर कायोत्सर्गीं निर्दोष श्रमणा ।
माराया या उद्यत झाले निर्दय करुनि मना ।। १२३ ।।
हे तरवारी उद्गारुनि[2] निज करुनी वर हात ।
घावा घालिति तोंच सुयक्षें निश्चल ते त्वरित ।। १२४ ।।
महामुनींना अशा अकार्यें पीडित जणु कोणी ।
करीत आहे निवारण्या त्या रक्षक जणु नृमणि[3] ।। १२५ ।।
उभे राहिले दोन्ही बाजुस खड्ग उगारोनी ।
सुकल्पनाही ऐशी उपजें सुन्दर सुकविमनीं ।। १२६ ।।
झाला प्रातःकाल नि आला दिनकर उदयाला ।
मुनीन्द्र सात्यकि योग विसर्जुनि शान्तपणें बसला ।। १२७ ।।
सर्व[4] चतुर्विध पुरवासी जन विस्मित होऊन ।
आले तेथें भयदद्दश्य हें वदले पाहून ।। १२८ ।।
अग्नि वायु हे येथें आले श्रमणा माराया ।
धिक्कारिति ते समस्त सज्जन तया खलां उभयां ।। १२९ ।।

( त्या दोघे ब्राह्मणपुत्रांनीं याप्रमाणें विचार केला. )

" अग्नि वायु हें चिन्तन करिते झाले निजहृदयीं ।
मुनिप्रभावें आम्हां निश्चल केलें या समयीं ।। १३० ।।
मुक्त जहालों या कष्टांतुनि जगलों जरि आम्ही ।
धारण करु जिनधर्मा समजू जिनवर हा स्वामी " ।। १३१ ।।

---

१ यक्ष. २ उगारून. ३ मनुष्यश्रेष्ठ. ४ मुनि, आर्यिका, श्रावक आणि श्राविका असे चार संघ.

यापरि असतां करित विचारा जनक तिथें आला ।
सोमदेव हा निजप्रियेसह मुनिवर्या वदला ॥ १३२ ॥
चरणीं वन्दन करुनी नाथा कुपुत्र हे माझे ।
कुकृति तयांनीं केली अमुच्या ती न कुला साजें ॥ १३३ ॥
कोपा त्यागा रक्षू आम्ही अपुला आदेश ।
आमृति[1] पाळू जेणें होइल इहपरहितपोष ॥ १३४ ॥
मुनिवर वदले साधूंच्या मनिं कोप न करि वास ।
शत्रुमित्र सम मानिति जीवीं धरिती समतेस ॥ १३५ ॥
अमुचा आहे जीवगणावरि दयाक्षमाभाव ।
रोष न कधिंही समचि मानितो नित रंक नि राव ॥ १३६ ॥
कोपें झाले लाल जयाचे डोळे यक्ष वदे ।
या दुष्टांचें कृत्य कुणाच्या न मना खेदा दे ॥ १३७ ॥

( साधुजनांना दुःख देणारे दुःखी होतात. )

जे साधूंना पाहुनि निन्दिति जे त्यांना छळिती ।
त्या दुष्टांना खूपचि दण्डिन पाहु कसें पळती ॥ १३८ ॥
जे अवमानिति साधुगणा ते दुःखी होतात ।
स्वदोष बघति न साधुजनीं ते योजिति खल सतत ॥ १३९ ॥
दर्पणिं कोणी नर मुख पाही करी तसें दिसतें ।
वक्र करी तें तैसें दिसतें अवक्र सुन्दर तें ॥ १४० ॥
त्यापरि साधुस बघतां जैसे मानव भाव करी ।
तैसें फल त्या सुखदुःखाभिध मिळतें अवधारी ॥ १४१ ॥
करि उपहासा रडणें हें फल त्याला लाभेल ।
निष्ठुरवचनें भाण्डण त्याच्या नशिवीं येईल ॥ १४२ ॥
मारी ठोकी हाणी त्याच्या वध फल ये पदरीं ।
द्वेषा करि जो द्वेष तयाचा जन धरि नित्य उरीं ॥ १४३ ॥
निन्द्यभाव जे धरिती हृदयीं साधुगणाविषयीं ।
अनुरूपचि फल त्यांना मिळतें समजा हें हृदयीं ॥ १४४ ॥
मारायाचा प्रयत्न केला या तव तनयांनीं ।
स्तम्भन[2] केलें मीच तयाचें मुनिवर्यें न गणीं ॥ १४५ ॥

---

१ मरेपर्यंत. २ एके ठिकाणीं खिळून टाकिलें.

वेदज्ञानी आम्ही ऐसा धरिती अभिमान ।
निन्द्याचारी या दुष्टांची तोडिन मी मान ।। १४६ ।।
करी गदायुध ज्याच्या होतें उग्र अशा यक्षा ।
पाहुनि वदला सोमदेव तो करि आम्हा शिक्षा ।। १४७ ।।
जोडुनि कर ते ठेवुनि भालीं वन्दुनि मुनिचरण ।
प्रमुदित व्हावें हे मुनिवर्या आलों तुज शरण ।। १४८ ।।
पुत्रयुगाला सोडुनि द्यावें ऐसें सांगावें ।
आपण यक्षा विनती करितों चरणयुगीं भावें ।। १४९ ।।

( मुनीश्वरानें यक्षाला ब्राह्मणपुत्रांना सोडून दे असें
म्हटल्यावर यक्षानें त्यांना सोडून दिलें. )

नन्तर वदले मुनिपति यक्षा यांच्या दोघांची ।
क्षमा करी वा मोह प्राण्या घे ध्यानीं जाची ।। १५० ।।
हे पुण्यात्म्या यक्षा श्रीजिनशासनिं केलीस ।
वत्सलता[1] तूं द्विजसुत-युगलीं करि वा प्रीतीस ।। १५१ ।।
माझी आज्ञा मान्य करी वा यांचा वध न करी ।
हे जिनधर्मीं होतिल तत्पर जो जन हितकारी ।। १५२ ।।
हे मुनिवर्या आज्ञा अपुली मान्य मला आहे ।
अपकाऱ्यावरि उपकृति करिशी तूं एकचि पाहे ।। १५३ ।।
बोलुनि यापरि मुक्त तयांना तेणें झणि केलें ।
निजमणिमयगृहिं जाण्यापूर्वीं मुनिपद वन्दियलें ।। १५४ ।।
इकडे द्विजसुत सुभक्तिभावें सुनम्र होऊन ।
प्रदक्षिणात्रय देउनि भालीं करयुग ठेवून ।। १५५ ।।
वन्दन करिते झाले मुनिवरहितकारीचरणा ।
सम्यक्त्वासह अणुव्रतांनीं करिती पूत मना ।। १५६ ।।
सुज्ञ श्रावक झालें आणिक गृहिधर्मीं रमले ।
जननीजनकें धर्मा त्यागुनि दुर्मरणा वरिलें ।। १५७ ।।
तेणें त्यांची भ्रान्ति भवामधिं अगणितशी झाली ।
त्यांचीं दुर्भवलता[2] अपरिमित दुःखफळें फळली ।। १५८ ।।

१ अतिशय आदर, २ वाईट संसारवल्ली.

यज्ञीं हिंसा विषसम मानुनि केला त्याग तिचा ।
झाला आत्मा निःसन्देही जिनधर्मी त्यांचा ॥ १५९ ॥
समाधि साधुनि मरणोत्तर ते पहिल्या सुरलोकीं ।
महर्द्धिधारी देव जहाले झाले दिव्य सुखी ॥ १६० ॥
सर्व इन्द्रिया आणि मनाला आनन्दित करि जें ।
तयें भोगिलें सुख चक्रीचें ज्यापुढति न साजे ॥ १६१ ॥
आयुष्यान्तीं चवून तेथुनि पुरीं विनीतेंत[1] ।
समुद्र, धारिणि यांचे झाले सुतयुग अतिकान्त ॥ १६२ ॥
( पूर्णभद्र व काञ्चनभद्र समाधिमरणानें सौधर्म देव झाले. )
पूर्ण नि काञ्चन होतीं त्यांचीं नांवें भद्रान्त ।
जिनधर्मी ते तत्पर राहति जो करि कर्मान्त ॥ १६३ ॥
गृहस्थधर्मा धारण केलें निर्व्याकुलभावें ।
सुचरित त्यांचें सदा मुखानें विबुधगणें[2] गावें ॥ १६४ ॥
श्रावकधर्में प्राणा त्यागुनि झाले सौधर्मी ।
सुर ते ज्यांची जिनतत्त्वामधिं होती मति मर्मी[3] ॥ १६५ ॥
दीर्घावधि सुख भोगुनि तेथें च्युत पुनरपि झाले ।
हेमनाभ नृप अमरावतिच्या कुक्षीं[4] उद्भवले ॥ १६६ ॥
नांवें त्यांचीं प्रसिद्ध होतीं मधु कैटभ ऐशीं ।
राज्य अयोध्यापुरींत करिती अरिगण ज्या सुवशी ॥ १६७ ॥
( मधु व कैटभ दोघे भाऊ भीमराजाला जिंकण्यास निघाले. )
दोघे भाऊ धीर नि शूर नि यमसम नृपतिगणा ।
सगळी पृथ्वी वश ते करिते झाले श्रीसदना[5] ॥ १६८ ॥
भीम सुनामा भूपति कोणी महाबली होता ।
पर्वतवेष्टित-नगरनिवासी प्रजाधना हर्ता ॥ १६९ ॥
वीरसेननृप मधुराजाचा होता सन्मित्र ।
तयें प्रेषिलें एका दूता देउनि करिं पत्र ॥ १७० ॥
या खलभीमें नानानगरें केलीं उद्ध्वस्त ।
जनता झाली अतिशय पीडित धनधान्यें रहित ॥ १७१ ॥

---

१ अयोध्येंत. २ देवसमूहें किंवा विद्वत्समूहानें. ३ मर्म जाणणारी.
४ पोटीं. ५ लक्ष्मीचें घर.

यास्तव भीमा जिंकायातें ये तूं मधुमित्रा ।
सज्ज जाहला अरिवरि जाया वाचुनि सखिपत्रा ॥ १७२ ॥
समस्तसेना वेगें रागें घेउनि मधुनृपति ।
वीरसेननृप होता जेथं आला शीघ्रगति ॥ १७३ ॥
वटपुरपुरिं नृप वीरसेन ह्या आणी मित्रास ।
स्नेहें मिरवित वाटे त्याला मिटला हृत्त्रास ॥ १७४ ॥
चन्द्रासम मुख सुवक जियेचें ऐशी मित्राची ।
अनुपमसुन्दर जी ' चन्द्राभा ' पत्नी नेत्राची ॥ १७५ ॥
वाटे फेडी जणु पारण ती आरति घेऊन ।
आली ओवाळाया चित्तीं हर्पित होऊन ॥ १७६ ॥
पाहुनि तिजला चञ्चल झालें मन मधुराजाचें ।
वाटें जीवन हिच्याविणें त्या निःसारचि साचें ॥ १७७ ॥
हिच्याविणें हें सर्व भूमिचें राज्य असे विफल ।
मिळेल जरि हीं जीवन होइल धन्य प्राप्तफल ॥ १७८ ॥
चिन्तन ऐसें करून युद्धीं भीमा जिंकून ।
केला वश निजपराक्रमानें अन्य हि शत्रुगण ॥ १७९ ॥

( मधुत्सवाच्या निमित्तानें वीरसेनराजाला सपत्नीक
बोलावून त्याचा आदर केला. )

कामाकुल मधु चन्द्राभेचा मनांत अभिलाष ।
धरून गेला निजपुरिं दर्शवि वरून सन्तोष ॥ १८० ॥
मधूत्सवाचें[1] निमित्त कळवुनि नृपा सपत्नीका ।
बोलावुनि तो सादर दानें प्रेषी शीघ्र सखा ॥ १८१ ॥
निजपत्नीसह वीरसेननृप बाह्योद्यानांत ।
आला स्वागत केलें मधुनें आणुनि भवनांत ॥ १८२ ॥

( राज्यरक्षणासाठीं तूं पुढें जा तुझी पत्नी कांहीं दिवसांनीं पाठवून देतों असें म्हणून त्यानें वीरसेनाला पाठवून चंद्राभेला मधुराजानें आपली पट्टराणी केलें. )

आदर अतिशय करुनि तयाचा वदला नृप त्याला ।
जाइ पुढें बा पुर रक्षाया अपाय[2] बहु ज्याला ॥ १८३ ॥

---

१ वसंतोत्सव जो वसंतऋतूंत राजे करितात. २ शत्रूपासून धोका.

पत्नी देइन पाठवुनी तव चिन्ता न करी तूं ।
अल्पदिनांनीं न धरी मित्रा लवहि मनीं किन्तु ॥ १८४ ॥
यापरि कपटें पाठवुनी त्या, तो चन्द्राभेला ।
कोंडुनि ठेवी जोंवरि वश ती झाली नच त्याला ॥ १८५ ॥
वश झाल्यावरि महाभिषेकें देवीपद देई ।
सुखसागरिं तो मग्न तिच्यासह रात्रंदिन होई ॥ १८६ ॥
माझी पत्नी मधुभूपानें हरिली जाणून ।
वेडा झाला भटके भूवर राज्या त्यागून ॥ १८७ ॥
मण्डल नामक असे तपस्वी त्याचा होऊन ।
शिष्य जलप्रिय नामें कुतपीं झाला बहु लीन ॥ १८८ ॥
पञ्चाग्निक तप करुनि तयानें केलें जनतेला ।
विस्मित अतिशय मानि तुपाहुनि उत्तम तो तेला ॥ १८९ ॥
एके वेळीं नृपपति मधु हा धर्मासनिं बसला ।
न्यायविचारीं सचिवगणासह गढुनी बहु गेला ॥ १९० ॥
सूर्यास्ताच्या समयीं राजा अन्तःपुरिं आला ।
चन्द्राभेनें पुसिलें त्याला उशीर कां झाला ॥ १९१ ॥
नर परदारालम्पट कोणी त्याचा व्यवहार ।
होता अतिशय जटिलचि[१] तेणें उशीर हो फार ॥ १९२ ॥
विलम्बहेतु श्रवुनी वदली हासुनि ती भूपा ।
परभार्याप्रिय नर पूजी वा समज न मनिं पापा ॥ १९३ ॥
भाषण ऐकुनि तिचें वदे तो रागावुनि राजा ।
जे परदारालम्पट त्यांना द्यावी क्रूर सजा[२] ॥ १९४ ॥
त्या पुरुषाधम लोकां पञ्चक-दण्डें दण्डावें ।
परनारीचा स्पर्शहि करितां वदतां वा भावें ॥ १९५ ॥
जे परदारालम्पट होति न निवृत्त त्यांतून ।
नरकीं जाती ते पूजावें योग्य न हें वचन ॥ १९६ ॥
बोले पुनरपि देवी भूपा भूपालनचतुरा[३] ।
झाला आपण धर्मपरायण केंव्हां स्मरण करा ॥ १९७ ॥

१ गुंतागुंतीचा. २ शिक्षा. ३ पृथ्वीरक्षणांत चतुर.

परनारीचें सेवन करणें मोठा दोप असे ।
निग्रह राजन् करी स्वत:ला हें विस्मृत कैसें ॥ १९८ ॥
परदारेच्छुकलोकीं आपण पहिले आहात ।
राजा जैसा जन हि तैसे कोण न दोपांत ॥ १९९ ॥
राजा जेथें परनारीच्छुक तेथें न्यायाचें ।
नसे प्रयोजन राहा स्वस्थचि ढोंग न हें साचें ॥ २०० ॥
बीजें ज्यानें अङ्कुरलीं जें जनजीवन झालें ।
ऐशा पाण्यांतुनि अनलाचे स्फुलिंग उद्भवले ॥ २०१ ॥
बोचक भाषण बोलुनि भूपा कुण्ठित राणीनें ।
केलें उत्तर देई कांहीं तरि निर्लज्जपणें ॥ २०२ ॥
परि मोहाच्या वश तो राहुनि भोगसुखीं दङ्ग ।
चन्द्राभेसह चिरकालीं जणु राही स्मर साङ्ग[1] ॥ २०३ ॥
आले एके वेळीं मुनिवर विहरत साकेतीं ।
सहस्राम्रवन नामोद्यानीं प्रसिद्ध जे जगतीं ॥ २०४ ॥
सिंहचरण हें नांव तयांचें सिंहव्रतधारी ।
मूल नि उत्तरगुणव्रतामधिं निश्चल हितकारी ॥ २०५ ॥
जाउनि विनयें मधुनृप त्यांच्या चरणयुगा वन्दी ।
निजभावासह चन्द्राभेसह होउनि आनन्दी ॥ २०६ ॥
ऐकुनि त्यांची सुहितदेशना[2] जी जिनधर्माची ।
सुविरत झाली भोगापासुनि सुवृत्ति भूपाची ॥ २०७ ॥
या भोगांच्या आसक्तीनें होय भवीं भ्रमण ।
जाणुनि झाली श्रीचन्द्राभा सुविरत गुणखाण ॥ २०८ ॥
मधुराजा तो निजभावासह वन्दुनि मुनिचरणा ।
झाला दीक्षित पाळित राही सदैव मुनिचरणा ॥ २०९ ॥

आर्यावृत्त.

ज्याला सुराज्य अर्पण केलें कुलवर्धनें नि मधुपुत्रें ।
स्वपरास मुदित केलें भूपालन सुखद विपुलगुणसत्रें[3] ॥ २१० ॥
मधुनें बहुशतवर्षें केलें दुश्चरतपास बन्धुसह ।
साधुनि समाधिमरणा झाला तो अच्युतेन्द्र निर्मोह ॥ २११ ॥

---

१ शरीरधारी. २ धर्मोपदेश. ३ गुणांचें घर.

हा जिनशासनमहिमा पूर्वी मधुनृप सुवृत्त नसतांही ।
इन्द्रपदाधिप झाला विस्मय वाटे न यांत केव्हां ही ॥ २१२ ॥
चरमशरीरी मानव सुवृत्त नसतां हि पूर्वकालांत ।
कर्मक्षय प्रयत्नें करून निर्वाण घेति पदरांत ॥ २१३ ॥
यापरि मधुनृपसुचरित सांगितलें श्रेणिकास गणिवर्यें ।
सीताप्रतीन्द्र झाली तिथें करावें म्हणून तप आर्यें ॥ २१४ ॥
यानन्तर मी कथितों वीराष्टकचरित चित्तहर साचें ।
ऐकावें जिनदासें पापविनाशक नि सुखदसुरसाचें ॥ २१५ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे मधूपाख्यानं नाम नवोत्तरशतं पर्व ॥ १०९ ॥

## एकशेदहाव्या पर्वांतील कथेचा सार.

काञ्चननगरांत काञ्चनरथ राजा शतन्हदा राणीसह आनंदानें प्रजापालन करीत होता. या उभयतांना रतिप्रमाणें दोन सुंदर कन्या होत्या. त्या सर्व कलाचतुर होत्या. विवाहाला योग्य झाल्या असें पाहून राजानें स्वयंवर करण्याचें ठरविलें. अनेक विद्याधरराजे व भूगोचरीराजाकडे त्यानें लेखासह दूत पाठविले. अयोध्येंत श्रीराम व लक्ष्मणांनाही दूतानें लेख दिला. त्या उभयतांनीं आपल्या सर्व पुत्रांना स्वयंवरासाठीं पाठविण्याचा निश्चय केला. अनेक विमानांत राम-लक्ष्मणाचे पुत्र बसले व परिवारासह वैभवानें काञ्चननगरास पोचले. लवण व अङ्कुश हे त्यांत मुख्य होते. या सर्वांची सेवा करण्यासाठीं अनेक विद्याधरही त्यांचेबरोबर होते.

स्वयंवरमण्डप अतिशय सुंदर होता. राम-लक्ष्मणाचे पुत्र आलेले पाहून कांहीं राजांना या कन्या आपणाला वरणार नाहींत अशा विचारानें खिन्नता वाटली. हे सर्व राजपुत्र तेथील मंचकावर बसले. सर्व पुत्र देवकुमारासारखे दिसले व लवण आणि अङ्कुश हे त्यांत इन्द्र-प्रतीन्द्रासारखे शोभू लागले.

जेव्हां कन्या वरमाला घेऊन मंडपांत आल्या तेव्हां त्यांचें अप्रतिमरूप पाहून सर्व राजे विस्मित झाले. कांहीं राजे तर त्यांना पाहून गोंधळले. प्रत्येक राजाचे देश, कुल, धन व पराक्रमादिगुणांचें वर्णन कञ्चुकिनें कन्यांना सांगितलें. तें ऐकून त्यांना ते राजे न रुचल्यामुळें त्या पुढें चालल्या. त्यामुळें मागील राजे खिन्न झाले. आपण येथें आलों नसतो तर बरें झालें असतें असें त्यांना वाटलें. पुढील राजांना आम्हाला या वरतील किंवा नाहींत कोण जाणें असा संशय उत्पन्न झाला. त्यामुळें तेहि खिन्न झाले. क्रमक्रमानें त्या कन्या लव-अङ्कुश जेथें बसले होते तेथें आले. त्यांना पाहिल्याबरोबर त्या कन्यांच्या मनांत त्यांच्याविषयीं अभिलाष उत्पन्न झाला.

लवणाकडे जी कन्या आली होती तिचें नांव मंदाकिनी होतें. तिच्या गालांवर लवणाला पाहून हास्य शोभू लागलें. सलज्ज होऊन तिनें त्याच्या गळयांत माळ घातली. दुसऱ्या कन्येचें नांव शशांकभाग्या होतें. तिच्या दृष्टीस अङ्कुशाचे गांभीर्यादिगुण पडले व ती आनंदित झाली. तिनें अङ्कुशाच्या गळयांत माळ घातली. त्यावेळीं लवण व अङ्कुशांच्या परिवारानें त्या उभयांचा वारंवार जयजयकार केला.

लक्ष्मणाचे अडिचशे पुत्र स्वयंवरासाठीं आले होते. त्यांत आठ पुत्र मुख्य होते. त्यांना मोठा क्रोध आला व ते लवण-अङ्कुशाबरोबर युद्ध करण्यासाठीं उद्युक्त झाले.

आतां भयंकर प्रसंग उद्भवेल असें वाटून काञ्चनरथानें आपल्या दुसऱ्या आठ कन्याबरोबर लक्ष्मणाच्या आठ मुख्य पुत्रांचे विवाह लावून युद्ध टाळलें.

ज्यांनीं लवण व अङ्कुशांना वरिलें त्या कन्यांची अभिलाषा करणें हें योग्य नाहीं असा विचार करून ते लक्ष्मणपुत्र शांत झाले. पण त्यांच्या मनांत वैराग्याचे विचार याप्रमाणें उद्भवले.

रूपवतीराणीच्या पुत्रानें सर्व आपल्या भावांना म्हटलें– बंधूनो, या दोन कन्यांपैकीं एकीनेंतरी आपणापैकीं कोणास वरणें योग्य झालें असतें. कारण आम्ही हरिपुत्र-लक्ष्मणाचे पुत्र आहोत. आम्हामध्यें वैभव, परिवार, कांति वगैरे गुण लवणां-कुशा प्रमाणेंच आहेत. परंतु जगांत प्राणिमात्रामध्यें वैचित्र्य दिसतें व ते कर्मोदयामुळें होतें.

आमचे ठिकाणीं लव-अङ्कुशासारखें, कर्म नाहीं. यास्तव शोक करणें, खिन्न होणें हें योग्य नाहीं. आपण सर्व या कर्मभूमीला स्वर्गाप्रमाणें मानू लागलों आहोत. हें पण योग्य नाहीं. दान, पूजा, तप आम्ही न केल्यामुळें आत्मज्ञानविमुख झालों आहोत.

यानंतर ते सर्व कुमार लक्ष्मणाकडे आले व त्यांनीं लक्ष्मणाला विनयानें नमस्कार केला. नंतर म्हणाले कीं,– पिताजी, या अशुभकर्मापासून आम्हाला पीडा होत आहे. ही पीडा माता, पिता, बंधु-भगिनी निवारूं शकत नाहींत म्हणून आम्ही दीक्षा घेऊन कर्माचा नाश करून मोक्ष मिळवूं. पुत्रांचें हें भाषण ऐकून लक्ष्मणानें म्हटलें– मुलांनो, कैलासपर्वताच्या शिखराप्रमाणें हे प्रासाद आहेत. यांतील रत्नमयी जमीन पायाला मृदु मृदु वाटते. या राजप्रासादांत राहा व भोगोपभोगांचा सुखानें

उपभोग घ्या. मुलें म्हणाली– पिताजी, सर्पफणाप्रमाणें हे भोग दुःख देतात व यम केव्हां नेईल याचा भरंवसा नाहीं. यास्तव आम्हीं दीक्षा घेऊन तपश्चरणानें कर्मक्षय करण्याचा निश्चय केला आहे असें बोलून ते सर्व कुमार ‘ महाबल ’ नामक मुनि-राजाकडे गेले व त्यांच्यासंनिध दीक्षा घेतली. सर्वजण पूर्ण निष्परिग्रही झाले. त्यांनीं उत्तम तपांनीं पुण्य-पापांचा नाश केला व अनंतसुखदायक मोक्षाची प्राप्ति करून घेतली.

हें बीराष्टक जिनदास असलेल्या जिनभक्तांच्या पापांचा नाश करो व पुण्य-प्राप्ति करून देवो.

# एकशेदहावें पर्व.

[ राम-लक्ष्मणांच्या पुत्रांचें स्वयंवरार्थ प्रयाण. ]

जो काञ्चननगरीपति काञ्चनरथनृप तया सुता दोन ।
रतिसुन्दर त्या होत्या माता त्यांची शतऱ्हदा जाण ॥ १ ॥
त्यांच्या स्वयंवरास्तव नरविद्याधरनृपाल भूपानें ।
प्रेषुनि सलेखदूता बोलावियलें अतीव मुदितमनें ॥ २ ॥
यापरि साकेतापति रामा श्रीलक्ष्मणा नृपेन्द्रांना ।
प्रेषून लेख विनयें स्वयंवरार्थास सूचवी त्यांना ॥ ३ ॥

[ लवण व अङ्कुशासह लक्ष्मणाचे सर्वपुत्र स्वयंवराला गेले. ]

वाटे मनांत कौतुक ज्यांना त्या राम-लक्ष्मणेशांनीं ।
अपुल्या सर्वसुतांना पाठविलें शीघ्र काञ्चनस्थानीं ॥ ४ ॥
लवणाङ्कुशास अग्रस्थानीं ते करुनि सर्व राजसुत ।
देवकुमारासम कीं, गेले वैसून शतविमानांत ॥ ५ ॥
गेले स्वयंवराच्या मण्डपिं ते परमविभव सम्पन्न ।
ज्यांच्या सेवेमध्यें विद्याधरनृपति राहति लीन ॥ ६ ॥
वसले सुन्दर मञ्चकिं सुत ते जणु शोभलेचि सर्व सुर ।
इन्द्रप्रतीन्द्रसाम्या लवणाङ्कुश वरिति त्यांत बहु चतुर ॥ ७ ॥
अपुला निवास सोडुनि जणु लक्ष्मी दोन येथ अवतरल्या ।
सुन्दर राजसुता त्या नृपतिगणा दोन मण्डपीं दिसल्या ॥ ८ ॥
आलेल्या नृपतींचे देश नि कुल वित्त विक्रमादिगुण ।
सांगितले कञ्चुकिनें राजसुतां ऐकिले तयें पूर्ण ॥ ९ ॥

[ कांहीं राजे खिन्न व कांहीं राजे आम्हाला या वरतील किंवा नाहीं म्हणून संशययुक्त झाले. ]

वानर सिंह व्याघ्र नि गज वृषभादिध्वजास धरिती जे ।
पाहत कन्या जाती त्यांना ऐसें अनेक खगराजे ॥ १० ॥
पाहुनि कन्या झाले अनेक राजे मनांत बहु खिन्न ।
या आपणां न वरितिल निश्चित हा व्यर्थ जाहला यत्न ॥ ११ ॥

परि जेव्हां कन्यांनीं डोळे वळवून पाहिलें त्यांना ।
आम्हा वरितिल किंवा नच या संशय तदीय येइ मना ॥ १२ ॥
कन्या ज्यांना बघती ऐसे राजे विभूषणा करिती ।
स्थिर अपुलें गोंधळले काय करावें न जाणतात किती ॥ १३ ॥
सौन्दर्यगर्व झाला हिजला ही वरिल केवि कोणाला ।
आम्हांतून नृपाला आम्हा ही मानितेचि जणु पाला ॥ १४ ॥
ज्यानें सुरासुरांना केलें निजसुमशरें पराभूत ।
त्या कामाच्या जणु या दोन पताका असे मना गमत ॥ १५ ॥
पाहुनि यांना अमुच्या होतो उन्माद मानसा खचित ।
गळतो विवेक त्याचा चञ्चल तें होतसें अतित्वरित ॥ १६ ॥
ऐसा विचार येउनि मनांत ते आसनांत चुळबुळती ।
जणु वेड लागलें कां ऐसे तेथें अनेक नृप दिसती ॥ १७ ॥

[ मंदाकिनी व शशांकभाग्या या कन्यांनीं क्रमानें
लवण व अङ्कुश यांना वरिलें. ]

त्या उत्तम कन्यांनीं जेव्हां लवणाङ्कुशास पाहियलें ।
स्मरबाणविद्ध[1] झाल्या त्यांचें निश्चल तिथेंचि पद झालें ॥ १८ ॥
मन्दाकिनीसुनामा कन्येच्या हृदयिं नयनिं गालांत ।
अनुराग प्रगटे बहु वरि लवणा स्मित करून वदनांत ॥ १९ ॥
सुन्दर मुखचन्द्र जिचा शशाङ्कभाग्या यथार्थनांवाची ।
अङ्कुशभालावरि जणु याची पत्नी स्वनाम जी वाची ॥ २० ॥
मदनाङ्कुशास वरिलें सलज्ज होउनि शशाङ्कभाग्येनें ।
कण्ठीं त्याच्या घालुनि माला स्वकरें नि सानुरागमनें ॥ २१ ॥
झाला कोलाहल बहु कुमारसैन्यांत जयजयाराव ।
उसळे उंच नभामधिं पसरे जिकडे मिळेल त्या वाव ॥ २२ ॥
सम्बन्ध सदृश झाला वरिलें या रामचन्द्र-तनययुगा ।
या सुन्दरकन्यांनीं कोण न शंसिति सुवर्णमणियोगा[2] ॥ २३ ॥
गम्भीर लवणसागर कन्या मन्दाकिनी तिनें वरिला ।
जणु सौन्दर्यजलानें अपुल्या सम्पूर्णसा तिनें केला ॥ २४ ॥

१ कामबाणांनीं जखमी. २ सोने व रत्नाचा संबंध.

सर्वजगत्कान्तीला उद्यत जिंकावयास झाली ही ।
कन्या शशाङ्कभाग्या वरि योग्यचि अङ्कुशास ही पाही ॥ २५ ॥
यापरि सुजनगणांची वचनावलि मण्डपामधें प्रगटे ।
सम्बन्ध योग्य होतां साधूंच्या हृदयिं मोद बहु दाटे ॥ २६ ॥
त्या समयिं लक्ष्मणाचे सुविवेकी आठ पुत्र मुख्य असे ।
वस्वष्टका[1]प्रमाणें ज्यांचे मुख कोपयुक्त बहुत दिसे ॥ २७ ॥
अर्धतृतीय[2]शतामधिं लक्ष्मणपुत्रांत मुख्य हे होते ।
तारागणीं जसे ग्रह बुधादि तेजें नभांत खुलती ते ॥ २८ ॥
होऊन कुपित हृदयीं विरुद्ध लवणाङ्कुशावरी झाले ।
कन्याष्टक त्या देउनि त्याच नृपालें प्रसन्न बहु केलें ॥ २९ ॥
तेव्हां क्रोध तयांचा शम पावे मनिं विचार तैं आला ।
कन्याद्वयार्थ आतां नुरलें कांहींच कार्य आम्हांला ॥ ३० ॥
जिह्वा आणिक वनिता यांचें अन्याकडेचि लक्ष्य असे ।
स्वाभाविक हें यास्तव मन करणें विकृत हें न योग्य दिसे ॥ ३१ ॥
यांनीं निजसौन्दर्यें सुराङ्गनांनाहि जिंकिलें आहे ।
इच्छा तथापि यांची धरणें आम्हां न उचित हें पाहे ॥ ३२ ॥
बोलुनि अष्टकुमारें सर्वांचें शान्त चित्त झणि केलें ।
तेव्हां विवाहवाद्यध्वनिनें आकाश सर्व दुमदुमलें ॥ ३३ ॥
त्यांच्या स्वयंवराचें वैभव पाहून सर्व हरितनय ।
चिन्तिति मनांत अमुच्यामध्यें आहे उणें बरें काय ? ॥ ३४ ॥
हरिपुत्र[3] सर्व आम्ही वैभव-परिवार-कान्तिसम्पन्न ।
आहो तरुण हि आम्ही नाहीं अमुच्यांत कोणता सुगुण ? ॥ ३५ ॥
ऐसें असतां आम्हा एकाहि जनास कां नसे वरिलें ।
कन्याद्वयें तयांनीं लवण नि अङ्कुशचि केवि आदरिलें ॥ ३६ ॥

[ हरिपुत्रांच्या मनांत वैराग्यविचार उत्पन्न झाले. ]

अथवा विस्मय यांत न वैचित्र्य जनांत सर्वदा विलसे ।
कर्म तयाला कारण तें या जगतीं चराचरांत[4] वसे ॥ ३७ ॥

---

१ आठवसु नामक देवाप्रमाणें. २ अडीचशें. ३ लक्ष्मणाचे मुलगे.
४ स्थावर व त्रस या जीवसमूहांत.

ज्याला जसें नि जेथें ज्यापासुनि जेवढें मिळायाचें ।
तें त्या अवश्य तेथें तैसें सम्प्राप्त होतसें साचें ॥ ३८ ॥
यापरि सगळे लक्ष्मणसुत असतां शोक करित त्या वदला ।
रूपवतीचा आत्मज विस्मय ज्याच्या मनांत नच हसला ॥ ३९ ॥
हे भद्र बान्धवांनो, स्त्रीसाठीं कासया असा शोक ।
ऐसें तुमचें चेष्टित पाहुनि हसतील सर्व बुधलोक ॥ ४० ॥
कां या लवाङ्कुशांनीं जिनशोभा मिळविली असे दासी ।
जी निर्वाणश्रीची दिसता कां खिन्न जेवि दिवसशशी ॥ ४१ ॥
केळीच्या खाम्बासम असती हे कामभोग निःसार ।
त्यांच्यासाठीं तुमचा होइल हा शोक खचित हास्यकर ॥ ४२ ॥
दिसतात जीव सगळे झाले आहेत कर्म परतन्त्र ।
कर्मचि नाशाप्रति न्या जेणें तुम्हां मिळेल निजतन्त्र ॥ ४३ ॥
भववनिं विनाश झाला प्राण्यांचा त्यास शोक हेतु असे ।
शोकविनाशें होइल दुःखांचा नाश वचन कां न ठसे ॥ ४४ ॥
ही कर्मभूमि आहे बन्धूनो, परि पितृप्रसादानें ।
स्वर्ग हिला मानियलें प्रमाद हा होय मोहमूढमनें ॥ ४५ ॥
बाळपणीं बापाच्या माण्डीवरि वसुनि ऐकिलें आहे ।
पुस्तक वाचित असतां जें सुन्दर सांगतों तुम्हा पाहे ॥ ४६ ॥
सर्वभवामाधिं दुर्लभ नरभव मिळवून करि न जो स्वहित ।
तो फसला समजावा मोह तयाचें न करिल कां अहित ? ॥ ४७ ॥
सत्पात्रदान देतें वैभव, सुरलोक लाभतो सुतपें ।
मुक्ति निजात्मज्ञानें, दुःखदगति लाभतें नरा पापें ॥ ४८ ॥
तप आम्ही न करू जरि पुनरपि होईल जन्म मात्रुदरीं ।
दुःखें भोगीत फिरूं प्रवेश होईल केवि मुक्तिपुरीं ॥ ४९ ॥
यापरि अष्टकुमारें विचार चित्तांत तेधवा केला ।
संसारसागराच्या भयें जया घाबरेपणा आला ॥ ५० ॥
गेले बापाजवळी नमून विनयें तयास ते वदले ।
जोडून हात दोन्ही अतिशय मधुवचन अमृतसें गमलें ॥ ५१ ॥

---

१ वागणें. २ स्पर्शनेंद्रिय व रसनेंद्रियविषयानुभव तो काम. नाक, डोळे व कान या विषयांचा अनुभव तो भोग. ३ स्वाधीनपणा. ४ मोहानें अज्ञ.

विज्ञप्ति तात ऐका अमुच्या कार्यांत विघ्न आणु नका ।
अमुच्या दीक्षेच्छला होवो तुमचा विचार साधुसरवा ॥ ५२ ॥
जग हें सारविवर्जित नश्वर विद्युल्लतेसमान असे ।
पाहून त्यास हृदयीं अमुच्या त्यागैकबुद्धि[1] आज वसे ॥ ५३ ॥
आम्हास आज झाली कष्टानें प्राप्त बोधिनौका[2] ही ।
आतां तरून जाऊ संसारसमुद्र निश्चयें पाही ॥ ५४ ॥
सर्पफणासम भयकर सुतीव्रदुःखास हेतु जाणून ।
ते काम फेकण्याची इच्छा आम्हास जाहली तूर्ण[3] ॥ ५५ ॥
माता पिता नि बान्धव मित्र भ्राता नि जीवमात्रास ।
कर्मापासुनि होतो मिटवू शकती न हे महात्रास ॥ ५६ ॥
ताता तुमचे अणिक जननींचें प्रेम ज्यास उपमा न ।
अमुच्यावरि तें बन्धन मोक्षाला हेतु केधवा ही न ॥ ५७ ॥
वात्सल्यसौख्य तुमचें भोगूनहि दीर्घकाल होईल ।
विरह तयाचा दुःखद हृदया क्रकचासमान[4] कापील ॥ ५८ ॥
जीव कदापि न होतो भोगामधिं तृप्त तात आयु गळे ।
सोडून देह जाइल हित त्यापासून कां न शीघ्र पळे ॥ ५९ ॥

[ स्नेहविह्वल लक्ष्मणाचें पुत्रांनों दीक्षा घेऊ नका असें सांगणें. ]

यापरि भाषण ऐकुनि पुत्रांचें स्नेहविह्वलें म्हटलें ।
श्रीलक्ष्मणें सुतांनो, भोगा ही विविध पूर्वपुण्यफलें ॥ ६० ॥
कैलासशैलशिखरासम हे अत्युच्च सौध आहेत ।
ज्यांना खाम्ब हजारो सुवर्णमणिजडित कान्तिसंयुक्त ॥ ६१ ॥
मणिमय भूमि तयांतिल सुखकर चरणास चालतां वाटे ।
हेवा ज्यांना पाहुनि कुबेर-हृदयांत सर्वदा दाटे ॥ ६२ ॥
सुखसाधनें जयामधिं अक्षयनिधिसम सदैव आहेत ।
राहा त्यांत सुतांनो भोगा भोगा अनेक दिनरात ॥ ६३ ॥
सुन्दर शारदचन्द्रासम मुख ज्यांचें अशा तुम्हा नारी ।
भोगा सौख्य तयासह विरक्ति सोडून द्या असुखकरी ॥ ६४ ॥

---

१ फक्त भोगत्यागांत बुद्धि तत्पर झाली आहे. २ रत्नत्रयप्राप्ति रूप नांव. ३ शीघ्र. ४ करवताप्रमाणें.

सुरुचिरभोगांचें सुख सोडून वनांत केवि राहाल ।
वत्सानो, लोण्यासम शरीर तुमचें असे सदा मृदुल ॥ ६५ ॥
वीणावेणुमृदंगा वाजवुनि श्रीजिनेन्द्र गुणगानीं ।
तत्पर राहुनि पूजा दीक्षेहुनि ही नसेचि किमपि उणी ॥ ६६ ॥
स्नेहाधीन मुलांनो मला नि तुमच्या विपण्ण मातेला ।
सोडू नका, घृताला त्यागून करा न वदन आ तेला ॥ ६७ ॥
स्नेह मनांतिल घटला आत्मा ज्यांचा भवास बहु विटला ।
इन्द्रियसौख्यापासुनि विमुखपणा ज्यांचिया मना पटला ॥ ६८ ॥
ऐसें कुमार वदले क्षणभरि धारण करून मनिं मौन ।
शुद्धात्मचिन्तनामृतपानीं रुचि नित्य ते असें वचन ॥ ६९ ॥
माता पिता नि या भविं फिरतां जीवा अनन्तदा झाले ।
हें स्नेहाचें बन्धन कारागृहसम मनास नच रुचलें ॥ ७० ॥
पापारम्भा घडवी नानादुःखास वाढवी सतत ।
हा गृहवास विरक्ता वाटे नच सेवितात ते तात ॥ ७१ ॥
शारीर नि मानस जें तें या जीवास दुःख नच व्हावें ।
ऐसा निश्चय हृदयीं अमुच्या कैसें तयास सोडावें ॥ ७२ ॥
निर्दोष मी न मजला पाप असा करुनि ही विचार मनीं ।
मळकट गृहस्थ होतो शुक्ल जसें वस्त्र मलिन कांहिं दिनीं ॥ ७३ ॥
असती गृहाश्रमीं जे त्यांची पापीं प्रवृत्त होय मति ।
यास्तव गृहस्थधर्मा त्यागून तपांत सन्त करिति रति ॥ ७४ ॥
कांहीं दिन हें वैभव भोगा आम्हांस तात जें म्हटलें ।
ढकलित आहा आम्हा भवान्धकूपीं न म्हणुनि तें पटलें ॥ ७५ ॥
पाणी हरिण तृषेनें असतां त्या पीत पारधी मारी ।
भोगीं अतृप्तपुरुषा तैसे हा क्रूर मृत्यु संहारी ॥ ७६ ॥
परतन्त्र सर्व जग हें विषयप्राप्तींत सर्वदा गढलें ।
क्रीडत कामाहीसह आहे अज्ञा उपाय त्या न कळे ॥ ७७ ॥
घर हें तळें तयामधिं नृमीन[१] विषयामिषांत[२] लुब्ध वसे ।
अडकुनि रोगादिकगळि[३] घोर अशा यममुखांत शीघ्र वसे ॥ ७८ ॥

---

१ मनुष्यरूपी मासा. २ पंचेन्द्रियाचे विषय हेच मांस. ३ रोग, जरा, मरणादि रूप गळ.

त्रैलोक्यनाथ जिनवर इन्द्र जयांच्या पदास नमितात ।
कर्माधीन असे हें जग झालें वचन सत्य वदतात ॥ ७९ ॥
हा प्रियसङ्गम ताता चञ्चल आहे तडिल्लता जैशी ।
दुःखद विरहीं होतो निजरूपाच्या स्मृतीस हा नाशी ॥ ८० ॥
येती नानागतिंतुनि जीव नि एका कुलांत कांहिं दिन ।
राहति तेव्हां हा प्रिय ऐसा सम्बन्ध होय उत्पन्न ॥ ८१ ॥
मोहचि याला कारण उत्पन्न करी अनेक तो भाव ।
तेणें प्रिय अप्रिय हो अप्रियही प्रिय न यांत किन्तुलव ॥ ८२ ॥
कुद्वीप असत्यागम मोहाचा चिखल त्यांत बहु आहे ।
शोक नि सन्तापाच्या-फेसें भरला सदैव हा पाहे ॥ ८३ ॥
नानाजन्मचि यामधिं अनेक आवर्त भोवरे असती ।
रोग नि मरणतरङ्गें पीडित होऊन जीव घावरती ॥ ८४ ॥
क्रोधादि मत्स्य मगर नि नक्र असे क्रूर जन्तु फिरतात ।
कुमत नि कुहेतु वज्राघातें होतात सुजन बहुभीत ॥ ८५ ॥
मिथ्यात्वाचा वारा वाहे येथें प्रचण्ड विस्तारें ।
दुर्गति खारें पाणी उसळे तेणे पुनः पुनः न सरे ॥ ८६ ॥
अतिशय दुःसह असती वियोग वडवाग्नि ज्यांत बहु थोर ।
झालों घोर भवार्णविं आम्ही ताता प्रखिन्न कीं फार ॥ ८७ ॥
नानायोनिंत फिरतां आम्हा नरदेह जाहला प्राप्त ।
तें कार्य करूं आतां जेणें बुडणें न हो भवाब्धींत ॥ ८८ ॥
ते वीर आठ आज्ञा पितरांची ग्रहण करुनि वनि गेले ।
मुनिवरमहाबलाच्या सन्निध दीक्षाविधीस अनुसरले ॥ ८९ ॥
झाले सर्व दिगम्बर मुनिवर भवभीति हृदयिं ठेवून ।
धरुनि क्षमादिसद्गुण आत्मध्यानांत होति बहु लीन ॥ ९० ॥
सुतपें पापा छेदुनि पुण्यागमजास तेवि वारून ।
ते वीर आठ गेले मोक्षा कर्माष्टकास तोडून ॥ ९१ ॥
हे वीराष्टक मङ्गल भावें पढतो नि ऐकतो भक्त ।
त्या जिनदासाचें अघ विनाश पावे नि पुण्य हो उदित ॥ ९२ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे कुमाराष्टकनिष्क्रमणाभिधानं नाम दशोत्तरशतं पर्व ॥ ११० ॥

१ वीज. २ हिंसादिक-पापाचें प्रतिपादन करणारा आगम हाच वाईट द्वीप. ३ फिरणारे. ४ उदयाला येतें.

## एकशेअकराव्या पर्वाचा कथासारांश.

श्रेणिकाला गौतमगणधरांनीं भामण्डलाचें वृत्त याप्रमाणें सांगितलें:—

मनुष्यानें धर्माचेंद्वारें आपलें हित करून घ्यावें यासाठीं भामण्डलवृत्त ऐकणें आवश्यक आहे. भामण्डल हा सीतेचा भाऊ होता हें सर्वांस ठाऊक आहेच. तो विषयसुखांत लीन राहिला. त्याच्या मनांत याप्रमाणें विचारतरङ्ग उठत असत. "मी जर दीक्षा घेऊन वनांत तप करण्यास गेलों तर माझ्याविरहानें माझ्यावर प्रेम करणाऱ्या स्त्रिया मरण पावतील. कामसुखांचा यथेच्छ अनुभव घेऊन नंतर दान, तप व पूजन करून स्वहित साधीन. भोगसेवन जरी पापबन्धास कारण आहे तथापि तें पाप नष्ट करण्यासाठी मी आत्मध्यानरूपी अग्नि पेटवीन. अर्थात् आत्मध्यानानें पाप नाहींसें करण्यास मला आयास वाटणार नाहींत. मी सेना घेऊन सर्व शत्रूंचीं नगरें उद्ध्वस्त करीन व त्यांना माझी आज्ञा पाळावयास लावीन. पराक्रमानें सर्व विद्याधरांना वश करून दोन्ही विद्याधरश्रेणींचें स्वामित्व मिळवून मी विद्याधर-चक्रवर्ती होईन." असे मनोरथ तो नेहमी करीत असे. अनेक शेकडोवर्षें भोग भोगण्यांत व्यतीत झालीं. एके दिवशीं तो आपल्या प्रासादाच्या सातव्या मजल्यावर पत्नीसह बसला असतां त्याच्या मस्तकावर वीज कडाडून पडली व तो मरण पावला.

जातिस्मरणानें पूर्वभवांतील आपल्या कृति तो जाणत होता पण त्यानें स्वहित करून घेतलें नाहीं व यमपाशानें गळा दाबला गेला व त्याला भवांतरीं जावें लागलें. त्याच्या या कथेवरून भव्यांनीं बोध घेऊन सावध व्हावें व स्वहित करून घ्यावें. दुःख उत्पन्न करणारे, आशा वाढविणारे अशा कषायांचा नाश करावा. हें ज्यास करतां आलें नाहीं त्याचा जन्म व्यर्थ होय. क्षणिक अशा शरीराचे चोचले

पुरविण्यासाठीं विषयासक्त होणें हें अविवेकीचें कार्य आहे. विवेकीचें नाहीं. शास्त्रें शिकूनही तृष्णा जर नाहींशी झाली नाहीं तर मनुष्यजन्म व्यर्थ घालविला असें समजावें. एकहि शास्त्र शिकला नाहीं पण ज्याचें मन नेहमीं संतुष्ट असतें त्याची सज्जनलोक प्रशंसा करितात. मी दान, पूजा, व्रत, तप करीन असा संकल्प करून तीं सत्कार्यें जो करीत नाहीं त्याच्या पदरीं पाप पडतें व तो दुर्गतींत फिरतो. यास्तव जिनदास अशा भव्यांनीं नुसते सत्कार्यांचे संकल्प करून थांबू नये. दान, तप, व्रत, जिनपूजनादि कर्तव्यें करावींत म्हणजे गळ्यांत यमपाश पडणार नाहींत.

# एकशेअकरावें पर्व.

विद्याधरपति भामण्डल जो वृत्त इथें त्याचें ।
श्रेणिकभूपा गौतमगणधर जें वदलें साचें ॥ १ ॥
कथितों तुम्हां तें ऐकावें सावध चित्तानें ।
स्वहिता साधुनि घ्यावें मनुजें सुधर्मवित्तानें ॥ २ ॥

( भामण्डलाचे नाना मनोरथ. )

सीताभ्राता भामण्डल हा विषयसुखीं लीन ।
सदैव राही यापरि त्याचें करी विचार मन ॥ ३ ॥
मी जर दीक्षा घेउनि जाइन वनिं तप करण्यास ।
हा माझा स्त्रीवृन्द समुद्यत होइल मरणास ॥ ४ ॥
माझ्यावरती चित्त तयाचें आहे आसक्त ।
ना तरि माझ्या विरहें प्राणें होइल हा त्यक्त ॥ ५ ॥
कामसुखें हीं दुर्लभ दुस्त्यज यथेच्छ भोगून ।
दानतपादिक करुनी नन्तर निजहित साधीन ॥ ६ ॥
सुभोगसेवन हेंही आहे कारण पापास ।
नाश तयाचा ध्यानानल करि नच त्या आयास ॥ ७ ॥
यास्तव मजला अघभय नाहीं जरि तें बहु झालें ।
ध्यानाग्नीनें जाळुनि टाकिन तत्क्षणिं तें सगळें ॥ ८ ॥
चिन्तन ऐसें करुनि ध्यानीं आत्मा नच रमवी ।
मनोरथांनीं कदापि होइल कार्य न वदति कवि ॥ ९ ॥
सेना घेउनि करिन पुरें मी नगरें अरिचीं उद्ध्वस्त ।
करुनी त्यांच्या मदभङ्गा मी ठेविन आज्ञेंत ॥ १० ॥
उभयश्रेणी खगनृपतींच्या करुनी हस्तगत ।
खेचरचक्री[१] होइन विद्याबल मम अपरिमित ॥ ११ ॥
मेरुगिरीच्या शिखरावर मी घेउनि ललनांना ।
पञ्चेन्द्रियसुख भोगिन ऐसें चिन्तन करि नाना ॥ १२ ॥

---

१ आकाशगमन करणाऱ्या विद्याधरांचा चक्रवर्ती.

यापरि नानावस्तूंचा तो करी विचार मनीं ।
वर्षें गेलीं बहुशत त्याचीं रमणीभोगांनीं ॥ १३ ॥
मी हें केलें करीत आहे आतां हें करिन ।
चिन्तन करितचि जीवन सम्पे साधी परि हित न ॥ १४ ॥

( वीज पडून भामण्डल मरण पावला.)

एके वेळीं निजसदनाच्या सप्तमभूमिवरी ।
वसला पडली वीज कडाडुनि मस्तकिं मरण वरी ॥ १५ ॥
जाणत होता पूर्वभवांतिल कार्यें जरि सगळीं ।
स्वहित न केलें तरिही पडलें खलयमपाश गळीं ॥ १६ ॥
विषाद-तृष्णा-विनाशकारी कषायशमन जरी ।
क्षणपर्यन्तहि त्यास न झालें जन्म वृथाचि धरी ॥ १७ ॥
पाय गळ्यावरि दिधला ज्यानें मृत्यु असा पाही ।
स्मरतो हित वा नच नर वघतो तो समया कांहीं ॥ १८ ॥
क्षणिक अशा या खलदेहास्तव विषयासक्त नर ।
अकार्य ऐसें उरलें नाहीं जें हा न करि खरें ॥ १९ ॥
अपुलें जीवित अल्पचि समजुनि सङ्ग त्यागावा ।
ऐसें करि जो सुगुण तयाचा सुजनें नित गावा ॥ २० ॥
परि जो स्वहितीं प्रवृत्त नाहीं अकृतार्थक नर तो ।
नष्टचि होतो नरकादिकगतिवृन्दीं नित फिरतो ॥ २१ ॥
शास्त्रें शिकला जरीं हजारों तृष्णा नच गेली ।
शान्त न झाला आत्मा त्याचा जाई यमगालीं ॥ २२ ॥
एकहि शास्त्र न शिकला परि जो तृप्त मनीं झाला ।
प्राप्त तयाला शम झणिं होतो स्तविती बुध त्याला ॥ २३ ॥
सद्धर्मा मी करीन ऐसा करितो सङ्कल्प ।
परि नच करितो पदरीं त्याच्या राही नित पाप ॥ २४ ॥
आकाशामधिं उंचगतीची इच्छा बहुत धरी ।
परन्तु तुटला पंख जयाचा श्रम तो काक करी ॥ २५ ॥

---

१ गादव– अविवेकी. २ ज्यानें स्वकार्य आत्महित केलें नाहीं असा.

हितीं प्रयत्न न करी जरी नर तथापि होइल तें ।
विरही अधनिक कुणिहि न राहिल हितें न कुणिहि रितें[1] ॥ २६ ॥
द्वारीं आले अतिथि साधु त्या पूजुनि झणि दान ।
देई मानव सुकृता बान्धी होई नच खिन्न ॥ २७ ॥
सद्गुरुवाक्या ऐकुनि करि जो कृति त्या अनुसरुन ।
सत्वर होतो पूज्य जनीं तो सम्पत्परिपूर्ण ॥ २८ ॥
आयु तयाचें अमूल्यमणिसम जाइ करांतून ।
गळुनी भोगी दुःखें बहुविध चतुर्गतींतून ॥ २९ ॥
नाना कार्यीं आकुळ होतो प्रतिदिनिं मानव हा ।
चुकतो स्वहितीं सदैव पडतो बळि दारुण मोहा ॥ ३० ॥
जाणुनि यापरि निजहितिं तत्पर हो तूं जिनदासा ।
पूजादानव्रतास आचरि न पडे यमफासा ॥ ३१ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे प्रभामण्डलपरलोकाभिगमनं नाम एकादशोत्तरशतं पर्व ॥ १११ ॥

---

१ रिकामा.

# एकशेंबारा व एकशेंतेराव्या पर्वांतील कथासार

श्रीरामचंद्र व लक्ष्मण यांचे दिवस एकमेकांवरील अपूर्वस्नेहानें आनंदांत व्यतीत होत असत. उन्हाळा, पावसाळा व हिंवाळा या तिन्ही कालांत त्या त्या कालानुरूप सुखाच्या सामग्रीमुळें त्यांना दुःख कधींही झालें नाहीं ते सुखाच्या डोहांत डुंबत होते.

वीणा, मृदंग, पावा वगैरे वाद्यांच्या मंजुळ आवाजानें त्याना कर्णसुख होत होतें. ज्यांची वाणी वीणारवाला जिंकणारी होती अशा सौंदर्यसंपन्न अनेक राण्यासह ते उद्यानादिकांत विहार करीत असत. जणु देवांगनाबरोबर दोन देव क्रीडा करीत आहेत असे ते वाटत असत. याप्रमाणें त्यांचा काल सुखांत जात होता. इकडे कर्णकुण्डलनगरांत हनुमान् राज्य करीत होता. तोही आपल्या अनेक स्त्रियांना बरोबर घेऊन उद्यान, नदी, सरोवरें आदिकांच्या प्रदेशांत जाऊन सुखविहार करीत असे. याप्रमाणें त्याचाही काल सुखोपभोगांत व्यतीत होऊ लागला.

एके दिवशीं जिनभक्ति मनांत उचंबळू लागल्यामुळें आपल्या अनेक स्त्रियासह तो विमानांत बसून मेरुपर्वतावर जाण्यास निघाला. वाटेंत अनेक ठिकाणीं महर्षि तप करीत होते. विमानांतून उतरून त्यांना वंदन करून तो पुढें जात असे. अशारीतीनें तो मेरुपर्वतावर पोहोंचला. आपल्या स्त्रियांना त्यानें मेरुपर्वताच्या अनेक स्थलांची माहिती सांगितली. तो म्हणाला– ही पाण्डुकशिला आहे. या ठिकाणीं जिनबालकाला आणून इंद्र क्षीरसमुद्राच्या जलांनीं अभिषेक घालीत असतात. या मेरुपर्वतावर रत्नांनीं लखलखणाऱ्या गंभीर गुहा पाहा. येथें किन्नरादिकदेव येऊन जिनेश्वराचे यश गात बसतात.

या पर्वतावर भद्रशाल, नंदन, सौमनस व पाण्डुक अशीं चार वनें कल्पवृक्ष व कल्पलतांनीं फार सुंदर दिसत आहेत. हा मेरुपर्वत नेहमी उत्सवाचेंच स्थान आहे.

या मेरुपर्वताच्या शिखरावर अतिशय उंच हीं जिनमंदिरें रत्नसुवर्णांनीं जडलेलीं आहेत. येथें मोत्यांच्या मालांनीं अष्टमङ्गलद्रव्यें शोभत आहेत. असें सांगून सर्व स्त्रियांसह तो विमानांतून उतरला. जिनमंदिरांत प्रवेश करून त्याला तीन प्रदक्षिणा सर्व स्त्रियासह त्यानें घातल्या. नक्षत्रांनीं जसा चंद्र शोभतो तशा सिंहासनावर जिनेंद्रमूर्ति शोभत होत्या. त्यांना पाहून मारुतीनें व त्याच्या सर्व स्त्रियांनीं हात जोडून नमस्कार केला. यानंतर अत्यंत हर्षानें त्या सर्वांनीं अष्टद्रव्यांनीं पूजन केलें. नंतर जिनस्वरूपाचें त्यांनीं हृदयांत चिंतन केलें.

यानंतर मांडीवर वीणा ठेवून मारुति भक्तीनें जेव्हां वीणा वाजवू लागला तेव्हां सर्वांना गानसुधा आपण आज पीत आहोत असें वाटलें. पूजनाच्या शेवटीं शांतिभक्ति करून सर्वांनीं श्रावककुलांत जन्म, हृदयांत दृढ जिनभक्ति व समाधिमरण यांची प्राप्ति होवो असें चिंतन करून व पुनः वंदन करून जिनेश्वराकडे पाठ न करितां ते सर्वजण बाहेर येऊन व विमानांत बसून त्यांनीं जिनमंदिरांना प्रदक्षिणा घालीत त्यावर पुष्पवृष्टि केली.

यानंतर मारुति सर्व स्त्रियांसह विमानांत बसून निघाला. सूर्यास्ताच्यावेळीं ते सुरदुन्दुभि नामक पर्वताजवळ आले. तेथें मारुतिनें विद्येच्या सामर्थ्यानें प्रासादरचना करून रात्रीं निवास केला. रात्रीं मारुति आकाशाकडे पाहत असतां त्यांतून एक प्रकाशमान तारा खालीं पडत असलेला त्याला दिसला. त्यावेळीं त्याचें मन विरक्त होऊन याप्रमाणें विचार करूं लागलें. " जेथें मरण नाहीं असें या जगांत स्थान नाहीं. जगांत जीव वीज, तरंग व बुडबुडे याप्रमाणें उत्पन्न होऊन नाश पावतात. मनुष्य नश्वरसुखाचें मागें लागून त्यांत आसक्त व तृप्तिरहित होतात. कुमार्गगामी होऊन जीव संसारांत फिरत आहेत. मोहयुक्त होऊन माशाप्रमाणें माणसें विषयजालांत सांपडून मरण पावतात. मी जर या प्रियजनांचा त्याग न करून विषयसेवनांत आयुष्य व्यतीत करीन तर सुभौमचक्रवर्तीप्रमाणें नरकांत दुःख भोगीत पडेन. माझा विषयसुख भोगण्यांत फार मोठा काल व्यतीत झाला आहे. आतां शुद्ध रत्नत्रय-मार्गाचें अवलंबन करून या माझ्या आत्म्याला मुक्त करीन ". असा विवेक मारुतीच्या मनांत उत्पन्न झाला.

सूर्योदय झाल्यावर मारुति सर्व स्त्रियांसह विमानांत बसून कर्णकुण्डल नामक आपल्या नगरांत आला. यानंतर सर्व मित्रांना तो मारुति निःस्पृह होऊन याप्रमाणें बोलला— मी आतां तपोवनाकडे जातो आपण मला आज्ञा द्यावी. त्यावेळीं सचिवांनीं

हात जोडून आम्हाला त्यागून आपण जाऊं नये म्हणून विनविलें. मारुतीच्या सर्व स्त्रियांना ही वार्ता समजली. त्यांना अतिशय दुःख झालें. त्या सर्वांची अनेक दृष्टांतांनीं मारुतीनें समजूत काढली. पुत्राला राज्य दिलें. उद्यानांत 'धर्मरत्न' नावाचे श्रेष्ठ मुनीश्वर आले होते त्यांच्याकडे मारुति गेला. नम्रपणें दीक्षेची याचना केली. त्यांनीं त्याला महाव्रतदीक्षा दिली. पुष्कळ वर्षें मुनिव्रतांचें उत्तम पालन केलें. मारुतीबरोबर स्वामिभक्तीनें साडेसातशें विद्याधरराजांनीं दीक्षा घेतली. मारुतीच्या स्त्रियांनीं व इतर राजांच्या स्त्रियांनींही बंधुमति आर्यिकेजवळ दीक्षा घेतली. मारुति मुनीश्वराला तपःप्रभावानें केवलज्ञान झालें. धर्मोपदेश करून भव्यांत मोक्षमार्ग दाखविला. व अघातिकर्मांचा नाश करून 'निर्वाणाचल' नामक पर्वतावर ते मुक्त झाले.

# एकशेचारावें पर्व.

बलनारायण यांचा त्रिविध असा काल जाइ मोदांत ।
स्नेह जयांचा होता अन्योन्यावरि अपूर्व अपरिमित[1] ॥ १ ॥
ते परमैश्वर्याच्या शिखरीं आरूढ जाहले होते ।
बलहरि नन्दन[2]-दत्तासम ते भोगीत होति सौख्यशतें ॥ २ ॥

[ राम व लक्ष्मण हे पावसाळा, हिंवाळा व उन्हाळ्यांत सुख भोगीत होते. ]

होतात शुष्कसरिता वनांत पेटे दवाग्नि ज्या कालीं ।
तप तीव्र करिति मुनिगण झळके यत्तेज ज्यांचिया गालीं ॥ ३ ॥
कारंजाचे जेथें तुषार उडतात सतत सदनांत ।
सम्पूर्ण-प्रियसाधन-सज्ज अशा रुचिर[3]-धवलसौधांत ॥ ४ ॥
चन्दनगन्धजलानें ओले शीतल तुषार वर्षिति जे ।
चामरपंखे सुखविति ज्याला बलकृष्णयुग्म तें साजे ॥ ५ ॥
चन्दनकर्पूरांची उटी निजाङ्गीं सुगन्धि लावून ।
उदकार्द्र[4]कमलिनीदलशय्येवरि करिति मुदित ते शयन ॥ ६ ॥
कापूर वेलदोडे लवङ्गचूर्णें सुगन्ध विमलजल ।
ते सेविती नि शमविति निदाघसन्ताप कृष्ण आणि बल ॥ ७ ॥
नानाकथा कथाया चतुर अशा स्त्रीजनें सुसेवित ते ।
ग्रीष्मा हिमकालासम निवारिती अनुभवून शीता तें ॥ ८ ॥
ज्यासमयीं, श्रमणांचा गण वृक्षतलीं निमग्न होऊन ।
स्वध्यानीं पर्जन्या क्षपितो सोसून अशुभकर्मगण ॥ ९ ॥
मेघान्धकार पसरे मधून विद्युत्प्रकाश त्यांत शिरे ।
गर्जनरवांत धाराजलवर्षणशब्द सर्व पूर्ण विरे ॥ १० ॥
ऐशा समयीं राघव-लक्ष्मण केशर-उटी निजाङ्गास ।
लावुनि सुन्दरवस्त्रें नेसुनि सौधांत करिति विनिवास ॥ ११ ॥

---

१ अमर्याद. २ सातवे बलभद्र नंदन व सातवा नारायण दत्त. ३ सुन्दर शुभ्रराजवाड्यांत. ४ पाण्यानें ओल्या कमलिनीच्या पानांच्या अंथरुणावर.

नानाललनानयना कमलाकर[1] दोन राम-लक्ष्मण हे ।
स्त्रीवृन्दीं जणु आले यक्षेन्द्रद्वय म्हणून जन पाहे ॥ १२ ॥
ज्या रात्रीं योगीश्वर हिमपटलावृतनदीतटीं[2] दिसती ।
धर्मध्यानामध्यें निमग्न ज्यांची असे मनोवृत्ति ॥ १३ ॥
ज्या हिमकालीं सगळीं कमलवनें जाति पूर्ण करपून ।
थण्ड अशा वाऱ्यानें होती तरुराज[3] सर्व दलहीन[4] ॥ १४ ॥
त्यासमयीं प्रासादीं मध्यगृहीं रुचिरयुवतिवृन्दांत ।
राहून भोगती रति ठेवुनि ललनाधरावरी दांत ॥ १५ ॥
वीणा मृदङ्ग पावा यांचे स्वर मधुर कर्णयुगलास ।
सुखविति हरिरामाच्या मनास वाटे अतीव उल्हास ॥ १६ ॥
वीणारवास जिंकी वाणी कानां गमे सुधामधुर ।
ज्यांची ऐशा ललना घेउनि ते करिती उभय सुविहार ॥ १७ ॥
जणु अमरीसह सुरवर दोघे क्रीडति असे जनां वाटे ।
पुण्यानुभवें भोगिति सुख यद्देहीं प्रमोदमय[5] कांटे ॥ १८ ॥
यापरि पुरुषोत्तमयुग भोगसुखीं निरत जाहलें असतां ।
ऐका श्रीशैलाचें[6] वृत्त जयें मोद होय तें आतां ॥ १९ ॥
श्रीकर्णकुण्डलाभिध नगर स्वर्गासमान जणु त्यांत ।
परमैश्वर्या सेवी मारुति सुरतुल्य ज्या नसे गणित ॥ २० ॥
[ सर्व स्त्रियासह मारुति मेरुजिनांना वंदन करण्यासाठीं गेला.]
घेउनि नभश्वरांना नारीवृन्दें विहार भूवरती ।
श्रीवायुपुत्र करितो स्वच्छन्दें आचरी परोपकृति ॥ २१ ॥
बसुनि विमानीं मानी विभवान्वित तो अनेक उद्यानीं ।
स्वर्गीयसुरेन्द्रासम विहरे होऊन मोदयुक्त मनीं ॥ २२ ॥
कोणे एके समयीं सुमनांनीं[7] मेदनीस जो हासे ।
ऐसा वसन्त आला प्राणिगणीं प्रेम ज्यामुळें विलसे ॥ २३ ॥
श्रीजिनभक्ति मनामाधिं उफळे ज्याच्या असा समीरसुत[8] ।
अन्तःपुरस्त्रियासह मेरुगिरिप्रति निघे प्रमोदयुत ॥ २४ ॥

---

१ अनेक स्त्रियांच्या डोळेरूपी कमलांना तळ्याप्रमाणें. २ बर्फसमूहानें आच्छादित. ३ मोठीं झाडें. ४ पानांनीं रहित. ५ आनन्दयुक्त रोमाञ्च. ६ मारुतीचे. ७ फुलांनीं. ८ पवनञ्जयपुत्र मारुति.

मार्गी नानापुष्पें कुलगिरिशिखरें सुरम्य पाहून ।
जीं सुरसेवित होतीं करी तिथें वास वास सेवून ॥ २५ ॥
भृङ्ग नि कोकिल यांचा मधुरध्वनि जो मनास आकर्षी ।
ऐशा सरीं नि उपवनिं उतरे तप करिति जेथ वन्यर्षि ॥ २६ ॥
जेथें स्त्रीपुरुषांचीं विहरत असतात जोडपीं सतत ।
दलफलसुमनें सुन्दर वनें अशीं जात तो असे बघत ॥ २७ ॥
द्वीपीं विस्तृत असती ज्यांचें जल विमल शुभ्र मोति जसे ।
ऐशा सरिता तरुतति उभयतटीं बघत जाय तो हर्षें ॥ २८ ॥
मोठे तरङ्ग उसळुनि पसरे ज्यांच्या तटावरी फेस ।
मासे मगरी विहरति बघुनि गमे त्यास मेदिनीहास ॥ २९ ॥

[ मारुति मेरुपर्वताचें वर्णन करीत आहे. ]

यापरि विहरत गेला पवनसुत श्रीसुमेरुगिरिवरती ।
तो आपुल्या प्रियांना दावी जिनमन्दिरादिवस्तुतति ॥ ३० ॥
हीं मेरुपर्वताचीं स्थानें जिनबालका जिथें स्नान ।
घालिति सुरपति अमरासह ज्यांचें भक्तिभारपूर्ण मन ॥ ३१ ॥
हीं या मेरुगिरीचीं शिखरें मणिजडित शोभतीं उच्च ।
विस्तृत ज्यांना बघतां होती अङ्गांत हर्षरोमाञ्च ॥ ३२ ॥
रत्नें लखलखती या गुहा मनोहर विशाल गम्भीर ।
द्वारें ज्यांचीं नानाविधकिरणां पसरितात बहु दूर ॥ ३३ ॥
आहे या गिरिभूतलिं मनोज्ञवन भद्रशाल नांवाचें ।
याच्या तटावरी हें नन्दन आनन्द देइ वन साचें ॥ ३४ ॥
हें याच्या वक्षःस्थलिं कल्पद्रुमकल्पवल्लरीयुक्त ।
नानारत्नशिलांनीं शोभे सौमनससुवन हरि चित्त ॥ ३५ ॥
या मेरुशैलशिखरीं पाण्डुकवन रुचिर शोभतें येथें ।
क्रीडाया सुर येती जिनसदनहि इन्द्र वन्दिती ज्यातें ॥ ३६ ॥
अहमिन्द्रस्थानासम सुमेरु हा सतत उत्सवस्थान ।
गन्धर्वयक्षकिन्नर यांचें चाले इथें सदा गान ॥ ३७ ॥

---

१ सुगन्ध. २ पान, फळें व फुलांनीं. ३ समूह. ४ सुन्दर.

या मेरुपर्वताच्या शिखरीं अद्भुत जिनेन्द्रसदन असे ।
जें लालसान्ध्यमेघासम अत्युत्तुङ्ग हेममय विलसे ॥ ३८ ॥
सर्वोत्तम रत्नांनीं भूषित आकाररुचिर जें धरितें ।
मोत्यांच्या मालांनीं शोभतसे अष्टमङ्गलें खुलतें ॥ ३९ ॥
प्राकारतोरणांनीं गोपुरचामर नि किङ्किणी सुपटें ।
जें शोभतें तयाचें वर्णन शब्दें अपूर्णसें पडतें ॥ ४० ॥
नानावर्णाचे ध्वज मानस्तम्भहि सुवर्णमय ज्याचे ।
बुरुज जयाचें सुन्दर शब्दें वर्णन न होय तें साचें ॥ ४१ ॥
पन्नास योजनांची लाम्बी छत्तीस योजनें रुन्दी ।
ज्याची तें जिनमन्दिर कान्ते ! करिते मनास आनन्दी ॥ ४२ ॥
जणु तें मेरुगिरीचा अपूर्व वाटे मनास कीं मुकुट ।
जिनसदनाचें वर्णन कान्तेसन्निध करी असें प्रगट ॥ ४३ ॥
यापरि करून वर्णन येउनि सन्निध जिनेन्द्रसदनाचे ।
उतरून विमानांतुनि प्रदक्षिणात्रय करीतसे साचें ॥ ४४ ॥
तेथें अत्युच्च अशा सिंहासनिं विभवपूर्ण जिनविम्ब ।
अतिशय विशिष्ट भासे भक्तिगुणा जें खरेंचि आलम्ब ॥ ४५ ॥
नक्षत्र-ग्रहतारागणांत शोभे जसा नभीं चन्द्र ।
शोभे निजतेजानें जिनेन्द्र ज्या पूजितात शतइन्द्र ॥ ४६ ॥

[ मारुतिनें स्वस्त्रियासह प्रभूची पूजा करून वीणा वाजवून प्रभुगुणस्तुति केली. ]

सम्पूर्णलक्षणांनीं सुन्दर जिनविम्ब वघुनि नयनांनीं ।
अन्तःपुरस्त्रियासह वन्दी जोडून पाणि तो सुगुणी ॥ ४७ ॥
पाहुनि जिनेश्वराला झाला आनन्द सर्वललनांना ।
रोमाञ्च सर्वदेहीं भक्तीचा हा प्रकर्ष सुजन गणा ॥ ४८ ॥
भक्तिभरनम्र होउनि सुराङ्गनासम मनांत मोदून ।
केली पूजा त्यांनीं अष्टद्रव्यें करांत घेऊन ॥ ४९ ॥
त्यांनीं जिनेन्द्रचरणीं सुवर्णकमलें अनेक अर्पियलीं ।
वहु पद्मरागमयही स्वभावकुसुमेंहि पादपीठतलीं ॥ ५० ॥

---

१ सूर्यास्तासमयींच्या लाल मेघाप्रमाणें. २ ल्हान डुंगरें. ३ ध्वजवस्त्रांनीं. ४ हात.

ज्याचा सुवास पसरे दहा दिशामधिं अशा सुधूपानें ।
पूजन जिनपदिं केलें स्त्रीवृन्दें भक्तिभावपूर्णमनें ॥ ५१ ॥
अतिशय उज्ज्वल ऐशा मणिदीपा निजकरांत घेऊन ।
वायुसुतानें केलें जिनपूजन भक्तिलीन होऊन ॥ ५२ ॥
ध्यानीं निजस्वरूपा आणुनि आनन्दयुक्त तो झाला ।
करुनि स्तुति सुगुणांची जणु जी अतिशय अमूल्य मणिमाला ॥ ५३ ॥
यानन्तर मांडीवरी वीणा ठेवून पवनसुत भावें ।
वाजवि गेयसुधा[1] जणु पिऊन जनता प्रसन्नता पावे ॥ ५४ ॥
जिनबिम्बदर्शनानें झाले एकाग्रचित्त जन सारे ।
पूजास्तुतींत मोक्षा ठेविति ते निजकरांत हर्षभरें ॥ ५५ ॥
निर्मलचित्ता भक्ता दुर्लभकल्याण कोणतें गमतें ।
जिनपूजनांत तत्पर सुदृष्टिजायां[2] अशा न कां वरितें ॥ ५६ ॥
उत्पत्ति श्रावककुलिं हृदयीं दृढतर जिनेन्द्रभक्ति वसे ।
मिळणें समाधिनें मृति जन्माचें सुफल विबुध वदति असे ॥ ५७ ॥
यापरि वीणेवरती गायन गाऊन भक्तिभारानें ।
पुनरपि पूजी नि स्तुति करिती वन्दन तथा आतृप्तपणें ॥ ५८ ॥
ज्याचें ज्ञान सुनिर्मल अशा जिनेन्द्रास पाठ नच देई ।
त्या अर्हत्सदनांतुनि निर्वर्तनेच्छा[3] मनांत नच होई ॥ ५९ ॥
सर्वस्त्रीगण घेउनि बसुनि विमानीं प्रदक्षिणेस करी ।
मेरूस सूर्य जैसा भक्ति अशी ही भवार्णवांत तरी ॥ ६० ॥
जणु शैल राज दुसरा ऐसा श्रीशैल मेरुशैलास ।
विज्ञप्ति जणु विचारी शेवटची होतसे असा भास ॥ ६१ ॥
सर्वजिनेश्वरसदनीं सुमनें वर्षून भक्तिसुमनानें ।
होउनि भरता संमुख गमन करीं वायुपुत्र मन्दपणें ॥ ६२ ॥
रवि खेद हरायास्तव अस्ताचलिं निजगृहास जायास ।
निघतां अनुरक्त अशी सन्ध्या आलिंगते मुदें त्यास ॥ ६३ ॥
नक्षत्रबन्धुसहितहि पतिचन्द्राविण कृष्णपक्षाची ।
शोभे न रात्र तेव्हां भासे विधवेसमान जणु साची ॥ ६४ ॥

१ गानामृत. २ सम्यग्दर्शनरूपी पत्नी. ३ परतण्याची इच्छा.

सुरदुन्दुभि नांवाच्या शैलतटीं सर्व आपली सेना ।
उतरवि मारुति रचिले निवास तेथें तदर्थ तें नाना ॥ ६५ ॥
पद्मोत्पलगन्धि[1] असा वारा वाहून सुखवि सर्वांस ।
कथिती जिनेन्द्रसुकथा झाला आनन्ददायि गिरिवास ॥ ६६ ॥
श्रीशैलभूपमणि हा वसुनि विमानीं तदभ्रभागांत ।
तारानक्षत्रांचा समूह पाही जिनेन्द्रगुण गात ॥ ६७ ॥
आकाशांतुनि खालीं चमकून नि मन्दकान्ति होऊन ।
असतां पडत सुतारा मारुतसुत होय बघुनि मनिं खिन्न ॥ ६८ ॥
तो मन्दतेज होउनि झाला अत्यन्त गाढतमिं लीन ।
बघुनि परिस्थिति त्याची मारुति झाला विचारविनिमग्न ॥ ६९ ॥

[ आकाशांतून एक तेजस्वी तारा पृथ्वीवर पडत असलेला पाहून मारुतीला वैराग्य झालें. ]

जेथें मरणक्रीडा नाहीं चालत असे नसे स्थान ।
संसारीं सुरगणही मृतिवश होतो असें मनीं जाण ॥ ७० ॥
वीज नि तरङ्ग बुद्बुद होउनि उत्पन्न नष्ट होतात ।
त्यापरि सुरगण देखिल कालमुखांत प्रवेश करितात ॥ ७१ ॥
ज्यांचें बल बहु मोठें अशा सुरांचीहि ही अशी मात ।
इतर प्राणिगणांची काय कथा करि विचार चित्तांत ॥ ७२ ॥
सुख कोणतें असे जें अनन्तवेळां न भोगिले जीवें ।
किंवा दुःखहि तें नच जें अतिसङ्क्लेशयुक्तशा भावें ॥ ७३ ॥
मोहाचें बलवत्तर आहे सामर्थ्य त्यामुळें जीव ।
फिरतो दुःखें भोगित सौख्याचें लाभलें न त्या नांव ॥ ७४ ॥
उत्सर्पिणि अवसर्पिणि[2] अशा हजारो व्यतीत होऊन ।
मानवभव हा कष्टें मिळतो तूं नष्ट करिशि त्या जाण ॥ ७५ ॥
नश्वरसुखांत होती आसक्त नि तृप्तिरहित होतात ।
प्राणी ताप नि सङ्कट अशा फला पावतात ते सतत ॥ ७६ ॥
चञ्चल कुमार्गगामी अतिशय दुःखद जनांस हा सतत ।
इन्द्रियगण जिनमार्गाविण हो नच शान्त जाण तूं त्वरित ॥ ७७ ॥

---

१ दिन व रात्रीं प्रफुल्ल होणाऱ्या कमलाप्रमाणें गंध. २ ज्या कालांत मनुष्याची बुद्धि, शरीर, आयुष्य आदिक वाढतात तो उत्सर्पिणीकाल. व हीं ज्यांत कमी कमी होतात तो अवसर्पिणीकाल.

न मिळे जिनपथ होती मोही जन बद्ध विषयजालांत ।
होतात मृग नि पक्षी जैसे जातात मृत्युगालांत ॥ ७८ ॥
विषपूर्ण सर्प जैशा भोगीं खेळे मनुष्य परिणामीं ।
दुःखाग्निदग्ध होइल निश्चित तो वदति आगमस्वामी ॥ ७९ ॥
वर्षं अनेक भोगुनि दुःखें जो राज्य एक दिवसाचें ।
मिळवी त्यासम आहे विषयसुखा इच्छिणें गमे साचें ॥ ८० ॥
सञ्चित मनुष्यभवि जो सुधर्म[1] केला सुरालयीं त्याचें ।
भोगून सुफल होतो नर लुटल्यासम असेचि हें साचें ॥ ८१ ॥
स्वर्गीयसौख्य भोगुनि संपे जें सुकृत दुरित[2] उदयास ।
येतां हीनस्थानीं[3] प्राणी जन्मून सहति आयास ॥ ८२ ॥
प्राणी कर्म करी जें तें त्याचा शत्रु मित्र वा आहे ।
याचा विचार करि वा जीवा जिनवचन सत्य हें पाहे ॥ ८३ ॥
यास्तव निन्दित दारुण या भोगांना अवश्य तूं सोड ।
होतो वियोग यांचा नियमें ही भावना मनीं जोड ॥ ८४ ॥
सोडून प्रियजन हा तपा न मी जरि करीन भोगीन ।
चक्री सुभौम जैसा नरकीं होऊन दुःख अतिदीन ॥ ८५ ॥
सुन्दर हरिणीनयना स्त्रीसद्गुणभूषिता अशा ललना ।
प्रेम जयांचें माझ्यावरि त्या त्यागू कशा बरे सुमना[4] ॥ ८६ ॥
क्षणभरि यापरि चिन्तुनि मारुतिनें निन्दिलें स्वहृदयास ।
स्वहितीं सावध होउनि त्यागाविण भोग रे भवायास[5] ॥ ८७ ॥
स्वर्गीं अनेकसागर वर्षं देवाङ्गनास रमवून ।
सुख भोगिलेंस विभवें येथें ही तृप्त होय तव न मन ॥ ८८ ॥
सागर नदीजलांनीं तृप्त न होतो तसा अतृप्त जरी ।
तूं राहशील जीवा तरून जाशिल कदापि न भवसरी[6] ॥ ८९ ॥
कां तूं नरकामधलें भयकर असिपत्रकुवनदुःखास ।
नच ऐकिलेंस जेणें इच्छिसि रागादिजन्यसौख्यास ॥ ९० ॥
रागोद्भव जें पातक तप करण्यानें समस्त नाशून ।
हे जीवा मुक्तिश्रीसुखास करि वा सदा निजाधीन ॥ ९१ ॥

---

१ पुण्य. २ पाप. ३ कृमिकीटकादिक. ४ ज्यांचें मन प्रेम, विश्वास, पातिव्रत्य आदिगुणयुक्त आहे. ५ संसारकष्ट. ६ संसाररूप नदी.

सुखसागरजलिं पडलों गेला मम भूतकाल सर्व वृथा ।
मी मुक्त करिन जीवा संसारांतून धरुनि शुद्धपथा[1] ॥ ९२ ॥
यापरि पवनसुताच्या विवेक उत्पन्न जाहला हृदयीं ।
जिनदास सूर्यसम तो सत्पथिं उद्युक्त होय सतत जयी ॥ ९३ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे हनुमन्निर्वेदं नाम द्वादशोत्तरं पर्व ॥ ११२ ॥

---

१ निर्मल रत्नत्रयमार्ग.

# एकशेतेरावें पर्व.

रजनी गेली तप्तसुवर्णासम[1] रवि उदयाला ।
आला पडली द्युति या भूवरि समस्ततम[2] सरला ॥ १ ॥
मुनिवर जैसें निजवचनांनीं भव्यजना मार्ग ।
दाखवितो रवि करि प्रकाशित समस्त भूभाग ॥ २ ॥
उगवुनि सूर्यें पद्मवनांना प्रफुल्ल झणि केलें ।
जसें जिनेशें हितोपदेशें भव्यां हर्षविलें ॥ ३ ॥
( तपोवनीं दीक्षा घेण्यासाठीं मारुति मित्रादिकांची आज्ञा मागतो. )
भवभय हृदयीं वायुसुताच्या उपजे मित्रगणा ।
निःस्पृह वदला तपोवनातें जाया द्या आज्ञा ॥ ४ ॥
प्रेमें विह्वल मन्त्री वदले करयुग जोडून ।
करा अनाथ न तपोवनाला आम्हां जाऊन ॥ ५ ॥
आम्हा भक्तां प्रमुदित व्हावें दीनां रक्षावें ।
अपुल्या चरणां सोडुनि आम्हीं कुठें वरें जावें ॥ ६ ॥
जे भवबन्धीं टाकिति होती अनर्थहेतु तया ।
बन्धु वदावें केवि न दाविति हितकर धर्मनया[3] ॥ ७ ॥
तरुनी जाया जो भवसागर झाला उद्युक्त ।
त्यांतचि त्याला पुनरपि फेकिति होइल केवि हित ॥ ८ ॥
जननीजनक नि मित्र भ्राता मदत करायास ।
येति न जीवा नरकीं दुःखी होतां तद्वत्स[4] ॥ ९ ॥
मानवभव हा दुर्लभ आहे बोधि[5] नि जैनमतीं ।
आळस करणें एक निमेषहि योग्य न यति वदती ॥ १० ॥
राहुनि देखिल तुमच्या सह मी होइल मज विरह ।
दुःख तीव्र मज होइल तुमचा हो असुखद मोह ॥ ११ ॥
देवासुरनर कुणिहि असो वा स्वकर्मवश सारे ।
कालदवानल[6] जाळी त्याला नेई प्रलया रे ॥ १२ ॥

---

१ तापलेल्या सोन्याप्रमाणें. २ अंधार. ३ धर्माची पद्धति.
४ त्यांचा बालक. ५ रत्नत्रय प्राप्ति. ६ यमरूपी वनाग्नि.

शुष्केन्धन जें अगणित भक्षुनि अग्नि न शम पावे ।
तृप्ति न लाभे सुख अनुभविलें पल्यावधि जीवें ॥ १३ ॥
जाणें येणें करवी दुःखद या भविं जीवाचें ।
कर्म असे तें माझ्याहुनि ही बलवत्तर साचें ॥ १४ ॥
तनु[1] ही थकली त्याचा करण्या क्षय ही प्रिय माझी ।
नाश कराया आज जहाली त्याचा मति राजी ॥ १५ ॥
गर्भी फिरवी जें अतिदुःखद ऐशा कर्मास ।
लङ्घुनि जाया मम मन इच्छी शाश्वत[2] शर्मास ॥ १६ ॥
यापरि मारुति बोलत असतां अन्तःपुरललना[3] ।
रडत्या झाल्या दुःख जहालें त्यांच्या बहुत मना ॥ १७ ॥
दुःखी झाल्या त्या ललनांना बोलुनि दृष्टान्त ।
शान्त करी तो मारुति खगपति करुनी दुःखान्त ॥ १८ ॥
नीतिनिपुण हा समीरनन्दन तनया सन्तुष्ट ।
करुनी देई राज्य यथोचित गमे न ज्या कष्ट ॥ १९ ॥
मित्रसमूहें वेष्टित मारुति निघे गृहांतून ।
चैत्योद्यानीं[4] गेला झाली विरक्ति अन्यून ॥ २० ॥
जात तयाला असतां पाहुनि जननयनांतून ।
अश्रू वाहति हृदय तयाचें झालें अतिखिन्न ॥ २१ ॥
जेथें गळतो मरन्द[5] सन्तत सुमवृन्दांतून[6] ।
उपवनिं ऐशा मारुति गेला सुविरत होऊन ॥ २२ ॥
कीर्ति जयाची दहा दिशामधि गेली व्यापून ।
'धर्मरत्न' या मुनिवर्याला पाही मोदून ॥ २३ ॥
जणु जो होता धर्ममण्यांचा सुन्दरसा राशि ।
पाहुनि झाला मोद तयाला मेघा मोराशीं ॥ २४ ॥
( धर्मरत्न मुनिजवळ दीक्षा घेऊनि मारुति मुनि झाला. )
जैसा भुजबलि आदिजिनाला पाहुनि वरि मोद ।
हर्ष जाहला श्रीशैलाला मन हो गतखेद ॥ २५ ॥

---

१ शरीर. २ नित्य- मोक्षसुखाला. ३ स्त्रिया. ४ ज्यांत जिनमंदिर आहे अशा बगीचांत. ५ मकरन्द. ६ पुष्पसमूहांतून.

उतरुनि मारुति नरयानांतुनि वन्दी भगवन्ता ।
वदला मजला द्यावी दीक्षा तपोरमाकान्ता ॥ २६ ॥
सुविरत झालें माझें मानस शरीरभवभोगीं ।
मुनिवर्यांच्या चरितीं झालें अतिशय अनुरागी ॥ २७ ॥
यतिवर वदले बघुनि असारा भवा करी स्वहित ।
चिन्तन तव हें उत्तम आहे मतिही अतिपूत ॥ २८ ॥
देह अशाश्वत तयेंचि शाश्वत चरितिं विहार करी ।
मति कल्याणी तुजला लाभे मिळेल मुक्तिपुरी ॥ २९ ॥
मिळे अनुज्ञा मुनिवर्यांची करुनि नमस्कार ।
भवभय हृदयीं ठेवुनि वसला पर्यङ्कें चतुर ॥ ३० ॥
मुकुट नि कुण्डल हार मुद्रिका आदि अलङ्कार ।
वस्त्र नि मानससङ्गा त्यागुनि बनला अविकार ॥ ३१ ॥
ललनानिगडा तोडुनि ममताजाल करी दूर ।
स्नेहा तोडुनि विषसम सौख्या त्यजि तो गुणधीर ॥ ३२ ॥
मोहतमा तो वैराग्याच्या दीपें दूर करी ।
देहा मानुनि कचऱ्यासम तो त्यातें अवधीरी ॥ ३३ ॥
कमलमृदुलशा निजाङ्गुलींनीं उपडुनि कचभार ।
महाव्रती तो मारुतनन्दन झाला श्रमणवर ॥ ३४ ॥

( स्वामिभक्त अशा साडेसातशे विद्याधर राजांनींही
मारुतिबरोबर जिनदीक्षा घेतली. )

भवभय ज्यांच्या उद्भवलें मनिं ऐसे खगराजे ।
प्रभुभक्तीचें मानसभूमधिं ज्यांच्या बीज रुजे ॥ ३५ ॥
सप्तशताधिक होती ज्यांची संख्या पन्नास ।
दिलें स्वपुत्रा राज्य तयांनीं त्यजिलें आशेस ॥ ३६ ॥
झाले मुनिवर नग्नदिगम्बर करुनी कचलोच ।
बाह्याभ्यन्तर सङ्गा त्यागुनि वरिति महाशौच ॥ ३७ ॥

( मारुतीच्या अनेक राण्यांनींही बंधुमती नामक
आर्यिकेजवळ दीक्षा घेतली. )

बन्धुमती या महत्तरार्येसन्निध जाऊन ।
वातसुताच्या नाना राण्या भवभय मनिं धरुन ॥ ३८ ॥

श्रीमति आदिक नांवें ज्यांचीं इतरहि नृपभार्या ।
शीलभूषणा वैराग्यानें झाल्या त्या आर्या ॥ ३९ ॥
वैभव त्यांना जीर्ण तृणासम वाटुनि निःसार ।
धारण केला नृपमहिषींनीं शीलतपोभार ॥ ४० ॥
सुगुप्तिसमितिव्रतशैलांना धरिलें श्रीशैलें ।
ध्यानाग्नीनें घातिकर्मगणकाष्ठा जाळियलें ॥ ४१ ॥
केवलबोधें भव्यजनांना सत्पथ मोक्षाचा ।
दाखविला श्रीशैलमुनीशें अनन्तसौख्याचा ॥ ४२ ॥
अघातिकर्मा चतुर्थशुक्लध्यानें जाळून ।
निर्वाणाचलिं मारुतियतिवर पावे निर्वाण ॥ ४३ ॥
जिनपदकमलीं सुभक्ति ठेविति दृढ जे जिनदास ।
मुक्तिश्री त्या वरिते घालुनि कण्ठीं करपाश ॥ ४४ ॥

इति श्रीरविषेणाचार्यप्रोक्ते महापुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत पद्यानुवादे हनुमन्निर्वाणाभिधानं नाम त्रयोदशोत्तरशतं पर्व ॥ ११३ ॥

## एकशेचौदा व एकशेपंधराव्या पर्वाची कथा.

श्रीमारुतीनें व लक्ष्मणाच्या आठ पुत्रांनीं जिनदीक्षा धारण केली हें वृत्त ऐकून रामचंद्र म्हणाले— नानाविध भोगाचे पदार्थ मिळत असतां त्यांचा त्याग करणाऱ्यांना वीर म्हणणें चुकीचें आहे— वास्तविक ते भ्याडच होत. यांना भोगांचा स्वाद माहीत नाहीं असें का म्हणू नये. असा विचार करून राम-लक्ष्मण भोगसागरांत निमग्न झाले.

येथें प्रस्तुत विषयाशीं संबंध असलेली दुसरी एक कथा आहे ती अशी:— पाहिल्या स्वर्गांत सचिव, पुरोहित, सामानिक आदि देवांनीं सुंदर दिसणारा सौधर्मेंद्र सभेंत सिंहासनावर बसून श्रोते असलेल्या देवापुढें याप्रमाणें उपदेश करूं लागला.

"देवहो, ज्यानें संसाररूपी दैत्याला केवलज्ञानरूपी चक्रानें ठार मारलें आहे त्या अरिहंताची आपण पुष्पांनीं पूजा करा. ज्यानें विंध्य व कैलास जिचे दोन स्तन आहेत, समुद्र जिचा सुंदर कमरपट्टा आहे अशी पृथ्वीरूपी स्त्री त्यागिली व मोहाचा नाश करून ज्यानें धर्मप्रकाश सर्व जगाला दाखविला त्या जिनेश्वराला नमस्कार करा. आत्मकल्याणाचें जिनेश्वरच कारण आहेत असें जाणून त्यांची तुम्ही भक्ति करा म्हणजे तुम्हाला त्यांच्याप्रमाणें अनंतगुणाची प्राप्ति होईल. जे जिननामाचा द्वेष करितात ते कुगतिरूप खड्ड्यांत पडतात. मिथ्यात्ववासनेनें जिनधर्माचा द्वेष मनांत उत्पन्न होतो. त्यामुळें विषयासक्ति वाढते. पञ्चाग्न्यादिक कुतपांनीं हीन पुण्ययुक्त देवपद प्राप्त होतें. महर्द्धिकदेवाची सेवा करतांना त्यांच्या मनाला दुःख होतें. कित्येक महर्द्धिकदेवही जेव्हां मनुष्यजन्म धारण करितात तेव्हां त्यांना रत्नत्रय प्राप्त होत नाहीं. कित्येकांना रत्नत्रय प्राप्त झालें तरी ते सोडून देतात अशीं माणसें अमृत पिऊनही ओकून टाकतात असें समजावें." याप्रमाणें इंद्राचा उपदेश चालत असतां

विभावसु नामक देव दुसऱ्या देवाला म्हणाला— मला मनुष्यजन्म प्राप्त झाल्यावर मी जिनदीक्षा धारण करून कर्मांचा नाश करीन व मोक्ष मिळवीन. हें त्याचें भाषण ऐकून दुसरा देव म्हणाला— येथें असतांना देव असाच विचार करितात पण मनुष्यपणा मिळाल्यावर हे विचार त्याच्या स्वप्नींही येत नाहींत. त्याच्या मोहाला हजारो फाटे फुटतात.

पूर्वी ब्रह्मेंद्र असलेला देव आतां राम झाला आहे पण अतिशय मोही बनला आहे. हें त्या देवांचें भाषण ऐकून सौधर्मेंद्र म्हणाला— " देव हो, सर्व बंधनापेक्षा स्नेहबंधन मात्र अत्यंत दृढ असतें. ज्याच्या हातापायांत बेड्या टोकल्या आहेत असा एकादा मनुष्य त्या बेड्या तोडून मोकळा होईल पण स्नेहबंधन तोडणें त्याला अशक्य वाटेल. राम व लक्ष्मण हे एकमेकांच्या स्नेहबंधनानें अतिशय जखडले आहेत. जर एकमेकाचें थोडा वेळही दर्शन नाहीं झालें तरीही ते घाबरे होतात. या स्नेहबंधनानें ते अतिशय जखडले आहेत. प्राण्यांची स्नेहानें अशी विचित्र स्थिति होते हें जाणून संसारनाशक प्रयत्न करून मनांत शांति उत्पन्न करून घेतली पाहिजे." असा उपदेश करून सौधर्मेंद्र आसनावरून उतरत असतां बाकीचे देव त्याला नमस्कार करून आपआपल्या स्थानीं निघून गेले.

परंतु सुरमणि व मृगचूल या दोन देवांच्या मनांत राम व लक्ष्मणाच्या स्नेहाची परीक्षा करावी असा विचार आला. एक दिवसही रामाचें दर्शन नाहीं झालें तर लक्ष्मण मरण पावेल असलें स्नेहाचें कोडें त्यांना उलगडलें नव्हतें म्हणून ते कौतुकानें अयोध्येंत राजवाड्यांत आले. त्यांनीं प्रथमतः राम मेला आहे व सचिव पुरोहित शोकानें माना खालीं घालून बसले आहेत, अंतःपुरांतील राण्या राममरणानें शोक करीत आहेत असें दृश्य उत्पन्न केलें.

यानंतर ते लक्ष्मणाकडे गेले व म्हणाले— लक्ष्मणा, बलशाली असा राम मृत्यु पावला ही फार वाईट गोष्ट घडली आहे. रामचंद्र मरण पावले ? काय झालें ? एवढेंच वाक्य लक्ष्मणाचें तोंडून बाहेर पडलें. डोळे अश्रूंनीं भरून आले व वीज कडाडून पडली असतां मनुष्य तत्काल मरण पावतो तसा लक्ष्मण सिंहासनावर बसलेल्या अवस्थेंतच तत्काल मरण पावला. जणु सिंहासनावर लक्ष्मणाचें चित्रच बसविलें आहे असा तो दिसू लागला. त्याचें शरीर चैतन्यहीन झालें. डोळे उघडे होते पण ते कोणास पाहत आहेत असें समजत नव्हतें. जीवित देण्यास असमर्थ असलेले ते दोन देव स्वस्थानीं निघून गेले. त्यांना आपल्या या कृत्यानें फार वाईट वाटलें.

इकडे लक्ष्मणाच्या सर्व स्त्रिया जमल्या व त्या शोक करूं लागल्या. हंबरडा फोडून रडूं लागल्या. रामचंद्रही धावतच तेथें आले. त्यांनीं त्याच्या अंगावर कोठें जखम आहे काय हें पाहिलें. एखादा नखाचा ओरखडाही त्याच्या अंगावर नव्हता. तत्काल रामचंद्रांनीं वैद्यांना बोलावणें पाठविलें. ते आले. मांत्रिकही आले. त्यांनीं परीक्षा केली व औषध आणि मंत्र यांचा उपयोग नाहीं कारण लक्ष्मणाच्या देहांतून प्राण निघून गेले आहेत असा त्यांनीं निर्णय सांगितला. शोकातिशयानें रामचंद्र मूर्च्छित झाले.

आपल्या जनकाची अशी दीनदशा पाहून लवण व अंकुश यांना वैराग्य उत्पन्न झालें. ते दुःखदायक संसारपाश तोडण्याला तयार झाले. त्यांनीं रामचंद्राच्या चरणांना नमस्कार केला व ते पालखींत बसून महेंद्रोदय उद्यानांत गेले. तेथें ' अमृतस्वर ' मुनिवर्यांना वंदून त्यांनीं जिनदीक्षा द्या अशी विनंति केली. त्यांनीं दीक्षा दिली. ती उत्तमरीतीनें ते पाळू लागले.

रामचंद्रांना पुत्रवियोग झाला व भावाचाही वियोग झाला. पण त्यांना लक्ष्मणच अत्यंत प्रिय वाटत असल्यामुळें इतरांच्या वियोगापासून त्यांना दुःख वाटलें नाहीं.

विवेकीजनास अशुभ अवस्था प्राप्त झाली असतां वैराग्य उत्पन्न होतें. व शोकापासून ते दूर राहतात. पण अत्यंत स्नेहाकुल व्यक्तीला हें प्राप्त होत नाहीं. असो.

शुभाशुभ कर्मांचा उदय झाला असतांही कित्येकांच्या स्वभावांत हर्षविषाद उत्पन्न होत नाहींत. ते विरक्त होऊन तप करितात व संसाराचा अंत करितात.

# एकशेचौदावें पर्व.

श्रीजिनदीक्षा धारण केली वीराष्टकें नि वायुसुतें।
जाणून राम हसले वदले हे वीर केवि कांतर ते ॥ १ ॥
मिळतां नानाविधसे भोग तया त्यजिति वीर ते कसले।
जणु ते पिशाचपीडित मानव ऐसें वदून त्या हसले ॥ २ ॥
झाले वा वातानें पीडित त्या वैद्य भेटला न खरा।
गुड गोड मनुज जाणी कळे न तत्स्वाद केधवा हि खरा ॥ ३ ॥
यापरि राम नि लक्ष्मण नानाविधभोगसागरीं बुडले।
कर्मवशराघवाचें सुज्ञान हि अज्ञतुल्य जड झालें ॥ ४ ॥
हा संसारी मानव सुखलव मिळतां हि होय मदमूढ।
मति मूढ होय त्याची जाणें नच कर्मरूप ती गूढ ॥ ५ ॥
नानालङ्कारांनीं मण्डित ऐशा अनेक सचिवांनीं।
शोभत होता प्रथमस्वर्गीचा इन्द्र एकदा स्थानीं ॥ ६ ॥
रत्नद्युतियुत-उन्नत-सिंहासनिं वैसला सुरेश सुखें।
शोभे मेरुगिरीच्या शिखरीं चैत्यासमान सर्व मुखें ॥ ७ ॥
ज्याची कान्ति तरङ्गासमान भासे असा गळां हार।
धारण करि जणु सुरपति नदीप्रवाहास हेमगिरि थोर ॥ ८ ॥
जणु नक्षत्रगणानें शोभे नभिं चन्द्र तेवि देवगणें।
सौधर्मेन्द्र सभेमधिं उपदेश करी प्रसन्न वचनमनें ॥ ९ ॥

[ सौधर्मेन्द्राचा देवांना उपदेश. ]

ज्यानें संसारासुर अतिशय दुःसाध्य बोधचक्रानें।
सुखनाशी नाशियला अरिहन्ता त्या यजा सुपुष्पगणें ॥ १० ॥
सम्पूर्ण दोषकक्षा जाळाया अग्नितुल्य जो आहे।
त्या जिनपतीस वन्दा केवलबोधें जगास जो पाहे ॥ ११ ॥

---

१ भिणारे भित्रे. २ गाढवाला. ३ गर्वानें मूर्ख. ४ गमेना. ५ सुमेरुपर्वत. ६ केवलज्ञानरूपीचक्रानें. ७ वनाला.

उग्रकषाय जयामधिं तरङ्ग हे उसळती सदा मोठे ।
भयकाममोह मासे विहरति ज्याच्यांत अन्त नच कोठें ।। १२ ।।
ऐशा भवार्णवांतुनि[1] भव्या तारावया समर्थ असे ।
त्या श्रीजिनपदकमलीं मन माझें भृङ्गतुल्य सतत वसे ।। १३ ।।
जो जन्मतांच नेला जिन इन्द्रें मेरुपर्वतावरती ।
ऐरावतगजमस्तकिं वसवुनि हृदयांत धरुनि अतिभक्ति ।। १४ ।।
क्षीरसमुद्रजलांनीं सहस्रघट अधिक आठ परिपूर्ण ।
भरलेले ओतियले सहस्रहस्तें सुरेश्वरें तूर्ण ।। १५ ।।
होऊन भक्तितत्पर निजपरिवारासवें अनन्यमनें ।
पूजिति अष्टद्रव्यें सुरेन्द्र करिती तथा गुणस्तवनें ।। १६ ।।
विन्ध्य नि कैलास जिचे स्तन सागर रम्यमेखला[2] भासे ।
ऐशी पृथ्वी त्यागुनि मुक्तिश्री सेविली जिना ! स्वरसें ।। १७ ।।
मोहान्धकार भूतलिं होता सर्वत्र पसरला नाथ ।
धर्म-प्रकाश देउनि दाखविला सज्जनास तूं सुपथ ।। १८ ।।
सिंह जसा गज मारी अत्यद्भुतशक्तिवन्त कर्मगजा ।
केलेस नष्ट नाथा हरिशी वैद्यासमान भव्यरुजा ।। १९ ।।
तुजला जिनेन्द्र म्हणती कालंजर[3] शम्भु आणि अरिहन्त ।
असशी शिव स्वयम्प्रभ महेश देवाधिदेव तूं सुगत ।। २० ।।
सद्धर्मचक्रवर्ती तीर्थंकर[4] तूं हिरण्यगर्भ[5] कृती ।
आहेस तूं स्वयम्भू मी तुज वर्णूं शके न अल्पमति ।। २१ ।।
संसारसूदना[6] तूं भवान्तका ज्ञानचक्षु आहेस ।
तूं सूरिसूर्य जगतां तूंच विभो सकल सद्गुणावास ।। २२ ।।
नरसुरखगपति सगळे भक्तीनें स्तविति सार्थ नांवांनीं ।
मिळवुनि तुझ्या प्रसादा सुभव्य होतात खचित मुक्तिधनी ।। २३ ।।
ज्याचें माहात्म्य असें स्मरणीं येतांच विपुल पुण्य हसे ।
पातक सर्व विनाशे तो जन आनन्दसागरांत वसे ।। २४ ।।

१ संसारसमुद्रांतून. २ कंबरपट्टा. ३ कालालाहि पचविणारा. ४ उत्तमज्ञान–केवलज्ञान ज्याला आहे. ५ गर्भांत असतांना ज्याच्यामुळें देव रत्नवृष्टि करतात. ६ संसारनाशका.

उत्तमकल्याणाचें मूळ जिनेश्वरचि हृदयिं जाणून ।
व्हा भक्त सतत त्याचे मिळतिल सुर हो तुम्हां अनन्तगुण ॥ २५ ॥

[ मिथ्यात्वी जीवाची अवस्था कशी असते. ]

जीवास आदि अन्त न कर्मांनीं घेरिला असे सतत ।
दुर्लभ नरता मिळवुनि पडतो धिक् तो तथापि मोहांत ॥ २६ ॥
गति चार हेचि खळगे अतिशय मोठे जयांत आहेत ।
ऐशा या संसारीं जिननामद्वेष धरिति जे सतत ॥ २७ ॥
त्या मिथ्यात्वी जीवां रत्नत्रयलाभ केवि होईल ।
भ्रमण तयांचें सन्तत चक्रारूढासमान चालेल ॥ २८ ॥
अन्धाच्या खांद्यावरि दुसरा देऊन हात अन्ध जरी ।
चालेल केवि जाइल विस्मय मज वाटतो सदैव उरीं ॥ २९ ॥
मिळतां मानवभव हा भवारिनाशक जिनेश्वरास गनें ।
जरी नादरील मानव त्याची चुकतील कां भवभ्रमणें ॥ ३० ॥
मिथ्यातपें महर्धिक होउनि सुर जीव देवसुख भोगी ।
आयुष्यान्तीं नृभवीं होतो मिथ्यामतांत अनुरागी ॥ ३१ ॥
मिथ्यात्ववासनेनें जिनधर्मद्वेष मानसीं धरितो ।
मिथ्याधर्म विचारी दर्शनमोहास तीव्रशा वरितो ॥ ३२ ॥
होऊन तीव्रमोही द्वेष करी तो सदा जिनेन्द्राचा ।
हितकर तया न मानी दाता जो सतत सौख्यकन्दाचा ॥ ३३ ॥
नरजन्मीं विषयामिष विलुब्ध होऊन मोहनीयानें ।
पञ्चाग्न्यादिक कुतपा करून सुर होय हीनपुण्यानें ॥ ३४ ॥

[ अल्पर्द्धि देव चिन्तार्त होतो. ]

अतितुच्छता स्वतःची पाहुनि तो दग्ध होय चिन्तेनें ।
सेवा महर्द्धिकाची करितांना खेदयुक्त होय गनें ॥ ३५ ॥
रत्नद्वीपासम मज जिनशासन रम्य लाभलें होतें ।
परि मन्दबुद्धि माझी कल्याणीं वर्तली न धिक्यातें ॥ ३६ ॥
परि वाक्चतुर खलांनीं कुशास्त्र सांगुनि मला कुमार्गांत ।
अल्पर्द्धि देव चिन्ती टाकियलें हाय जाहला घात ॥ ३७ ॥

१ पञ्चेन्द्रि.

संसारीं बहु फिरणें ज्यांच्या दैवीं असे असे जीव ।
होउनि मानव देखिल न जाणती श्रीजिनेन्द्रमतभाव ॥ ३८ ॥
देव महर्धिक देखिल सरतां आयुष्य मरुनि नरलोकीं ।
मानव होउनि जन्मे न मिळे जिनबोधि[1] त्यास अवलोकी ॥ ३९ ॥
तो धन्य नर म्हणावा मिळवुनि जिनबोधि जो करी स्वहित ।
परि मिळतां हि तियेला त्यागी तो पिउनि ओकितो अमृत ॥ ४० ॥

[ देवावस्थेचे विचार मनुष्यावस्थेंत राहत नाहींत. ]

देव विभावसु नामें मनांत चिन्ता करावया लागे ।
आयुष्य सम्पल्यावरि मिळेल मानवपणा मला वेगें ॥ ४१ ॥
मी विषयारि त्यागुनि करीन कपिचञ्चला[2] मना सुवश ।
कर्म नाशुनि जिनपद मिळविन नच गळिं पडेल भवपाश ॥ ४२ ॥
सुर एक त्यास वदला स्वर्गीं असतां अशीच मति होते ।
परि मानवता मिळतां मतिजल हें हृद्घटांतलें[3] गळतें ॥ ४३ ॥
माझ्या या वचनावरि बसेल विश्वास तव न मज वाटे ।
मानववैभव मिळतां मोहा फुटती सहस्रधा फाटे ॥ ४४ ॥

[ स्नेहबंधनासारखें दृढबंधन दुसरें नाहीं. ]

या रामाला बघ तूं ब्रह्मस्वर्गा त्यजून भूलोकीं ।
आला मानवविभवीं मोहित झाला अतीव अवलोकी ॥ ४५ ॥
ऐकून इन्द्र वदला तेजस्वी सर्व बन्धनांत दृढ ।
कीं स्नेहबन्ध आहे बान्धी तो मानवा भवीं गाढ ॥ ४६ ॥
हाता पाया देहा प्राण्याच्या बांधिलें तरी त्यास ।
सुटता येइल परि नच तोडु शके स्नेहबन्धनायास ॥ ४७ ॥
जोवरि धरी मनांत स्नेहाचा बन्ध मनुज मुक्ति नसे ।
हा स्नेहबन्ध अतिदृढ याहुनि दृढ अन्य भूतलीं न वसे ॥ ४८ ॥
पायांत ठोकतांही बेड्या जाइल सहस्रकोस नर ।
स्नेहें बद्ध न एकहि पाउल उचलावयास तो चतुर ॥ ४९ ॥
लक्ष्मण रामावरि या अतिशय अनुरक्त जाहला आहे ।
पाहुनि तृप्ति न ये त्या न दिसे अतिघाबरा दिसे पाहे ॥ ५० ॥

१ रत्नत्रयलाभ. २ माकडाप्रमाणें चपल. ३ मनरूपी घागरींतलें.

लक्ष्मण निमेषभरहि न दिसतां श्रीरामचित्त घाबरतें ।
तोडावयास त्या नच समर्थ वा केधवाहि तें होतें ॥ ५१ ॥
हा कर्मोदय ऐसा बुधही तेणेंचि मूढ होतात ।
भावी सर्व हि ऐकुनि कां नच जन करुनि घेति ते स्वहित ॥ ५२ ॥
यापरि सुर हो ऐसी प्राण्यांची स्थिति मनांत जाणून ।
यत्नें भवारिनाशक कृत्य करा शान्ति हृदयिं ठेवून ॥ ५३ ॥
यापरि इन्द्रें कथिला तत्त्वांचा मार्ग अमर ऐकून ।
भवभीत स्वस्थानीं गेले जिनदास शान्ति ठेवून ॥ ५४ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यप्रोक्ते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत–
पद्यानुवादे शक्रसुरसंकथाभिधानं नाम चतुर्दशोत्तरशत पर्व ॥ ११४ ॥

# एकशेपंधरावें पर्व.

( लक्ष्मण-राम स्नेहपरीक्षा. )

आसन सोडित असतां सुरपति करुनि तया नमन ।
विविध भाव सुर करुनी धारण गेले तेथून ॥ १ ॥
लक्ष्मण-रामस्नेहपरीक्षा करावयासाठीं ।
आले सुरयुग कौतुक अपुल्या बान्धुनि हृदयपटीं ॥ २ ॥
एक दिवसही राममुखाचें दर्शन जरि न घडे ।
हरिमृति होइल हें स्नेहाचें उलगडलें कोडें ॥ ३ ॥
शोकें विह्वल होतां लक्ष्मण अपुल्या परिहासें ।
सत्य परिस्थिति सांगू त्याला जेणें शान्त वसे ॥ ४ ॥
शोकें लक्ष्मण दिसतो कैसा त्याचें मुख कैसें ।
राग कुणावरि काढिल पाहू आपण मृदुहासें ॥ ५ ॥
हृदयीं निश्चय करुनी दोघे सुरमणि मृगचूल ।
साकेतापुरिं आले सौधीं शिरले शशिधवल ॥ ६ ॥
श्रीरामाच्या भवनीं मायाशोका ते रचिती ।
आक्रन्दनरव सर्वस्त्रीमुखिं अतिमळकट कान्ति ॥ ७ ॥
सचिवपुरोहित मित्र वगैरे घालुनि मुख खालीं ।
वदले हरिला मेला सुन्दर राघव बलशाली ॥ ८ ॥
राघव मेला वाक्य श्रविलें चक्रेश्वर हरिनें ।
काय जहालें बोलुनि डोळे भरले अश्रुगणें ॥ ९ ॥
वीज कडाडुनि पडली असतां तत्क्षणिं नर मरतो ।
सिंहासनगत झाला झडकरि हरि गतजीवित तो ॥ १० ॥
दिसे जनां तो चित्रचि सिंहासनिं जणु बैसविलें ।
डोळे उघडे कोणा वदती हें न कुणा कळलें ॥ ११ ॥
निघुनी गेला जीव तनूंतुनि ऐकुनि मृत राम ।
जीवित देण्या अक्षम ते सुर गेले निजधाम ॥ १२ ॥

---

१ मनरूपीं वस्त्रांत. २ मन्द हंसण्यानें. ३ चन्द्राप्रमाणें शुभ्र.
४ रडण्याचे शब्द. ५ मृत. ६ असमर्थ.

याला येइल आशस्मिकसें दुर्विधिनें[1] मरण ।
विस्मय उपजुनि सुर ते झाले स्वमनीं अतिखिन्न ॥ १३ ॥

( लक्ष्मण मरण पावला असें पाहून ते दोन देव
पहिल्या स्वर्गाला गेले. )

अरुचि मनामधिं ठेवुनि गेले प्रथमस्वर्गांत ।
पश्चात्तापें व्याकुलता बहु वाढे हृदयांत ॥ १४ ॥
अविचारानें पापचि घडतें तें दे सन्ताप ।
हृदया सन्तत म्हणुनि विवेकी असतो निष्पाप ॥ १५ ॥

( प्रेमकलहानें पति रुसला असें समजून स्त्रिया त्याला—
लक्ष्मणाला प्रसन्न करण्याचा प्रयत्न करितात. )

सुरमायेचें कार्य असे हें नेणुनि हरिललना ।
प्रमुदित करण्याकरितां झटती श्रीसौमित्रिमना ॥ १६ ॥
अकृतज्ञा जी कुणि मूर्खेनें केला अपमान ।
सौभाग्याच्या गर्वा वाहुनि तो नच तव सहन ॥ १७ ॥
प्रमुदित व्हावें नाथा सोडा आपण कोपास ।
कां दुःखानें खेदित होउनि वरिलें मौनास ॥ १८ ॥
ज्याच्याविषयीं कोप मनामधिं कोप तिथेंचि धरा ।
प्रेमिजनावरि तो धरणें हें उचित न अवधारा ॥ १९ ॥
यापरि बोलुनि त्या आलिङ्गिति कोणि तया नमिती ।
मधुरोक्तीनें प्रमुदित करण्या त्यातें त्या यतती ॥ २० ॥
कोणी घेउनि नारी अङ्कीं वीणा वाजविती ।
गाती हरिगुण मधुरपणानें निष्फलता वरिती ॥ २१ ॥
घट्ट मिठी त्या मारिति त्याच्या घालुनि गळि हात ।
चुंम्बुनि वदना हर्षित होण्या वदति तया त्वरित ॥ २२ ॥
स्वगाल त्याच्या गालीं ठेवुनि गुलगुल त्या वदती ।
प्रसन्नतेचें चिह्न तयाच्या मुखिं नच अनुभविती ॥ २३ ॥
हरिणीनयना कोणी त्यातें तिरपें पाहून ।
प्रमुदित करण्या यत्ना करिती परि तो धरि मौन ॥ २४ ॥

---

१ दुर्दैवानें. २ कान्तिहीन. ३ मांडीवर.

जांभई देउनि कोणी नारी हरिचें मुख बघती ।
कोणी त्याचा पाय स्वशिरीं स्थापुनि त्या वदती ॥ २५ ॥
यापरि नानाचेष्टा केल्या व्यर्थचि त्या झाल्या ।
चैतन्यानें वर्जित हरिची समाप्त हो लीला ॥ २६ ॥
नारी होत्या हरिला सतरासहस्र नवतरुणी ।
मधुर तयाला वचनें वदती जीं अमृतावाणी ॥ २७ ॥
त्याच्या देहा स्पर्शिति नारी संशय मनिं येतां ।
मोहित होउनि वदती नाथा प्रमुदित करि चित्ता ॥ २८ ॥
देवेन्द्राच्या जणु या नारी अनुपम रूपवती ।
शोकसमुद्रीं बुडल्या झाली म्लान मुखीं कान्ति ॥ २९ ॥

( शोकयुक्त रामाचें लक्ष्मणाकडे येणें. )

दूतमुखानें ऐकुनि लक्ष्मणमरणाचें वृत्त ।
शोकें पीडित हृदयीं झाला राघव अत्यन्त ॥ ३० ॥
सचिव नि आप्तासह तो आला धावत वेगानें ।
विगतद्युति निजलक्ष्मणवदना राम बघे नयनें ॥ ३१ ॥
प्रातश्चन्द्रासमशा पाहुनि वदन श्रीहरिचें ।
चिन्तीं हृदयीं घडलें कारण काय बरें याचें ॥ ३२ ॥
नम्र जहालें किञ्चित् मस्तक बघुनि श्रीहरिचें ।
खिन्न रुष्ट कां मजवरि झाला हें न कळे साचें ॥ ३३ ॥
स्नेहें जाउनि जवळ तयाचे तो मस्तक हुंगी ।
हिमशीतलसा देह तयाचा राघव आलिङ्गी ॥ ३४ ॥
जीं मृतिचिह्नें सगळीं बघुनिहि अतिगाढस्नेहें ।
राघव मानी अमृतचि[1] हरिला अतिशय संमोहें ॥ ३५ ॥
अङ्ग गळा मुख पृष्ठ नि भुजयुग सर्व ढिले झाले ।
श्वासोच्छ्वासें विरहित लक्ष्मणशरीर तव दिसलें ॥ ३६ ॥
जीव जयांतुनि गेला ऐशा लक्ष्मणदेहास ।
पाहुनि राघव घामें झाला ओला सविशेष ॥ ३७ ॥
आली मूर्च्छा पडला भूवरि झाला शुष्क गळा ।
नयनाश्रूंनीं आला त्याच्या मलिनपणा गाला ॥ ३८ ॥

१ न मेलेला.

सावध होउनि पाहे त्याच्या अङ्गोपाङ्गास ।
जखम न देहीं कोठें दिसली कारण मरणास ॥ ३९ ॥
ओरखडाही नसे नखाचा देहीं कोठेंही ।
कैशी झाली कुदशा ऐशी न कळे मज कांहीं ॥ ४० ॥

(वैद्यांनीं लक्ष्मण जिवंत नाहीं असें सांगितलें.)

यापरि चिन्तन करुनी राघव झाला खिन्नमना ।
जाणत असुनि हि झडकरि दूतें कळवी वैद्यगणा ॥ ४१ ॥
आले वैद्यहि औषधमन्त्रीं अतिशय निपुण असे ।
करुनि परीक्षा वदले लक्ष्मण जीवित मुळिंच नसे ॥ ४२ ॥
दुःखी होउनि छिन्नमूलतरुतुल्य[1] श्रीराम ।
पडला होउनि मूर्च्छित अल्पचि लाभे आराम ॥ ४३ ॥
शीतलचन्दन-गन्धजलांनीं मूर्च्छा करि दूर ।
किङ्करगण जैं सावध राघव रुदन करी चतुर ॥ ४४ ॥
जैसा विधु नभिं विरळ्या मेघें रजनीं मलिन दिसे ।
नेत्राश्रूंनीं मलिन राममुख हास्य न ज्यांत वसे ॥ ४५ ॥
अतिशय दुःखी पाहुनि रामा अन्तःपुररामा[2] ।
शोकसमुद्रीं बुडल्या ज्याला पार न नच सीमा[3] ॥ ४६ ॥
नाथा आपण कांहो रुसला बोला प्रिय बोल ।
कोठें आपण गेला नुमजे मन तुमचें सरल ॥ ४७ ॥
अपराधाविण कां अमुच्यावरि नाथा रोष असा ।
अल्पसमयही पाहुनि आम्हा प्रियकर अला हसा ॥ ४८ ॥

(लवण व अङ्कुश यांनीं दीक्षा घेतली.)

लवण नि अङ्कुश निजजनकाची पाहुनि दीनदशा ।
तोडायाला तत्पर झाले दुःखद-भवपाशा ॥ ४९ ॥
सार न आहे मनुजभवामधिं आहे अतिहीन ।
मृत्यु अचानक हरुनी नेतो लागे निमिषहि न ॥ ५० ॥
सुरविद्याधर सगळे मिळुनिहि जिंकु न ज्या शकती ।
ऐशा हरिलहि पाश यमाचे शीघ्रचि वश करिती ॥ ५१ ॥

---

१ ज्याचीं मुळें तुटलीं आहेत अशा वृक्षासमान. २ अन्तःपुरांतील स्त्रिया.
३ मर्यादा.

मलभृत आहे देह नि धन हें नश्वर नच टिकतें ।
चिन्तुनि झाले सुविरत हृदयीं श्रीराघवसुत ते ॥ ५२ ॥
पुनरपि गर्भी येण्याचें ज्या भय अतिशय वाटे ।
कुगतिवनामधिं पीडा देतिल दुःखाचे काटे ॥ ५३ ॥
राघवचरणां नमूनी वसले सुतयुग शिविकेंत ।
गेले घेउनि महेन्द्रउपवनिं सुविरति हृदयांत ॥ ५४ ॥
तेथें 'अमृतस्वर' मुनिवर्या गेले ते शरण ।
भाग्यें युत ते लवण नि अङ्कुश झणि झाले श्रमण ॥ ५५ ॥
त्रिखण्ड पृथ्वी जणु मातीचा ढेकुळ समजून ।
तिजला सोडुनि झाले समतामृतपानीं लीन ॥ ५६ ॥
झाला इकडे पुत्रवियोग नि बान्धवमृति तिकडे ।
दुःखें झाले राममनाचे सहस्रधा तुकडे ॥ ५७ ॥
राज्य नि पुत्र नि जीवित याहुनि रामा प्रिय वाटे ।
लक्ष्मण एकचि अप्रिय सगळे जैसें वनिं काटे ॥ ५८ ॥
कर्मे येतां अशुभ अवस्था अपुल्या आप्तजना ।
सुविरत वाढे शोक न उपजे धैर्ये सुजनमना ॥ ५९ ॥
परवस्तूचे निमित्त मिळतां कालहि अनुकूल ।
स्वकृतशुभाशुभकर्मोदय जो विरक्ति दृढमूल ॥ ६० ॥
यापरि मिळतां बाह्याभ्यन्तर कारण जिनदास ।
विरक्त होउनि तप करि त्याचा चुकतो भववास ॥ ६१ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्य-विरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत-पद्यानुवादे लवणाङ्कुशतपोभिधानं नाम पञ्चदशोत्तरशतं पर्व ॥ ११५ ॥

---

१ मळानें भरलेला वाईट. २ पालखींत. ३ जैन-दिगंबरमुनि. ४ संसारांत राहणें.

# एकशेसोळा व सतराव्या पर्वांची संक्षिप्त कथा.

जेव्हां लक्ष्मण मरण पावला तेव्हां त्याच्या तीव्र वियोगानें खिन्न होऊन रामानें राज्य त्यागिलें. एक क्षणपर्यंतही लक्ष्मणाच्या देहापासून रामचंद्र वेगळे होत नव्हते. ते त्याला मांडीवर घेऊन त्याचें तोंड धूत असत. त्याच्या अंगावरून आपला हात फिरवीत असत. एखादें बालक आपल्या आवडत्या फलाचा जसें त्याग करीत नाहीं तसें रामचंद्र लक्ष्मणदेहाला खालीं ठेवीत नसत.

ते त्याला म्हणत असत– बाळा लक्ष्मणा, तूं मला सोडून कोठें रे गेलास ? तुझा वियोग मला सहन होत नाहीं रे. एकदा तरी अमृत मधुर भाषण बोल. माझ्यावर इतका कसा तूं रागावला आहेस. कधींही तूं माझ्यावर रुसला किंवा रागावला नव्हतास. मी तुझा कोणताही अपराध केला नाहीं मग कां रे रागावला आहेस ? मला पाहून आदरानें उठून सिंहासनावर बसवून स्वतः तूं जमीनीवर बसत होतास. आतां मौन कां रे धारण केलेस ?

अरे लक्ष्मणा, ऊठ. माझे लव व अङ्कुश हे दोन पुत्र वनांत गेले आहेत. चल त्यांना परत आणण्यास आपण जाऊं.

अरे लक्ष्मणा, हें चक्ररत्न तुला अत्यंत प्रिय होतें. त्याचा त्याग कां केलास रे ? तुझा हा विरहाग्नि मला फार जाळीत आहे. तो शांत करण्याचा उपाय लौकर सांग.

वत्सा लक्ष्मणा, हा सूर्य अस्तास जात आहे व सरोवरांतील कमळें तुझ्या डोळ्याप्रमाणें मिटलीं आहेत. बाळा लक्ष्मणा, आतां रात्र झाली व तुझ्यासाठीं ही कोमलशय्या मी तयार केली आहे– आपण झोप. माझ्यावर कां रुसला आहेस त्याचें कारण माझ्या कानांत सांग. तुझें तोंड किती मनोहर दिसत होते. तुझें कमलासारखें

सुंदर डोळे प्रफुल्ल कमलाला हंसत होते. ते आतां कां मिटून घेतलेस ? तूं जगाला प्रकाशित करणारा अपूर्व दीप होतास पण यमरुपी वाऱ्यानें तो शांत करुन टाकला. आपल्या चक्ररत्नानें सर्व शत्रुचक्राला तूं जिंकिलेस पण कालचक्रानें तुझा कसा पराभव केला हें मला कळेना.

अरे लक्ष्मणा, रात्र संपूनही फार उशीर झाला आहे. अद्यापि तूं झोपत आहेस. ऊठ. तुझें दर्शन घ्यावयास लोक फार उत्सुक झाले आहेत. पूर्वीं केव्हांही अशी दीर्घ झोप तुला लागली नव्हती. ऊठ व नेहमीच्या राजकार्यांकडे आपलें चित्त लाव. तुझी अशी अवस्था पाहून मुनीश्वरांच्या मनांतही दया उत्पन्न झाली आहे. त्यामुळें त्यांच्या प्रातःकृत्यांत शिथिलता उत्पन्न झाली आहे. वत्सा लक्ष्मणा, रावणाची शक्ति लागून तूं निश्चेष्ट पडला होतास पण पुनः तुला चैतन्य प्राप्त झालें होतें तसें आतांही पुनः चैतन्य प्राप्त होऊ दे. अशुभकर्मोदयानें तुझ्या विरहाचें मला कष्ट होत आहे. लक्ष्मणा ऊठ म्हणजे तें सर्व कष्ट नाहीसें होऊन मला मोठा आनंद वाटेल.

लक्ष्मण मेला व रामचंद्र अतिशय दुःखी झाले आहेत ही वार्ता बिभीषण, सुग्रीव, विराधित आदिक विद्याधरराजांना समजल्यावर ते सगळे अयोध्येला आले. रामचंद्रांची ती दुःखदशा पाहून सर्वांचे डोळे अश्रूंनीं भरले. मन त्यांचें दुःखी झालें.

श्रीरामाजवळ येऊन त्यांनीं त्यांना नमस्कार केला. क्षणपर्यंत मौनानें बसून नंतर ते म्हणाले– प्रभो, आपण सुज्ञ आहांत. शोकाचा त्याग करा. त्यावेळीं चतुर-व्यवहारी बिभीषणानें याप्रमाणें समजुतीच्या चार गोष्टी सांगितल्या. संसारीप्राण्याच्या पाठीमागें जन्म-मरण अनादिकालापासून लागलें आहे. जो प्राणी जन्मला त्याला मरण आहेच. तें कदापि टळणार नाहीं. मरण पावलेला प्राणी परत येत नसतो. शोक करण्यानें जर येईल तर शोक करणें योग्य होईल. शोक ऐकून परलोकीं गेलेला प्राणी परत येतो असें आढळून येत नाहीं. या मृत्यूला जिंकण्यास हरि, हर, ब्रह्मा व बुद्ध हेही समर्थ नाहींत. याला फक्त जिनेश्वरानेंच जिंकिलें आहे.

उपपादशय्येवर उत्पन्न होणारे इंद्रादिकही या मृत्यूला जिंकू शकत नाहींत. ज्याच्या हातांत वज्रदण्ड आहे असा यम-मृत्यु सिंहाप्रमाणें आहे व सर्व प्राणी हरिणासारखे आहेत. ज्याला यमानें पीडा दिली नाहीं असा जीव जगांत कोणही नाहीं. हा यम पाताळांत, मध्यलोकीं व स्वर्गांतही आहे. हा जेथें नाहीं असें स्थान

या जगांत नाहीं. मेघ जसा अग्नीचा नाश करितो तसा हा यममेघ सर्व जीवाग्नींचा नाश करितो. हा मृत्यु सर्व लोकांत आहे. जेथें नाहीं असा तिळाएवढाही प्रदेश नाहीं.

अवसर्पिणीच्या सहाव्या विभागांत प्रलयाग्नीनें पर्वतही भस्मसात होतात तेथें माणसांची काय कथा. ज्यांना सुरासुर वधू शकले नाहींत अशा वज्रर्षभसंहनन-धारकासही हा यम जिंकता येत नाहीं.

या संसारांत स्वजनही आतांपर्यंत इतके झाले आहेत कीं, तितकी वाळूही नदीमध्यें नसेल. ज्याला प्रेमानें आपण पोसलें होतें तोच आपला शत्रुही होतो. पूर्वभवामध्यें आपण जिचें स्तनपान केलें होतें तिचेंच मांस एकाद्या भवांत या जीवानें भक्षिलें असेल.

मोहराजाची अद्भुतशक्ति आहे. तिच्यावश होऊन हा जीव प्रियसंयोगाची इच्छा करितो. या जीवानें नरकांत ताम्ररस इतका प्राशन केला आहे कीं, स्वयम्भू-रमण समुद्रांत तेवढें पाणी नसेल. या जीवानें अन्योन्याचा एवढा मोठा नाश केला आहे कीं, त्या डोक्यांची जर रास केली तर ती सूर्यालाही भेदून वर जाईल. मोहपिशाचानें हा मनुष्य झपाटलेला आहे व त्यामुळें तो संसारांत सारखें भ्रमण करीत आहे. याप्रमाणें शोक कमी व्हावा म्हणून बिभीषणानें एकांतीं रामचंद्राला पुष्कळ उपदेश केला. पण रामचंद्राची भ्रांति दूर झाली नाहीं व त्यांनीं लक्ष्मणाचें कवटाळलेलें शरीर आपल्यापासून दूर केलें नाहीं.

# एकशेसोळावें पर्व.

[ रामाचा राज्यत्याग. ]

अनुष्टुप्–

मेला जेव्हां त्रिखण्डेश पुरुषोत्तम लक्ष्मण ।
सोडिलें राज्य रामानें दुःखी तो होय दारुण ॥ १ ॥
होता श्रीहरिचा देह सुगन्धि मृदु सुन्दर ।
सोडिती न क्षण हि त्या रामाचे बाहुपञ्जर ॥ २ ॥
तो आलिङ्गी नि त्या स्थापी निजाङ्कावर सत्वर ।
प्रक्षाली तोंड सुजलें शरीरीं फिरवी कर ॥ ३ ॥
बाल प्रियफला इच्छी खालीं ठेवावया नच ।
ठेवी न लक्ष्मणा खालीं मानी तेणें स्वहानिच ॥ ४ ॥
वत्सा, सोडून मजला कोठें गेलास तूं वद ।
तुझें गमन हें मातें झालें अत्यन्त दुःखद ॥ ५ ॥
तुझा वियोग मी कैसा साहू तो ताप दे मला ।
मला दिलेस फेकून कां दुःखाग्नींत कोमला ॥ ६ ॥
परलोकप्रयाणाची वार्ता कळविली न तूं ।
आहेस क्रूर तूं वत्स माझा न असमी हि तू ॥ ७ ॥
एकदां तरि तूं बोल सुधासदृश भाषण ।
विनम्र असशी बाला, कोपाचें काय कारण ॥ ८ ॥
मान वा रुसणें वत्सा, माझ्यावरि कधींहि न ।
अपराध न मी केला कां वरें हें अभाषण ? ॥ ९ ॥
उठून मजला तेथें होता स्थापित आदरें ।
मला दुरून पाहून आसनावरुनि त्वरें ॥ १० ॥
स्वतः बसत होतास भूतलावरि बालका ! ।
आतां गेला तुझा कोठें समादर नि मौन कां ? ॥ ११ ॥
लक्ष्मणा ऊठ रे माझे लवणाङ्कुश कानना ।
गेले पुत्र तया आणू त्वरें निश्चित सद्म ना ॥ १२ ॥

तुझा वियोग होऊन दुःखी झाल्या तुझ्या प्रिया ।
लोळती भूमिवर या ऊठ दे सान्त्वना तया ॥ १३ ॥
मेखला कुण्डलें हार चूडा रत्नादि भूषणें ।
ज्यांचीं तुटून पडलीं रडती गुणवर्णनें ॥ १४ ॥
करूं नका तुम्ही शोक प्रियांनो शान्त व्हा म्हणी ।
जागा झालों धरा मोदा आहात बहुसद्गुणी ॥ १५ ॥
जाऊ कोठें करूं काय तुझा विरह भाजितो ।
उपाय सांग मजला जयें तो नाश पावतो ॥ १६ ॥
हें चक्ररत्न बघ रे अत्यन्त प्रिय जें तुझें ।
नको त्यागू तया वत्सा, जीवितासम तें दुजें ॥ १७ ॥
विरहानल हा बन्धो, माझें सर्वाङ्ग जाळितो ।
अपूर्व हा मला वाटे शमे वद उपाय तो ॥ १८ ॥
प्रयाण परलोकीं जें तुझें जाळून मन्मना ।
टाकितें शुष्क करुन जें विषासम जीवना ॥ १९ ॥
ऋषिभोजन वेळा ही टळली ऊठ वा त्वरें ।
जेऊं आपण आतां या समयीं कोप सोड रे ॥ २० ॥
चालला सूर्य अस्तास कमलें मिटलीं कशीं ।
लक्ष्मणा तव निद्रेनें मिटलीं नयनें जशीं ॥ २१ ॥
जाहली रात्र रामानें केली शय्या सुकोमला ।
लक्ष्मणा बाहुपाशांत राम घेऊन बोलला ॥ २२ ॥
तुझा सद्भाव वद वा कानीं माझ्याच लक्ष्मणा ।
कोणता हेतु वा आहे या अवस्थेस सांग ना ॥ २३ ॥
तुझें प्रसन्न वदन होतें अतिमनोहर ।
अत्यन्त कान्तिरहित तें केवि वद सुन्दर ॥ २४ ॥
प्रफुल्ल पद्मा हसती असे डोळे तुझे किती ।
म्लान ते आज दिसती जाहली कां अशी स्थिति ॥ २५ ॥
सांग सांग रुचे काय तें तें तत्काळ देइन ।
बोल कांहीं मुखें वत्सा ! तुझें कां खिन्नसें मन ॥ २६ ॥
सीतेचें कां मनाभाजीं तुला स्मरण जाहलें ।
गेली ती परलोकास झालें सर्व तिचें भलें ॥ २७ ॥

विषाद सोड लक्ष्मीशा[1] ! विरुद्ध खगभूप हे ।
इच्छा आले करायास हो तूं सन्नद्ध वा त्वरें ॥ २८ ॥
रागावून हि सौमित्रे[2] ! मुखिं सौन्दर्य राहिलें ।
पूर्वी तें न दिसे आतां विचेष्टित न हें भलें ॥ २९ ॥
प्रसन्न हो नमस्कार करितों मी तुझ्या पदां ।
केलीस कां अशी वत्सा ! स्थिति जी मरणापदा ॥ ३० ॥
अद्वितीय असा दीप तूं जगाला प्रकाशक ।
परि कालसमीरानें[3] नष्ट झालास नायक ॥ ३१ ॥
झालास राजराजा तूं केलें लोकास हर्षित ।
केलें अनाथ सर्वांना झालें गमन अद्भुत ॥ ३२ ॥
अरिचक्रा स्वचक्रानें जिंकिलेस तुवा विभो ।
कालचक्रें परि तुझा पराभव कसा प्रभो ॥ ३३ ॥
आली नृपाललक्ष्मीनें शोभा देहा तुझ्या सभीं ।
तुझी निर्जीव ही शोभे मूर्ति माझ्यापुढें उभी ॥ ३४ ॥
राजेन्द्रा, सोड ही झोप रात्र आतांच सम्पली ।
सूर्यागमन सांगाया सन्ध्या ही बघ पातली ॥ ३५ ॥
सुप्रभात जिनेन्द्राचें ज्यांनीं लोकास पाहिलें ।
खुललीं भव्यपद्में हीं नेत्रांनीं बघ आपुले ॥ ३६ ॥
उशीर झाला बहुत वत्सा ! तूं झोप सोड रे ।
लोकां दर्शन द्यायास आतां जाऊ सभीं त्वरें ॥ ३७ ॥
केव्हांही पाहिली नाहीं दीर्घ झोप अशी तुझी ।
सकाळीं निष्प्रभ दिसे तुझें मुख जसा शशी ॥ ३८ ॥
विपरीत असें कार्य दे सोडून नि ऊठ रे ।
सम्पूर्ण राजकार्यांत वत्सा ! दे लक्ष्य तूं त्वरें ॥ ३९ ॥
उठशील न राजेन्द्रा जर तूं जिनमन्दिरीं ।
कसें मङ्गलसङ्गीत ध्वनि होतील ते तरी ॥ ४० ॥
अशी पाहून कुदशा श्रमणांच्या मनांत ही ।
दया उत्पन्न होऊन उद्वेगा[4] जाति ते सुधी ॥ ४१ ॥

---

१ त्रिखण्डलक्ष्मीचा पति अशा हे लक्ष्मणा. २ सुमित्रेच्या मुला लक्ष्मणा. ३ यमरूपीवायूनें. ४ खिन्नता.

प्रातःकर्तव्य शिथिल त्यांचें तें वघ होतसे ।
आत्मानुभूतिविमुख मुख त्यांचें पहा दिसे ॥ ४२ ॥
वीणा-वेणु-मृदङ्गादिध्वनि शून्य अशी पुरी ।
त्वद्वियोगभयें खिन्न मौन ही हृदयीं धरी ॥ ४३ ॥

( चंद्रकांत राजाची कन्या ही चाल. )

पूर्वीं सञ्चित अशुद्ध ऐसा कर्मोदय येतां ।
भावाच्या हा विरहें आतां भोगितसे कष्टा ॥ ४४ ॥
जैसें पूर्वीं युद्धीं आलें होतें चैतन्य ।
वन्धो तैसें पुनरपि येवो गळोचि जें अन्य ॥ ४५ ॥
चिन्तन ऐसें करुनी वदले राम श्रीहरिला ।
ऊठ हरे वा दे जिनदासा हर्षचि रामाला ॥ ४६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत- पद्यानुवादे रामदेवविप्रलापं नाम षोडशोत्तरशतं पर्व ॥ ११६ ॥

---

१ चैतन्यहीनदशा.

# एकशेसतरावें पर्व.

लक्ष्मण मेला झाला दुःखी अतिशय बलराम ।
कळतां वार्ता आले खगपति[1] रामीं ज्या प्रेम ॥ १ ॥
येइ विभीषण निजपुत्रासह तेवि विराधितही ।
निजपरिवारें खगसुग्रीवहि दुःख मनीं वाही ॥ २ ॥
नेत्रीं आले अश्रु तयांच्या झालें खिन्न मन ।
श्रीरामाला सौधीं येउनि करिती ते नमन ॥ ३ ॥
बसुनि क्षणभरि भूमितलावरि विनती नम्रपणें ।
वदले आपण ऐकुनि घ्यावी नाथा शान्तमनें ॥ ४ ॥
शोक असे हा कठिणचि अतिशय नाथा त्यागाया ।
आहा आपण अतिशय सुज्ञ त्यागा शीघ्र तया ॥ ५ ॥
बोलुनि ऐसें वदे विभीषण चतुर व्यवहारीं ।
सत्यपदार्थस्वरूप वदतों रामा अवधारीं ॥ ६ ॥
अनादिनिधनस्थिति[2] ही राजन् आहे जगताची ।
आजचि घडली असे न समजा कथिती विबुध शुचि[3] ॥ ७ ॥
या संसारीं जन्म जयाला मरण असे त्यास ।
टळतें कधिंहि न तें जरि करिता विविधोपायास ॥ ८ ॥
परतुनि येतो देहीं गेला जीव न हे नृमणे[4] ! ।
शोक त्यजावा उपाय तो नच पुनरपि ये जेणें ॥ ९ ॥
जो परलोकीं गेला येइ न ऐकुनि शोकरवा ।
येउनि उत्तर देइल ऐशा समज न मनिं भावा ॥ १० ॥
स्त्री-पुरुषांच्या संयोगानें होती उत्पन्न ।
जीवांचे हे देह नृपाला यामधिं विस्मय न ॥ ११ ॥
उदकीं जन्मुनि बुद्बुद जैसे विध्वंसित होती ।
जन्मुनि देहहि आयुष सरतां विलया झणि जाती ॥ १२ ॥

---

१ विद्याधरराजे. २ ज्याला प्रारंभ व नाश नाहीं. उत्पत्ति व विनाश नसलेली. ३ पवित्र. ४ नररत्ना.

जे उपपादज[1] जनपालक सुर इन्द्रादिक असती ।
असुनि अयोनिज[2] पुण्यसंक्षयें मृतिवश ते होती ॥ १३ ॥
गर्भक्लिष्ट[3] नि रोगें पीडित तृणजलबिन्दुचल ।
चर्में वेष्टित अस्थिमांसमय भरले ज्यांत मल ॥ १४ ॥
ऐशा मानवदेहीं धरि जो मानव अभिलाषा ।
मुक्तिसुखाची त्यानें करणें विफल न कां आशा ॥ १५ ॥
स्वतःस मानी अजर अमर नर त्यानें कां शोक ।
इतराविषयीं वदा करावा व्हावें निःशोक ॥ १६ ॥
जैसे मरती अन्य तसा मी आहे मरणारा ।
यमदंष्ट्रान्तरपीडित[4] मीही होइन म्हणणारा ॥ १७ ॥
त्यानें सावध होउनि निजहितकार्यीं लागावें ।
स्वपरजनांना सत्पथ दावुनि मोक्षा साधावें ॥ १८ ॥
एकचि मरतो मानव केवल नच हो इतरांचें ।
उच्चाक्रन्दन करणें उचितचि परि नच हें साचें ॥ १९ ॥
जन्मे प्राणी मृत्युस घेउनि साधारणधर्म ।
असे जगाचा निश्चल वदती मनुजा बुध वर्म ॥ २० ॥
प्रियजनसङ्गमलाभेच्छा मनिं ठेवुनि शोक करी ।
परि तो कधिहि न होतो इच्छा नर तो विफल वरी ॥ २१ ॥
जैसे चमरी काननिं पीडित शबरें लोभ धरी ।
निजकचपाशीं व्यर्थ गमे तो तत्प्राणास हरी[5] ॥ २२ ॥
सगळे आपण इष्टवियोगें येथुनि जाणार ।
शोक वृथा तो बुध त्या त्यजिती धारुनी मनिं धीर ॥ २३ ॥
पविदण्डा[6] करिं धरि ऐसा यम सिंहासन आहे ।
सर्व प्राणी असति मृगासम परि निर्भय पाहे ॥ २४ ॥
पीडि न ज्याला यम जन ऐसा कोण असे जगि या ।
पाताळीं वा भूतलिं राजन् मृत्युस नैव द्रष्टा ॥ २५ ॥

---

१ उपपादशिलेवर ज्यांचा जन्म होतो ते. २ योनिपासून न उत्पन्न होणारे. ३ गर्भांत दुःखी झालेला. ४ यमाच्या दाढांमध्ये चूर्ण झालेला. ५ [illegible] गळा कापून टाकणारा. ६ वज्रदंड.

जिनपति ऐसा एकचि आहे पीडि न ज्यास यम ।
जिंकाया त्या हरिहर सुगतहि[1] न क्षम हे राम ॥ २६ ॥
यमाग्नि जाळित आहे सन्तत जीववना रामा ।
विन्ध्यवनासम विश्व दिसे हें सुजना अभिरामा ॥ २७ ॥
फिरुनी भववनि मत्तगजासम होती स्मरदास ।
मानव रामा अन्तीं होती यमपाशांत वश ॥ २८ ॥
सुधर्मसुपथा मिळवुनि गेला स्वर्गीं जरि जीव ।
सरित्तटाच्या तरुसम पडतो त्यागुनि शुभभाव ॥ २९ ॥
घन विध्वंसी अग्निस राजन् जीव तसे सगळे ।
नष्टचि होती यममेघानें कुणिही नच वगळे ॥ ३० ॥
अम्बरिं जावो रसातळीं वा सर्वस्थानांत ।
यम राहे हे नृपते आपण ध्यावें ध्यानांत ॥ ३१ ॥
अवसर्पिणिचा भेद सहावा नाशा जैं पावे ।
भारतिं गिरि ही विनष्ट होती नृकथा केवि कवे ! ॥ ३२ ॥
वज्रर्षभवपु ज्यांचें होतें न सुरासुरवध्य ।
तेहि विनाशा गेले कदलीसम नच यम साध्य ॥ ३३ ॥
पातालांतुनि सर्पा ओढुनि मारी गरुड जसा ।
जननीहृदया विलगे वाला यम निर्दय तैसा ॥ ३४ ॥
हे प्रियपुत्रा हे प्रियबन्धो प्राणप्रियभार्ये ।
कोठें गेला मजला सोडुनि दिलें असे धैर्यें ॥ ३५ ॥
यापरि करि जो शोक तयाला यम अजगर गिळितो ।
व्यर्थ तयाचा नरभव होतो भववनिं तो फिरतो ॥ ३६ ॥
करितो मी हें करीन नन्तर ऐशा चिन्तेनें ।
जन काळाच्या वदनीं शिरतो उदधित नौका ने ॥ ३७ ॥
अन्यभवीं जरि गेल्या मनुजा भेटे नर कोण ।
शत्रु मित्र जे विरह तयांचा कधिंही होइल न ॥ ३८ ॥
स्नेह नि आदर करी परांचा मानुनि त्या स्वजन ।
शिरतो नाना क्लेशवनानलिं ज्याला जयास उपमा न ॥ ३९ ॥

---

१ बुद्ध.

या संसारीं स्वजन हि इतुके झाले आहेत ।
सरितीं वाळू नाहीं तितुकी समजा चित्तांत ॥ ४० ॥
पोशियलें ज्या प्रियकर नाना करुनी कार्यगणा ।
मानव तोचि क्रोधी होतो धरुनी शत्रुपणा ॥ ४१ ॥
पूर्वभवामधिं ज्या मातेचें केलें स्तनपान ।
तिजला मारुनि मांस तियेचें सेविति अदय जन ॥ ४२ ॥
स्वामी मानुनि नम्र जयाला होउनि आदरितो ।
किङ्कर होतो तो चरणाचें ताडन बहु सहतो ॥ ४३ ॥
मोहनृपाची अत्यद्भुतशी शक्ति असे लोकीं ।
नर वश होउनि संयोगातें इच्छी अवलोकी ॥ ४४ ॥
जागा नुरली तिळप्रमितही जेथें हा जीव ।
जन्मा मरणा प्राप्त न झाला वदती जिनदेव ॥ ४५ ॥
ताम्रादिकरस नरकीं प्याला इतुका हा प्राणी ।
स्वयम्भुरमणीं उदक न तितुकें म्हणती बुध जाणी ॥ ४६ ॥
राशि मलाचा भक्षण केला सुकर होऊन ।
विन्ध्य हजारो पर्वत होतिल त्याहुनि बहु ऊन ॥ ४७ ॥
अन्योन्यांच्या करुनी नाशा राशी शीर्षांची ।
जरि जमवियली सूर्या भेदुनि जाइल वर साची ॥ ४८ ॥
तप्तवालुकापथिं प्रवेशें जीवा अनुपमसें ।
दुःखचि होतें जैसें मनुजा मोहें भूप ! तसें ॥ ४९ ॥
अल्पकालच्या विषयसुखामधिं मोहें होऊन ।
लुब्ध भवीं हा अगणितदुःखें करित असे सहन ॥ ५० ॥
मोहपिशाचें झपाटलेला होउनि उन्मत्त ।
जीव फिरे हा संसारामधिं विषयीं आसक्त ॥ ५१ ॥
कषायचिन्तायास जयामधिं ऐसें कुशरीर ।
जैसें त्यजणें योग्य हरीचा हा जड वपुभार ॥ ५२ ॥
जिनदासश्रीविभीषणानें कथिलें एकान्तीं ।
राम तथापि न हरिवपु सोडी धरुनि मनिं भ्रान्ति ॥ ५३ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास पद्मकुंवर-
पद्यानुवादे लक्ष्मणवियोगविभीषणसंसारस्थितिवर्णनं नाम सप्तदशोत्तरं पर्व ॥ ११७ ॥

---

## एकशेअठराव्या पर्वाची संक्षिप्त कथा.

सुग्रीवादिक विद्याधरराजांनीं रामचंद्रांना म्हटलें– ' प्रभो, आम्ही सुंदर चिता रचितों. लक्ष्मणाच्या देहाला अग्निदग्ध करावें. हें भाषण ऐकल्यावर रामचंद्र क्रोधानें म्हणाले– " दुष्टानो, तुमचे माता, पिता, आजोबा यांना जाळून टाका. जो कोणी तुमचा संबंधी मेला असेल त्याबरोबर तुम्हीही मरा. माझ्या लक्ष्मणाविषयीं असें अमङ्गल बोलू नका. व तुम्ही आपलें तोंड मला दाखवू नका. चल लक्ष्मणा, आपण येथून दुसरीकडे जावू " असें म्हणून लक्ष्मणाचें प्रेत त्यांनीं उचलून घेतलें व इतर ठिकाणीं ते गेले. तेथें गेल्यावर लक्ष्मणा ऊठ, अरे किती झोपावें ? आतां स्नान करण्याची वेळ झाली. असें बोलून त्यांनीं त्याला सुवर्णकलशांनी स्नान घातलें. मुकुटादिकांनीं त्याला भूषित केलें. व जेवणाची वेळ झालीं तेव्हां सरस पक्वान्नें आणण्या-साठीं स्वैपाक्यांना आज्ञा केली. रत्नमयपात्रांत नानाविध अन्नें आणवून त्यांचा घास ते लक्ष्मणाच्या तोंडांत घालू लागले. व लक्ष्मणा वत्सा खा रे म्हणून त्याला विनवू लागले. अरे माझ्यावर तूं रागावला आहेस. अन्नावर रागावण्याचें कारण काय ? अरे हें अन्न अमृताप्रमाणें मधुर आहे व शांति उत्पन्न करणारें आहे. त्याच्यावर रागावणें योग्य नाहीं. चन्दनचर्चित लक्ष्मणाचें शरीर मांडीवर घेऊन राम त्याचें मुख, गाल व हातांचें चुंबन घेऊन किती झोपतोस ऊठ, ऊठ असें वारंवार म्हणूं लागले. याप्रमाणें रामचंद्र मोहकर्माच्या पूर्ण आधीन झाले. लक्ष्मण मेला व रामचंद्र वेडे झाले हें वृत्त शत्रूंना समजलें व ते लंकेहून मोठें सैन्य घेऊन अयोध्येच्या जवळ जवळ आले.

सुंदाचा मुलगा सुंदररत्न व इंद्रजिताचा मुलगा वज्रमाली आदिक वीर अयोध्या हस्तगत करण्यास आले. ही वार्ता समजल्यावर प्रजा प्रक्षुब्ध झाली.

सुग्रीवादिकराजे रामचंद्राच्या बाजूनें लढावयास सन्नद्ध झाले. रामचंद्रही लक्ष्मणाला मांडीवर घेऊन वज्रावर्त धनुष्यास बाण जोडून युद्धास तयार झाले.

अशावेळीं स्वर्गांत जटायुदेव व कृतांतवक्रदेव यांची आसनें चंचल झालीं. जटायु व कृतांतवक्र देवांनीं अवधिज्ञानानें सर्व प्रकार जाणला. व ते रामचंद्राला संकटमुक्त करण्यासाठीं अयोध्येंत आले.

जटायुदेवानें शत्रुसैन्याला मोहित केलें. पाठीमागें पर्वत व पुढें अयोध्या आहे असें त्यानें दाखविलें. तें अयोध्येजवळ येत आहे तोंच ती अयोध्या फार लांब गेली आहे असा भास जटायूनें उत्पन्न केला. एवढेंच नव्हें तर खालीवर चोहोकडे अनेक अयोध्यांचा आभास त्यानें निर्माण केला. त्यामुळें आतां आपणास पळावयासही स्थान उरलें नाहीं असें सैन्यास वाटून तें घाबरून गेलें. अशारीतीनें शत्रु घाबरल्यामुळें त्याला पळून जाण्यासाठीं दक्षिणेची दिशा मोकळी केली. तेव्हां तें सैन्य दक्षिणकडे पळून गेलें.

इंद्रजिताचा मुलगा पविमाली व मुंदपुत्र सुंदररत्न यांना वैराग्य उत्पन्न झालें व त्यांनीं रतिवेगमुनीश्वराजवळ मुनिदीक्षा घेतली. त्यांना जटायुदेवानें नमस्कार केला व तो त्यांना म्हणाला कीं– प्रभो, पूर्वी मी जैनसाधूंचा फार द्वेष केला होता त्यामुळें मला नरकतिर्यंचादि गतिमध्यें फार फिरावें लागलें असें बोलून त्यानें स्वतःचें चरित्र सांगून त्यांना वंदन केलें.

नंतर ते दोघे देव अयोध्येंत रामाजवळ आले. रामचंद्र बंधुशोकानें मोहित झाले होते. यांचें दुःख दूर करावें असा दोघांनीं विचार केला.

कृतांतवक्रदेव वठलेल्या झाडाला पालवी फुटावी म्हणून पाणी घालूं लागला. जटायुदेवानें दोन मेलेले बैल नांगराला जोडून त्यांना चाबकानें त्यांनीं चालावें म्हणून फटके मारू लागला पण ते एक पाऊलही पुढें टाकीनात. पुनः जटायुदेवानें शिळेवर बीज पेरण्यास सुरुवात केली. कृतांतवक्रदेवानें उन्हांत पाणी भरून लोणी काढण्यासाठीं तें घुसळूं लागला.

पुनः घाण्यांत वाळू घालून ती रगडून तेल काढण्याचा प्रयत्न जटायुदेव करूं लागला.

हें सर्व रामचंद्रांनीं पाहिलें व ते म्हणाले– वठलेल्या झाडाला पाणी घालून काय उपयोग होणार ! मेलेल्या बैलांना नांगराला जुंपून नांगर कसा चालविता येईल. शिळेवर बी पेरणें मूर्खपणाचें आहे. पाणी घुसळून लोणी कधींही काढतां येत नाहीं.

व घाणींत वाळू रगडून तेल केव्हांही निघणार नाहीं. यांत तुम्हाला श्रमाशिवाय काय फळ मिळेल बरें ? तेव्हां अशीं कार्यें करणारे तुम्ही मूर्खशिरोमणि आहांत.

यानंतर त्या दोघा देवांनीं रामचंद्राला विचारलें– अरे भल्या माणसा, या जीवरहित देहाला तूं वाहून नेत आहेस याच्यांत तुला काय फळ मिळालें किंवा मिळणार आहे ? बोल.

तेव्हां रामचंद्र रागावले व लक्ष्मणाच्या देहाला आपल्या हृदयाला लावून ते म्हणाले– लक्ष्मणाविषयीं असें अमंगल बोलतांना आपणास लाज कशी वाटत नाहीं ? असें तो कृतांतवक्राबरोबर बोलत असतां जटायुदेवानें खांद्यावर एक मनुष्यशव घेतलें व तो रामचंद्राजवळ आला. रामचंद्र त्याला म्हणाले– हें मढें तूं खांद्यावर कां वाहत आहेस. तुझी बुद्धि विवेकरहित झाली असें मला वाटतें. तो मनुष्यही म्हणाला– हा प्रश्न तूं जसा मला विचारीत आहेस तसा स्वतःलाही विचार. तुला दुसऱ्याचा अल्पही दोष दिसतो व स्वतःचा महादोषही दिसत नाहीं हें आश्चर्यावह आहे. तुला पाहून मला मोठा आनंद वाटत आहे. आपण सगळे स्वच्छन्दी आहो. तूं आम्हा स्वच्छंद्यांचा राजा हो. आपण हातांत ध्वज घेऊन सर्व जगांत उन्मत्त होऊन स्वच्छन्दानें फिरू या.

याप्रमाणें जटायु व कृतांतवक्राचें भाषण ऐकून रामचंद्रांचा मोह नाहींसा झाला व ते पूर्वीप्रमाणें शांतस्वभावी बनले. जसें शरत्कालीं आकाश मेघरहित स्वच्छ होतें तसें रामचंद्र शोकमुक्त व शांत झाले.

यानंतर त्या दोन देवांनींही स्वतःचा परिचय रामाला सांगितला. तुम्ही मला यथार्थदर्शन करविलें म्हणून मी तुमचा आभारी आहे असें रामचंद्र म्हणाले.

यानंतर रामचंद्रांनीं शरयूनदीच्या कांठीं लक्ष्मणदेहाचें दहन केलें. नंतर रामचंद्रांना वैराग्य झालें. त्यांनीं शत्रुघ्नाला राज्यभार धारण करण्यास सांगितलें पण शत्रुघ्नानेंही मी तुझेंच अनुसरण करीन असें सांगितलें अर्थात् त्यानेंही राज्याचा स्वीकार केला नाहीं. पुष्कळ काल भोगांचा भोग घेऊनही मनाला तृप्ति होत नाहीं. पण जिनाचे जे दास आहेत ते या भोगांचा त्याग करितात व त्यांना खरें सुख मिळतें.

# एकशेअठरावें पर्व.

सुग्रीवादिक भूपें म्हटलें रामास राघवा देवा ।
रचितो चिता सुरम्या लक्ष्मणदेहास अग्नि लावावा ॥ १ ॥
वदले राम क्रोधें तुमचे माता पिता नि आजोबा ।
जाळुनि टाका सत्वर तुमच्या या भाषणांत नच शोभा ॥ २ ॥
दुष्टांनो जो कोणी बान्धव तुमचा असेल जरि मेला ।
त्यासह तुम्हीहि मरा तुमचें मुख दाखवू नकाचि मला ॥ ३ ॥
बा ऊठ लक्ष्मणा हें याचें कुवचन न ऐकणेंचि बरें ।
आपण अन्यस्थानीं जाऊ हे बोलती असत्यचि रे ॥ ४ ॥
यापरि बोलुनी लक्ष्मण देहा उचलावयास राम सजे ।
तेव्हां सुग्रीवादिक खांदा द्यायास पातले राजे ॥ ५ ॥
परि विश्वास तयावरि न ठेवतां लक्ष्मणास उचलून ।
अन्यस्थानीं गेला राघव शिशु विषफला जसें त्यजि न ॥ ६ ॥
पाणी नयनीं आणुन वदले श्रीराम लक्ष्मणा वचन ।
किति झोपतोस वत्सा उठुनी आतां करी सुखें स्नान ॥ ७ ॥
बोलुनि ऐसें प्रेता स्नानासनिं बैसवून मूढमनें ।
घाली सुवर्णकुम्भें स्नान श्रीराम उष्णनीरानें ॥ ८ ॥
मुकुटादिभूषणांनीं हरिदेहा भूषवून राम वदे ।
आणा विविधरसान्नें जेणें रसना अतीव आनन्दे ॥ ९ ॥
नानारत्नें जडलीं ऐशा पात्रीं अनेक सरसान्नें ।
आणून ठेविलीं तें सूदें तत्काळ राघवाज्ञेनें ॥ १० ॥
घेउनि करांत अन्नग्रासा लक्ष्मणमुखांत घालून ।
राम वदे खा वत्सा परि कण्ठांतून उदरिं उतरे न ॥ ११ ॥
जैसा जिनोपदेश प्रवेश न करी अभव्यकानांत ।
अन्नग्रास हरीच्या वदनांतुन तो न जाय उदरांत ॥ १२ ॥
राम हरीला वदला माझ्यावरि जरि असे तुझा कोप ।
अन्नावरि कां करिशी अमृतासम मधुर अन्न हरि कोप ॥ १३ ॥

१ लैपाक्यानें.

ही मदिरा प्याल्यामधि अत्यन्त स्वच्छ पिउन ही टाक ।
ऐसें बोलुनि लावी मदिरेचा तन्मुखास तो चषक ॥ १४ ॥
समजुनि जिवन्त हरिला स्नेहानें राम मूढ होऊन ।
ऐशा क्रिया सदोदित करी जयें सर्व जाहलें खिन्न ॥ १५ ॥
चन्दनचर्चितदेहा राघव बसवुनि हरीस मांडिवरी ।
मुख गाल हात चुम्बी वदे किती झोपतोस ऊठ हरि ॥ १६ ॥
मोहमहाकर्माच्या झाला उदयांत पूर्ण आधीन ।
सुग्रीवादिक ऐशी स्थिति पाहुनि जाहले मनीं खिन्न ॥ १७ ॥
लक्ष्मण मेला झाला राघव वेडा सुवृत्त ऐकून ।
शत्रु क्षुब्ध जहाले प्रचण्ड वैराग्नि हृदयिं पेटून ॥ १८ ॥
जो सुन्दाचा नन्दन सुन्दररत्नाख्य त्यास ते वदले ।
मारून तव पित्या बा राज्य तयाचें विराधितास दिलें ॥ १९ ॥
( सुंदररत्न वगैरे शत्रूंचें अयोध्येवर आक्रमण करण्याकरितां प्रयाण.)
ज्यानें तो श्रीलक्ष्मण मेला वेडा नि जाहला राम ।
आतां जिंकायाला जाऊ होईल आपुलें काम ॥ २० ॥
सुग्रीवाशीं बान्धुनि मैत्री जाणून वृत्त सीतेचें ।
विद्याधरवृन्दाचें मिळवी साहाय्य राम तैं साचें ॥ २१ ॥
आकाशांतुनि ज्यांचें गमन अशा यानवाहनें त्वरित ।
लङ्केस जात असतां विनाशिले द्वीप तैं तयें अमित ॥ २२ ॥
या राम-लक्ष्मणांना सिंह नि गरुडेश दोन विद्यांची ।
झाली प्राप्ति जयांनीं द्युति वाढे तेवि शक्ति बहु त्यांची ॥ २३ ॥
करुनि प्रवेश लङ्काद्वीपीं केलें तयें महाकंदन[2] ।
इन्द्रजित मेघवाहन घटकर्णा टाकिलेंचि बान्धून ॥ २४ ॥
लक्ष्मण करांत येतां चक्रायुध तेंचि रावणावरती ।
फेकून मारि त्याला झाला सौमित्रि तो त्रिखण्डपति ॥ २५ ॥
परि आतां तो लक्ष्मण मेला झाला नि राम बहु वेडा ।
आतां सुग्रीवादिक झाले असमर्थ भीति मनिं सोडा ॥ २६ ॥
आहे मास सहावा स्कन्धीं हा प्रेत राम घेऊन ।
फिरत असे भावाचें झाला तो शोककर्दमीं मग्न ॥ २७ ॥

१ प्याला– मद्यपिण्याचें एक पात्र. २ मोठें युद्ध.

याच्या या भावानें अमुचा विध्वंसिला असे वंश ।
जाउनि साकेतापुरिं करु त्याचा आज पूर्णसा नाश ॥ २८ ॥
इन्द्रजिताचा पुत्र हि ऐकुनि हें वचन चारुरत्नाचें ।
पविमाली वहु भयकर वदला वज्रासमानशा वाचें ॥ २९ ॥
या दुष्टांनीं अमुच्या वंशाचा नाश जो असे केला ।
फल अतिकटुक तयाचें आतां मी चाखवीन वहु त्याला ॥ ३० ॥
सैन्य सर्वें वहु घेउनि पविमालीं तैं निघें महाकोपें ।
सुन्दसुतासह आला साकेताग्रहण वाटलें सोपें ॥ ३१ ॥
सुग्रीवादिक खगपति सजले श्रीरामपक्ष घेऊन ।
सुन्दसुतासह आला पविमाली हें स्वमानसीं वघुन ॥ ३२ ॥
लवणाङ्कुशागमानें साकेता भीत जेवि होऊन ।
झाली क्षुब्ध तथा या समयीं ही क्षुब्ध होय पौरंगण[1] ॥ ३३ ॥
अरिसैन्य जवळ आलें पाहुनि राघव हरीस मांडिवरी ।
घेऊन करीं धरिलें वज्रावर्तास सशर वेवि करी ॥ ३४ ॥
जणु तें धनुष्य दिसलें यमराजभ्रूलता[2] दुजी आहे ।
आलो निजस्वभावीं श्रीरामहि अरिविनाश करु पाहे ॥ ३५ ॥
ऐशा समयीं झाली कृतान्तवक्र नि जटायु अमरांची ।
सिंहासनचञ्चलता वदलें अन्योन्य उभय ते वाचीं ॥ ३६ ॥
संरंभ[3] हे जटायो, कां वाटे आपणा वदा मजला ।
अवधिज्ञानें जाणुनि कृतान्तवक्त्रा वदावया सजला ॥ ३७ ॥

( जटायुदेव व कृतांतवक्त्रदेव स्वतःवर रामचंद्रानें काय उपकार केले यानें वर्णन करतात. )

मी ज्यावेळीं होतो कृतान्तवक्त्रा गिधाडभवि रामें ।
मजला सुताप्रमाणें रक्षियलें सतत जाण या प्रेमें ॥ ३८ ॥
यावेळीं तो राघव लक्ष्मणमरणें सशोक वहु झाला ।
अरिसैन्यहि वहु आलें निजवश साकेतपुर करायाला ॥ ३९ ॥
ऐकुनि जटायुवचना अवधिज्ञानोपयोग जोडून ।
वदला कृतान्तवक्राहि सुर रामा शोकतप्त पाहून ॥ ४० ॥

---

१ नगरवासी लोक. २ यमराजाच्या भुवयीरूपी वेलीप्रमाणें. ३ कार्य करण्यास प्रवृत्त होणें.

मित्रा माझाही तो प्रभु राघव तत्प्रसाद पावून ।
वहु सौख्य भोगिलें मी जें सुरसौख्यासमान न न्यून ॥ ४१ ॥
कष्टप्रसङ्ग येतां नाथा त्यांतून करिन मी मुक्त ।
ऐसें तयास वदलों होतों तें पाळणें असें युक्त ॥ ४२ ॥
यास्तव आतां आपण उभयहि रामासमीप झणि जाऊं ।
करुं कष्टमुक्त त्यातें किङ्करकार्यास[1] सर्वदा जागू ॥ ४३ ॥
ज्यांच्या कानीं कुण्डल मस्तकिं मुकुट, प्रभा दिशांत सरे ।
ऐसें सुरयुग तेव्हां स्वर्गाहुनि भूतलावरि उतरे ॥ ४४ ॥
आले कोसलनगरीं[2] उभयहि सुर तो कृतान्तवक्त्र वदे ।
अरिसैन्य मोहवी तूं साकेतानगरगमन नच साधे ॥ ४५ ॥
रामासन्निध जातों मी त्याला मोहरहित करण्यास ।
होउनि विशोक जेणें प्रवृत्त होईल खचित सुतपास ॥ ४६ ॥

( शत्रुसैन्याला मोहित करून जटायुदेवानें त्याला
दक्षिणदिशेकडे पिटाळलें. )

तो सुर जटायु इच्छितरूप रचायास कुशल वहु होता ।
मोहवि अरिसैन्याला दाखवि तो अतिसमीप साकेता ॥ ४७ ॥
पाठीमागें पर्वत पुढें अयोध्या तयास तो दावी ।
जवळ तिच्या तें येतां पुनः पुढें निघुनि शीघ्र ती जाई ॥ ४८ ॥
खालीं वरती इकडे तिकडे दिसती अनेक साकेता ।
आकाशांतहि दिसती तेणें सेना मनीं वहु भ्रान्ता[3] ॥ ४९ ॥
आतां स्वजीविताला धारण करणें गमे महाकठिण ।
ही रामदेवतेची दिसते वहु विक्रिया अपरिमाण ॥ ५० ॥
ही विक्रिया न खगजनकृत ऐशी नच तयांत ती दिसते ।
अमुचें येणें इकडे आम्हा अविचारपूर्ण कीं गमतें ॥ ५१ ॥
ज्याच्या किरणसहस्रें जगत् प्रकाशांत सर्वदा न्हातें ।
आम्ही सोनकिड्यासम अमुच्या वैरास विफलता येते ॥ ५२ ॥
चोहीकडे अयोध्या येथून पळावयाहि न स्थान ।
आतां कसें करावें झालों येउनि अतीव हैराण[4] ॥ ५३ ॥

---

१ नोकराचे कर्तव्याला. २ अयोध्यानगरांत. ३ भांबावली, ४ कष्टी, श्रमयुक्त.

हें सैन्य अयोध्येचें अब्धितरङ्गासमान चोहिंकडे ।
आम्ही अतिशय अल्पचि अमुच्या हृदयास तीव्र घोर पडे ॥ ५४ ॥
विस्तृत सैन्यतरङ्गीं आम्हीं जणु बुड्बुडे बुडायाचे ।
यांत न कल्याण दिसे आतां यांतुनि कसें जगायाचें ॥ ५५ ॥
यापरि परस्परांना विद्याधरसैन्य बोलतें झालें ।
देहीं कम्प प्रगटे हृदय तयाचें अतीव थरथरलें ॥ ५६ ॥
यापरि करून विह्वल पळावया दक्षिणा दिशा दावी ।
गेले पळून सगळें टळलें समजून मरण तें भावी ॥ ५७ ॥
श्येनां[1] पाहुनि पक्षी जैसें होऊन घाबरे पळती ।
मागें वळुनि न बघतां गेलें तें सैन्य सारखें पुढती ॥ ५८ ॥
आम्ही बिभीषणाला उत्तर जाऊन कायसें द्यावें ।
केलें अकार्य आम्ही कैसें हें कृष्णवदन दावावें ॥ ५९ ॥
अमुच्या सम्बन्धिजनां दावावें वदन केवि हें न कळे ।
श्रीइन्द्रजितसुताच्या येणें वैराग्य मानसीं आलें ॥ ६० ॥
श्रीसुन्दररत्नासह पविमाली[2] बहु सुमित्र घेऊन ।
रतिवेगमुनिवराच्या जाऊन समीप जाहला श्रमण ॥ ६१ ॥

( जटायुसुर आपले पूर्वभवदोष सांगत आहे. )

त्या सर्व मुनिवरांना पाहुनि तो सुर जटायु नम्रपणें ।
वदला आपण झाला महर्षि अपुल्या पदास शतनमनें ॥ ६२ ॥
पूर्वीं श्रमणगणा मी निर्मल असतां दिले महादोष ।
अतिशय दुःखांचा मज तिर्यङ्नरकांत लाभला कोष ॥ ६३ ॥
जो मोहशत्रु त्याचा झाला सम्बन्ध दुर्निवार मला ।
तेणें भवार्णवीं मग मुनिवर्या जीव हा असे भ्रमला ॥ ६४ ॥
सांगुनि अशा स्वचरिता नमन तदा सकलसाधुवृन्दाला ।
केलें आदरभावें हरिलें त्यानें स्वकीय पापमला ॥ ६५ ॥
मागितली मुनिवर्यां क्षमा नि त्यांनी हि शान्तहृदयानें ।
केली नन्तर आला साकेतीं सुर जटायु हर्षमनें ॥ ६६ ॥

( कृतान्तवक्त्र व जटायुदेवांनी [illegible] )

१ [illegible]. २ इंद्रजिताचा पुत्र.

भावाच्या शोकानें मोहित शिशुतुल्य राम करि चेष्टा ।
उभयहि सुर त्या पाहुनि यतले त्याच्या हरावया कष्टा ॥ ६७ ॥
यमवक्रदेव वठल्या द्रुममूला[1] सिंचि विपुलनीरानें ।
रामप्रबोधनास्तव[2] रामें तत्कार्य पाहिलें नयनें ॥ ६८ ॥
सुर तो जटायु देखिल जोडी मृत बैल नांगरा दोन ।
हातीं चाबुक घेउनि ताडन करि टाकिती न ते चरण ॥ ६९ ॥
पेरावयास बीजा शिलातलावरि करी प्रयत्न सुर ।
नाम जटायु जयाचें मूर्खपणाचे असे करी चारे[3] ॥ ७० ॥
सुर तो कृतान्त कुम्भीं भरून जल घुसळि तो तया सुचिर ।
लोणी काढायास्तव हलीपुढें[4] परि निघे न तत्सार ॥ ७१ ॥
अमर जटायु हि घाण्यामध्यें टाकून वालुका[5] पीडी ।
परि विफल तें जहालें तैल निघे नच जरीहि बहु रगडी ॥ ७२ ॥

( दोन देव व रामचंद्र यांचें उत्तर-प्रत्युत्तर. )

यापरि निष्फल कार्यें करिती सुर ते अनेक पाहून ।
श्रीराम त्या विचारी ऐशीं कार्यें करील कां सुज्ञ ॥ ७३ ॥
या वठलेल्या झाडा पाणी सिंचून काय उपयोग ।
मृत बैल नांगराला चालविण्याचा न करिति उद्योग ॥ ७४ ॥
बीजा शिलातलावरि कैसें रे पेरिसी नरा मूढा ।
जल घुसळतां न लाभे कदापि नवनीत[6] यत्न हा सोडा ॥ ७५ ॥
वाळू पिळून घाणीं तेल तयांतुनि कदापि निघतें न ।
श्रम फक्त यांत होती अत्यल्पहि फल न येइ आढळुन ॥ ७६ ॥
ऐसें असतां ही या कार्यीं तुमचा दिसे महायत्न ।
मजला गमतें तुम्ही आहा मूर्खामधे शिरोरत्न ॥ ७७ ॥
ते दोघे नर वदले विचारितों सत्य जें असे बोल ।
या जीवरहितदेहा वाहुनि तुज काय बा मिळेल फल ॥ ७८ ॥
सुन्दर लक्षणधारक लक्ष्मणदेहास हृदयिं लावून ।
कोपें सुतप्त होउनि वदले श्रीराम त्या असें वचन ॥ ७९ ॥

---

१ झाडाच्या मुळ्यांना. २ रामाचा मोह नाहींसा करण्यासाठीं. ३ कार्यें. ४ बलभद्र रामचंद्रापुढें. ५ वाळू. ६ लोणी.

पुरुषोत्तमा सुमित्रातनया[1] श्रीलक्ष्मणास कां म्हणता ?
आपण मेला ऐसें शब्द अमङ्गल न लाज मनिं धरितां ॥ ८० ॥
यापरि कृतान्तवक्त्रासह रामाचा विवाद होतांना ।
आला जटायुसुरही स्कन्धीं घेऊन नृशव[2] त्या स्थाना ॥ ८१ ॥
पाहुनि तयास वदले राघव शव वाहतोस कां स्कन्धीं ।
अतिशय मोहित असशी झाली कां तव विवेकरहिता धी[3] ॥ ८२ ॥
तो नर रामा वदला प्रश्न जसा मज करी स्वतःस तसा ।
कां प्राणरहित हें शव रामा तूं वाहतोस मूढ जसा ॥ ८३ ॥
अत्यन्त अल्पदोषहि दुसऱ्याचा शीघ्र पाहतोस तुला ।
मेरुप्रमाण न दिसे स्वदोष आश्चर्य वाटतें मजला ॥ ८४ ॥
पाहुनि तुजला अमुच्या हृदया अत्यन्त वाटला मोद ।
सदृशांचें सदृशांत प्रेम जमे यांत नच वसे वाद ॥ ८५ ॥
आपण सगळे आहो स्वच्छन्दी भूत वा पिशाच जसे ।
तूं हो पिशाचराजा फिरू जनीं आपणास कोण पुसे ? ॥ ८६ ॥
उन्मत्तांचे राजे आम्ही ध्वज निजकरांत घेऊन ।
हिण्डू सगळ्या भूवर सर्वजनांना प्रमत्त बनवून ॥ ८७ ॥
यापरि सुरयुगलाचें भाषण ऐकून मोह रामाचा ।
गेला विलया आला प्रशान्तसा भाव पूर्ववत् साचा ॥ ८८ ॥
जैसें शारदसमयीं मेघमलें मुक्त विमल आकाश ।
होतें तैसें झालें राघवमन शोकमुक्त सविशेष ॥ ८९ ॥
निर्मेघचन्द्र जैसा चमके गगनांत शुभ्र किरणांनीं ।
घनमोह दूर होतां श्रीराघवचन्द्र बोधकिरणगणीं[5] ॥ ९० ॥
जैसा सुमेरुपर्वत निर्मल होतो जिनाभिषेकजलें ।
गुरुदेशनाजलानें राममन स्वच्छ होय मोह गळे ॥ ९१ ॥
हिमसम्पर्कें[6] विरहित कमलसमूहीं विशुद्धता येते ।
कलुषाशय[7] गळण्यानें प्रसन्नता प्राप्त होय रामातें ॥ ९२ ॥
गाढतमें मूढाला रव्युदयानें[8] प्रसन्नता येते ।
जो तडफडे भुकेनें मिळतां त्या अन्न मुदित मन होतें ॥ ९३ ॥

---

१ सुमित्रेचा मुलगा. २ मनुष्यप्रेत. ३ बुद्धि. ४ रहित. ५ ज्ञानरूपी किरणसमूहांनीं. ६ बर्फाच्या स्पर्शानें. ७ मोहयुक्त ज्ञान. ८ सूर्योदयानें.

पीडी तहान ज्याला तुडुम्ब भरलें तडाग त्या भेटे ।
अतितीव्ररोगितेला औषध मिळतां प्रमोद बहु वाटे ॥ ९४ ॥
सागरिं बुडणाऱ्याला नाव मिळे परमहर्ष होय मनीं ।
मार्गभ्रष्टा पथिका सत्पथ मिळतांचि मोद होय वनीं ॥ ९५ ॥
अपुल्या देशीं जावें ऐशी इच्छा करी मनीं त्रास ।
मिळतां सहायकारी सार्थ तया वाटतो महाहर्ष ॥ ९६ ॥
कदेंतुनि निसटावें ऐशी इच्छा मनीं जया आली ।
तुटतां दृढार्गला झणि पळतो तेथून तो हसे गालीं ॥ ९७ ॥
यापरि जिनमार्गस्मृति होतां श्रीराम मुदित मनिं झाले ।
तेणें कमलविलोचन मुखिं ते सुजना प्रसन्न बहु दिसले ॥ ९८ ॥
गाढान्धकार ज्यामधिं कूपांतुनि चढुनि वर जणू आलों ।
अथवा अन्यभवीं मी श्रीरामा आज वाटले गेलों ॥ ९९ ॥
दर्भाग्रावरि चञ्चल पाण्याचा बिन्दु एकसमयांत ।
चमकुनि खालीं पडतो जीवित चल लवहि किन्तु नच यांत ॥ १०० ॥
देवादिचतुर्गतिमधिं फिरलों कष्टें नृदेहलाभ मला ।
झाला परि होउनि मी मूढ न उपयोग आत्महितिं केला ॥ १०१ ॥
प्रिय भार्या कोणाला धन कोणाला नि बन्धु कोणाला ।
मिळती सुलभचि असती परि दुर्लभ धर्म वाटतो मजला ॥ १०२ ॥
यापरि सुबोध होतां श्रीरामाला यथार्थ जें कळलें ।
माया सुदूर सारुनि देवयुगें प्रगटविभव निज केलें ॥ १०३ ॥
सुखदस्पर्श जयाचा मन्द सुगन्धित समीर तैं वाहे ।
यानविमानसमूहें भरलें नभ लोक विस्मयें पाहे ॥ १०४ ॥
वीणामधुररवासह सुरस्त्रिया मधुर गान नभिं करिती ।
श्रीरामचन्द्र अपुलें सुचरित लज्जित अशा मनें श्रवति ॥ १०५ ॥
देव कृतान्त, जटायु नि वदले रामास नाथ सुखद दिन ।
झाले व्यतीत असुखद सांगावें शान्तसें करून मन ॥ १०६ ॥
राम तयांना वदले सुखकर-दिन म्हणुनि काय हो पुसता ।
मुनिपद ज्यांना लाभे सुखद तयांचेंचि वाटतें चित्ता ॥ १०७ ॥

---

१ आजाऱ्याला. २ प्रवाश्यांचा समूह. ३ मजबूत अगळ.
४ कमलाप्रमाणें डोळे असलेले. ५ अतिशय दूर. ६ ऐकतात.

आहात कोण तुम्ही विस्मयकर कृत्य कां तुम्ही केलें ।
कारण मजला सांगा उत्तर द्या प्रश्न जे तुम्हां पुसिले ॥ १०८ ॥

( देव आपली पूर्वभवकथा सांगतात :- )

नन्तर जटायु वदला गिधाड मी दण्डकावनीं होतो ।
मुनिदर्शनें मनामधिं उपशम लाभे नि जाणता खग तो ॥ १०९ ॥
लक्ष्मण सीतादेवी आपण मज पाळिलें असे नाथ ।
हरिली दशाननानें देवी सोडून जेधवा सुपथ ॥ ११० ॥
त्यावेळीं मी लढलों अङ्ग तयाचें विदारिलें नखरें[१] ।
क्रोधें ताडुनि मजला भूवरि फेकून देइ तो स्वकरें ॥ १११ ॥
होऊन शोक विह्वल पञ्चनमस्कार मन्त्र मम कानीं ।
आपण जो सांगितला झाला क्षम तो सुरेशपददानीं[२] ॥ ११२ ॥
लाभे प्रसाद अपुला तिर्यग्गतिदुःख सर्व सम्पून ।
स्वर्गी सुर मी झालों ऐसें माझें प्रभो असे कथन ॥ ११३ ॥
अवधिज्ञानें पाहुनि एकदिनीं नाथ दुर्दशा अपुली ।
मी खिन्न बहुत झालों दूर करायास युक्ति मज सुचली ॥ ११४ ॥
कांहीं तरी करावा दुःखाचा आपुल्या प्रतीकारें[३] ।
ठरवुनि येथें आलों केला तो जाहला हि सौख्यकर ॥ ११५ ॥
वदला कृतान्तदेवहि सेनापति आपला कृतान्त असे ।
पूर्वभवीं मी माझ्या हृदयीं नाथा कृतज्ञता विलसे ॥ ११६ ॥
सङ्कट पडलें असतां मजला त्यासमयिं तूं करी मुक्त ।
ऐशा अपुल्या वचना ठेउनि हृदयांत पातलों त्वरित ॥ ११७ ॥
तें दुःख दूर झालें अपुला सरला समस्तसा मोह ।
आम्हा प्रमोद झाला आपण आहात नाथ गुणगेह ॥ ११८ ॥
यापरि बोलुनि त्यांनीं वैभव अपुलें जनास दाखविलें ।
पाहुनि जें जनतेच्या हृदया आश्चर्य फार उद्भवलें ॥ ११९ ॥
अतिशय मोहित झालों ऐशा मजला तुम्ही सुबोधाया ।
आला येथें दोघे स्वर्गातुनि शुद्धचित्त ठेवुनिया ॥ १२० ॥
या शोकसङ्कटांतुनि मजला उद्धारिलें तुम्ही सुर हो ।
झाला प्रमोद मजला आतां स्वर्गी तुम्ही सुखें जा हो ॥ १२१ ॥

---

१ दीर्घ नखांनीं. २ महर्द्धिकदेवांचे पद देण्यात. ३ इलाज, उपाय.

बोलुनि ऐसें रामें शरयूतीरीं नृपेशहरिदेहा[1] ।
केलें चन्दनकाष्ठे दग्ध नि करि दूर तो मनोमोहा ॥ १२२ ॥
सरला विषाद मनिचा झालें वैराग्य तीव्रतर रामा ।
धर्म नि जनमर्यादा पालन करण्यास सर्व हितकामा[2] ॥ १२३ ॥
होउनि मनांत वदला शत्रुघ्ना तूं प्रजेस वा रक्षी ।
जातो तपोवना मी स्नेह न माझा वसे वुधा अक्षीं[3] ॥ १२४ ॥
जें सर्वेच्छाविरहित जिनपद आराधण्यास कान्तारीं ।
जातो शत्रुघ्ना मी संसारांतून तेंच मज तारी ॥ १२५ ॥
शत्रुघ्नहि तैं वदला मन माझें भोगविरत नृप झालें ।
अनुसरतो मी तुजला आतांपर्यन्त भोग भोगियले ॥ १२६ ॥
असती भोग मनोहर भोगुनिही तृप्ति ते न देतात ।
मित्र नि वान्धव सगळे जीवा कुगतींत फिरविती सतत ॥ १२७ ॥
अत्यन्त प्रिय भोगुनि मनुजमना भोग तृप्ति नच लाभे ।
जिनदास त्यागिती जे आत्मा त्यांचाच सर्वदा शोभे ॥ १२८ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत-
पद्यानुवादे कल्याणमित्र-देवाभिगमाभिधानं नाम अष्टादशोत्तरशतं
पर्व ॥ ११८ ॥

---

१ लक्ष्मणशरीराला. २ सर्वांचें हित करण्याची इच्छा करणारा.
३ इन्द्रियविषयांत.

## एकशेएकोणिसाव्या पर्वांतील संक्षिप्त कथा.

श्रीरामचंद्रांनीं अनंगलवणाच्या पुत्राला राज्य दिलें. तोही आपल्या पित्याप्रमाणें पराक्रमादिगुणांनीं युक्त होता. त्यामुळें अनेक राजांना त्यानें नम्र केलें. प्रजेचें त्याच्यावर प्रेम होतें. त्याच्या राज्यांत अन्यायाला कोठेंही थारा मिळाला नाहीं.

बिभीषणानें आपल्या सुभूषण नामक पुत्राला विशाल लङ्केचें राज्य दिलें. सुग्रीवानें अङ्गदाला राज्य दिलें व रामचंद्राबरोबर या सर्वांनीं दीक्षा घेण्याचा निश्चय केला.

त्यावेळीं 'अर्हद्दास' नामक धर्मप्रेमीश्रेष्ठी रामचंद्राजवळ येऊन त्यांना म्हणाले- प्रभो, सुव्रतजिनेश्वराच्या वंशांत ज्यांचा जन्म झाला आहे असें 'सुव्रत' नामक महामुनि आकाशमार्गानें आले आहेत. आपण त्यांना वंदन करण्यास जाऊं. हें श्रेष्ठिवचन ऐकून रामचंद्रांना आनंद वाटला. व ते प्रसन्नचित्तानें वंदनेस गेले.

मुनिसुव्रतजिनेश्वराला पाहून महापद्मचक्रवर्तीला जसा आनंद झाला होता तसा आनंद राजा रामचंद्रांना सुव्रतमुनिवर्यांना पाहून झाला. रामचंद्रानें दोन हात जोडून वंदन करून म्हटलें- प्रभो, प्रसन्न होऊन मला मुनिदीक्षा द्यावी. जणु भयंकर विषाप्रमाणें माझ्या ठिकाणीं जे रागादिक दोष होते ते आपल्या दर्शनानें नाहींसे झाले. सुव्रतमुनिराज म्हणाले- राजन्, तुझ्या मनांत हा सुविचार उत्पन्न झाला व तो तुला संसारवनांतून लौकर पार पाडील अशी मला खात्री आहे. हे संयमिनाथाचे भाषण ऐकून रामचंद्रांना मोठा आनंद वाटला. रामचंद्रानें आशापाश व स्नेहाचें जाळें तोडलें. पत्नीरूपी बेड्या तोडून टाकिल्या, किरीट, कुंडलें व वस्त्रें त्यागलीं. आपल्या कमलकोमल कराङ्गुलींनीं केशलोच केला. बाह्याभ्यंतर परिग्रह त्यागून त्यांनीं गुप्तिसमिति महाव्रतें धारण केलीं. त्यावेळीं अदृश्यरूपानें देवांनीं त्याच्यावर कल्पवृक्षांच्या फुलांची वृष्टि केली. आकाशांत दिव्यनगारे वाजू लागले.

रामचंद्राबरोबर शत्रुघ्न, बिभीषण, सुग्रीव, नल, नील, विराधितादिक विद्याधर राजांनींही दीक्षा घेतली. तीव्रतपानें त्यांना आकाशगमनादिक ऋद्धि प्राप्त झाल्या.

श्रीरामचंद्राबरोबर सोळा हजार राजांनीं दीक्षा घेतली. ‘श्रीमति’ नामक आर्यिकेजवळ जाऊन लक्ष्मण, रामचंद्र व इतर राजांच्या राण्यांनीं आर्यिका-दीक्षा घेतली. या आर्यिकांची संख्या सत्तावीस हजार होती. आर्यिकांच्या सर्वोत्तम आचाराचें पालन या सर्व शीलवती आर्यिका उत्तम रीतीनें करीत असत.

श्रीरामचंद्रमुनि नेहमी गुरूजवळ राहून अनेकप्रकारचें तप करीत असत. तपांतील तत्परता व सर्व मुनिव्रतें निर्दोष पाळलीं जात आहेत असें पाहून सुव्रत-आचार्यांनीं त्यांना एकटें विहार करण्याची आज्ञा दिली. जेव्हां ते गिरिगुहा, वन, नदीकिनारा आदिक स्थानीं निर्भय होऊन तप करीत होते. तेव्हां क्रूर सिंहादिक प्राण्यांच्या गर्जनेनेंही त्याच्या मनांत तिळमात्रहि क्षोभ उत्पन्न होत नसे. अशा महातपानें त्यांना अवधिज्ञान उत्पन्न झालें. हातांतील स्फटिक मण्याप्रमाणें मूर्तिक पदार्थांचें निर्मल ज्ञान त्यांना झालें. लक्ष्मण व रावणाच्या गतीचें ज्ञान त्यांना झालें. अर्थात् ते नरकांत उत्पन्न झाले आहेत याचें ज्ञान त्यांना झालें.

लक्ष्मणाचीं कुमारकालांत शंभर वर्षें, मांडलिकपदांत तीनशे वर्षें व दिग्विजयांत चाळीस वर्षें गेलीं. व अकरा हजार पांचशे साठ वर्षें साम्राज्योपभोगांत गेलीं. याप्रमाणें बारा हजार वर्षें ज्यांत पंचवीस वर्षें कमी आहेत असें लक्ष्मणाचें आयुष्य होतें. अवधिज्ञानानें रामचंद्रांना हें समजलें. यांत दोन देवांचा अपराध नव्हता ज्यामुळें लक्ष्मणाला मरण आलें. लक्ष्मण व माझे अनेक जन्माचे संबंध होते. वसुदत्तादिक लक्ष्मणाचे भव व धनदत्तादिक माझे भव अनेक व्यतीत झाले. यामुळें लक्ष्मणावर माझा अतिशय स्नेह उत्पन्न झाला. याप्रमाणें अवधिज्ञानानें रामानें सर्व जाणिलें पण त्यांच्या मनीं खिन्नता उत्पन्न झाली नाहीं. राममुनिराज मुनिव्रतांचें पालन करीत होते. मुक्तिरमेची आराधना करण्यांत ते नेहमी तत्पर राहत.

भव्यजनानो, श्रीजिनशासनांत भक्ति ठेवावी व व्रतादिकांच्या पालनांत शक्तिचा उपयोग करावा. जे कुगुरु व कुमताला प्रशंसून त्याला आदरतात ते कर्मांचें ओझें वाहत फिरतात. ज्यांना परिग्रहांत प्रेम नाहीं जे याचना करीत नाहींत त्या निर्ग्रंथगुरूंची उपासना करावी. ते भव्यांचें भवभ्रमण नाहींसें करितात. अशा निर्ग्रंथमुनिगणांत सद्गुण राहतात. त्यांची भक्ति करावी. ती मोक्ष देईल.

# एकशेएकोणिसावें पर्व.

निश्चित हितकर शत्रुघ्नाचें भाषण ऐकून ।
चिन्तन चित्तीं क्षणभरि केलें कर्तव्यीं निपुण ॥ १ ॥

[ रामचंद्रानीं अनङ्गलवणाच्या पुत्राला राज्य दिलें.]

आत्मज होता सन्निध बसला अनङ्गलवणाचा ।
सर्व नृपांचा अधिपति केलें अनुपम विभवांचा ॥ २ ॥
जो जनकासम विक्रमआदिक सुगुणें परिपूर्ण ।
ज्याला नमिती नाना भूपति तेजःसम्पन्न ॥ ३ ॥
जनरागानें पराक्रमानें धरणी वश केली ।
अन्यायाचें नांव हि नुरलें प्रजा सुखी झाली ॥ ४ ॥

[ बिभीषणानें सुभूषणाला व सुग्रीवानें अङ्गदाला राज्य दिलें.]

बिभीषणानें अपुल्या पुत्रा सुभूषणास दिलें ।
अनुपम लङ्काराज्य नि निजमनिं वैराग्या वरिलें ॥ ५ ॥
सुग्रीवेंही अङ्गद पुत्रा स्वराज्य देवून ।
सुविरतभावामध्यें केलें सुस्थिरसें स्वमन ॥ ६ ॥
जैसे कोणी सविषान्नाचा करितो त्याग नर ।
रामें राज्य त्यजिलें भरतासम तें सौख्यकर ॥ ७ ॥
जन्ममृतीचें भय ज्याच्या मनिं वाटे राघव तो ।
सुविरत झाला असतां श्रेष्ठी येउनि त्या वदतो ॥ ८ ॥
नाम जयाचें सुन्दर होतें अर्हद्दास असे ।
अरिहन्ताची भक्ति जयाच्या हृदयीं सतत वसे ॥ ९ ॥
वदला राजन्, अपुल्यावरचें सङ्कट जाणून ।
मुनिवरमनही आकुलतेचें बनलें जणु सदन ॥ १० ॥
आले नाथा सुव्रतमुनिवर सुव्रतवंशाचे ।
व्योमपथानें चरित जयांचें असे सदा साचें ॥ ११ ॥
श्रेष्ठीचें हें ऐकुनि वचन प्रमोद बहु झाला ।
प्रमुदितचित्तें राम मुनींच्या सन्निध झणि गेला ॥ १२ ॥

पहिला हलधर[1] नाम जयाचें होतें विजय असे ।
स्वर्णकुम्भमुनिसन्निध जातां जैसा तो विलसे ॥ १३ ॥
भूखेचरनृप सेविति ज्याला हलधर हा राम ।
सुव्रतनाथाजवळीं आला शोभे अभिराम[2] ॥ १४ ॥
पूजिति ज्याला सहस्रमुनिवर त्या सुव्रतनाथा ।
राघव वन्दन करि हर्षानें नमवुनि निजमाथा ॥ १५ ॥
जो मुक्तीचें उत्तम कारण अशा मुनीशास ।
पाहुनि राघव अमृतसमुद्रीं बुडला सविशेष ॥ १६ ॥
मुनिसुव्रत जिनवर्या पाहुनि पूर्वी चक्रपति ।
महापद्म बहु हर्षित झाला ज्याला नैव मिति ॥ १७ ॥
[ सुव्रतनाथमुनिश्वराजवळ रामचंद्र जिनदीक्षा घेतात.]
श्रीरामाच्या हृदयीं झाली श्रद्धा अपरिमित ।
सुव्रतचरणीं तेणें झाला भ्रमरासम निरत ॥ १८ ॥
विनती केली तेणें त्यांना करयुग जोडून ।
नाथा, द्यावी मज मुनिदीक्षा प्रमुदित होऊन ॥ १९ ॥
माझे सगळे शमले नाथा रागादिक-दोष ।
जणु या माझ्या हृदयीं होतें दारुण[3] अमित विष ॥ २० ॥
वदले सुव्रत *गणधर रामा* हृदयीं सुविचार ।
तो तव झाला करिलचि तुजला लौकर भवपार ॥ २१ ॥
ऐकुनि वच हें मुनिवर्याचें प्रदक्षिणा घाली ।
राघव भावें अघकर्मांची करिते जी होळी ॥ २२ ॥
प्राप्त जहाली बोधि जयाला भवभय बहु ज्यास ।
उद्यत झाला तोडायाला राघव भवपाश ॥ २३ ॥
आशा-पाशा छेदुनि जाळी जाळें स्नेहाचें ।
भार्यानिगडा[4] तोडी फोडी नरडें मोहाचें ॥ २४ ॥
मुकुट नि कुण्डल वस्त्रें त्यागुनि घेउनि उपवास ।
कमलमृदुलशा कराङ्गुलींनीं करि कचलोचास ॥ २५ ॥
पर्यङ्कासन घालुनि बाह्याभ्यन्तर-सङ्गास ।
सोडी, पाळी महाव्रतांना त्यागुनि अङ्गास ॥ २६ ॥

१ बलभद्र. २ सुंदर. ३ भयङ्कर. ४ बेडी.

जो शीलांचा आलय झाला समिति नि गुप्ति धरी ।
त्रस नि स्थावर जीवा रक्षी दण्डत्रितय[1] हरी ॥ २७ ॥
भयसप्तक[2] नच नच गर्वाष्टक ज्याच्या हृदयांत ।
श्रमण जहाला राघव तेव्हां जो अतिशय शान्त ॥ २८ ॥
अदृश्य देहें देवगणानें वृष्टि नभांतून ।
दिव्यसुमांची केली भूवरि हर्षित होऊन ॥ २९ ॥
स्वर्गी दुंदुभि दुमदुमले बहु त्यांचा मधुररव ।
ऐकुनि झाला मोद जनांना राघव हा देव ॥ ३० ॥
गृहस्थपण या जणु चिखलांतुनि राघव बाहेर ।
पडला जेव्हां दीक्षा घ्याया उत्सव करिति सुर ॥ ३१ ॥
राघव होतां दीक्षित विस्मित झाले नृप सगळे ।
सुरपतिविभवा त्यागुनि मुनिवर नरनायक झाले ॥ ३२ ॥
वैभव अमुचें असुनि हि अल्पचि न सोडवें आम्हा ।
प्रवृत्ति अमुची न हो व्रतोन्मुख लोभें बहु वामा[3] ॥ ३३ ॥
यापरि चिन्तुनि भवभय झाली सुविरति कितिकांना ।
तोडुनि गेले गृहबन्धन ते मुनि होऊन वना ॥ ३४ ॥
संसृतिबन्धन तोडुनि मारुनि रिपुस द्वेषास ।
मुनिवर झाला रिपुघ्न[4] सोडुनि समस्त सङ्गास ॥ ३५ ॥
[ नल-नील, बिभीषण, सुग्रीवादिकांनींही जिनदीक्षा घेतली.]
नील, बिभीषण, सुग्रीव नि नल विराधितादि खग ।
विद्या त्यागुनि मुनिवर झाले सोडुनि भवरागें[5] ॥ ३६ ॥
तीव्रतपानें ऋद्धि चारणी झाली कितिकांना ।
पुनरपि वाटे व्योमगमनपद[6] लाभे जणु त्यांना ॥ ३७ ॥
यापरि हलधर[7] राम दिगम्बर मुनिवर जैं झाले ।
सहस्र सोळा मुनिपद धारण नरपतिनीं केलें ॥ ३८ ॥
'श्रीमति' नाम श्रमणीसन्निध आर्यापद धारी ।
झाल्या उत्तम राण्या त्यागुनि ममता अविकारी ॥ ३९ ॥

---

१ मन-वचनकायांच्या पापप्रवृत्तीला दंड म्हणतात. २ इहलोकभय, परलोकभय, वेदनाभय, अत्राणभय, अगुप्तिभय, मृत्युभय, आकस्मिकभय. ३ कपटयुक्त. ४ शत्रुघ्न. ५ संसारावरील प्रेम. ६ विद्याधरपद. ७ बलभद्र.

सहस्रसत्तावीस तयांची संख्या शीलवती ।
होती ज्यांच्या आर्याचारीं[1] निर्मल सतत मति ॥ ४० ॥
राघव मुनिवर निजगुरुपासुनि मिळवुनि आदेश[2] ।
एक विहारी झाले फिरले नानाविध देश ॥ ४१ ॥
गिरिगुम्फेमधिं राहति सन्तत निर्भय होऊन ।
क्रूरश्वापदशब्दें त्यांचें चञ्चल हो न मन ॥ ४२ ॥
[ अवधिज्ञानानें रावण व लक्ष्मणाचे दुर्गतिगमन जाणूनही
राम क्षुब्ध झाले नाहींत. ]
उत्तम योगीं तत्पर राहुनि तप असतां करित ।
झालें अवधिज्ञान तयांना शुचिपरिणामयुत[3] ॥ ४३ ॥
विमल स्फाटिकरत्न करीं हें जैसें जाणावें ।
अवधिज्ञानीं वस्तु मूर्त ज्या झळकति शुचिभावें[4] ॥ ४४ ॥
लक्ष्मणगतिचें ज्ञान तयाला रावणगतिचें ही ।
झालें परि न क्षुब्ध तयाचें मन निश्चल राही ॥ ४५ ॥
शम्भरवर्षें कौमार्याची मण्डलिपदिं गेलीं ।
तीनशतकशीं वर्षें चाळिस दिग्विजयीं झालीं ॥ ४६ ॥
सहस्र अकरा पुनः पांचशे वर्षें वरि साठ ।
साम्राज्याच्या उपभोगामधिं गेली नच कष्ट ॥ ४७ ॥
यापरि बाराहजार वर्षें लक्ष्मण आयु असे ।
पंचवीस त्यामध्यें कमती बुधजन सांगतसे ॥ ४८ ॥
यापरि लक्ष्मण आयू सम्पुनि मेला हें कळतां ।
देवयुगाचा अपराध हि नच वाटे तच्चित्ता ॥ ४९ ॥
माझे आणिक लक्ष्मण याचे नाना पूर्वभव ।
वसुदत्तादिक झाले सगळे होते मोहभव ॥ ५० ॥
यापरि रामें अवधिज्ञानें सगळे जाणियलें ।
खिन्न न झालें परि मन त्यांचें ऐसें बुध वदले ॥ ५१ ॥
उत्तमलेश्याधारक होते श्रीराघव धीर ।
पाळित होते अखण्ड शीलव्रतगण जे चतुर ॥ ५२ ॥

---

१ आर्यिकांच्या आचरणांत. २ आज्ञा. ३ निर्मलपरिणामांनीं युक्त.
४ शुद्धपरिणामांनीं.

सिद्धिरमा जी तदाराधनीं लीन सदा दिसती ।
बाह्य पदार्थीं मन नच त्यांचे करि निजरूपिं रति ॥ ५३ ॥
जेथें रमला राघव तेथें सन्मार्गांत करा ।
रति सज्जन हो होइल तुमचें सुहितचि अवधारा ॥ ५४ ॥
श्रीजिनशासनिं भक्ति शक्ति जी सन्तत योजावी ।
लक्ष्य मुक्तिपद पडतें पदरीं नच जा परगावीं ॥ ५५ ॥
श्रीजिनशासन मणिकोशाला मिळवुनि कुमतास ।
त्यागा दुःखद न तरी होइल संसृतिचा त्रास ॥ ५६ ॥
कुग्रन्थांनीं मोहित होउनि अघकर्मा करिती ।
जन्मान्धासम हितपथ सोडुनि अन्यस्थलिं जाती ॥ ५७ ॥

( आर्यावृत्त. )

नानोपकरण पाहुनि मतिवर्जित शुद्ध त्यांतलें कांहीं ।
समजुन घेती तेणें आयासचि[1] लाभतो तया पाहीं ॥ ५८ ॥
जे कुगुरु नि कुमताला प्रशंसिती अग्रमान देति तया ।
ओझेंचि वाहती ते होतिल भविं खिन्न जाणती न नया ॥ ५९ ॥
ज्यांची परिग्रहीं नच मति रमते याचना न जे करिती ।
त्या निर्ग्रन्थमुनींना सेवावें ते भवभ्रमा हरिती ॥ ६० ॥
तेथेंचि साधु सद्गुण असती हृदयांत भक्ति ठेवून ।
सेवा करा तयांची सुभक्ति देइल तुम्हास निर्वाण ॥ ६१ ॥
श्रीरामाच्या चरितां ऐकुनि या भोग सर्व सोडून ।
भवभावा[2] त्यागा झणि व्हा श्रीजिनदास वदति विबुधगण ॥ ६२ ॥

इत्यार्षे श्रीरविषेणाचार्य-विरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत-पद्यानुवादे बलदेवनिष्क्रमणाभिधानं नाम एकोनविंशोत्तरशतं पर्व ॥ ११९ ॥

---

१ कष्ट. २ संसाराचे विचार राग, द्वेष, मोह आदिक.

## एकशेवीस व एकशेएकवीसाव्या पर्वांतील संक्षिप्त कथा.

श्रीरामचंद्रमुनींद्रानीं पांच उपवासाची प्रतिज्ञा करून ते पांच दिवस त्यांनीं आत्मध्यानांत घालविले. यानंतर ते आहार घेण्यास 'नंदस्थली' नामक नगरांत आले. ते शुभ्रवर्णाचे असल्यामुळें लोकांना जणु कैलासपर्वतच नगरांत प्रवेश करीत आहे असें वाटलें. असें उत्तम सौंदर्य आपण पूर्वी कधींही पाहिलें नाहीं असें लोकांना वाटूं लागलें.

मुनींद्र रामचंद्र चार हात जमीन पाहून शांत दृष्टीनें व मनानें नगरांत येत होते.

ज्याच्या घरीं या महात्म्याचा आहार होईल तो श्रावक खरोखर धन्य होईल असें लोक म्हणूं लागले. कांहीं लोक त्यांना पाहण्यासाठीं त्यांच्या मागें जाऊं लागले. मोठी गर्दी व कोलाहल होऊं लागला.

कांहीं लोक स्वामिन् आमच्या घरीं आहारास येऊन आमच्यावर अनुग्रह करा. मुनिराज उभे राहा. आपण अतिशय निःस्पृही आहात असें म्हणूं लागले. कित्येकांनीं आपल्या घरीं आल्यावर आपण मोठ्या भक्तीनें त्यांचे पाय धुऊन त्यांना आहार देऊं असा विचार करूं लागले. आजचा दिवस मोठा शुभ आहे असें त्यांना वाटूं लागलें.

प्रतिनंदीराजानें या मुनीश्वरास पाहिलें व त्याला मोठा आनंद झाला व त्यानें त्यांना आणण्यासाठीं कांहीं नोकरांना पाठविलें. ते त्यांना घेरून उभे राहिले व म्हणूं लागले— प्रभो, लोकांच्या घरी विवर्ण, विरस व विगंध आहार मिळेल पण आमच्या राजाच्या घरीं फार उत्तम आहार मिळेल. आपण तिकडे चला असें म्हणाले व लोकांना आहार देऊं नका; राजा या मुनीश्वरांना आहार देणार आहे असें म्हणून त्यांना आहार न देण्याविषयीं सांगूं लागले. हा विचित्र प्रकार अन्तरायास कारण आहे असें समजून मुनि गांवांतून वनांत निघून गेले. त्यांनीं तेथें प्रतिमायोग धारण केला व ते आत्मध्यानांत लीन राहिले. त्यांनीं पुनः पांच उपवासांची प्रतिज्ञा केली व वनांतच आहार मिळाला तर घेईन असें त्यांनीं ठरविलें.

प्रतिनंदिराजाला एका दुष्ट घोड्यानें वनांत नेलें व तेथें तो चिखलांत रुतला. राजा तेथील कांठावर घोड्यावरून उतरून जाऊन पोहोचला.

राजाला हुडकण्यासाठीं राणीनें कांहीं शूर शिपाई घेऊन त्याच वनांत प्रवेश केला. राजाला पाहिल्यानंतर तिला आनंद वाटला. ती म्हणाली— घोड्यानें आपणास हरण करून येथें आणिलें हा आमच्यावर त्यानें उपकारच केला असें म्हणावयास हरकत नाहीं. त्यानें असें केलें नसतें तर हें सुन्दर वन व हें सरोवर आम्हास पाहावयास मिळालें नसतें. असें बोलून त्या सरोवरांत तिनें स्नान केलें व तेथील वेलींची पुष्पें गोळा करून तिनें स्वतःसाठीं व राजासाठीं हार करून राजाला व स्वतःला भूषित केलें.

आज येथें आपण भोजन करूं या. हें वनभोजन फार आनंददायक होईल असें म्हणून ते दंपती भोजनास बसणार अशावेळीं पंचोपवासांची प्रतिज्ञा पूर्ण करून रामचंद्रमुनि आहारासाठीं निघाले. ते राजाराणी जेथें उतरले होते तेथें आले. त्यांना पाहून दंपतीस परमानंद झाला. राजानें पत्नीसह उठून वंदन केलें. प्रभो, या प्रासुक भूतलावर उभें राहावें असें म्हणून प्रासुक पाण्यानें मुनीश्वराचे पाय राजानें धुतले. राजाला भक्तीनें फार आनंद झाला. व त्यानंतर त्यानें मुनीश्वरांना सुंदर सुवर्णपात्रांतून आहार दिला. राजा श्रद्धादिक सात गुणांनीं युक्त असा दाता होता. त्यानें मुनीश्वराच्या करपुटांत आहार दिला.

त्यावेळीं देवांनीं अदृश्य राहून दात्याचा जयजयकार केला. अनुकूल वायु वाहू लागला. देवांनीं सुगंधि पुष्पवृष्टि केली. अनेक प्रकारच्या सुवर्णरत्नांची वृष्टि झाली. देवनगारे वाजू लागले.

राजा तुझें वैभव वाढो, तुला जय प्राप्त होवो, आणि तूं दीर्घकाल नांद असें देवांचे शब्द आकाशांतून उच्चारले गेले. सूर्याचा प्रकाश त्यावेळीं चन्द्राप्रमाणें आल्हादक वाटू लागला. देवांनीं राजाचा आदर केला. व राजानें सम्यक्त्वासह अणुव्रतें धारण केलीं.

याप्रमाणें दान देऊन राजा आपला जन्म सफल झाला असें मानूं लागला. यानंतर रामचंद्र या पृथ्वीवर विहार करूं लागले. भव्य अशा जिनदासांचे त्यांच्या चरणांना वंदन असो.

# एकशेविसावें पर्व.

अनुष्टुप्—

धरणेन्द्रं हि रामाचें गुणवर्णन शक्य न ।
कोटि जिह्वा मुखामाजीं धरितो जो प्रतिक्षण ॥ १ ॥
पञ्चोपवास करुनी विधिपूर्वक राघव ।
नन्दस्थली पुरा गेले ज्याचें विपुल वैभव ॥ २ ॥
दिसे राघव तेजस्वी जणु बालदिवाकर[1] ।
उदयाचलिं हा आला जनपद्मां सुखाकर ॥ ३ ॥
करूं शके न रविही मन्द चन्द्र असा दिसे ।
पाहून त्यास जनता-मुखिं मोद तदा वसे ॥ ४ ॥
होतें हृदय रामाचें स्फटिकासम निर्मल ।
कैलासशैल हा आला नगरास गमे चलें[2] ॥ ५ ॥
( नंदस्थलीपुरांतील श्रावकाचे राममुनीला पाहून हर्षोद्गार. )
घेऊन नररूपास आला आनन्द हा पुरीं ।
निजकान्तिप्रवाहांत बुडवी वाटतें उरीं ॥ ६ ॥
शुभ्रशा कमलांचा हा पुञ्ज सुन्दर कीं गमे ।
जनदृष्टि खिळे येथें अन्यत्र नच ती रमे ॥ ७ ॥
ऐसा सुन्दर आकार जगीं कोठेंहि ना ढळे ।
एकाग्रदृष्टि होऊन येथून नच ती ढळे ॥ ८ ॥
महाप्रसिद्ध हा कोणी असे येत सुसुन्दर ।
बघा बघा सुजन हो जणु हा नरमन्दर[3] ॥ ९ ॥
अपूर्व धैर्य याच्यांत दिसे द्युति मनोहर ।
देहीं कान्ति मुखीं शान्ति अत्यद्भुत असे नर ॥ १० ॥
जमीन चार पाहून कर चालत हा असे ।
कोण कोणाकडे येई मनीं एकाग्रता वसे ॥ ११ ॥
विशालकुल कोणाचें भूषवी पुण्यवन्त हा ।
अन्नें करील कोणाला तुमजे धन्य हा महा ॥ १२ ॥

---

१ सूर्य. २ चालणारा. ३ पुरुषरूपी मेरुपर्वत.

सुरेन्द्रासारखें रूप ज्याचें हा नरसत्तम ।
सत्त्वशैल असे राम वारितो हा मनस्तम[1] ॥ १३ ॥
याला पाहून जन हो डोळे सफल आपुले ।
करूं या रूप असलें दुजें न जगिं आगळें[2] ॥ १४ ॥
ऐसें बोलून पाहाया जन त्या धावती किती ।
त्यांचा वृन्द जसे मोठा राहिली नच त्या मिति[3] ॥ १५ ॥
प्रवेश करितां राम नगरीं जन विस्मित ।
हर्षानें पाहती त्यास बनलें चित्र निश्चित ॥ १६ ॥
स्वामिन्, या अमुच्या गेहीं करा मोठा अनुग्रह ।
मुनिराज उभे राहा आहात अतिनिःस्पृह ॥ १७ ॥
लोकांच्या जयघोषांनीं झालें व्याप्त मही नभ ।
सर्वां[4] जनांना गमला आजचा दिन हा शुभ ॥ १८ ॥
आणा लौकर सत्पात्रें आलें सत्पात्र[5] हें घरीं ।
धुऊं पाय प्रमोदानें झारी घेउनिया करीं ॥ १९ ॥
चान्दीच्या कलशीं आणा उष्ण पाणी नि दूधही ।
खीर ही हेमपात्रांत आणा घट्ट असे दही ॥ २० ॥
आंब्याचा रस वाटींत आण गे सत्वर प्रिये ।
आणा मोदक मोदानें[6] टाक आळस गे सये ॥ २१ ॥
भाषणें नर-नारींत ऐशीं होतीं घरोघरीं ।
पाहावयास रामास धावती नर सत्वरी ॥ २२ ॥
झाला गावांत सर्वत्र कोलाहल नि धावती ।
लोक मार्गांत पडती शिशु[7] त्यांना न जाणती ॥ २३ ॥
प्रचण्डरव ऐकून लोकांचा क्षुब्ध जाहले ।
गज मोडुनि खांबास मार्गीं सत्वर धावले ॥ २४ ॥
टवकारुनि कानास खाणें गवत सोडिलें ।
करून मान भीतीनें वरती अश्व धावले ॥ २५ ॥

---

१ मनांतील अज्ञानांधकार. २ उत्कृष्ट सुंदर. ३ मर्यादा. ४ उत्तम भाट. ५ दान, आहार-दान ज्यास द्यावयाचें असे मुनि उत्तम पात्र किंवा सत्पात्र होत. ६ आनंदानें. ७ बालक.

समुद्रगर्जनातुल्य शब्द ऐकून तेधवा ।
प्रतिनन्दिनृपालानें पाहिलें शान्त राघवा ॥ २६ ॥
कलङ्कपङ्करहित जो चन्द्रासम निर्मल ।
रामा पाहुन आनन्द होय भूपास निस्तुल[1] ॥ २७ ॥
वीरांनो त्या मुनीन्द्रास राजगेहांत सत्वर ।
आणा घेऊन विनयें जोडून अपुले कर ॥ २८ ॥
जसा आदेश[2] अपुला ऐसें बोलून किङ्कर ।
गेले मुनीन्द्राजवळ जोडून वदले कर ॥ २९ ॥
प्रभो विनन्ति भूपाची आमुच्या आपणास ही ।
मागावी इष्ट जी वस्तु त्याच्या जाऊन ती गृहीं ॥ ३० ॥
विवर्ण आणि विरस लोकांचें अन्न हें असे ।
अपथ्यसें प्रभो घेणें अहिता हेतु तें दिसे ॥ ३१ ॥
महासाधो चला भूपसदनांत निराकुल ।
अन्न देईल भूपाल रसाल नि निस्तुल ॥ ३२ ॥
बोलून वीरें लोकांनां अन्नदाना निवारिलें ।
जाहले खिन्न ते त्यांचा उत्साह सगळा गळे ॥ ३३ ॥
विचित्र आदराचा हा प्रकार बघतां मनीं ।
अन्तरायास जाणून राम गेले तदा वनीं ॥ ३४ ॥
अत्यन्त शान्त चरितीं स्थिर ते नगरांतुन ।
असतां जात संक्षुब्ध जाहले तेधवा जन ॥ ३५ ॥

( आर्या– )

येतील पुन: केव्हां देऊ शकलों तया न आहार ।
ऐशा विचारचक्रें झाले संक्षुब्ध[3] सुजन मनिं फार ॥ ३६ ॥
इकडे वनांत जाउनि राम मुनीश्वर शिलेवरी बसले ।
निजरूपचिन्तनामधिं चित्त स्थिर तेधवा तयें केलें ॥ ३७ ॥
प्रतिमायोगीं राहुनि निश्चल केली निशा व्यतीत तयें ।
आत्मारामीं क्रीडति इतरांच्या हें न सौख्य सन्निध ये ॥ ३८ ॥
पाहुनि नररवि ऐसा सुचरित पक्षी नि पशुहि नयनहर ।
होवो वियोग यांचा केव्हांहि न मनिं विचारिती चतुर ॥ ३९ ॥

---

१ अनुपम. २ आज्ञा. ३ खिन्न.

जिनदास जे मुनीश्वरभक्ति सदा करिति दुःख त्या झालें ।
धार्मिकवियोग होतां खिन्न न जिनदास ते वदा कसले ॥ ४० ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत-
पद्यानुवादे पुरसंक्षोभाभिधानं नाम विंशोत्तरशतं पर्व ॥ १२० ॥

# एकशेएकविसावें पर्व.

उपवासपञ्चकाच्या करून नियमा मुनीन्द्र राम वनीं ।
आत्मध्यानीं तत्पर झाले निःसङ्गता यदीयमनीं ॥ १ ॥
हरिणादिप्राणिगणें भरलेल्या या वनांत आहार ।
लाभेल तरिच घेइन तदर्थ[1] मी आश्रयीन नैव पुर ॥ २ ॥

[ प्रतिनन्दिराजाला दुष्ट घोड्यानें वनांत नेलें व तेथें
राजाराणीनें रामचन्द्रमुनींना आहार दिला. ]

घोर अशा नियमानें मुनिवर ते जाहले तपीं निरत ।
प्रतिनन्दिभूप आला वनांत जो जाहला खलाश्वहृत[2] ॥ ३ ॥
प्रभवा त्याची राणी नृपास हुडकावयास शीघ्र निघे ।
अनुसरुनि नृपतिमार्गा बहुभट घेउनि वनांत त्याच रिघे ॥ ४ ॥
नृपतीस हरुनि नेतां घोडा चिखलांत जेधवा रुतला ।
नरपाल त्या वनांतिल पद्मसराच्या तटावरी आला ॥ ५ ॥
आली प्रभवाराणी पाहुनि नवऱ्यास हासली गालीं ।
अश्वानें अमुच्यावर केला उपकार ती असे वदली ॥ ६ ॥
हरिलें नसतें अश्वें नृपा सरोवर विशाल सुन्दर हें ।
दिसलें आम्हां नसतें सफलचि आगमन या स्थलीं पाहे ॥ ७ ॥
यापरि विनोदि भाषण करुनि नृपासह सखीजना सह ती ।
क्षणभर सरस्तटावरि वसली झाली तिची प्रसन्न मति ॥ ८ ॥
निर्मलजलांत न्हाउनि विविधसुमें ती तटीं करी गोळा ।
भूपवुनी अन्योन्या नृपराज्ञी वदति हास्ययुत बोला ॥ ९ ॥
झाली भोजनवेळा करु या भोजन सरस्तटावरती ।
वनभोजन आज असे दिसे मनोज्ञ प्रदेश नाथ किती ॥ १० ॥
यापरि बोलुन भोजन करावया राजदम्पती बसले ।
उपवासावधि होतां समाप्त अभिराम राममुनि आले ॥ ११ ॥

---

१ आहारासाठीं. २ दुष्ट घोड्यानें नेलेला.

पाहुनि साधुवराला प्रमोद मनिं दम्पतीस बहु झाला ।
उठुनी नि करुनि वन्दन सभार्यनृप तो मुनीश्वरा वदला ॥ १२ ॥
भगवन् उभे रहावें या प्रासुकभूतलावरी[1] सदया ।
बोलुनि ऐसें प्रासुकजलें करी स्वच्छ साधुवर पाया ॥ १३ ॥
अतिभक्तिवन्त भूपति सर्वाङ्गीं मोद ज्यास आदरुन ।
देई मुनीस भोजन रसगन्धें जें करी प्रसन्न मन ॥ १४ ॥
सुन्दर सुवर्णपात्रांतुनि मुनिकरपुटिं[2] विशुद्ध आहार ।
श्रद्धेनें नृप देई पात्रीं तो वाढु लागला फार ॥ १५ ॥
श्रद्धादिक सुगुणांनीं दाता उत्तम बघून मुनि अमर ।
सानन्दचित्त होउनि अदृश्य करितात दातृजयकार[3] ॥ १६ ॥
अनुकूल वात वाहे सुगन्धिसुमवृष्टि[4] सुरगणें केली ।
मधुर नगाऱ्यांचा रव नरकर्णयुगीं मनोज्ञ करि केलिं[5] ॥ १७ ॥
करिती देवी नर्तन मुनिदातृगुणास सरस गाऊन ।
रविकर चन्द्रकरासम आल्हादक भासती न ते ऊन ॥ १८ ॥
दान नि पात्र नि दाता विधि आणिक देयवस्तु[6] मोदास ।
देती सुरगण म्हणती अगणित पुण्यास हेतु जिनदास ॥ १९ ॥
वैभव वाढो नृपते, जय होवो दीर्घकाल तूं नान्द ।
ऐसे शब्द नभामधिं अमरांचे वाटलेचि सुखकन्द ॥ २० ॥
केल्या दिशा दहाही जिनें प्रकाशित सुवर्णमणिधारा ।
पडती आकाशांतुनि सुकृतांच्या[7] वैभवास अवधारा ॥ २१ ॥
प्रतिनन्दिभूप यापरि सुरपूजित जाहला सुनिष्पाप ।
सम्यक्त्वासह घेई अणुव्रतें हरिति जीं मनस्ताप ॥ २२ ॥
भूवरि कीर्ति तयाची पसरे गौरव समस्त जन करिती ।
धार्मिकजन जे असती वात्सल्याङ्गास ते सदा वरिती ॥ २३ ॥
यापरि दानी विनयी सत्पात्रीं दम्पती सुभक्तियुत ।
मानिति नरजन्माचें आम्हा फल आज जाहलें प्राप्त ॥ २४ ॥

---

१ निर्जन्तुक जमीनीवर. २ मुनींच्या ओंजळींत. ३ दात्याची जयजय शब्दांनीं प्रशंसा. ४ पुष्पांचा वर्षाव. ५ क्रीडा. ६ शुद्ध आहाराचे पदार्थ. ७ पुण्याच्या संपदेचा.

श्रीरामचन्द्रमुनिवर विविक्तशय्यासनास[1] आचरिति ।
सुतप जयानें त्यांच्या देहीं सम्प्राप्त होय रविकान्ति[2] ॥ २५ ॥
यापरि या भूवरती विहार रवितुल्य सर्वदा करिती ।
वन्दन जिनदास तया करितो यत्पाद[3] पाप संहरिती ॥ २६ ॥

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत-पद्यानुवादे दानप्रसङ्गाभिधानं नाम एकविंशोत्तरशतं पर्व ॥ १२१ ॥

---

१ स्त्री पशु व नपुंसक यांनीं रहित एकांतस्थानीं झोपणें व बसणें तें विविक्त-शय्यासन तप होय. २ सूर्याप्रमाणें तेज. ३ ज्या रामचन्द्रमुनीन्द्रांचे चरण.

# एकशेबावीसाव्या पर्वांतील कथेचा सारांश.

---

श्रीरामचंद्रमुनींनीं इतरांना शक्य नसलेलें व पंचमकालांत अशक्य असलेलें तप केलें. त्यांनीं आहारासाठीं गावांत जाणें बंद केलें. ते वनांतच पारणें करण्यासाठीं फिरत असत. आहार मिळाला नाहीं तर त्यांचें मन खिन्न होत नसे. स्वाध्यायांत व मुनींचें वात्सल्य शुश्रूषा करण्यांत ते तत्पर राहत असत. ते जितेंद्रिय होते. गुप्ति, समिति व महाव्रतें यांत तत्पर असल्यामुळें त्यांना अनेक ऋद्धि प्राप्त झाल्या होत्या. त्यांच्या तपःप्रभावानें वाघ, सिंह वगैरे क्रूर प्राणी शांत बनले.

विहार करीत ते कोटिशिलापर्वताकडे आले. व तेथें कर्मक्षपण करावयाला त्यांनीं आरंभ केला. रात्रिप्रतिमायोग धारण करून ते आत्मचिंतनीं लीन होत असत.

इकडे अच्युतपति सीतादेवानें अवधिज्ञानानें आपलें व रामाचें पूर्वभवांचें अवलोकन केलें. "रामचंद्रांना उपसर्ग करून ध्यानच्युत करावें म्हणजे ते आपल्याप्रमाणेंच स्वर्गांत जन्मतील व नंतर स्नेहानें मेरुपर्वत, नंदीश्वरजिनमंदिरें आदिस्थानांत मिळून विहार करता येईल. मनुष्यलोकीं हे रामचंद्र माझे पति होते. लक्ष्मण पापोदयानें नरकीं जन्मला आहे. व त्याला मी नरकांतून स्वर्गांत आणून ठेवीन." याप्रमाणें विचार करून रामचंद्राच्या ध्यानस्थळीं अनेक सुंदर विलासी देवांगनासह स्वतःही सुंदर देवांगनेचें रूप धारण करून त्यानें आगमन केलें. वन सुगंधित वाऱ्यानें भरून गेलें. सर्व वेली सुगंधी पुष्पांनीं लकडल्या. कोकिलादिकांचे शब्द वनांतील प्राण्यांना सुख देऊं लागले. रामाच्या समीप सीतेचें रूप धारण करून ठुमकत ठुमकत अनेक सुरांगनासह तो देव गेला. या तरुणपणीं अनेक विद्याधरींनी तूं दीक्षा घेऊं नकोस म्हणून मला सांगितलें पण मी न ऐकतां दीक्षा घेतली. आतां त्या विद्याधरींसह मी आपल्या चरणाजवळ आले आहे- आपण माझा स्वीकार करा व

आपण आनंदानें राहूं. असें सीतावेषी अच्युतेंद्रानें म्हटलें. इतर देवांगनांनींही अनेक हावभावांनीं रामचंद्रमुनींचें लक्ष आपणाकडे वळविण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या सभोंवतीं घेरा घालून त्या हावभावासह नृत्य करूं लागल्या. कोणी देवांगना बकुल-वृक्षाची शाखा खालीं वाकवित असतां भुंग्यांनीं पीडित होऊन राममुनीकडे घाबरून गेली. हातानें आपलें वस्त्र वर करून कोणी देवांगना सुंदर मांड्या रामचंद्रांना दाखवू लागली. अशा अनेक शृंगारादिक चेष्टांनींही रामचंद्रमुनींचें मन चञ्चल झालें नाहीं.

श्रीराममुनींचें मन अत्यंत निर्मल व निर्विकार झालें होतें. सर्व इंद्रियें व मनासह ते आत्मस्वरूपावलोकन करीत होते. सीतादेवानें त्यांचें मन चञ्चल करण्याचा प्रयत्न केला पण तो व्यर्थ गेला. त्यांचीं अनादिकर्में विफल झालीं. क्षपकश्रेणीवर चढून त्रेसष्ट कर्मप्रकृतींचा त्यांनीं नाश केला. व माघ शुद्ध द्वादशीचे दिवशीं पश्चिमरात्रीं ते केवलज्ञानी—सर्वज्ञ झाले. त्यांच्या केवलज्ञानांत लोकालोक गोष्पदाप्रमाणें दिसूं लागले. ज्ञान, दर्शन, सुख व शक्ति असे अनंतचतुष्टय त्यांना प्राप्त झालें.

सर्व देवेंद्र आसनकंपनामुळें जाणून त्यांचें पूजन करण्यास आले. इंद्रानें समवसरण रचलें व रामप्रभु सिंहासनावर बसले. त्यावेळीं मुक्तिलक्ष्मीचें मुख फार प्रसन्न झालें.

सीतेंद्रानें ज्याचें नांव स्वयंप्रभ होतें येऊन तीन प्रदक्षिणा देऊन रामचंद्र-पदांना वंदन केलें. व मी आपणास दुर्बुद्धीनें उपसर्ग केला त्याची क्षमा करा अशी याचना केली. माझ्या कर्मांचा नाश करून मला मुक्तिश्रीकांत करा असें तो म्हणाला. पूजामहिमा करून व वंदन करून सर्व जिनदासदेव आपल्या स्थानीं नंतर निघून गेले.

# एकशेबाविसावें पर्व.

शमले सगळे राममुनींचे रागादिक दोप ।
केलें दुःसह सुतप तयांनीं मिळवुनि गुणकोप ।। १ ।।

( रामचंद्र दुर्धर तप करून क्षपणश्रेणीवर चढले. )

तीन नि चार नि उपवासातें करुनी ते निघती ।
आहारास्तव विपिनीं फिरती ग्रामीं नच येती ।। २ ।।
न मिळे भोजन खिन्न न होती देहिं न रति करिती ।
स्वाध्यायीं ते श्रमणीं वत्सल करिति बहु प्रीति ।। ३ ।।
गुप्ति नि समितिव्रतगणिं तत्पर साधु जितेन्द्रिय ते ।
करिति पराजित परीषहांना जिनवचनज्ञाते ।। ४ ।।
ऋद्धि जहाल्या नाना त्यांना गर्व न तरिहि मनीं ।
विहरत असतां विस्तृतनेत्रें बघती वनिं हरिणी ।। ५ ।।
शान्त जहाले तपःप्रभावें व्याघ्र नि सिंह गज ।
ध्यानीं तत्पर असतां गळलें रागद्वेषरेज[1] ।। ६ ।।
उभे शिलेवरि राहति राघव सोडुनि भवमोह ।
निजस्वरूपा सन्तत चिन्तिति होती गुणगेह ।। ७ ।।
भूतल पाहुनि चार करांवधि[2] विहृति[3] दिनीं करिती ।
येउनि काननदेवी त्यांचे पदपङ्कज यजिती ।। ८ ।।
केलें तप जें दुष्कर त्यांनीं या पञ्चमकालीं ।
चिन्तनही नच शक्य तयाचें वदती विबुधोलि[4] ।। ९ ।।
विहरत विहरत कोटिशिलेप्रति राघव यति आले ।
जीस हरीनें निजभुजयुगलें होतें उद्धरिलें ।। १० ।।
राममहात्मा बन्धासमशा स्नेहा तोडून ।
करि आरोहण कर्मक्षपणीं होता जो निपुण ।। ११ ।।
प्रतिमायोगा करुनी धारण रात्रौ मुनिवर्य ।
शुद्धात्म्याच्या लीन जहाला ध्यानामधिं आर्य ।। १२ ।।

---

१ पाप, धूळ. २ चार हाताची जमीन. ३ विहार. ४ विद्वानांचा समूह.

( अच्युतेंद्र राम व लक्ष्मणाविषयीं विचार करूं लागला.)

इकडे अच्युतपति जो होता सीतेचा जीव ।
अवधिज्ञानें स्नेहें पाही तो राघवभाव ।। १३ ।।
अपुल्या पूर्वोत्तरभव-चरिता क्रमें क्रमें स्मरुन ।
श्रीजिनशासनमाहात्म्याला हृदयीं जाणून ।। १४ ।।
चिन्तन करि तो या नरलोकीं नरभूषण राम ।
होता माझा स्त्रीपर्यायीं पति सद्गुणधाम ।। १५ ।।
पाहा जनहो कर्मोत्पादित विविधमनोभावा ।
पूर्वेच्छांच्या आणिक आतां इच्छांच्या धावा ।। १६ ।।
कर्म शुभाशुभ उदया येतां बहुविध जन्म मिळे ।
नानावस्था हीनोच्चादिक मिळतां गर्व गळे ।। १७ ।।
वैभव विस्मित करि जगता जें अतिशय बलहरिचें ।
ऊर्ध्वाधरगति[1] मिळते त्यांना कर्म जसें ज्यांचें ।। १८ ।।
या उभयांतुनि चरमशरीरी एक असे ज्येष्ठ ।
दुसरा नरकीं पापें जन्मे भोगी बहु कष्ट ।। १९ ।।
दिव्य नि मानवविषया भोगुनि तृप्त न होऊन ।
झालें हरिचें कृतपापांनीं नरकामाधिं पतन ।। २० ।।
कमलानन हा हलधर हरिच्या विरहें अतिखिन्न ।
राज्य रमेला सोडुनि झाला असे जिनश्रमण ।। २१ ।।
हलरत्नानें बाह्यरिपुव्रज[2] करुनि पराभूत ।
ध्यानें इन्द्रियगण जिंकाया झाला उद्युक्त ।। २२ ।।

( तपोभ्रष्ट करण्यासाठीं अच्युतेंद्र रामयतीशांना उपसर्ग करितो.)

क्षपकश्रेणीरूढ राम हा ध्यानापासून ।
भ्रष्ट जयानें होइल ऐशा कार्या मी करिन ।। २३ ।।
होइल तेणें प्रीति नि मैत्री जाऊ वन्दाया ।
मेरु नि नन्दीश्वरास आम्ही होइल सुख उभया ।। २४ ।।
बसुनि विमानीं अनुपमविभवें नानास्थानांत ।
विहरू उभया सुखदुःखादिक सांगू कानांत ।। २५ ।।

---

१ मोक्ष व नरकगति. २ शत्रुसमूह.

सौमित्रीला उपदेशाया जाउनि नरकांत ।
रामासह मी त्याला आणुनि राहिन सौख्यांत ॥ २६ ॥
यापरि आणिक इतर हि सीतादेव विचार करी ।
अच्युतकल्पाहुनि या भूतलिं झाला अवतारी[1] ॥ २७ ॥
सीतादेवागमनें झालें जणु नन्दनवन तें ।
जेथें राघव आत्मध्यानीं तत्पर यति होते ॥ २८ ॥
वात सुगन्धित वाहे दशदिशि पुष्परजा[2] वाही ।
सकल विहगगण[3] करिति मधुररव हो सानन्द मही ॥ २९ ॥
बकुलावरती गुञ्जन करिती भुंग्यांचे वृन्द ।
कोकिल करिती मधुररवातें फुलले माकन्द ॥ ३० ॥
नानाविधरव करिती मैना-शुकगण शब्द करी ।
आम्रमञ्जरीरस आस्वादीं लुब्धचि हो भ्रमरी ॥ ३१ ॥
कर्णिकारतरु[4] फुलले सगळे वन पिवळें झालें ।
बकुलफुलांतुनि मधुमधु[5] गळतो जनमन बहु धालें ॥ ३२ ॥
अच्युतपति तो सीतारूपें तेथें अवतरला ।
श्रीरामाच्या सन्निध ठुमकत ठुमकत तो गेला ॥ ३३ ॥
सर्वऋतूंच्या पुष्पफलांनीं झाडें रमणीय ।
झालीं होतीं वनप्रान्त तो करि कामी[6] हृदय ॥ ३४ ॥
सीता वनिं त्या राममुनीच्या सन्निध येऊन ।
वदली नाथा दर्शन तव हें मम करि मुदित मन ॥ ३५ ॥
विरहतरङ्गें भरलेल्या या प्रीतिनदीडोहीं ।
व्याकुल झाले बहु मी नाथा ! हात मला देई ॥ ३६ ॥
त्यजिलें तुजला दीक्षा घेउनि मूर्खपणा केला ।
कामें पीडित झाली मम तनु आलिंगी मजला ॥ ३७ ॥
मजला कथिलें खगकन्यांनीं यौवनकालांत ।
दीक्षा घेणें योग्य न गमतें त्यागी ती त्वरित ॥ ३८ ॥
यौवनभूषित तव तनु कोठें दुस्तर तप कोठें ।
सुन्दर उपवन कोठें कोठें वन भरलें काटें ॥ ३९ ॥

---

१ खालीं भूतलावर येणारा. २ फुलांतील मकरन्द. ३ पक्ष्यांचा समूह.
४ कण्हेरीचीं झाडें. ५ गोडमध. ६ कामेच्छेनें युक्त.

देवी अमुच्यासह तूं चल गे वन्दुनि रामास ।
वरु गे आपण हर्षित होइल तो सखि हृदयेश ॥ ४० ॥
मुख्यसुराज्ञीपदीं विराजित तूं हो सखि रामा ।
जाऊ रामासन्निध रमऊ हर्षित करु कामा ॥ ४१ ॥
यापरि बोलुनि रति-शचि-लक्ष्मीसमशा रूपवती ।
नानाभूषणभूषित निर्मी कन्या ज्या न मिति ॥ ४२ ॥
हंसीसमगति ज्यांची ज्यांची अमृतासम वाणी ।
श्रवणीं पडतां तृप्ति न होतें ज्यांची या श्रवणीं ॥ ४३ ॥
त्या कन्यांनीं कर्णरसायन गायन जें केलें ।
वीणाझङ्कारासम तेणें प्रमुदित मन झालें ॥ ४४ ॥
भ्रमरासम अतिकृष्ण जयांचे होते मृदु केश ।
रूप जयांचें विजेप्रमाणें मन्द मुखीं हास ॥ ४५ ॥
ज्या सुकुमारी पुष्ट नि उन्नत कुचयुग उरिं धरिती ।
नानावस्त्रें रंगित नेसुनि नर्तन त्या करिती ॥ ४६ ॥
राममुनींच्या अवतीभवती घेरा घालून ।
नर्तन करिती मोहविण्याचा करिती त्या यत्न ॥ ४७ ॥
बाहुबलीला सुरललनांनीं मोहित करण्याचा ।
पूर्वी केला यत्न जहाला सफल न तो त्यांचा ॥ ४८ ॥
त्या परि हाही असफल झाला यत्न असें बघुन ।
पुनरपि करिती आग्रह धरुनि स्वमनीं त्या यत्न ॥ ४९ ॥
बकुलतरूची फांदी खालीं ओढी सुरनारी ।
भ्रमरें पीडित होतां रामासन्निध गमन करी ॥ ५० ॥
मोहोत्पादक यत्नामध्यें असफल ती गेली ।
रामासन्निध कोण द्रुम हा त्या पुसती झाली ॥ ५१ ॥
उंचलतेच्या पुष्पा घ्याया केला वर हात ।
खालीं गळतां वस्त्र उरःस्थल दावी ती त्वरित ॥ ५२ ॥
घेरा घालुनि हाव नि भाव नि दाविति सुरनारी ।
परि रामाचें चित्त अचञ्चल जैसा मेरुगिरि ॥ ५३ ॥

---

१ स्त्री. २ कानांत ३ ऐकणें. ४ छातीचा प्रदेश.

निजवस्त्रातें करुनी वरती सुरनारी कोणी ।
मांड्या दावी मोह न उपजे श्रीरामश्रमणीं ॥ ५४ ॥
यापरि नाना यत्न मनोहर करिती सुररमणी ।
परि नच झाले राघव मोही लीन निजध्यानीं ॥ ५५ ॥
परिषहवर्गा वज्रासम जे नासाग्रीं दृष्टि ।
ठेवुनि शुक्लध्यानें करिती कर्मगणा कष्टी ॥ ५६ ॥
निर्मल अतिशय मानस झालें इन्द्रियगण सकल ।
निजरूपामधिं तत्पर झाला मोह बने विकल[1] ॥ ५७ ॥
जे परमार्थी तत्पर असती बाह्यव्यापारीं ।
वृत्ति तयांची कधिही होय न, राहे अविकारी ॥ ५८ ॥
नाना यत्ना करुनि ध्यानीं विघ्नें आणीन ।
केल्या चेष्टा सीतादेवें चिन्तन मनिं करुन ॥ ५९ ॥
परि मुनिवर ते उद्यत झाले कर्मा जाळाया ।
अनादिकर्में विफल जहालीं विस्मय केंवि तयां ॥ ६० ॥
कर्में त्रेसट रामसुनीशें नेलीं विलयाला ।
क्षपकश्रेणी चढुनी वरिलें कैवल्यश्रीला ॥ ६१ ॥
बारस होती तिथि माघाची निर्मलपक्षाची[2] ।
राघव झाले केवलबोधी पश्चिमनिशिं सुशुचि[3] ॥ ६२ ॥
झाला केवलबोध सुनेत्र प्राप्त श्रीरामा ।
सर्व द्रव्यें दिसतीं जेणें ज्याला निष्कामा ॥ ६३ ॥
लोकालोकद्वय हें झालें गोष्पदसम ज्यांत ।
दर्शन सौख्य नि वीर्या झाली अनन्तता प्राप्त ॥ ६४ ॥
निजसिंहासन कम्पन होतां आणुनि उपयोगीं ।
अवधिज्ञाना करुनी वन्दन सुरपति अनुरागी ॥ ६५ ॥
अनुपमविभवें देवसमूहें केवलपूजेस ।
आले सुरपति धरुनि स्वमनीं बहु शुभभक्तीस ॥ ६६ ॥
घातिकर्मगणविनाशका त्या रामश्रमणास ।
पाहुनि वन्दन केलें त्यांनीं झाला श्रमनाश ॥ ६७ ॥

१ असमर्थ. २ शुक्लपक्षाची. ३ अतिशय कर्ममलरहित.

चारणमुनिगण सर्व सुरासुर वन्दिति रामास ।
परात्मपद ज्या प्राप्त जहालें अनन्तगुणकोष ।। ६८ ।।
समवसरण जें इन्द्रें रचिलें सिंहासनिं वसले ।
श्रीरामप्रभु तेंव्हां मुक्तिश्रीमुख वहु हसलें ।। ६९ ।।
असे स्वयम्प्रभ नाम जयाचें ऐसा सीतेन्द्र ।
केवलिपूजन करि ज्याच्या मनिं भक्ति वसे सान्द्र[1] ।। ७० ।।
प्रदक्षिणात्रय करुनी वदला क्षमा करा मजला ।
दुर्बुद्धीनें मजकडुनि प्रभु दोष असे घडला ।। ७१ ।।
प्रमुदित व्हावें मजला द्यावा कर्माचा अन्त ।
नाथा मजला शीघ्र करावें मुक्तिश्रीकान्त ।। ७२ ।।
अनवधिलक्ष्मीपतित्व आलें अष्टम वलदेवा ।
जिनदासाला द्या हो नाथा अष्टमभू[2] देवा ।। ७३ ।।
पूजा महिमा करुनी सगळे वन्दुनि जिनदास ।
सुर रामाच्या गेले निजगृहिं पदारविन्दास ।। ७४ ।।

इत्यार्षे रविषेणाचार्यविरचिते पद्मपुराणे पार्श्वनाथसुत जिनदास फडकुलेकृत-पद्यानुवादे पद्मस्य केवलोत्पत्त्यभिधानं नाम द्वाविंशोत्तरशतं पर्व ।। १२२ ।।

---

१ गाढ दृढ. २ मोक्षस्थान.

# एकशेतेवीसाव्या पर्वाची कथा.

लक्ष्मणाच्या गुणांचें स्मरण करून सीतेंद्र तिसऱ्या नरकांत– वालुका प्रभेंत गेला. तेथें जन्मलेल्या नारक्यांचीं शरीरें अतिशय भयानक, कुरूप व किळस उत्पन्न करणारीं होतीं. तेथील दुःखांचें वर्णन विद्वानांनाही सांगता येत नव्हतें. ज्याला दण्डकारण्यांत लक्ष्मणानें मारिलें होतें तो शम्बूक संक्लिष्टपुण्यानें असुर झालेला होता. तो तेथें जाऊन नारक्यांना बांधून ठोकीत होता. कित्येकांना त्यानें खालीं डोकें व वर पाय करून बांधलें होतें. कित्येकांच्या शरीराचे कापून तुकडे करून तो इतस्ततः फेकीत होता. अशीं अनेक प्रकारचीं दुःखें देत होता. तीं दुःखें पाहून इंद्राच्या मनांत दया उत्पन्न झाली.

लक्ष्मणाला इतर नारकी घेरून दुःख देत होते. कोणी त्याला वैतरणीच्या डोहामध्यें फेकून दिलें होतें. तेथील क्षारजलानें त्याच्या सर्वाङ्गांत दाह उत्पन्न होऊन तो त्या दुःखांचे शमनार्थ असिपत्रवनांत जाऊन बसला. पण त्याचीं तरवारीसारखीं तीक्ष्ण पानें लक्ष्मण नारक्याच्या अंगावर पडून त्याचे अवयव कापले जात होते. तेथें रावण नारकी जाऊन पोचला. त्याच्या हातांत भयंकर गदा होती. शम्बूकानें रावणाला प्रेरून त्याला खूप ठोकलें.

इतक्यांत सीतेंद्र तेथें जाऊन पोचला. त्यानें शम्बूकासुराला असला क्रूरपणा सोडून देण्याचा उपदेश केला. तूं हीं निर्दय कार्यें करितोस. तुझें मन शांत कां होत नाहीं? नारक्यांचीं दुःखें ऐकून देखिल मनाला भीति वाटते. तूं तर यांचीं दुःखें नेहमी पाहतोस. तुझें मन कसें भीत नाहीं? याप्रमाणें बोलून त्या शम्बूकासुराला शांत केलें. तो तेथून निघून गेल्यावर अन्य नारकी जीवहि पळून गेले. कित्येक गारेमध्यें पडले, कित्येकांच्या मुखावरून अश्रु ओघळत होते. त्यांना– ‘नारक्यांनो,

तुम्ही भिऊन पळूं नका, मी तुम्हाला पीडा देण्यास येथें आलों नाहीं. थांबा.' असें आश्वासन मिळाल्यावर ते नारकी थांबले. महामोहानें तुम्ही रौद्रध्यानानें पातकें केलीं त्यामुळें तुम्ही येथें उत्पन्न झालेले आहात. भोगामध्यें तत्पर होऊन अकार्यें केलीं त्यामुळें येथें तुम्ही जन्मलेले आहात.

लक्ष्मणानें धैर्य धारण करून तुम्ही कोण व इथें कां आला असें विचारलें. तेव्हां त्या देवानें स्वतःची व रामचंद्राची सर्व हकीकत सांगितलीं तीं ऐकून लक्ष्मण व रावणांना आपण कोण होतों हें समजलें. त्यांच्या ठिकाणचा क्रोध नाहींसा होऊन शांतता उत्पन्न झाली. आम्ही पूर्वजन्मीं जिनधर्मावर प्रेम केलें नाहीं. पापें केलीं त्यामुळें ही कष्टद अवस्था आम्हास प्राप्त झाली आहे. हे देवेंद्रा, तूं धन्य आहेस. तूं विषयेच्छा सोडून जिनवाणीसुधा प्यालास त्यामुळें तुला देवावस्था प्राप्त झाली आहे. आम्ही येथें पापाचरणामुळें उत्पन्न होऊन दुःखें भोगीत आहो. देव म्हणाला– लक्ष्मणा, रावणा भिऊ नका. मी तुम्हाला येथून काढून स्वर्गी नेईन. असें बोलून त्या दोघांना बांधून तो घेऊन जात असतां त्यांचे अवयव गळू लागले. पुनः पुनः त्यांना बांधून नेण्यास तो उद्युक्त झाला पण पुनः ते गळून पडू लागले. अग्नीनें लोणी जसें वितळतें तसें त्याचे अवयव वितळू लागले. तेव्हां ते देवाला म्हणाले– देवा, आम्हाला स्वकर्म भोगणें प्राप्त आहे. तें भोगल्याशिवाय येथून आमची सुटका होणार नाहीं. हे सीतेंद्रा, आम्हाला या दुःखापासून सुटका होण्याचा उपाय सांग.

देव म्हणाला– सम्यग्दर्शन हा उपाय आहे. अर्हद्भगवंतांनीं सांगितलेल्या जीवादिक पदार्थांवर विश्वास ठेवणें तें सम्यग्दर्शन होय. हें कालांतरानें रत्नत्रयाची प्राप्ति करून देतें. ज्याला हें प्राप्त होतें त्याचें पाप नाहीसें होतें. त्या सम्यग्दर्शनाचा खुलासा करून त्यांच्या मनांत जीवादि तत्त्वाबद्दल श्रद्धान उत्पन्न केलें. पूर्वी तुम्ही अत्यन्त सुंदर होतां पण जशीं अग्नीनें होरपळलेली लता कुरूप होते तसे तुमचे हे देह आतां कान्तिहीन व कुरूप झाले आहेत. ते नारकी म्हणाले– आम्ही जें कर्म केलें तें भोगल्यावांचून सुटका होणार नाहीं. हें देवा, आम्हाला येथलें दुःख भोगून नंतर मनुष्यत्व मिळालें म्हणजे जिनाला शरण जाऊन सुखी होऊं. हे सीतेंद्रा आतां तूं येथून सुखानें जा. व स्वर्गीय सुखांचा अनुभव घे. जातांना देव म्हणाला– सम्यक्त्व तुम्ही जपून ठेवा. तुमचें हें कल्याण करणारें आहे. त्या उभयतांनीं तें मान्य केलें. नंतर तो देव तेथून अच्युतस्वर्गी गेला व तेथील सुखाचा उपभोग घेऊ लागला.

पुनः एकदा तो देवेंद्र अनेक देवासह रामाच्या समवसरणांत आला. श्रीराम-केवलींना वंदून तेथें बसला. गौतमगणधर श्रेणिकराजाला म्हणाले– हे राजन्, राम-केवलीनीं सीतेंद्राला त्यावेळीं जें सांगितलें तें मी तुला सांगतो ऐक.

सीतेंद्रानें केवलींना याप्रमाणें विचारलें. दशरथ आदिक कोणत्या स्वर्गांत जन्मले ? लवण व अंकुश कोठें गेले ? केवली म्हणाले– हे देवा, दशरथ आनत स्वर्गांत जन्मले आहेत. कौसल्यादिकही स्वर्गांत जन्मल्या आहेत. जनक व कनक हेही स्वर्गांत सम्यग्दृष्टी देव झाले आहेत. लवण व अंकुश हे मुनि कर्मक्षय करून मोक्षाला जातील.

हे ऐकून माझा भाऊ भामण्डल कोठें उत्पन्न झाला असें देवानें विचारलें. केवली म्हणाले– देवा, तुला मी त्याचें वृत्त सांगतो ऐक.

वज्राङ्ग नांवाचा एक मोठा श्रीमंत गृहस्थ होता. त्याच्या पत्नीचें 'मकरी' नांव होतें. या उभयतांना पुष्कळ मुलगे होते. जेव्हां रामानें सीतेचा त्याग केला. जेव्हां तिला वनांत सोडलें. तेव्हां वज्राङ्ग फार दुःखी व विरक्त झाला. त्यानें द्युति-मुनीजवळ जाऊन दीक्षा घेतली. आपला पिता कोठें गेला हें न समजल्यामुळें ते दुःखी झाले. त्यांना आपल्या बापाची हकीकत जाणून घ्यावयाची होती म्हणून ते द्युतिमुनिजवळ आले. द्युतिमुनि नैमित्तिक होते. आपले वडील तेथें दीक्षा घेऊन बसले आहेत हें पाहून त्यांनाही वैराग्य झालें व त्यांनींही द्युतिमुनीजवळ दीक्षा घेतली. पुढें द्युतिमुनि समाधिमरणानें ऊर्ध्वग्रैवेयकांत उत्पन्न झाले. हे पितापुत्र जिनवंदनार्थ तेथून निघून ताम्रचूड नगराला आले. वाटेंत पन्नासयोजनाहून अधिक मोठा वाळूचा प्रदेश पसरला होता. तो ओलांडून एका झाडाखालीं ते अनगारविहारार्थ कायोत्सर्ग धारण करून बसले असतां भामण्डलानें त्यांना पाहिलें. या वनांत मनुष्यांची वस्ती नाहीं असें पाहून त्यानें एक नगर निर्मिलें व तेथें त्यानें त्या मुनींची आहारदान देऊन कांहीं दिवस सुश्रूषा केली. पुनः एकेवेळीं त्यानें कांहीं मुनींचें वैयावृत्य केलें. त्यामुळें त्याला विशाल पुण्य संचित करतां आलें.

एके वेळीं हा भामण्डल आपल्या बगीच्यांतील प्रासादांत आपल्या मालिनी-राणीसह झोपला असतां वीज पडून राणीसह मरण पावला. मुनिदानाच्या प्रभावानें तो देवकुरु उत्तम भोगभूमींत राणीसह जन्मला.

पुनः रामचंद्रकेवलींना देवानें विचारलें– प्रभो, रावण व लक्ष्मण नरकांतून कुठे जन्मतील व मी ही स्वर्गीय आयुष्य संपल्यानंतर कोठें जन्मणार आहे हें सांगा. या प्रश्नाचें उत्तर केवलींनीं याप्रमाणें दिलें:—

तिसऱ्या नरकांतील आयुष्य संपल्यानंतर ते दोघे विजयावती नगरींत सुनंदश्रेष्ठी व रोहिणीश्रेष्ठिनी या उभयतांना पुत्र होऊन जन्मतील. त्यांची ऋषिदास व अर्हद्दास अशीं नांवें ठेवण्यांत येतील. तेथें पंचेंद्रियसौख्यें भोगून पुनः वैश्यकुळांत त्यांचा जन्म होईल व त्या जन्मांत सुपात्रदान करून ते हरिक्षेत्रांत जन्मतील. तेथें भोगभूमीचीं सुखें भोगून स्वर्गांत जन्मून तेथेंही तें दिव्यसुखें भोगतील. तेथील आयु संपल्यानंतर विजयावतीपुरांत कुमारराजा व सुकीर्तिराणी यांच्या उदरीं राजपुत्र जय व जयप्रभ या नांवानें जन्म घेतील. या भवांत ते मुनि होऊन घोर तप करतील आणि लान्तवस्वर्गांत दिव्यसुख भोगतील.

हे सीतेंद्रा तुझें अच्युतस्वर्गांतील आयुष्य संपल्यावर तूं 'सर्वरत्नपति' नांवाचा षट्खण्डाधिप चक्रवर्ती होशील. आणि तुझ्यापोटीं जय व जयप्रभ इंद्ररथ व मेघरथ पुत्र होतील. इंद्ररथ हा रावणाचा जीव व मेघरथ लक्ष्मणाचा जीव समज. इंद्ररथ मोठा धार्मिक होईल. तो पशु व नारकजन्म सोडून देव व मनुष्याचे कांहीं जन्म घेऊन नंतर तो इंद्ररथ रत्नस्थल-नगरांत राजा होईल. विरक्त होऊन दीक्षा घेईल आणि विजय अनुत्तरामधें तो अहमिंद्र होईल.

हे सीतेंद्रा, विजय अनुत्तराहून अवतरून तो भरतक्षेत्रांत तीर्थंकर होईल व तूंही स्वर्गांतून येऊन त्या तीर्थंकराचा गणधर होणार आहेस.

याचप्रमाणें मेघरथ अर्थात् लक्ष्मणाचा जीव कांहीं सुंदर भव धारण करून पुष्करार्धांतील पूर्वविदेहांतील शतपत्र-नगरांत तीर्थंकर होऊन जन्मेल. मेरुपर्वतावर देव त्याचा अभिषेक करतील. तो तीर्थंकर षट्खण्डाधिपचक्रवर्तिपदाचा अनुभव घेऊन दीक्षा घेऊन सर्व कर्मक्षयानें मुक्त होईल. हें सर्व ऐकल्यानंतर सीतेंद्र आपल्या भावाला भेटण्यासाठीं हरिक्षेत्रांत गेला. त्याच्याशीं मधुर भाषण करून नंतर तो स्वर्गांत जाऊन देवसुख भोगू लागला.

रामचंद्रकेवलींनीं सीतेंद्राला यानंतर असें सांगितलें– हे अच्युतेंद्रा, मीही या भारतवर्षांत विहार करून सातव्या वर्षीं कर्मक्षय करून मुक्त होईन. रावण, लक्ष्मण व स्वतःच्या भावी भवांचें वर्णन ऐकून सीतेंद्राला आनंद वाटला व तो वंदन करून स्वर्गांत निघून गेला.

रामचंद्रांचें आयुष्य सतरा हजार वर्षांचें होतें. त्यांच्या देहाची उंची सोळा धनुष्य होती. लक्ष्मण देखिल रामासारखाच सोळा धनुष्य उंचीचा होता.

पुण्य व पाप यांतील अंतर जाणून पापाचा भव्यांनीं त्याग करावा व पुण्य-कार्य करावें म्हणजे कल्याण होईल.

जिनेंद्रशासनांत नेहमी स्थिर राहून रामचंद्रांनीं जन्मजरामरणरूपी शत्रूंचा नाश करून मोक्ष मिळविला. त्यांनीं पंचवीस वर्षें विहार करून धर्मसुधा भव्यांना पाजली व नंतर ते मुक्त झाले. त्या रामचंद्रकेवलींना भव्यहो आपण भक्तीनें नमस्कार करा.

मिथ्यात्वादिक कर्मांची धूळ जीवाला मलिन करीत असते पण ती नाहीशी करून रामचंद्रांनीं आपला आत्मा निर्मळ बनविला.

रामचंद्राचें सर्वचरित्र व त्यांच्या जीवनांतील सर्व प्रसंग ज्यांत वर्णिले आहेत त्यास रामायण म्हणतात. याच्या वाचनानें वाचकांना स्वर्गाची व मोक्षाची प्राप्ति होते.

या रामचरित्राच्या वाचनानें धर्म, यश, राज्य जें जें मनुष्य इच्छितो तें तें त्याला मिळतें. याच्या वाचनानें क्रूरग्रह प्रीतियुक्त होतील व पापांचा नाश होईल.

रविषेण आचार्यांची गुरुपरम्परा अशी आहे– इंद्रगुरु, दिवाकर, अर्हन्मुनि, लक्ष्मणसेन व लक्ष्मणसेनाचे शिष्य रविषेणाचार्य. रविषेण आचार्यांनीं वीरनिर्वाण १२०४ वर्षें व ६ महिने झाल्यावर हें रामायण रचिलें आहे.

या रामायणाच्या वाचनानें– स्वाध्यायानें ग्राह्य व अग्राह्य याचें ज्ञान होतें. जिनभक्ति उत्पन्न होते. परस्त्रीची इच्छा रावण मनांत धारण करून नरकांत गेला हें जाणून भव्यांनीं परस्त्रीसेवन त्यागावें. पुण्यानें जीवाला रामाप्रमाणें उच्चपद मिळतें व पापानें रावण-लक्ष्मणाप्रमाणें अधोगति मिळतें म्हणून पापाचा त्याग करावा.

हें रामचरित्र जीवाला पवित्र बनवितें. हें पद्मचरित्र– रामायण श्रीरविषेण-आचार्यांनीं रचिलें व त्याचा पद्यानुवाद वीरनिर्वाण २४८६ मध्यें आषाढ वद्य प्रतिपदेच्या दिवशीं पूर्ण केला आहे. श्रीजिनशासनाची सेवा सतत घडो हीच इच्छा माझ्या मनांत आहे. व ती वीरजिनेश्वर पूर्ण करतील असें वाटतें.

# एकशेतेविसावें पर्व.

[ सीतेंद्र लक्ष्मण व रावणाला नरकांतून स्वर्गांत घेऊन जाण्याचा प्रयत्न करितो पण तो विफल होतो. ]

लक्ष्मणसुगुणार्णवास हृदयीं स्मरुनी सीतेन्द्र ।
उपदेशाया त्याला गेला प्रीतीनें सान्द्रें[1] ॥ १ ॥
नरोत्तरो[2] तो शैला लंघुनि रत्नप्रभनरका ।
तेवि शर्करा-प्रभास देतीं जीं बहु आतङ्का[3] ॥ २ ॥
तिसऱ्या नरकीं गेला दुःसह लक्षावधि दुःखें ।
जेथिल विबुधें वर्ण्य न असतीं अबुधें केवि मुखें ॥ ३ ॥
जेथें पापें नारकजीवा मिळते अशुभदशा ।
अतिवीभत्स[4] नि कुत्सित असमर्यि जाइ न जी नाशा ॥ ४ ॥
दण्डकविपिनीं ज्याला हरिनें मारियलें होतें ।
त्या शम्बूका मिळलें तेथें सङ्क्लेशितसुकृतें[5] ॥ ५ ॥
असुरामरपद आला येथें क्रूर विचाराचा ।
बान्धुनि मारी नारकजीवा हिंसकवृत्तीचा ॥ ६ ॥
कोणा टांगी खालीं तोंड नि करुनीं वर पाय ।
कोणा कापुनि शत तुकडे करि हृदयीं बहु अदय ॥ ७ ॥
लोखण्डाच्या मुसळांनीं तो मारी कांहिं जणा ।
अन्योन्यांना रक्ता-मांसा खाववि अदयमना ॥ ८ ॥
तीव्राघातें तुटुनी पडले तुकडे देहाचे ।
घालुनि कुम्भीमध्यें[6] शिजवी बोले कटु वाचें ॥ ९ ॥
यन्त्रामध्यें पिळुनी काढी बाणें विद्ध करी ।
नसे दयेचा लेशहि तन्मनिं हिंसेलाच वरी ॥ १० ॥
दांत नि डोळे जीभ नि कानहि तोडी कोणाचे ।
यापरि दुःखें देतां त्याचें हर्षें उर नाचें ॥ ११ ॥

---

१ दाट. २ मानुषोत्तर पर्वताला. ३ पीडेला. ४ भयानक.
५ क्रोधादि कषायानींसहित पुण्यानें. ६ वस्तें शिजविण्याऱ्या भांड्यांत.

नारक दुःखें पाहुनि ऐशीं इन्द्रमनीं करुणा ।
प्रगटे तेंव्हां तद्दुःखाच्या तो उद्यत हरणा ॥ १२ ॥
नारक इतरहि घेरुनि देती पीडा बहु ज्याला ।
ऐशा हरिला सुरपति पाहुनी मनिं झाला ओलो[1] ॥ १३ ॥
कोणी त्याला फेकुनि देती वैतरणीडोहीं ।
क्षार तयाच्या विदीर्ण अङ्गा पाणी बहु दाही ॥ १४ ॥
पळुनी तेथुनि गेला लक्ष्मण तो असिपत्रवनीं ।
पडतीं पानें छिन्न जहाला असिसमें[2] त्या स्थानीं ॥ १५ ॥
उद्यत झाला मारायाला घेउनि घोरगदा ।
रावण त्याला प्रेरक शम्बुक झाला सुर शतदा ॥ १६ ॥
सुरपति गेला सन्निध वदला दुष्टा शम्बूका ।
क्रूरपणा हा सोडुनि दे वा दे सोडुनि रङ्का[3] ॥ १७ ॥
निर्दय कार्यें करिशी कितिही उपशम कां न मनीं ।
अनुचित कार्यें हानिच होते दिसशी अभिमानी ॥ १८ ॥
नारक दुःखें ऐकुनि देखिल भय हृदया वाटे ।
परि तूं वधशीं सगळीं येथें भय न कसें दाटे ॥ १९ ॥
यापरि वदला सुरपति जेंव्हां शमला शम्बूक ।
अन्य नारक्या वदता गेले पळुनी ते रङ्क[4] ॥ २० ॥
रडते झाले अश्रु मुखावरि त्यांच्या ओघळती ।
पळतां पळतां पडले गारेमध्यें तेचि किती ॥ २१ ॥
हे दीनानो धावु नका रे या माझ्याजवळीं ।
त्रास न देइन परता सारे भीति धरा न मुळीं ॥ २२ ॥
यापरि देतां आश्वासन सुर भीति कमी झाली ।
लक्ष्य तयांनीं तद्वचनांवरि केलें त्या कालीं ॥ २३ ॥
मोह तुम्हाला मोठा छळतो उमजे नात्महित ।
रौद्रध्यानीं होउनि झाला हिंसेमधि निरत ॥ २४ ॥
भोगामध्यें तत्पर होउनि तीव्र क्रोधानें ।
दुष्कृत केलें पीडित झाला आतां दुःखानें ॥ २५ ॥

---

१ दयाळु. २ तरवारीसारखीं. ३ दीनास. ४ दीन.

यानारूढा पाहुनि याला लक्ष्मण दशवदन ।
वदले तुम्ही कोण इथें कां सुर बोलें वचन ॥ २६ ॥
तेव्हां देवें वार्ता आपुली श्रीरामाचीही ।
सांगितली जी कर्में चित्रित नानाविध पाही ॥ २७ ॥
लक्ष्मण-रावण वार्ता अपुली ऐकुनि बोधास ।
प्राप्तचि झाले शान्तहि झाले करिती शोकास ॥ २८ ॥
प्रेम न केलें मानवजन्मीं आम्ही जिनधर्मी ।
ऐशी कुदशा लाभे आतां आम्ही अघकर्मी[1] ॥ २९ ॥
आम्ही केलें निजदुःखाला कारण कार्य असे ।
मोह स्वार्थभ्रष्ट नरा करि अमृतें[2] न यांत वसे ॥ ३० ॥
हे देवेन्द्रा धन्य धन्य तूं विषयेच्छा त्यजुन ।
जिनवाक्यामृत सेवुनि तुजला मिळ्लें देवपण ॥ ३१ ॥
सुरपति नन्तर वदला करुणा हृदयीं ठेवून ।
भय न धरी मनिं येथुनि नेतों तुम्हां मी तूर्ण ॥ ३२ ॥
उद्यत झाला त्या उभयांना बान्धुनि नेण्यास ।
परि ते गळती पुनः पुनः बहु झाला आयास ॥ ३३ ॥
जैसे अनलें[3] वितळे लोणी त्यांचा देह गळे ।
यत्न न एकहि सिद्ध जहाला फल मम केवि मिळे ॥ ३४ ॥
सर्वोपायें देखिल घेण्या सुर न क्षम[4] झाला ।
आदर्शस्थित वस्तुच्छाया घेउ न नर शकला ॥ ३५ ॥
लक्ष्मण-रावण वदले दुःखी देवा जा आतां ।
प्राक्तन कर्मा भोगू आम्ही कोणी न त्राता[5] ॥ ३६ ॥
विपयोत्कटता नरकीं नेतें पटलें आम्हास ।
स्वार्जितभोगी[6] यत्न न चालें होती आयास ॥ ३७ ॥
देवहि दुःखें दूर कराया असमर्थचि होती ।
केलीं कर्में भोगाविण तीं कधिंही नच सुटतीं ॥ ३८ ॥

[ सीतेंद्र लक्ष्मण व रावणाला सम्यग्दृष्टि बनवितो. ]

१ पापकर्म करणारें. २ खोटें. ३ अग्नीनें. ४ समर्थ. ५ रक्षक.
६ केलेलें शुभाशुभकर्म भोगण्यांत.

हे सीतेन्द्रा रक्षी आम्हा पुनः न नरक मिळो ।
सदुपाया वद जेणें अमुचें सगळें दुःख गळो ॥ ३९ ॥
वदला सुर तैं सम्यग्दर्शन आहे सुखदायी ।
कर्मविनाशी घ्यावें सगळें आपण या समयीं ॥ ४० ॥
दुर्लभ आहे अभव्यजीवा केव्हांही न मिळे ।
सम्यक्त्वानें मिथ्यात्वार्जित सगळें पाप गळे ॥ ४१ ॥
सुखचि मिळावें इच्छा आहे तुमच्या हृदयिं जरी ।
स्वीकारावें सम्यक्त्वातें तें अशुभास हरी ॥ ४२ ॥
कालान्तरिं तें होतें रत्नत्रयास हेतु खरें ।
ज्याला लाभे पाप तयाचें निश्चित शीघ्र सरे ॥ ४३ ॥
श्रेष्ठ न याविण दुसरें आहे न पुढें होईल ।
मुक्तिरमा ही मिळते येणें वदति दयाशील ॥ ४४ ॥
अरिहन्तांनीं सांगितले जे जीवादिक विषय ।
भक्ति तयांची दृढ तें समजा सद्दर्शन भव्यं[1] ॥ ४५ ॥
यापरि बोलुनि सम्यक्त्वाची उभयमनीं केली ।
सीतेन्द्रानें सुदृढस्थिति जी करि तेथें केलिं[2] ॥ ४६ ॥
पूर्वभवीची कान्ति न दिसली लावण्य न उभयीं ।
सौन्दर्य हि जें जळुनी गेलें उरलें नच कायीं[3] ॥ ४७ ॥
उद्यानाची सुन्दर शोभा जाळी अनल जसा ।
तुमचे देहहि बनले तैसे भव्यांनो परिसा ॥ ४८ ॥
देहद्युति जी यांची पाहुनि विस्मित हो जनता ।
गेली कोठें काळी झाली कुत्सित दग्धलता ॥ ४९ ॥
कर्मविनिसुखवृन्दीं[4] तत्पर होउनि हे दोघे ।
दुःखसमुद्रीं पडले पातककार्यी चित्त रिघे ॥ ५० ॥
यापरि वदतां दोघे झाले दृढ ते सम्यक्त्वी ।
अगणित भविही जें न मिळालें वदती विबुध कवि ॥ ५१ ॥
वदले आम्ही दुःख निकाचित[5] भोगुनि सहन करूं ।
नरता मिळतां शरण जिनाला जाउनि सौख्य वरूं ॥ ५२ ॥

---

१ उत्तम हितकर. २ क्रीडा. ३ शरीरांत. ४ कर्मभूमीच्या सुखसमूहांत.
५ जें आपलें फळ दिल्याशिवाय नष्ट होत नाहीं असें कर्म.

हे देवेन्द्रा आपण अमुचें अतिशय हित केलें ।
सम्यक्त्वामधिं आपण आम्हां दृढतर योजियलें ॥ ५३ ॥
हे सीतेन्द्रा आतां जावें मोदें स्वस्थानीं ।
शुद्धसुकृतफल भोगुनि हो त्वा अक्षयमुक्तिधनी ॥ ५४ ॥
यापरि वदले रावण-लक्ष्मण ते या इन्द्रास ।
शोक न ज्याला सुरपति गेला हर्षसमुद्रास ॥ ५५ ॥
रत्नत्रय जें देई ऐसें सद्दर्शनरत्न ।
जपुनी ठेवा शुभ तें हृदयीं नित्य करा यत्न ॥ ५६ ॥
बोलुनि ऐसें सीतासुरपति पर्वत सुकृतांचा ।
अच्युतनाकीं गेला ज्याला मद नच वित्तांचा ॥ ५७ ॥
अर्हत्, सिद्ध नि साधु नि धर्म नि चारचि जगिं शरण ।
तत्पर राही त्यांतचि हरिती जे जनजनिमरण[1] ॥ ५८ ॥
जाई वारंवार अकृत्रिम जिनवर वन्दाया ।
मेरुगिरींचे क्षम जे असती विस्तृत सुख द्याया ॥ ५९ ॥
नारकदुःखा पाहुनि त्यातें स्मरुनी हृदयांत ।
दीनारव जणु त्यांचे पडती सन्तत कानांत ॥ ६० ॥
कम्पित झाला देह तयाचा असुनि विमानींही ।
आला पुनरपि पाहायाला भरतक्षेत्रमही ॥ ६१ ॥
नाना आले देव तयासह बसुनि विमानांत ।
भक्तिरसाचा निर्झर वाहे ज्याच्या सुमनांत ॥ ६२ ॥
नानायानीं बसुनी आले सुरललनासहित ।
जय जय शब्दा वदत मुखानें हृदयीं धरुनि हित ॥ ६३ ॥
अच्युतसुरपति करयुग जोडुनि वन्दी रामास ।
सुगुणस्तुति करि विलया जाया भवार्णवायास[2] ॥ ६४ ॥
ध्यानसमीरें प्रेरित झाला बोधानल अपुला ।
दग्ध जहाला संसृतिविपिनप्रदेश[3] हा सगळा ॥ ६५ ॥
निर्मललेश्या[4]-शूला फेकुनि वधिला रिपु मोह ।
सुविरतिवज्रें[5] चूर्णित केला सर्वभवस्नेह ॥ ६६ ॥

---

१ जन्म. २ संसारसमुद्राचे परिश्रम. ३ संसारवनाचा प्रदेश. ४ शुक्ललेश्या जी कषायरहित मन-वचन-कायांची प्रवृत्ति. ५ वैराग्यवज्राच्या आघातानें.

जन्मजरामृति ज्यामधिं असती संसृतिजलधींत ।
तारी मजला भ्रान्ति जहाली माझ्या बुद्धींत ॥ ६७ ॥
हे सर्वज्ञा कृतकृत्या तुज आलों मी शरण ।
हरण करी वा माझें सगळें जन्मजरामरण ॥ ६८ ॥
शासन उत्तम सेवुनि ईशा सुव्रतनाथांचें ।
भवसागर हा तरुनी गेला आपण हें साचें ॥ ६९ ॥
हे श्रीरामा मजला त्यागुनि अच्युत[1]-तुङ्गपदा ।
आपण जातां योग्य न गमतें पीडी भवविपदा ॥ ७० ॥
राघव वदले अच्युतनाथा सोडुनि दे राग ।
सुविरतपुरुषा मिळतो मुक्तिश्रीचा सम्भोग ॥ ७१ ॥
जो जन रागी मिळतें त्याला संसारभ्रमण ।
ऐसें जाणुनि रागा त्यागी होय भवोत्तरण[2] ॥ ७२ ॥
कण्ठीं वान्धुनि दगड भुजांनीं क्षम न नदी तरणें ।
मोहें रागें द्वेषें तरण्या भव नच वा शकणें ॥ ७३ ॥
शीलें ज्ञानें असङ्गतांनीं[3] भवसागर तरती ।
सम्यग्ज्ञानी गुरुवाक्यांनीं सुचरित आचरिती ॥ ७४ ॥
आदि नि मध्य नि अवसानींही केवलिनाथ जिन ।
महाप्रतापी सर्वगुणांना ग्रासी स्वमनिं गण ॥ ७५ ॥
गौतम वदले तुजला श्रेणिक वदतो तें ऐक ।
सीतादेवा रामें कथिलें जें हरि भवपङ्क ॥ ७६ ॥

[ दशरथ, कौसल्यादिक, लवण व अङ्कुश आणि जनक व कनक हे कोठें गेले अशा अच्युतेंद्राच्या प्रश्नांचीं उत्तरें श्रीरामकेवलींनीं याप्रमाणें दिलीं:—]

कोठें असती दशरथआदिक कोण्या कल्पांतं[4] ।
लवणाङ्कुश हे कोठें गेले वद मज अभ्रान्त[5] ॥ ७७ ॥
राघव वदले आनतकल्पीं दशरथ सुर झाला ।
कौसल्यादिकजननीगणही स्वर्गामधिं रमला ॥ ७८ ॥
जनक-कनक हे भूपति दोघे सम्यग्दृष्टि सुर ।
झाले स्वर्गीं वैभवधारी ज्या सौख्य प्रचुर ॥ ७९ ॥

---

१ कदापि नष्ट न होणारें उच्चस्थान अर्थात् मोक्ष. २ संसार तरून जाणें. ३ निष्परिग्रहता निर्ममतांनीं. ४ स्वर्गांत. ५ निश्चयानें.

लवणाङ्कुश हे दोघे श्रमणहि कर्मक्षय करुन ।
युगपत्केवलदर्शन वोध नि सुतपं मिळवून ॥ ८० ॥
अक्षय अच्युत ऐशा मोक्षा निश्चित जातील ।
कविगण त्यांच्या निर्मलचरिता काव्यीं गातील ॥ ८१ ॥
ऐसें वदतां केवलिराघव सीतासुर वदला ।
भाऊ माझा उपजे कोठें त्याचें वृत्त गला ॥ ८२ ॥
सांगा वदले केवलिराघव सीतेन्द्रा ऐक ।
तव भावाचें सुन्दर चेष्टित उपजवि जें कुतुक ॥ ८३ ॥
कुलपति होतां वहुकोटीश्वर नामें वज्राङ्ग ।
भार्या ज्याची नामें मकरी दिसे सुरी साङ्ग ॥ ८४ ॥
होते वहुसुत उभया हसती विभवें धनदास ।
श्रीजिनपूजनकार्यी रमती न दुजी ज्या आस ॥ ८५ ॥
रामें सीता त्यजिली वार्ता ऐकुनि वज्राङ्ग ।
नवनीतासम मृदुल जहाला चिन्तेमधिं दङ्ग ॥ ८६ ॥
दिव्यगुणांनीं भूषित सीता अतिशय सुकुमारी ।
होईल स्थिति काय तियेची न गमे कान्तारीं ॥ ८७ ॥
आर्द्रमनाच्या त्या श्रेष्ठीला येई विरतदशा ।
द्युतिमुनिसन्निध घेउनि दीक्षा सुतप करि स्ववशा ॥ ८८ ॥
स्वपिता गेला कोठें हें नच तनयांना कळलें ।
निमित्त जाणी द्युतिमुनिसन्निध जाणाया आले ॥ ८९ ॥
नांवें त्यांचीं अशोक आणिक तिलक अशीं होतीं ।
द्युतिमुनिसन्निध वघुनी जनका होय मनिं प्रीति ॥ ९० ॥
स्नेहें उभयहि दीक्षित झाले झाले निरत तपीं ।
ऊर्ध्वग्रैवेयकिं गेले द्युति अमृतरसा जे पी ॥ ९१ ॥
गेले तेथुनि जनक नि सुत ते जिनपद वन्दाया ।
विहरत आले ताम्रशिखापुरिं विश्रम जणु व्हाया ॥ ९२ ॥
पन्नासाहुनि योजन सिकतासागर वहु दूर ।
तरुनी गेले प्रावृट्काल हि आला भरपूर ॥ ९३ ॥

१ एकदम. २ देवाङ्गना. ३ मूर्तिमन्त. ४ लोण्याप्रमाणें. ५ दयालु. ६ ताम्रचूड नामक नगरांत. ७ पावसाळा.

बहुशाखांनीं शोभिततरुतलिं कायोत्सर्गांत ।
असतां भावलयानें त्यांना पाहियलें त्वरित ॥ ९४ ॥
प्रथमचि कोशलनगरीं जाण्या उद्यत तो झाला ।
परि सुकृताचा सञ्चय करण्या मार्गे करीं आला ॥ ९५ ॥
जिनधर्माचें पालन करण्या येथें यति तीन ।
विजनीं[1] दिसतां पुर निर्मियलें जेथें बहु सुजन ॥ ९६ ॥
वैभवशाली निजविद्येच्या सुविपुल मदतीनें ।
बहुविध रचिलीं जागोजागीं स्थानें शुभ त्यानें ॥ ९७ ॥
स्वभावरूपा करुनी धारण वन्दी मुनिचरणा ।
पूजी भावें परिवारासह करुनी नम्र मना ॥ ९८ ॥
पुनरपि एकेवेळीं निर्जल विपिनीं मुनिवर्या ।
संयम ज्यांचा उत्तम त्यानें सेवियलें आर्या ॥ ९९ ॥
यापरि सेवा मुनिवर्यांची करुनी अपरिमित ।
सुकृता सांचवि तो द्युतिमण्डल[2] गेला स्वपुरांत ॥ १०० ॥
जिनधर्मावरि जे अनुरागा करिती जन त्यांना ।
सागरदत्तासम त्या मिळते विमुक्ति विधुवदना ॥ १०१ ॥
एकेवेळीं हा भामण्डल गेला उद्यानीं ।
होती त्याच्यासहचि मालिनी अतिसुन्दर राणी ॥ १०२ ॥
चन्द्रकरासम धवल नि मृदुतर ऐशा शयनांत ।
निजले असतां झाला उभयावरि विद्युत्पात ॥ १०३ ॥
मुनिदानाच्या सुकृतें उभयहि जन्मुनि तत्काल ।
देवकुरूत्तमभोगभूमिमधिं सुख मिळविति विपुल ॥ १०४ ॥
पात्रदानफल सुविपुल भोगिति तेथें पतिपत्नी ।
यास्तव द्यावें दान सुपात्रा भव्यें अतियत्नीं ॥ १०५ ॥
सुभोगभूचें जीवन सरतां स्वर्गीं जनन मिळे ।
भोग, सुदानें बहुविध मिळतीं दुःख सदैव गळे ॥ १०६ ॥
नाथा ! गेले रावण-लक्ष्मण तिसऱ्या नरकांत ।
पापान्तीं ते कोठें जातिल मज सांगा मात ॥ १०७ ॥

---

१ निर्मनुष्यस्थानीं. २ विजेचें पडणें.

[ श्रीरामकेवली रावण, लक्ष्मण व अच्युतेन्द्र यांच्या
भाविभवांचें कथन करितात. ]

माझा जन्महि कोठें होइल हें मज सांगावें ।
पुण्यप्रद हें सुचरित अपुलें सन्तें नित गावें ॥ १०८ ॥
देवेन्द्राच्या प्रश्ना ऐकुनि कथिती भाविभवा[1] ।
सर्वज्ञप्रभु राघव नित जे ठेविति समभावा ॥ १०९ ॥
होउनि तिसऱ्या च्युत नरकाहुनि रावण लक्ष्मण हे ।
विजयावतिपुरिं जनना घेतिल सुविभव ज्या पाहे ॥ ११० ॥
सुनन्द नामक असेल नान्दत सम्यग्दृष्टि जिथें ।
असेल पत्नी ज्याला रोहिणि ज्यांची गति सुपथें ॥ १११ ॥
वैश्यदम्पती यांना होतिल आत्मज हे दोघे ।
अर्हद्दास नि ऋषिदासाभिध धर्मीं चित्त रिघे ॥ ११२ ॥
पञ्चेन्द्रियसुख भोगुनि उभयहि पुनरपि वैश्यकुलीं ।
घेतिल जन्मा यश पसरेलचि विस्तृत भूमितलीं ॥ ११३ ॥
सुपात्रदानें उद्भवतिल ते उभय हरिक्षेत्रीं ।
पुष्कळ सौख्यें मिळतिल त्यांना दानें सत्पात्रीं ॥ ११४ ॥
जीवन सरतां च्युत ते होतिल उभयहि तेथून ।
स्वर्गीं सुजनन[2] होइल त्यांचें सौख्यहि अन्यून ॥ ११५ ॥
प्रच्युत होउनि तेथुनि विजयावतिपुरिं नृपपुत्र ।
कुमार आणिक सुकीर्ति यांच्या उदरीं गुणसत्र[3] ॥ ११६ ॥
जय नि जयप्रभ नामें उद्भट बहु-सद्गुणशाली ।
होतिल त्यांच्यासम नच कोणी अनुपम त्या कालीं ॥ ११७ ॥
करितिल दोघे दीक्षा घेउनि तीव्र तपश्चरण ।
लान्तवनाकीं दिव्यसुखाचें ये त्या अनुभवन ॥ ११८ ॥
हे सीतेन्द्रा अच्युत ऐशा स्वर्गापासून ।
होऊन च्युत भरतक्षेत्रीं होइल तव जनन ॥ ११९ ॥
होशिल तूं वा षट्खण्डाधिप चक्री नयशाली ।
'सर्वरत्नपति' या नांवाचा विक्रमनीतिवली ॥ १२० ॥

१ भविष्यकालीनजन्म. २ जन्म. ३ गुणांचे आश्रयस्थान.

स्वर्गच्युत ते जय नि जयप्रभ होतिल तव पुत्र ।
इन्द्ररथ नि घनरथ या नामें विक्रम-नय-पात्र ॥ १२१ ॥
प्रतिनारायण रावण होता आधीं बलशाली ।
त्रिखण्डचक्री ज्याच्या राज्यीं कधिंही नैव कलि ॥ १२२ ॥
जी परललना इच्छित नाहीं तिजला त्यागीन ।
ऐसें सुव्रत ज्यानें धरिलें दुःखहि साहून ॥ १२३ ॥
या व्रतरक्षणिं केला ज्यानें स्वजीवितत्याग ।
इन्द्ररथाभिधतनुज जहाला भोगी बहु भोग ॥ १२४ ॥
धर्मपरायण नव्हता त्याच्यासम नच जन कोणी ।
निघते हितकर यद्वदनांतुनि सन्तत जिनवाणी ॥ १२५ ॥
तो पशुनारकवर्जित कांहीं जन्मा मिळवून ।
नृभवीं दुर्लभ तीर्थंकरपद मिळविल गुणपूर्ण ॥ १२६ ॥
पूजिल त्याला त्रैलोक्यांतिल सज्जनगण सारा ।
मोहादिक अरि नष्टचि होतिल हें मनिं अवधारा ॥ १२७ ॥
रत्नस्थलपुरिं राज्य इन्द्ररथ करुनी होईल ।
सुविरत दीक्षा घेउनि सुतपा करिल यति प्रबल ॥ १२८ ॥
तीव्रतपानें अहमिन्द्राचें पद त्या लाभेल ।
'वैजयन्त'[1] या अनुत्तरामधिं लेश्या ज्या धवल ॥ १२९ ॥
हे सीतेन्द्रा स्वर्गापासुनि भरतीं अवतरुन ।
गणधर होशिल त्या जिनपतिचा ऋद्ध्यष्टकपूर्ण[2] ॥ १३० ॥
नन्तर तुजला हे अमरेन्द्रा मुक्तिश्री वरिल ।
स्ववृत्त ऐकुनि पावे मोदा सुरपति मनिं अतुल ॥ १३१ ॥
कथिलें नन्तर रामजिनानें लक्ष्मणचरितास ।
जाण मेघरथ चक्रिभवामधिं तव लघुपुत्रास ॥ १३२ ॥

[ लक्ष्मण कोठें तीर्थंकर होईल याचें श्रीरामकेवली
कथन करितात. ]

कांहीं सुन्दर फिरुनि भवामधिं सुधर्मसंयोगें ।
तीर्थंकराचें पद तो मिळविल लक्ष्मण हृदयीं घे ॥ १३३ ॥

---

१ दुसऱ्या अनुत्तरस्वर्गांत. २ बुद्धि, क्रिया, विक्रिया, तप, बल, औषध, रस व क्षेत्र अशा आठ ऋद्धींनीं पूर्ण.

पुष्करनामद्वीपविदेहक्षेत्रीं पुर एक ।
शतपत्रीसम[1] शतपत्राभिध सुन्दर अवलोक ॥ १३४ ॥
तेथें होइल तीर्थंकर तो योग्य अशा कालीं ।
मेरूवरती अभिषेकिल त्या भावें देवाली[2] ॥ १३५ ॥
चक्रेश्वरपद अर्हत्पदही तो विभु मिळवून ।
कर्मगणाला नाशुनि निजकरिं घेइल निर्वाण ॥ १३६ ॥
हे देवेन्द्रा मीही विहरुन या भारतवर्षीं ।
सप्तमवर्षीं जाइन मोक्षा लोकाच्या शीर्षीं ॥ १३७ ॥
यापरि ऐकुनि भाविभवांचें वर्णन सुर झाला ।
हर्षित अतिशय करि वन्दन तो रामपदाब्जाला ॥ १३८ ॥

[ अच्युतेंद्र अकृत्रिम जिनबिंबांना वंदन करून देवकुरुभोगभूमींत आपल्या भावाला भेटून नंतर स्वर्गांत गेला. ]

संशयविरहित होउनि विनयें करुनि नमस्कार ।
सुरगिरिं वन्दन करण्या गेला सुरपति साचार ॥ १३९ ॥
तेथें शाश्वत जिनबिम्बांना हर्षें नमन करी ।
जिननिर्वाणक्षेत्रें वन्दी ठेवुनि भाव उरीं ॥ १४० ॥
गेला नन्दीश्वर या द्वीपीं श्रीजिनबिम्बांना ।
वन्दन करि तो सुकृत मिळाया अवलम्बी त्यांना ॥ १४१ ॥
देवाधिप जिन हृदयीं ठेवी सन्तत अमरेश ।
मानी केवलिपद लाभे जणु अगणितगुणकोश ॥ १४२ ॥
अघकर्में जणु विलया गेलीं ऐसें मानून ।
स्वर्गा जाया उद्यत झाला घेउनि अमरगण ॥ १४३ ॥
स्वर्गीं जाण्यासमयीं मार्गीं हो भ्रातृस्मरण ।
भोगावनि जी सुरकुरुनामें करि तेथें गमन ॥ १४४ ॥
पूर्वभवीं जो भाऊ होता भामण्डल त्याला ।
प्रियसंभाषण केलें तेणें हृदयिं सुखी झाला ॥ १४५ ॥
तेथुनि गेला अच्युतकल्पीं धर्मप्रिय देव ।
सुरललनासुखभोगी बहु तो ठेवी शुभभाव ॥ १४६ ॥

---

१ शंभर पाकळ्याचें कमल. २ देवसमूह.

[ श्रीरामचंद्राच्या आयुष्याचें कथन. ]

श्रीरामाचे आगमिं कथिलें वर्णन आयूचें ।
वर्षें सतरा सहस्र निश्चित वदती बुध वाचें ॥ १४७ ॥
उंची त्याच्या देहीं होती सोळा चापांची ।
लक्ष्मणदेहीं तीच गणावी उक्ति असे साची ॥ १४८ ॥
पुण्य नि पातक या उभयांतिल अन्तर जाणून ।
त्यागा पापा ह्मणिं घ्या पुण्या होइल कल्याण ॥ १४९ ॥

[ श्रीरामचंद्रकेवली पंचवीस वर्षें धर्मोपदेश करून मुक्त झाले.]

जिनवरशासनिं धैर्यस्थिरता सन्तत ठेवून ।
श्रीमद्रामें जन्मजरामृतिशत्रु विदारून ॥ १५० ॥
नित्योत्तमसुख अतिशय दुर्लभ जिनप्रसादानें ।
मिळवियलें शुचि केवलबोधा[१] तेणें मोदानें ॥ १५१ ॥
श्रमणसुरासुर ज्याला वन्दिती गाति स्तुति करिती ।
त्रिजगच्छिखरीं अतिशय शोभे श्रीमद्रामयति ॥ १५२ ॥
जिनधर्माची करुनी सेवा मोदें श्रीराम ।
पांच नि विंशतिवर्षें विहरे अनन्तगुणधाम ॥ १५३ ॥
पांच पंधरा पांच वत्सरावधि जिनधर्मसुधा ।
भव्यजनांना पाजी जेणें झाला हर्ष बुधा ॥ १५४ ॥

[ ग्रंथकार व भव्यजन रामचंद्राला वंदन करितात. ]

संसाराच्या सर्व निदानां[२] विलया नेऊन ।
शुचिभावचि निजहृदयीं धरिला मग रामा नमन ॥ १५५ ॥
श्रेष्ठ मुनीश्वर परमयोगधर असे महावीर ।
भव्यजनांनो ऐशा रामा करा नमस्कार ॥ १५६ ॥

( आर्या– )

जिंकून सूर्यतेजा सुन्दर सम्पूर्ण चन्द्रबिम्बास ।
लज्जित केलें वन्दन करा सुभावें सदैव रामास ॥ १५७ ॥
पूर्वस्नेहा हृदयीं धरुनी उपसर्ग रामचन्द्रास ।
सीतेन्द्रानें केला रामें परि जिंकिलें समुद्रास ॥ १५८ ॥

---

१ केवलज्ञानाला– सर्वज्ञपणाला.  १ मिथ्यात्वादिक कारणांना.

ते क्षुब्ध नैव झाले निजात्मचिन्तेंत निरत होऊन ।
केवलबोधी[1] बनले त्या रामा मम असो सदा नमन ॥ १५९ ॥
श्रीरामचन्द्र होते अष्टम बलभद्र धवलदेहाचे[2] ।
ते निर्विकार झाले बल जिंकियलें तयें कुमोहाचें ॥ १६० ॥
अठरा हजार शीला हृदयीं ज्यानें दिलें सदा स्थान ।
सर्वचि उत्तर सुगुणा त्या रामपदाम्बुजा करा नमन ॥ १६१ ॥
अतिनिर्मलकीर्तीचा जगतां ज्ञानप्रदीप जो विलसे ।
त्या रामा मम वन्दन रूपें सम्पूर्ण जो विधूस[3] हसे ॥ १६२ ॥
जाळून सर्वकर्मा बनले जे गुणसमुद्र गतपार ।
चारित्र[4] पूर्ण ज्यांचें त्या श्रीरामा असो नमस्कार ॥ १६३ ॥
सगळे कषाय ज्यानें रिपुसम, मानून नाशिले घोर ।
जिनशासनांत झाला रत त्या रामास मम नमस्कार ॥ १६४ ॥
मिथ्यात्वादिक कर्में करिते ही धूळ मलिन जीवास ।
यतिवर्यें श्रीरामें नेली ती सर्व पूर्ण नाशास ॥ १६५ ॥
आत्मा त्यांनीं अपुला सद्दर्शन बोधचरितमय केला ।
वन्दन माझें रामा मुक्तिश्रीशीं अखण्ड करि लीला ॥ १६६ ॥

[ रामायण म्हणजे काय ? व तें ऐकणारांना व वाचणारांना प्राप्त होणारें फल. ]

रामाचें जें चेष्टित तेंचि तयाचें चरित्र बोलावें ।
रामायण त्या वदती तच्चरितीं निजमनास लावावें ॥ १६७ ॥
बलदेवाचें सुचरित दिव्य असे जे तयास भक्तीनें ।
निःसंशय मनि होउनि वाचे तें त्यास नाकमुक्तिस[5] ने ॥ १६८ ॥
जो ऐकतो सुभावें त्याचें आयुष्य खचित वाढतसे ।
लाभे पुण्य तयाला त्याच्या वैभव घरांत येत असे ॥ १६९ ॥
घेऊन खड्ग हातीं धावें मारावयास जरि रिपुही[6] ।
वैर तयाचें शमतें होउनि तो मित्र जातसे स्वगृहीं ॥ १७० ॥
जो धर्मार्थी पढतो लाभे येणें विशाल धर्म तया ।
जो इच्छितो यश तें लाभे इच्छा न जातसे वाया ॥ १७१ ॥

---

१ केवलज्ञानी– सर्वज्ञ. २ शुभ्र; गोरे. ३ चन्द्रास. ४ आचरण, शुभकार्ये. ५ स्वर्गास व मोक्षास. ६ शत्रु.

राज्यभ्रष्टा मिळतें राज्य न संशय तयांत तिळभरही ।
इष्टप्राप्ति तयाला होते जो इष्ट चिन्तितो हृदयीं ॥ १७२ ॥
इच्छी द्रव्य तयाला मिळतें तें पठन जो करी याचें ।
जायार्थी[1] जायेला पुत्रार्थी तो सुतास हें साचें ॥ १७३ ॥
क्लेशावांचुनि व्हावा लाभ मला सुखद लाभ त्यास घडे ।
जातां परदेशाला विघ्न न येतांचि कुशल पदरिं पडे ॥ १७४ ॥
अथवा पाठक याचा इच्छी याया जरी स्वदेशास ।
तत्कार्यसिद्धि होते विफला त्याची न होतसे आसे[2] ॥ १७५ ॥
पावे रोग विनाशा ग्रामीं नगरीं निवास जे करिती ।
पढतां रामायण हें त्यांची विलयास जातसे भ्रान्ति ॥ १७६ ॥
नक्षत्रासह असतिल सूर्यादिग्रह जरी महाकुटिल ।
ते प्रीतियुक्त होतिल वाचन याचें न होतसे विफल ॥ १७७ ॥
दुष्कृतशतें नि चिन्ता रामायणपाठकां न बाधिति त्या ।
अशिवें[3] असे जें कांहीं नाशे वाणी सदैव हो सत्या ॥ १७८ ॥
जें चांगलें मनामधिं ठेवी त्या रामकीर्तनासक्ता ।
तें लाभतेंचि सुन्दर देते दृढभक्ति सकल हो न वृथा ॥ १७९ ॥
जिनवरभक्ति अशीही बहुभवपापास नाशिते तूर्ण ।
सङ्कटसमुद्र जाइल तरून लाभेल जैनपद पूर्ण ॥ १८० ॥
चातुर्यपूर्ण आहे दिव्य पवित्राक्षरें असे रचिलें ।
नानाजन्म-क्लेशप्रद पापा नष्ट करित असलेलें ॥ १८१ ॥
नानाविध आख्यानें सत्पुरुषांच्या क्रिया इथें असती ।
भव्यजनानन्दाचें कारण हें पद्मचरित व्या चित्तीं ॥ १८२ ॥

[ हें रामायण कोणी कोणाला सांगितलें त्याचें कथन. ]

हें श्रीवीरजिनानें वन्दन करिती जया त्रिलोकजन ।
सांगितलें भव्यांनो याचें आपण करा सदा मनन ॥ १८३ ॥
हें इन्द्रभूतिगणिनें गौतमगणधर असे सुनाम जया ।
कथिलें जम्बुमुनीन्द्रा शिष्याचा शिष्य जो असेचि तया ॥ १८४ ॥
उत्तरवाग्मी शिष्या जम्बुमुनींच्या तयें असे कथिलें ।
हें पद्मचरित मङ्गल रत्नत्रयवृद्धिहेतु वदति भले ॥ १८५ ॥

---

१ पत्नीची इच्छा करणारा. २ आशा, इच्छा. ३ अहितकर.

सिद्धान्तज्ञगुरूंच्या परम्परेनें सुरेख रामकथा ।
चालत आली भव्यां सदैव ती दाखवोचि मुक्तिपथा ॥ १८६ ॥
इन्द्रगुरूंचे होते शिष्य दिवाकर यतीश धीमन्त ।
अर्हन्मुनि नांवाचे शिष्य तयांचे अतीव गुणवन्त ॥ १८७ ॥
लक्ष्मणसेनमुनीश्वर अर्हन्मुनिराजशिष्य मतिवन्त ।
रविषेण शिष्य त्यांचें रचिलें हें पद्मचरित विख्यात ॥ १८८ ॥

[ हें पद्मचरित रत्नत्रयदायक आहे म्हणून तें
वाचावें, ऐकावें व सांगावें. ]

हें रामचरित आहे कारण दर्शनविशुद्धि व्हायास ।
श्रवण तयाचें मिटवी भव्यांचा निश्चयें भवायास ॥ १८९ ॥
हें स्पष्ट परमनिर्मल रत्नत्रयदायि पापसंहारी ।
पुण्यातें वाढवितें रामासम वनवि शान्त अविकारी ॥ १९० ॥
श्रीराम-लक्ष्मणांचा शत्रु दशग्रीव जो तयाचें ही ।
चरित प्रसिद्ध आहे नाहीं माहित असा न नर पाही ॥ १९१ ॥
बलरामचरित कथितें पुण्य करावें असें समस्त जना ।
अशिवास दूर सारी भव्यजनांच्या करी पवित्र मना ॥ १९२ ॥
हरि नि प्रतिहरि यांचे चरितीं जें कलुष[1] तेंचि टाळावें ।
निजबुद्धीनें त्यांतिल हितकर जें तेंचि सज्जनें घ्यावें ॥ १९३ ॥
हितकर गुणसम्बन्धी, अशिव असे तें सदोष वर्जावें ।
विषयेच्छा अशिवा वरि खालीं राही शिवेंचि वर जावें ॥ १९४ ॥
असुनि हि विद्यापति हा परनारीच्छा धरून हृदयांत ।
रावण नरकीं गेला इतरांची काय हो असे मात ॥ १९५ ॥
असुनि स्त्रिया हजारो सुरनारीसम अपूर्व रूपवती ।
तृप्ति न त्याला झाली वळली नाशाकडे तदीयमति ॥ १९६ ॥
स्वस्त्री त्यागुनि पापी परनारीकर्दमांत[2] नर लोळे ।
दुःखार्णवी बुडे तो दोषाग्नीनें सदैव होरपळे ॥ १९७ ॥

[ भव्यांनो बलरामाच्या चरिताचें अनुकरण करा
म्हणजे तुम्हाला स्वर्ग व मोक्ष मिळेल. ]

---

१ पाप. २ परस्त्रीरूपी चिखलांत.

बलराममुख्य गेले ज्या सुपदीं भव्य हो तुम्ही हि चला ।
जिनभक्त नि सुचरित व्हा दृढतर त्यागा सदैव पापमला ॥ १९८ ॥
पुण्यानें उन्नतिपद मिळतें मनुजा सुसम्पदा लाभे ।
स्वर्मोक्षसौख्य मिळतें मुक्तिश्रीनें सदैव तो शोभे ॥ १९९ ॥

[ पापांचें फल. ]

पापाचें फल दुर्गतिदुःखचि ऐसा स्वभाव पापाचा ।
यास्तव पापा त्यागा संग कसा सुखद होय सापाचा ॥ २०० ॥
करणें कुकार्य पहिलें क्रोध असे दीर्घकाल टिकणारा ।
परपीडा देण्याचा वाहे हृदयांत सर्वदा वारा ॥ २०१ ॥
रुक्ष मुखांतुनि निघणें भाषण ऐसा स्वभाव ज्यांत असे ।
तो मानव मरणोत्तर दुःखद नरकांत दीर्घकाल वसे ॥ २०२ ॥

[ स्वर्ग व मोक्ष प्राप्त होण्याचीं कारणें. ]

करिती सदा सुकार्य स्वाभाविक विनय हृदयिं नर धरिती ।
शास्त्रीं श्रद्धान सदा शीलाला केधवा हि न त्यजिती ॥ २०३ ॥
सदय मुखांतुनि निघतें वाक्य अमत्सर मनीं सदा राहे ।
क्षुब्ध न हो मन कामें शान्ति जयांचें सदैव मन वाहे ॥ २०४ ॥
त्यांना दुःखित करणें देवासहि केधवाहि शक्य नसे ।
स्वर्गप्राप्ति तयांना अन्तीं मोक्षहि अवश्य भेटतसे ॥ २०५ ॥
धन, आरोग्य, सुखादिक कोणीही देति नैव कोणास ।
पूर्वसुपुण्यें मिळतें पुण्य करावें म्हणून सविशेष ॥ २०६ ॥
जरि देति अमर सौख्यें परन्तु ते तेधवाचि देतात ।
पदरीं पुण्य जयांचें सज्जन ऐसे सदैव हसतात ॥ २०७ ॥
बहु सांगणें कशाला प्रयत्न आपण करीत राहावें ।
शुभकर्मोदय होतां मिळतें फल हें मनीं सदा ध्यावें ॥ २०८ ॥
परमार्थप्राप्तीचे आचार्यांनीं उपाय सांगितले ।
सेवन करून त्यांचें तरून जाती भवार्णवास भले ॥ २०९ ॥

[ रामायणापासून हेय उपादेयाचें ज्ञान होतें. ]

जीवा विशुद्ध करण्या दक्ष असे पद्मचरित रमणीय ।
दाखवि रविप्रकाशासम हेयें जना तथा उपादेय ॥ २१० ॥

---

१ निर्मलस्वरूपाची प्राप्ति करून देण्यास. २ दाखवितें. ३ ग्रहण करण्यास योग्य.

[ संस्कृत पद्मपुराणाचा रचनाकाल. ]

वीरजिन मुक्त होउनि बाराशे चार ( १२०४ ) जाहलीं वर्षे ।
रविषेणें मास सहा रचिलें हें पद्मचरित बहुहर्षें ॥ २११ ॥

[ जिनशासनदेवतांना रविषेणाचार्यांची विनंति. ]

जिनशासनदेवीनो, या शास्त्रावरि सदा कृपा ठेवा ।
जिनभक्तीचा आपण द्यावा सन्तां सदैव शुभ ठेवा ॥ २१२ ॥

[ भव्यजनांनीं जिनवचनाचें रक्षण करुन लोकहित करावें. ]

जीवादिक वस्तूंच्या वचनाच्या रक्षणीं सदा दक्ष ।
भव्यजनांनो ठेवा जनहित-सद्भावनेंत नित लक्ष ॥ २१३ ॥

[ श्रीरविषेणाचार्यांची पाठकांना विनंति. ]

जें व्यञ्जनान्त किंवा स्वरान्त जें नाम पद्मचरितांत ।
सांगितलें मीं आपण शोधा होउन मनीं कृपावन्त ॥ २१४ ॥
अर्थास शब्द कथितो शब्दांनीं वाक्ययोजना होते ।
वाक्यगणांनीं रचिलें भव्यांचें शास्त्र सद्धिता करितें ॥ २१५ ॥
शास्त्रीं प्रमाण, लक्षण छन्दोऽलङ्कार आणि आगम हे ।
असती विबुधजनांनो, शोधा विज्ञप्ति मम अशी आहे ॥ २१६ ॥
निर्मलचित्तें बुधगण शोधोतचि पद्मचरित रविकृति ही ।
राहो भूमण्डलिं हें सन्तत जयवन्त अन्त ज्या नाहीं ॥ २१७ ॥
रविकृतपद्मपुराणीं श्लोकांचें जें प्रमाण बुध कथिती ।
अठरा हजार तेविस पाठकगण तें सदा धरा चित्तीं ॥ २१८ ॥
श्रीपार्श्वनाथतनयें जिनदासें श्रीजिनास वन्दून ।
रविकृत-पद्मपुराणा अनुवादीं आणिलें करा श्रवण ॥ २१९ ॥
संस्कृतभाषेमध्यें रविषेणांनीं रसाळ हा ग्रन्थ ।
'श्रीपद्मचरित' कथिला भव्यां दावावयास मुक्तिपथ ॥ २२० ॥
संक्षेपानें केला त्याचा अनुवाद मी मराठींत ।
पार्श्वसुतें जिनदासें आदर ठेवोत त्यांत नित सन्त ॥ २२१ ॥
आषाढ वद्य पहिल्या दिनीं समाप्तीस तो असे नेला ।
पूर्ण ग्रन्थ जहाला हृदयीं आनन्द विपुल उद्भवला ॥ २२२ ॥

द्विसहस्र[1]अधिक षोडश विक्रमसंवत्सरांत अनुवाद ।
पद्यमय-पद्मचरितीं देवो पाठक जनास बहु मोद ॥ २२३ ॥
वद्याषाढप्रतिपद्दिनिं झाला पूर्ण पद्य अनुवाद ।
शार्वरिसंवत्समयीं होवो सज्जनगणा सदा सुखद ॥ २२४ ॥
चोविसशे शायंशी[2] श्रीसन्मतिनिर्वाणवत्सरीं केला ।
अनुवाद पद्मचरितीं तेणें झाला प्रमोद बहु मजला ॥ २२५ ॥
श्रीजिनशासनसेवा या जिनदासाकडून दिनरात ।
होवो सन्मतिचरणीं करितो विज्ञप्ति वनुनि बहु मुदित ॥ २२६ ॥

---

१ विक्रमसंवत् २०१६. २ वीरनिर्वाणसंवत् २४८६.

# अनुवादकाचें वक्तव्य

देशमहाराष्ट्रामधिं सोलापुर नगर हें प्रसिद्ध असे ।
उपनाम फडकुले ज्या तेथें जिनदास मन्दबुद्धि वसे ॥ १ ॥
श्रीवंशीधरआदिकसद्गुरुचरणासमीप बोधलव ।
मजला प्राप्त जहाला तेणें उत्पन्न होय सद्भाव ॥ २ ॥
श्रीपार्श्वनाथ-पितृपदिं सुरभाषाज्ञान अल्प जें झालें ।
वंशीधरादिगुरुवरचरणांनीं तेंच विशद वाढविलें ॥ ३ ॥
या सर्वगुरुवरांचें स्मरण सदा मन्मनांत राहील ।
जोवरि देहीं माझ्या आत्मा आयुर्विराम न वरील ॥ ४ ॥
दोशीवंशसमुद्भवनेमिसुत श्रीहिरा हिरा[१] होता ।
जिनधर्मजला पाजुनि केली स्थिर ही खरेंच जिनजनता ॥ ५ ॥
धर्मज्ञानाभावीं जिनधर्मविनाश खचित होईल ।
यापरि चिन्तन हृदयीं करी हिराचन्द्र हा दयाशील ॥ ६ ॥
स्थापून पाठशाला, धर्मग्रन्थप्रकाशना करुन ।
धर्मप्रसार केला देउनही 'जैनबोधका' जनन ॥ ७ ॥
दोशीवंशविभूषण धर्मसखा रावजी सखाराम ।
श्रीजिनवाणीभूषण होते जे सकलसुगुणगणधाम[२] ॥ ८ ॥
माझ्यावरी तयांचा होता सुस्नेह त्यामुळें ग्रन्थ ।
अनुवादिले यथामति जे दाखवितात पन्थ निर्ग्रन्थ ॥ ९ ॥
जे धर्मवीर होते त्यांची पत्नी जिनेन्द्रधर्मरता ।
राजूबाई ज्यांची सुपात्रदानांत सतत तत्परता ॥ १० ॥
यांचे सुतयुग ज्यांचीं नांवें गोविन्द आणि अरविन्द ।
जिनधर्माचरणामधिं ज्यांना वाटे सदैव आनन्द ॥ ११ ॥

---

१ उन्हाळयांत नदी कोरडी पडली असतां तिच्या पात्रांत लोक खड्डा खणतात व त्यापासून त्यांना पाणी मिळतें. त्या खड्ड्याला हिरा म्हणतात. २ सर्वसद्गुणांचें घर.

पुत्र सखारामाचा ज्याचें शुभनाम रत्नचन्द्र[1] असे ।
धर्मांत रुचि जयाची ज्याचें यशपौर्णिमाविधूस हसे ॥ १२ ॥
या सर्वांनीं केलें पद्मपुराण-प्रकाशनीं दान ।
न्यायार्जितवित्ताचें त्यांचें होवो सदैव कल्याण ॥ १३ ॥
षोडशपुरादिनानापुरस्थ धार्मिकजनें असें केलें ।
साहाय्य वित्तदानें जिनेन्द्र त्यांचें करो सदैव भलें ॥ १४ ॥
जोंवरि या धरणीवरि सूर्य नि चन्द्र प्रकाश देतात ।
या पद्मपुराणाचें पठनश्रवण हि घडो अविश्रान्त ॥ १५ ॥

---

१ श्री. रत्नचन्द्र सखाराम शहा निम्गांवकर.